**सार्थ व्याकरणप्रबोधिनी**

**ॐ श्रीपरमात्मने नमः**

**श्रीमद्भगवद्गीता**

**अथ प्रथमोऽध्यायः**

धृतराष्ट्राला संशय आला की, धर्मक्षेत्राच्या माहात्म्याने दुर्योधन स्वयं धर्मपरायण होऊन पांडवांना अर्धे राज्य देण्यास तयार होईल अथवा त्या धर्मक्षेत्राच्या माहात्म्याने आपल्या स्वजनांचा वध, नरकप्राप्तीचा हेतु समजून युद्धापासुन परावृत्त होईल. म्हणून धृतराष्ट्र संजयाला विचारतो.

**धृतराष्ट्र उवाच** - धृतराष्ट्र म्हणाला -

**धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।**

**मामकाः पाण्डवाश्चैव किमकुर्वत सञ्जय ॥१॥**

**अन्वयः -** हे सञ्जय, धर्मक्षेत्रे, कुरुक्षेत्रे, समवेताः, युयुत्सवः, मामकाः, च, एव, पाण्डवाः, किम्, अकुर्वत ।

**अन्वयार्थः - हे सञ्जय -** हे संजया! **धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे** - धर्मभूमी असणाऱ्या कुरुक्षेत्रामध्ये **समवेताः** - एकत्रित झालेले **युयुत्सवः** - संग्रामाची इच्छा करणारे **मामकाः** - माझे पुत्र **च, एव** - आणि **पाण्डवाः** - पंडुचे पुत्र **किम्** - काय **अकुर्वत** - करते झाले?

**विवरण -** धृतराष्ट्राला संशय आला की, दुर्योधनाने कपटाने मिळवलेले राज्य धर्मक्षेत्राच्या माहात्म्याने स्वयं धर्मपरायण होऊन, पश्चात्तापपूर्वक पांडवांना दिले काय? अथवा पांडव पूर्वीच धार्मिक असल्याने दोन्ही पक्षांच्या हिंसेच्या भितीने युद्धातून परावृत्त झाले काय? मग तर माझ्या पुत्रांना सहजच राज्य प्राप्त होईल अशा प्रकारे स्वपुत्रांना राज्य प्राप्त व्हावे व पांडवांना राज्य प्राप्त होऊ नये याविषयी दृढतर उपाय न सुचल्यामुळे उद्विग्न होऊन धृतराष्ट्र संजयाला विचारतो की, माझे व पंडूचे पुत्र कुरुक्षेत्रामध्ये युद्ध करण्याकरिता गेलेले आहेत. ते त्या ठिकाणी काय करते झाले?

**व्याकरणम् - सञ्जय -** सम्+जि प्र.ग.प.प.+अच्=सञ्जय पु.संबो.ए.व. **धर्मक्षेत्रे** - धृ प्र.ग.उ.प.+मन्+धर्म+क्षि+ष्ट्रन्=क्षेत्र-धर्मक्षेत्र न.स.ए.व. **कुरुक्षेत्रे** - कुरुक्षेत्र न.स.ए.व. **समवेताः** - सम्+अव+इ द्वि.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **युयुत्सवः** - युध् च.ग.आ.प.+सन्+उ=युयुत्सु वि.पु.प्र.ब.व. **मामकाः** - अस्मत्+सम्बन्धार्थे अकच् प्रत्ययान्त सर्वनाम पु.प्र.ब.व. **च** - च उभयान्वयी अव्ययः **एव** - एव अव्ययः **पाण्डवाः** - पाण्डव पु.प्र.ब.व. **किम्** - प्रश्नार्थक सर्वनाम **अकुर्वत** - कृ अ.ग.उ.प.प्रथम भूतकाळ तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - धर्मक्षेत्रे** - धर्मप्रधानत्वाद् धर्मप्रदत्वाद् वा धर्मक्षयात् त्रायत इति वा धर्मक्षेत्रं धर्मस्य-पुण्यस्य क्षेत्रमिति धर्मक्षेत्रं तस्मिन् धर्मक्षेत्रे = 'ज्या क्षेत्रामध्ये धर्म प्रधान आहे अथवा जे धर्माला देणारे आहेत अथवा जे धर्मक्षयापासून रक्षा करते त्या क्षेत्राला धर्मक्षेत्र म्हटले जाते' धर्माचे-पुण्याचे क्षेत्र धर्मक्षेत्र त्या धर्मक्षेत्रामध्ये**(षष्ठी तत्पुरुष समासः) कुरुक्षेत्रे** - कुरूणाम्-कुरुवंशानां क्षेत्रमिति कुरुक्षेत्रं तस्मिन् कुरुक्षेत्रे

= कुरुचे-कुरुवंशाचे क्षेत्र ते कुरुक्षेत्र त्या कुरुक्षेत्रामध्ये(**षष्ठी तत्पुरुष समासः) मामकाः** - मम इम इति मामकाः = माझे हे असे माझ्या संबंधी(**संबंधार्थे तद्धित विग्रहः) पाण्डवाः -** पण्डोरपत्यानि-पुत्रा इति पाण्डवाः = पंडुचे अपत्य ते पांडव(**अपत्यार्थे तद्धित विग्रहः) सञ्जय** - रागद्वेषादिदोषान् सम्यक् प्रकारेण जयतीति सञ्जयस्तत्सम्बुद्धौ हे सञ्जय = रागद्वेषादि दोषांना चांगल्या प्रकाराने जिंकितो तो सञ्जय त्याचे संबोधनामध्ये हे सञ्जय(**विग्रहः) युयुत्सवः** - योद्धुमिच्छन्ति ये ते युयुत्सवः = युद्धाची इच्छा करणारे जे ते युयुत्सु(**विग्रहः) समवेताः** - समवायं प्राप्ताः-सन्नद्धा इति समवेताः = शस्त्र घेऊन युद्धाकरिता एकत्र झालेले **(विग्रहः)**

**सञ्जय उवाच** - संजय म्हणाला

**दृष्ट्वा तु पाण्डवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ।**

**आचार्यमुपसङ्गम्य राजा वचनमब्रवीत् ॥२॥**

**अन्वयः -** तु, तदा, राजा, दुर्योधनः, पाण्डवानीकम्, व्यूढम्, दृष्ट्वा, आचार्यम्, उपसङ्गम्य, (इदम्), वचनम्, अब्रवीत् ।

**अन्वयार्थः - तु -** परंतु **तदा** - त्या वेळी **राजा** - राजा **दुर्योधनः** - दुर्योधन **पाण्डवानीकम्** - पांडवांची सेना **व्यूढम्** - व्यूहरचनेने उभी असलेली **दृष्ट्वा** - पाहून **आचार्यम् उपसङ्गम्य** - द्रोणाचार्यांजवळ जाऊन **(इदम्)** - हे **वचनम्** - वचन **अब्रवीत्** - बोलला.

**विवरण** - त्यानंतर संजय धृतराष्ट्रास म्हणाला की, हे राजन्! कुरुक्षेत्रामध्ये दोन्ही पक्षांचे सैन्य एकत्र झालेले आहे अशा वेळी राजनीतिज्ञ दुर्योधन व्यूहरचनेने युक्त असलेल्या पांडव सैन्यास पाहून आश्चर्ययुक्त झाला व मनामध्ये विचार करू लागला, की आपल्या सैन्याचीही अशी व्यूहरचना झाली पाहिजे. त्या करिता तो आपले गुरु द्रोणाचार्यांजवळ जाऊन हे वचन त्यांना सांगू लागला.

**व्याकरणम् - तु** - तु उभयान्वयी अव्ययः **तदा** - तद्+दा=तदा अव्ययः **राजा** - राज्+कनिन्=राजन् पु.प्र.ए.व. **दुर्योधनः -** दुर्योधन पु.प्र.ए.व. **पाण्डवानीकम्** - पांडव पु. अन् द्वि.ग.प.प.+ईकन्=अनीक न. द्वि.ए.व. **व्यूढम्** - वि+उह् प्र.ग.उ.प.कर्म.भूतकाळवाचक धा.वि.न.द्वि.ए.व. **दृष्ट्वा** - दृश् प्र.ग.प.प.त्वान्त अव्ययः **आचार्यम्** - आ+चर् प्र.ग.प.प.+ण्यत्=आचार्य पु.द्वि.ए.व. **उपसङ्गम्य** - उप+सम्+गम् प्र.ग.प.प.ल्यबन्त अव्ययः **वचनम्** - वच् द्वि.ग.प.प.+ल्युट्=वचन न.द्वि.ए.व. **अब्रवीत्** - ब्रू द्वि.ग.प.प.प्रथम भूतकाळ तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - तदा** - तस्मिन् काले तदा = ज्या वेळी**(वि.) पाण्डवानीकम्** - पाण्डवानाम्-युधि ष्ठिरादीनाम्, अनीकम्-सैन्यम्-बलमिति पाण्डवानीकम् = पांडवांचे-युधिष्ठिरादिकांचे अनीक म्ह. सैन्य-बल असे पांडवसैन्य(**षष्ठी तत्पुरुष समासः) दुर्योधनः** - दुष्टं धनमेव मतिः-बुद्धिर्यस्य इति दुर्योधनः = दुष्ट धनच म ति-बुद्धि आहे ज्याची तो दुर्योधन(**विग्रहः**) यद्वा **दुर्योधनः** - दुष्टकर्मसु-दुर्व्यसनेषु धनं यस्य स दुर्योधनः = दुष्टकर्मामध्ये-दुर्व्यसनामध्ये ज्याचे धन आहे तो दुर्योधन**(वि.)** यद्वा **दुर्योधनः** - दुष्टतापूर्वकमर्जितं धनं येन स दुर्योधनः = दुष्टतापूर्वक अर्जित धन आहे ज्याच्याद्वारा तो दुर्योधन**(वि.)** यद्वा **दुर्योधनः** - दुःखेन युध्यतेऽसौ दुर्योधनः = ज्याच्या बरोबर युद्ध करणे कठीण आहे असा दुर्योधन**(वि.) वचनम्** - उच्यत इति वचनम् =

बोलले जाणारे ते वचन**(वि.)**

**आचार्य** - आचिनोति च शास्त्रार्थमाचारे स्थापयत्यपि। स्वयमप्याचरेद्यस्तु स आचार्य इति स्मृत: ॥

**अर्थ** = जो शास्त्राचे तात्पर्य गोळा करतो, निर्णय करतो, इतरांमध्ये स्थापित करतो आणि स्वत: शास्त्राप्रमाणे वागतो तो आचार्य म्हटला जातो.

पाण्डवसैन्य पाहण्याची द्रोणाचार्यांना दुर्योधनाची प्रार्थना -

**पश्यैतां पाण्डुपुत्राणामाचार्य महतीं चमूम्।**

**व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥३॥**

**अन्वय:** - आचार्य, तव, धीमता, शिष्येण, द्रुपदपुत्रेण, व्यूढाम्, पाण्डुपुत्राणाम्, एताम्, महतीम्, चमूम्, पश्य।

**अन्वयार्थ:** - **आचार्य** - हे द्रोणाचार्य **तव** - तुमचा **धीमता** - बुद्धिमान **शिष्येण** - शिष्य **द्रुपदपुत्रेण** - द्रुपुदाच्या पुत्राने **व्यूढाम्** - व्यूहरचना करून उभ्या असलेल्या **पाण्डुपुत्राणाम्** - पाण्डुपुत्रांच्या **एताम्** - या **महतीम्** - मोठ्या **चमूम्** - सैन्याला **पश्य** - पहा.

**विवरण** - धृष्टद्युम्न हा द्रुपदाचा पुत्र आहे आणि त्याने द्रोणाचार्यांजवळ धनुर्वेदाची विद्या प्राप्त केलेली आहे. म्हणून तो द्रोणाचार्यांचा शिष्य आहे. याकरिता दुर्योधन म्हणतो की, ''हे आचार्य! सर्व विद्यांमध्ये पारंगत असलेला तथा भस्मासुरासारखा आपल्याला भ्रम उत्पन्न करण्याकरिता उपस्थित असलेला आपला जो बु द्धिमान शिष्य धृष्टद्युम्न त्याने अशी आश्चर्ययुक्त सैन्याची व्यूहरचना केली आहे की, आमच्यापेक्षा पाण्डवांची सेना थोडी आहे. परंतु ती सेना आमच्यापेक्षा मोठी दिसत आहे. अशा या व्यूहरचनायुक्त उभ्या असलेल्या मोठ्या सैन्यास पहा.''

**व्याकरणम्** - **आचार्य** - आचार्य पु.संबो.ए.व. **तव** - युष्मत् सर्वनाम ष.ए.व. **धीमता** - धीमत् वि.पु.तृ.ए.व. मतुप् प्रत्ययान्त **शिष्येण** - शास्+क्यप्=शिष्य वि.पु.तृ.ए.व. **द्रुपदपुत्रेण** - द्रुपद पु. पुत्र पु.तृ.ए.व. **व्यूढाम्** - वि+उह् प्र.ग.उ.प.कर्मणि भूतकाळवाचक धा.वि.स्त्री.द्वि.ए.व. **पाण्डुपुत्राणाम्** - पाण्डुपुत्र पु.ष.ब.व. **एताम्** - एतत् सर्वनाम स्त्री.द्वि.ए.व. **महतीम्** - महती स्त्री.द्वि.ए.व. **चमूम्** - चमू स्त्री. द्वि.ए.व. **पश्य** - दृश् प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - द्रुपदपुत्रेण** - द्रुपदस्य पुत्र इति द्रुपदपुत्रस्तेन द्रुपदपुत्रेण = द्रुपदाचा पुत्र असा द्रुपदपुत्र त्या द्रपदपुत्राने**(षष्ठी तत्पुरुष समास:) पाण्डुपुत्राणाम्** - पण्डो: अपत्यानि-पुमांस: पाण्डुपुत्रास्तेषां पाण्डुपुत्राणाम् = पण्डुचे अपत्य-पुत्र पाण्डुपुत्र त्या पाण्डुपुत्रांचे**(षष्ठी तत्पुरुष समास:) धीमता** - धी:-सूक्ष्मबुद्धिरस्यास्तीति धीमान् तेन धीमता = सूक्ष्मबुद्धि आहे ज्याची असा बुद्धिमान त्या बुद्धिमानाने**(अस्यार्थे तद्धित विग्रह:)**

पाण्डव सैन्यातील प्रमुख योद्ध्यांची नांवे -

**अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि।**

**युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथ: ॥४॥**

**अन्वयः -** अत्र, महेष्वासाः, शूराः, युधि, भीमार्जुनसमाः, युयुधानः, च, विराटः, च, महारथः, द्रुपदः ।

**अन्वयार्थः - अत्र -** येथे (सैन्यामध्ये) **महेष्वासाः -** ज्यांनी मोठमोठी धनुष्ये धारण केलेली आहेत असे **शूराः -** शूर-वीर **युधि -** युद्धामध्ये **भीमार्जुनसमाः -** भीम आणि अर्जुन यांच्यासारखे **युयुधानः -** सात्यकी **च -** आणि **विराटः -** विराट राजा **च -** आणि **महारथः द्रुपदः -** महारथी द्रुपद राजा.

**विवरण -** त्या व्यूहरचनायुक्त पाण्डवसैन्यामध्ये असे मोठमोठ्या धनुष्याने युक्त भीम व अर्जुन यांच्या तोडीचे असलेले जे धनुर्धारी शूर-वीर त्यांची नावे दुर्योधन द्रोणाचार्यांजवळ सांगत आहे. ती अशी युयुधान-सात्यकी-अर्जुनाचा शिष्य, यादव वंशीय राजा शनिचा पुत्र महारथ, मत्स्य देशाचा धार्मिक राजा विराट, पांचाल देशाचा राजा पृषताचे पुत्र महारथ द्रुपद.

**व्याकरणम् - अत्र -** इदम्/एतद्+त्रल्=अत्र सप्तम्यन्त तद्धित अव्ययः **महेष्वासाः -** महा वि. इषु+अस् च.ग.प.प.+घञ्=आस-इष्वास पु.प्र.ब.व. **शूराः -** शूर पु.प्र.ब.व. **युधि -** युध् च.ग.आ.प.+क्विप्=युधि स्त्री.स.ए.व. **भीमार्जुनसमाः -** भीम पु. अर्जुन पु. सम पु.प्र.ब.व. **युयुधानः -** युयुधान पु.प्र.ए.व. **च -** च उभयान्वयी अव्ययः **विराटः -** विराट पु.प्र.ए.व. **च -** च उभयान्वयी अव्ययः **महारथः -** महा+रथ वि.पु.प्र.ए.व. **द्रुपदः -** द्रुपद पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - महेष्वासाः -** इषवोऽस्यन्ते क्षिप्यन्ते एभिरितीष्वासाः-कोदण्डास्ते महान्तो येषां ते महेष्वासाः = ज्यांच्याद्वारा इषु-बाण फेकल्या जातात त्यांचे नाव इष्वास आहे ज्यांचे मोठे इष्वास-धनुष्य आहे ते महेष्वास**(षष्ठी बहुव्रीहि समासः) भीमार्जुनसमाः -** भीमश्चार्जुनश्चेति भीमार्जुनौ ताभ्यां बलेन पराक्रमेण च समा इति भीमार्जुनसमाः = भीम आणि अर्जुन असे भीमार्जुन त्यांच्यासारखे बलाने आणि पराक्रमाने असणारे असे ते भीमार्जुनसम**(द्वन्द्व गर्भित तृतीया तत्पुरुष समासः) महारथः -** महान् रथः-स्यन्दनो यस्य स महारथः = मोठा आहे रथ ज्याचा तो महारथ**(षष्ठी बहुव्रीहि समासः) शूराः -** विक्रान्तानपि श्रृणन्तीति शूराः = मोठ मोठ्या विक्रान्त पुरुषालाहि मारणारे म्हणूनच ते शूर**(विग्रहः) अत्र -** अस्मिनित्यत्र-युद्धस्थले वा सैन्ये = अत्र-युद्धस्थलामध्ये किंवा सैन्यामध्ये**(तद्धितविग्रहः) युयुधानः -** पुनः पुनरतिशयेन युध्यत इति युयुधानः = पुन्हा पुन्हा किंवा अत्यंत लढणारा असा युयुधान**(विग्रहः) विराटः -** शत्रून् विशेषेण रटयतीति विराटः = शत्रूंना विशेष रूपाने रटणारा-पळविणारा असा तो विराट**(विग्रहः) द्रुपदः -** द्रुर्वृक्षः पदं ध्वजे चिह्नं यस्य स इ ति द्रुपदः = ज्याच्या ध्वजाचे चिन्ह वृक्ष आहे असा द्रुपद**(विग्रहः)**

**धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ।**

**पुरुजित्कुन्तिभोजश्च शैब्यश्च नरपुङ्गवः ॥५॥**

**अन्वयः -** धृष्टकेतुः, चेकितानः, च, वीर्यवान्, काशिराजः, नरपुङ्गवः, पुरुजित्, च, कुन्तिभोजः, च, शैब्यः ।

**अन्वयार्थः - धृष्टकेतुः -** धृष्टकेतु **चेकितानः -** चेकितान **च -** आणि **वीर्यवान्, काशिराजः -** बलवान् का शिराजा **नरपुङ्गवः पुरुजित् -** नरश्रेष्ठ वीर पुरुजित **च -** आणि **कुन्तिभोजः -** कुन्तिभोज **च -** आणि **शैब्यः -** शैब्य.

**विवरण -** चेदी देशाचा राजा शिशुपालाचा पुत्र धृष्टकेतु, वृष्णिवंशीय यादव महारथी योद्धा तथा मोठा

पराक्रमी चेकितान, काशीचा राजा काशीराज, कुन्तीचे भाऊ पुरुजित् व कुन्तिभोज म्हणजे पांडवांचे मामे त्याचप्रमाणे धर्मराज युधिष्ठिराचा सासरा शैब्य.

**व्याकरणम्** - **धृष्टकेतुः** - धृष् पं.ग.प.प.कर्मणि भू.धा.वि. केतु पु.प्र.ए.व. **चेकितानः** - चेकितान पु.प्र.ए.व. **च** - च उभयान्वयी अव्ययः **वीर्यवान्** - वीर्यवत् वि.पु.प्र.ए.व. **काशिराजः** - काशिराज पु.प्र.ए.व. **नरपुङ्गवः** - नर पु. पुङ्गव पु.प्र.ए.व. **पुरुजित् -** पुरु+जित् पुरुजित् वि.पु.प्र.ए.व. **च** - च उभयान्वयी अव्ययः **कुन्तिभोजः** - कुन्तिभोज पु.प्र.ए.व. **च -** च उभयान्वयी अव्ययः **शैब्यः** - शैब्य पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - काशिराजः** - काशो ब्रह्मतत्त्वप्रकाशो यस्यां निवसतां सुलभः सा काशी काश्या राज इति काशिराजः = ज्या काशीमध्ये निवास करणाऱ्याला ब्रह्मतत्त्वाचा प्रकाश सुलभ आहे ती काशी असा का शिराज**(षष्ठी तत्पुरुष स.) नरपुङ्गवः -** नराणां नरेषु वा पुङ्गवः-श्रेष्ठ इति नरपुङ्गवः = मनुष्यांमध्ये श्रेष्ठ**(षष्ठी/सप्तमी तत्पुरुष स.) धृष्टकेतुः** - धृष्टः-परभयंकरः-शत्रुविनाशकः केतुः-पताकाचिन्हं यस्य स धृष्टकेतुः = शत्रूंना रणभूमीवर भयभीत करण्याकरिता पताकाचिन्ह आहे ज्याचेजवळ तो धृष्टकेतु**(षष्ठी बहुव्रीहि स.) वीर्यवान्** - प्रशस्तं वीर्यमस्यास्तीति वीर्यवान् = चांगला पराक्रम-बल आहे ज्याचे असा तो वीर्यवान**(तद्धित विग्रहः)** यद्वा **वीर्यवान्** - तेजोबलविक्रान्तानपि शत्रून्विविधमीरयति पलाययतीति वीरस्तस्य कर्म वीर्यं तदस्यास्तीति वीर्यवान् = जो शत्रू तेज आणि बलाने अधिक आहे त्यांना सुद्धा पळून लावतो त्याचे नाव वीर आहे वीराचे कर्म वीर्य ज्याचे तो वीर्यवान**(अस्यार्थे तद्धित विग्रहः) शैब्यः** - शिबेर्गोत्रापत्यम्-पुमानिति शैब्यः-राजविशेषः = शिबी गोत्राचे अपत्य-पुरुष असा तो शैब्य-एक राजा**(अपत्यार्थे तद्धित विग्रहः) पुरु जित् -** युद्धे पुरून् बहून्जयतीति पुरुजित् = युद्धामध्ये सर्वांना जिंकतो असा तो पुरुजित**(उपपद समासः) चे कितानः** - चिकितानस्यापत्यं चेकितानो वीर्यवान्-राजविशेषः = चिकितानाचा अपत्य-पुत्र चेकितान **(अपत्यार्थे तद्धित विग्रहः)**

**युधामन्युश्च विक्रान्त उत्तमौजाश्च वीर्यवान् ।**

**सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥६॥**

**अन्वयः** - विक्रान्तः, युधामन्युः, च, वीर्यवान्, उत्तमौजाः, सौभद्रः, च, द्रौपदेयाः, सर्वे, एव, महारथाः ।

**अन्वयार्थः - विक्रान्तः** - पराक्रमी **युधामन्युः** - युधामन्यु **च** - आणि **वीर्यवान् उत्तमौजाः** - बलवान उत्तमौजा **सौभद्राः** - सुभद्रा पुत्र अभिमन्यु **च** - आणि **द्रौपदेयाः -** द्रौपदीचे पांच पुत्र **सर्वे एव महारथाः -** हे सर्वच महारथी आहेत.

**विवरण -** पांचाल देशाचे पराक्रमी दोन्ही भाऊ राजकुमार युधामन्यु आणि शक्तिमान उत्तमौजा हे अर्जुनाच्या रथाच्या चाकांचे रक्षण करण्यासाठी नेमले होते. भगवान कृष्णाची बहीण सुभद्रा हिचा पुत्र अभिमन्यु तसेच द्रौपदीचे पांच पुत्र प्रतिविन्ध्य, सुतसोम, श्रुतकीर्ति, शतानीक आणि श्रुतकर्मा हे सर्वच महारथी आहेत. युद्धामध्ये जो वीर एकटाच दहा हजार धनुर्धारी सैन्याचे संचालन करू शकतो अशा वीर पुरुषास महारथी म्हणतात.

**व्याकरणम् - विक्रान्तः -** विक्रान्त वि.पु.प्र.ए.व. **युधामन्युः -** युधामन्यु पु.प्र.ए.व. **च** - च उभयान्वयी

अव्यय: **सौभद्र: -** सौभद्र पु.प्र.ए.व. **च -** च उभयान्वयी अव्यय: **द्रौपदेया:** - द्रौपदी+ढक्-एय=द्रौपदेय पु.प्र.ब.व. **सर्वे -** सर्व सर्व.पु.प्र.ब.व. **एव** - एव क्रियाविशेषण अव्यय: **महारथा:** - महारथ वि.पु.प्र.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **उत्तमौजा: -** उत्तममोज:-बलं यस्य स उत्तमौजा: = उत्तम बल आहे ज्याचे तो उत्तमौजा **(षष्ठी बहुव्रीहि स.) सौभद्र: -** सुभद्राया अपत्यं पुमान् सौभद्र:-अभिमन्यु: = सुभद्रेचे अपत्य-पुत्र अभिमन्यु **(विग्रह:) द्रौपदेया:** - द्रौपद्या अपत्यानि-पुमांसो द्रौपदेया:-प्रतिविन्ध्यादय: = द्रौपदीचे अपत्य-पुत्र द्रौपदेय-प्रतिविंध्य, श्रुतसेन, श्रुतकीर्ति, शतानीक आणि श्रुतकर्मा**(अपत्यार्थे तद्धित विग्रह:) युधामन्यु:** - युधायाम्-युद्धे मन्यु:-कोपवेगो यस्य स युधामन्यु: = युद्धामध्ये क्रोधाचा वेग ज्याचा तो युधामन्यु**(षष्ठी बहुव्रीहि स.)**

कौरवसैन्यातील वीरांची माहिति ऐकण्याची द्रोणाचार्याला विनंती -

**अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम ।**

**नायका मम सैन्यस्य सञ्ज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥७॥**

**अन्वय:** - तु, अस्माकम्, ये, विशिष्टा:, मम, सैन्यस्य, नायका:, तान्, निबोध, द्विजोत्तम, ते, सञ्ज्ञार्थं, तान्, ब्रवीमि ।

**अन्वयार्थ: - तु** - परंतु **अस्माकम्** - आमच्यामध्ये **ये विशिष्टा:** - जे विशिष्ट आहेत **मम सैन्यस्य नायका:** - माझ्या सैन्याचे नेते आहेत **तान् -** त्यांना **निबोध** - आपण जाणा **द्विजोत्तम** - हे द्विजोत्तमा! **ते** - तुम्हाला **सञ्ज्ञार्थम्** - स्मरणार्थ-कळावीत म्हणून **तान्** - त्यांची नावे **ब्रवीमि** - मी सांगतो.

**विवरण -** हे ब्राह्मणश्रेष्ठ! आपल्यातील जे महत्वाचे आहेत ते जाणून घ्या. आपल्या माहितीसाठी माझ्या सैन्याचे जे जे सेनापती आहेत ते मी आपल्याला सांगतो.

**व्याकरणम् - तु** - तु उभयान्वयी अव्यय: **अस्माकम्** - अस्मत् सर्व.ष.ब.व. **ये** - यत् सर्व.पु.प्र.ब.व. **विशिष्टा:** - वि+शिष् स.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **मम** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **सैन्यस्य** - सैन्य न.ष.ए.व. **नायका:** - नी प्र.ग.उ.प.+ण्वुल्=नै+अक=नायक पु.प्र.ब.व. **तान्** - तत् सर्व.पु.द्वि.ब.व. **निबोध** - नि+बुध् प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **द्विजोत्तम** - द्विज पु. उत्तम वि.पु.संबो.ए.व. **ते** - युष्मत् सर्व.पु.च.ए.व. **सञ्ज्ञार्थम्** - सञ्ज्ञा स्त्री. अर्थम् अव्यय: **तान्** - तत् सर्व.पु.द्वि.ब.व **ब्रवीमि** - ब्रू द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - द्विजोत्तम** - द्विजानाम्-ब्राह्मणानां वा द्विजेषु-ब्राह्मणेषु वा उत्तम:-श्रेष्ठो द्विजोत्तमस्तत्सम्बुद्धौ हे द्विजोत्तम = द्विजांचा-ब्राम्हणांचा किंवा द्विजांमध्ये-ब्राम्हणांमध्ये उत्तम-श्रेष्ठ तो द्विजोत्तम त्याचे संबोधनामध्ये हे द्विजोत्तम**(षष्ठी/सप्तमी तत्पुरुष स.) विशिष्टा:** - विशेषेण-विशेषरूपेण शिष्टा:-विशिष्टा:-विद्याबलपौरुषपराक्रमकुलशीलादिभि: प्रसिद्धा: = विशेषाने-विशेषरूपाने जे शिष्ट ते विशिष्ट विद्या, बल, पौरुष, पराक्रम, कुल आणि शील यांच्याद्वारा प्रसिद्ध**(तृतीया तत्पुरुष स.) नायका: -** नयन्तीति नायका:-नेतार: = मार्गदर्शन करणारे ते नायक-नेता**(विग्रह:) सञ्ज्ञार्थम्** - सञ्ज्ञा-स्मरणमर्थ:-प्रयोजनं यस्य वचनस्य तत्सञ्ज्ञार्थम् = संज्ञा-स्मरण अर्थ-प्रयोजन ज्याच्या वचनाचे ते संज्ञार्थ अर्थात् तुम्हाला स्मरण व्हावे याकरिता**(वि.)** यद्वा **सञ्ज्ञार्थम्** - सम्यग् ज्ञायत इति संज्ञा तस्या अर्थम्-प्रयोजनमिति सञ्ज्ञार्थम् = चांगल्या प्रकारे जाणल्या जाते ती संज्ञा तिचा अर्थ-प्रयोजन असे सञ्ज्ञार्थ**(वि.)**

कौरव सेनेतील वीरांची नांवे -

**भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिञ्जयः ।**

**अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥८॥**

**अन्वयः** - भवान्, च, भीष्मः, च, कर्णः, च, समितिञ्जयः, कृपः, च, तथा, एव, अश्वत्थामा, विकर्णः, च, सौमदत्तिः ।

**अन्वयार्थः - भवान् -** आपण(द्रोणाचार्य) **च** = आणि **भीष्मः** - भीष्माचार्य **च** - आणि **कर्णः** - कर्ण **च** - आणि **समितिञ्जयः कृपः** - संग्रामविजयी कृपाचार्य **च** - आणि **तथा** - त्याचप्रमाणे **एव** - ही **अश्वत्थामा** - अश्वत्थामा **विकर्णः** - विकर्ण **च** - आणि **सौमदत्तिः** - सोमदत्ताचा पुत्र भूरिश्रवा.

**विवरण** - दुर्योधन आपल्या सैन्यामध्ये असलेल्या प्रमुख योद्ध्यांची नावे द्रोणाचार्यांना सांगत आहे ती अशी -आपण स्वतः, शंतनुपुत्र भीष्म, कर्ण, गौतमवंशीय महर्षि शारद्वानाचे पुत्र कृपाचार्य, आपला पुत्र अश्वत्थामा, धृतराष्ट्राचा पुत्र विकर्ण, शंतनूचे बंधु बाल्हीकाचे नातू तसेच सोमदत्ताचा पुत्र सौमदत्ती-भूरिश्रवा इत्यादि.

**व्याकरणम् - भवान्** - भवत् सर्व.पु.प्र.ए.व. **च** - च उभयान्वयी अव्ययः **भीष्मः** - भीष्म पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **कर्णः** - कर्ण पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **समितिञ्जयः** - सम्+इ+क्तिन्=समिति द्वि.ए.व.+जयः=समितिञ्जयः पु.प्र.ए.व. **कृपः** - कृप पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **तथा** - तद्+थाल्=तथा अव्ययः **एव** - एव क्रि.वि.अ. **अश्वत्थामा** - अश्वत्थामा पु.प्र.ए.व. **विकर्णः** - विकर्ण पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **सौमदत्तिः** - सौमदत्ति पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - समितिञ्जयः -** समितौ-संग्रामे वीरानपि जयतीति समितिञ्जयः = युद्धामध्ये शूरवीरांना सुद्धा जिंकतो असा तो समितिंजय**(सप्तमी तत्पुरुष स.) सौमदत्तिः** - सोमदत्तस्य अपत्यं पुमान् सौमदत्तिः = सोमदत्ताचा पुत्र तो सौमदत्त-भूरिश्रवा**(अपत्यार्थे तद्धित विग्रहः) भीष्मः** - बिभेति यस्मादिति भीष्मः = ज्यापासून शत्रू भिवून पळतात तो भीष्म**(विग्रहः) अश्वत्थामा -** अश्नुते व्याप्नोति एतादृशं स्थाम-बलं यस्य स यद्वा अश्नाति वैरिणो भक्षयति येन एतादृशं स्थाम-बलं यस्य सोऽश्वत्थामा = सर्वांना व्याप्त करतो एवढे स्थाम -बल आहे ज्याचे तो अथवा ज्याच्याकडून शत्रू भक्षण केल्या जातात असे या समान बल आहे ज्याचे तो अश्वत्थामा**(बहुव्रीहि स.)**

**अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ।**

**नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥९॥**

**अन्वयः** - च, अन्ये, मदर्थे, त्यक्तजीविताः, बहवः, शूराः, नानाशस्त्रप्रहरणाः, च, सर्वे, युद्धविशारदाः ।

**अन्वयार्थः - च** - आणि **अन्ये** - दुसरे **मदर्थे** - माझ्याकरिता **त्यक्तजीविताः** - जे आपल्या जीवनाचा त्याग करण्यास तयार झाले आहेत असे **बहवः** - पुष्कळ **शूराः** - वीर **नानाशस्त्रप्रहरणाः** - नाना प्रकारच्या शस्त्रांनी सज्ज **च** - आणि **सर्वे -** सर्व **युद्धविशारदाः** - संग्रामामध्ये कुशल असणारे.

**विवरण -** त्याचप्रमाणे इतर सर्व शत्रु जयद्रथादि वीरांचा नामोल्लेख न करता परंतु त्यांचे वैशिष्ट्य सांगताना

दुर्योधन म्हणतो कि, हे आचार्य! मी आपणास ज्या वीरांचा संकेत सुचविला ते व असे अनेक दुसरे शस्त्रसज्ज व युद्धनिपुण पुष्कळ वीर आहेत की ज्यांनी माझ्याकरिता स्वत:चे जीविताचीही आशा सोडली आहे व रणांगणात उभे आहेत.

**व्याकरणम्** - **च** - च उभ.अ. **अन्ये** - अन्य सर्व.पु.प्र.ब.व. **मदर्थे** - मदर्थ पु.स.ए.व. **त्यक्तजीविता:** - त्यज् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. जीविता: जीव् प्र.ग.प.प.वि.पु.प्र.ब.व. इतच् प्रत्ययान्त **बहव:** - बहु वि.पु.प्र.ब.व. **शूरा:** - शूर पु.प्र.ब.व. **नानाशस्त्रप्रहरणा:** - नाना अव्यय: शस्त्र न. प्रहरण वि.पु.प्र.ब.व. **सर्वे** - सर्व सर्व.पु.प्र.ब.व. **युद्धविशारदा:** - युध् च.ग.आ.प.+कर्म.क्त=युद्ध न. विशारद वि.पु.प्र.ब.व.

**समासविग्रहार्था: - त्यक्तजीविता: -** त्यक्तानि जीवितानि यैस्ते त्यक्तजीविता: = ज्यांनी जीविताचा त्याग केलेला आहे असे ते त्यक्तजीवित**(तृतीया ब.स.) नानाशस्त्रप्रहरणा:** - नाना-विविधानि शस्त्राणि-प्रहरणानि शूलचक्रगदाखड्गपरिघादीनि प्रहरणसाधनानि येषां ते नानाशस्त्रप्रहरणा: = नाना प्रकारची शस्त्रे चक्रगदादि प्रहार करण्याची साधने ज्यांची ते नानाशस्त्रप्रहरण**(ष.ब.स.) युद्धविशारदा: -** युद्धे-संग्रामे विशारदा:-अति निपुणा इति युद्धविशारदा: = युद्धामध्ये अतिकुशल असे युद्धविशारद**(स.त.स.) मदर्थे** - मम अर्थ:-विजय सिद्धिस्तस्मिन्मदर्थे = माझा अर्थ-विजयसिद्धि त्या माझ्या अर्थामध्ये**(तद्धित वि.)**

दुर्योधनाद्वारा दोन्ही पक्षातील सैन्याची तुलना -

**अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् ।**

**पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥१०॥**

**अन्वय:** - भीष्माभिरक्षितम्, अस्माकम्, तत्, बलम्, अपर्याप्तम्, तु, भीमाभिरक्षितम्, एतेषाम्, इदम्, बलम्, पर्याप्तम् ।

**अन्वयार्थ: - भीष्माभिरक्षितम्** - भीष्म पितामहाकडून रक्षिले गेलेले **अस्माकम्** - आमचे **तत्** - ते **बलम्** - सैन्य **अपर्याप्तम्** - अपार असे आहे **तु** - परंतु **भीमाभिरक्षितम्** - भीमाकडून रक्षिलेले **एतेषाम् -** या पांडवांचे **इदम्** - हे **बलम्** - सैन्य **पर्याप्तम्** - फार थोडे आहे(मर्यादित आहे).

**विवरण** - दुर्योधन आपल्या सेनेचे वैशिष्ट्य व पांडवसेनेचे न्यूनत्व दाखवितांना म्हणत आहे की, 'हे आचार्य! भीष्म व आपणांसारख्या अनुभवी पुरुषांद्वारा संकलित असलेली (११)अकरा अक्षौहिणी संख्या असलेली आमची सेना अपार असून ती अजेय आहे. मात्र भीमासारख्या आडदांड व अनुभव नसलेल्या नायकाकडून रक्षित केलेली ही पांडवांची सेना मात्र मर्यादित असून आपणास जिंकण्यास सहज शक्य आहे. अर्थात् या युद्धामध्ये आपला विजय निश्चितच आहे.'

**व्याकरणम्** - **भीष्माभिरक्षितम्** - भीष्म पु. अभि+रक्ष् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **अस्माकम् -** अस्मत् सर्व.ष.ब.व. **तत्** - तत् सर्व.न.द्वि.ए.व. **बलम्** - बल न.प्र.ए.व. **अपर्याप्तम्** - अ+परि+आप् पं.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **तु** - तु उभ.अ. **भीमाभिरक्षितम्** - भीम पु. अभि+रक्ष् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **एतेषाम्** - एतत् सर्व.न.ष.ब.व. **इदम्** - इदम् सर्व.न.प्र.ए.व. **बलम्** - बल न.प्र.ए.व. **पर्याप्तम्** - परि+आप् पं.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - भीष्माभिरक्षितम् -** भीष्मेनाभिरक्षितमिति भीष्माभिरक्षितम् = भीष्मांनी रक्षित असे भीष्मा

भिरक्षित(**तृ.त.स.**) **भीमाभिरक्षितम्** - भीमेनाभिरक्षितमिति भीमाभिरक्षितम् = भीमाकडून रक्षित असे भीमा-भिरक्षित(**तृ.त.स.**) **अपर्याप्तम्** - न पर्याप्तमित्यपर्याप्तम् = नाही पर्याप्त असे अपर्याप्त(**न.त.स.**)

आपल्या सर्व वीरांना भीष्मांचे रक्षण करण्याची दुर्योधनाची आज्ञा -

**अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः ।**

**भीष्ममेवाभिरक्षन्तु भवन्तः सर्व एव हि ॥११॥**

**अन्वयः** - च, सर्वेषु, अयनेषु, यथाभागम्, अवस्थिताः, भवन्तः, सर्वे, एव, हि, भीष्मम्, एव, अभिरक्षन्तु ।

**अन्वयार्थः - च** - आणि **सर्वेषु** - सर्व प्रकारे **अयनेषु** - नियतस्थलामध्ये **यथाभागम्** - आपापली जागा न सोडता **अवस्थिताः** - एकाच जागेवर राहून **भवन्तः** - आपण **सर्वे एव हि** - सर्वांनीच **भीष्मम् एव हि** - केवळ भीष्माचेच **अभिरक्षन्तु** - सर्व बाजूंनी रक्षण करावे.

**विवरण** - द्रुपदाचा पुत्र शिखंडी हा पूर्वजन्मी स्त्री होता व भीष्माचा वध करण्यासाठी पुरुषरूपाने तो जन्माला आल्याने त्यास स्त्री समजून भीष्मांनी त्याच्याशी युद्ध करणार नसल्याचे जाहीर केले असल्याने भीष्मांचे रक्षण करणे अत्यावश्यक आहे, याची जाण दुर्योधनास आहे; म्हणून तो आपल्या सर्व वीरांना आवर्जून सांगत आहे की, आपण सर्वांनीच भीष्मांचे रक्षण करण्यासाठी प्रयत्नशील राहावे. (म्हणजेच शिखंडीस भीष्मासमोर येऊ न देण्याची दक्षता घ्यावी) कारण भीष्माचार्य हे सेनापती असून त्यांच्यावर आपला विजय अवलंबून आहे.

**व्याकरणम् - च** - च उभ.अ. **सर्वेषु** - सर्व सर्व.न.स.ब.व. **अयनेषु** - अय् प्र.ग.उ.प.+ल्युट्=अयन न.स.ब.व. **यथाभागम्** - यथाभाग पु.द्वि.ए.व. **अवस्थिताः** - अव+स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा. वि.पु.प्र.ब.व. **भवन्तः** - भवत् सर्व.पु.प्र.ब.व. **सर्वे** - सर्व सर्व.पु.प्र.ब.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **हि** - हि क्रि.वि.अ. **भीष्मम्** - भीष्म पु.द्वि.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **अभिरक्षन्तु** - अभि+रक्ष् प्र.ग.प.प.आज्ञार्थ तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - यथाभागम्** - भागम्-स्वं स्वं स्थलमनतिक्रम्येति यथाभागम् = आपापल्या भागाला-स्थलाला न सोडता न त्यागता म्हणजे यथाभाग(**अव्ययीभाव स.**)

दुर्योधनाच्या वाक्याने प्रसन्न होऊन भीष्माचार्यांची गर्जना व शंखनाद -

**तस्य सञ्जनयन्हर्षं कुरुवृद्धः पितामहः ।**

**सिंहनादं विनद्योच्चैः शङ्खं दध्मौ प्रतापवान् ॥१२॥**

**अन्वयः** - (ततः), कुरुवृद्धः, प्रतापवान्, पितामहः, तस्य, हर्षम्, सञ्जनयन्, उच्चैः, सिंहनादम्, विनद्य, शङ्खम्, दध्मौ ।

**अन्वयार्थः** - (**ततः** - त्यानंतर) **कुरुवृद्धः** - कौरवांमध्ये वृद्ध **प्रतापवान्** - प्रतापी **पितामहः** - पितामह भीष्मांनी **तस्य** - त्या दुर्योधनाचा **हर्षम्** - हर्ष **सञ्जनयन्** - उत्पन्न करणारा **उच्चैः** - उंच स्वराने **सिंहनादम्** - सिंहगर्जनेसमान आवाज **विनद्य** - करून **शङ्खम्** - शंख **दध्मौ** - वाजविला.

**विवरण** - द्रोणाचार्यांसमक्ष दुर्योधनाच्या सैन्य व वीरांच्या प्रसंशेचे व सर्वांचा उत्साह वाढविणारे, तसेच सर्वांनी केवळ भीष्मांचेच रक्षण करावे, हे बोलणे ऐकून संतुष्ट होऊन भीष्माचार्यांनीसुद्धा आपला प्रभाव व्यक्त करण्यासाठी व दुर्योधनाचा उत्साह व हर्ष वाढविण्याचे हेतूने सिंहगर्जनेप्रमाणे मोठ्याने गर्जना करून आपला शंख वाजविला.

**व्याकरणम् - कुरुवृद्धः** - कुरु पु. वृध् प्र.आ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **प्रतापवान्** - प्र+तप्+घञ्=प्रताप+मतुप्-वत्=प्रतापवान् वि.पु.प्र.ए.व. **पितामहः** - पितृ+डामहच्=पितामह पु.प्र.ए.व. **तस्य** - तत् सर्व.पु.ष.ए.व. **हर्षम्** - हर्ष पु.द्वि.ए.व. **सञ्जनयन्** - सम्+जन् च.ग.आ.प.+ णिच्+शतृ=सञ्जनयत् वि.पु.प्र.ए.व. **उच्चैः** - उच्चैस् क्रि.वि.अ. **सिंहनादम्** - सिंह पु. नाद पु.द्वि.ए.व. **विनद्य** - वि+नद् प्र.ग.प.प.ल्यबन्त अ. **शङ्खम्** - शम्+ख=शंख पु.द्वि.ए.व. **दध्मौ** - ध्मा प्र.ग.प.प.परोक्ष भूतकाल तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - सिंहनादम्** - सिंहस्य नाद इव नादमिति सिंहनादम् = सिंहाच्या नादासारखा नाद असा सिंहनाद**(उपमीत स.) कुरुवृद्धः** - कुरूणाम्-कुरुवंशानां वा कुरुषु वृद्धः कुरुवृद्धः = कुरुवंशाचा किंवा कुरुवंशामध्ये श्रेष्ठ**(ष./स.त.स.) प्रतापवान्** - प्रतापमस्त्यस्य प्रतापवान् = प्रताप आहे ज्याचा तो प्रतापवान् **(अस्त्यर्थे तद्धित वि.) सञ्जनयन्** - सञ्जयति-निर्माणयतीति सञ्जनयन् = उत्पन्न करणारा असा संजनयन् **(वि.)**

भीष्मांच्या पाठोपाठ कौरवसैन्यात शंख, भेरी, इ. रणवाद्यांचा जयघोष -

**ततः शङ्खाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः।**

**सहसैवाभ्यहन्यन्त स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥१३॥**

**अन्वयः** - ततः, शङ्खाः, च, भेर्यः, च, पणवानकगोमुखाः, सहसा, एव, अभ्यहन्यन्त, सः, शब्दः, तुमुलः, अभवत्।

**अन्वयार्थः - ततः** - त्यानंतर **शङ्खाः** - शंख **च** - आणि **भेर्यः** - नगारे **च** - आणि **पणवानकगोमुखाः** - ढोल, मृदंग, रणसिंग इ. वाद्ये **सहसा** - एकाएकी **अभ्यहन्यन्त** - वाजविले गेले **सः शब्दः** - तो आवाज **तुमुलः** - फार भयंकर **अभवत्** - झाला.

**विवरण** - भीष्माचार्यांनी केलेल्या सिंहनाद व शंखनादापाठोपाठ कौरवसैन्यात कोणी शंख, कोणी नगारे तसेच ढोल, मृदंग, रणशिंगे, झांजा, खंजिऱ्या इ. रणवाद्ये वाजवू लागले व त्या सर्व रणवाद्यांचा महाभयंकर ध्वनी निर्माण होऊन सर्व वातावरण दुमदुमून गेले.

**व्याकरणम्** - **ततः** - तद्+तसिल्=ततस् अ. **शङ्खाः** - शंख पु.प्र.ब.व. **च** - च उभ.अ. **भेर्यः** - भेरी स्त्री.प्र.ब.व. **च** - उभ.अ. **पणवानकगोमुखाः** - पणव पु. आनक पु. गोमुख पु.प्र.ब.व. **सहसा** - सहसा अ. **अभ्यहन्यन्त** - अभि+हन् द्वि.ग.प.प.लङ् प्र.भू.तृ.पु.ब.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **शब्दः** - शब्द पु.प्र.ए.व. **तुमुलः** - तुमुल वि.पु.प्र.ए.व. **अभवत्** - भू प्र.ग.प.प.प्र.भू.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **पणवानकगोमुखाः** - पणवाश्चाऽऽनकाश्च गोमुखाश्चेति पणवानकगोमुखाः = ढोल, खंजिऱ्या, मृदंग (पखवाज) असे पणवानकगोमुख**(इ.द्व.स.)**

श्रीकृष्णार्जुन व पांडवसेनेतील इतर वीर आपापले शंख वाजवू लागले -

**ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यन्दने स्थितौ ।**

**माधवः पाण्डवश्चैव दिव्यौ शङ्खौ प्रदध्मतुः ॥१४॥**

**अन्वयः -** ततः, श्वैतैः, हयैः, युक्ते, महति, स्यदने, स्थितौ, माधवः, च, पाण्डवः, एव, दिव्यौ, शङ्खौ, प्रदध्मतुः ।

**अन्वयार्थः - ततः** - सर्वांनी शंख वाजविल्यानंतर **श्वेतैः हयैः युक्ते** - पांढऱ्या घोड्यांनी युक्त अशा **महति स्यन्दने** - उत्तम रथावर **स्थितौ** - बसलेले **माधवः** - श्रीकृष्ण भगवान **च** - आणि **पाण्डवः** - अर्जुन **एव** - ही **दिव्यौ** - अलौकिक (देवलोकातील) **शङ्खौ** - शंख **प्रदध्मतुः** - जोराने वाजविते झाले.

**विवरण** - कौरवसैन्यात रणवाद्याचा आणि भीष्माचार्यांनी वाजविलेल्या शंखाचा मोठा आवाज ऐकून पांडव सैन्याच्या मध्यभागी पांढऱ्या घोड्यांनी युक्त अशा दिव्य रथावर विराजित भगवान श्रीकृष्ण तसेच अर्जुन यांनी युद्धाची घोषणा करून विलक्षण अलौकिक दिव्य शंख वाजविले.

**व्याकरणम् - ततः** - तसिल् प्रत्ययान्त तद्धित अनन्तरार्थक अ. **श्वेतैः** - श्वेत - वि.पु.तृ.ब.व. **हयैः** - हय पु.तृ.ब.व. **युक्ते** - युज् स.ग.उ.प./प.प.कर्म.भू.धा.वि.पु.स.ए.व. **महति** - महत् वि.पु.स.ए.व. **स्यन्दने** - स्यन्द् प्र.ग.आ.प.+ल्युट्=स्यन्दन पु.स.ए.व. **स्थितौ** - स्था प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.द्वि.व. **माधवः** - माधव पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **पाण्डवः** - पाण्डव पु.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **दिव्यौ** - दिव् च.ग.प.प.+यत्=दिव्य वि.पु.द्वि.द्वि.व. **शङ्खौ** - शंख पु.द्वि.द्वि.व. **प्रदध्मतुः** - प्र+ध्मा प्र.ग.प.प परोक्ष भू.तृ.पु.द्वि.व.

**समासविग्रहार्थाः - माधवः** - मायाः-लक्ष्म्याः, धवः-पतिरिति माधवः = मायेचा-लक्ष्मीचा धव-पति असा माधव**(ष.त.स.) पाण्डवः** - पण्डोरपत्यमिति पाण्डवः-अर्जुनः = पण्डुचे अपत्य असा पाण्डव-अर्जुन **(अपत्यार्थे तद्धित वि.)**

**पाञ्चजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनञ्जयः ।**

**पौण्ड्रं दध्मौ महाशङ्खं भीमकर्मा वृकोदरः ॥१५॥**

**अन्वयः -** हृषीकेशः, पाञ्चजन्यम्, धनञ्जयः, देवदत्तम्, (तथा), भीमकर्मा, वृकोदरः, पौण्ड्रम्, महाशङ्खम्, दध्मौ ।

**अन्वयार्थः - हृषीकेशः** - श्रीकृष्ण भगवंताने **पाञ्चजन्यम्** - पाञ्चजन्य नावाच्या शंखास **धनञ्जयः** - अर्जुनाने **देवदत्तम्** - देवदत्त नावाच्या शंखाला **भीमकर्मा वृकोदरः** - भयानक कर्मे आहेत ज्याची असा भीम त्याने **पौण्ड्रम्** - पौण्ड्र नावाच्या **महाशङ्खम् -** मोठ्या शंखाला **दध्मौ** - वाजविले.

**विवरण** - भगवान् श्रीकृष्णाने पाञ्चजन्य नावाच्या, अर्जुनाने देवदत्त नावाच्या दिव्य शंखास वाजविल्यानंतर भयंकर कर्मे करणाऱ्या भीमाने पौण्ड्र नावाच्या शंखास वाजविले.

**व्याकरणम् - हृषीकेशः -** हृषीकेश पु.प्र.ए.व. **पाञ्चजन्यम् -** पाञ्चजन्य पु.द्वि.ए.व. **धनञ्जयः** - धन+ जि+खच्+मुम्=धनञ्जय वि.पु.प्र.ए.व. **देवदत्तम् -** देवदत्त पु.द्वि.ए.व. **भीमकर्मा** - भीम न. कर्मन् न.

वि.पु.प्र.ए.व. **वृकोदरः -** वृकोदर पु.प्र.ए.व. **पौण्ड्रम् -** पौण्ड्र पु.द्वि.ए.व. **महाशङ्खम् -** महा वि. शंख पु. द्वि.ए.व. **दध्मौ** - ध्मा प्र.ग.प.प.परोक्ष भू.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - हृषीकेशः** - हृषीकाणाम्-इन्द्रियाणाम्, ईशः-स्वामी हृषीकेशः = इंद्रियांचा स्वामी हृषीकेश**(ष.त.स.) वृकोदरः** - वृक इव अथवा वृकवदुदरं यस्य स वृकोदरः-भीमः = वृक नावाच्या अ ग्निच्या समान उदर म्हणजे पोट आहे ज्याचे तो वृकोदर-भीम अथवा वृक नावाचा अग्नी ज्याच्या पोटात आहे असा वृकोदर**(ष.ब.स.) महाशङ्खम् -** महांश्चासौ शङ्खश्च महाशङ्खस्तं महाशङ्खम् = मोठा हा शङ्ख महाशङ्ख त्या महाशङ्खाला**(कर्म.स.) भीमकर्मा** - भीमम्-हिडिम्बवधादिरूपम् भयंकरम्, कर्म-कार्यं यस्य स इति भीमकर्मा = हिडिम्बासुराच्या वधादिरूप भयंकर कर्म-कार्य आहे ज्याचे तो भीमकर्मा**(ष.ब.स.)** यद्वा **भीमकर्मा** - भीमानि कर्माणि यस्य स भीमकर्मा = भयंकर कर्म आहे ज्याचे तो भीमकर्मा**(ष.ब.स.)देवदत्तम्** - देवैर्दत्तम्-समर्पितमिति देवदत्तम् = देवांनी दिलेला-समर्पण केलेला असा देवदत्त**(तृ.त.स.)**

**अनन्तविजयं राजा कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ।**

**नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥१६॥**

**अन्वयः -** कुन्तीपुत्रः, राजा, युधिष्ठिरः, अनन्तविजयम्, नकुलः, च, सहदेवः, सुघोषमणिपुष्पकौ ।

**अन्वयार्थः** - **कुन्तीपुत्रः** - कुंतीचा पुत्र **राजा युधिष्ठिरः** - राजा युधिष्ठिर **अनन्तविजयम्** - अनंतविजय नावाच्या शंखाला **नकुलः** - नकुल **च** - आणि **सहदेवः** - सहदेव **सुघोषमणिपुष्पकौ -** सुघोष तथा म णिपुष्पक नावाच्या शंखास क्रमाने वाजविते झाले.

**विवरण** - कुंतीपुत्र राजा युधिष्ठिराने अनंतविजय नावाचा आणि नकुल व सहदेव यांनी सुघोष व मणिपुष्पक नावाचे शंख वाजविले.

**व्याकरणम् - कुन्तीपुत्रः** - कुन्तीपुत्र पु.प्र.ए.व. **राजा** - राजन् पु.प्र.ए.व. **युधिष्ठिरः** - युधिष्ठिर पु.प्र.ए.व. **अनन्तविजयम्** - अनंतविजय पु.द्वि.ए.व. **नकुलः** - नकुल पु.प्र.ए.व. **च** - उभ.अ. **सहदेवः** - सहदेव पु.प्र.ए.व. **सुघोषमणिपुष्पकौ** - सुघोष पु. मणिपुष्पक पु.द्वि.द्वि.व. **प्रदध्मतुः** - ध्मा प्र.ग.प.प.परोक्ष भू.तृ.पु.द्वि.व.

**समासविग्रहार्थाः - अनन्तविजयम् -** न अन्तेति अनन्तः-नाशरहितो विजयो यस्मात्सोऽनन्तविजयस्तमनन्त विजयम् = नाही अन्त असा अनन्त-नाशरहित विजय ज्यापासून तो अनन्तविजय त्या अनन्तविजयाला **(पं.ब.स.) कुन्तीपुत्रः** - कुन्त्याः पुत्रः कुन्तीपुत्रः = कुंतीचा पुत्र कुंतीपुत्र**(ष.त.स.) सुघोषमणिपुष्पकौ** - सुघोषश्च मणिपुष्पकश्चेति सुघोषमणिपुष्पकौ = सुघोष व मणिपुष्पक**(इ.द्व.स.) युधिष्ठिरः** - युधि-संग्रामे तिष्ठतीति युधिष्ठिरः = युद्धामध्ये उभा रहातो किंवा स्थिर रहातो असा युधिष्ठिर**(सप्तम्यन्त उप.कृदन्त वि.) राजा** - राजते-जनसंसदि सर्वतोभावेन प्रकाशत इति राजा = लोकांच्या सभेत अनेक प्रकाराने शोभतो असा राजा**(कृदन्त वि.)**

**काश्यश्च परमेष्वासः शिखण्डी च महारथः ।**

**धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥१७॥**

**अन्वयः** - च, परमेष्वासः, काश्यः, च, महारथः, शिखण्डी, धृष्टद्युम्नः, च, विराटः, अपराजितः, सात्यकिः ।

**अन्वयार्थः - च** - आणि **परमेष्वासः** - मोठे धनुष्य आहे ज्याचे असा **काश्यः** - महाधनुर्धर काशीराजा **च** = आणि **महारथः** - महारथी **शिखण्डी** - शिखण्डी **धृष्टद्युम्नः** - धृष्टद्युम्न **च** - आणि **विराटः** - विराट **अपरा जितः सात्यकिः** - शत्रूकडून पराजित न होणारा सत्यकाचा पुत्र सात्यकि.

**विवरण** - तसेच महाधनुर्धर काशीराजा, महारथी शिखण्डी, धृष्टद्युम्न, विराट राजा, कधीही पराजित न झालेला सात्यकि.

**व्याकरणम् - च** - च उभ.अ. **परमेष्वासः** - परम वि. इष्वास पु.प्र.ए.व. **काश्यः** - काश्य पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **महारथः** - महा वि. रथ.पु.प्र.ए.व. **शिखण्डी** - शिखण्डिन् पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **विराटः** - विराट पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **अपराजितः** - अ+परा+जि प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **सात्य किः** - सात्यकि पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - परमेष्वासः** - परमः-श्रेष्ठः, इष्वासः-धनुर्यस्य स परमेष्वासः = श्रेष्ठ धनुष्य आहे ज्याचे तो परमेष्वास**(ब.स.) अपराजितः** - न पराजितो रिपुभिरित्यपराजितः = नाही शत्रूकडून जिंकल्या जाणारा किंवा पराभव न पावणारा असा अपराजित**(न.त.स.) शिखण्डी** - शिखण्डम्-श्मश्रुदाढिकाऽभावोऽस्यास्तीति शिखण्डी = केशरहित मुख ज्याचे आहे तो शिखण्डी**(अस्त्यर्थे त.वि.)** यद्वा **शिखण्डी** - 'शिखण्डं श्मश्रुशून्यता' इत्यभिधानात्तदस्याऽस्तीति शिखण्डी-पाञ्चालः = शिखण्ड म्हणजे श्मश्रुरहित-दाढी व मिशार हित असे सांगितल्यामुळे असा तो शिखण्डी**(अस्त्यर्थे त.वि.) धृष्टद्युम्नः** - धृष्टम्-परधर्षकम्, द्युम्नम्- बलं यस्य स धृष्टद्युम्नः = शत्रूला दमन करणारे बल ज्याचे आहे तो धृष्टद्युम्न**(ष.ब.स.) सात्यकिः** - सत्यकस्याऽपत्यं पुमान् सात्यकिः = जो शत्रुच्या द्वारा पराजित होत नाही असा सत्यकाचा पुत्र सात्य कि**(अपत्यार्थे त.वि.)**

**द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ।**

**सौभद्रश्च महाबाहुः शङ्खान्दध्मुः पृथक् पृथक् ॥१८॥**

**अन्वयः** - पृथिवीपते, द्रुपदः, च, द्रौपदेयाः, च, महाबाहुः, सौभद्रः, सर्वशः, पृथक्, पृथक्, शङ्खान्, दध्मुः ।

**अन्वयार्थः - पृथिवीपते** - हे पृथिवीपती! **द्रुपदः** - द्रुपद **च** - आणि **द्रौपदेयाः** - द्रौपदीचे पाच पुत्र **च** - आणि **महाबाहुः** - मोठे बाहु आहेत ज्याचे असा **सौभद्रः** - सुभद्रापुत्र अभिमन्यु **सर्वशः** - या सर्वांनी **पृथक् पृथक्** - निरनिराळ्या **शङ्खान्** - शंखांना **दध्मुः** - वाजविले.

**विवरण** - द्रुपद आणि द्रौपदीचे पाच पुत्र आणि सुभद्रेचा पुत्र अभिमन्यू या सर्वांनी आपापले निरनिराळे शंख वाजविले.

**व्याकरणम् - पृथिवीपते** - पृथिवी स्त्री. पति वि.पु.संबो.ए.व. **द्रुपदः** - द्रुपद पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **द्रौपदेयाः** - द्रौपदी+ढक्(एय)=द्रौपदेय पु.प्र.ब.व. **च** - च उभ.अ. **महाबाहुः** - महा वि. बाहु पु.प्र.ए.व. **सौभद्रः** - सौभद्र पु.प्र.ए.व. **सर्वशः** - सर्वशस् अ. **पृथक् पृथक्** - पृथक् अ. **शङ्खान्** - शङ्ख पु.द्वि.ब.व. **दध्मुः** - ध्मा प्र.ग.प.प.परोक्ष भू.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - सौभद्रः** - सुभद्राया अपत्यं पुमान् सौभद्रः = सुभद्रेचे अपत्य सौभद्र-अभिमन्यु**(अपत्यार्थे त.वि.) महाबाहुः** - महान्तौ-पराक्रमयुक्तौ बाहू-हस्तौ यस्य स इति महाबाहुः = मोठे-पराक्रमयुक्त बाहु-हात ज्याचे तो महाबाहु**(ष.ब.स.)**

पांडववीरांच्या शंख वाजविण्याच्या भयंकर परिणामाने कौरवसैन्याचा थरकाप -

**स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ।**

**नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥१९॥**

**अन्वयः -** सः, तुमुलः, घोषः, नभः, च, पृथिवीम्, एव, व्यनुनादयन्, धार्तराष्ट्राणाम्, हृदयानि, व्यदारयत् ।

**अन्वयार्थः - सः** - तो **तुमुलः** - भयंकर **घोषः** - नाद **नभः** - आकाश **च** - आणि **पृथिवीम्** - पृथ्वीला **एव** - ही **व्यनुनादयन्** - दुमदुमून टाकणारा तसेच **धार्तराष्ट्राणाम्** - कौरवांची **हृदयानि -** हृदये **व्यदारयत्** - विदीर्ण करता झाला.

**विवरण** - श्रीकृष्णार्जुनासह सर्व पांडववीरांच्या शंखांचा आवाज एवढा महाभंयकर झाला की त्यामुळे सर्व त्रैलोक्य दुमदुमून तर गेलेच; पण त्या आवाजाने उभी असलेली कौरवांची सेना भयभीत झाली. व त्यांच्या हृदयाचा थरकाप उडाला म्हणजे थरकाप झाला.

**व्याकरणम्** - **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **तुमुलः -** तुमुल वि.पु.प्र.ए.व. **घोषः** - घोष पु.प्र.ए.व. **नभः** - नभस् न.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **पृथिवीम्** = पृथिवी स्त्री.द्वि.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **व्यनुनादयन्** - वि+अनु+नद् प्र.ग.प.प.णिच्+शतृ=व्यनुनादयत् वि.पु.प्र.ए.व. **धार्तराष्ट्राणाम्** - धार्तराष्ट्र पु.ष.ब.व. **हृदयानि** - हृदय न.द्वि.ब.व. **व्यदारयत्** - वि+दॄ न.ग.प.प.णिच् प्र.भू.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - व्यनुनादयन्** - विशेषेणानुनादयतीति व्यनुनादयन्-स्वस्वनादानुरूपं प्रतिध्वनयन् = विशेषरूपाने नाद-आवाज करणारा-स्वतःच्या नादाप्रमाणे प्रतिध्वनी निर्माण करणारा असा व्यनुनादयन **(वि.) धार्तराष्ट्राणाम् -** धृतराष्ट्रस्यापत्यानि पुमांस इति धार्तराष्ट्रास्तेषां धार्तराष्ट्राणाम् = धृतराष्ट्राची अपत्ये-पुत्र धार्तराष्ट्र-दुर्योधनादि**(अपत्यार्थे त.वि.)**

कौरवसेनेची उद्युक्तता-तयारी पाहून अर्जुन श्रीकृष्णास दोन्ही सैन्यांमध्ये रथ नेण्यास सांगतो -

**अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान् कपिध्वजः ।**

**प्रवृत्ते शस्त्रसम्पाते धनुरुद्यम्य पाण्डवः ॥२०॥**

**हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ।**

**अर्जुन उवाच** - अर्जुन म्हणाला

**सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥२१॥**

**अन्वयः** - महीपते, अथ, कपिध्वजः, पाण्डवः, धार्तराष्ट्रान्, व्यवस्थितान्, दृष्ट्वा, तदा, शस्त्रसम्पाते, प्रवृत्ते, धनुः, उद्यम्य, हृषीकेशम्, इदम्, वाक्यम्, आह, अच्युत, मे, रथम्, उभयोः, सेनयोः, मध्ये, स्थापय ।

**अन्वयार्थः - महीपते** - हे पृथिवीनाथ! (राजा) **अथ** - नंतर **कपिध्वजः** - रथाचे ध्वजावर कपिचिन्ह

असणारा **पाण्डवः** - अर्जुन **धार्तराष्ट्रान्** - धृतराष्ट्रपुत्रांना **व्यवस्थितान् -** संग्रामास उभे असलेले **दृष्ट्वा** - पाहून **तदा -** त्यावेळी **शस्त्रसम्पाते प्रवृत्ते** - शस्त्रे चालू होण्याच्या वेळेस (युद्धाच्या वेळेस) **धनुः** - धनुष्य **उद्यम्य** - उचलून **हृषीकेशम्** - श्रीकृष्णास **इदम्** - हे **वाक्यम् -** वाक्य **आह** - बोलला. **अच्युत** - हे कृष्णा! **मे** - माझा **रथम्** - रथ **उभयोः -** दोन्ही **सेनयोः** - सैन्यांच्या **मध्ये** - मध्यभागी **स्थापय** - उभा कर.

**विवरण** - शंखाच्या आवाजाने भयकंपित झालेले कौरवांचे वीर थोड्याच वेळात भय सोडून युद्धास प्रवृत्त झाले आहेत. असे पाहून अर्जुनाच्या मनांत वीररस उत्पन्न झाला. त्याचे बाहू स्फुरू लागले व आपले प्रख्यात गांडीव धनुष्य उचलून भगवान श्रीकृष्णास तो म्हणाला की, हे अच्युता आता माझा रथ दोन्ही सैन्यांमध्ये नेवून उभा कर.

**व्याकरणम् - महीपते** = मही स्त्री. पति पु.संबो.ए.व. **अथ** - अथ अ. **कपिध्वजः** - कपि+ध्वज पु.प्र.ए.व. **पाण्डवः** - पाण्डव पु.प्र.ए.व. **धार्तराष्टान्** - धार्तराष्ट्र पु.द्वि.ब.व. **व्यवस्थितान्** - वि+अव+स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.द्वि.ब.व. **दृष्ट्वा -** दृश् प्र.ग.प.प.त्वान्त अ. **तदा** - अ. **शस्त्रसम्पाते** - शस्त्र न. संपात पु.स.ए.व. **प्रवृत्ते** - प्र+वृत् प्र.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.स.ए.व. **हृषीकेशम्** - हृषीकेश पु.द्वि.ए.व. **इदम् -** इदम् सर्व.न.द्वि.ए.व. **वाक्यम्** - वच् द्वि.ग.प.प.+ण्यत्=वाक्य न.द्वि.ए.व. **आह** - ब्रू द्वि.ग.प.प.परोक्ष भू.तृ.पु.ए.व. **अच्युत** - अच्युत पु.संबो.ए.व. **अर्जुनः** - अर्जुन पु.प्र.ए.व. **उवाच** - वच् द्वि.ग.प.प.परोक्ष भू.तृ.पु.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **रथम्** - रथ पु.द्वि.ए.व. **उभयोः** - उभ्+अयच्=उभय सर्व.स्त्री.ष.द्वि.व. **सेनयोः** - सि प.ग./न.ग.उ.प.+न-टाप्=सेना स्त्री.ष.द्वि.व. **मध्ये** - मध्य वि.पु.स.ए.व. **स्थापय** - स्था प्र.ग.प.प.प्रयोजक लोट् प्रार्थनार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - महीपते** - मह्याः-पृथिव्याः, पतिः-स्वामीति महीपतिस्तत्सम्बुद्धौ हे महीपते = पृथ्वीचा पती-स्वामी महीपती त्याचे संबोधनामध्ये हे महीपते**(ष.त.स.) हृषीकेशम्** - हृषीकाणाम्-इन्द्रियाणाम्, ईशः -स्वामीति हृषीकेषस्तं हृषीकेशम् = इंद्रियांचा स्वामी असा हृषीकेश त्या हृषीकेशाला**(ष.त.स.) शस्त्रसम्पाते** - शस्त्राणां सम्यक् पातः-पतनमिति शस्त्रसम्पातस्तस्मिन् शस्त्रसम्पाते = शस्त्रांचे चांगले पडणे शस्त्रसंपात त्या शस्त्रे पडण्याचे वेळी**(ष.त.स.) कपिध्वजः -** ध्वजायाम्-पताके, कपिः-हनुमान् यस्य स कपिध्वजः = ध्वजावर कपी-हनुमान आहे ज्याच्या तो कपिध्वज-अर्जुन**(व्यधिकरण ब.स.) अच्युत** = न च्युत इत्यच्युतस्तत्सम्बुद्धौ हे अच्युत = नाही च्युत असा अच्युत त्याचे संबोधनामध्ये हे अच्युत**(न.त.स.) वाक्यम्** = वक्तुं योग्यमिति वाक्यम् = बोलण्यास योग्य ते वाक्य**(योग्यार्थे कृदन्त वि.)**

कौरवांच्या सर्व वीरांमध्ये आपणास लढण्यास योग्य असणाऱ्या वीरांना पाहण्याची अर्जुनाची इच्छा -

**यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान् ।**

**कैर्मया सह योद्धव्यमस्मिन्रणसमुद्यमे ॥२२॥**

**अन्वयः -** यावत्, अहम्, योद्धुकामान्, अवस्थितान्, एतान्, निरीक्षे, अस्मिन्, रणसमुद्यमे, मया, कैः, सह, योद्धव्यम् ।

**अन्वयार्थः - यावत्** - जोवर **अहम्** - मी **योद्धुकामान्** - युद्धाभिलाषी तथा **अवस्थितान्** - समोर उभे अस-

लेल्या **एतान्** - यांना **निरीक्षे** - पाहीन की, **अस्मिन्** - या **रणसमुद्यमे -** रणाच्या व्यापारामध्ये(रणात) **मया** - मला **कैः** - कोणाच्या **सह** - बरोबर **योद्धव्यम्** - युद्ध करावे लागणार आहे.

**विवरण** - आपला रथ दोन्ही सैन्यांच्या मध्यभागी कशाकरिता न्यावा याचा खुलासा अर्जुन करतो की, या रणांगणामध्ये युद्धाला तयार होऊन अनेक वीर आले आहेत. परंतु ते सर्वच माझ्याशी लढण्यास योग्य नाहीत. कारण माझ्या बरोबर लढतील असे थोडेच वीर यात असतील व ते मला पाहिले पाहिजे की, मी कोणाशी लढावे?

**व्याकरणम् - यावत्** - यावत् क्रि.वि.अ. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **योद्धुकामान्** - युध् च.ग.आ.प.तुमन्त अ. काम पु.द्वि.ब.व. **अवस्थितान् -** अव+स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.द्वि.ब.व. **एतान्** - एतत् सर्व.पु.द्वि.ब.व. **निरीक्षे** - निर्+ईक्ष् प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.प्र.पु.ए.व. **अस्मिन्** - इदम् सर्व.पु.स.ए.व. **रणसमुद्यमे** - रण न. सम्+उद्यम पु.स.ए.व. **मया** - अस्मत् सर्व.तृ.ए.व. **कैः** - किम् सर्व.पु.तृ.ब.व. **सह** - सह अ. **योद्धव्यम्** - युध् च.ग.आ.प.कर्म.तव्यत्=योद्धव्य वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - योद्धुकामान्** - कामयते इति कामः, योद्धुं कामः-इच्छा येषां ते योद्धुकामास्तान् योद्धुकामान् = इच्छा करतो असा काम युद्धाची इच्छा-काम ज्यांची ते योद्धुकाम त्या योद्धुकामांना **(ष.ब.स.) रणसमुद्यमे -** रणस्य-संग्रामस्य-युद्धस्य समुद्यमः-व्यापार इति रणसमुद्यमस्तस्मिन् रणसमुद्यमे = रणाचा-संग्रामाचा-युद्धाचा, उद्योग-व्यापार असा रणसमुद्यम त्यामध्ये**(ष.त.स.)**

**योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः ।**

**धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥२३॥**

**अन्वयः** - दुर्बुद्धेः, धार्तराष्ट्रस्य, युद्धे, प्रियचिकीर्षवः, ये, एते, अत्र, समागताः, (तान्), योत्स्यमानान्, अहम्, अवेक्षे ।

**अन्वयार्थः - दुर्बुद्धेः** - दुष्टबुद्धि **धार्तराष्ट्रस्य** - दुर्योधनाचे **युद्धे** - युद्धांत **प्रियचिकीर्षवः** - प्रिय करण्यास इच्छिणारे **ये** - जे **एते** - हे **अत्र -** या ठिकाणी **समागताः** - आलेले आहेत (**तान्** - त्या) **योत्स्यमानान्** - युद्ध करणाऱ्या सर्वांना **अहम्** - मी **अवेक्षे** - पहातो(पाहीन).

**विवरण** - या श्लोकात अर्जुनाची दुर्योधनाविषयीची चीड व्यक्त झाली आहे. तो म्हणतो आमच्यावर सतत अन्याय केलेला व कपट बुद्धिने आम्हास जिंकणारा व आम्ही त्याचे दास व्हावे अशी इच्छा करणाऱ्या दुर्बुद्धी दुर्योधनाचे युद्धामध्ये भले करावे, (दुर्योधनास युद्धामध्ये विजय मिळवून द्यावा) अशा इच्छेने एकत्र आलेले अनेक देशाचे राजे मी पहातो. (अथवा मला पाहिले पाहीजे)

**व्याकरणम्** - **दुर्बुद्धेः** - दुर् उपसर्ग बुद्धि स्त्री.ष.ए.व. **धार्तराष्ट्रस्य** - धार्तराष्ट्र पु.ष.ए.व. **युद्धे** - युद्ध न.स.ए.व. **प्रियचिकीर्षवः** - प्रिय वि. कृ अ.ग.उ.प.इच्छादर्शक पु.प्र.ब.व. **ये** - यत् सर्व.पु.प्र.ब.व. **एते** - एतत् सर्व.पु.प्र.ब.व. **अत्र** - त्रल् प्रत्ययान्त सप्तम्यन्त तद्धित अ. **समागताः** - सम्+आ+गम् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **योत्स्यमानान्** - युध् च.ग.आ.प.कर्त.भविष्यकाल शानच् प्रत्ययान्त धा.वि.पु.द्वि.ब.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **अवेक्षे** - अव्+ईक्ष् प्र.ग.आ.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **दुर्बुद्धेः** - दुष्टा बुद्धिर्यस्य स दुर्बुद्धिस्तस्य दुर्बुद्धेः = दुष्ट बुद्धी ज्याची तो दुर्बुद्धी त्या

दुर्बुद्धीचे**(ष.ब.स.) प्रियचिकीर्षव:** - कर्तुमिच्छन्तीति चिकीर्षव:, प्रियस्य चिकीर्षव: प्रियचिकीर्षव: = प्रिय करण्याची इच्छा करणारे**(ष.त.स.) योत्स्यमानान्** - योत्स्यन्त इति योत्स्यमानास्तान् योत्स्यमानान् = युद्ध करतात असे युद्ध करणारे त्या युद्ध करणाऱ्यांना**(वि.)**

दोन्ही सैन्यांमध्ये रथ उभा करून कौरववीरांना पाहण्याची श्रीकृष्णाची सूचना -

**सञ्जय उवाच** - संजय म्हणाला -

**एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत ।**

**सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥२४॥**

**भीष्मद्रोणप्रमुखत: सर्वेषां च महीक्षिताम् ।**

**उवाच पार्थ पश्यैतान् समवेतान्कुरूनिति ॥२५॥**

**अन्वय:** - भारत, एवम्, गुडाकेशेन, उक्त:, हृषीकेश:, उभयो:, सेनयो:, मध्ये, रथोत्तमम्, भीष्मद्रोणप्रमुखत:, च, सर्वेषाम्, महीक्षिताम्, स्थापयित्वा, पार्थ, एतान्, समवेतान्, कुरून्, पश्य, इति, उवाच ।

**अन्वयार्थ:** - **भारत** - हे भारता! **एवम्** - याप्रमाणे **गुडाकेशेन** - अर्जुनद्वारा **उक्त:** - बोलला गेलेला **हृषीकेश:** - श्रीकृष्ण **उभयो:** - दोन्ही **सेनयो:** - सैन्यांच्या **मध्ये** - मध्यभागी **रथोत्तमम्** - उत्तम असा रथ **भीष्मद्रोणप्रमुखत:** - भीष्म-द्रोणांच्या समोर **च** - आणि **सर्वेषां** - सर्व **महीक्षिताम्** - राजांसमोर **स्थापयित्वा** - उभा करून **पार्थ** - हे अर्जुना! **एतान्** - या **समवेतान् कुरून्** - एकत्रित आलेल्या कौरवांना **पश्य** - पहा **इति** - असे **उवाच** - बोलला.

**विवरण** - रथ मध्ये घ्यावा, असे अर्जुनाकडून सुचविलेल्या इंद्रियांचा नियामक भगवान् श्रीकृष्णाने त्वरित रथ दोन्ही सैन्यामध्ये नेऊन मुद्दाम भीष्म-द्रोण यांच्या समोर व इतर राजांसमोर उभा केला की, ज्या योगे भीष्म-द्रोणांना पाहून अर्जुनास मोह निर्माण व्हावा, या हेतुने भगवान अर्जुनास असे सांगतात की, हे पार्था! तू या कौरववीरांना पहा !

**व्याकरणम् - भारत** - भारत पु.संबो.ए.व. **एवम्** - एवम् क्रि.वि.अ. **गुडाकेशेन** - गुडाका+ईश पु.तृ.ए.व. **उक्त:** - वच् द्वि.ग.प.प./द.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **हृषीकेश:** - हृषीकेश पु.प्र.ए.व. **उभयो:** - उभ सर्व.स्त्री.ष.द्वि.व. **सेनयो:** - सेना स्त्री.ष.द्वि.व. **मध्ये** - मध्य पु.स.ए.व. **रथोत्तमम्** - रथोत्तम पु. द्वि.ए.व.(उत्तम वि.) **भीष्मद्रोणप्रमुखत:** - भीष्म पु. द्रोण पु. प्रमुखतस् षष्ठी बहुवचनान्त तसिल् प्रत्ययान्त अ. **च** - च उभ.अ. **सर्वेषाम्** - सर्व सर्व.पु.ष.ब.व. **महीक्षिताम्** - मही+ईक्ष्=महीक्षित् पु.ष.ब.व. **स्थापयित्वा** - स्था प्र.ग.प.प.प्रयोजक त्वान्त अ. **पार्थ -** पृथा+अन्=पार्थ पु.संबो.ए.व. **एतान् -** एतत् सर्व.पु. द्वि.ब.व. **समवेतान्** - सम्+अव+इ द्वि.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.द्वि.ब.व. **कुरून्** - कुरु पु.द्वि.ब.व. **पश्य -** दृश् प्र.ग.प.प.कर्त.लोडार्थक द्वि.पु.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **उवाच** - वच् द्वि.ग.प.प.कर्त.लिट्-परोक्ष भू.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **गुडाकेशेन** - गुडाकाया:-निद्राया:, ईश:-स्वामी गुडाकेशस्तेन गुडाकेशेन = गुडाका

म्हणजे निद्रेचा स्वामी तो गुडाकेश**(ष.त.स.)** यद्वा **गुडाकेशेन** - 'अङ्गुष्ठतर्जनीयोगो गुडानाम्नी तु मुद्रिका' इति वचनादङ्गुष्ठतर्जनीयोगो गुडेत्युच्यते तत्परिमाणा अग्रकेशा यस्य स इति गुडाकेशस्तेन गुडाकेशेन = अंगुठा व तर्जनी योग म्हणजे गुडा नावाची मुद्रा आहे. या वचनाद्वारा अंगुठा व तर्जनीचा (अंगुठ्या शेजारील बोट) योग म्हणजे एकत्र असणे गुडा, ज्याचे अग्रभागाचे केश गुडापरिमाण तो गुडाकेश त्या गुडाकेशाने-अर्जुनाने **(ष.ब.स.)** यद्वा **गुडाकेशेन** - 'गुडो गोलेक्षुपाकयो:' इत्यभिधानाद् गुडो गोलो ब्रह्माण्डगोलस्तं तप्ताय: पिण्डमग्निरिवाऽन्तर्बहिश्चाऽकति व्याप्नोतीति गुडाक:-शिव:, 'विश्वस्यैकं परिवेष्टितारं ज्ञात्वा शिवम् इति श्रुते:' स शिव ईशो यस्य स गुडाकेशोऽर्जुनस्तेन गुडाकेशेन = जसा अग्नि लोहगोलकास अन्तर्बाह्य व्यापून असतो तसा ब्रह्मांडगोलाला व्यापून जो अन्तर्बाह्य असतो असा शिव तोच शिव-ईश आहे ज्याचा तो गुडाकेश त्या गुडाकेशाने-अर्जुनाने**(ष.ब.स.)** यद्वा **गुडाकेशेन** - गुडवन्मधुर: सन् भक्तानकति व्याप्नोतीति गुडाक:-शिव:, स शिव ईशो यस्य स गुडाकेशोऽर्जुनस्तेन गुडाकेशेन = गुळाप्रमाणे आपल्या भक्तांना माधुर्य देतो अर्थात् भक्तांना मधुर आनंद प्रदान करतो असा शिव तोच शिव-ईश आहे ज्याचा तो गुडाकेश त्या गुडाकेशाने-अर्जुनाने**(ष.ब.स.)** **रथोत्तमम्** - रथानाम्-स्यंदनानाम्, रथेषु-स्यंदनेषु वा उत्तम:-श्रेष्ठो रथोत्तमस्तं रथोत्तमम् = रथांचा किंवा रथांमध्ये उत्तम-श्रेष्ठ तो रथोत्तम त्या रथोत्तमास**(ष./स.त.स.)** **भीष्मद्रोणप्रमुखत:** - भीष्मश्च द्रोणश्चेति भीष्मद्रोणौ प्रमुखावादी येषां ते भीष्मद्रोणप्रमुखास्तेषां भीष्मद्रोणप्रमुखत: = भीष्म आणि द्रोण असे भीष्मद्रोण, प्रमुख आहेत ज्यांच्यात असे भीष्मद्रोणप्रमुख राजे त्या भीष्मद्रोणप्रमुख राजांसमोर **(द्वं.ग.ष.ब.स.)**

भीष्मद्रोणासह सर्व गोत्रजांना पाहून अर्जुनाचे व्याकूळ होणे -

**तत्रापश्यत्स्थितान् पार्थ: पितृनथ पितामहान् ।**

**आचार्यान्मातुलान्भ्रातॄन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा ॥२६॥**

**श्वशुरान् सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ।**

**तान्समीक्ष्य स कौन्तेय: सर्वान्बन्धूनवस्थितान् ॥२७॥**

**कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।**

**अन्वय:** - अथ, पार्थ:, तत्र, उभयो:, अपि, सेनयो:, स्थितान्, पितॄन्, पितामहान्, आचार्यान्, मातुलान्, भ्रातॄन्, पुत्रान्, पौत्रान्, तथा, सखीन्, श्वशुरान्, च, सुहृद:, एव, अपश्यत्, तान्, सर्वान्, अवस्थितान्, बन्धून्, समीक्ष्य, स:, कौन्तेय:, परया, कृपया, आविष्ट:, विषीदन्, इदम्, (वचनम्), अब्रवीत् ।

**अन्वयार्थ: - अथ** - तदनंतर **पार्थ:** - अर्जुन **तत्र** - त्या **उभयो:** - दोन्ही **अपि** - ही **सेनयो:** - सेनेमध्ये **स्थितान्** - उभे राहिलेल्या **पितॄन्** - चुलत्यांना **पितामहान्** - भीष्मादि पितामहांना **आचार्यान्** - द्रोणाचार्यादि गुरुंना **मातुलान्** - मामांना **भातॄन्** - भीम दुर्योधनादि बंधूंना **पुत्रान्** - अभिमन्यु आदि पुत्रांना **पौत्रान्** - नातवांना **तथा** - त्याचप्रमाणे **सखीन्** = अश्वत्थामादि सुहृदांना **श्वशुरान्** - द्रुपद शल्यादि सासऱ्यांना **च** - आणि **सुहृद: एव** - विना हेतुच्या द्वारा निरपेक्ष कल्याण करणारे अनेक स्नेही यांना **अपश्यत्** - पाहता झाला **तान्** - त्या **सर्वान्** - सर्व **अवस्थितान्** - समोर उभे राहिलेल्या **बन्धून्** - बंधुंना **समीक्ष्य** - पाहून **स: कौन्तेय:** - तो कुन्तीचा पुत्र अर्जुन **परया कृपया आविष्ट:** - अत्यंत करुणा ज्याच्या अंतकरणात उत्पन्न झाली आहे

असा **विषीदन् -** शोकाच्या द्वारा युक्त होऊन **इदम्** - असे (**वचनम्** - वचन) **अब्रवीत् -** बोलला.

**विवरण** - पश्चात् अर्जुन दोन्ही सैन्यामध्ये उभे असलेले वाडवडील, आजे, गुरु, मामा, भाऊ, मुले, नातू, मित्र इ. आप्तेष्ट युद्धामध्ये उभे असलेले पाहून अत्यंत करुणेने व्याप्त झालेला अर्जुन विषादयुक्त व सखेद होऊन म्हणाला.

**व्याकरणम् - अथ** - अथ अव्यय: **पार्थः** - पार्थ पु.प्र.ए.व. **तत्र** - तत्+त्रल् प्रत्ययान्त सप्तम्यन्त तद्धित अ. **उभयोः** - उभ सर्वनाम स्त्री.स.द्वि.व. **अपि** - अव्यय: **सेनयोः** - सेना स्त्री.स.द्वि.व. **स्थितान्** - स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.द्वि.ब.व. **पितॄन्** - पितृ पु.द्वि.ब.व. **पितामहान्** - पितामह पु.द्वि.ब.व. **आचार्यान्** - आ+चर्+ण्यत्=आचार्य पु.द्वि.ब.व. **मातुलान्** - मातुल पु.द्वि.ब.व. **भ्रातॄन्** - भातृ पु.द्वि.ब.व. **पुत्रान्** - पुत्र पु.द्वि.ब.व. **पौत्रान्** - पुत्र+अण्=पौत्र पु.द्वि.ब.व. **तथा** - तथा क्रि.वि.अ. **सखीन् -** सखी पु. द्वि.ब.व. **श्वशुरान्** - श्वशुर पु.द्वि.ब.व. **च** - च उभयान्वयी अ. **सुहृदः** - सुहृद् पु.द्वि.ब.व. **एव** - एव अ. **अपश्यत्** - दृश् प्र.ग.प.प.प्रथम भू.तृ.पु.ए.व. **तान्** - तत् सर्वनाम पु.द्वि.ब.व. **अवस्थितान्** - अव+स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.द्वि.ब.व. **सर्वान्** - सर्व सर्वनाम पु.द्वि.ब.व. **बंधून्** - बंधु पु.द्वि.ब.व. **समीक्ष्य** - सम्+ईक्ष् प्र.ग.आ.प.ल्यबन्त अ. **सः** - तत् सर्वनाम पु.प्र.ए.व. **कौन्तेयः** - कौन्तेय पु.प्र.ए.व. **परया** - परा वि.स्त्री.तृ.ए.व. **कृपया** - कृपा स्त्री.तृ.ए.व. **आविष्टः** - आ+विष् तृ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **विषीदन्** - वि+सद्(सीद्) प्र.ग./ष.ग.प.प.+कर्त.शतृ=विषीदन् वि.पु.प्र.ए.व. **इदम्** - इदम् सर्व.न. द्वि.ए.व. **अब्रवीत्** - ब्रू द्वि.ग.उ.प.(प.प.) प्रथम भू.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - पुत्रान्** - पुनाति पित्रादीनिति पुत्रस्तान् पुत्रान् = पितरादिकांना पवित्र करतो तो पुत्र त्या पुत्रांना(**वि.**)**सुहृदः -** शोभनं हृदयं येषां ते सुहृदः = चांगले हृदय ज्यांचे ते सुहृद(**ष.ब.स.**) **पितामहान् -** पितॄणां पितरः पितामहास्तान् पितामहान् = वडीलांचे वडील पितामह-आजोबा त्या पितामहांना(**ष.त.स.**) **पौत्रान् -** पुत्रस्यापत्यानि पुमांसस्तान् पौत्रान् = मुलांचे अपत्य त्या पौत्रांना(**तद्धित वि.**) **कौन्तेयः -** कुन्त्या अपत्यं पुमान् कौन्तेयः-अर्जुनः **=** कुन्तीचे अपत्य पुरुष कौन्तेय-अर्जुन(**अपत्यार्थे त.वि.**) **विषीदन्** - विषीदतीति विषीदन् = खेद करतो असा खेद करणारा(**कृदन्त वि.**) **भ्रातॄन् -** समाने उदरे शयिताः-स्थिताः समानोदर्याः-भ्रातरस्तान् भ्रातॄन् = एका उदरामध्ये राहणारे समानोदर-भाऊ त्या भावांना(**वि.**)

अर्जुन आपली अवस्था सांगतो व मनातील विचार प्रगट करतो -

**अर्जुन उवाच -** अर्जुन म्हणाला -

**दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥२८॥**

**सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ।**

**वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥२९॥**

**अन्वयः -** कृष्ण, समुपस्थितम्, युयुत्सुम्, इमम्, स्वजनम्, दृष्ट्वा, मम, गात्राणि, सीदन्ति, च, मुखम्, प रिशुष्यति, मे, शरीरे, वेपथुः, च, रोमहर्षः, जायते ।

**अन्वयार्थः - कृष्ण** - हे कृष्णा! **समुपस्थितम् -** युद्धक्षेत्रामध्ये स्थित असलेल्या त्याचप्रमाणे **युयुत्सुम्** - संग्रामाची अभिलाषा करणाऱ्या **इमम्, स्वजनम्** - या स्वजनसमुदायास **दृष्ट्वा** - पाहून **मम** - माझे **गात्राणि** -

सर्व अवयव **सीदन्ति -** शिथील होत आहेत **च** - आणि **मुखम्** - तोंड **परिशुष्यति -** कोरडे पडत आहे **मे** - माझ्या **शरीरे** - शरीरामध्ये **वेपथुः** - कम्प **च** - आणि **रोमहर्षः** - अंगावर रोमांच **जायते** - उभे राहत आहेत.

**विवरण -** अर्जुन म्हणतो की, हे कृष्णा! युद्ध करण्याच्या इच्छेने येथे जमलेल्या या आप्त जनांना पाहू माझे अवयव गळून जाऊ लागले आहेत. तोंड कोरडे पडू लागले आहे आणि अंगावर रोमांच उभे राहू लागले आहेत.

**व्याकरणम्** - **कृष्ण** - कृष्ण पु.संबो.ए.व. **समुपस्थितम् -** सम्+उप+स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु. द्वि.ए.व. **युयुत्सुम् -** युयुत्सु इच्छादर्शक पु.द्वि.ए.व. **इमम् -** इदम् सर्व.पु.द्वि.ए.व. **स्वजनम्** - स्वजन पु. द्वि.ए.व. **दृष्ट्वा -** दृश् प्र.ग.प.प.त्वान्त अ. **मम -** अस्मत् सर्व.ष.ए.व. **गात्राणि -** गात्र न.प्र.ब.व. **सीदन्ति -** सद् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **च** - च उभ.अ. **मुखम्** - मुख न.प्र.ए.व. **परिशुष्यति** - परि+शुष् च.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **शरीरे** - शरीर न.स.ए.व. **वेपथुः -** वेपथु पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **रोमहर्षः** - रोमन् न. हर्ष पु.प्र.ए.व. **जायते** - जन् च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - स्वजनम्** - स्वस्य जनः स्वजनस्तं स्वजनम् = स्वतःचे जन स्वजन त्या स्वजनांना **(ष.त.स.) रोमहर्षः -** रोम्णाम्-केशाणां हर्ष इति रोमहर्षः = केशांचा हर्ष असा रोमहर्ष-अंगावर शहारे येणे **(ष.त.स.) युयुत्सुम् -** योद्धुमिच्छतीति युयुत्सुस्तं युयुत्सुम् = युद्धाची इच्छा करतो असा युयुत्सु अशा त्या युद्धाची इच्छा करणाऱ्या युयुत्सुला**(इच्छार्थे वि.)**

**गाण्डीवं स्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते ।**

**न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥३०॥**

**अन्वयः** - हस्तात्, गाण्डीवम्, स्रंसते, च, त्वक्, एव, परिदह्यते, च, मे, मनः, भ्रमति, इव, अतः, अवस्थातुम्, अहम्, न, शक्नोमि ।

**अन्वयार्थः - हस्तात् -** हातातून **गाण्डीवम् -** गाण्डीव धनुष्य **स्रंसते -** गळू लागले आहे **च** - आणि **त्वक् एव** - त्वचा ही **परिदह्यते** - सर्व बाजूंनी जळू लागली आहे **च** - आणि **मे** - माझे **मनः** - मन **भ्रमति इव -** जणु काय भ्रमण करू लागले आहे **अतः** - यास्तव **अवस्थातुम् -** उभा राहण्याकरिता **अहम्** - मी **शक्नोमि** - समर्थ नाही.

**विवरण** - आपल्या शरीराची शोचनीय अवस्था झालेली आहे, असे अर्जुन सांगत आहे. की माझ्या हातून गांडीव धनुष्य गळू लागले आहे आणि युद्धाच्या भावी परिणामाच्या चिंतेने माझे मन चहूकडे भ्रमण करत आहे. तसेच सर्व शरीराचा दाह होऊ लागला आहे. अशावेळी मला हातात धनुष्य घेऊन युद्ध करणे अशक्य झाले आहे. याप्रमाणे माझ्या शरीराची विपरीत अवस्था झाली आहे.

**व्याकरणम् - हस्तात्** - हस्त पु.पं.ए.व. **गाण्डीवम्** - गाण्डीव न.द्वि.ए.व. **स्रंसते** - स्रंस् प्र.ग.आ.प.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **त्वक् -** त्वच् स्त्री.प्र.ए.व. **एव -** एव क्रि.वि.अ. **परिदह्यते -** परि+दह् प्र.ग.आ.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **मनः** - मन् च.ग.आ.प.+असुन्=मनस् न.प्र.ए.व. **भ्रमति** - भ्रम् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **इव** - इव अ. (**अतः** -

अ.) **अवस्थातुम् -** अव+स्था प्र.ग.प.प.तुमन्त अ. (**अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व.) **न** - न क्रि.वि.अ. **शक्नोमि** - शक् पं.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - परिदह्यते** - परित:-सर्वतो दह्यत इति परिदह्यते = सर्व बाजूंनी त्वचा जळू लागली**(वि.)**

**निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव ।**

**न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥३१॥**

**अन्वय:** - केशव, (अहम्), विपरीतानि, निमित्तानि, पश्यामि, च, आहवे, स्वजनम्, हत्वा, श्रेय:, च, न, अनुपश्यामि ।

**अन्वयार्थ: - केशव** - हे केशव! (**अहम्** - मी) **विपरीतानि** - अरिष्ट सूचक-विपरीत **निमित्तानि -** चिन्हे-लक्षणे **पश्यामि** - पाहू लागलो आहे **च** - आणि **आहवे -** युद्धामध्ये **स्वजनम्** - आपल्या कुलाला **हत्वा -** नष्ट करून-ठार मारून **श्रेय: च -** कल्याणसुद्धा(होईल असे) **न अनुपश्यामि -** मी पहात नाही-मला दिसत नाही.

**विवरण -** आतापर्यंत अर्जुनाने आपल्या शरीराच्या प्रत्येक अवयवाचे केलेले जे भयानक वर्णन आहे ते संपून आताचे वर्णन अशुभ-अरिष्ट सूचक लक्षणांनी युक्त आहे. या अशुभ-अरिष्ट सूचक चिन्हाने भावी परिणामही चांगले होणार नाहीत. या हेतूने अर्जुन म्हणतो की, मी युद्धामध्ये या आत्मीय जनांना तथा संबंधी लोकांना मारण्याची इच्छा करत नाही. कारण त्यांना मारून माझे परिणामी हित होईल असे मला वाटत नाही. याचा प हिला परिणाम आत्मीय जनांच्या घाताने चित्तामध्ये पश्चात्तापजनित क्षोभ उत्पन्न होईल. दुसरा परिणाम त्यांच्या अभावाने जीवन दु:खमय होईल. तिसरा परिणाम त्यांना मारण्याने मला महान पातक लागेल. अशा दृष्टीने माझे या लोकात आणि परलोकांत हित होणारच नाही.

**व्याकरणम् - केशव** - केशव पु.संबो.ए.व. **निमित्तानि -** निमित्त न.द्वि.ब.व. **च** - च उभ.अ. **विपरीतानि** - वि+परि+इ द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.द्वि.ब.व. **पश्यामि** - दृश् प्र.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **आहवे** - आहव पु.स.ए.व. **स्वजनम्** - स्वजन् पु.द्वि.ए.व. **हत्वा** - हन् द्वि.ग.प.प.त्वान्त अ. **श्रेय:** - श्रेयस् न. द्वि.ए.व. **न -** न क्रि.वि.अ. **अनुपश्यामि** - अनु+दृश् प्र.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - केशव** - के-जले शेत इति केशवस्तत्संबुद्धौ हे केशव = पाण्यात शयन करतो तो केशव त्याचे संबोधनामध्ये हे केशव**(वि.)** यद्वा **केशव** - केशा: प्रशस्ता: सन्त्यस्येति केशवस्तत्संबुद्धौ हे केशव = अतिसुंदर केश-केस आहेत ज्याचे तो केशव त्याचे संबोधनामध्ये हे केशव**(अस्त्यर्थे त.वि.) आहवे** - आसमन्तात् हूयते-हवनं क्रियत इत्याहवस्तस्मिन्नाहवे = सर्व बाजूंनी हवन केले जाते असे आहव त्या आहवामध्ये**(वि.)** यद्वा **आहवे** - आहूयन्तेऽस्मिन्नात्मीयान्-प्रतिस्पर्धीयानित्याहवस्तस्मिन्नाहवे-संग्रामे = आत्मीय-आपले प्रतिस्पर्धी-शत्रू बोलाविल्या जातात असे युद्ध त्या युद्धामध्ये**(वि.)**

अर्जुनाचे विजय आणि राज्यसुखाची इच्छा न करण्याचे युक्तिपूर्वक वर्णन -

**न काङ्क्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च ।**

**किं नो राज्येन गोविन्द किं भोगैर्जीवितेन वा ॥३२॥**

**अन्वयः -** कृष्ण, (अहम्), विजयम्, न, काङ्क्षे, च, राज्यम्, न, (काङ्क्षे), च, सुखानि, (न काङ्क्षे), गोविन्द, नः, राज्येन, किम्, भोगैः, वा, जीवितेन, किम्।

**अन्वयार्थः** - **कृष्ण** - हे कृष्णा! (**अहम्** - मी) **विजयम् न काङ्क्षे** - मी विजयाची इच्छा करीत नाही **च** - आणि **राज्यम्** - राज्याची **न** (**काङ्क्षे**) - इच्छा करीत नाही (**च** - आणि) **सुखानि** - सुखाचीही **न** - इच्छा करीत नाही **गोविन्द** - हे गोविन्दा! **नः** - आम्हाला **राज्येन** - राज्याच्या द्वारा **किम्** - काय प्रयोजन? **भोगैः** - भोगांचा **वा** - अथवा **जीवितेन** - जगण्याचा **किम्** - काय उपयोग आहे?

**विवरण -** अर्जुन म्हणतो की, या आत्मीय स्वजनांचा घात करून, मला चांगल्या प्रकारचा विजय, उत्कृष्ट राज्य तसेच त्रैलोक्यातील सुख जरी मिळाले, तरी या स्वजनांच्या अभावामध्ये मला ते दु:खाप्रमाणेच आहे; म्हणजे या स्वजनांना मारून आपण स्वत: जीवित राहणेही व्यर्थ आहे; कारण यांच्या अभावामध्ये विजय, भोग आणि सुख प्राप्त करण्यामध्ये काहीच एक प्रयोजन दिसत नाही.

**व्याकरणम् - कृष्ण -** कृष्ण पु.संबो.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **विजयम्** - वि+जि+अच्=विजय पु.द्वि.ए.व. **काङ्क्षे** - काङ्क्ष् प्र.ग.उ.प.(आ.प.)वर्त.प्र.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **राज्यम्** - राजन्+यक्=राज्य न.द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **च** - च उभ.अ. **न** - न क्रि.वि.अ. **सुखानि** - सुख न.द्वि.ब.व. **गोविन्द** - गोविन्द पु.संबो.ए.व. **नः** - अस्मत् सर्व.ष.ब.व. **राज्येन** - राज्य न.तृ.ए.व. **किम्** - किम् अ. **वा** - वा उभ.अ. **भोगैः** - भुज्+घञ्=भोग पु.तृ.ब.व. **जीवितेन** - जीव् प्र.ग.प.प.भावे.भू.धा.वि.न.तृ.ए.व. **किम्** - आक्षेपार्थक सर्व.

**समासविग्रहार्थाः** - **विजयम् -** विजयते ज्ञानवैराग्यैश्वर्यादिभिर्गुणैर्विश्वमितिविजयस्तं विजयम् = जिंकतो ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्यादि गुणांनी विश्वाला असा विजय त्या विजयाला(**तृ.त.स.**) यद्वा **विजयम्** - विशेषेण जयः-विजयस्तं विजयम् = विशेषाने जय-विजय त्या विजयाला(**तृ.त.स.**) **राज्यम्** - राज्ञः कर्म भावो वा राज्यम् = राजाचे कर्म किंवा भाव राज्य त्या राज्याला(**भावकर्मार्थे त.वि.**) **गोविन्द** - गोभिः-श्रुतिभिः-वेदान्तवाक्यै र्विद्यते परमार्थरूपेण लभ्यत इति गोविन्दस्तत्सुम्बुद्धौ गोविन्द = श्रुतिने-वेदांत वाक्यांनी जाणला जातो, परमार्थ रूपाने मिळविला जातो असा गोविंद त्याचे संबोधनामध्ये हे गोविंद(**वि.**) यद्वा **गोविन्द** - गवाम्-गोलोकस्थानां इन्द्रः-स्वामीति गोविन्दस्तत्सुम्बुद्धौ हे गोविन्द = गोलोकस्थांचा स्वामी असा गोविंद त्याचे संबोधनामध्ये हे गोविंद(**ष.त.स.**) **जीवितेन** - जीवनं जीवितं तेन जीवितेन = जीवनच जीवित आहे, त्या जीविताच्याद्वारा(**वि.**)

**येषामर्थे काङ्क्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च।**

**त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥३३॥**

**अन्वयः -** नः, येषाम्, अर्थे, राज्यम्, काङ्क्षितम्, भोगाः, च, सुखानि, (काङ्क्षितानि), ते, इमे, धनानि, च, प्राणान्, त्यक्त्वा, युद्धे, अवस्थिताः।

**अन्वयार्थः** - **नः** - आम्हाला **येषाम् अर्थे** - ज्यांच्यासाठी **राज्यम्** - राज्य **काङ्क्षितम्** - इष्ट आहे-अपेक्षित आहे (व ज्यांच्यासाठी) **भोगाः -** भोग **च** - आणि **सुखानि** - सुखे (**काङ्क्षितानि -** इष्ट-अपेक्षित आहेत) **ते इमे** - ते हे (सर्वजण) **धनानि** - धनाला म्ह. धनाची **च** - आणि **प्राणान्** - प्राणाला म्ह. प्राणाची आशा

**त्यक्त्वा -** सोडून **युद्धे** - संग्रामामध्ये-युद्धात **अवस्थिता:** - येवून उभे राहिले आहेत.

**विवरण** - ज्यांच्याकरिता अर्थात् पितापुत्रादिकरिता आम्हाला राज्योपभोग आणि सुखे यांची अनुकूलता आहे असे हे स्वजन जीवित आणि संपत्ति याविषयी निराश होऊन युद्धाला तयार होऊन उभे राहिले आहेत.

**व्याकरणम् - न:** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **येषाम्** - यत् सर्व.पु.ष.ब.व. **अर्थे** - अर्थ पु.स.ए.व. **राज्यम्** - राज्य न.प्र.ए.व. **भोगा:** - पु.प्र.ब.व. **च -** च उभ.अ. **सुखानि** - सुख न.प्र.ब.व. **काङ्क्षितम्** - काङ्क्ष् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **ते** - तत् सर्व.पु.प्र.ब.व. **इमे** - इदम् सर्व.पु.प्र.ब.व. **धनानि** - धन न. द्वि.ब.व. **च** - च उभ.अ. **प्राणान्** - प्राण पु.द्वि.ब.व. **त्यक्त्वा** - त्यज् प्र.ग.प.प.त्वान्त अ. **युद्धे** - युद्ध न.स.ए.व. **अवस्थिता:** - अव+स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व.

**समासविग्रहार्था: - भोगा:** - भुज्यन्त इति भोगा: = भोगले जातात ते भोग**(वि.)**

**आचार्या: पितर: पुत्रास्तथैव च पितामहा: ।**

**मातुला: श्वशुरा: पौत्रा: श्याला: सम्बन्धिनस्तथा ॥३४॥**

**अन्वय:** - आचार्या:, पितर:, पुत्रा:, च, तथा, एव, पितामहा:, मातुला, श्वशुरा:, पौत्रा:, श्याला:, तथा, सम्बन्धिन: ।

**अन्वयार्थ: - आचार्या: -** गुरुजन **पितर: -** चुलते **पुत्रा:** - मुले **च तथा -** त्याचप्रमाणे, **पितामहा: -** आजे **मातुला:** - मामे **श्वशुरा:** - सासरे **पौत्रा:** - नातू **श्याला:** - मेव्हणे **तथा -** त्याचप्रमाणे **सम्बन्धिन: -** संबंधी लोक.

**विवरण -** गुरुजन, वडील, पुत्र तसेच आजे, मामे, सासरे, नातू, मेव्हणे आणि त्याप्रमाणे इतरही आप्तलोक येथे आलेले आहेत.

**व्याकरणम् - आचार्या:** - आचार्य पु.प्र.ब.व. **पितर:** - पितृ पु.प्र.ब.व. **पुत्रा: -** पू न.ग.उ.प.+क्त्र,ऱ्हस्व=पुत्र पु.प्र.ब.व. **च -** च उभ.अ. **तथा** - तथा क्रि.वि.अ. **एव -** एव क्रि.वि.अ. **पितामहा:** - पितामह पु.प्र.ब.व. **मातुला:** - मातृ+डुलच्=मातुल पु.प्र.ब.व. **श्वशुरा:** - श्वशुर पु.प्र.ब.व. **पौत्रा:** - पौत्र पु.प्र.ब.व. **श्याला:** - श्याल पु.प्र.ब.व. **तथा** - तथा क्रि.वि.अ. **सम्बन्धिन:** - सम्+बन्ध्+इनि=संबंधिन् पु.प्र.ब.व.

**समासविग्रहार्था: - पुत्रा: -** पुनन्ति पित्रादीनिति पुत्रा: = जे पित्रांना पवित्र करतात ते पुत्र**(वि.)पितामहा: -** पितॄणां पितर इति पितामहा: = पित्यांचे पितर असे पितामह**(ष.त.स.) पौत्रा:** - पुत्रस्यापत्यानि पुमांस इति पौत्रा: = पुत्राची अपत्ये (मुले) असे पौत्र-नातू**(अपत्यार्थे त.वि.) सम्बन्धिन: -** सम्बधोऽस्ति येषां ते सम्ब न्धिन: = संबंध आहे ज्यांचा ते संबंधी**(अस्त्यर्थे त.वि.)**

**एतान्न हन्तुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ।**

**अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतो: किं नु महीकृते ॥३५॥**

**अन्वय: -** मधुसुदन, घ्नत:, अपि, त्रैलोक्यराज्यस्य, हेतो:, अपि, एतान्, हन्तुम्, न, इच्छामि, महीकृते, नु, किम् ।

**अन्वयार्थः - मधूसदन** - हे मधुसूदना! **घ्नतः अपि** - माझ्यावर प्रहार करणाऱ्यालाही **त्रैलोक्यराज्यस्य हेतोः अपि** - त्रैलोक्याच्या राज्याकरिताही **एतान्** - या संबंधी जनाला **हन्तुम्** - मारण्याची **न इच्छामि** - मी इच्छा करीत नाही **महीकृते** - तर मग केवळ पृथ्वीच्या राज्याकरिता **नु किम्** - त्यांना मी कसा मारीन.

**विवरण** - अर्जुन म्हणतो की मला विजय, भोग आणि सुख इत्यादि हे प्राप्त व्हावेत अशा या इच्छेने देखील माझ्यावर प्रहार करण्यासाठी आलेल्यांना मी मारणार नाही अथवा इहलोकातील भोग तर सोडूनच द्या; कारण ते केव्हांही प्राप्त होतील परंतु त्रैलोक्याचे जरी भोग मला प्राप्त झाले, तरी पण मी त्यांच्यावर कसा शस्त्र चालवणार म्हणजे मी त्यांना कसा मारणार ?

**व्याकरणम् - मधुसूदन** - मधुसूदन पु.संबो.ए.व. **घ्नतः** - हन् द्वि.ग.प.प.कर्त शतृ=घ्नत् वि.पु.द्वि.ब.व. **अपि** - अपि अ. **त्रैलोक्यराज्यस्य** - त्रैलोक्य न. राज्य न.ष.ए.व. **हेतोः** - हेतु पु.ष.ए.व. **अपि** - अपि अ. **एतान्** - एतत् सर्व.पु.द्वि.ब.व. **हन्तुम्** - हन् द्वि.ग.प.प.तुमन्त अ. **न** - क्रि.वि.अ. **इच्छामि** - इष् ष.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **महीकृते** - मही स्त्री. कृते अ.चतुर्थ्यर्थे **नु** - नु अ. **किम्** - आक्षेपार्थक सर्व.

**समासविग्रहार्थाः - त्रैलोक्यराज्यस्य** - त्रयाणां लोकानां समाहारस्त्रिलोकम्, त्रिलोकमेव त्रैलोक्यम्, त्रैलोक्यस्य राज्यं त्रैलोक्यराज्यं तस्य त्रैलोक्यराज्यस्य = तीन लोकांचा समुदाय त्रिलोक, त्रिलोकच त्रैलोक्य, त्रैलोक्याचे राज्य त्रैलोक्यराज्य त्या त्रैलोक्यराज्याचे**(द्विगु गर्भित ष.त.स.) मधुसूदन** - मधुनामानं दैत्यं नाशयति-सूदयतीति मधुसूदनस्तत्सम्बुद्धौ मधुसूदन = मधुनावाच्या दैत्याला मारतो असा मधुसूदन त्याचे संबोधनामध्ये हे मधुसूदन**(उपपद स.) महीकृते** - मह्यायिति महीकृते = पृथ्वीकरिता-पृथ्वीसाठी**(ष.त.स.)**

**निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ।**

**पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ।।३६।।**

**अन्वयः** - जनार्दन, धार्तराष्ट्रान्, निहत्य, नः, का, प्रीतिः, स्यात्, एतान्, आततायिनः, हत्वा, अस्मान्, पापम्, एव, आश्रयेत् ।

**अन्वयार्थः - जनार्दन** - हे जनार्दना! **धार्तराष्ट्रान्** - धृतराष्ट्राचे पुत्र दुर्योधनादिकांना **निहत्य** - मारून **नः** - आमची **का प्रीतिः** - कोणती प्रसन्नता **स्यात्** - होणार **एतान्** - या **आततायिनः** - दुष्टांना **हत्वा** - मारून **अस्मान्** - आम्हाला **पापम् एव** - पापच **आश्रयेत्** - लागेल.

**विवरण** - हे श्रीकृष्णा! या ठिकाणी युद्धाकरिता एकत्रित जमलेले हे सर्व कौरव आततायी आहेत.**'अग्निदो गरदश्चैव शस्त्रपाणिर्धनापहः । क्षेत्रदारापहारी च षडेते आततायिनः '**(वसिष्ठ स्मृति ३.१६)**अर्थ** = आग लावणारा, विष घालणारा, हातात शस्त्र घेऊन मारण्यास सज्ज झालेला, संपत्ती हरण करणारा, जमीन-राज्य लुटणारा आणि स्त्री पळविणारा हे सहा आततायि होत. यांना मारून आम्हाला पापच लागेल; कारण आततायिला मारण्यात शास्त्रकारांनी एके ठिकाणी दोष सांगितलेला आहे आणि एके ठिकाणी दोष सांगितलेला नाही याकरिता अर्थकाराचे उदाहरणही आहे ते असे -**'गुरु वा बालवृद्धौ वा ब्राह्मणं वा बहुश्रुतम् । आततायिनमायान्तं हन्यादेवाविचारयन्'**(अर्थशास्त्र-मनुस्मृति ८.३५०-३५१)**अर्थ** = आततायी मनुष्य गुरु आहे, बाल आहे की वृद्ध आहे, ब्राह्मण आहे की मोठा विद्वान आहे, हा विचार न करता ठार मारावा. **'नाऽऽततायिवधे दोषो हन्तुर्भवति कश्चन'**(अर्थशास्त्र-मनुस्मृति ८.३५१)**अर्थ** = आततायीला मारणे

कोणत्याही प्रकारचा दोष नाही; परंतु धर्मशास्त्र असे सांगते की, मनुष्याने केव्हाही कोणाचीही हिंसा करू नये **'न हिंस्यात्सर्वा भूतानि'**(धर्मशास्त्र)= हिंसा न करणे परम धर्म आहे **'अहिंसा परमो धर्मः'**(धर्मशास्त्र)= जीवाची हत्या न करणे हाच परम धर्म आहे. पुन्हा धर्मशास्त्रकाराने एका ठिकाणी विशेष नियम सांगितलेला आहे, तो असा **'स एव पापिष्ठतमो यः कुर्यात् कुलनाशनम्'**(धर्मशास्त्र) तोच अतिपापी आहे जो कुलाचा नाश करतो यास्तव मी यांना कसे मारणार? यांना मारण्यात मला निस्संदेह पापच भोगावे लागेल.(कारण अर्थशास्त्रात स्वार्थ असतो आणि धर्मशास्त्रात स्वार्थ नसतो म्हणून अर्थशास्त्रापेक्षा धर्मशास्त्र बलवान आहे.)

**व्याकरणम् - जनार्दन -** जनार्दन पु.संबो.ए.व. **धार्तराष्ट्रान् -** धार्तराष्ट्र पु.द्वि.ब.व. **निहत्य -** नि+हन् द्वि.ग.प.प.ल्यबन्त अ. **नः -** अस्मत् सर्व.ष.ब.व. **का -** किम् सर्व.स्त्री.प्र.ए.व. **प्रीतिः -** प्री+क्तिन्=प्रीति स्त्री.प्र.ए.व. **स्यात् -** अस् द्वि.ग.प.प.कर्त.विधिलिङ् तृ.पु.ए.व. **एतान् -** एतत् सर्व.पु.द्वि.ब.व. **आतता यिनः -** आततायिन् पु.द्वि.ब.व. **हत्वा -** हन् द्वि.ग.प.प.त्वान्त अ. **अस्मान् -** अस्मत् सर्व.द्वि.ब.व. **पापम् -** पाप न.द्वि.ए.व. **एव -** एव क्रि.वि.अ. **आश्रयेत् -** आ+श्रि प्र.ग.उ.प.(प.प)कर्त.विधिलिङ् तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - जनार्दन -** जनान्-दुष्टजनानर्दयति-ताडयतीति जनार्दनस्तत्सम्बुद्धौ हे जनार्दन = दुष्टजनांना दुःख देतो असा जनार्दन त्याचे संबोधनामध्ये हे जनार्दन**(कृदन्त वि.)** यद्वा **जनार्दन -** अर्दयतीत्यर्दनो जनानामर्दन इति जनार्दनस्तत्सुम्बुद्धौ जनार्दन = पीडा करतो असा पीडा करणारा, जनांना दुःख देणारा जनार्दन त्याचे संबोधनामध्ये हे जनार्दन**(ष.त.स.) धार्तराष्ट्रान् -** धृतं राष्ट्रं येन स धृतराष्टो धृतराष्ट्रस्यापत्यानि पुमांसो धार्तराष्ट्रास्तान्धार्तराष्ट्रान् = ज्याने राष्ट्र धारण केले असा तो धृतराष्ट्र, धृतराष्ट्राची अपत्ये-पुत्र धार्तराष्ट्र-दुर्योधनादि**(अपत्यार्थे त.वि.) आततायिनः -** आततायाः **'अग्निदोगरदश्चैव '** इत्युक्ताः षड्विधा दोषा येषां स न्ति ते आततायिनः = **'अग्निदोगरदश्चैव'** या मध्ये सांगितलेले सहा दोष ज्यांच्यामध्ये असतात ते आततायि **(ब.स.)**

**तस्मान्नार्हा वयं हन्तुं धार्तराष्ट्रान् स्वबान्धवान् ।**

**स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥३७॥**

**अन्वयः -** तस्मात्, माधव, स्वबान्धवान्, धार्तराष्ट्रान्, हन्तुम्, वयम्, न, अर्हाः, हि, स्वजनम्, हत्वा, कथम्, सुखिनः, स्याम ।

**अन्वयार्थः - तस्मात् -** म्हणून **माधव -** हे माधवा **स्वबान्धवान् -** आपले कुटुंबी **धार्तराष्ट्रान् -** धृतराष्ट्रपुत्र दुर्योधनादिकांस **हन्तुम् -** मारण्याकरिता **वयम् न अर्हाः -** आम्ही योग्य नाहीत **हि -** कारण **स्वजनम् -** आपल्या बांधवांना **हत्वा -** मारून **कथम् -** कशाप्रकारे **सुखिनः -** आम्ही सुखी **स्याम -** होऊ.

**विवरण -** कुलघातकी लोकांना कोठेही शास्त्रामध्ये तरणोपाय सांगितलेला नाही; त्यामुळे अर्जुन म्हणतो की, मी या आत्मीय जनांना मारण्याकरिता योग्य नाही; कारण दुर्योधनादि जरी दुष्ट असले तरी ते आमचे बांधवच आहेत; म्हणून त्यांच्यावर शस्त्राचा वर्षाव करणे आम्हाला अयोग्य वाटते; कारण त्यांना मारून कोणत्या प्रकारे आम्हाला सुख मिळणार?

**व्याकरणम् - तस्मात् -** तस्मात् अ. **माधव -** माधव पु.संबो.ए.व. **स्वबान्धवान् -** स्वबान्धव पु.द्वि.ब.व.

**धार्तराष्ट्रान्** - धार्तराष्ट्र पु.द्वि.ब.व. **हन्तुम्** - हन् द्वि.ग.प.प.तुमन्त अ. **वयम्** - अस्मत् सर्व.प्र.ब.व. **न** - न क्रि.वि.अ. **अर्हाः** - अर्ह वि.पु.प्र.ब.व. **हि** - क्रि.वि.अ. **स्वजनम्** - स्वजन पु.द्वि.ए.व. **हत्वा** - हन् द्वि.ग.प.प.त्वान्त अ. **कथम्** - कथम् अ. **सुखिनः** - सुख् द.ग.प.प.+अच्=सुख+इनि=सुखिन् पु.प्र.ब.व. **स्याम** - अस् द्वि.ग.प.प.कर्त.विध्यर्थ प्र.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **स्वबान्धवान्** - स्वस्य बान्धवाः स्वबान्धवास्तान् स्वबान्धवान् = स्वतःचे बांधव स्वबांधव त्या स्वबांधवांना**(ष.त.स.)** **सुखिनः** - सुखमस्ति येषां ते सुखिनः = सुख आहे ज्यांचे - ज्यांना ते सुखी**(अस्त्यर्थे त.वि.)** **कथम्** - केन प्रकारेण कथम् = कोणत्या प्रकाराने कसे?**(प्रकारार्थे त.वि.)**

कुलाचा नाश व मित्रद्रोहाने होणाऱ्या पापापासून वाचण्याकरिता अर्जुनाचे युद्ध न करणेच योग्य आहे -

**यद्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः ।**

**कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥३८॥**

**कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ।**

**कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥३९॥**

**अन्वयः** - यद्यपि, लोभोपहतचेतसः, एते, कुलक्षयकृतम्, दोषम्, च, मित्रदोहे, पातकम्, न, पश्यन्ति, जनार्दन, कुलक्षयकृतम्, दोषम्, प्रपश्यद्भिः, अस्माभिः, अस्मात्, पापात्, निवर्तितुम्, कथम्, न, ज्ञेयम् ।

**अन्वयार्थः** - **यद्यपि** - जरी **लोभोपहतचेतसः** - लोभामुळे ज्यांचे चित्त भ्रष्ट झाले आहे असे धृतराष्ट्राचे पुत्र दुर्योधनादिक **एते** - हे **कुलक्षयकृतम्** - कुलाच्या नाशाने उत्पन्न होणाऱ्या **दोषम्** - दोषाला **च** - आणि **मित्रद्रोहे** - मित्राच्या बरोबर वैर केल्यामुळे होणाऱ्या **पातकम्** - पापाला **न पश्यन्ति** - पहात नाहीत तरी **जनार्दन** - हे वासुदेवा **कुलक्षयकृतम्** - कुलाच्या क्षयाने उत्पन्न होणाऱ्या **दोषम्** - दोषाला **प्रपश्यद्भिः** - चांगल्या प्रकाराने जाणणारे **अस्माभिः** - आम्ही (आमच्या द्वारा) **अस्मात् पापात्** - या पापापासून **निवर्तितुम्** - निवृत्त होण्याकरिता **कथ् न ज्ञेयम्** - कसा विचार करू नये?

**विवरण** - भविष्यकालीन राज्यसुखाच्या आणि भोगाच्या लोभाने दुर्योधनादिकांचे चित्त विचारहीन झालेले असल्यामुळे, युद्धात आपल्या कुळाचा क्षय झाला तर अनिष्ट परिणाम होतील आणि मित्रांचा द्रोह केला तर पाप लागेल हे त्यांना कळत नसले; तरी पण आम्ही तर चांगल्या प्रकारे जाणणारे तसेच राज्याविषयी यत्किंचितही लोभ न करणारे आणि नंतर कुळाच्या क्षयाचा परिणाम काय होईल हे आम्हाला स्पष्ट प्रतीत होत आहे. त्यांना विचारहीनतेमुळे काही कळत नसले तरी परंतु आम्हाला तर सर्वच परिणाम कळतात; असे असूनही आम्ही पापापासून निवृत्त का होऊ नये.

**व्याकरणम्** - **यद्यपि** - यद्यपि अ. **लोभोपहतचेतसः** - लोभ पु. उप+हन् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. चित्+असुन्+क्विप्=चेतस् न.वि.पु.प्र.ब.व. **एते** - एतत् सर्व.पु.प्र.ब.व. **कुलक्षयकृतम्** - कुल न. क्षय पु. कृ अ.ग.उ.प.भू.धा.वि.पु.द्वि.ए.व. **दोषम्** - दोष पु.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **मित्रद्रोहे** - मित्र न. द्रोह पु.स.ए.व. **पातकम्** - पातक न.द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **पश्यन्ति** - दृश् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **जनार्दन** - जनार्दन पु.संबो.ए.व. **कुलक्षयकृतम्** - कुल न. क्षय पु. कृ अ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.द्वि.ए.व.

**दोषम् -** दोष पु.द्वि.ए.व. **प्रपश्यद्भिः -** प्र+दृश् प्र.ग.प.प.शतृ=प्रपश्यत् वि.पु.तृ.ब.व. **अस्माभिः -** अस्मत् सर्व.तृ.ब.व. **अस्मात् -** इदम् सर्व.न.पं.ए.व. **पापात् -** पाप न.पं.ए.व. **निवर्तितुम् -** नि+वृत् प्र.ग.आ.प.तुमन्त अ. **कथम् -** कथम् अ. **न -** न क्रि.वि.अ. **ज्ञेयम् -** ज्ञा न.ग.उ.प.कर्म.यत् वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - लोभोपहतचेतसः -** लोभेन-राज्यलोभेन, उपहतम्-नष्टं चेतः-अन्तःकरणं येषां ते लोभोपहतचेतसः = लोभाने-राज्यलोभाने भ्रष्ट चित्त किंवा विवेकशून्य चित्त-अन्तःकरण झाले आहे ज्यांचे ते लोभोपहतचेतस**(ब.स.)** यद्वा **लोभोपहतचेतसः -** स्थितद्रव्यत्यागासहिष्णुत्वं लोभस्तेनोपहतम्-ग्रस्तं चेतो येषां ते लोभोपहतचेतसः = स्थित-विद्यमान द्रव्याच्या त्यागाला सहन करू शकत नाही तोच लोभ त्या लोभाने ज्यांचे चित्त अपहृत-ग्रस्त झालेले आहे ते लोभोपहतचेतस(**ब.स.**) **कुलक्षयकृतम् -** कुलस्य क्षयः कुलक्षयः कुलक्षयेन कृतः कुलक्षयकृतस्तं कुलक्षयकृतम् = कुलाचा क्षय-कुलक्षय कुलक्षयाने केलेला कुलक्षयकृत त्या कुलक्षय केलेल्या**(ष.त.ग.तृ.त.स.) मित्रद्रोहे -** मित्राणाम्-सुहृदां द्रोह इति मित्रद्रोहस्त स्मिन् मित्रद्रोहे = मित्रांचा-सुहृदांचा द्रोह त्या मित्रद्रोहामध्ये**(ष.त.स.) प्रपश्यद्भिः -** प्रकर्षेण पश्यन्ति ते प्रपश्यन्तस्तैः प्रपश्यद्भिः = चांगल्या प्रकारे पाहतात ते पाहणारे त्या पाहणाऱ्यांना**(कृदन्त वि.)**

कुळाच्या नाशापासून होणाऱ्या दोषांचे विस्तारपूर्वक वर्णन -

**कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः ।**

**धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥४०॥**

**अन्वयः -** कुलक्षये, सनातनाः, कुलधर्माः, प्रणश्यन्ति, उत, धर्मे, नष्टे, अधर्मः, कृत्स्नम्, कुलम्, अभिभव ति ।

**अन्वयार्थः - कुलक्षये -** कुळाचा नाश झाला असता **सनातनाः कुलधर्माः -** वंशपरंपरेने अनादि कालापासून चालत आलेले कुलाचे आचार-विचार **प्रणश्यन्ति -** सर्व प्रकाराने नष्ट होतात **धर्मे नष्टे -** धर्माचा नाश झाला असता **अधर्मः -** अधर्म **कृत्स्नम् उत कुलम् -** संपूर्णच वंशाला **अभिभवति -** व्यापून टाकतो.

**विवरण -** कुळाचा क्षय झाला असता वंशपरंपरेने चालत आलेले कुळधर्म नष्ट होतात आणि धर्म नष्ट झाला की सर्व कुळावर अधर्माचा पगडा बसतो.

**व्याकरणम् - कुलक्षये -** कुल न. क्षय पु.स.ए.व. **सनातनाः -** सनातन वि.पु.प्र.ब.व. **कुलधर्माः -** कुल न. धर्म पु.प्र.ब.व. **प्रणश्यन्ति -** प्र+नश् च.ग.प.प.कर्त.वर्त.तृ.पु.ब.व. **धर्मे -** धृ प्र.ग.उ.प.+मन्=धर्म पु.स.ए.व. **नष्टे -** नश् - च.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.स.ए.व. **अधर्मः -** अधर्म पु.प्र.ए.व. **कृत्स्नम् -** कृत्+क्स्न=कृत्स्न वि.न.द्वि.ए.व. **उत -** अ. **कुलम् -** कुल न.द्वि.ए.व. **अभिभवति -** अभि+भू प्र.ग.प.प.कर्त.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - कुलक्षये-** कुलस्य क्षयः कुलक्षयस्तस्मिन् कुलक्षये = कुलाचा क्षय कुलक्षय त्या कुलक्षयामध्ये**(ष.त.स.) कुलधर्माः -** कुलस्य धर्माः कुलधर्माः-आचारविशेषाः = कुलाचा धर्म कुलधर्म-आचारविशेष धर्म**(ष.त.स.) अधर्मः -** न धर्म इत्यधर्मः = नाही धर्म असा अधर्म**(न.त.स.) सनातनाः -** सदा तिष्ठन्तीति सनातनाः = नेहमी राहतात असे सनातन**(त.वि.)**

**अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः ।**

**स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसङ्करः ॥४१॥**

**अन्वयः -** कृष्ण, अधर्माभिभवात्, कुलस्त्रियः, प्रदुष्यन्ति, वार्ष्णेय, स्त्रीषु, दुष्टासु, वर्णसङ्करः, जायते ।

**अन्वयार्थः - कृष्ण -** हे कृष्णा! **अधर्माभिभवात् -** कुळात अधिक पाप वाढल्यामुळे **कुलस्त्रियः -** कुळामधल्या स्त्रिया **प्रदुष्यन्ति -** दुषीत होतात **वार्ष्णेय -** हे श्रीकृष्णा! **स्त्रीषु दुष्टासु -** कुलीन स्त्रिया दुराचरणी झाल्या असता **वर्णसङ्करः -** ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांचा परस्पर वर्णसंकर **जायते -** उत्पन्न होतो.

**विवरण -** हे कृष्णा! (कुल) अधर्माने ग्रासले म्हणजे कुलीन साध्वी स्त्रियाही बिघडतात आणि कुलस्त्रिया बिघडल्या की वर्णव्यवस्था नाहीशी होते.

**व्याकरणम् - कृष्ण -** कृष्ण पु.संबो.ए.व. **अधर्माभिभवात् -** अधर्म पु. अभि+भू प्र.ग.प.प.+अप्=अभिभव कर्त.धा.वि.पु.पं.ए.व. **कुलस्त्रियः -** कुल न. स्त्री स्त्री.प्र.ब.व. **प्रदुष्यन्ति -** प्र+दुष् च.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **वार्ष्णेय -** वार्ष्णेय पु.संबो.ए.व. **स्त्रीषु -** स्त्री स्त्री.स.ब.व. **दुष्टासु -** दुष् च.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.स्त्री.स.ब.व. **वर्णसङ्करः -** वर्णसङ्कर पु.प्र.ए.व. **जायते -** जन् च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अधर्माभिभवात् -** अधर्मस्याभिभवोऽधर्माभिभवस्तस्मादधर्माभिभवात् = अधर्माचा उत्कर्ष त्या अधर्मोत्कर्षापासून**(ष.त.स.) कुलस्त्रियः -** कुलस्य-वंशस्य स्त्रिय इति कुलस्त्रियः = कुलाच्या वंशाच्या स्त्रिया अशा कुलस्त्रिया**(ष.त.स.) वार्ष्णेय -** वृष्णेर्गोत्रापत्यम्-पुमान् वार्ष्णेयस्तत्सम्बुद्धौ वार्ष्णेय = वृष्णीवंशाचे गोत्रापत्य पुरुष वार्ष्णेय त्याचे संबोधनामध्ये हे वार्ष्णेय**(अपत्यार्थे त.वि.) वर्णसङ्करः -** वर्णानाम् -ब्राह्मणादीनाम्, सङ्करः-मिश्रीकरणम्-एकत्रीकरणमिति वर्णसङ्करः = ब्राह्मणादि वर्णाचे मिश्रीकरण-एकत्र मिलन म्हणजे वर्णसंकर**(ष.त.स.) कृष्ण -** कर्षति-भक्तजनानाकर्षतीति कृष्णस्तत्सम्बुद्धौ हे कृष्ण = भक्तजनांना आपल्याकडे चहुकडून आकर्षित करतो असा कृष्ण त्याचे संबोधनामध्ये हे कृष्ण**(त.वि.)**

**सङ्करो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ।**

**पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिण्डोदकक्रियाः ॥४२॥**

**अन्वयः -** सङ्करः, कुलघ्नानाम्, च, कुलस्य, नरकाय, एव, हि, लुप्तपिण्डोदकक्रियाः, एषाम्, पितरः, पतन्ति ।

**अन्वयार्थः - सङ्करः -** वर्णसंकरता दोष **कुलघ्नानाम् -** कुलाचा घात करणाऱ्या लोकांना **च -** आणि **कुलस्य -** कुलाला **नरकाय एव हि -** नरकालाच नेण्याकरिता कारण होतो **लुप्तपिण्डोदकक्रियाः -** ज्यांची पिण्ड क्रिया, उदक क्रिया लुप्त झाली आहे असे **एषाम् -** यांचे **पितरः -** पितर **पतन्ति -** आपल्या स्थानापासून पतित होतात म्हणजे नरकात पडतात.

**विवरण -** वर्णसंकर हा कुलक्षय करणाऱ्यांना आणि त्यांच्या कुलाला देखील नरकाला नेतो कारण श्राद्ध-तर्पणादि क्रिया लुप्त झाल्यामुळे त्यांचे-कुलक्षय करणारांचे पितर-पूर्वज अधोगतीला जातात.

**व्याकरणम् - सङ्करः -** संकर पु.प्र.ए.व. **कुलघ्नानाम् -** कुलघ्न पु.ष.ब.व. **च -** च उभ.अ. **कुलस्य -** कुल

न.ष.ए.व. **नरकाय -** नृ न.ग.प.प.+वुन्=नरक पु.च.ए.व. **एव -** एव क्रि.वि.अ. **हि -** हि क्रि.वि.अ **लुप्त पिण्डोदकक्रिया: -** लुप् च.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. पिण्ड पु. उदक न. क्रिया स्त्री.प्र.ब.व. **एषाम् -** इदम् सर्व.पु.ष.ब.व. **पितर: -** पितृ पु.प्र.ब.व. **पतन्ति -** पत् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था: - कुलघ्नानाम् -** कुलं घ्नन्तीति कुलघ्नास्तेषां कुलघ्नानाम् = कुलाचा घात करतात असे कुलघ्न त्या कुलघ्नांचा-त्या कुलघातक्यांचा-कुलघात करणाऱ्यांचा**(ष.त.स.) जातिधर्मा: -** जात्या:-वर्णस्य धर्मा इति जातिधर्मा:-वर्णधर्मा: = जातीचे-वर्णाचे धर्म जातिधर्म-वर्णधर्म**(ष.त.स.) कुलधर्मा: -** कुलस्य-वंशस्य धर्मा इति कुलधर्मा: = कुलाचे-वंशाचे धर्म असे कुलधर्म**(ष.त.स.) सङ्कर: -** संकीर्यन्ते-मिश्रीक्रियन्त इति सङ्कर: = परस्परामध्ये मिश्र केले जातात वर्ण असा वर्णसंकर**(वि.) लुप्तपिण्डोदकक्रिया: -** पिण्डश्च उदकश्चेति पिण्डोदके तयो: क्रिया पिण्डोदकक्रिया: लुप्ता: पिण्डोदकक्रिया येषां ते लुप्त पिण्डोदकक्रिया: = पिंड आणि उदक असे पिंडोदक त्यांची क्रिया पिंडोदकक्रिया, लुप्त झाली पिंडोदकक्रिया ज्यांची ते लुप्तपिंडोदकक्रिय**(ब.स.)**

**दोषैरेतै: कुलघ्नानां वर्णसङ्करकारकै: ।**

**उत्साद्यन्ते जातिधर्मा: कुलधर्माश्च शाश्वता: ॥४३॥**

**अन्वय: -** एतै:, वर्णसङ्करकारकै:, दोषै:, कुलघ्नानाम्, शाश्वता:, जातिधर्मा:, च, कुलधर्मा:, उत्साद्यन्ते ।

**अन्वयार्थ: - एतै: -** या **वर्णसङ्करकारकै: -** वर्णसंकरकारक **दोषै: -** दोषांच्याद्वारा **कुलघ्नानाम् -** कुल घातक्यांचे **शाश्वता: -** वंशपरंपराप्राप्त अनादि कालापासून आलेले **जातिधर्मा: -** जातिधर्म **च -** आणि **कुलधर्मा: -** सनातन कुलधर्म **उत्साद्यन्ते -** नष्ट होतात.

**विवरण -** परंपराप्राप्त सनातन धर्म अभिभूत होवून, वर्णसंकररूपी अधर्म प्रादूर्भूत झाला की, कुळामध्ये जे वेदोक्त कथित जातिधर्म-वर्णधर्म आहेत ते मुळासह नष्ट होतात आणि वर्णसंकर उत्पन्न होवून, कुळाचा नाश, कुळाच्या नाशाने कुळधर्माचा नाश, कुळधर्माच्या नाशाने पापाची वृद्धी आणि पापाच्या वृद्धीने स्त्रिया व्यभिचार दोषाने दूषित होतात.

**व्याकरणम् - एतै: -** एतत् सर्व.पु.तृ.ब.व. **वर्णसङ्करकारकै: -** वर्ण पु. सङ्कर पु. कारक वि.पु.तृ.ब.व. **दोषै: -** दोष पु.तृ.ब.व. **कुलघ्नानाम् -** कुलघ्न पु.ष.ब.व. **शाश्वता: -** शश् प्र.ग.प.प.+वत्=शश्वत्+अण्=शाश्वत पु.प्र.ब.व. **जातिधर्मा: -** जाति स्त्री.वि. धर्म पु.प्र.ब.व. **च -** च उ.अ. **कुलधर्मा: -** कुल न. धर्म पु.प्र.ब.व. **उत्साद्यन्ते -** उद्+सद् प्र.ग.उ.प.(आ.प.)णिजन्त कर्म.लट् वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था: - कुलघ्नानाम् -** कुलघ्नान्-कुलधर्मप्रवर्तकान् ये घ्नन्ति ते कुलघ्नास्तेषां कुलघ्नानाम् = कुलधर्म प्रवर्तकांना जे मारतात ते कुलघातकी त्या कुलघातक्यांचा**(उप.स.) वर्णसङ्करकारकै: -** वर्णानां सङ्करो वर्णसङ्कर:, वर्णसङ्करं कुर्वन्तीति ते वर्णसङ्करकारकास्तैर्वर्णसङ्करकारकै: = वर्णाचा संकर वर्णसंकर वर्णसंकराला करतात असे ते वर्णसंकर करणारे त्या वर्णसंकर करणाऱ्यांकडून**(ष.त.स.)**

**उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।**

**नरकेऽनियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥४४॥**

**अन्वय:** - जनार्दन, उत्सन्नकुलधर्माणाम्, मनुष्याणाम्, नरके, अनियतम्, वास:, भवति, इति, अनुशुश्रुम।

**अन्वयार्थ:** - **जनार्दन** - हे जनार्दना! **उत्सन्नकुलधर्माणाम्** - ज्यांचे कुलधर्म नष्ट झाले आहेत **मनुष्याणाम्** - अशा मनुष्यांचा **नरके** - नरकामध्ये **अनियतम्** - अनिश्चित कालपर्यंत **वास:** - निवास **भवति** - होतो **इति** - असे **अनुशुश्रम** - आम्ही अनादि कालापासून ऋषिमुनि यांच्या कडून ऐकत आलो आहोत.

**विवरण** - हे कृष्णा! ज्यांचे कुलधर्म आणि जातिधर्म प्राय: समूळ नष्ट झाले आहेत अशा या कुलाचा घात करणाऱ्या तथा वर्णसंकर व्याप्त करणाऱ्या पुरुषांचा नि:संदेह दीर्घकालपर्यंत कुंभीपाक, रौरव आदि नरकामध्ये निवास होतो आणि भीषण-कठीण यमयातना सहन कराव्या लागतात, असे आम्ही शास्त्र आणि सत्पुरुष यांच्याद्वारा श्रवण केले आहे.

**व्याकरणम्** - **जनार्दन** - जनार्दन पु.संबो.ए.व. **उत्सन्नकुलधर्माणाम्** - उद्+सद् प्र.ग./ष.ग.प.प.कर्म.भू.धा. वि. कुल न. धर्म. पु.ष.ब.व. **मनुष्याणाम्** - मनु+यत्, सुक् आगम=मनुष्य पु.ष.ब.व. **नरके** - नरक पु.स.ए.व. **अनियतम्** - अ+नि+यम्+क्त=अनियत कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **वास:** - वास पु.प्र.ए.व. **भव ति** - भू प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **अनुशुश्रुम** - अनु+ श्रु पं.ग.प.प.कर्त. लिट् परोक्ष भू.प्र.पु.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **जनार्दन** - जनैरर्द्यते याच्यते स्वाभीष्टं असौ जनार्दन: = लोक आपली इच्छा ज्याच्याद्वारा पूर्ण करतात असा जनार्दन**(ब.स.)** **उत्सन्नकुलधर्माणाम्** - कुलस्य-वंशस्य धर्मा इति कुलधर्मा उत्सन्ना:-विध्वंसिता: कुलधर्मा:-वर्णाश्रमधर्मा यैस्ते उत्सन्नकुलधर्मास्तेषां उत्सन्नकुलधर्माणाम् = कुलाचे-वंशाचे धर्म ते कुलधर्म उत्सन्न-विध्वंसित कुलधर्म-वर्णाश्रमधर्म ज्याच्याद्वारा ते उत्सन्नकुलधर्म अशा त्या विध्वंसित कुलधर्मांचे**(ष.त.ग.ब.स.)** **वास:** - वसनमिति वास: = राहाणे असे वास अथवा वास करण्याचे स्थान **(वि.)**

अर्जुनाचे राज्य आणि सुखादिकांच्या लोभाने स्वजनांना मारण्याकरिता केलेल्या युद्धाच्या तयारीने मोठ्या पापाचा आरंभ करत आहोत असे दाखविणे -

**अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम्।**

**यद्राज्यसुखलोभेन हन्तुं स्वजनमुद्यता: ॥४५॥**

**अन्वय:** - अहो, बत, वयम्, महत्पापम्, कर्तुम्, व्यवसिता:, यत्, राज्यसुखलोभेन, स्वजनम्, हन्तुम्, उद्यता:।

**अन्वयार्थ:** - **अहो** - काय आश्चर्य आहे **बत** - अरेरे! **वयम्** - आम्ही **महत्** - मोठे **पापम्** - पाप **कर्तुम्** - करण्याकरिता **व्यवसिता:** - निश्चय केला आहे **यत्** - जे **राज्यसुखलोभेन** - राज्यसुखाच्या लोभाने **स्वजनम्** - आपल्या बांधवांना **हन्तुम्** - मारण्याकरिता **उद्यता:** - तयार झालो आहोत.

**विवरण** - आश्चर्ययुक्त होवून अर्जुन म्हणतो की, अरेरे! आम्ही लोक धार्मिक तथा बुद्धिमान मानले जात आहोत. केवळ आपले जीवन जगण्याकरिता आणि राज्यसुखाच्या लोभाकरिता आम्ही आपल्या आत्मीय जनांना मारण्यास तयार झालो आहोत. असे हे निकृष्ट कृत्य करणे म्हणजे घोर पापच करणे होय.

**व्याकरणम् - अहो** - केवलप्रयोगी अ. **बत** - केवलप्रयोगी अ. **वयम्** - अस्मत् सर्व.प्र.ब.व. **महत्** - मह् प्र.ग.प.प.+अति=महत् वि.न.द्वि.ए.व. **पापम्** - पाप न.द्वि.ए.व. **कर्तुम्** - कृ अ.ग.उ.प.तुमन्त अ. **व्यव सिताः** - वि+अव+षिञ् पं.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **राज्यसुखलोभेन** - राज्य न. सुख न. लोभ पु.तृ.ए.व. **स्वजनम्** - स्वजन पु.द्वि.ए.व. **हन्तुम्** - हन् द्वि.ग.प.प.तुमन्त अ. **उद्यताः** - उद्+यम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ब.व.

**समासविग्रहार्थाः - राज्यसुखलोभेन** - राज्यस्य सुखं राज्यसुखं राज्यसुखस्य लोभ इति राज्यसुखलोभस्तेन राज्यसुखलोभेन = राज्याचे सुख राज्यसुख. राज्यसुखाचा लोभ असा राज्यसुखलोभ त्या राज्यसुखलोभाने **(ष.त.स.) पापम्** - पाति-रक्षति अस्मात् आत्मानमिति पापम् =

**यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः।**

**धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥४६॥**

**अन्वयः** - यदि, अशस्त्रम्, तथा, अप्रतिकारम्, माम्, शस्त्रपाणयः, धार्तराष्ट्राः, रणे, हन्युः, तत्, मे, क्षेमतरम्, भवेत्।

**अन्वयार्थः - यदि** - जर **अशस्त्रम्** - शस्त्ररहित **तथा** - त्याचप्रमाणे **अप्रतीकारम्** - कौरवादिक शत्रूंचा प्रतीकार न करणाऱ्या **माम्** - मला **शस्त्रपाणयः** - हातात शस्त्र आहे ज्यांच्या असे **धार्तराष्ट्राः** - दुर्योधनादि **रणे** - रणभूमीवर **हन्युः** - मारतील **तत्** - तर ते **मे** - मला **क्षेमतरम्** - अतिशय कल्याणकारक **भवेत्** - होईल.

**विवरण** - युद्धाची घोषणा झाल्यावर मी शस्त्राचा त्याग करून दुर्योधनादि शत्रूंचा प्रतिकार न करता, संभवत: ते लोक युद्धही न करतील आणि याप्रमाणे समस्त आत्मीय जनांचे रक्षण होईल. परंतु कदाचित मला ते शस्त्रहीन आणि युद्धापासून निवृत्त झालेला समजून, माझ्यावर शस्त्रांचा वर्षाव करतील तथा युद्धस्थलात मला ते मारतील तरी पण मला ते सुखकारकच होईल.

**व्याकरणम् - यदि** - यदि अ. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **अशस्त्रम्** - अ+शस्त्र न.वि.द्वि.ए.व. **अप्रतीकारम्** - अ+प्रतीकार पु.द्वि.ए.व. **शस्त्रपाणयः** - शस्त्र न. पाणि पु.प्र.ब.व. **धार्तराष्ट्राः** - धार्तराष्ट्र पु.प्र.ब.व. **रणे** - रण न.स.ए.व. **हन्युः** - हन् द्वि.ग.प.प.कर्त.विधिलिङ् तृ.पु.ब.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.च.ए.व. **क्षेमतरम्** - क्षि+मन्=क्षेम+तर=क्षेमतर वि.न.प्र.ए.व. **भवेत्** - भू प्र.ग.प.प.कर्त.विधिलिङ् तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अप्रतीकारम्** - न विद्यते प्रतिकारो यस्मिन् सोऽप्रतीकारस्तमप्रतीकारम् = नाही प्रतिकार असा अप्रतिकार त्या प्रतिकार न करणाऱ्यास**(न.ब.स.) अशस्त्रम्** - नास्ति शस्त्रं यस्य पार्श्वे सोऽशस्त्रस्तमशस्त्रम् = नाही शस्त्र ज्याचे जवळ तो अशस्त्र त्या शस्त्र नसणाऱ्यास**(न.ब.स.) शस्त्रपाणयः** - स न्ति शस्त्राणि पाण्यो: येषां ते शस्त्रपाणय: = आहेत शस्त्रे हातामध्ये ज्यांच्या ते शस्त्रपाणि**(व्यधिकरण ब.स.) क्षेमतरम्** - अतिक्षयेन क्षेम इति क्षेमतरम् = अतिशयाने कल्याण असे अतिशय कल्याणकारक**(त.वि.)**

युद्ध न करण्याचा निश्चय करून अर्जुन शस्त्रत्याग करून रथात गप्प बसला, ही गोष्ट सांगून संजयाने अध्यायाची समाप्ति केली -

**सञ्जय उवाच -** संजय म्हणाला -

**एवमुक्त्वार्जुनः सङ्ख्ये रथोपस्थ उपाविशत्।**

**विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥४७॥**

**अन्वयः -** सङ्ख्ये, शोकसंविग्नमानसः, अर्जुनः, एवम्, उक्त्वा, सशरम्, चापम्, विसृज्य, रथोपस्थे, उपाविशत्।

**अन्वयार्थः - सङ्ख्ये -** युद्धामध्ये **शोकसंविग्नमानसः -** ज्याचे मन शोकाने उद्विग्न झाले आहे असा **अर्जुनः -** अर्जुन **एवम् उक्त्वा -** असे बोलून **सशरम् -** बाणासह **चापम् -** धनुष्य **विसृज्य -** सोडून **रथोपस्थे -** रथाच्या मागच्या भागाला-बाजूला **उपाविशत् -** बसला.

**विवरण -** संजय धृतराष्ट्राला म्हणतो की, हे राजन् रणांगणात शोकयुक्त अर्जुन श्रीकृष्णाला असे बोलून, बाणासह धनुष्य सोडून, नाना प्रकारच्या चिन्तेने ज्याचे मन अतिशय उद्विग्न झाले आहे, असा होत्साता अर्जुन रथाच्या एका पृष्ठभागी जाऊन गप्प-शांत बसला.

**व्याकरणम् - सङ्ख्ये -** संङ्ख्य न.स.ए.व. **शोकसंविग्नमानसः -** शोक पु. सम्+विज्(ओविजी-भयचलनयोः) स.ग.प.प./ष.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि. मानस वि.पु.प्र.ए.व. **अर्जुनः -** अर्ज्+उनन्=अर्जुन पु.प्र.ए.व. **एवम् -** एवम् क्रि.वि.अ. **उक्त्वा -** वच् द्वि.ग.प.प.त्वान्त अ. **सशरम् -** स अ. शर पु.द्वि.ए.व. **चापम् -** चाप पु.द्वि.ए.व. **विसृज्य -** वि+सृज् च.ग.आ.प.ल्यबन्त अ. **रथोपस्थ -** रथ पु. उपस्थ पु.स.ए.व. **उपाविशत् -** उप+आ+विश् ष.ग.प.प.कर्त.लङ् प्र.भू.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - रथोपस्थे -** रथस्य-स्यंदनस्य उपस्थम्-पृष्ठभाग इति रथोपस्थं तस्मिन् रथोपस्थे = रथाचा उपस्थ-पाठीमागचा भाग असा रथोपस्थ त्या रथोपस्थामध्ये**(ष.त.स.) सशरम् -** शरेण-बाणेन सहितम् सशरम् = शराने सहित सशर-बाणासह**(तृ.त.स.) शोकसंविग्नमानसः -** शोकेन संविग्नम्-पीडितम्-दु:खितं मानसम्-चेतो यस्य स शोकसंविग्नमानसः = शोकाने दु:खित मन ज्याचे तो शोकसंविग्नमानस **(तृ.त.ग.ब.स.)**

**ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे**

**श्रीकृष्णार्जुनसंवादेऽर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥१॥**

**-: अध्याय पहिला समाप्त :-**

**ॐ श्रीपरमात्मने नम:**

**अथ द्वितीयोऽध्याय:**

युद्धस्थलावर आपल्यासमोर उभा असलेला सर्व आप्तसमुदाय पाहून अर्जुनाच्या ठिकाणी अनिवार शोक व करुणा उत्पन्न होऊन चिखलात रुतलेल्या राजहंसाप्रमाणे त्याची स्थिती झाली; ती पाहून त्याला त्या महामोहातून सोडविण्याकरिता भगवंतांनी उपदेश करण्यास या अध्यायात सुरुवात केली आहे.

**सञ्जय उवाच** - संजय म्हणाला -

**तं तथा कृपयाविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम्।**

**विषीदन्तमिदं वाक्यमुवाच मधुसूदन: ॥१॥**

**अन्वय: -** तथा, कृपया, आविष्टम्, अश्रुपूर्णाकुलेक्षणम्, विषीदन्तम्, तम्, मधूसूदन:, इदम्, वाक्यम्, उवाच।

**अन्वयार्थ: - तथा** - त्याप्रमाणे (म्हणजे पहिल्या अध्यायात जसा अर्जुन खेदयुक्त होतो तसा या ठिकाणी सुद्धा) **कृपया** - करुणेने **आविष्टम्** - आविष्ट-व्याप्त म्हणजे परिपूर्ण झालेल्या तथा **अश्रुपूर्णाकुलेक्षणम्** - नेत्र अश्रुंनी भरून व्याकूळ झालेल्या अशा **विषीदन्तम्** - शोक म्हणजे विषादयुक्त **तम्** - त्याला (अर्जुनाला) **मधुसूदन:** - भगवान श्रीकृष्ण **इदम् वाक्यम्** - हे वाक्य **उवाच** - बोलले.

**विवरण** - संजय धृतराष्ट्राला सांगत आहे की, हे राजन्! या रणसंग्रामात अर्जुन आपले सर्व बंधु-बांधव मरणार आहेत, असे पाहून स्वकीय जनांच्या स्नेहाने त्याच्या अंत:करणात अत्यंत करुणा-दया उत्पन्न होऊन, नेत्र अश्रुंनी परिपूर्ण आणि व्याकूळ झाले आहेत अशा अतिशय खेदयुक्त अर्जुनाला भगवान श्रीकृष्ण हे वाक्य बोलले.

**व्याकरणम् - तथा** - तथा प्रकारार्थे थाल् प्रत्ययान्त तद्धित अ. **कृपया** - कृपा स्त्री.तृ.ए.व. **आविष्टम्** - आ+'विष्लृ व्याप्तौ' विष् तृ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.द्वि.ए.व. **अश्रुपूर्णाकुलेक्षणम्** - अश्रु न. पृ-पूर् तृ.ग.प.प./न.ग.प.प./द.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. आकुल वि. ईक्ष्+ल्युट्=ईक्षण न.वि.पु.द्वि.ए.व. **विषीदन्तम्** - वि+सद् प्र.ग./ष.ग.प.प.कर्त.शतृ=विषीदत् वि.पु.द्वि.ए.व. **तम्** - तत् सर्व.पु.द्वि.ए.व. **मधुसूदन:** - मधुसूदन पु.प्र.ए.व. **इदम्** - इदम् सर्व.न.द्वि.ए.व. **वाक्यम्** - वाक्य न.द्वि.ए.व. **उवाच** - वच् द्वि.ग.प.प.कर्त.लिट् परोक्ष भू.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **मधुसूदन:** - मधुनाम्नोऽसुरस्य दैत्यस्य सूदन इति मधुसूदन: = मधुनावाच्या असुराचा दैत्याचा वध करणारा असा मधुसूदन(**वि.**) यद्वा **मधुसूदन:** - मध्वाख्यमसुरं सूदयतीति मधुसूदन: = मधुनावाच्या दैत्याचा नाश करणारा(**वि.**) यद्वा **मधुसूदन:** - सर्वेषां देहे मधुव दिष्टत्वान्मधुरहंकारस्तमात्मप्रकाशेन सूदयतीति मधुसूदन: = मधु-अहंकार त्याचा आत्मज्ञानप्रकाशाने नाश करणारा(**वि.**) यद्वा **मधुसूदन:** - '**इयं पृथिवी सर्वेषां भूतानां मधु**' इति श्रवणान्मधु: स्वरूपानंदस्तं स्वापरोक्षवतां सूदयति स्फोरयतीति मधुसूदन: = 'ही पृथ्वी सर्व भूतांमध्ये मधु आहे' या श्रुति वचनानुसार स्वरूपानंदाला मधु असे म्हणतात. अर्थात आत्मस्वरूपानंदाचे जो अपरोक्ष रूपाने स्फुरण करविणारा असा

जो तो मधुसूदन**(वि.)** **अश्रुपूर्णाकुलेक्षणम्** - अश्रुभिः पूर्णे आकुले ईक्षणे-नेत्रे यस्य सोऽश्रुपूर्णाकुले क्षणस्तमश्रुपूर्णाकुलेक्षणम् = अश्रुंनी पूर्ण व्याकूळ नेत्र ज्याचे तो अश्रुपूर्णाकुलेक्षण त्याला**(तृ.त.ग.ष.ब.स.)** **विषीदन्तम्** - विषीदतीति विषीदन् तं विषीदन्तम् = खेद करतो असा खेद करणारा त्या खेद करणाऱ्याला **(वि.)**

अर्जुनाच्या विषादाची निंदा व युद्धाकरिता उत्साहित करतांना भगवान श्रीकृष्ण म्हणतात -

**श्रीभगवानुवाच** - श्रीभगवान म्हणाले -

**कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् ।**

**अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥२॥**

**अन्वयः** - अर्जुन, त्वा, विषमे, इदम्, कश्मलम्, कुतः, समुपस्थितम्, अनार्यजुष्टम्, अस्वर्ग्यम्, अकीर्तिकरम् ।

**अन्वयार्थः - अर्जुन** - हे अर्जुना! **त्वा** - तुला **विषमे** - या विषम स्थितिमध्ये **इदम् कश्मलम्** - हा मोह **कुतः** - कोठून **समुपस्थितम्** - प्राप्त म्हणजे उत्पन्न झाला? **अनार्यजुष्टम्** - जो श्रेष्ठ पुरुषाच्या द्वारा आचरित म्हणजे अनुष्ठित नाही **अस्वर्ग्यम्** - जो स्वर्ग प्राप्त करुन देणारा नाही **अकीर्तिकरम्** - आणि जो कीर्ती करणाराही नाही.

**विवरण** - युद्धामध्ये मोठमोठ्या वीरांना पराजित करणाऱ्या क्षत्रियवर्णप्राप्त अर्जुनाची अतिशय विचित्र स्थिती पाहुन भगवान श्रीकृष्ण म्हणतात की, हे अर्जुना! अशा स्वधर्मरूपी युद्धाला सोडून एखाद्या साधारण पुरुषाप्रमाणे दीन होऊन बसणे हे क्षत्रियवर्णप्राप्त धर्माच्या दृष्टीने अतिशय निकृष्ट आहे. अशा या समयाला हा मोह तुला कोठून प्राप्त झाला? जो (मोह) स्वर्गाला देणारा नाही, कीर्ती करणारा नाही व स्वधर्मालाही वाढविणारा नाही.

**व्याकरणम् - अर्जुन** - अर्जुन पु.संबो.ए.व. **त्वा** - युष्मद् सर्व.द्वि.ए.व. **विषमे** - विषम पु.स.ए.व. **इदम्** - इदम् न.प्र.ए.व. **कश्मलम्** - कश्मल न.प्र.ए.व. **कुतः** - कुतस् क्रि.वि.अ. **समुपस्थितम्** - सम्+उप+स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **अनार्यजुष्टम्** - अन्+आर्य+जुष् ष.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **अस्वर्ग्यम्** - अ+स्वर्ग्य वि.न.प्र.ए.व. **अकीर्तिकरम्** - अ+कृ+क्तिन्=अकीर्ति स्त्री. कर वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अनार्यजुष्टम्** - अतत्त्वेभ्यः-अनात्मभ्य आरात्-दूरात् याता बुद्धिर्यस्य स आर्यः, न आर्य इत्यनार्यः, अनार्यैः-अश्रेष्ठपुरुषैः-आर्यशिक्षावर्जितैः पामरैर्जुष्टम्-सेवितमित्यनार्यजुष्टम् = अतत्त्वापासून दूर गेलेली बुद्धी ज्याची तो आर्य, नाही आर्य असे अनार्य अनार्यांनी-अश्रेष्ठ पुरुषांनी-आर्यशिक्षावर्जित पामरांनी सेविलेले असे अनार्यजुष्ट**(ष.ब.स.)** **अस्वर्ग्यम्** - स्वर्गाय योग्यं न भवतीत्यस्वर्ग्यम् = स्वर्गास योग्य नाही ते अस्वर्ग्य **(नञ्.त.स)** यद्वा **अस्वर्ग्यम्** - स्वर्गाय हितं न भवतीत्यस्वर्ग्यम् = स्वर्गाकरिता हितकर नाही असे अस्वर्ग्य**(न.त.स.)** **अकीर्तिकरम्** - कीर्तेः करमिति कीर्तिकरं न कीर्तिकरमित्यकीर्तिकरम् = कीर्तीला करणारे असे कीर्तिकर, नाही कीर्ती करणारे असे अकीर्तिकर**(न.त.स.)**

मनाची दुर्बलता टाकून युद्धाकरिता प्रवृत्त हो, असे श्रीकृष्ण अर्जुनाला सांगतात -

**क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ।**

**क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परन्तप ॥३॥**

**अन्वयः** - पार्थ, क्लैब्यम्, मा, स्म, गमः, त्वयि, एतत्, न, उपपद्यते, परन्तप, क्षुद्रम्, हृदयदौर्बल्यम्, त्यक्त्वा, उत्तिष्ठ ।

**अन्वयार्थः - पार्थ** - हे अर्जुना! **क्लैब्यम्** - अशा नपुंसकावस्थेला **मा स्म गमः** - प्राप्त होवू नकोस **त्वयि** - तुझ्यामध्ये **एतत्** - हे मानसिक दौर्बल्य **न उपपद्यते** - योग्य दिसत नाही **परन्तप** - शत्रूंना संताप देणाऱ्या अर्जुना! **क्षुद्रम् हृदयदौर्बल्यम्** - हृदयाचे हे क्षुद्र दुर्बलत्व **त्यक्त्वा** - त्यागून-टाकून **उत्तिष्ठ** - उठ.

**विवरण** - युद्धाच्या वेळी नपुंसकावस्थेला तथा मानसिक दुर्बलतेला प्राप्त होणे, हे संपूर्ण क्षत्रिय स्वभावाच्या दृष्टीने योग्य नाही, म्हणजे विपरीत आहे. अशा समयी तुला हे करणे शोभनीय कार्य नाही म्हणून तूं आपल्या मनाची दुर्बलता टाकून युद्ध करण्याकरिता ऊठ म्हणजे तयार हो.

**व्याकरणम् - पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **क्लैब्यम्** - क्लैब्य न.द्वि.ए.व. **मा स्म** - मा आणि स्म अव्यय भूतकाळामध्ये लावताना तृतीय भूतकाळातील अट् आगमाचा-अकाराचा लोप होतो **गमः** - गम् प्र.ग.प.प.कर्त.लुङ् तृ.भू.द्वि.पु.ए.व. **त्वयि** - युष्मत् सर्व.स.ए.व. **एतत्** - एतत् सर्व.न.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **उपपद्यते** - उप+पद् च.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **परन्तप** - परन्तप पु.संबो.ए.व. **क्षुद्रम्** - क्षुद्र वि.न.द्वि.ए.व. **हृदयदौर्बल्यम्** - हृदय न.दुर्+बल द.ग.प.प.+ष्यञ्=हृदयदौर्बल्य **त्यक्त्वा** - त्यज् प्र.ग.प.प.त्वान्त अ. **उत्तिष्ठ** - उद्+स्था प्र.ग.प.प.कर्त.लोट् द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - क्लैब्यम्** - क्लीबस्य-नपुंसकस्य भावः कर्म वा क्लैब्यम्-कायरत्वम् = क्लीबाचा-नपुंसकाचा भाव कर्म वा क्लैब्य**(त.वि.) हृदयदौर्बल्यम्** - दुर्बलस्य भावो दौर्बल्यम्, हृदयस्य दौर्बल्यमिति हृदयदौर्बल्यम् = दुर्बलाचा भाव असे दौर्बल्य, हृदयाचे दौर्बल्य असे हृदयदौर्बल्य**(भावार्थक त.ग.ष.त.स.)**

'भीष्म द्रोणादि पूज्य गुरुजनांबरोबर कसे युद्ध करू?' असे अर्जुनाचे कथन -

**अर्जुन उवाच** - अर्जुन म्हणाला -

**कथं भीष्ममहं सङ्ख्ये द्रोणं च मधुसूदन ।**

**इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥४॥**

**अन्वयः** - मधुसूदन, अहम्, सङ्ख्ये, कथम्, इषुभिः, भीष्मम्, च, द्रोणम्, प्रतियोत्स्यामि, (यतः), अरिसूदन, (तौ), पूजार्हौ ।

**अन्वयार्थः - मधुसूदन** - मधु नावाच्या दैत्याला मारणाऱ्या हे श्रीकृष्णा! **अहम्** - मी **सङ्ख्ये** - युद्धामध्ये **कथम्** - कसा बरे **इषुभिः** - बाणांच्या द्वारा **भीष्मम्** - भीष्म **च** - आणि **द्रोणम्** - द्रोण यांच्याबरोबर **प्रतियोत्स्यामि** - युद्ध करू? (**यतः** - कारण) **अरिसूदन** - हे शत्रुला मारणाऱ्या श्रीकृष्णा! (**तौ** - ते दोघेही) **पूजार्हौ** - पूजनीय आहेत.

**विवरण** - अर्जुन म्हणतो की हे श्रीकृष्णा! या रणसंग्रामात ज्यांच्याशी म्हणजे भीष्म आणि द्रोण यांच्या बरोबर युद्ध करण्याकरिता प्रवृत्त करता हे मला इष्ट वाटत नाही कारण की, ते माझे अतिशय पूजनीय गुरुजन

आहेत. अशा या गुरुजनांचा चांगल्या प्रकारे आदर-सत्कार करणे हे आमचे कर्तव्य आहे. अशा पूजनीय गुरुजनांबरोबर युद्धाकरिता प्रवृत्त होऊन मी कसा बरे त्यांच्याशी प्रतियुद्ध करू?

**व्याकरणम् - मधुसूदन** - मधुसूदन पु.संबो.ए.व. **अहम्** - अहम् अस्मत् सर्व.पु.प्र.ए.व. **सङ्ख्ये** - संख्य न.स.ए.व. **कथम्** - कथम् अ. **इषुभिः** - इष् प्र.ग.प.प.+उ,कित्,ह्रस्व=इषु पु.तृ.ब.व. **भीष्मम्** - भीष्म पु. द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **द्रोणम्** - द्रोण पु.द्वि.ए.व. **प्रतियोत्स्यामि** - प्रति+युध् च.ग.उ.प.कर्त.लृट द्वि.भ वि.प्र.पु.ए.व. **यतः** - यतस् यद्-तसिल् प्रत्ययान्त पञ्चम्यर्थ्ये तद्धि. अ. **अरिसूदन** - अरिसूदन पु.सं.ए.व. **तौ** - तत् सर्व.पु.द्वि.ए.व. **पूजार्हौ** - पूजा स्त्री. अर्ह वि.पु.प्र.द्वि.व.

**समासविग्रहार्थाः - अरिसूदन** - भक्तानामरीन्-कामादीन् सूदयतीत्यरिसूदनस्तत्सम्बुद्धौ अरिसूदन = भक्तांच्या शत्रूंना कामादिकांना मारतो असा अरिसूदन त्याचे संबोधनामध्ये हे अरिसूदन**(उप.स.) पूजार्हौ** - अर्हत इत्यर्हौ पूजायायर्हौ-योग्यौ तौ पूजार्हौ = पूजेस योग्य असे ते दोघे पूजनीय**(च.त.स.)** यद्वा **पूजार्हौ** - पूजाया अर्हौ पूजार्हौ = दोघे पूजेस योग्य आहेत**(ष.त.स.)**

निंद्य भोगाच्या प्राप्तीसाठी पूज्य गुरुजनांचा वध करणे हे अनुचित वाटते असे अर्जुनाचे कथन -

**गुरूनहत्वा हि महानुभावान् श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके।**

**हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव भुञ्जीय भोगान् रुधिरप्रदिग्धान्॥५॥**

**अन्वयः** - महानुभावान्, गुरून्, अहत्वा, इह, लोके, भैक्ष्यम्, अपि, भोक्तुम्, श्रेयः, हि, गुरून्, हत्वा, इह, रूधिरप्रदिग्धान्, अर्थकामान्, भोगान्, एव, तु, भुञ्जीय।

**अन्वयार्थः - महानुभावान्** - या महानुभाव **गुरून्** - पूज्य गुरुजनांना **अहत्वा** - न मारून **इह लोके** - या लोकामध्ये **भैक्ष्यमपि** - भिक्षेचे अन्नही **भोक्तुम्** - खाणे **श्रेयः** - कल्याणकारक आहे **हि** - कारण **गुरून्** - गुरुंना **हत्वा** - मारून **इह** - या संसारामध्ये **रुधिरप्रदिग्धान्** - रक्ताने लिप्त असलेल्या **अर्थकामान्** - अर्थकाम **भोगान् एव** - या भोगांनाच **तु** - तर **भुञ्जीय** - मी भोगीन.

**विवरण** - सर्व प्रकारांनी व अतिशय आदर-सत्कारास योग्य अशा गुरुजनांना मारणे सर्वथा अनुचित आहे त्यांना मारून धर्माची सिद्धी होणार नाही व मुक्तीही मिळणार नाही. केवळ या लोकामध्ये अर्थ व कामरूप तुच्छभोग मिळतील या शिवाय दुसरे काय मिळणार? आणि त्यांचे मूल्य गुरुजनांच्या समोर काय असणार? काही एक नाही, केवळ रक्ताने माखलेल्या निंद्य भोगांस प्राप्त करण्याकरिता पूजनीय गुरुजनांचा वध करणे आम्हाला कधीही उचित नाही. त्यापेक्षा या लोकी केवळ भिक्षान्नही खाणे आम्हाला कल्याणकारक वाटते.

**व्याकरणम् - महानुभावान्** - महा+अनुभव वि.पु.द्वि.ब.व. **गुरून्** - गुरु पु.द्वि.ब.व. **अहत्वा** - अ+हन् द्वि.ग.प.प.त्वान्त अ. **इह** - इदम्+ह,'इ'आदेश=इह अ. **लोके** - लोक पु.स.ए.व. **भैक्ष्यम्** - भिक्ष् प्र.ग.आ.प.+टाप्=भिक्षा(स्त्री.)+ष्यञ्=भैक्ष्य न.द्वि.ए.व. **अपि** - अपि अ. **भोक्तुम्** - भुज् स.ग.प.प.तुमन्त अ. **श्रेयः** - श्रेयस् न.प्र.ए.व. **हि** - हि क्रि.वि.अ. **गुरून्** - गुरु पु.द्वि.ब.व. **हत्वा** - हन् द्वि.ग.आ.प.त्वान्त अ. **अपि** - अपि अ. **रुधिरप्रदिग्धान्** - रुधिर् न. प्र+दिह् द्वि.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि. द्वि.ब.व. **अर्थकामान्** - अर्थ पु. काम पु.द्वि.ब.व. **भोगान्** - भोग पु.द्वि.ब.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **तु** - तु उभ.अ. **भुञ्जीय** - भुज् स.ग.आ.प.कर्त.विधिलिङ् विध्यर्थ प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - महानुभावान् -** महान्तः-श्रेष्ठाः, अनुभवाः-सामर्थ्यानि येषां ते महानुभावास्तान् महानुभावान् = मोठा श्रेष्ठ अनुभव-सामर्थ्य ज्यांचे ते महानुभाव**(ब.स.)** यद्वा **महानुभावान्** - महाननर्गलोऽनुभावो धर्मब्रह्मविषयको बोधो येषां ते महानुभावास्तान् महानुभावान् = मोठा निर्दोष अनुभाव धर्मब्रम्हविषयक ज्ञान आहे ज्यांचे ते महानुभाव त्या महानुभावांना**(ब.स.)** यद्वा **महानुभावान्** - महान् प्रतिबंधशून्योऽनुभवो येषां ते महानुभावास्तान् महानुभावान् = मोठा प्रतिबंधरहित अनुभव ज्यांचा ते महानुभाव त्या महानुभावांना**(ब.स.)** यद्वा **महानुभावान्** - श्रुताध्ययनतपआचारादिनिबन्धनः प्रभावो येषां ते महानुभावास्तान् महानुभावान् = शास्त्रश्रवण, अध्ययन, तप आणि आचार आदि या कारणांमुळे ज्यांचा मोठा अनुभव-प्रभाव आहे असे, या गुरुजनांना**(ब.स.)** यद्वा **महानुभावान्** - हिमहानुभावानित्येकं वा पदं हिमं जाड्यमपहन्तीति हिमहा आदित्योऽग्निर्वा तस्येवानुभावः सामर्थ्यं येषां ते महानुभावास्तान् महानुभावान् = 'हिमहानुभावान्' हे एक पद आहे हिम-थंडीचे नाश करणारे सूर्य आणि अग्नी आहेत, त्याप्रमाणे अत्यंत तेजस्वी सामर्थ्य आहे ज्यांचे ते महानुभाव त्या महानुभावांना**(ब.स.) गुरून्** - गिरत्यज्ञानम्, यद्वा गीर्यते स्तूयते देवगन्धर्वादिभिरिति गुरुस्तान् गुरून्= अज्ञानाचा नाश करणारे अथवा देव गंधर्वांच्याद्वारा स्तुती केली जाणारे ते गुरु त्या गुरुंना**(वि.) अर्थकामान्** - अर्थेषु कामाः-इच्छा येषां ते अर्थकामास्तान् अर्थकामान् = अर्थामध्ये-द्रव्यामध्ये काम-इच्छा ज्यांची ते अर्थकाम त्या अर्थकामिकांना**(व्यधि.ब.स.)** यद्वा **अर्थकामान्** - अर्थान्-धर्मादिपुरुषार्थान् शिष्येभ्यः कामयन्ति-बोधयन्तीत्यर्थकामास्तानर्थकामान् = धर्मादि पुरुषार्थाचे जे शिष्याकरिता प्रतिपादन करतात अर्थात बोधन करतात असे ते अर्थकाम त्या अर्थकामांना**(उपपद स.)**

युद्ध करावे किंवा करू नये, या विषयात अर्जुनाचा प्रश्न -

**न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ।**

**यानेव हत्वा न जिजीविषामस्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥६॥**

**अन्वयः -** नः, कतरत्, गरीयः, एतत्, च, न, विद्मः, यत्, वा, जयेम, यदि, वा, नः, जयेयुः,(न विद्मः) यान्, हत्वा, न, जिजीविषामः, ते, एव, धार्तराष्ट्राः, प्रमुखे, अवस्थिताः ।

**अन्वयार्थः - नः** - आम्हाला **कतरत्** - युद्ध करणे अथवा न करणे या दोहोतील कोणते एक **गरीयः** - श्रेयस्कर आहे **एतत् च** - हे देखील **न विद्मः** - आम्ही जाणत नाही **यत् वा** - किंवा **जयेम** - आम्ही त्यांच्यावर विजय प्राप्त करू **यदि वा (ते)**- अथवा ते **नः जयेयुः** - आमच्यावर विजय प्राप्त करतील(**न विद्मः** - हेही आम्ही जाणत नाही) **यान्** - ज्या दुर्योधनादि बांधवांना **हत्वा** - मारून **न जिजीविषामः** - आम्ही जीवन जगू इच्छित नाही **ते एव** - तेच **धार्तराष्ट्राः** - दुर्योधनादि **प्रमुखे** - आमच्या समोर **अवस्थिताः** - उभे राहिलेले आहेत.

**विवरण -** युद्ध करणे श्रेयस्कर आहे, की न करणे श्रेयस्कर आहे, या दोहोंचा निर्णय करण्याकरिता मी असमर्थ आहे; कारण की युद्ध करणे हा क्षत्रियांचा धर्म आहे आणि शेवटी त्याचे फल कुलाचा नाश होणे हा मोठा दोषही सांगितलेला आहे. युद्ध करणे हे श्रेष्ठ असे मानले तर जय कोणाचा होणार हेही आम्ही जाणत नाही आणि जय आमचा होणार असे मानले तर ज्यांना मारून आम्हाला जगण्याची इच्छा नाही असे हे दुर्योधनादि आमच्या समोर उभे आहेत.

**व्याकरणम् - एतत्** - एतत् सर्व.न.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **न** - न क्रि.वि.अ. **विद्म:** - विद् द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.प्र.पु.ब.व. **यत्** - यत् अ. **न:** - अस्मत् सर्व.द्वि.ब.व. **कतरत्** - कतरत् सर्व.न.प्र.ए.व. **गरीय:** - गुरु+ईयसुन्,गर आदेश=गरीयस् वि.न.प्र.ए.व. **वा** - वा उभ.अ. **जयेम** - जि प्र.ग.प.प.कर्त.विधिलिङ्-विध्यर्थ प्र.पु.ब.व. **यदि** - यदि अ. **वा** - वा उभ.अ. **न:** - अस्मत् सर्व. द्वि.ब.व. **जयेयु:** - जि प्र.ग.प.प.कर्त.विधिलिङ् विध्यर्थ तृ.पु.ब.व. **यान्** - यत् सर्व.पु.द्वि.ब.व. **हत्वा** - हन् द्वि.ग.प.प.त्वान्त अ. **न** - न क्रि.वि.अ. **जिजीविषाम:** - जीव् प्र.ग.प.प.कर्त.सन्नन्त लट् वर्त.प्र.पु.ब.व. **ते** - तत् सर्व.पु.प्र.ब.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **धार्तराष्ट्रा:** - धार्तराष्ट्र पु.प्र.ब.व. **प्रमुखे** - प्रमुखे अ. **अवस्थिता:** - अव+स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व.

धर्माधर्मविवेकशून्य अशा अर्जुनाची भगवंतास उपदेशाची प्रार्थना -

**कार्पण्यदोषोपहतस्वभाव: पृच्छामि त्वां धर्मसम्मूढचेता: ।**

**यच्छ्रेय: स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥७॥**

**अन्वय:** - कार्पण्यदोषोपहतस्वभाव:, धर्मसम्मूढचेता:, अहम्, त्वाम्, पृच्छामि, यत्, निश्चितम्, श्रेय:, स्यात्, तत्, मे, ब्रूहि, अहम्, ते, शिष्य:, त्वाम्, प्रपन्नम्, माम्, शाधि ।

**अन्वयार्थ: - कार्पण्यदोषोपहतस्वभाव:** - कायरतारूप दोषाच्या द्वारा ज्याचा स्वभाव (क्षत्रिय धर्म) नष्ट झाला आहे आणि **धर्मसम्मूढचेता:** - धर्माचा निर्णय करण्याकरिता ज्याचे अंत:करण विवेकशून्य झाले आहे असा **अहम्** - मी **त्वाम्** - तुला **पृच्छामि** - विचारतो **यत्** - जे **निश्चितम्** - निश्चित **श्रेय:** - कल्याणस्वरूप **स्यात्** - असेल **तत्** - ते **मे** - मला **ब्रूहि** - सांग **अहम्** - मी **ते** - तुझा **शिष्य:** - शिष्य आहे **त्वाम्** - तुला **प्रपन्नम्** - शरण आलेल्या **माम्** - मला **शाधि** - तू उपदेश कर.

**विवरण** - स्वाभाविक शूरवीर तथा आदर्श क्षत्रिय असा अर्जुन परंतु नाना प्रकारच्या चिन्तांद्वारा ज्याचे मन कारुण्याला प्राप्त झाले आहे म्हणून कायरतारूप दोषाच्या द्वारा ज्याचा स्वभाव नष्ट झाला आहे आणि धर्मसंमूढचेता म्हणजे धर्म काय, अधर्म काय व कर्तव्य काय, अकर्तव्य काय या सर्वांचा यथार्थ निर्णय करण्याकरिता ज्याचे अंत:करण असमर्थ झाले आहे असा दैन्ययुक्त अर्जुन भगवंताला विचारतो की, हे श्रीकृष्णा! माझे निश्चित श्रेय कशामध्ये आहे ते मला सांग, कारण मी तुझा शिष्य आहे. काया वाचा आणि मनाने तुला शरण आलेल्या मला चांगल्या प्रकारांनी उपदेश कर.

**व्याकरणम् - कार्पण्यदोषोपहतस्वभाव:** - कृप्+क्युन्=कृपण+ष्यञ्=कार्पण्य न. दोष पु. उप+हन् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. स्वभाव पु.प्र.ए.व. **धर्मसम्मूढचेता:** - धर्म पु. सम्+मुह् च.ग.प.प.कर्म.भू.धा. वि. चेतस् न.वि.पु.प्र.ए.व. **त्वाम्** - युष्मत् सर्व.द्वि.ए.व. **पृच्छामि** - प्रच्छ् ष.ग.प.प.कर्त.लट् वर्त.प्र.पु.ए.व. **यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **निश्चितम्** - निस्+चि पं.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.द्वि.ए.व. **श्रेय:** - श्रेयस् न.द्वि.ए.व. **स्यात्** - अस् द्वि.ग.प.प.कर्त.विध्यर्थ तृ.पु.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.द्वि.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.च.ए.व. **ब्रूहि** - ब्रू द्वि.ग.उ.प.(प.प.)आज्ञार्थक द्वि.पु.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **ते** - युष्मत् सर्व.ष.ए.व. **शिष्य:** - शिष्य पु.प्र.ए.व. **त्वाम्** - युष्मत् सर्व.द्वि.ए.व. **प्रपन्नम्** - प्र+पद् च.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.पु.द्वि.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **शाधि** - शास्

द्वि.ग.प.प.कर्त.आज्ञार्थक द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - कार्पण्यदोषोपहतस्वभाव: -** कृपणस्य इदं भाव: कार्पण्यम्-अज्ञानम्-तमस्तदेव दोष: कार्पण्यदोष: कार्पण्यदोषेण उपहत:-नष्ट:, स्वभाव:-प्रकृतिर्यस्य स कार्पण्यदोषोपहतस्वभाव: = आत्म्याचे स्वरूप न जाणणे असे कार्पण्य तोच दोष असा कार्पण्यदोष, कार्पण्यदोषाने नष्ट झाला आहे स्वभाव ज्याचा तो कार्पण्यदोषोपहतस्वभाव**(कर्म.ग.ष.ब.स.)** यद्वा **कार्पण्यदोषोपहतस्वभाव: -** अविद्याकृतदेहेन्द्रियाद्यनात्मन: स्वरूपमिदमेवाऽहमिति व्यवहरतीति कृपणस्त्वतत्त्वज्ञस्तस्य भाव: कार्पण्यमज्ञत्वमज्ञानं तम:प्रधानत्वाद् वस्तुस्वरूपं दूषयतीति तदेव दोषस्तेनोपहतस्तिरोहित: स्वस्याऽविक्रियस्य प्रत्यगात्मनो भाव:-सत्ता यस्य स कार्पण्यदोषोपहतस्वभाव:-अविद्यातिरस्कृतात्मस्वरूप: = अविद्याकृत देहेन्द्रियादि अनात्म्याचे ठिकाणी आत्मबुद्धी धारण करणे अर्थात देहोऽहं अशी बुद्धी धारण करणे असा तो कृपण-अतत्त्वज्ञ, कृपणचा भाव कार्पण्य-अज्ञान-तम प्रधान असल्यामुळे वस्तुस्वरूपाला दुषित करते म्हणून तो दोष त्या दोषाने तिरोहित झाली आपल्या अविक्रिय प्रत्यगात्म्याची सत्ता-भाव ज्याची तो कार्पण्यदोषोपहतस्वभाव-अविद्यातिरस्कृतात्मस्वरूप**(भावार्थे त.ग.कर्म.ग.ब.स.) धर्मसम्मूढचेता: -** अविद्यया संसारे पात्यमान: पुमान् धार्यतेऽनेनेति धर्मस्तस्मिन् स्वरूपप्रकाशके ज्ञानात्मके धर्मे सम्मूढम्-अप्रविष्टं चेतो यस्य स धर्मसम्मूढचेता: = अविद्यापतित पुरुषांना धारण करण्याकरिता पर्याप्त धर्म अशा त्या स्वरूपप्रकाशक ज्ञानात्मक धर्मामध्ये सम्मूढ-अप्रविष्ट चित्त आहे ज्याचे तो धर्मसम्मूढचेता**(ब.स.)** यद्वा **धर्मसम्मूढचेता: -** युद्धं त्यक्त्वा भिक्षाटनमपि क्षत्रियस्य धर्मो वा अधर्म इत्येवंरूपे धर्मे सम्मूढम्-संदिग्धं चेत:-अंतकरणम्-यस्य स धर्मसम्मूढचेता: = युद्धाचा त्याग करून भिक्षाटन करणे सुद्धा क्षत्रियाचा धर्म किंवा अधर्म अशाच प्रमाणे संशययुक्त अंत:करण ज्याचे तो धर्मसंमूढचेता**(व्यधिकरण ब.स.) शिष्य: -** शासितुं योग्य इति शिष्य: = शासन करण्यास योग्य असा शिष्य(शिकवण्यास योग्य)**(वि.)**

त्रैलोक्याचे शत्रूरहित राज्यसुद्धा शोकनिवृत्तिचे कारण नाही असे मानून अर्जुनाचे वैराग्याने युक्त होवून बोलणे -

**न हि प्रपश्यामि ममापनुद्याद् यच्छोकमुच्छोषणमिन्द्रियाणाम् ।**

**अवाप्य भूमावसपत्नमृद्धं राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ॥८॥**

**अन्वय: -** हि, भूमौ, असपत्नम्, ऋद्धम्, राज्यम्, च, सुराणाम्, अपि, आधिपत्यम्, अवाप्य, अपि, यत्, मम, इन्द्रियाणाम्, उच्छोषणम्, शोकम्, अपनुद्यात्, तत्, न, प्रपश्यामि ।

**अन्वयार्थ: - हि -** कारण **भूमौ -** या पृथ्वीवर **असपत्नम् -** निष्कंटक-शत्रुरहित **ऋद्धम् -** समृद्ध (धनधान्यसंपन्न) **राज्यम् -** राज्य **च -** आणि **सुराणाम् -** देवांचे **आधिपत्यम् -** स्वामित्त्वाला **अवाप्य -** प्राप्त करून **अपि -** देखील **तत् -** तो उपाय **न प्रपश्यामि -** मला दिसत नाही **यत् -** जो की **मम -** माझ्या **इन्द्रियाणाम् -** इंद्रियांना **उच्छोषणम् -** सुकविणाऱ्या अथवा संताप देणाऱ्या **शोकम् -** शोकाला **अपनुद्यात् -** दूर करील.

**विवरण -** पहिल्या अध्यायात अर्जुनाने म्हटले आहे की युद्ध करणे मोठे हिंसात्मक कार्य आहे आणि त्याचप्रमाणे कुळाचा नाश करणे सुद्धा मोठे पाप आहे. अशा या कुळाच्या नाशाने आजन्म यावत् पितर

नरकात पडतील आणि महान अनर्थ वाढेल अशा या अनेक प्रकारच्या चिंतेने त्याचे अंत:करण शोकयुक्त झालेले आहे म्हणून तो म्हणतो की, हे भगवंता! जरी पृथ्वीचे निष्कंटक राज्य प्राप्त झाले अथवा देवतांचे आधिपत्य जरी मला प्राप्त झाले तरी पण माझा माझ्या इंद्रियांना सुकविणारा हा शोक नष्ट होईल असे मला काही उत्कृष्ट साधन माझ्या दृष्टीपुढे दिसत नाही.

**व्याकरणम् - हि -** हि क्रि.वि.अ. **भूमौ -** भूमि स्त्री.स.ए.व. **ऋद्धम् -** ऋध् च.ग./पं.ग.प.प.भावे.भू.धा. वि.न.द्वि.ए.व. **राज्यम् -** राज्य न.द्वि.ए.व. **च -** च उभ.अ. **सुराणाम् -** सुर पु.ष.ब.व. **आधिपत्यम् -** अधि+पा द्वि.ग.प.प.+डति=अधिपति+ष्यञ्=आधिपत्य न.द्वि.ए.व. **अवाप्य -** अव+आप् पं.ग.प.प.ल्यबन्त अ. **अपि -** अपि अ. **तत् -** तत् सर्व.न.द्वि.ए.व. **न -** न क्रि.वि.अ. **प्रपश्यामि -** प्र+दृश् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.प्र.पु.ए.व. **यत् -** यत् सर्व.न.प्र.ए.व. **मम -** अस्मत् सर्व.ष.ए.व. **इन्द्रियाणाम् -** इन्द् प्र.ग.प.प.+र=इन्द्र+घ-इय=इन्द्रिय न.ष.ब.व. **उच्छोषणम् -** उच्छोषण वि.पु.द्वि.ए.व. **शोकम् -** शोक पु.द्वि.ए.व. **अपनुद्यात् -** अप+नुद् ष.ग.प.प.आशीर्वादार्थक तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - असपत्नम् -** न विद्यते सपत्नो यस्मिन् तदसपत्नम् = नाही शत्रु ज्यामध्ये ते असपत्न **(स.ब.स.) उच्छोषणम् -** उत्कर्षणं शोषयतीत्युच्छोषणस्तमुच्छोषणम् = उत्कर्षाला शोषण करणारा असा उच्छोषण त्या उच्छोषणाला-त्या शोषण करणाऱ्याला**(वि.)**

युद्ध करणार नाही असे अर्जुनाचे कथन संजय धृतराष्ट्राला सांगू लागला -

**सञ्जय उवाच -** संजय म्हणाला -

**एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेश: परन्तप ।**

**न योत्स्य इति गोविन्दमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ॥९॥**

**अन्वय: -** परन्तप, गुडाकेश:, हृषीकेशम्, एवम्, उक्त्वा, (पुन:), न, योत्स्ये, इति, गोविन्दम्, उक्त्वा, तूष्णीम्, बभूव, ह ।

**अन्वयार्थ: - परन्तप -** हे राजन्! **गुडाकेश: -** निद्रेला जिंकणारा अर्जुन **हृषीकेशम् -** अन्तर्यामी भगवान श्रीकृष्णाला **एवम् उक्त्वा-** असे बोलून (**पुन:-** पुन्हा) **न योत्स्ये -** मी युद्ध करणार नाही **इति गोविन्दम् -** असे त्या गोविंदाला **उक्त्वा -** सांगून **तूष्णीम् बभूव ह -** गप्प बसला.

**विवरण -** संजय धृतराष्ट्राला म्हणाला की, हे राजन! अनेक प्रकारच्या शोकाने युक्त अर्जुन भगवंताला शरण जावून पुनरपि मी काहीही झाले तरी युद्ध करणार नाही असा आपला दृढ निश्चय प्रकट करून रथात गप्प बसला.

**व्याकरणम् - परन्तप -** परन्तप पु.संबो.ए.व. **गुडाकेश: -** गुडाका स्त्री. ईश पु.प्र.ए.व. **हृषीकेशम् -** हृषीकेश पु.द्वि.ए.व. **एव -** एव क्रि.वि.अ. **उक्त्वा -** वच् द्वि.ग.प.प.त्वान्त अ. **गोविन्दम् -** गोविंद पु.द्वि.ए.व. **न -** न क्रि.वि.अ. **योत्स्ये -** युध् च.ग.आ.प.कर्त.लृट् द्वि.भवि.प्र.पु.ए.व. **इति -** इति क्रि.वि.अ. **उक्त्वा -** वच् द्वि.ग.प.प.त्वान्त अ. **तूष्णीम् -** तूष्णीम् अ. **बभूव -** भू प्र.ग.प.प.कर्त.लिट् परोक्ष भूत.तृ.पु.ए.व. **ह -** ह अ.

**समासविग्रहार्थाः - गुडाकेशः -** गुडो-लगुडो दण्डस्तद्वद्दीर्घा आसमन्तात्समाश्च केशाः-शिरोजा यस्य स गुडाकेशः-अर्जुनः = दण्डाप्रमाणे लांब आणि चहुबाजुंनी समान केस आहेत डोक्यावर ज्याचे तो गुडाकेश **(ब.स.) गोविन्दम् -** गाम्-वेदलक्षणां वाणीं वेत्तीति गोविन्दस्तं गोविन्दम् = वेदलक्षणेच्या वाणीला/शास्त्राला जाणतो असा गोविंद त्या गोविंदाला**(उप.स.)**

अर्जुनाच्या सांगण्यावरून दोन्ही सैन्यामध्ये रथ नेवून खेदयुक्त अर्जुनास भगवंत हसत बोलले, असे धृतराष्ट्राला संजय सांगत आहे.

**तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत ।**

**सेनयोरुभयोर्मध्ये विषीदन्तमिदं वचः ॥१०॥**

**अन्वयः -** भारत, हृषीकेशः, उभयोः, सेनयोः, मध्ये, विषीदन्तम्, तम्, प्रहसन्, इव, इदम्, वचः, उवाच ।

**अन्वयार्थः - भारत -** हे भरतवंशीय धृतराष्ट्रा! **हृषीकेशः -** अंतर्यामी श्रीकृष्ण **उभयोः सेनयोः मध्ये -** दोन्ही सैन्यांच्या मध्ये **विषीदन्तम् -** शोक करणाऱ्या **तम् -** त्या अर्जुनाला **प्रहसन् इव -** जणु काय हसतच **इदम् वचः -** हे वाक्य-वचन **उवाच -** बोलला-म्हणाला.

**विवरण -** महान पराक्रमयुक्त अर्जुनाने आपला रथ दोन्ही सैन्यांच्या मध्यभागी उभा करण्याकरिता सांगितले आणि भगवंतानेही त्याची आज्ञा मानून मोठ्या उत्साहाने दोन्ही सैन्यांच्या मध्यभागी रथ उभा केला परंतु आत्मीय-स्वजनांना पाहून मोहामुळे त्याचे मन खिन्न म्हणजे खेदयुक्त झाले अशा खेदयुक्त अर्जुनाला निश्चित श्रेय सांगण्याकरिता जणुं काय हसतच भगवान श्रीकृष्ण हे वचन बोलले.

**व्याकरणम् - भारत -** भारत पु.संबो.ए.व. **हृषीकेशः -** हृषीकेश पु.प्र.ए.व. **उभयोः -** उभ सर्व.ष.द्वि.व. **सेनयोः -** सेना स्त्री.ष.द्वि.व. **मध्ये -** मध्य वि.पु.स.ए.व. **विषीदन्तम् -** वि+सद् प्र.ग./ष.ग.प.प.कर्त.शतृ=विषीदत् वि.पु.द्वि.ए.व. **तम् -** तत् सर्व.पु.द्वि.ए.व. **प्रहसन् -** प्र+हस् प्र.ग.प.प.+कर्त.शतृ=प्रहसत् वि.पु.प्र.ए.व. **इव -** इव अ. **इदम् -** इदम् सर्व.न.द्वि.ए.व. **वचः -** वचस् न. द्वि.ए.व. **उवाच -** वच् द्वि.ग.प.प.कर्त.लिट् परोक्ष भूत.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - विषीदन्तम् -** विषीदति-खेदं प्राप्नोतीति विषीदन्, तम् विषीदन्तम् = खेद करतो असा खेद करणारा त्याला**(वि.)**

अर्जुनाला भगवंताच्या उपदेशाचा प्रारंभ (गीताशास्त्राचा उपक्रम) -

**श्रीभगवानुवाच -** श्रीभगवान म्हणाले -

**अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।**

**गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पण्डिताः ॥११ ॥**

**अन्वयः -** त्वम्, अशोच्यान्, अन्वशोचः, च, प्रज्ञावादान्, भाषसे, पण्डिताः, गतासून्, च, अगतासून्, न, अनुशोचन्ति ।

**अन्वयार्थः - त्वम् -** तू **अशोच्यान् -** जे शोक करण्यास योग्य नाहीत त्यांच्याकरिता **अन्वशोचः -** शोक

करीत आहेस **च** - आणि **प्रज्ञावादान्** - बुद्धिमानाप्रमाणे तर तू **भाषसे** - गोष्टी सांगत आहेस परंतु **पण्डिताः** - पंडित लोक **गतासून्** - ज्यांचे प्राण गेलेले आहेत त्यांच्याकरिता **च** - आणि **अगतासून्** - ज्यांचे प्राण गेलेले नाहीत त्यांच्याकरिता **न अनुशोचन्ति** - शोक करीत नाहीत.

**विवरण** - दोन्ही सैन्याच्या मध्यभागी रथ उभा करून अर्जुनाने ज्यावेळी समोर पाहिले त्यावेळी त्याला आत्मीय-स्वजन तथा भीष्म द्रोणादिक दिसू लागले; परंतु त्याला वाटले की हे सर्वच युद्धांत मरतील, या आशंकेने तो (पहिल्या अध्यायातील २८,२९,३० श्लोकामध्ये) आपल्या शरीर स्थितीचे वर्णन करून (आणि दुसऱ्या अध्यायातील ९ व्या श्लोकामध्ये) मी युद्ध करणार नाही म्हणून गप्प बसला. म्हणून भगवान म्हणतात की, हे अर्जुना! वास्तविक पाहिले तर ते आत्मरूपाने नित्य आहेत त्यांचा केव्हाही नाश संभवत नाही; परंतु ज्यांच्याविषयी शोक करणे योग्य नाही त्यांच्याविषयी तूं शोक करतोस आणि त्याचप्रमाणे दुसरीकडे तर तूं मोठे पाण्डित्य कथन करतोस की, युद्ध केले म्हणजे कुळाचा नाश होईल, त्यापासून अधर्म वाढेल आणि त्याचप्रमाणे अहंकारपूर्वक दुर्योधनाचीही दुष्टता सांगतोस; असे तू पाण्डित्यपूर्ण कथन करीत आहेस आणि पुनरपि इकडेही भीष्मद्रोणादिक परलोकांत जातील, त्यांना पिंडदान देण्याकरिता कोणी शिल्लक रहाणार नाही, स्त्रिया व्यभिचारदोषाने दूषित होतील आणि वर्णसंकर वाढेल अशा प्रकारची चिंता करतोस परंतु जे पण्डित लोक असतात ते गेलेल्या विषयी आणि न गेलेल्या विषयी सुद्धा शोक करीत नाहीत.

**व्याकरणम् - त्वम्** - युष्मत् सर्व.प्र.ए.व. **अशोच्यान्** - अ+शुच् प्र.ग.प.प.+कर्म.यत्=अशोच्य वि.पु.द्वि.ब.व. **अन्वशोचः** - अनु+शुच् प्र.ग.प.प.लङ् प्रथम भूत.द्वि.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **प्रज्ञावादान्** - प्रज्ञा+वाद पु.द्वि.ब.व. **भाषसे** - भाष् प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.द्वि.पु.ए.व. **गतासून्** - गत गम् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. असु पु.द्वि.ब.व. **च** - च उभ.अ. **अगतासून्** - अ+गम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. असु पु.द्वि.ब.व. **पण्डिताः** - पण्डा+इतच्=पण्डित वि.पु.प्र.ब.व. **न** - न क्रि.वि.अ. **अनुशोचन्ति** - अनु+शुच् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - अशोच्यान्** - शोचितुं योग्याः शोच्याः, न शोच्या अशोच्यास्तानशोच्यान्-शोकायोग्यान् = शोक करण्यास योग्य ते शोच्य जे शोच्य नाहीत ते अशोच्य या अशोच्यांना**(योग्यार्थे न.त.स.) प्रज्ञावादान्** - प्रज्ञया-पाण्डित्येन वादाः प्रज्ञावादास्तान् प्रज्ञावादान् = प्रज्ञेने-पाण्डित्याने वाद प्रज्ञावाद त्या प्रज्ञावादांना **(तृ.त.स.) गतासून्** - गताः-परलोकप्राप्ताः, असवः-प्राणाः, येषां ते गतासवस्तान् गतासून् = गेले-परलोकास प्राप्त झाले प्राण ज्यांचे ते गतासून त्या प्राण गेलेल्यांना **(ष.ब.स.) अगतासून्** - न गतासून्, इत्यगतासून् = नाही गेले प्राण असे जीवंत असलेले**(न.त.स.) पण्डिताः** - पण्डा-आत्मविषया बुद्धिर्येषां ते पण्डिताः-विद्वांसः = आत्मविषयक बुद्धी ज्यांची ते विद्वान**(ष.ब.स.)** यद्वा **पण्डिताः** - सदसद्विवेकिनी बुद्धिः -पण्डा सञ्जाता येषां ते पण्डिताः = सदसद्विवेकिनी बुद्धि उत्पन्न झाली ज्यांची ते पण्डित**(ष.ब.स.)** यद्वा **पण्डिताः** - गतासूनामगतासूनामप्युभयेषामविद्याकार्यत्वेन स्वप्नार्थवदसत्त्वादुभयत्र ब्रह्मैव पश्यन्ति त एव हि पण्डिताः ये त्वसत्त्यक्त्वा सदेव गृह्णन्ति = प्राण गेलेले न गेलेले हे दोन्ही अविद्याकार्य आहे असे जाणून स्वप्नप्रपंचाप्रमाणे असत् असल्यामुळे दोन्हींना ब्रह्मरूपाने पाहतात असे तेच यथार्थ पंडित**(परिभाषा)** यद्वा **पण्डिताः** - ये पण्डिता विचारजन्यात्मतत्त्वज्ञानवन्तस्ते गतप्राणानगतप्राणांश्च बन्धुत्वेन कल्पितान् देहान्नानुशोचन्ति = जे पंडित-विचारजन्यात्मतत्त्वज्ञानाने युक्त आहेत ते बन्धुरूपाने कल्पित मृत आणि जीवित शरीराकरिता शोक करीत नाहीत**(परि.)**

आत्म्याच्या नित्यतेचे व निर्विकारतेचे निरूपण -

**न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः ।**

**न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥१२॥**

**अन्वयः -** अहम्, जातु, न, आसम् (इति), तु, न, एव, त्वम्, न (आसीः), (इति, अपि), न, इमे, जना धिपाः, (जातु), न, आसन् (इति, अपि), न, च, वयम्, सर्वे, अतः, परम्, न, भविष्यामः, (इति अपि), न, एव ।

**अन्वयार्थः - अहम् -** मी **जातु -** कोणत्या समयी **न आसम् -** नव्हतो (**इति**-असे) **तु -** तर **न एव -** नाहीच -अवश्य विद्यमान होतो **त्वम् -** तू (**जातु**-केव्हाही) **न (आसीः**-नव्हतास **इति अपि**-असेही) **न -** नाही, तर अवश्य विद्यमान होतास **इमे -** हे **जनाधिपाः -** राजे लोक (**जातु -** केव्हाही**) न (आसन् -** नव्हते **इति अपि** -असेही**) न -** नाही **च -** आणि **वयम् सर्वे -** आम्ही सर्व **अतः परम् -** यापुढे न **भविष्यामः -** नाहीसे होऊ-असणार नाही (**इति अपि -** असेही) **न एव -** मुळीच नाही.

**विवरण -** यापूर्वी, परमार्थ म्हणजे आत्मदृष्ट्या हे सर्व नित्य आहेत असे प्रतिपादन करून भगवान म्हणतात की, हे अर्जुना! वर्तमान शरीराच्या उत्पत्तिपुर्वी आम्ही सर्व आत्मरूपाने होतो वर्तमानकाळामध्ये सुद्धा आम्ही सर्व आत्मरूपाने आहोत आणि भविष्यकाळामध्ये देखील आम्ही आत्मरूपाने रहाणार आहोत. आम्ही केव्हाही नव्हतो आणि राजेलोक केव्हाही नव्हते असे कदापि नाही आणि भविष्यकाळामध्ये सुद्धा आम्ही सर्व नष्ट होऊन जाऊ असेही कदापि नाहीच म्हणून शरीराच्या नाशाने आत्म्याचा केव्हाही नाश होत नाही याकरिता तुला कोणत्याही परिस्थितीमध्ये शोक करणे योग्य नाही.

**व्याकरणम् - जातु -** जातु अ. **अहम् -** अस्मत् सर्व.प्र.ए.व. **न -** न क्रि.वि.अ. **आसम् -** अस् द्वि.ग.प.प.कर्त.लङ् प्र.भू.प्र.पु.ए.व. **(इति-**इति क्रि.वि.अ.) **तु -** तु उभ.अ. **न -** न क्रि.वि.अ. **एव -** एव क्रि.वि.अ. **त्वम् -** युष्मत् सर्व.प्र.ए.व. (**जातु**-जातु अ.) **न -** न क्रि.वि.अ. (**आसीः**-अस् द्वि.ग.प.प.कर्त.लङ् प्र.भू.द्वि.पु.ए.व.) (**इति, अपि -** इति अ. अपि अ.) **इमे -** इदम् सर्व.पु.प्र.ब.व. **जना धिपाः -** जन पु. अधिप पु.प्र.ब.व.(**जातु**-जातु अ.) **न -** न क्रि.वि.अ. (**आसन् -** अस् द्वि.ग.प.प.कर्त.लङ् प्र.भू.तृ.पु.ब.व. **इति-**इति क्रि.वि.अ.) **न -** न क्रि.वि.अ. **च -** च उभ.अ. **वयम् -** अस्मत् सर्व.प्र.ब.व. **सर्वे -** सर्व सर्व.पु.प्र.ब.व. **अतः -** अतस् तसिल् प्रत्ययान्त अ. **परम् -** परम् क्रि. वि.अ. **न -** न क्रि.वि.अ. **भविष्यामः -** भू प्र.ग.प.प.कर्त.लृट् द्वि.भवि.प्र.पु.ब.व. **(इति-**इति क्रि.वि.अ.) **न -** न क्रि.वि.अ. **एव -** एव क्रि.वि.अ.

**समासविग्रहार्थाः - जनाधिपाः -** जनानाम्-लोकानाम्, अधिपाः-स्वामिनः-राजान इति जनाधिपाः = जनांचे -लोकांचे स्वामी-राजे**(ष.त.स.)**

आत्म्याच्या नित्यतेचे, निर्विकारतेचे प्रतिपादन -

**देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।**

**तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥१३॥**

**अन्वय:** - यथा, देहिनः, अस्मिन्, देहे, कौमारम्, यौवनम्, जरा, तथा, देहान्तरप्राप्तिः, तत्र, धीरः, न, मुह्य ति।

**अन्वयार्थ:** - **यथा** - ज्याप्रमाणे **देहिन:** - जीवात्म्याच्या **अस्मिन्** - या **देहे** - देहामध्ये **कौमारम्** - कुमारावस्था-बालपण **यौवनम्** - यौवनावस्था-तरुणपण **जरा** - वृद्धावस्था-म्हातारपण **तथा** - त्याप्रमाणे **देहान्तरप्राप्तिः** - अन्य शरीराची प्राप्ती होते **तत्र** - त्या विषयी **धीर:** - बुद्धिमान पुरुष-धीर मनुष्य **न मुह्यति** - मोहित होत नाही.

**विवरण** - ज्याप्रमाणे बाल्य, तारुण्य आणि वृद्ध अशा तीन प्रकारच्या अगदी विरुद्ध असलेल्या अवस्था जीवात्म्याला केवळ या स्थूल शरीरातच प्राप्त होतात. वास्तविक पाहिले तर यांच्या नाशाने आत्म्याचा नाश तथा यांच्या उत्पत्तीने आत्म्याची उत्पत्ती अशी दोन्ही प्रकारची दुर्गति आत्म्याची होत नाही; त्याचप्रमाणे दुसऱ्या शरीराची प्राप्ती सुद्धा या जीवात्म्यालाच होते; परंतु परमार्थ दृष्ट्या पाहिले तर एका शरीरांतून दुसऱ्या शरीरांत जाणे-येणे हे कार्य आत्म्याचे नाही, हे संपूर्ण कर्तृत्व सूक्ष्म शरीराचे आहे; परंतु आत्म्यावर केवळ त्यांचा आरोप केला जातो. खरे पाहिले तर आत्मा निर्विकार आहे त्याचा शरीराशी कोणत्याही प्रकारचा संबंध नाही अशी वास्तविकता जाणून बुद्धिमान पुरुष कोणत्याही अवस्थेत मोहाला प्राप्त होत नाही.

**व्याकरणम्** - **यथा** - यद्+थाल्=यथा अ. **देहिन:** - देह्+इनि=देहिन् पु.ष.ए.व. **अस्मिन्** - इदम् सर्व.पु.स.ए.व. **देहे** - दिह् द्वि.ग.उ.प.+घञ्=देह पु.स.ए.व. **कौमारम्** - कुमार् द.ग.प.प.+अण्=कौमार न.प्र.ए.व. **यौवनम्** - युवन्+अण्=यौवन न.प्र.ए.व. **जरा** - जृ च.ग.प.प.+अङ्-टाप्=जरा स्त्री.प्र.ए.व. **तथा** - तथा क्रि.वि.अ. **देहान्तरप्राप्तिः** - देह पु. अन्तर न. प्राप्ति स्त्री.प्र.ए.व. **तत्र** - तत्र त्रल् प्रत्ययान्त सप्तम्यर्थे तद्धि.अ. **धीर:** - धीर वि.पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **मुह्यति** - मुह् च.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **देहान्तरप्राप्तिः** - अन्यो देह इति देहान्तरं देहान्तरस्य प्राप्तिरिति देहान्तरप्राप्तिः = दुसरा देह असा देहान्तर, दुसऱ्या देहाची प्राप्ती देहान्तरप्राप्ती**(ष.त.स.)** **देहिन:** - देहोऽस्यास्तीति देही तस्य देहिनः-देहा भिमानिनो जीवस्य = देह ह्याचा आहे असा देही त्या देहाभिमानी जीवाचे**(अस्त्यर्थे त.वि.)** **कौमारम्** - कुमारस्येदं भावो वा कौमारम् = कुमाराचे-बालपणाचे हे कौमार किंवा कुमाराचा-बालपणाचा भाव कौमार **(भावार्थे/इदमर्थे तद्धित.वि.)** **यौवनम्** - यून इदम् भावो वा यौवनम् = तरूणाचे हे तारूण्य किंवा तरूणाचा भाव तारूण्य**(भावार्थे/इदमर्थे त.वि.)**

संपूर्ण भोगांचे अनित्यत्व दाखवून सुखदुःखादि द्वंद्वांना सहन करण्याची आज्ञा -

**मात्रास्पर्शास्तु कौन्तेय शीतोष्णसुखदुःखदाः।**

**आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ॥१४॥**

**अन्वय:** - कौन्तेय, शीतोष्णसुखदुःखदाः, मात्रास्पर्शाः, तु, आगमापायिनः, (च) अनित्याः, भारत, तान्, तितिक्षस्व।

**अन्वयार्थ:** - **कौन्तेय** - हे कुन्तीपुत्र अर्जुना **शीतोष्णसुखदुःखदाः** - शीत-उष्ण आणि सुख-दुःखाला देणारे **मात्रास्पर्शाः** - इंद्रिये आणि विषयांचे संयोग **तु** - तर **आगमापायिन:** - उत्पत्ति विनाशशील (**च**-आणि) **अ**

**नित्याः** - अनित्य आहेत याकरिता **भारत** - हे भरतवंशामध्ये उत्पन्न होणाऱ्या अर्जुना! **तान्** - त्यांना **ति तिक्षस्व** - तू सहन कर.

**विवरण** - हे अर्जुना! इंद्रिय आणि विषय यांच्या संयोगापासून सुखदुःख, रागद्वेष, हर्षशोक, अनुकूलता प्र तिकूलता इत्यादि द्वंद्व उत्पन्न होतात परंतु त्यांच्या ठिकाणी मात्र तू नित्य बुद्धी ठेवू नकोस. त्यांना केवळ उत्प त्ति आणि विनाशशील समज; कारण उत्पन्न होऊन विनाश पावणे हे अनित्याचे लक्षण आहे. याकरिता त्यांना अनित्य समजून, इंद्रिय आणि विषय यांच्या संयोगापासून उत्पन्न होणारे द्वंद्व तू सहन कर.

**व्याकरणम्** - **कौन्तेय** - कुन्ती+ढक्(एय)=कौन्तेय पु.संबो.ए.व. **शीतोष्णसुखदुःखदाः** - शीत वि. उष्ण वि. सुख न. दुःख न. दा तृ.ग.प.प.+क प्रत्यय=द वि.पु.प्र.ब.व. **मात्रास्पर्शाः** - मात्र पु. स्पर्श पु.प्र.ब.व. **तु** - तु उभ.अ. **आगमापायिनः** - आगम पु. अपायिन् वि.पु.प्र.ब.व. **अनित्याः** - अनित्य वि.पु.प्र.ब.व. **भारत** - भारत पु.संबो.ए.व. **तान्** - तत् सर्व.पु.द्वि.ब.व. **तितिक्षस्व** - तिज् प्र.ग.आ.प.+स्वार्थे सन् प्रत्यय=तितिक्ष् लोट् द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **मात्रास्पर्शाः** - चक्षुरादिज्ञानेन्द्रियैः सामान्येन मीयन्ते-प्रमीयन्त इति मात्राः, वागाद्युभये न्द्रियैः स्पृश्यन्ते गृह्यन्त इति स्पर्शाः-शब्दादयः-भोग्यपदार्था मात्राणाम्-इन्द्रियाणाम्, स्पर्शा इति मात्रास्पर्शाः = चक्षुरादी इंद्रियांच्या द्वारा जे सामान्य रूपाने जाणल्या जातात ते मात्रा आणि वागादि दोन्ही प्रकारच्या इं द्रियांच्या द्वारा जे स्पर्श केल्या जातात अर्थात ग्रहण केल्या जातात ते स्पर्श-शब्दादी विषय मात्रांचे जे स्पर्श ते मात्रास्पर्श**(ष.त.स.)** **शीतोष्णसुखदुःखदाः** - शीतश्चोष्णश्च सुखश्च दुःखश्चेति शीतोष्णसुखदुःखानि ददाति-प्रयच्छन्ति ते शीतोष्णसुखदुःखदाः = शीत, उष्ण, सुख आणि दुःख अशी शीतोष्णसुखदुःखे यांना देतात ते शीतोष्णसुखदुःखद**(द्व.ग.उप.स.)** **अनित्याः** - न नित्या इत्यनित्याः = नाही नित्य असे अनित्य**(न.त.स.)** **आगमापायिनः** - आगमश्च-उत्पत्तिश्च, अपायश्च-विनाशश्चेत्यागमापायौ तौ द्वौ येषां सन्ति ते आगमापायिनः = उत्पत्ति आणि विनाश हे दोन्ही आहेत ज्यांचे ते आगमापायी**(ष.ब.स.)** **भारत** - भा-ब्रह्मविद्या तस्यामेव रमत इति भारतस्तत्संबुद्धौ हे भारत-अर्जुन = भा-ब्रह्मविद्या तिच्यामध्येच रमतो असा भारत त्याचे संबोधनामध्ये हे भारत**(वि.)**

वर सांगितलेल्या सहनशीलतेला मोक्षप्राप्तिमध्ये कारण दाखविणे -

**यं हि न व्यथयन्त्येते पुरुषं पुरुषर्षभ ।**

**समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥१५॥**

**अन्वयः** - हि, पुरुषर्षभ, समदुःखसुखम्, यम्, धीरम्, पुरुषम्, एते, न, व्यथयन्ति, सः, अमृतत्वाय, कल्पते ।

**अन्वयार्थः** - **हि** - कारण की **पुरुषर्षभ** - हे नरश्रेष्ठ! **समदुःखसुखम्** - दुःख आणि सुखाला समान समजणारा असा जो **यम्** - त्या **धीरम् पुरुषम्** - बुद्धिमान पुरुषाला **एते** - हे (इंद्रिय आणि विषयांचे संयोग) **न व्यथय न्ति** - व्याकुल करू शकत नाहीत **सः** - तो **अमृतत्वाय** - मोक्षाकरिता **कल्पते** - योग्य होतो.

**विवरण** - सुख प्राप्त झाले तरी हर्ष न मानणाऱ्या आणि दुःख प्राप्त झाले तरी विषाद न मानणाऱ्या अशा या आत्मज्ञानी पुरुषाला हे सुख-दुःख, राग-द्वेष, शीत-उष्ण इत्यादि द्वंद्व पीडा देऊ शकत नाहीत; कारण सर्व

ठिकाणी त्याची समान दृष्टी असते असा जो द्वंद्वाला सर्व प्रकारांनी समान रूपाने समजणारा धीर पुरुष असतो तो मोक्षाचा अधिकारी होतो म्हणजे मोक्ष प्राप्त करण्याकरिता समर्थ होतो.

**व्याकरणम्** - **हि** - हि क्रि.वि.अ. **पुरुषर्षभ** - पुरुष पु. ऋषभ पु.संबो.ए.व. **समदुःखसुखम्** - सम वि. दुःख न. सुख न.वि.पु.द्वि.ए.व. **यम्** - यत् सर्व.पु.द्वि.ए.व. **धीरम्** - धीर वि.पु.द्वि.ए.व. **पुरुषम्** - पुरुष पु. द्वि.ए.व. **एते** - एतत् सर्व.पु.प्र.ब.व. **न** - न क्रि.वि.अ. **व्यथयन्ति** - व्यथ् प्र.ग.प.प.प्रयोजक लट् वर्त.तृ.पु.ब.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **अमृतत्वाय** - अमृतत्व न.च.ए.व. **कल्पते** - क्लृप् प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - समदुःखसुखम्** - समे दुःखसुखे यस्य स समदुःखसुखस्तं समदुःखसुखम् = सारखे दुःख सुख ज्याचे तो समदुःखसुख त्यास**(ष.ब.स.)** यद्वा **समदुःखसुखम्** - समे समभावम्-ब्रह्मभावं गमिते दुःखसुखे यस्य स समदुःखसुखस्तं समदुःखसुखम् = सारखे समभावाने-ब्रम्हभावाने प्राप्त झालेले सुखदुःख ज्याचे तो समदुःखसुख त्या दुःखसुख समान असलेल्यास**(ष.ब.स.) पुरुषर्षभ** - पुरुषेषु ऋषभः-श्रेष्ठः पुरुषर्षभस्तत्संबुद्धौ हे पुरुषर्षभ = पुरुषामध्ये श्रेष्ठ असा तो पुरुषर्षभ त्याचे संबोधनामध्ये हे पुरुषर्षभ **(स.त.स.) धीरम्** - विषयग्रहणेभ्यो धियं राति निगृह्णातीति धीरः-सदा आत्मनिष्ठस्तं धीरम् = विषयाचे ग्रहण करण्यापासून बुद्धिला आवरतो असा धीर त्या आत्मनिष्ठाला**(वि.)**

सत् आणि असताच्या लक्षणाचे प्रतिपादन -

**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।**

**उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥१६॥**

**अन्वयः** - असतः, भावः, न, विद्यते, तु, सतः, अभावः, न, विद्यते, अनयोः, उभयोः, अपि, अन्तः, तत्त्वदर्शिभिः, दृष्टः ।

**अन्वयार्थः** - **असतः** - असत्-अविद्यमान वस्तुची **भावः** - सत्ता **न विद्यते** - राहात नाही **तु** - त्याचप्रमाणे **सतः** - सत्-विद्यमान वस्तुचा **अभावः** - अभाव **न विद्यते** - होत नाही **अनयोः उभयोः अपि** - असा या दोन्हीचाही **अन्तः** - निर्णय **तत्त्वदर्शिभिः** - तत्त्ववेत्या पुरुषांनी **दृष्टः** - पाहिलेला आहे.

**विवरण** - जडवर्गरूप जगत ज्या कालामध्ये प्रतीतिला येत होते ते त्याच्या अगोदर म्हणजे पूर्वीही नव्हते आणि पुढेही होणार नाही. ज्या कालामध्ये वास्तवरूपाने प्रतीती येत होती त्या कालामध्ये सुद्धा ते वास्तविक नव्हते. त्याचप्रमाणे तू भीष्म द्रोणादिकांविषयीच्या नाशाची आशंका करीत होतास (म्हणजे त्यांच्या विषयी शोक करीत होतास) हे तुझे करणे परमार्थदृष्ट्या व्यर्थ आहे कारण की, अविद्यमान वस्तूचे अस्तित्वच संभवत नाही आणि सद्रूप आत्मतत्त्वाचा अभाव केव्हाही होत नाही. अशा प्रकारे तत्त्ववेत्या पुरुषांनी या दोन्हीचा निर्णय प्रत्यक्ष अनुभविलेला आहे.

**व्याकरणम्** - **असतः** - अस् द्वि.ग.प.प.+शतृ=सत्,अ+सत्=असत् वि.न.ष.ए.व. **भावः** - भू+घञ्=भाव पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **विद्यते** - विद् च.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **तु** - तु उभ.अ. **सतः** - सत् वि.न.ष.ए.व. **अनयोः** - इदम् सर्व.न.ष.द्वि.व. **उभयोः** - उभ सर्व.न.ष.द्वि.व. **अपि** - अपि अ. **अन्तः** - अन्त वि.पु.प्र.ए.व. **तत्त्वदर्शिभिः** - तत्त्व न. दृश्+णिनि=दर्शिन् वि.पु.तृ.ब.व. **दृष्टः** - दृश्

प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अभावः** - न भाव इत्यभावः = न असणे असा अभाव**(न.त.स.) असतः** - न स दित्यसत् = नाही सत् असे असत्**(न.त.स.) तत्त्वदर्शिभिः** - तत्त्वं पश्यन्तीति तत्त्वदर्शिनस्तैस्तत्त्वदर्शिभिः = तत्त्व पहातात असे तत्त्वदर्शी त्यांच्याकडून**(उप.स.)** यद्वा **तत्त्वदर्शिभिः** - तत्त्वं सर्वाधिष्ठानभूतस्य ब्रह्मणो याथात्म्यमबाधितस्वरूपं सत्यज्ञानानन्दात्मकं यत्तदेव सदा सर्वत्र द्रष्टुं शीलं येषां ते तत्त्वदर्शिनस्तैस्तत्त्वदर्शिभिः -ब्रह्मविद्भिः = तत्त्व-सर्वाधिष्ठानभूत ब्रम्हाचे-आत्म्याचे अबाधित स्वरूप सत्यज्ञानानंदात्मक तेच नेहमी सर्व ठिकाणी पहाण्याचा स्वभाव ज्यांचा ते तत्त्वदर्शी त्यांच्याकडून**(ष.ब.स.)**

सत् आणि असत् स्वरूपाचे वर्णन आणि अर्जुनाला युद्ध करण्याची प्रेरणा -

**अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।**

**विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ॥१७॥**

**अन्वयः** - तु, येन, इदम्, सर्वम्, ततम्, तत्, अविनाशि, विद्धि, अस्य, अव्ययस्य, विनाशम्, कर्तुम्, कश्चित्, न, अर्हति ।

**अन्वयार्थः - तु** - परंतु **येन** - ज्याने (सत् संज्ञक ब्रह्माने) **इदम्** - हे **सर्वम्** - सर्व दृश्यवर्ग जगत **ततम्** - व्याप्त केले आहे **तत्** - असे जे आत्मतत्त्व ब्रह्म **अविनाशि** - देशकालवस्तुपरिच्छेदरहित-नाशरहित आहे असे **विद्धि** - तू जाण **अस्य अव्ययस्य** - या अविनाशी-अक्षय वस्तुचा **विनाशम्** - विनाश **कर्तुम्** - करण्याकरिता **कश्चित्** - कोणीही-ईश्वरही **न अर्हति** - समर्थ नाही.

**विवरण** - जडवर्ग विनाशी असल्यामुळे त्याचा क्षणाक्षणाला नाश होतो परंतु विनाश न पावणे ज्याचा स्वभाव आहे असे जे देशकालवस्तुपरिच्छेदरहित सत् अविनाशी आत्मतत्त्व आहे ते नाशरहित आहे. अशा या अविनाशी आत्मतत्त्वाच्या द्वारा संपूर्ण दृश्य वर्ग जगत व्याप्त आहे, असे तूं जाण अशा या उपर्युक्त प्रतिपादित अविनाशी आत्मतत्त्वाचा विनाश करण्याकरिता कोणीही-ईश्वर-सार्वभौम राजा किंवा महेश्वरसुद्धा समर्थ नाही.

**व्याकरणम् - तु** - तु उभ.अ. **येन** - यत् सर्व.पु.तृ.ए.व. **इदम्** - इदम् सर्व.न.प्र.ए.व. **सर्वम्** - सर्व सर्व.न.प्र.ए.व. **ततम्** - तन् अ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.द्वि.ए.व. **अविनाशि** - अ+वि+नाशिन् वि.न.द्वि.ए.व. **विद्धि** - विद् द्वि.ग.प.प.कर्त. आज्ञार्थक द्वि.पु.ए.व. **अस्य** - इदम् सर्व.पु.ष.ए.व. **अव्ययस्य** - अव्यय वि.पु.ष.ए.व. **विनाशम्** - वि+नश्+घञ्=विनाश वि.पु.द्वि.ए.व. **कर्तुम्** - कृ अ.ग.उ.प.तुमन्त अ. **कश्चित्** - कः किम् सर्व.+चित्=कश्चित् पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अर्हति** - अर्ह् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अव्ययस्य** - न विद्यते व्ययो नाशो यस्य तदव्ययं तस्याव्ययस्य = नाही नाश ज्याचा ते अव्यय त्या अव्ययाचा**(ष.ब.स.)अविनाशि** - विनाशोऽस्यास्तीति विनाशि न विनाशीत्यविनाशि = विनाश ज्याचा आहे असे विनाशी नाही विनाशी असे अविनाशी**(न.त.स.)** यद्वा **अविनाशि** - यथा असत्तथा विनष्टुं विनाशनविक्रियाया विषयतां प्राप्तुमनर्हं शीलम्-स्वभावः-सत्ता यस्य तदविनाशि = जसे असत् तसे नष्ट होण्यास योग्य त्याप्रमाणे विक्रियाच्या-विकाराच्या विषयाला प्राप्त होण्याचे शील-स्वभाव-सत्ता नाही ज्याची

ते अविनाशि**(ष.ब.स.)**

सत् आणि असत् स्वरूपाचे वर्णन आणि अर्जुनाला युद्ध करण्याची प्रेरणा -

**अन्तवन्त इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः ।**

**अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत ॥१८॥**

**अन्वयः** - नित्यस्य, अनाशिनः, अप्रमेयस्य, शरीरिणः, इमे, देहाः, अन्तवन्तः, उक्ताः, तस्मात्, भारत, युध्यस्व ।

**अन्वयार्थः** - **नित्यस्य** - नित्य **अनाशिनः** - अविनाशि-नाशरहित आणि **अप्रमेयस्य** - कोणत्याही प्रमाणाचा विषय न होणाऱ्या अशा या **शरीरिणः** - शरीरी-आत्म्याची **इमे देहाः** - ही सर्व शरीरे **अन्तवन्तः** - नाशवान **उक्ताः** - सांगितली आहेत **तस्मात्** - म्हणून **भारत** - हे अर्जुना! **युध्यस्व** - तू युद्ध कर.

**विवरण** - नित्य, अविनाशी आणि कोणत्याही प्रमाणाचा विषय न होणाऱ्या आत्म्याची ही संपूर्ण शरीरे विनाशी आहेत कारण की, विनाश पावणे त्यांचा स्वभाव आहे; अतः भीष्मद्रोणादिकांच्या शरीराच्या नाशा विषयी शोक करणे व्यर्थ आहे. म्हणून हे अर्जुना! तू युद्ध कर.

**व्याकरणम्** - **नित्यस्य** - नित्य वि.पु.ष.ए.व. **अनाशिनः** - अ+नाशिन् वि.पु.ष.ए.व. **अप्रमेयस्य** - अ+प्रमेय न.वि.पु.ष.ए.व. **शरीरिणः** - शॄ न.ग.प.प.+ईरन्=शरीर+इनि=शरीरिन् वि.पु.ष.ए.व. **इमे** - इदम् सर्व.पु.प्र.ब.व. **देहाः** - दिह् द्वि.ग.उ.प.+घञ्=देह पु.प्र.ब.व. **अन्तवन्तः** - अन्तवत् वि.पु.प्र.ब.व. **उक्ताः** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **तस्मात्** - तत् सर्व.पु.पं.ए.व./अव्ययः **भारत** - भारत पु.संबो.ए.व. **युध्यस्व** - युध् च.ग.आ.प.कर्त.आज्ञार्थक द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **अनाशिनः** - नाशोऽस्यास्तीति नाशी, न नाशीत्यनाशी तस्य अनाशिनः-नाशरहितस्य = नाश ज्याचा आहे असे नाशवान, नाश नाही असे अनाशी-नाशरहित त्यांचे**(न.त.स.)** **अप्रमेयस्य** - प्रमातुं योग्यः प्रमेयो न प्रमेय इत्यप्रमेयस्तस्याप्रमेयस्य = मोजण्यास-प्रमाणाला योग्य ते प्रमेय, नाही प्रमेय ते अप्रमेय त्याचे**(न.त.स.)** **शरीरिणः** - शरीरमस्यास्तीति शरीरी तस्य शरीरिणः = शरीर ह्याचे आहे असा शरीर धारण करणारा त्याचे**(अस्यार्थे त.वि.)** **अन्तवन्तः** - अन्तः-विनाशो विद्यते येषान्ते अन्तवन्तः = अंत-विनाश आहे ज्यांचा ते **(ष.ब.स.)**

आत्म्याला मरणारा आणि मारणारा समजणाऱ्यांना अज्ञानी दाखविणे -

**य एनं वेत्ति हन्तारं यश्चैनं मन्यते हतम् ।**

**उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते ॥१९॥**

**अन्वयः** - यः, एनम्, हन्तारम्, वेत्ति, च, यः, एनम्, हतम्, मन्यते, तौ, उभौ, न, विजानीतः, अयम्, न, ह न्ति, न, हन्यते ।

**अन्वयार्थ** - **यः** - जो(पुरुष) **एनम्** - या आत्म्याला **हन्तारम्** - मारणारा **वेत्ति** - समजतो **च** - आणि **यः** - जो **एनम्** - या आत्म्याला **हतम्** - मरणारा **मन्यते** - मानतो **तौ उभौ** - ते दोघेही **न विजानीतः** - या आत्मतत्त्वाला जाणत नाहीत **अयम्** - हे आत्मतत्त्व **न हन्ति** - कोणाला मारीत नाही **न हन्यते** - कोणाच्या

द्वारा मारल्या जात नाही.

**विवरण -** अविनाशी, नित्य, निर्विकार आत्मतत्त्व दुसऱ्या कोणाला मारीत नाही आणि स्वत: कोणाच्याद्वारा मारल्या जात नाही; परंतु ज्यांना या अविनाशी आत्मतत्त्वाचे यत्किंचितही ज्ञान नाही असे हे अज्ञानी मूढ लोक देहाने दुसऱ्याला मारले म्हणजे मी-आत्म्याने याला मारले व दुसऱ्याच्या देहाने याच्या देहाला मारले म्हणजे मी आत्मा मारला गेलो असे समजतात. ते दोघेही आत्म्याच्या स्वरूपाविषयी अनभिज्ञ-मूढ आहेत; वास्तविक आत्मा अविनाशी असल्यामुळे तो हनन क्रियेचा कर्ता किंवा कर्मही होत नाही.

**व्याकरणम् - यः -** यत् सर्व.पु.प्र.ए.व. **एनम् -** एतत् सर्व.पु.द्वि.ए.व. **हन्तारम् -** हन्+तृच्=हन्तृ पु. द्वि.ए.व. **वेत्ति -** विद् द्वि.ग.प.प.कर्त.वर्त.तृ.पु.ए.व. **च -** च उभ.अ. **यः -** यत् सर्व.पु.प्र.ए.व. **एनम् -** एतत् सर्व.पु.द्वि.ए.व. **हतम् -** हन् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.द्वि.ए.व. **मन्यते -** मन् च.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **तौ -** तत् सर्व.पु.प्र.द्वि.व. **उभौ -** उभ सर्व.पु.प्र.द्वि.व. **न -** न क्रि.वि.अ. **विजानीतः -** वि+ज्ञा न.ग.प.प.लट् वर्त.प्र.पु.द्वि.व.**अयम् -** इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **हन्ति -** हन् द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **न -** न क्रि.वि.अ. **हन्यते -** हन् द्वि.ग.प.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - हन्तारम् -** हन्तीति हन्ता तं हन्तारम् = मारतो असा मारणारा त्या मारणाऱ्याला**(वि.)**

जन्मादि सहा विकारांनी रहित आत्मस्वरूपाचे निरूपण -

**न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः ।**

**अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥२०॥**

**अन्वयः** - अयम्, कदाचित्, न, जायते, वा, कदाचित्, न, म्रियते, वा, भूत्वा, भूयः, भविता, न, अयम्, अजः, नित्यः, शाश्वतः, पुराणः, शरीरे, हन्यमाने, अपि, न, हन्यते ।

**अन्वयार्थः** - **अयम्** - हा आत्मा **कदाचित्** - केव्हाही **न जायते** - उत्पन्न होत नाही **वा** - अथवा **कदाचित्** - केव्हाही **न म्रियते** - मरत नाही **वा** - किंवा हा आत्मा **भूत्वा** - उत्पन्न होऊन **भूयः** - पुन्हा **भविता** - (सत्तावान) होणारा **न** - नाही (म्हणून) **अयम्** - हा आत्मा **अजः** - उत्पन्न न होणारा **नित्यः** - नित्य स्वरूप **शाश्वतः** - क्षयरहित **पुराणः** - पुरातन आहे **शरीरे हन्यमाने अपि** - शरीराचा नाश झाला तरी **न हन्यते** - ह्या आत्म्याचा नाश होत नाही अथवा आत्मा मारला जात नाही.

**विवरण** - या श्लोकात शरीराच्या ठिकाणी होणाऱ्या उत्पत्ति, अस्तित्त्व, वृद्धि, विपरिणाम, अपक्षय, विनाश या सहा विकारांनी आत्मा रहित आहे असे प्रतिपादन केले आहे. आत्मा अज आहे, असे कथन करून उत्प त्ति विकाराचा आत्म्याच्या ठिकाणी सदैव अभाव(त्रैकालिक अत्यन्ताभाव) दाखविलेला आहे. (नायं भूत्वाभविता वा न भूयः) या द्वारा आत्मा स्वभावतः सत् आहे असे सांगून आत्माच्या अस्तित्वरूप विकाराचा सदैव अभाव दाखविलेला आहे. पुराण या पदाद्वारा आत्मा चिरकालीन सदा एकरस आहे असे कथन करून आत्म्याच्या ठिकाणी वृद्धिरूप विकाराचा सदैव अभाव दाखविलेला आहे. नित्य या पदाद्वारा आत्मा अखंड सत्तावान सांगून विपरिणाम विकाराचा सदैव अभाव दाखविलेला आहे. शाश्वत या पदाद्वारा आत्मा सदा एकरूपाने स्थिर आहे असे सांगून आत्म्याच्या ठिकाणी अपक्षय विकाराचा सदैव अभाव दाख विलेला आहे. (शरीरे हन्यमाने न हन्यते, न म्रियते) असे कथन करून, आत्म्याच्या ठिकाणी विनाश

विकाराचा सदैव अभाव दाखविलेला आहे. अशा प्रकारे शरीराचा विनाश झाला तरी नित्य तथा अविनाशी आत्मस्वरूपाचा केव्हाही नाश होत नाही.

**व्याकरणम्** - **अयम्** - इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **कदाचित्** - कदाचित् अ. **न** - न क्रि.वि.अ. **जायते** - जन् च.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **वा** - वा उभ.अ. **न** - न क्रि.वि.अ. **म्रियते** - मृ ष.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **वा** - वा उभ.अ. **न** - न क्रि.वि.अ. **भूत्वा** - भू प्र.ग.प.प.त्वान्त अ. **भूय:** - भूयस् अ. **भविता** - भू अनद्यतने लुट् प्र.ग.प.प.तृ.पु.ए.व. **अयम्** - इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **अज:** - अज वि.पु.प्र.ए.व. **नित्य:** - नित्य वि.पु.प्र.ए.व. **शाश्वत:** - शश्वत्+अण्=शाश्वत वि.पु.प्र.ए.व. **पुराण:** - पुराण वि.पु.प्र.ए.व. **शरीरे** - शरीर न.स.ए.व. **हन्यमाने** - हन् द्वि.ग.आ.प.+य+शानच्=हन्यमान वि.पु.स.ए.व. **हन्यते** - हन् द्वि.ग.प.प.कर्म.आ.प.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - अज:** - जायतेऽसौ ज: कदाचित् न जोऽज:-जन्मशून्य: = उत्पन्न होतो असा उत्पन्न होणारा केव्हाही उत्पन्न न होणारा-जन्मरहित असणारा**(न.त.स.) शरीरे** - शीर्यते तत् शरीरं तस्मिन् शरीरे = जीर्ण होते-झिजल्या जाते ते शरीर त्यामध्ये**(त.वि.) शाश्वत: -** शश्वद् भव: शाश्वत: = नेहमी असणारे असे शाश्वत**(त.वि.)**

आत्मतत्त्ववित् कोणाला मारीत नाही आणि कोणाला मारविणाराही होत नाही असे दाखविणे -

**वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् ।**

**कथं स पुरुष: पार्थ कं घातयति हन्ति कम् ॥२१॥**

**अन्वय:** - पार्थ, य:, पुरुष:, एनम्, अविनाशिनम्, नित्यम्, अजम्, अव्ययम्, वेद, स:, पुरुष:, कथम्, कम्, घातयति, कम्, हन्ति ।

**अन्वयार्थ:** - **पार्थ** - हे पृथापुत्र अर्जुना! **य:** - जो कोणी **पुरुष:** - पुरुष **एनम्** - ह्या आत्म्याला **अविनाशिनम्** - नाशरहित **नित्यम्** - नित्य **अजम्** - न जन्मणारा (आणि) **अव्ययम्** - अव्यय-व्ययरहित **वेद** - समजतो **स:** - तो **पुरुष:** - पुरुष **कथम्** - कसा **कम्** - कोणाला **घातयति** - दुसऱ्याकडून मारविणार व **कम्** - कोणाला **हन्ति** - मारणार?

**विवरण** - जो पुरुष यथार्थ रूपाने आत्मतत्त्वाला जाणतो म्हणजे ज्याने चांगल्या प्रकारांनी आत्मतत्त्वाचा अनुभव घेतलेला आहे की, आत्मा अजन्मा, अविनाशी, अव्यय आणि नित्य आहे. असा तत्त्वज्ञानी पुरुष स्वत: दुसऱ्याला कसा मारणार आणि अन्याकडून तरी कसा मारविणार? कारण ज्याच्या ज्ञानामध्ये सर्वत्र आत्मतत्त्वच व्याप्त असल्यामुळे मरणे, मारणे आणि मारविणे हे सर्व आत्म्यामध्ये केवळ अज्ञानामुळेच अध्यारोपित होते. वास्तविक प्रतीत होत नाही म्हणून तो पुरुष दुसऱ्याला मारणारा किंवा दुसऱ्याकडून मारविणारा होत नाही.

**व्याकरणम्** - **पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **य:** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **पुरुष:** - पुर्+कुषण्=पुरुष पु.प्र.ए.व. **एनम्** - एतत् सर्व.पु.द्वि.ए.व. **अविनाशिनम्** - अ+वि+नाशिन् वि.पु.द्वि.ए.व. **नित्यम्** - नित्य वि.पु.द्वि.ए.व. **अजम्** - अज पु.द्वि.ए.व. **अव्ययम्** - अव्यय वि.पु.द्वि.ए.व. **वेद** - विद् द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **पुरुष:** - पुरुष पु.प्र.ए.व. **कथम्** - कथम् अ. **कम् -** किम् सर्व.पु.

द्वि.ए.व. **हन्ति** - हन् द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **कम्** - किम् सर्व.पु.द्वि.ए.व. **कथम्** - कथम् अ. **घातयति** - हन् द्वि.ग.प.प.णिजन्त कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थः** - **पार्थ** - पृथायाः-कुन्त्या अपत्यं पुमान् पार्थस्तत्संबुद्धौ हे पार्थ = **(अपत्यार्थे त.वि.)** **अव्ययम्** - न विद्यते व्ययो नाशो यस्य सोऽव्ययस्तमव्ययम् = नाही नाश होत ज्याचा ते अव्यय त्या अव्ययाला**(ब.स.)**

मनुष्याचा कपडे बदलण्याचा दृष्टान्त देऊन शरीरान्तराची प्राप्ति दाखविणे -

**वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि ।**

**तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही ॥२२॥**

**अन्वयः** - यथा, नरः, जीर्णानि, वासांसि, विहाय, अपराणि, नवानि, गृह्णाति, तथा, देही, जीर्णानि, शरीराणि, विहाय, अन्यानि, नवानि, संयाति ।

**अन्वयार्थः** - **यथा** - ज्याप्रमाणे **नरः** - पुरुष **जीर्णानि** - जीर्ण **वासांसि**- वस्त्रे **विहाय** - टाकून **अपराणि** - दुसरी **नवानि** - नवी वस्त्रे **गृह्णाति** - ग्रहण करतो **तथा** - त्याचप्रमाणे **देही** - आत्मा **जीर्णानि शरीराणि** - जीर्ण शरीरे **विहाय** - त्यागून **अन्यानि नवानि** - दुसरी नवीन शरीरे **संयाति** - धारण करतो.

**विवरण** - या श्लोकात वस्त्राचा दृष्टांत देऊन आत्म्याचे सर्वदा एकरूपत्व प्रतिपादन केले आहे. ज्याप्रमाणे पुरुष जुनी वस्त्रे टाकून नवी वस्त्रे धारण करतो परंतु वस्त्रे धारण करणाऱ्यामध्ये कोणत्याही प्रकारचा बदल होत नाही; त्याचप्रमाणे आत्मा जीर्ण झालेली शरीरे टाकून नवी शरीरे धारण करतो परंतु तो सर्वदा नित्य एकरूपच असल्यामुळे त्यामध्ये काही एकमात्र बदल होत नाही.

**व्याकरणम्** - **यथा** - यथा क्रि.वि.अ. **नरः** - नृ न.ग.प.प.+अच्=नर पु.प्र.ए.व. **जीर्णानि** - जॄष् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.द्वि.ब.व. **वासांसि** - वासस् न.द्वि.ब.व. **विहाय** - वि+हा तृ.ग.प.प.ल्यबन्त अ. **अपराणि** - अपर सर्व.न.द्वि.ब.व. **नवानि** - नु द्वि.ग.प.प.+अप्=नव वि.न.द्वि.ब.व. **गृह्णाति** - ग्रह् न.ग.उ.प.(प.प.)कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **तथा** - तथा क्रि.वि.अ. **देही** - देह+इनि=देहिन् पु.प्र.ए.व. **जीर्णानि** - जॄष् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.द्वि.ब.व. **शरीराणि** - शरीर न.द्वि.ब.व. **विहाय** - वि+हा तृ.ग.प.प.ल्यबन्त अ. **अन्यानि** - अन्य सर्व.न.द्वि.ब.व. **नवानि** - नव वि.न.द्वि.ब.व. **संयाति** - सम्+या द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थः** - **देही** - देहोऽस्यास्तीति देही-जीवात्मा = देह ह्याचा आहे असा देहधारी**(अस्त्यर्थे त. वि.)** **जीर्णानि** - जीर्यन्त इति जीर्णानि = जीर्ण केली जातात/होतात ती जीर्ण(वस्त्रे)**(वि.)**

आत्मतत्त्वाला अच्छेद्य, अदाह्य, अक्लेद्य, निर्विकार इ. सांगून शोक करणे योग्य नाही असे दाखवितात -

**नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।**

**न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः ॥२३॥**

**अन्वयः** - एनम्, शस्त्राणि, न, छिन्दन्ति, एनम्, पावकः, न, दहति, एनम्, आपः, न, क्लेदयन्ति, च,

मारुत:, न, शोषयति ।

**अन्वयार्थ: - एनम्** - या आत्मतत्त्वाला **शस्त्राणि** - शस्त्रे **न छिन्दन्ति** - तोडीत नाहीत **एनम्** - याला **पावक:** - अग्नी **न दहति** - जाळीत नाही **एनम्** - याला **आप:** - पाणी **न क्लेदयन्ति** - भिजवीत नाही **च** - आणि **मारुत:** - याला वारा **न शोषयति** - सुकवीत नाही.

**विवरण** - शस्त्रांच्या द्वारा शरीर तोडले तरी आत्मा तोडल्या जात नाही, अग्निने शरीर जाळले तरी आत्मा जाळल्या जात नाही, पाणी शरीराला भिजवते परंतु आत्म्याला ओले करू शकत नाही, वायुमुळे शरीर सुकले तरी आत्मा सुकत नाही म्हणजे पंचमहाभूते त्या आत्मतत्त्वाचे ठिकाणी कोणत्याही प्रकारचा परिणाम करू शकत नाहीत; कारण ते आकाशाप्रमाणे अविक्रिय असल्यामुळे त्याच्या ठिकाणी कोणत्याही प्रकारची क्रिया होऊ शकत नाही.

**व्याकरणम् - एनम्** - एतत् सर्व.पु.द्वि.ए.व. **शस्त्राणि** - शस् प्र.ग.प.प.+ष्ट्रन्=शस्त्र न.प्र.ब.व. **न** - न क्रि. वि.अ. **छिन्दन्ति** - छिद् स.ग.उ.प.(प.प.)कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व. **एनम्** - एतत् सर्व.पु.द्वि.ए.व. **पावक:** - पू प्र.ग.आ.प./न.ग.उ.प.+ण्वुल्=पौ+अक=पावक पु.प्र.ए.व. **दहति** - दह् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **एनम्** - एतत् सर्व.पु.द्वि.ए.व. **आप:** - स्त्री.प्र.ब.व. **क्लेदयन्ति** - क्लिद् च.ग.प.प.प्रयोजक लट् वर्त.तृ.पु.ब.व. **च** - च उभ.अ. **मारुत:** - मृ ष.ग.आ.प.+उत्=मरुत्+अण्=मारुत पु.प्र.ए.व. **शोषयति** - शुष् च.ग.प.प.प्रयोजक लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - शस्त्राणि** - शस्यन्ते पदार्था एभिरिति शस्त्राणि गदादय: = छेदल्या जातात पदार्थ ज्याच्या योगाने अशी शस्त्रे तलवार, गदा इत्यादि**(वि.) पावक:** - पुनातीति पावक: = पवित्र करतो असा अग्नी **(वि.)**

हे आत्मतत्त्व नित्य, सर्वव्यापक, अचल, स्थिर, चिरकालीन आहे असे दाखवितात -

**अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च ।**

**नित्य: सर्वगत: स्थाणुरचलोऽयं सनातन: ॥२४॥**

**अन्वय:** - अयम्, अच्छेद्य:, अयम्, अदाह्य:, अयम्, अक्लेद्य:, च, अशोष्य:, एव, अयम्, नित्य:, सर्वगत:, अचल:, स्थाणु:, सनातन: ।

**अन्वयार्थ:** - **अयम्** - हे आत्मतत्त्व **अच्छेद्य:** - शस्त्रांनी तोडले जात नाही **अयम्** - हे आत्मतत्त्व **अदाह्य:** - अग्निने जाळले जात नाही **अयम्** - हे आत्मतत्त्व **अक्लेद्य:** - पाण्याने कुजले जात नाही **च** - आणि **अशोष्य: एव** - वायुनेही सुकले जात नाही **अयम्** - हा आत्मा **नित्य:** - नित्य **सर्वगत:** - सर्वव्यापक **अचल:** - अचल **स्थाणु:** - स्थिर **सनातन:** - चिरकालीन आहे.

**विवरण** - या श्लोकात अच्छेद्यत्वादि विशेषणे देऊन आत्मा शस्त्रांच्या द्वारा तोडण्यास, अग्निच्याद्वारे जाळण्यास, पाण्याच्याद्वारे कुजविण्यास अथवा वायुच्याद्वारे सुकविण्यास योग्य नाही असे प्रतिपादन केले आहे. कारण तो आत्मा नित्य-शाश्वत, सर्वगत, अचल, स्थाणु-स्थिर तथा सनातन-अनादि असल्यामुळे त्याच्या ठिकाणी कोणतीही उपर्युक्त कार्ये होऊ शकत नाहीत.

'न तस्य कश्चिज्जनिता न चाऽधिप:' या श्रुति प्रमाणाने आत्मा निरवयव असल्यामुळे कोणत्याही कारणापासून उत्पन्न होणारा नाही असा तो सनातन-जन्मादि विकार रहित आहे; म्हणूनच तो नित्य आहे आ णि नित्य आहे म्हणूनच तो सर्वगत-सर्वव्यापक आहे. नित्य, सर्वगत असूनही त्याच्या ठिकाणी क्रिया राहू शकते असेही म्हणता येणार नाही; कारण आकाश जसे नित्य, सर्वगत असूनही त्याच्या ठिकाणी क्रियाशक्तीचे आश्रयत्व नाही त्याचप्रमाणे आत्माही क्रियाशक्तीचा आश्रय नाही म्हणूनच तो स्थाणु-स्थिरस्वभावाचा आहे व स्थिरस्वभावाचा आहे म्हणूनच तो अचल आहे. सनातनत्व, नित्यत्व, स्थिरत्व, अचलत्व, सर्वगतत्व या विशेषणांनी आत्म्याचे ठिकाणी अनुक्रमे निर्विकारत्त्व, प्रमाणान्तराबाध्यत्व, क्रियाशक्त्यनाश्रयत्व, क्रियाशक्त्यविषयत्व, अद्वितीयत्व (नित्यशुद्धत्व आनन्दैकरसत्त्व) सूचित केले आहे.

**व्याकरणम्** - **अयम्** - इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **अच्छेद्य:** - अ+छिद् स.ग.उ.प.कर्म.ण्यत् वि.पु.प्र.ए.व. **अयम्** - इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **अदाह्य:** - अ+दह् प्र.ग.प.प.कर्म.ण्यत् वि.पु.प्र.ए.व. **अयम्** - इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **अक्लेद्य:** - अ+क्लिद् च.ग.प.प.कर्म.ण्यत् वि.पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **अशोष्य:** - अ+शुष् च.ग.प.प.कर्म.ण्यत् वि.पु.प्र.ए.व. **अयम्** - इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **नित्य:** - नित्य वि.पु.प्र.ए.व. **सर्वगत:** - सर्व वि. गम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **अचल:** - अचल वि.पु.प्र.ए.व. **स्थाणु:** - स्था प्र.ग.प.प.+नु,पृषो.णत्व=स्थाणु वि.पु.प्र.ए.व. **सनातन:** - सनातन वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अच्छेद्य:** - च्छेत्तुं योग्य इति च्छेद्यो न च्छेद्य इत्यच्छेद्य: = छेदन करण्यास योग्य असे च्छेद्य, नाही च्छेद्य असे अच्छेद्य**(न.त.स.)** **अक्लेद्य:** - क्लेदितुम्-द्रवीकर्तुं योग्य इति क्लेद्यो न क्लेद्य इत्यक्लेद्य: = ओले करण्यास योग्य असे क्लेद्य, नाही क्लेद्य असे अक्लेद्य**(न.त.स.)** **अशोष्य:** - शोष्टुं योग्य इति शोष्यो न शोष्य इत्यशोष्य: = सुकविण्याला योग्य असे शोष्य, नाही शोष्य असे अशोष्य **(न.त.स.)** **अदाह्य:** - दग्धुं योग्य इति दाह्यो न दाह्य इत्यदाह्य: = जळण्यास योग्य असे दाह्य, नाही दाह्य असे अदाह्य**(न.त.स.)** **अचल:** - न स्वरूपाद् न सामर्थ्यान्न च ज्ञानादिकाद् गुणात् चलनं विद्यतेऽस्येत्यचल: - निष्क्रिय: = नाही स्वरूपाने, सामर्थ्याने, ज्ञानादिक गुणाने चलन ह्याचे असे अचल**(अस्त्यर्थे त.वि.)** **स्थाणु:** - तिष्ठतीति स्थाणु: = स्थिर राहतो असा स्थाणु**(वि.)**

आत्मा अव्यक्त, अचिन्त्य, अविकारी आहे हे सांगून तू शोक करणे योग्य नाही असे भगवान सांगतात -

**अव्यक्तोऽयमचिन्त्योऽयमविकार्योऽयमुच्यते।**

**तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥२५॥**

**अन्वय:** - अयम्, अव्यक्त:, अयम्, अचिन्त्य:, अयम्, अविकार्य:, उच्यते, तस्मात्, एनम्, एवम्, वि दित्वा, अनुशोचितुम्, न, अर्हसि।

**अन्वयार्थ:** - **अयम्** - हा आत्मा **अव्यक्त:** - अव्यक्त आहे **अयम्** - हा आत्मा **अचिन्त्य:** - अचिन्त्य आहे **अयम्** - हा आत्मा **अविकार्य:** - अविकारी आहे असे **उच्यते** - बोलले जाते **तस्मात्** - म्हणून **एनम्** - या आत्म्याला **एवम्** - असे **विदित्वा** - जाणून **अनुशोचितुम्** - शोक करण्याकरिता **न अर्हसि** - तू योग्य नाहीस.

**विवरण** - आत्मा कोणत्याही इंद्रियांच्या द्वारा जाणल्या जात नाही म्हणून तो अव्यक्त, मनाचा विषय नाही म्हणून तो अचिन्त्य, कोणत्याही विकाराच्या द्वारा विकृत होत नाही म्हणून तो अविकार्य आहे म्हणूनच अशा प्रकारच्या आत्म्याला जाणून तुला शोक करणे योग्य नाही.

**व्याकरणम्** - **अयम्** - इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **अव्यक्तः** - अ+वि+अञ्ज् स.ग.प.प.+कर्म क्त=अव्यक्त वि.पु.प्र.ए.व. **अयम्** - इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **अचिन्त्यः** - अ+चिन्त् द.ग.उ.प.कर्म.यत् वि.पु.प्र.ए.व. **अयम्** - इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **अविकार्यः** - अ+वि+कृ अ.ग.उ.प.कर्म.ण्यत् वि.पु.प्र.ए.व. **उच्यते** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **तस्मात्** - तत् सर्व.पु.पं.ए.व./अ. **एनम्** - एतत् सर्व.पु.द्वि.ए.व. **एवम्** - एवम् क्रि.वि.अ. **विदित्वा** - विद् द्वि.ग.प.प.त्वान्त अ. **अनुशोचितुम्** - अनु+शुच् प्र.ग.प.प.तुमन्त अ. **न** - न क्रि.वि.अ. **अर्हसि** - अर्ह् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **अचिन्त्यः** - चिन्तितुं योग्य इति चिन्त्यो न चिन्त्य इत्यचिन्त्यः = चिंतन करण्यास योग्य असे चिंत्य, नाही चिंत्य असे अचिंत्य**(न.त.स.)** **अविकार्यः** - न विकार्य इत्यविकार्यः = नाही विकारी असे अविकार्य**(न.त.स.)**

आत्म्याला जन्मणारा, मरणारा मानून सुद्धा तुला शोक करणे योग्य नाही असे भगवान सांगतात -

**अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम्।**

**तथापि त्वं महाबाहो नैवं शोचितुमर्हसि ॥२६॥**

**अन्वयः** - अथ, च, त्वम्, एनम्, नित्यजातम्, वा, नित्यम्, मृतम्, मन्यसे, तथापि, महाबाहो, (त्वम्) एवम्, शोचितुम्, न, अर्हसि।

**अन्वयार्थः** - **अथ च** - यानंतर जरी (आत्मा नित्य, अव्यक्त असे विस्तारपूर्वक वर्णन केलेले असूनही तरी) **त्वम्** - तू **एवम्** - या आत्म्याला **नित्यजातम्** - नित्य उत्पन्न होणारा **वा** - अथवा **नित्यम् मृतम्** - नित्य मरणारा **मन्यसे** - मानत असशील **तथापि** - तरीसुद्धा **महाबाहो** - हे महाबाहो! (**त्वम् -** तू ) **एवम्** - अशा रीतिने **शोचितुम्** - शोक करण्यास **न अर्हसि** - योग्य नाहीस.

**विवरण** - आतापर्यंतच्या वर्णनांत आत्म्याचे नित्यत्व, अविनाशित्व व निर्विकारत्व प्रतिपादन केलेले आहे, परंतु वास्तविक पाहिले तर अशा उपर्युक्त विशेषणांनी युक्त आत्मा मरणारा आणि जन्मणारा नाही. जरी शरीराचा नाश झाला की आत्मा मरतो आणि शरीर उत्पन्न झाले की आत्मा उत्पन्न होतो असा जन्मणारा आ णि मरणारा आत्मा तू मानलास तरी देखील तुला शोक करणे योग्य नाही.

**व्याकरणम्** - **अथ** - अथ आनन्तर्यार्थक अ. **च** - अ. **त्वम्** - युष्मत् सर्व.प्र.ए.व. **एनम्** - एतत् सर्व.पु. द्वि.ए.व. **नित्यजातम्** - नित्य वि. जन् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.द्वि.ए.व. **वा** - वा अ. **नित्यम्** - नित्य वि.पु.द्वि.ए.व. **मृतम्** - मृ न.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.द्वि.ए.व. **तथापि** - तथा+अपि क्रि.वि.अ. **महाबाहो** - महाबाहु पु.संबो.ए.व. **एवम्** - एवम् क्रि.वि.अ. **शोचितुम्** - शुच् प्र.ग.प.प.तुमन्त अ. **न** - न क्रि. वि.अ. **अर्हसि** - अर्ह् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **महाबाहो** - महान्तौ शत्रुविदारकौ बाहू-हस्तौ यस्य स महाबाहुस्तत्सम्बुद्धौ हे महाबाहो = मोठे शत्रुविदारक आहेत हात ज्याचे तो महाबाहु त्याचे संबोधनामध्ये हे महाबाहो**(ष.ब.स.)** **नित्यजातम्** -

नित्यं जात इति नित्यजातस्तं नित्यजातम् = नित्य उत्पन्न होणारा(झालेला) असा नित्यजात, असा त्यास नित्य उत्पन्न होणारा(झालेला)**(क.स.)**

जन्म-मृत्यु असे चक्र अपरिहार्य असताना त्याविषयी शोक करणे व्यर्थ आहे हे सांगतात -

**जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ।**

**तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥२७॥**

**अन्वयः -** हि, जातस्य, मृत्युः, ध्रुवः, च, मृतस्य, जन्म, ध्रुवम्, भवति, तस्मात्, अपरिहार्ये, अर्थे, त्वम्, शोचितुम्, न, अर्हसि ।

**अन्वयार्थः - हि -** कारण की **जातस्य** - उत्पन्न झालेल्याचा **मृत्युः** - मृत्यू **ध्रुवः**- निश्चित म्हणजे निःसंशय आहे **च** - आणि **मृतस्य** - मेलेल्याचा म्हणजे मृत झालेल्याचा **जन्म -** जन्म **ध्रुवम् (भवति) -** निश्चित होतो **तस्मात्** - म्हणून **अपरिहार्ये अर्थे** - न टाळता येणाऱ्या पदार्थाविषयी **त्वम्** - तू **शोचितुम् -** शोक करण्यास **न अर्हसि** - समर्थ नाहीस.

**विवरण -** कारण की, हे अर्जुना! जो जन्माला आला आहे त्याला केव्हा ना केव्हा मरण अवश्य आहे आणि जो मरण पावला आहे त्याला पुन्हा जन्म अवश्य आहे. अशा या नियमाचा भंग ईश्वरसुद्धा करू शकत नाही म्हणजेच जीवात्म्याचा जन्म आणि मृत्यू निश्चित आहे म्हणून अपरिहार्य म्हणजे न टाळता येणाऱ्या वस्तु विषयी शोक करणे तुला योग्य नाही.

**व्याकरणम् - हि** - हि क्रि.वि.अ. **जातस्य** - जन् च.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.पु.ष.ए.व. **मृत्युः** - मृ ष.ग.आ.प.+त्युक्=मृत्यु पु.प्र.ए.व. **ध्रुवः** - ध्रुव वि.पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **मृतस्य** - मृ न.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.ष.ए.व. **जन्म** - 'जनी प्रादुर्भावे' च.ग.आ.प.+मनिन्=जन्मन् न.प्र.ए.व. **ध्रुवम्** - ध्रुव वि.न.प्र.ए.व. **तस्मात्** - तत् सर्व.पु.पं.ए.व./अ. **अपरिहार्ये** - अ+परि+हृ प्र.ग.प.प. कर्म.ण्यत् वि.पु.स.ए.व. **अर्थे** - अर्थ पु.स.ए.व. **त्वम्** - युष्मत् सर्व.प्र.ए.व. **शोचितुम्** - शुच् प्र.ग.प.प.तुमन्त अ. **न** - न क्रि.वि.अ. **अर्हसि** - अर्ह् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अपरिहार्ये** - परिहर्तुम्-दूरीकर्तुं योग्यः परिहार्यः, न परिहार्य इत्यपरिहार्यस्तस्मिन्नपरिहार्ये = टाळता येण्यास-दूर करण्यास योग्य परिहार्य, नाही परिहार्य असे अपरिहार्य त्या न टाळता येणाऱ्या गोष्टी विषयी**(न.त.स.)**

जन्मापूर्वी व मध्ये असणाऱ्या अव्यक्त व व्यक्त आत्म्याचा मरणानंतर शोक न करण्याविषयी सांगतात -

**अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।**

**अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥२८॥**

**अन्वयः** - भारत, भूतानि, अव्यक्तादीनि, व्यक्तमध्यानि, अव्यक्तनिधनानि, एव, तत्र, का, परिदेवना ।

**अन्वयार्थः** - **भारत** - हे भरतकुलोत्पन्न अर्जुना! **भूतानि** - भूते **अव्यक्तादीनि** -जन्मापूर्वी अव्यक्त असतात **व्यक्तमध्यानि** - मध्ये तेवढी व्यक्त होतात **अव्यक्तनिधनानि एव** - आणि मरणानंतर ती पुन्हा दिसत नाहीत

**तत्र** - तर त्याविषयी **का परिदेवना** - शोक करण्याचे कारणच नाही.

**विवरण** - वास्तविक विचार करून पाहिले तर प्राणिमात्रांचा जन्माच्या पूर्वी वर्तमान स्थूल शरीराबरोबर संबंध नव्हता म्हणजे ते अव्यक्त होते आणि मरण पावल्यानंतर देखील स्थूल शरीराच्या बरोबर संबंध रहाणार नाही. त्यावेळी सुद्धा ते अव्यक्तच रहाणार होते, परंतु केवळ उत्पत्तिपासून मरणापर्यंत जी मध्ये अवस्था आहे त्यावेळी मात्र त्यांचा स्थूल शरीराबरोबर संबंध होता म्हणजे त्यावेळी ते व्यक्त होते. अशा या भ्रमाचा विषय होणाऱ्या आत्मीय स्वजनरूपी भूताविषयी तुला शोक करणे योग्य नाही.

**व्याकरणम्** - **भारत** - भारत पु.संबो.ए.व. **भूतानि** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.प्र.ब.व. **अव्यक्तादीनि** - अव्यक्त वि. आदि वि.न.प्र.ब.व. **अव्यक्तनिधनानि** - अव्यक्त वि. निधन न.प्र.ब.व. **एव** - एव क्रि. वि.अ. **व्यक्तमध्यानि** - व्यक्त वि. मध्य वि.न.प्र.ब.व. **तत्र** - तत्र क्रि.वि.अ. **का** - किम् सर्व.स्त्री.प्र.ए.व. **परिदेवना** - दिव् च.ग.प.प.+न+टाप्=परिदेवना स्त्री.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **व्यक्तमध्यानि** - सर्वं व्यञ्जयतीति व्यक्तम्-अन्त:करणं मध्ये स्थितिकाले येषां तानि व्यक्तमध्यानि = सर्वांचा जे प्रकाश करते ते व्यक्त-अंत:करण, ते स्थितिकालामध्ये ज्यांचे ते व्यक्तमध्य **(ब.स.)** **अव्यक्तनिधनानि** - अव्यक्ते-मायायां निधनम्-लयो येषां तान्यव्यक्तनिधनानि = अव्यक्तामध्ये-मायेमध्ये नाश-प्रलय ज्यांचा ते अव्यक्तनिधन-सूक्ष्मावस्था**(स.ग.ष.ब.स.)** यद्वा **अव्यक्तनिधनानि** - अव्यक्तम्-अदर्शनम्, निधनम्-मरणं येषां तान्यव्यक्तनिधनानि = अव्यक्त-अदर्शन निधन-मरण ज्यांचे ते अव्यक्तनिधन**(ष.ब.स.)** **अव्यक्तादीनि** - नामरूपगुणादिभिर्न व्यज्यत इत्यव्यक्तम्-माया तस्या: सकाशादा दिर्जन्म येषां तान्यव्यक्तादीनि = नाम, रूप आणि गुणादिकांनी जे प्रत्यक्ष होत नाही ते अव्यक्त म्हणजे माया, त्या अव्यक्तरूप मायेपासून आदि-जन्म ज्यांचा ते अव्यक्तादि**(ष.ब.स.)** यद्वा **अव्यक्तादीनि** - सर्वै: प्रमाणैर्न व्यज्यते-व्यक्तिकर्तुं न शक्यत इत्यव्यक्तं परं ब्रह्म, तदग्रहणादादिर्जन्म येषां तान्यव्यक्तादीनि = सर्व प्रमाणांच्या द्वारा जो अर्थ प्रगट केला जात नाही त्यास अव्यक्त असे म्हणतात; असे केवळ परब्रह्मच आहे त्या परब्रह्माच्या अज्ञानापासून ज्यांची उत्पत्ती होते ते सर्व अव्यक्तादि**(ष.ब.स.)**

आत्मतत्त्वाचा द्रष्टा, वक्ता आणि श्रोता यांच्या दुर्लभतेचे वर्णन -

**आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्य: ।**

**आश्चर्यवच्चैनमन्य: शृणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ॥२९॥**

**अन्वयः** - कश्चित्, आश्चर्यवत्, एनम्, पश्यति, च, तथा, एव, अन्य:, आश्चर्यवत्, वदति, च, अन्य:, एनम्, आश्चर्यवत्, शृणोति, कश्चित्, श्रुत्वा, अपि, न, वेद, एव।

**अन्वयार्थः** - **कश्चित्** - कोणी पुरुष **आश्चर्यवत्** - आश्चर्याप्रमाणे **एनम्** - या आत्म्याला **पश्यति** - पहातो **च** - आणि **तथा एव** - त्याचप्रमाणे **अन्य:** - दुसरा कोणी पुरुष **आश्चर्यवत्** - आश्चर्याप्रमाणे **वदति** - आत्म्या विषयी बोलतो **च** - आणि **अन्य:** - कोणी एखादा **एनम्** - याला **आश्चर्यवत्** - आश्चर्याप्रमाणे **शृणोति** - ऐकतो **कश्चित्** - कोणी तर **श्रुत्वा अपि** - पाहून वर्णन करून आणि श्रवण करून देखील **एनम्** - याला **न वेद एव** - जाणतच नाही.

**विवरण** - या श्लोकांत आत्म्याच्या दुर्लभतेबरोबर द्रष्टा, श्रोता आणि ज्ञाता इत्यादिकांच्या दुर्लभतेचे प्र

तिपादन करीत आहेत. ज्याप्रमाणे मनुष्य लौकिक दृश्यवस्तुचे दर्शन मन, बुद्धि आणि इंद्रियांच्या द्वारा करतो, परंतु आत्म्याचे दर्शन त्याप्रमाणे होत नाही कारण की आत्म्याला पहाण्याची रीती अद्भूत आणि अलौकिक आहे. कारण आत्मा स्वयं आपल्या द्वारा स्वत:ला पहातो. त्याच्या पहाण्यामध्ये दृष्टी, द्रष्टा आणि दर्शन रूपी त्रिपुटी रहातच नाही. अशा प्रकारचे पहाणे आश्चर्याप्रमाणेच आहे. साधारण मनुष्य लौकिक वस्तुप्रमाणे आत्म्याचे वर्णन करू शकत नाही. केवळ परमतत्त्वाला जाणणारा आणि वेदशास्त्रांचा वेत्ता पुरुषच त्याचे वर्णन करू शकतो. त्याचे ते वर्णनही आश्चर्याप्रमाणे आहे. दुसरा कोणी सदाचारी, शुद्धचित्त, श्रद्धायुक्त पुरुषच त्याचे श्रवण करतो; त्याचे श्रवण करणेही आश्चर्याप्रमाणेच आहे. म्हणजे पूर्वी शरीराला नित्य समजून व्यवहार करणारा पुरुष ज्यावेळी शास्त्रादिकाचे श्रवण करतो. त्या श्रवणापासून शरीर अनित्य आणि आत्मा नित्य आहे. असे त्याचे श्रवणही आश्चर्यकारक आहे. कोणी याचे श्रवण करूनही जाणत नाहीत, अशा प्रकारे आत्म्याचे पाहाणे, श्रवण करणे आणि जाणणे हे सर्व आश्चर्याप्रमाणेच आहे.

**व्याकरणम्** - **कश्चित्** - किम् सर्व.चित् प्रत्ययान्त पु.प्र.ए.व. **आश्चर्यवत्** - आ+चर् द.प.प.+ण्यत्,सुट्=आश्चर्य+वत्=आश्चर्यवत् न.प्र.ए.व. **एनम्** - एतत् सर्व.पु.द्वि.ए.व. **पश्यति** - दृश् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **तथा** - तथा क्रि.वि.अ. **एव** - एव अ. **अन्य:** - अन्य सर्व.पु.प्र.ए.व **एनम्** - एतत् सर्व.पु.द्वि.ए.व. **आश्चर्यवत्** - आश्चर्यवत् न.प्र.ए.व. **वदति** - वद् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **अन्य:** - अन्य सर्व.पु.प्र.ए.व. **एनम्** - एतत् सर्व.पु. द्वि.ए.व. **आश्चर्यवत्** - आश्चर्यवत् वत्प्रत्ययान्त न.प्र.ए.व. **शृणोति** - श्रु प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **कश्चित्** - किम् सर्व.चित् प्रत्ययान्त पु.प्र.ए.व. **श्रुत्वा** - श्रु पं.ग.प.प.त्वान्त अ. **एव** - एव क्रि.वि.अ. **वेद** - विद् द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **आश्चर्यवत्** - आश्चर्यमदृष्टपूर्वमद्भुतमकस्माद् दृश्यमानं तेन तुल्यमाश्चर्यवत् = जे पाहिले नाही ते पाहिले गेले अकस्मात दृष्टीगोचर झाले अशा अद्भुत पदार्थाचे नाव आश्चर्य आणि त्याच्यासारख्या पदार्थाचे नाव आश्चर्यवत्**(त.वि.)**

आत्मतत्त्व सर्व प्रकारांनी बंधरहित असल्याने कोणत्याही प्राण्याविषयी शोक करण्याचा निषेध -

**देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ।**

**तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ॥३०॥**

**अन्वय:** - भारत, अयम्, देही, सर्वस्य, देहे, नित्यम्, अवध्य:, तस्मात्, सर्वाणि, भूतानि, त्वम्, शोचितुम्, न, अर्हसि ।

**अन्वयार्थ:** - **भारत** - हे भरतकुलोत्पन्न अर्जुना! **अयम्, देही** - हा देहवान आत्मा **सर्वस्य देहे** - सर्व प्राण्यांच्या देहांत **नित्यम्** - सर्वदा **अवध्य:** - अवध्य आहे **तस्मात्** - म्हणून **सर्वाणि भूतानि** - संपूर्ण प्राण्यां विषयी **त्वम्** - तूं **शोचितुम्** - शोक करण्यास **न अर्हसि** - समर्थ नाहीस.

**विवरण** - वस्तुत: पाहिले तर अज्ञानामुळे शरीराच्या भेदाने आत्म्याचा भेद प्रतीत होतो. वास्तविक भेद नाही कारण की आत्मा संपूर्ण प्राणिमात्रांच्या शरीरात अवध्य आहे. अशा अवध्य आत्म्याचा कोणत्याही साधनाच्याद्वारा कोणीही त्याचा नाश करू शकत नाही. असा हा नित्य, निर्विकार आणि अवध्य आत्मा

आहे. यास्तव तुला कोणत्याही प्राण्याविषयी शोक करणे योग्य नाही.

**व्याकरणम् - भारत** - भारत पु.संबो.ए.व. **अयम्** - इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **देही** - देहिन् पु.प्र.ए.व. **सर्वस्य -** सर्व सर्व.पु.ष.ए.व. **देहे** - देह पु.स.ए.व. **नित्यम्** - नित्य वि.न.प्र.ए.व. **अवध्य:** - अ+हन्-वध् द्वि.ग.प.प.कर्म.ण्यत् वि.पु.प्र.ए.व. **तस्मात्** - तत् सर्व.पु.पं.ए.व./अ. **सर्वाणि** - सर्व सर्व.न.द्वि.ब.व. **भूतानि** - भू प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.द्वि.ब.व. **त्वम्** - युष्मत् सर्व.प्र.ए.व. **शोचितुम्** - शुच् प्र.ग.प.प.तुमन्त अ. **न** - न क्रि.वि.अ. **अर्हसि** - अर्ह् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अवध्य: -** वधितुं योग्य इति वध्यो न वध्य इत्यवध्य: = वध करण्यास योग्य असा वध्य, नाही वध्य असा अवध्य**(न.त.स.) देही** - सर्वे देहा उपलब्धिस्थानत्वेनाऽस्य सन्तीति देही = संपूर्ण देह आत्म्याच्या उपलब्धिचे स्थान आहेत असा आत्मा-देही**(वि.)**

अर्जुनाला क्षत्रियधर्म दाखवून त्याच्या त्यागाविषयी अयोग्यता सांगतात -

**स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकम्पितुमर्हसि ।**

**धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ॥३१॥**

**अन्वय: -** च, स्वधर्मम्, अवेक्ष्य, अपि, विकम्पितुम्, न, अर्हसि, हि, क्षत्रियस्य, धर्म्यात्, युद्धात्, अन्यत्, श्रेय:, न, विद्यते ।

**अन्वयार्थ: - च** - आणि **स्वधर्मम् -** आपल्या युद्धरूपी स्वधर्माला **अवेक्ष्य अपि -** पाहूनही **विकम्पितुम्** - व्याकूळ होण्यास **न अर्हसि** - तू योग्य नाहीस **हि** - कारण की **क्षत्रियस्य -** क्षत्रियाला **धर्म्यात्** - कर्तव्यप्राप्त **युद्धात्** - युद्धापेक्षा **अन्यत्** - दुसरे काही **श्रेय:** - हितकर **न विद्यते** - होत नाही.

**विवरण** - हे अर्जुना! आत्मा नित्य आणि शरीर अनित्य असा निर्णय झाल्यानंतर शोक करणे आणि युद्धापासून परावृत्त होणे तुला उचित नाही; कारण की ज्या युद्धाचा आरंभ अनीति वा लोभाच्या कारणामुळे झालेला नाही, जे युद्ध अन्यायाने युक्त नाही, असे जे धर्मसंगत, कर्तव्यरूपाने प्राप्त तथा न्यायानुकूल युद्ध क्षत्रियाकरिता अन्य समस्त धर्मांपेक्षा अधिक कल्याणकारक आहे; कारण की, क्षत्रियाला धर्मरूप युद्धाहून अन्य काहीही कल्याणकारक नाही.

**व्याकरणम् - च** - च उभ.अ. **स्वधर्मम् -** स्व वि. धर्म पु.द्वि.ए.व. **अवेक्ष्य** - अव+ईक्ष् प्र.ग.आ.प.ल्यबन्त अ. **अपि** - अपि अ. **विकम्पितुम्** - वि+कम्प् प्र.ग.आ.प.तुमन्त अ. **न** - न क्रि.वि.अ. **अर्हसि -** अर्ह् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.द्वि.पु.ए.व. **हि** - हि क्रि.वि.अ. **क्षत्रियस्य** - क्षत्रिय पु.ष.ए.व. **धर्म्यात्** - धर्म+यत्=धर्म्य वि.न.पं.ए.व. **युद्धात्** - युद्ध न.पं.ए.व. **अन्यत्** - अन्य सर्व.न.प्र.ए.व. **श्रेय:** - श्रेयस् न.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **विद्यते** - विद् च.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **स्वधर्मम्** - स्वस्य धर्म इति स्वधर्मस्तं स्वधर्मम् = स्वत:चा धर्म असा स्वधर्म त्या स्वधर्माला**(ष.त.स.) धर्म्यात् -** धर्मादनपेतं धर्म्यं तस्माद् धर्म्यात् = धर्मापासून न ढळलेले ते धर्म्य **(अनपेतार्थे त.वि.)**

स्वर्गाचे द्वार असलेल्या या धर्मयुद्धातून परावृत्त न होण्यातच क्षत्रियाचे क्षत्रियत्व आहे असे सांगतात

-

**यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम्।**

**सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभन्ते युद्धमीदृशम्॥३२॥**

**अन्वयः -** च, पार्थ, यदृच्छया, उपपन्नम्, अपावृतम्, स्वर्गद्वारम्, ईदृशम्, युद्धम्, सुखिनः, क्षत्रियाः, लभन्ते।

**अन्वयार्थः - च** - आणि **पार्थ** - हे अर्जुना! **यदृच्छया** - सहजगत्या **उपपन्नम्** - प्राप्त झालेले **अपावृतम्** - उघडलेले **स्वर्गद्वारम्** - स्वर्गाचे द्वार **ईदृशम्** - अशा प्रकारचे हे **युद्धम् -** युद्ध **सुखिनः** - मोठ्या भाग्यशाली **क्षत्रियाः -** क्षत्रियांना **लभन्ते** - प्राप्त होते.

**विवरण -** अशा प्रकारचे सहजा-सहजी म्हणजे सायासाविना प्राप्त झालेले हे धर्मयुद्ध म्हणजे उघडलेले स्वर्गाचे द्वारच आहे, असे धर्मयुद्ध मोठ्या भाग्यशाली क्षत्रियांनाच प्राप्त होते. म्हणून तूं मोठा भाग्यवान आ-हेस अशा धर्मरूपी युद्धापासून कदापि परावृत्त होऊ नकोस; कारण अशा युध्दापासून परावृत्त न होण्यामध्येच क्षत्रियाचे क्षत्रियत्व आहे.

**व्याकरणम् - च** - च उभ.अ. **पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **यदृच्छया** - यदृच्छा स्त्री.तृ.ए.व. **उपपन्नम् -** उप+पद् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.न.द्वि.ए.व. **अपावृतम्** - अप+आ+वृ पं.ग.उ.भ.कर्म.भू.धा.वि.न. द्वि.ए.व. **स्वर्गद्वारम्** - स्वर्ग पु.वि. द्वार न.द्वि.ए.व. **ईदृशम्** - ईदृश न.द्वि.ए.व. **युद्धम्** - युध् च.ग.आ.प.भावे.भू.धा.वि.न.द्वि.ए.व. **सुखिनः** - सुखिन् पु.प्र.ब.व. **क्षत्रियाः** - क्षत्रिय पु.प्र.ब.व. **लभन्ते** - लभ् प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **स्वर्गद्वारम् -** स्वर्गस्य द्वारमिति स्वर्गद्वारम् = स्वर्गाचे द्वार असे स्वर्गद्वार(**ष.त.स.**) **सुखिनः -** सुखमस्ति येषां ते सुखिनः = सुख आहे ज्यांचे ते सुखी-भाग्यवान(**ष.त.स.**)

या कर्तव्यप्राप्त युद्धाला सोडशील तर स्वधर्म आणि कीर्तिला मुकून पापास प्राप्त होशील -

**अथ चेत्त्वमिमं धर्म्यं सङ्ग्रामं न करिष्यसि।**

**ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि॥३३॥**

**अन्वयः -** अथ, चेत्, त्वम्, इमम्, धर्म्यम्, सङ्ग्रामम्, न, करिष्यसि, ततः, स्वधर्मम्, च, कीर्तिम्, हित्वा, पापम्, अवाप्स्यसि।

**अन्वयार्थः** - **अथ** - यानंतर **चेत्** - जर **त्वम् -** तू **इमम् धर्म्यम् सङ्ग्रामम्** - या कर्तव्य प्राप्त युद्धाला **न करिष्यसि** - न करशील **ततः** - तर **स्वधर्मम्** - स्वधर्म **च** - आणि **कीर्तिम्** - कीर्ती या दोन्हींनाही **हित्वा** - त्यागून(मुकून) **पापम् -** पापाला **अवाप्स्यसि** - प्राप्त होशील.

**विवरण** - हे अर्जुना! तुझा क्षत्रियांचा धर्म आहे युद्ध करणे आणि त्याशिवाय युद्ध धर्ममय असल्यामुळे अवश्य कर्तव्य आहे. अशा या स्वधर्मरूपी युद्धाचा परित्याग करून समरंगणातून परावृत्त होशील तर तूं आपल्या स्वधर्माला मुकशील आणि पापाला प्राप्त होशील. दुसरे असे की निवातकवचादि दानवांच्या बरोबर युद्ध करून तूं विजय प्राप्त केलेला आहेस. अशा प्रकारे तुझी कीर्ति त्रैलोक्यामध्ये विस्ताररूपाने पसर-

लेली आहे. त्या कीर्तिचा सुद्धा तू युद्धापासून परावृत्त झालास तर नाश होईल व तू पापाला प्राप्त होशील.

**व्याकरणम् - अथ** - अथ क्रि.वि.अ. **चेत्** - चेत् उभ.अ. **त्वम् -** युष्मत् सर्व.प्र.ए.व. **इमम् -** इदम् सर्व.पु. द्वि.ए.व. **धर्म्यम्** - धर्म+यत्=धर्म्य वि.पु.द्वि.ए.व. **सङ्ग्रामम्** - संग्राम पु.द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **करिष्यसि** - कृ अ.ग.उ.प.(प.प.)कर्त.लृट् द्वि.भ.द्वि.पु.ए.व. **ततः** - तद् सर्व.+तसिल्=ततस् तसिल् प्रत्ययान्त पञ्चम्यन्त तद्धि.अ. **स्वधर्मम्** - स्व वि. धर्म पु.द्वि.ए.व. **च -** च उभ.अ. **कीर्तिम्** - कीर्ति स्त्री. द्वि.ए.व. **हित्वा** - हा तृ.ग.प.प.त्वान्त अ. **पापम् -** पाप न.द्वि.ए.व. **अवाप्स्यसि** - अव+आप् पं.ग.प.प.कर्त.लृट् द्वि.भवि.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - धर्म्यम्** - धर्मादनपेतमिति धर्म्यम् = धर्मापासून बाहेर न गेलेले-धर्माने युक्त**(अनपेतार्थे त.वि.) स्वधर्मम्** - स्वस्य धर्मः स्वधर्मस्तं स्वधर्मम् = स्वतःचा धर्म स्वधर्म त्या स्वधर्माला**(ष.त.स.)**

तुझ्या या युद्ध न करण्याच्या विचाराने मरणापेक्षा अधिक दुःखदायी अशी दुष्कीर्ति होईल म्हणजे दुष्कीर्तिपेक्षा मरण चांगले -

**अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यन्ति तेऽव्ययाम् ।**

**सम्भावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥३४॥**

**अन्वयः** - च, भूतानि, ते, अव्ययाम्, अकीर्तिम्, अपि, कथयिष्यन्ति, च, सम्भावितस्य, अकीर्तिः, मरणात्, अतिरिच्यते ।

**अन्वयार्थः - च** - आणि **भूतानि** - सर्वलोक **ते** - तुझी **अव्ययाम्** - अक्षय **अकीर्तिम् अपि** - अपकीर्तिही **कथयिष्यन्ति** - सांगत राहातील **च** - आणि **संभावितस्य** - माननीय पुरुषाला **अकीर्तिः** - दुष्कीर्ति **मरणात्** - मरणापेक्षा **अतिरिच्यते -** अधिक दुःखदायक वाटते.

**विवरण** - केवळ स्वधर्म आणि कीर्तिचा नाश होईल आणि तुला पाप लागेल एवढेच नाही, तर सर्वलोक दीर्घकाळपर्यंत तुझी अपकीर्तिही सांगत राहतील. कदाचित तू म्हणशील की, 'अपकीर्ति होण्यामध्ये काय हानी आहे?' तर हे तुझे कथन करणेही व्यर्थ आहे; कारण की, जे संसारामध्ये माननीय तथा श्रेष्ठ पुरुष असतात त्यांना त्यांची अपकीर्ती मरणाहूनही अधिक मारक वाटते. तुझीसुद्धा शूरवीर आणि मान्य पुरुष म्हणून भुवनत्रयामध्ये प्रतिष्ठा झालेली आहे म्हणून तुलासुद्धा अपकीर्ति त्याचप्रमाणे प्रतीत व्हावयाला पाहिजे म्हणजे अधिक कष्टदायक वाटायला पाहिजे.

**व्याकरणम् - च** - च उभ.अ. **भूतानि** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.प्र.ब.व. **ते** - युष्मत् सर्व.ष.ए.व. **अव्ययाम्** - अव्यया वि.स्त्री.द्वि.ए.व. **अकीर्तिम्** - अ+कीर्ति स्त्री.द्वि.ए.व. **अपि** - अपि अ. **कथयिष्यन्ति** - कथ् द.ग.उ.प.(प.प.)द्वि.भ.तृ.पु.ब.व. **च** - च उभ.अ. **सम्भावितस्य** - सम्+भू प्र.ग.प.प.+ णिच्+कर्म.क्त=सम्भावित वि.पु.ष.ए.व. **अकीर्तिः** - अ+कीर्ति स्त्री.प्र.ए.व. **मरणात्** - मरण न.पं.ए.व. **अतिरिच्यते** - अति+रिच् प्र.ग.प.प./द.ग.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अव्ययाम्** - न विद्यते नाशो यस्याः सा अव्यया तामव्ययाम् = नाही नाश जिचा ती अव्यया त्या अव्ययाला**(न.ब.स.) अकीर्तिः** - न कीर्तिरित्यकीर्तिः = नाही कीर्ति अशी अकीर्ति **(न.त.स.)**

या अपकीर्तिमुळे तुझा मोठेपणा जाईल व दुर्योधनादि वीर तुला 'अर्जुन युद्धापासून पळून गेला' असे म्हणतील -

**भयाद्रणादुपरतं मंस्यन्ते त्वां महारथाः ।**

**येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥३५॥**

**अन्वयः** - च, येषाम्, त्वम्, बहुमतः, भूत्वा, लाघवम्, यास्यसि,(ते) महारथाः, त्वाम्, भयात्, रणात्, उपरतम्, मंस्यन्ते ।

**अन्वयार्थः - च** - आणि **येषाम्** - ज्यांना **त्वम्** - तू पूर्वी **बहुमतः** - फार मोठा **भूत्वा** - मान्य होऊन पुन्हा या वेळेला तूं **लाघवम्** - लघुत्वास **यास्यसि** - प्राप्त होशील **महारथाः** - (**ते** - ते सर्व) दुर्योधनादिक वीर **त्वाम्** - तुला **भयात्** - भीतीने **रणात्** - युद्धातून **उपरतम्** - परत गेलेला **मंस्यन्ते** - समजतील.

**विवरण** - युद्धामध्ये आलेले भीष्मद्रोणादिक पुष्कळसे आत्मीय जन तुलां शूरवीर, महान योद्धा आणि धर्मात्मा समजत आहेत, परंतु तू जर युद्धाचा त्याग करून परत जाशील तर ते तुला भित्रा समजून तुच्छ लेखतील; एवढेच नव्हे, तर यासाठी अशा समयाला तुला युद्ध न करणे उचित नाही. दुर्योधनादि शूरांचा उपहास दूर करण्याकरिता तुला युद्ध करणेच अनिवार्य व आवश्यक आहे.

**व्याकरणम्** - **च** - च उ.अ. **येषाम्** - यत् सर्व.पु.ष.ब.व. **त्वम्** - युष्मत् सर्व.प्र.ए.व. **बहुमतः** - बहु वि.मन् च.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **भूत्वा** - भू प्र.ग.प.प.त्वान्त अ. **लाघवम्** - लघु+अण्=लाघव न.द्वि.ए.व. **यास्यसि** - या द्वि.ग.प.प.लृट् द्वि.भ.द्वि.पु.ए.व. **महारथाः** - महारथ पु.प्र.ब.व. **त्वाम्** - युष्मत् सर्व.द्वि.ए.व. **भयात्** - भय न.पं.ए.व. **रणात्** - रण न.पं.ए.व. **उपरतम्** - उप+रम् प्र.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.द्वि.ए.व. **मंस्यन्ते** - मन् च.ग.आ.प.लृट् द्वि.भ.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **बहुमतः** - बहुभिर्गुणैः-शौर्यधैर्ययुद्धचातुर्यादिगुणैरुत्कृष्टोऽयमर्जुन इत्येवं बहुमतः = अनेक गुणांनी-शौर्य, धैर्य, युद्धचातुर्यादिक गुणांनी श्रेष्ठ असा हा अर्जुन, असेच पूर्वी बहुमत मानला गेला म्हणून बहुमत**(तृ.त.स.) लाघवम्** - लघोर्भावो लाघवम् = लघुचा भाव लाघव किंवा तिरस्कार**(भावार्थे त.वि.)**

शत्रू तुझ्या सामर्थ्याची निंदा करून अवाच्य शब्द बोलतील असे सांगतात -

**अवाच्यवादांश्च बहून्वदिष्यन्ति तवाहिताः ।**

**निन्दन्तस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ॥३६॥**

**अन्वयः** - तव, सामर्थ्यम्, निन्दन्तः, च, तव, अहिताः, बहून्, अवाच्यवादान्, वदिष्यन्ति, ततः, दुःखतरम्, किम्, नु ।

**अन्वयार्थः** - **तव** - तुझ्या **सामर्थ्यम्** - सामर्थ्याला **निन्दन्तः** - निंदणारे **च** - आणि **तव** - तुझे **अहिताः** - शत्रुलोक **बहून्** - पुष्कळ **अवाच्यवादान्** - तुझ्याविषयी अवाच्य शब्द **वदिष्यन्ति** - बोलतील **ततः** - त्यापेक्षा **दुःखतरम्** - अधिक दुःखदायक **किम् नु** - काय आहे?

**विवरण** - दुर्योधनादि शत्रू तुझ्या सामर्थ्याची निंदा करतील आणि बोलण्यास अयोग्य असे अवाच्य शब्द बोलतील; कारण की, निंदा ही माननीय पुरुषांकरिता अधिक दुःखदायिनी असते आणि तूं तर मान्यता युक्त

पुरुष आहेस.

**व्याकरणम्** - **तव** - युष्मत् सर्व.ष.ए.व. **सामर्थ्यम्** - सामर्थ्य न.द्वि.ए.व. **निन्दन्तः** - निन्द् प्र.ग.प.प.कर्त.शतृ=निन्दत् पु.प्र.ब.व. **च** - च उभ.अ. **तव** - युष्मत् सर्व.ष.ए.व. **अहिताः** - अ+धा तृ.ग.उ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **बहून्** - बहु वि.पु.द्वि.ब.व. **अवाच्यवादान्** -अ+वच् द्वि.ग.प.प.कर्म. विध्यर्थ धा.वि. वाद पु.द्वि.ब.व. **वदिष्यन्ति** - वद् द्वि.ग.प.प.कर्त.लृट् द्वि.भ.तृ.पु.ब.व. **ततः** - तसिल् प्रत्ययान्त पञ्चम्यन्त त.अ. **दुःखतरम्** - दुःखतर तद्धित तरप् प्रत्ययान्त न.प्र.ए.व. **नु** - नु अ. **किम्** - किम् क्रि.वि.अ.

**समासविग्रहार्थाः** - **अहिताः** - न हिता इत्यहिताः (दुर्योधनादिकाः) = नाही हित करणारे असे अहित (दुर्यो धनादिक)**(न.त.स.) अवाच्यवादान्** - वक्तुं योग्या इति वाच्याः, न वाच्या इत्यवाच्याः, अवाच्याश्च ते वादाश्च-शब्दाश्च अवाच्यवादास्तान्, अवाच्यवादान् = बोलण्यास योग्य असे वाच्य, नाही वाच्य असे अवाच्य, ते अवाच्यवाद त्या अवाच्य शब्द बोलणाऱ्यांना**(न.त.ग.क.स.) दुःखतरम्** - अतिशयेन दुःखमि ति दुःखतरम् = अतिशयाने दुःख असे दुःखतर**(अतिशयार्थे त.वि.) निन्दन्तः** - निन्दन्तीति निन्दन्तः = निंदा करतात असे निंदा करणारे**(कृ.वि.) सामर्थ्यम्** - समर्थस्य भावः सामर्थ्यम् = समर्थाचा भाव असणे सामर्थ्य **(त.वि.)**

पराजयाने स्वर्गप्राप्ती व जिंकल्याने पृथ्वीचे साम्राज्य सांगून अर्जुनास युद्धाकरिता तयार होण्याची आज्ञा -

**हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम्।**

**तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः ॥३७॥**

**अन्वयः** - हतः, स्वर्गम्, प्राप्स्यसि, वा, जित्वा, महीम्, भोक्ष्यसे, वा, तस्मात्, कौन्तेय, युद्धाय, कृत निश्चयः, उत्तिष्ठ।

**अन्वयार्थः** - **हतः** - संग्रामात शत्रुकडून मारला गेलास तर **स्वर्गम्** - स्वर्गाला **प्राप्स्यसि** - प्राप्त होशील **वा** - अथवा **जित्वा** - जय मिळविला तर **महीम् भोक्ष्यसे वा** - पृथ्वीवरचे राज्य उपभोगशील **तस्मात्** - म्हणून **कौन्तेय** - हे कुन्तीपुत्र अर्जुना! **युद्धाय** - युद्ध करण्याकरिता **कृतनिश्चयः** - दृढ निश्चय करून **उत्तिष्ठ** - उभा रहा.

**विवरण** - सहाव्या श्लोकामध्ये अर्जुनाने सांगितले होते की, युद्धामध्ये आमचा विजय होणार की शत्रुचा विजय होणार, याचा निर्णय मी करू शकत नाही. या प्रश्नाचेच उत्तर भगवान देतात की, हे अर्जुना! दोन्ही दृष्टीने तुला युद्ध करणे श्रेयस्कर आहे; कारण की, युद्धामध्ये जरी मारला गेलास तरी स्वर्गाला प्राप्त होशील व दुर्योधनादि शत्रुंना जिंकशील तर पृथ्वीवरचे राज्य उपभोगशील; म्हणजे जय झाला तरी आणि पराजय झाला तरी तुला लाभच होणार आहे. त्याकरिता तू स्वधर्मरूप युद्ध करण्यासाठी दृढनिश्चय करून उभा रहा.

**व्याकरणम्** - **वा** - वा उभ.अ. **हतः** - हन् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **स्वर्गम्** - स्वर्ग पु.द्वि.ए.व. **प्राप्स्यसि** - प्र+आप् पं.ग.प.प.कर्त.लृट् द्वि.भ.द्वि.पु.ए.व. **वा** - वा उभ.अ. **जित्वा** - जि प्र.ग.प.प.त्वान्त अ. **महीम्** - मही स्त्री.द्वि.ए.व. **भोक्ष्यसे** - भुज् स.ग.उ.प.(आ.प.) कर्त.लृट् द्वि.भ.द्वि.पु.ए.व. **तस्मात्** -

तत् सर्व.पु.पं.ए.व./अ. **कौन्तेय** - कौन्तेय पु.संबो.ए.व. **युद्धाय** - युध् च.ग.आ.प.+कर्म.क्त=युद्ध न.च.ए.व. **कृतनिश्चयः -** कृत कृ अ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि. निश्चय पु.प्र.ए.व. **उत्तिष्ठ** - उद्+स्था प्र.ग.प.प.कर्त.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **कृतनिश्चयः** - कृतो निश्चयो येन स कृतनिश्चयः = केला निश्चय ज्याने तो कृतनिश्चय **(तृ.ब.स.)**

सुख-दुःख, लाभ-हानी, जय-पराजय समान मानून युद्धास तयार राहण्याची आज्ञा -

**सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।**

**ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥३८॥**

**अन्वयः** - सुखदुःखे, जयाजयौ, लाभालाभौ, समे, कृत्वा, ततः, युद्धाय, युज्यस्व, एवम्, पापम्, न, अवाप्स्यसि ।

**अन्वयार्थः** - **सुखदुःखे** - सुख आणि दुःख या दोघांना त्याप्रमाणे **जयाजयौ** - जय आणि पराजय **लाभालाभौ** - लाभ आणि हानी **समे** - समान **कृत्वा** - करून(मानून) **ततः -** त्यानंतर **युद्धाय** - युद्धाला **युज्यस्व** - सज्ज हो **एवम्** - अशा प्रकारे अथवा (असे केले असता) **पापम्** - तुला पाप **न अवाप्स्यसि** - लागणार नाही.

**विवरण** - कदाचित तुला राज्यसुख आणि स्वर्गाची इच्छाही नसेल तरीपण युद्धामध्ये होत असलेल्या विषम भावाचा सर्वथा त्याग करून उपर्युक्त प्रकाराने युद्धामध्ये जय-पराजय, राग-द्वेष, हर्ष-शोक, सुख-दुःख या प रिणामाला समान मानून तूं युद्धाकरिता तयार हो; असे धर्मयुक्त युद्ध तूं केले तर तुला पाप लागणार नाही व दुसरे म्हणजे तू परम शान्तिला प्राप्त होशील.

**व्याकरणम्** - **सुखदुःखे** - सुख न. दुःख न.द्वि.द्वि.व. **च** - च उभ.अ. **जयाजयौ** - जय पु. अजय पु.द्वि. द्वि.व. **लाभालाभौ** - लाभ पु. अलाभ पु. द्वि.द्वि.व. **समे** - सम वि.तिन्ही लिङ्गामध्ये द्वि.द्वि.व. **कृत्वा** - कृ अ.ग.उ.प.त्वान्त अ. **ततः**- ततस् तद्+तसिल्=ततस् तसिल् प्रत्ययान्त पञ्चम्यन्त त.अ. **युद्धाय** - युद्ध न.च.ए.व. **युज्यस्व** - युज् च.ग.आ.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **एवम्** - एवम् क्रि.वि.अ. **पापम्** - पाप न. द्वि.ए.व. **न** - न.क्रि.वि.अ. **अवाप्स्यसि** - अव+आप् पं.ग.प.प.कर्त.लृट् द्वि.भ.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **सुखःदुखे** - सुखं च दुःखं च सुखदुःखे = सुख आणि दुःख सुखदुःख**(द्वं.स.)** **लाभालाभौ** - लाभश्च अलाभश्च लाभालाभौ = लाभ आणि अलाभ लाभालाभ**(द्व.स.)** **जयाजयौ** - जयश्च अजश्चय जयाजयौ = जय आणि अजय जयाजय **(द्वं.स.)**

कर्मबंधनाला तोडण्यास कारण असणाऱ्या कर्मयोगविषयक सुबुद्धिचे वर्णन करण्याची प्रतिज्ञा -

**एषा तेऽभिहिता साङ्ख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु ।**

**बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबन्धं प्रहास्यसि ॥३९॥**

**अन्वयः** - एषा, साङ्ख्ये, बुद्धिः, ते, अभिहिता, तु, योगे, इमाम्, शृणु, पार्थ, यया, बुद्ध्या, युक्तः, कर्मबन्धम्, प्रहास्यसि ।

**अन्वयार्थः** - **एषा** - याप्रमाणे ही **साङ्ख्ये** - सांख्यविषयक **बुद्धिः** - बुद्धि **ते** - तुला **अभिहिता** - सांगितली **तु** - परंतु या समयाला **योगे** - कर्मयोगविषयक **इमाम्** - ही बुद्धि **शृणु** - ऐक **पार्थ** - हे अर्जुना! **यया बुद्ध्या युक्तः** - ज्या योगबुद्धिने युक्त असलेला तूं **कर्मबन्धम्** - कर्मबन्धनापासून **प्रहास्यसि** - मुक्त होशील.

**विवरण** - दुसऱ्या अध्यायाच्या बाराव्या श्लोकापासून तिसाव्या श्लोकापर्यंत भगवन्ताने आत्म्याच्या यथार्थ स्वरूपाचे वर्णन केलेले आहे. आत्म्याच्या यथार्थ स्वरूपाचे ज्याला ज्ञान नाही त्याला समस्त पदार्थामध्ये विषमभाव दिसू लागतो आणि ज्याला यथार्थ स्वरूपाचे ज्ञान आहे त्याच्या ठिकाणी आत्मा आणि परमात्म्याचा वास्तविक भेदच रहात नाही. म्हणजे एकाच ब्रह्माहून भिन्न कोणाची सत्ता नाही, अशी त्याच्या ठिकाणी अभेद बुद्धि झालेली असते, म्हणजेच सर्वत्र समान भाव झालेला असतो; असा जो उपदेश तो ज्ञान योगाविषयी सांगितलेला आहे. यानंतर एकविसाव्या श्लोकापासून तर अडतिसाव्या श्लोकापर्यंत युद्धाची श्रेष्ठता सांगून कोणत्याही प्रकाराने तुला युद्ध करणे आवश्यक आहे असा व्यावहारिक तथा लौकिक सिद्धान्त सांगून एकोणचाळीसाव्या श्लोकांत भगवंत स्वतः कर्मयोगाची बुद्धि सांगतात. जन्मजन्मांतरात केलेल्या शुभाशुभ कर्मसंस्काराच्या द्वारा जीव बांधला जातो म्हणून कर्माच्या ठिकाणी असलेली ममता, आसक्ति आ णि फलेच्छेचा त्याग करून तथा सिद्धि आणि असिद्धिमध्ये समभाव करून राग-द्वेष आणि हर्ष-शोक आदि विकारांपासून निवृत्त होवून योगबुद्धिने युक्त झालास म्हणजे तू सहजरीत्या कर्मबंधनापासून निवृत्त होशील.

**व्याकरणम्** - **एषा** - एतत् सर्व.स्त्री.प्र.ए.व. **साङ्ख्ये** - संख्या+अण्=सांख्य वि.पु.स.ए.व. **बुद्धिः** - बुध्+ क्तिन्=बुद्धि स्त्री.प्र.ए.व. **ते** - युष्मत् सर्व.च.ए.व. **अभिहिता** - अभि+धा तृ.ग.उ.प.कर्म.भू.धा. वि.स्त्री.प्र.ए.व. **तु** - तु उभ.अ. **योगे** - योग पु.स.ए.व. **इमाम्** - इदम् सर्व.स्त्री.द्वि.ए.व. **शृणु** - (श्रुवः शृ च ३।१।७४) श्रु प्र.ग.प.प.कर्त. आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **यया** - यत् सर्व.स्त्री.तृ.ए.व. **बुद्ध्या** - बुद्धि स्त्री.तृ.ए.व. **युक्तः** - युज् स.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **कर्मबन्धम्** - कर्मन् न. बन्ध पु.द्वि.ए.व. **प्रहास्यसि** -प्र+हा तृ.ग.प.प.कर्त.लृट् द्वि.भ.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **कर्मबन्धम्** - कर्म एव बन्ध इति कर्मबन्धस्तं कर्मबन्धम् = कर्मच बन्ध असा कर्मबन्ध, त्या कर्मबन्धाला(**क.स.**) यद्वा **कर्मबन्धम्** - जन्ममृत्युजरादिभिः पुनः पुनः पुरुषं बध्नातीति कर्मबन्धस्तं कर्मबन्धम् = जन्ममृत्युजरादिकांनी पुन्हा पुन्हा पुरुष बांधला जातो असा कर्मबन्ध त्या कर्मबन्धाला **(तृ.त.स.)** **साङ्ख्ये** - सम्यक् ख्यातम्-ज्ञानमिति सङ्ख्या, सङ्ख्या एव साङ्ख्यम्, तस्मिन् साङ्ख्ये = चांगले सांगितल्या जाते ज्ञान असे सङ्ख्या, सङ्ख्या एव साङ्ख्या त्या साङ्ख्यामध्ये-आत्मानात्म विचारामध्ये**(वि.)** यद्वा **साङ्ख्ये** - ब्रह्मविद्भिः-ऋषिभिः सम्यक् ख्यायते पठ्यत इति सङ्ख्या-परविद्या तया सङ्ख्यया 'यत्तदद्रेश्यमग्राह्यमित्यादिना प्रतिपाद्यत इति साङ्ख्यम्-निर्विशेषं परं ब्रह्म तस्मिन् साङ्ख्ये-ब्रह्मणि विषये = ब्रह्मवित् अथवा ऋषिच्या द्वारा जे चांगले अध्ययन केले जाते असे सांख्य-परविद्या 'यत्तदद्रेश्यमग्राह्यम्-जे पाहणे योग्य नाही, जे ग्रहणयोग्य नाही' इत्यादि वचनद्वारा जे प्रतिपादन केले जाते ते सांख्य-निर्विशेष परब्रह्म त्या परब्रह्माविषयी**(तृ.त.स.)**

कर्मयोगाच्या महत्वाचे वर्णन -

**नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते।**

**स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥४०॥**

**अन्वयः** - इह, अभिक्रमनाशः, न, अस्ति, प्रत्यवायः, न, विद्यते, अस्य, धर्मस्य, स्वल्पम्, अपि, महतः, भयात्, त्रायते।

**अन्वयार्थः - इह** - या निष्काम कर्मयोगात **अभिक्रमनाशः** - आरंभ केलेल्या कर्माचा नाश **न अस्ति** - होत नाही व **प्रत्यवायः न विद्यते** - (ते यथावत् न झाल्यास) दोषही होत नाही **अस्य धर्मस्य** - या कर्मयोगरूप धर्माचे **स्वल्पम् अपि** - थोडेसे देखील अनुष्ठान **महतः भयात्** - मोठ्या भयापासून **त्रायते** - रक्षण करते.

**विवरण** - ज्याप्रमाणे व्यापार, कृषी, उद्योग करणारे पुरुष जरी भूमिमध्ये बीज टाकून यथार्थरूपाने पाणी आदिची व्यवस्था करूही लागले तर ते बीज जळून भस्म होते अथवा व्यापारात तोटा होतो. त्याचप्रमाणे या कर्मयोगाच्या ठिकाणी प्रारंभ केलेल्याचा नाश होत नाही. दुसरे असे की, ज्या ठिकाणी कामनायुक्त म्हणजे सकाम कर्म केले जाते, त्या ठिकाणीच चांगल्या-वाईट फलाची संभावना असते; परंतु या कर्मयोगामध्ये सकाम कर्माचा अभाव असतो म्हणून त्या ठिकाणी प्रत्यवाय अर्थात् विपरीत फल मिळत नाही. कर्म आणि योगशब्दाचा अर्थ याप्रमाणे आहे. शास्त्रविहित वर्णोचित क्रियेचे नाव कर्म आणि समभावाचे नाव आहे योग. अशा कर्मयोगाचे थोडेसेही म्हणजे चांगल्या प्रकाराने अनुष्ठान केले तर जन्मरूप मोठ्या भयापासून रक्षण करते. सर्वात मोठे भय कोणते असेल तर जन्म आणि मृत्युचे आहे. अशा या भयापासून निवृत्त होणे हेच मोठ्या भयापासून रक्षण आहे.

**व्याकरणम्** - **इह** - इह क्रि.वि.अ. **अभिक्रमनाशः** - अभि+क्रम पु. नाश पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अस्ति** - अस् द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **प्रत्यवायः** - प्रत्यवाय पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **विद्यते** - विद् च.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **अस्य** - इदम् सर्व.पु.ष.ए.व. **धर्मस्य** - धर्म पु.ष.ए.व. **स्वल्पम्** - स्वल्प वि.न.द्वि.ए.व. **अपि** - अपि अ. **महतः** - महत् वि.न.पं.ए.व. **भयात्** - भय न.पं.ए.व. **त्रायते** - त्रै प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **अभिक्रमनाशः** - अभिक्रमस्य-प्रारंभस्य-उपक्रमस्य नाशः-विनाश इत्यभिक्रमनाशः = अभिक्रमाचा-प्रारंभाचा-उपक्रमाचा नाश असा अभिक्रमनाश**(ष.त.स.)** **धर्मस्य** - धरति लोकान्,ध्रियते पुण्यात्मभिरिति वा धर्मस्तस्य धर्मस्य = लोकांना धारण करतो अथवा पुण्यात्मा पुरुषांच्याद्वारा धारण केल्या जातो तो धर्म त्या धर्माला**(वि.)**

निश्चयात्मिका आणि सकाम पुरुषांच्या बुद्धिच्या भेदाचे निरूपण -

**व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनन्दन ।**

**बहुशाखा ह्यनन्ताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥४१॥**

**अन्वयः** - कुरुनन्दन, इह, व्यवसायात्मिका, बुद्धिः, एका, अव्यवसायिनाम्, बुद्धयः, बहुशाखाः, च, अनन्ताः, हि।

**अन्वयार्थः - कुरुनन्दन** - हे कुरुवंशास आनन्द देणाऱ्या अर्जुना! **इह** - या निष्काम कर्मयोगात **व्यवसायात्मिका** - निश्चयात्मक **बुद्धिः** - बुद्धि **एका** - एकच आहे **अव्यवसायिनाम्** - किन्तु अस्थिरविचारयुक्त विवेकहीन सकाम पुरुषांच्या **बुद्धयः** - बुद्धि **बहुशाखाः** - अनेक भेदाने युक्त **च** - आणि **अनन्ताः हि** - अनन्त असतात हे प्रसिद्ध आहे.

**विवरण** - परमात्म्याव्यतिरिक्त नाना प्रकारचे भोग आणि त्यांच्या प्राप्तिची अनेक साधने या सर्वांचा निश्चय ज्या बुद्धिमध्ये नसून केवळ एकमात्र परमात्म्याचाच निश्चय असतो अशी व्यवसायात्मिका बुद्धी कर्मयोगामध्ये एकच असते आणि जी अनेक प्रकारच्या कामनांनी युक्त असते अशा त्या बुद्धिला अव्यवसायात्मिका बुद्धी म्हटली जाते, अशा याच बुद्धिने युक्त अविवेकी लोक असतात. त्यांच्या बुद्धी अनेक आणि अनंत प्रकारच्या असतात.

**व्याकरणम्** - **कुरुनन्दन -** कुरु वि. नन्दन पु.संबो.ए.व. **इह -** इह क्रि.वि.अ.**व्यवसायात्मिका -** व्यवसाया त्मिका वि+अव+सो च.ग.प.प.+घञ्=व्यवसाय+आत्मिका=व्यवसायात्मिका स्त्री.प्र.ए.व. **बुद्धिः -** बुद्धि स्त्री.प्र.ए.व. **एका -** एक संख्या वि.स्त्री.प्र.ए.व. **अव्यवसायिनाम्** - अ+व्यवसायिन् वि.पु.ष.ब.व. **बुद्धयः -** बुद्धि स्त्री.प्र.ब.व. **बहुशाखाः -** बहु वि. शाखा स्त्री.प्र.ब.व. **च -** च उभ.अ. **अनन्ताः -** अन्+अन्त वि.स्त्री.प्र.ब.व. **हि -** हि उभ.अ.

**समासविग्रहार्थाः** - **कुरुनन्दन -** कुरोः-कुरुवंशस्य नन्दन इति कुरुनन्दनस्तत्संबुद्धौ कुरुनन्दन = कुरुचा-कुरुवंशाचा पुत्र असा कुरुनन्दन त्याचे संबोधनामध्ये हे कुरुनन्दन**(ष.त.स.) व्यवसायात्मिका -** व्यवसायः-निश्चयः आत्मा-स्वरूपं यस्याः सा व्यवसायात्मिका = व्यवसाय-निश्चय आत्मा-स्वरूप जिचे ती व्यवसाया त्मिका**(ष.त.स.) अव्यवसायिनाम्** - न व्यवसायिनामित्यव्यवसायिनाम् = नाही व्यवसायि असे अव्यवसायि त्यांची**(न.त.स.) बहुशाखाः** - बह्व्यः-अनेकाः शाखाः-प्रकारा यासां ता बहुशाखाः = अनेक शाखा-प्रकार ज्यांचा त्या बहुशाखा**(ब.स.) अनन्ताः** - न विद्यते अन्तः-नाशो यासां ताः, अनन्ताः = नाही अन्त ज्यांचा त्या अनन्त-शाखा**(ष.ब.स)**

स्वर्गपरायण सकाम मनुष्यांच्या स्वभावाचे वर्णन -

**यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्त्यविपश्चितः ।**

**वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ॥४२॥**

**कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् ।**

**क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥४३॥**

**भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् ।**

**व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते॥४४॥**

**अन्वयः** - पार्थ, कामात्मानः, वेदवादरताः, स्वर्गपराः, अन्यत्, न, अस्ति, इति, वादिनः, अविपश्चितः, इमाम्, याम्, पुष्पिताम्, जन्मकर्मफलप्रदाम्, भोगैश्वर्यगतिम्, प्रति, क्रियाविशेषबहुलाम्, वाचम्, प्रवदन्ति, तया, अपहृतचेतसाम्, भोगैश्वर्यप्रसक्तानाम्, समाधौ, व्यवसायात्मिका, बुद्धिः, न, विधीयते ।

**अन्वयार्थः** - **पार्थ** - हे अर्जुना! **कामात्मानः** - अनेक प्रकारच्या भोगामध्ये रत झालेले **वेदवादरताः** - जे कर्मफलाचे प्रशंसक वाद त्यातच आसक्त झालेले **स्वर्गपराः** - स्वर्गाच्या सुखालाच श्रेष्ठ पुरुषार्थ समजणारे **अन्यत् न अस्ति** - स्वर्गसुखाच्या अतिरिक्त दुसरे काहीही साधन चांगले नाही **इति वादिनः** - असे म्हणणारे **अविपश्चितः** - अविवेकी लोक **इमाम् याम् पुष्पिताम्** - पुष्पयुक्त वृक्षाप्रमाणे मनोहर वाटणाऱ्या

**जन्मकर्मफलप्रदाम्** - जन्मरूप कर्मफलाला देणाऱ्या **भोगैश्वर्यगतिम् प्रति क्रियाविशेषबहुलाम्** - भोग आणि ऐश्वर्य यांच्या प्राप्तिकरिता जिच्यामध्ये पुष्कळ कर्मे सांगितलेली आहेत अशा **वाचम्** - वाणीला **प्रवदन्ति** - बोलतात **तया** - त्या वाणीच्या द्वारा **अपहृतचेतसाम्** - ज्यांचे चित्त हरण केलेले आहे आणि **भोगैश्वर्यप्रसक्तानाम्** - भोग व ऐश्वर्य यात रत झालेल्या **समाधौ** - अशा पुरुषांच्या अंत:करणामध्ये **व्यवसाया त्मिका** - आत्मतत्त्वविषयक **बुद्धिः** - बुद्धि **न विधीयते** - उत्पन्न होत नाही.

**विवरण** - भोग आणि ऐश्वर्य यांनी आसक्त झालेले पुरुष वेदाने कथन केलेल्या प्रशंसायुक्त कर्माहून दुसरे काहीच नाही म्हणजे केवळ परमप्राप्य स्वर्गच एक श्रेष्ठ वस्तू आहे, या अतिरिक्त दुसरे काहीच श्रेष्ठ नाही, असे बोलणारे अविवेकी पुरुष फुललेल्या वृक्षाप्रमाणे शोभणाऱ्या जन्मरूप कर्मफल देणाऱ्या भोग आणि ऐश्वर्य यांच्या प्राप्तिकरिता अनेक क्रियांचे वर्णन करणाऱ्या अशा प्रकारच्या त्या वाणीला बोलतात. वास्त विक पाहिले तर वेदाच्याद्वारा जाणणे योग्य एक परम तत्त्वच आहे; परंतु या तत्त्वाला न जाणता केवळ वेदोक्त सकाम कर्म आणि त्याच्या फलामध्ये आसक्त झालेल्या अविवेकी पुरुषांच्या अंत:करणामध्ये केव्हांही निश्चयात्मिका बुद्धि उत्पन्न होत नाही.

**व्याकरणम् - पार्थ** - हे पार्थ पु.संबो.ए.व. **कामात्मानः** - काम पु. आत्मन् पु.प्र.ब.व. **वेदवादरताः** - वेद पु. वाद पु. रम् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **स्वर्गपराः -** स्वर्ग पु. पर वि.पु.प्र.ब.व. **अन्यत्** - अन्यत् अ. **न** - न क्रि.वि.अ. **अस्ति** - अस् द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **वा दिनः** - वादिन् वि.पु.प्र.ब.व. **अविपश्चितः -** अ+विपश्चित् पु.प्र.ब.व. **याम्** - यत् सर्व.स्त्री.द्वि.ए.व. **इमाम्** - इदम् सर्व.स्त्री.द्वि.ए.व. **पुष्पिताम्** - पुष्प् च.ग.प.प.+कर्म क्त+टाप्=पुष्पिता वि.स्त्री.द्वि.ए.व. **जन्मकर्मफलप्रदाम्** - जन्म न. कर्म न. फल न. प्र+दा तृ.ग.वि.स्त्री.द्वि.ए.व. **भोगैश्वर्यगतिं प्रति** - भोग पु. ऐश्वर्य न. गम्+क्तिन्=गति स्त्री.द्वि.ए.व. प्रति अ. **क्रियाविशेषबहुलाम्** - क्रिया स्त्री. विशेष वि. बहुल वि.स्त्री.द्वि.ए.व. **वाचम्** - वाक् स्त्री.द्वि.ए.व. **प्रवदन्ति** - प्र+वद् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व. **तया** - तत् सर्व.स्त्री.तृ.ए.व. **अपहृतचेतसाम्** - अप+हृ प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि. चेतस् न.वि.पु.ष.ब.व. **भोगैश्वर्यप्रसक्तानाम्** - भोग पु. ऐश्वर्य न. प्र+सञ्ज् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.ष.ब.व. **समाधौ** - समाधि पु.स.ए.व. **व्यवसायात्मिका** - व्यवसायात्मिका स्त्री.प्र.ए.व. **बुद्धिः -** बुद्धि स्त्री.प्र.ए.व. **न** - न अ. **विधीयते** - वि+धा तृ.ग.उ.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - वेदवादरताः** - वेदवादा:-कर्मवादा:-अर्थवादा वेदवादा वेदवादेषु रता:-निमग्ना इति वेदवादरता: = वेदाचे रमणीय अर्थ वेदवाद वेदवादामध्ये निमग्न असे वेदवादरत**(स.त.स./ष.त.स.)** यद्वा **वेदवादरताः** - उच्यन्त इति वादा:-वाक्यानि वेदस्य वादा इति वेदवादास्तेषु रता:-निरता इति वेदवादरता: **=** वेदाचा वाद असा वेदवाद त्या वेदवाक्यामध्ये प्रीति करणारे**(स.त.स./ष.त.स.) कामात्मानः** - कामेषु-मनोरथेषु आत्मा-चित्तं येषां ते कामात्मान**:**-कामाकुलचित्ता: = काममध्ये मनोरथामध्ये चित्त ज्यांचे ते कामात्मा-कामाश्रित चित्त असणारे**(व्यधि.ब.स.) जन्मकर्मफलप्रदाम्** - जन्म च कर्म च इति जन्मकर्मणी ते फले जन्मकर्मफले ते ददाति जन्मकर्मफलप्रदा तां जन्मकर्मफलप्रदाम् = जन्म आणि कर्म अशी जन्मकर्मे ती दोन फले जन्मकर्मफले त्या जन्मकर्मफल देणाऱ्या**(द्वं.ग.कर्म.स.)** यद्वा **जन्मकर्मफलप्रदाम्** - कर्मण: फलमि ति कर्मफलं जन्म एव कर्मफलमिति जन्मकर्मफलं तत् प्रददातीति जन्मकर्मफलप्रदा तां जन्मकर्मफलप्रदाम् = कर्माचे फल असे कर्मफल, जन्मच कर्मफल जन्मकर्मफल, त्या जन्मकर्मफलाला देणाऱ्या

**(ष.ग.क.ग.उप.स.) भोगैश्वर्यगतिम्** - भोगश्च-विषयभोगश्च, ऐश्वर्यञ्च-संपत्तिश्चेति भोगैश्वर्ये तयोर्गतिः-प्राप्तिर्भोगैश्वर्यगतिस्तां भोगैश्वर्यगतिम् = भोग-विषयभोग ऐश्वर्य-संपत्ति भोगैश्वर्य, भोगैश्वर्यांची गति-प्राप्ति भोगैश्वर्यगती त्या भोगैश्वर्यगतिला**(द्व.ग.ष.त.स.) क्रियाविशेषबहुलाम्** - क्रियाणाम्-कर्मणाम् विशेषाः-अतिशयाः क्रियाविशेषाः, क्रियाविशेषा बहुला यस्यां सा क्रियाविशेषबहुला तां क्रियाविशेषबहुलाम् = क्रियांचा-कर्मांचा विशेष-अतिशय असा क्रियाविशेष, क्रियाविशेष पुष्कळ जिच्यामध्ये ती क्रियाविशेबहुला त्या क्रियाविशेष बहुलास**(ष.त.ग.ब.स.) अपहृतचेतसाम्** - अपहृतम्-तिरोभावितम्, अन्तःकरणम्-कार्याकार्यविज्ञानं येषां तेऽपहृतचेतसस्तेषामपहृतचेतसाम् = हरण केलेले आहे चित्त-अंतःकरण-कार्याकार्यविज्ञान ज्यांचे ते अपहृतचेतस**(ष.ब.स.) भोगैश्वर्यप्रसक्तानाम्** - भोगश्च-विषयश्च, ऐश्वर्यञ्च-सम्पत्तिश्चेति भोगश्वर्ये, भोगैश्वर्ययोः प्रसक्ता भोगश्वर्यप्रसक्तास्तेषां भोगश्वर्यप्रसक्तानाम् = भोग-विषय ऐश्वर्य-संपत्ति भोगैश्वर्य, त्यामध्ये आसक्त भोगैश्वर्यप्रसक्त त्या भोगैश्वर्यप्रसक्तांचा**(द्व.ग.ष.त.स.) स्वर्गपराः** - स्वर्ग एव परः-श्रेष्ठो येषां ते स्वर्गपराः = स्वर्गच अतिशय श्रेष्ठ ज्यांचा ते स्वर्गपर**(ष.ब.स.) पुष्पिताम्** - पुष्पाणि सञ्जातानि यस्यां सा पुष्पिता तां पुष्पिताम् = पुष्पाप्रमाणे रमणीय वाणी जिच्यामध्ये ती पुष्पिता त्या पुष्पितवाणीला किंवा त्या रमणीय वाणीला **(स.ब.स.) समाधौ** - समाधीयते पुरुषो विषयेषु अनेनेति समाधिः **=** स्थिर केला जातो पुरुष विषयामध्ये समाहित होतो अशी समाधी**(त.वि.)** यद्वा **समाधौ** - वासनात्मना जगत्सर्वं समाधीयते पुरुषेनाऽस्मिन्निति समाधिरन्तःकरणं तस्मिन् समाधौ = वासनात्मक सर्व जगत लीन केले जाते मनुष्याद्वारा हिच्यात अशी समाधी किंवा अंतःकरण त्या अंतःकरणामध्ये किंवा समाधीमध्ये**(त.वि.)** यद्वा **समाधौ** - समाधीयतेऽस्मिन् पुरुषोपभोगाय सर्वमिति समाधिर्वाऽन्तःकरणं तस्मिन् समाधौ = समाधीत-अंतःकरणात पुरुषाच्या उपभोगासाठी सर्व उत्तम प्रकारे स्थापिले जाते ती समाधी त्या समाधीमध्ये-अंतःकरणामध्ये**(त.वि.) वादिनः** - उच्यन्त इति वादाः-वाक्यानि येषां सन्ति ते वादिनः = बोलले जातात असे वाद-वाक्य ज्यांचे आहेत असे ते वादी**(वि.)** यद्वा **वादिनः** - कर्मतत्फलेभ्यः साधनसाध्येभ्योऽन्यदपीश्वरो मोक्षो वा किञ्चिद् नास्तीति वादाः, वादाः सन्ति येषां ते वादिनः = कर्मफलाहून अथवा साध्य-साधनाहून अन्य ईश्वर किंवा मोक्ष काही नाही असे बोलणारे असे ते वादी**(ष.ब.स.)**

अर्जुनाला निष्काम आणि आत्मसंयमी होण्याची आज्ञा -

**त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन ।**

**निर्द्वन्द्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥४५॥**

**अन्वयः** - अर्जुन, वेदाः, त्रैगुण्यविषयाः, त्वम्, निस्त्रैगुण्यः, निर्द्वन्द्वः, नित्यसत्त्वस्थः, निर्योगक्षेमः, आत्मवान्, भव ।

**अन्वयार्थः** - **अर्जुन** - हे अर्जुना! **वेदाः त्रैगुण्यविषयाः** - वेद त्रिगुणांचे कार्यरूप संपूर्ण भोगांचे म्हणजे त्यांच्या साधनांचे प्रतिपादन करणारे आहेत **त्वम्** - तू **निस्त्रैगुण्यः** - तीन गुणातीत **निर्द्वन्द्वः** - हर्षशोकादि द्वन्द्वरहित **नित्यसत्त्वस्थः** - नित्य सत्त्वगुणसंपन्न **निर्योगक्षेमः** - योगक्षेमाची चिंता न करणारा **आत्मवान्** - आत्मनिष्ठायुक्त **भव** - हो.

**विवरण** - वेद तीन गुणांनी युक्त असून भोग व त्यांचे साधन सांगणारे आहेत. त्याकरिता तू भोग व त्यांच्या साधनाविषयी आणि हर्ष-शोकादि द्वंद्वापासून निवृत्त हो. सतत सत्त्वगुण संपन्न व योगक्षेमाची चिंता न

करणारा हो, अशाप्रकारे आत्मनिष्ठायुक्त होवून रहा.

**व्याकरणम् - अर्जुन** - अर्जुन पु.संबो.ए.व. **वेदा:** - वेद पु.प्र.ब.व. **त्रैगुण्यविषया:** - त्रैगुण्य न. विषय पु.प्र.ब.व. **त्वम्** - युष्मत् सर्व.प्र.ए.व. **निस्त्रैगुण्य:** - निस्त्रैगुण्य वि.पु.प्र.ए.व. **निर्द्वन्द्व:** - निर्द्वन्द्व वि.पु.प्र.ए.व. **नित्यसत्त्वस्थ:** - नित्य वि. सत्त्वस्थ वि.पु.प्र.ए.व. **निर्योगक्षेम:** - निर्+योग पु. क्षेम पु.प्र.ए.व. **आत्मवान्** - आत्मवत् वि.पु.प्र.ए.व. **भव** - भू प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - त्रैगुण्यविषया:** - राजसास्तामसा: सात्विकाश्चेति त्रिविधा गुणास्त्रिगुणा: रागद्वेषलोभमोहादयस्तेषां तत्कार्याणां तत्फलानां च समाहारस्त्रैगुण्यं संसार: स एव विषय: कर्मतत्साधना दिप्रकाशनद्वारा वर्धनीयत्वेन गोचरो येषां ते त्रैगुण्यविषया वेदा: = सत्व, रज, तम असे तीन गुण अर्थात राग, द्वेष, लोभ, मोह इत्यादि हे गुण. गुण, गुणकार्य व त्यांचे फल यांचा समूह म्हणजे त्रैगुण्य होय. या त्रैगुण्यासच संसार असे म्हणतात. कर्मतत्साधनादिप्रकाशनद्वारा संसाराची वृद्धि हाच विषय आहे ज्यांचा असे ते त्रैगुण्य विषय वेद**(ब.स.)** यद्वा **त्रैगुण्यविषया:** - त्रैगुण्यम्-सकामो विषयो येषां ते त्रैगुण्यविषया: = तीन गुणांनी युक्त सकाम विषय ज्यांचे ते त्रैगुण्यविषय**(ष.ब.स.)** यद्वा **त्रैगुण्यविषया:** - त्रैगुण्यम्-संसारविषय: प्रकाशयितव्यो येषां ते वेदास्त्रैगुण्यविषया: = ज्यांना संसार या विषयाचे प्रतिपादन करावयाचे आहे असे ते वेद त्रैगुण्यविषय आहेत**(ष.ब.स.) निर्द्वन्द्व:** - निर्गतानि द्वन्द्वानि-सुखदु:खशीतोष्णादीनि यस्य स निर्द्वन्द्व: = नाहीसे झाले द्वन्द्व -सुखदु:ख, शीतोष्णादिक ज्याचे तो निर्द्वन्द्व**(ष.ब.स.) निर्योगक्षेम:** - योगश्च-अप्राप्तस्वीकारश्च, क्षेमश्च-प्राप्तपालनञ्च योगक्षेमौ निर्गतौ योगक्षेमौ यस्य स निर्योगक्षेम: = योग-अप्राप्त विषयाचा स्विकार आणि क्षेम-प्राप्त झालेल्याचे रक्षण योगक्षेम, गेले योगक्षेम ज्याचे तो निर्योगक्षम**(ष.ब.स.) नित्यसत्त्वस्थ:** - नित्यं सत्त्वे-सत्त्वगुण एव तिष्ठतीति नित्यसत्त्वस्थ: = नेहमी सत्त्वगुणामध्ये राहतो असा नित्यसत्त्वस्थ**(स.त.क.स.) आत्मवान्** - आत्मा ब्रह्माकारबुद्धि: सदा सैवास्याऽस्तीत्यात्मवान् = आत्मा-ब्रह्माकारबुद्धि, सदा तीच आहे ज्याची असा आत्मवान्**(अस्त्यर्थे त.वि.)**

ब्रह्मज्ञ पुरुषाकरिता वेदोक्त कर्मफलरूप सुखभोगाच्या अप्रयोजनाचे वर्णन -

**यावानर्थ उदपाने सर्वत: सम्प्लुतोदके ।**

**तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानत: ॥४६॥**

**अन्वय:** - उदपाने, यावान्, अर्थ:, सर्वत:, सम्प्लुतोदके, तावान्, (तथा), सर्वेषु, वेदेषु, (यावान्, अर्थ:), (तावान्, सर्व:), विजानत:, ब्राह्मणस्य, (भवति) ।

**अन्वयार्थ: - उदपाने** - विहीर, आड, तळे, सरोवर तथा लहान-लहान जलाशयात **यावान् अर्थ:** - जेवढे प्रयोजन होते ते सर्व **सर्वत: सप्लुतोदके** - सर्व बाजूंनी पाण्याने भरलेल्या समुद्रादिकांत **तावान्** - तेवढेच प्रयोजन होते (**तथा** - त्याप्रमाणे) **सर्वेषु वेदेषु** - संपूर्ण कर्मकांडरूप वेदामध्ये (**यावान् अर्थ:** - जेवढे फल अपेक्षित असेल) (**तावान् सर्व:** - तेवढे सर्व फल) **विजानत: ब्राह्मणस्य** - ब्रह्मतत्त्वाला जाणणाऱ्या ब्राह्मणाच्या ज्ञानरूप फलात अंतर्भूत (**भवति** - होते.)

**विवरण** - विहीर, आड, तळे, सरोवर तथा लहान-लहान जलाशयात मनुष्याला जेवढे पाण्याचे प्रयोजन आहे, तेवढे सर्व त्याला चोहोबाजूंनी तुडुंब भरलेल्या मोठ्या समुद्रातूनही प्राप्त होते. लहान-लहान अशा

अनेक जलाशयांचे प्रयोजन एका फार मोठ्या जलाशयात अंतर्भूत होते, हे प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणे संपूर्ण वेदोक्त कर्माचे जेवढे प्रयोजन आहे तेवढे सर्व प्रयोजन ब्रह्मज्ञानी संन्यासी पुरुषाला ज्ञानाने प्राप्त होते. कारण ज्ञानाचे फल जलाने तुडुंब भरलेल्या मोठ्या जलाशयासारखे असते आणि फार मोठे फल मिळाले असता क्षुद्र फलांची अपेक्षा राहत नाही हे प्रसिद्ध आहे.

**व्याकरणम्** - **उदपाने** - उदपान न.स.ए.व. **यावान्** - यावत् वि.पु.प्र.ए.व. **अर्थः** - अर्थ पु.प्र.ए.व. **सर्वतः** - सर्व+तसिल्=सर्वतस् अ. **सम्प्लुतोदके** - सम्+प्लु प्र.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि. उदक न.स.ए.व. **तावान्** - तावत् वि.पु.प्र.ए.व. (**तथा** - तथा अ.) **सर्वेषु** - सर्व सर्व.पु.स.ब.व. **वेदेषु** - वेद पु.स.ब.व. **विजानतः** - वि+ज्ञा न.ग.प.प.+कर्त शतृ=विजानत् वि.ष.ए.व. **ब्राह्मणस्य** - ब्रह्मन्+अण्=ब्राह्मण(अपत्यार्थे) पु.ष.ए.व. (**भवति** - भू प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.)

**समासविग्रहार्थाः** - **उदपाने** - उदम्-उदकं पिबन्त्यस्मिन्नित्युदपानम्-जलाशयस्तस्मिनुदपाने = पाणी पितात ह्याच्यामध्ये असे उदपान त्या उदपानामध्ये**(वि.)** **सम्प्लुतोदके** - सम्प्लुतम्-परिपूर्णं उदकं यस्य स सम्प्लुतोदकः-समुद्रस्तस्मिन् सम्प्लुतोदके = पूर्ण उदक-पाणी ज्याचे तो संप्लुतोदक त्या संप्लुतोदकामध्ये-पूर्ण पाण्याने भरलेल्या समुद्रामध्ये**(ष.ब.स.)** **विजानतः** - विशेषेण आत्मतत्त्वं जानातीति विजानन् तस्य विजानतः = विशेष रूपाने आत्मतत्त्व जाणतो असा तत्त्व जाणणारा त्या जाणणाऱ्याचा**(वि.)** **यावान्** - यावत्परिमाण इति यावान् = जेवढे परिमाण असे जेवढे**(त.वि.)** **तावान्** - तावत्परिमाण इति तावान् = तेवढे परिमाण असे तेवढे**(त.वि.)**

मागील श्लोकात ज्ञानफलाचे माहात्म्य सांगितले असले, तरी अनधिकऱ्यास मात्र ज्ञानप्राप्तीचा अधिकार प्राप्त होईपावेतो निष्काम कर्मच सेव्य आहे, या अभिप्रायाने पुढील श्लोकात अर्जुनाला कर्माचे साधन सांगतात -

**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन।**

**मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि ॥४७॥**

**अन्वयः** - ते, अधिकारः, कर्मणि, एव, फलेषु, कदाचन, मा, कर्मफलहेतुः, मा, भूः, ते, सङ्गः, अकर्मणि, मा, अस्तु।

**अन्वयार्थः** - **ते** - तुझा **अधिकारः** - अधिकार **कर्मणि एव** - कर्मामध्येच आहे **फलेषु** - कर्मफलाविषयी **कदाचन** - केव्हाही **मा (भूः)** - इच्छा करू नकोस **कर्मफलहेतुः** - कर्मफलाची अभिलाषा धरून त्या फलाचे निमित्त **मा भूः** - होवू नकोस **ते** - तुझी **सङ्गः** - आसक्ति **अकर्मणि** - कर्म न करण्याविषयी **मा अस्तु** - न होवो.

**विवरण** - कर्मातच तुझा अधिकार आहे फलांत तुझा अधिकार नाही. कारण की, जन्ममृत्युरूप संसारसागरातून मुक्त होण्याकरिता वर्णाश्रम आणि परिस्थितीच्या नुसार शास्त्राने ज्या कर्माचे विधान केलेले आहे ते केवळ माणसाकरिताच आहे. त्याचा जर सदुपयोग केला तर ठीक आहे. नाहीतर अनधिकार चेष्टायुक्त होवून दुरुपयोग केला तर त्याला दंडाचा भागी व्हावे लागेल म्हणून तू कर्माचा अधिकारी आहेस. शास्त्रविहित कर्म करीत असतांना तू कर्मफलाविषयी आसक्ति, ममता आणि कर्तेपणाचा अहंकार करू

नकोस; कारण की, कर्माचा त्याग न्यायसंगत नाही. जर मोहपूर्वक शरीरक्लेशामुळे कर्माचा त्याग केलास तर तो तामस त्याग म्हटलेला आहे. म्हणून तुझा कर्मातच अधिकार आहे, कर्म न करण्यात तुझा अधिकार नाही.

**व्याकरणम्** - **ते** - युष्मत् सर्व.ष.ए.व. **अधिकार:** - अधि+कृ अ.ग.उ.प.+घञ्=अधिकार पु.प्र.ए.व. **कर्मणि** - कृ+मनिन्=कर्मन् न.स.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **फलेषु** - फल न.स.ब.व. **कदाचन** - किम्+दा+चन=कदाचन अ. **मा** - मा अ. **कर्मफलहेतु:** - कर्म न. फल न. हेतु पु.प्र.ए.व. **मा** - मा अ. **भू:** - भू प्र.ग.प.प.कर्त.लुङ् तृ.भूत.द्वि.पु.ए.व. **ते** - युष्मत् सर्व.ष.ए.व. **सङ्ग:** - सञ्ज् प्र.ग.प.प.+घञ्/अच्=सङ्ग पु.प्र.ए.व. **अकर्मणि** - अ+कर्मन् न.स.ए.व. **मा** - मा अ. **अस्तु** - अस् द्वि.ग.प.प.आज्ञार्थ तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **कर्मफलहेतु:** - कर्मणां फलं कर्मफलं कर्मफलस्य हेतु: कर्मफलहेतु: = कर्माचे फल कर्मफल, कर्मफलाचे कारण कर्मफलकारण**(ष.त.स.)** यद्वा **कर्मफलहेतु:** - कर्मफले हेतु:-आशा यस्य स कर्मफलहेतु: = कर्मफलामध्ये हेतु-आशा आहे ज्याची तो**(ब.स.)** **अकर्मणि** - न कर्म इत्यकर्म तस्मिन् अकर्मणि = नाही कर्म असे अकर्म त्या अकर्मामध्ये**(न.त.स.)**

योगाच्या परिभाषारूपामध्ये समत्त्वाचे कथन -

**योगस्थ: कुरु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा धनञ्जय ।**

**सिद्ध्यसिद्ध्यो: समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥४८॥**

**अन्वय:** - धनञ्जय, योगस्थ:, सङ्गम्, त्यक्त्वा, सिद्ध्यसिद्ध्यो:, सम:, भूत्वा, कर्माणि, कुरु, समत्वम्, योग:, उच्यते ।

**अन्वयार्थ:**- **धनञ्जय** - हे अर्जुना! **योगस्थ:** - बुद्धियुक्त होवून (म्हणजे योगांत स्थित होवून) **सङ्गम् त्यक्त्वा** - कर्मफलाविषयीची आशा त्यागून **सिद्ध्यसिद्ध्यो:** - सिद्धि व असिद्धि यांच्या विषयी **सम: भूत्वा** - समता धरून **कर्माणि कुरु** - शास्त्रविहित कर्मे कर **समत्वम्** - सिद्धि व असिद्धि यांना सम मानणारा हाच **योग:** - श्रेष्ठ योग **उच्यते** - म्हटला जातो.

**विवरण** - कर्मयोगाचा अधिकारी हा कर्तृत्वाचा आणि कर्मफलाच्या आसक्तिचा त्याग करीत असल्यामुळे त्यात राग, द्वेष आणि हर्ष-शोकादिकाचाही अभाव होवून जातो; त्यामुळे साधकांच्या ठिकाणी सिद्धि आणि असिद्धि विषयी समताभाव उत्पन्न होतो. अशा प्रकारचा समताभाव अंत:करणामध्ये होणे हाच तो श्रेष्ठ योग म्हटला जातो. म्हणून भगवान म्हणतात की, जर तुला कर्मच करणे प्राप्त आहे, तर समताभावयुक्त होवून कर्म कर.

**व्याकरणम्** - **धनञ्जय** - धनञ्जय पु.संबो.ए.व. **योगस्थ:** - योग पु. स्थ वि.पु.प्र.ए.व. **सङ्गम्** - सङ्ग पु.द्वि.ए.व. **त्यक्त्वा** - त्यज् प्र.ग.प.प.त्वान्त अ. **सिद्ध्यसिद्ध्यो:** - सिध् च.ग.प.प.+क्तिन्=सिद्धि स्त्री. असिद्धि स्त्री.स.द्वि.व. **सम:** - सम वि.पु.प्र.ए.व. **भूत्वा** - भू प्र.ग.प.प.त्वान्त अ. **कर्माणि** - कर्मन् न.द्वि.ब.व. **कुरु** - कृ अ.ग.उ.प.कर्त.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **समत्वम्** - समत्व वि.न.प्र.ए.व. **योग:** - युज् स.ग.उ.प.+घञ्=योग पु.प्र.ए.व. **उच्यते** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **धनञ्जय** - धनम्-आत्मधनं जयतीति धनञ्जयस्तत्सम्बुद्धौ हे धनञ्जय = धनाला-आत्मधनाला जिंकणारा तो धनंजय, त्याचे संबोधनामध्ये हे धनंजय**(उप.स.)** **सिद्ध्यसिद्ध्योः** - सिद्धिश्च-लाभश्च, असिद्धिश्च-अलाभश्च सिद्ध्यसिद्धी तयोः सिद्ध्यसिद्ध्योः = सिद्धि-लाभ, असिद्धि-अलाभ, सिद्ध्य सिद्धि-लाभालाभ, त्या सिद्ध्यसिद्धिविषयी**(द्व.स.)** **योगस्थः** - योगः-ब्रह्म-समाधिस्तस्मिन् तिष्ठतीति योगस्थः = योग ब्रह्म किंवा समाधि त्यामध्ये राहतो असा योगस्थ**(वि.)** यद्वा **योगस्थः** - योगे स्थितः योगस्थः = योगामध्ये स्थित योगस्थ**(वि.)** **योगः** - समस्यभावः समत्वं तदेव ज्ञानेन युज्यते प्राप्यत इति योगस्तस्मिन् योगे = समाचा भाव समत्त्व तेच ज्ञानाने प्राप्त केल्या जाते तो योग त्यामध्ये**(त.वि.)**

समत्त्वबुद्धिपेक्षा सकाम कर्मे ही अत्यंत तुच्छ होत आणि त्यांचे फल इच्छिणारे अत्यंत दीन होत, असे सांगणे -

**दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनञ्जय ।**

**बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥४९॥**

**अन्वयः** - धनञ्जय, बुद्धियोगात्, कर्म, दूरेण, हि, अवरम्, बुद्धौ, शरणम्, अन्विच्छ, फलहेतवः, कृपणाः, (भवन्ति) ।

**अन्वयार्थः** - **धनञ्जय** - हे धनंजया! **बुद्धियोगात्** - समत्त्वरूप बुद्धियोगापेक्षा **कर्म** - सकाम कर्म (फलेच्छेने केलेले कर्म) **दूरेण हि** - अत्यंतही **अवरम्** - निकृष्ट आहे म्हणून तू **बुद्धौ** - बुद्धियोगा(ला)मध्ये **शरणम् अन्विच्छ** - शरण जाण्याचा उपाय प्राप्त कर (म्हणजेच तू बुद्धियोगाचा आश्रय कर) **फलहेतवः** - फलाच्या हेतूमध्ये आसक्त झालेले पुरुष **कृपणाः** - कृपण-अधम (**भवन्ति** - आहेत)

**विवरण** - समत्त्वभाव प्राप्त होणे यालाच बुद्धियोग म्हणतात. अशा या समत्त्वरूप बुद्धियोगापेक्षा सकाम कर्म अत्यंत निकृष्ट आहे; कारण की, सकाम कर्माचे फल नाशवान आणि क्षणिक सुखाची प्राप्ती करून देणारे आणि समत्त्व कर्मयोगाचे फल केवळ परमात्मप्राप्ती करून देणारे आहे. अशा या दोन्हीमध्ये अत्यधिक भेद आहे. म्हणून भगवान म्हणतात की, हे अर्जुना! ज्याच्यापासून परमात्मप्राप्ती होते अशा या कर्मयोगाचाच तू आश्रय कर; कारण की, फलाच्या इच्छेने सकाम कर्म करणारे पुरुष अत्यंत दीन होतात.

**व्याकरणम्** - **धनञ्जय** - धनंजय पु.संबो.ए.व. **कर्म** - कर्मन् न.प्र.ए.व. **बुद्धियोगात्** - बुद्धि स्त्री. योग पु.पं.ए.व. **दूरेण** - दूर वि.न.तृ.ए.व. **अवरम्** - अवर न.प्र.ए.व. **हि** - हि अ. **बुद्धौ** - बुद्धि स्त्री.स.ए.व. **शरणम्** - शृ न.ग.प.प.+ल्युट्=शरण वि.न.द्वि.ए.व. **अन्विच्छ** - अनु+इष् ष.ग.प.प.कर्त.लोट् द्वि.पु.ए.व. **फलहेतवः** - फल न. हेतु पु.प्र.ब.व. **कृपणाः** - कृपण वि.पु.प्र.ब.व. **भवन्ति** - भू प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **शरणम्** - शृणाति दुःखमनेनेति शरणम् = शरण जाणाऱ्याच्या दुःखाला दूर करणारा**(वि.)** **फलहेतवः** - फलम्-कर्मजन्यफलम्-स्वर्गसुखं वाऽप्यैहिकं एव हेतुरेषाम् ते फलहेतवः = फल-कर्मापासून उत्पन्न झालेले फल-स्वर्गसुख किंवा इहलोकातील सुख, हेच कारण ज्यांचे ते फलहेतु**(ष.ब.स.)** **बुद्धियोगात्** - समत्त्वबुद्धेर्योगः बुद्धियोगस्तस्माद् बुद्धियोगात् = समत्त्वबुद्धिचा योग बुद्धियोग त्या बुद्धियोगाहून **(ष.त.स.)**

समबुद्धि पुरुषाची प्रशंसा करून, अर्जुनाला कर्मयोगाची आज्ञा देवून, समभावाचे फल सांगणे -

**बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते ।**

**तस्माद्योगाय युज्यस्व योग: कर्मसु कौशलम् ॥५०॥**

**अन्वय:** - बुद्धियुक्त:, इह, सुकृतदुष्कृते, उभे, जहाति, तस्मात्, योगाय, युज्यस्व, योग:, कर्मसु, कौशलम् ।

**अन्वयार्थ:** - **बुद्धियुक्त:** - समबुद्धियुक्त पुरुष **इह** - या लोकामध्ये **सुकृतदुष्कृते उभे -** पुण्य आणि पाप या दोन्हीचाही **जहाति** - त्याग करतो **तस्मात्** - म्हणून **योगाय** - समत्त्वयोगाकरिता **युज्यस्व** - प्रयत्न कर **योग:** - समत्त्वरूप योगच **कर्मसु** - कर्मातील **कौशलम्** - कुशलता आहे अर्थात् कर्मबंधनापासून मुक्त होण्याचा उपाय आहे.

**विवरण** - कर्म हे स्वभावत:च बंधन प्राप्त करणारे असून देखील कर्म केल्याशिवाय मनुष्याला गत्यंतर नाही. कारण, जोपर्यंत शरीर आहे तोपर्यंत त्याला थोडे फार कर्म करावेच लागते. अशा परिस्थितीत समत्त्व योगच कर्मबंधनापासून मुक्त होण्याकरिता मोठा उपाय आहे. अशा समबुद्धिने युक्त असलेला पुरुष पूर्वजन्मात अथवा या जन्मामध्ये जेवढे काही कर्मापासून होणारे पुण्यकर्म आणि पापकर्म असेल त्याचा त्याग या लोकामध्ये करतो. म्हणून समत्त्व योग करण्याकरिताच तू तयार हो. कारण की, सिद्धि आणि असिद्धि यांना सम मानणे हा योगच कर्मातील कुशलता आहे व तोच कर्मबंधनापासून मुक्त होण्याकरिता मोठा उपाय आहे.

**व्याकरणम्** - **बुद्धियुक्त:** - बुद्धि स्त्री.'युजिर् योगे' युज् स.ग.उ.प.अधिकरणे क्त.वि.पु.प्र.ए.व. **इह** - इह क्रि.वि.अ. **सुकृतदुष्कृते** - सु+कृ अ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि. दुस्+कृत् वि.न.द्वि.द्वि.व. **उभे** - उभ सर्व.न. द्वि.द्वि.व. **जहाति** - हा तृ.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **तस्मात्** - तत् सर्व.पु.पं.ए.व./अ. **योगाय** - योग पु.च.ए.व. **युज्यस्व** - युज् च.ग.आ.प.कर्त.लोट् द्वि.पु.ए.व. **योग:** - योग पु.प्र.ए.व. **कर्मसु** - कर्मन् न.स.ब.व. **कौशलम्** - कुशल+अण्=कौशल न.प्र.ए.व.

**समासविग्रार्था:** - **बुद्धियुक्त:** - बुद्ध्या युक्तो बुद्धियुक्त:-योगयुक्त: = बुद्धिने युक्त बुद्धियुक्त-योगयुक्त**(तृ.त.स.)** **सुकृतदुष्कृते** - सुकृतम्-स्वर्गादिप्रापकश्च दुष्कृतम्- नरकप्रापकश्चेति सुकृतदुष्कृते = सुकृत-स्वर्गप्राप्ति दुष्कृत-नरकप्राप्ति असे सुकृतदुष्कृत**(द्वं.स.)** **कौशलम्** - कुशलस्य-कल्याणस्य भाव: कौशलम् = कुशलाचा-कल्याणाचा भाव कौशल**(भावार्थे त.वि.)** यद्वा **कौशलम्** - कुशलमेव कौशलम्-निपुणम् = कुशलच कौशल आहे**(वि.)**

**कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिण: ।**

**जन्मबन्धविनिर्मुक्ता: पदं गच्छन्त्यनामयम् ॥५१॥**

**अन्वय:** - हि, बुद्धियुक्ता:, मनीषिण:, कर्मजम्, फलम्, त्यक्त्वा, जन्मबन्धविनिर्मुक्ता:, च, अनामयम्, पदम्, गच्छन्ति ।

**अन्वयार्थ:** - **हि** - कारण **बुद्धियुक्ता:** - समबुद्धिने युक्त असणारे **मनीषिण:** - ज्ञानी **कर्मजम् फलम् त्यक्त्वा** - कर्मजन्य फलाचा त्याग करून **जन्मबन्धविनिर्मुक्ता:** - जन्मरूप बंधनापासून सर्वथा मुक्त होवून (**च** - आणि) **अनामयम् पदम्** - निर्विकार पदाला **गच्छन्ति** - प्राप्त होतात.

**विवरण** - कर्माचा स्वभावच असा विचित्र आहे की, त्यापासून अवश्यमेव फल प्राप्त होते. चांगले कर्म केले तर चांगले फल मिळते, वाईट कर्म केले तर वाईट फल म्हणजे दु:ख प्राप्त होते. परंतु समत्त्व बुद्धियोगाने युक्त असे संन्यासी-ज्ञानी जन कर्मापासून उत्पन्न होणाऱ्या फलाचा त्याग करून, तथा जन्मरूप बंधनापासून सर्वथा मुक्त होवून श्रेष्ठ अशा अनामय पदाला(अमृतत्त्वाला) प्राप्त होतात. म्हणजे ज्या ठिकाणी न राग द्वेष आदि क्लेशाचा, न शुभाशुभ कर्माचा, न हर्ष शोकादि विकारांचा आणि न समस्त दोषांचा संबंध होतो. अशा या निर्विकार परम धामाला प्राप्त होतात.

**व्याकरणम्** - **हि** - हि क्रि.वि.अ. **बुद्धियुक्ताः** - बुद्धि स्त्री. युज् च.ग.आ.प./द.ग.प.प. कर्म.भू.धा. वि.पु.प्र.ब.व. **मनीषिणः** - मनीषा+इन्=मनीषिन् वि.पु.प्र.ब.व. **कर्मजम्** - कर्मज न.द्वि.ए.व. **फलम्** - फल न.द्वि.ए.व. **त्यक्त्वा** - त्यज् प्र.ग.प.प.त्वान्त अ. **जन्मबन्धविनिर्मुक्ताः** - जन्म पु. बंध पु. वि+निर्+मुच् ष.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **अनामयम्** - अनामय न.द्वि.ए.व. **पदम्** - पद न.द्वि.ए.व. **गच्छन्ति** - गम् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **जन्मबन्धविनिर्मुक्ताः** - जन्म एव बन्धो जन्मबन्धो जन्मबन्धेन विनिर्मुक्ता जन्मबन्धविनिर्मुक्ताः = जन्मच बंध जन्मबंध, जन्मबंधाने मुक्त जन्मबंधविनिर्मुक्त**(क.ग.तृ.त.स.)** यद्वा **जन्मबन्धविनिर्मुक्ताः** - जन्मना बन्धः-सम्बन्धो यस्य स जन्मबन्धः-देहः-उत्तरकालभाविवर्तमानश्च तेन विनिर्मुक्ता जन्मबन्धविनिर्मुक्ताः = जन्माने बंध-संबंध ज्याचा तो जन्मबंध-भविष्यकालाचा आणि वर्तमानकालाचा देह, त्याने विमुक्त जन्मबंधविनिर्मुक्त**(ष.ब.ग.तृ.त.स.)** **मनीषिणः** - मनीषा-सदसद्विवेकिनी बुद्धिर्येषामस्ति ते मनीषिणः = सतासताचा विवेक करणारी बुद्धि ज्याची आहे ते मनीषी**(ष.ब.स.)** यद्वा **मनीषिणः** - मनसः-अन्तःकरणस्य ईषिण इति मनीषिणः = मनाचे-अंत:करणाचे शासन करणारे असे मनीषि**(ष.त.स.)** **कर्मजम्** - कर्मणो जातमिति कर्मजम् = कर्मापासून झालेले असे कर्मज**(त.वि.)** **फलम्** - फलतीति फलम् = प्राप्त होते असे फल**(वि.)** **अनामयम्** - अविद्यमान आमयः-रोगो यत्र तदनामयम्-सर्वोपद्रवरहितम् = नाही विद्यमान रोग जेथे ते अनामय-सर्वोपद्रवशून्य**(न.त.स.)**

वैराग्यद्वारा बुद्धि शुद्ध-स्वच्छ आणि निश्चल झाल्यावर परमात्मप्राप्तीचे कथन -

**यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ।**

**तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥५२॥**

**अन्वयः** - यदा, ते, बुद्धिः, मोहकलिलम्, व्यतितरिष्यति, तदा, श्रुतस्य, च, श्रोतव्यस्य, निर्वेदम्, गन्तासि ।

**अन्वयार्थः** - **यदा** - जेव्हा **ते** - तुझी **बुद्धिः** - बुद्धि **मोहकलिलम्** - मोहरूप मालिन्याचे (मालिन्याला) **व्यतितरिष्यति** - अतिक्रमण करील **तदा** - त्यावेळी **श्रुतस्य** - श्रवण केलेल्या **च** - आणि **श्रोतव्यस्य** - श्रवण करण्यास योग्य इहलोक आणि परलोक संबंधी संपूर्ण भोगापासून **निर्वेदम्** - विरक्त **गन्तासि** - होशील.

**विवरण** - पहिल्या अध्यायात आत्मीय स्वजनांच्या वधाविषयी जो मोह प्राप्त झाला होता. त्यालाच या ठिकाणी मोहकलिलाची उपमा दिली आहे. अशा या मोहकलिलामुळे अर्जुन धर्मसंमूढचेता होवून आपल्या कर्तव्याचा निश्चय करण्यास असमर्थ झाला होता. म्हणून भगवान् म्हणतात की, हे अर्जुना! ज्यावेळी तुझी बुद्धि मोहकलिलाचा नाश करील त्यावेळी श्रवण केलेल्या आणि श्रवण करण्यास योग्य इहलोक आणि परल-

ोक संबधी समस्त भोगाच्या वैराग्यास तू प्राप्त होशील.

**व्याकरणम्** - **यदा** - यद्+दा=यदा कालवाचक तद्धि.अ. **ते** - युष्मत् सर्व.ष.ए.व. **बुद्धिः** - बुद्धि स्त्री.प्र.ए.व. **मोहकलिलम्** - मोह पु. कलिल वि.न.द्वि.ए.व. **व्यतितरिष्यति** - वि+अति+तृ-तर् प्र.ग.प.प.लृट् द्वि.भवि.तृ.पु.ए.व. **तदा** - तद्+दा=तदा अ. **श्रुतस्य** - श्रु पं.ग.प.प.कर्म.भू.धा. वि.न.ष.ए.व. **च** - च उभ.अ. **श्रोतव्यस्य** - श्रु पं.ग.प.प.कर्म.विध्यर्थ धा.वि.न.ष.ए.व. **निर्वेदम्** - निर्वेद पु.द्वि.ए.व. **गन्तासि** - गम् प्र.ग.प.प.कर्त लुट् प्र.भवि.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **यदा** - यस्मिन् काले = ज्या वेळी**(वि.)मोहकलिलम्** - मोह एव-देहादिषु आत्मबुद्धिरेव कलिलम्-पंकमिति मोहकलिलम् = मोहच-देहादिकामध्ये आत्मबुद्धिच मल आहे असा मोहकलिल-मोह रूपी मल**(क.स.)** यद्वा **मोहकलिलम्** - मोहो विचित्तता विषयजातमेतत्सर्वमसन्मायिकम्-तुच्छमिति विवेकाभाव:-पदार्थापरिज्ञानं तदेव कलिलम्-कालुष्यं दर्पणस्य धूलिपटलवद् विवेकबुद्धेरावरणमेवंलक्षणं मोहकलिलम् = मोह-विचित्तता म्ह. चित्ताची विचलीत अवस्था अर्थात हे विषयसमूह मायिक, असत् व तुच्छ आहेत यांच्या विवेकाचा अभाव याचे नाव कलिल-कालुष्य आहे. आरशावर धुलिकण साठले असता तो जसा मलीन त्याप्रमाणे बुद्धिचे ठिकाणी अविवेकाचे आवरण उत्पन्न होते त्यास मोहकलिल म्हणतात **(क.स.)** **श्रोतव्यस्य** - श्रोतुं योग्य: श्रोतव्यस्तस्य श्रोतव्यस्य = श्रवण करण्यास योग्य श्रोतव्य त्या श्रोतव्याचे **(योग्यार्थे त.वि.)**

**श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ।**

**समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥५३॥**

**अन्वयः** - यदा, ते, श्रुतिविप्रतिपन्ना, बुद्धिः, समाधौ, अचला, (च), निश्चला, स्थास्यति, तदा, योगम्, अवाप्स्यसि ।

**अन्वयार्थः** - **यदा** - ज्यावेळी **ते** - तुझी **श्रुतिविप्रतिपन्ना बुद्धिः** - अनेक प्रकारच्या श्रवणांनी विक्षिप्त झालेली बुद्धि **समाधौ** - परमात्म्यामध्ये **अचला** - अचल-विकल्पशून्य (**च** - आणि) **निश्चला** - स्थिर **स्थास्यति** - होईल **तदा** - त्यावेळी **योगम्** - खऱ्या योगाला **अवाप्स्यसि** - प्राप्त होशील.

**विवरण** - लोक आणि परलोकांचे भोगैश्वर्य तथा त्यांची साधने त्या साधनाच्या प्राप्तिच्या संबंधाने नाना उपाय आणि त्या उपायामुळे चंचलत्वाला प्राप्त झालेली तुझी बुद्धी हे करणे योग्य आहे की ते करणे योग्य आहे अशा प्रकारच्या संशय द्वारा निश्चयरहित बुद्धिलाच विक्षिप्त बुद्धी म्हणतात. अशी विक्षिप्त झालेली तुझी बुद्धी चंचल रहित होवून आत्म्यामध्ये ज्यावेळी स्थिर होईल त्यावेळी उपर्युक्त सांगितलेल्या समत्त्व बुद्धी योगाला तू प्राप्त होशील.

**व्याकरणम्** - **यदा** - यदा अ. **ते** - युष्मत् सर्व.ष.ए.व. **श्रुतिविप्रतिपन्ना** - श्रुति स्त्री. वि+प्रति+पद् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.स्त्री.प्र.ए.व. **बुद्धिः** - बुद्धि स्त्री.प्र.ए.व. **समाधौ** - समाधि पु.स.ए.व. **अचला** - अचला वि.स्त्री.प्र.ए.व. (**च** - अ.) **निश्चला** - निश्चला वि.स्त्री.प्र.ए.व. **स्थास्यसि** - स्था प्र.ग.प.प.कर्त.लृट् द्वि.भ.वि.तृ.पु.ए.व. **तदा** - तदा अ. **योगम्** - योग पु.द्वि.ए.व. **अवाप्स्यसि** - अव+आप् पं.ग.प.प.लृट् द्वि.भवि.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **अचला** - न चला इति अचला = नाही चल अशी अचल**(न. त.स.)** **श्रुतिविप्रतिपन्ना** - श्रुतिभिः-नानालौकिकवैदिकार्थश्रवणैः, विप्रतिपन्ना-विक्षिप्ता श्रुतिविप्रतिपन्ना = श्रुतिद्वारा-नानालौकिक आणि वैदिकार्थ श्रवणांनी विक्षिप्त झालेली अशी ती श्रुतिविप्रतिपन्ना**(तृ.त.स.)** यद्वा **श्रुतिविप्रतिपन्ना** - अनेकसाध्यसाधनसम्बन्धप्रकाशनश्रुतिभिः-श्रवणैः विप्रतिपन्ना-नानाप्रतिपन्ना-श्रुतिविप्रतिपन्ना-विक्षिप्ता = अनेक प्रकारचे साध्य व त्यांची अनेक साधने त्यांच्या संबंधाचे जे प्रकाशन-प्रतिपादन त्याच्या श्रुतींनी म्ह. श्रवणांनी विप्रतिपन्न-नाना प्रकारे भलती समजूत झालेली म्ह. विक्षिप्त ती श्रुतिविप्रतिपन्ना**(तृ.त.स.)** **समाधौ** - चित्तं समाधीयतेऽस्मिन्निति समाधिः-आत्मा तस्मिन् समाधौ-आत्मनि = स्थिर केले जाते चित्त ज्यामध्ये अशी समाधि-आत्मा त्या आत्म्यामध्ये-त्या समाधिमध्ये**(त.वि.)**

स्थिरबुद्धि पुरुषांच्या विषयासंबंधी अर्जुनाचे चार प्रश्न -

**अर्जुन उवाच** - अर्जुन म्हणाला -

**स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव।**

**स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥५४॥**

**अन्वयः** - केशव, समाधिस्थस्य, स्थितप्रज्ञस्य, का, भाषा, स्थितधीः, किम्, प्रभाषेत्, किम्, आसीत, (च), किम्, व्रजेत।

**अन्वयार्थः** - **केशव** - हे कृष्णा! **समाधिस्थस्य** - समाधिमध्ये स्थित जो परमात्मा त्याला प्राप्त झालेल्या **स्थितप्रज्ञस्य** - स्थितप्रज्ञाचे **का भाषा** - काय लक्षण आहे **स्थितधीः** - स्थिरबुद्धि पुरुष **किम् प्रभाषेत** - काय बोलतो **किम् आसीत** - कसा राहतो **च** - आणि **किम् व्रजेत** - कसा चालतो.

**विवरण** - उपर्युक्त सांगितल्याप्रमाणे ज्यावेळी तुझी बुद्धि स्थिर होवून परमात्म्यामध्ये स्थित होईल त्यावेळी खऱ्या योगाला तू प्राप्त होशील असे वचन श्रवण केल्यानंतर अर्जुनाच्या अंतःकरणामध्ये जिज्ञासा उत्पन्न झाली की, परमात्म्याला प्राप्त झालेल्या पुरुषाची बुद्धी नेहमीकरिता परमात्म्यामध्ये अचल आणि स्थिर झालेली असते. अशा महापुरुषाचे लक्षण अवश्य श्रवण केले पाहिजे. म्हणून अर्जुन म्हणतो की, हे श्रीकृष्णा! समाधीमध्ये स्थिर तथा परमात्मा प्राप्त झालेल्या स्थिरबुद्धि पुरुषाचे काय लक्षण आहे? तो काय बोलतो? कसा राहतो? आणि कसा चालतो?

**व्याकरणम्** - **केशव** - केशव पु.संबो.ए.व. **समाधिस्थस्य** - समाधि पु. स्थ वि.पु.ष.ए.व. **स्थितप्रज्ञस्य** - स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. प्रज्ञ वि.पु.ष.ए.व. **का** - किम् सर्व.स्त्री.प्र.ए.व. **भाषा** - भाषा स्त्री.प्र.ए.व. **स्थितधीः** - स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. धी स्त्री.प्र.ए.व. **किम्** - किम् सर्व.न.प्र.ए.व. **प्रभाषेत** - प्र+भाष् प्र.ग.आ.प.कर्त.विध्यर्थ तृ.पु.ए.व. **किम्** - किम् सर्व.न.प्र.ए.व. **आसीत** - आस् द्वि.ग.आ.प. विध्यर्थ तृ.पु.ए.व. **किम्** - किम् सर्व न.प्र.ए.व. **व्रजेत** - व्रज् प्र.ग.आ.प.विध्यर्थ तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **केशव** - **समाधिस्थस्य** - समाधौ तिष्ठतीति समाधिस्थस्तस्य प्रज्ञा-बुद्धिर्यस्य स समाधिस्थस्तस्य समाधिस्थस्य = समाधीमध्ये राहतो असा समाधिस्थ त्या समाधिस्था(प्रमाणे)ची बुद्धी ज्याची तो समाधिस्थ त्या समाधिस्थाची**(ष.ब.स.)** **स्थितप्रज्ञस्य** - स्थिता-प्रत्यगात्मनि प्रतिष्ठिता प्रज्ञा यस्य स तस्य स्थितप्रज्ञस्य = स्थित म्ह. प्रत्यक् आत्म्यामध्ये प्रतिष्ठित आहे बुद्धी ज्याची त्या स्थितप्रज्ञाची**(ष.ब.स.)** यद्वा

**स्थितप्रज्ञस्य -** स्थिता-प्रतिष्ठिता 'अहमस्मि परं ब्रह्म' इति प्रज्ञा यस्य स स्थितप्रज्ञस्तस्य स्थितप्रज्ञस्य = 'मी परब्रह्म आहे' अशी ज्याची बुद्धी स्थित-प्रतिष्ठित झाली आहे तो स्थितप्रज्ञ त्या स्थितप्रज्ञाची**(ष.ब.स.)** यद्वा **स्थितप्रज्ञस्य -** स्थिता-ब्रह्माकारेण निश्चला बाह्यानवगाहिनी प्रज्ञा-बुद्धिर्यस्य स स्थितप्रज्ञस्तस्य स्थितप्रज्ञस्य = बाह्य पदार्थांना अवगाहन-विषय न करणारी, केवळ ब्रह्माकाराने निश्चल अशी बुद्धी आहे ज्याची तो स्थितप्रज्ञ त्या स्थितप्रज्ञाची**(ष.ब.स.)**

स्थिरबुद्धी पुरुषाला सर्व कामनांपासून रहित व आत्म्यामध्ये संतुष्ट दाखविणे -

**श्रीभगवानुवाच -** श्रीभगवान म्हणाले -

**प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान्।**

**आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥५५॥**

**अन्वयः** - पार्थ, यदा, मनोगतान्, सर्वान्, कामान्, प्रजहाति, आत्मनि, एव, आत्मना, तुष्टः, तदा, स्थितप्रज्ञः, उच्यते।

**अन्वयार्थः - पार्थ** - हे अर्जुना! **यदा** - ज्यावेळी **मनोगतान्** - मनामध्ये असलेल्या **सर्वान् कामान्** - सर्व कामनांना **प्रजहाति -** सर्वथा त्याग करतो व **आत्मनि एव** - स्वत:मध्येच म्हणजे आत्म्यामध्येच **आत्मना तुष्टः** - आत्मरूपानेच संतुष्ट झालेला असतो **तदा** - त्यावेळी **स्थितप्रज्ञः** - तो स्थितप्रज्ञ **उच्यते** - म्हटला जातो.

**विवरण** - जेव्हा पुरुष अंत:करणातील सर्व कामनांचा(इहलोक आणि परलोकसंबंधी भोगैश्वर्याच्या कामनांचा) तथा सूक्ष्मरूपाने अंत:करणामध्ये लिप्त झालेल्या वासनांचा सर्व प्रकारांनी त्याग करून आपल्या आत्मस्वरूपामध्ये निश्चल झालेला असतो म्हणजे कोणत्याच अनात्म पदार्थाविषयीच्या कामनेने युक्त नसून केवळ आत्मस्वरूपामध्येच संतुष्ट झालेला असतो त्यावेळी तो स्थितप्रज्ञ म्हटला जातो.

**व्याकरणम् - पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **यदा** - यदा कालवाचक त.अ. **मनोगतान्** - मनस् न. गम् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.द्वि.ब.व. **सर्वान्** - सर्व सर्व.पु.द्वि.ब.व. **कामान्** - काम पु.द्वि.ब.व. **प्रजहाति** - प्र+हा तृ.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **आत्मनि -** आत्मन् पु.स.ए.व. **आत्मना** - आत्मन् पु.तृ.ए.व. **एव -** एव क्रि.वि.अ. **तुष्टः** - तुष् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **तदा** - तदा कालवाचक त.अ. **स्थितप्रज्ञः** - स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. प्रज्ञ वि.पु.प्र.ए.व. **उच्यते** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - मनोगतान्** - मनसि-अन्त:करणे, गताः-प्राप्तास्तान् मनोगतान् = मनात-अंत:करणात, गत-प्राप्त झालेले ते मनोगत, त्या मनोगतांना**(स.त.स.) स्थितप्रज्ञः** - स्थिता-स्थिरा आत्मानात्मविवेकजा प्रज्ञा-बुद्धिर्यस्य स स्थितप्रज्ञः = स्थित-स्थिर-आत्मानात्मविवेकापासून उत्पन्न झालेली प्रज्ञा-बुद्धी ज्याची तो स्थितप्रज्ञ**(ष.ब.स.) प्रजहाति** - प्रकर्षेण-उत्कर्षेण जहाति-त्यजतीति प्रजहाति-परित्यजति = विशेष करून त्याग करतो असा प्रजहाति**(वि.)**

स्थितप्रज्ञास सुखदु:ख व शुभाशुभ यांच्या प्राप्तिमध्ये हर्षशोकादि द्वन्द्वापासून रहित सांगून दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर -

**दु:खेष्वनुद्विग्नमना: सुखेषु विगतस्पृह: ।**

**वीतरागभयक्रोध: स्थितधीर्मुनिरुच्यते ॥५६॥**

**अन्वय:** - दु:खेषु, अनुद्विग्नमना:, सुखेषु, विगतस्पृह:, वीतरागभयक्रोध:, स्थितधी:, मुनि:, उच्यते ।

**अन्वयार्थ:** - **दु:खेषु अनुद्विग्नमना:** - त्रिविध दु:खाने व्याप्त झाला तरी ज्याचे मन उद्विग्न होत नाही असा **सुखेषु विगतस्पृह:** - विविध म्हणजे अनेक प्रकारची सुखे प्राप्त झाली असता त्या विषयी निरिच्छ असणारा असा **वीतरागभयक्रोध:** - राग, भय, क्रोध ही सर्वथा ज्यांची गेलेली आहेत असा **स्थितधी:** - तो स्थितप्रज्ञ **मुनि:** - मुनी **उच्यते** - म्हटला जातो.

**विवरण** - परमात्म्याच्या स्वरूपामध्ये अचल-स्थिर झालेल्या पुरुषाच्या ठिकाणी साधारण दु:खे तर सोडूनच द्या परंतु आध्यात्मिकादि मोठमोठी दु:खे जरी प्राप्त झाली तरी पण तो आपल्या स्थितिपासून यत्किञ्चितही विचलित होत नाही. कारण की, त्या पुरुषाच्या अंत:करणात स्पृहारूपी दोषांचा सर्वथा अभाव झालेला असतो त्यामुळे त्याची सुखाविषयीची तृष्णा सर्वथा नष्ट झालेली असते आणि त्याचप्रमाणे आसक्ति, भय आणि क्रोध यांचा सुद्धा स्पर्श त्याच्या ठिकाणी यत्किञ्चितमात्रही नसतो. अशा उपर्युक्त गुणांनी युक्त पुरुष स्थितप्रज्ञ असा म्हटला जातो.

**व्याकरणम्** - **दु:खेषु** - दु:ख न.स.ब.व. **अनुद्विग्नमना:** - अन्+उद्+विज् स.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.मनस् वि.पु.प्र.ए.व. **सुखेषु** - सुख न.स.ब.व. **विगतस्पृह:** - वि+गम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. स्पृहा वि.पु.प्र.ए.व. **वीतरागभयक्रोध:** - वि+इ द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. राग पु. भय न. क्रोध पु.प्र.ए.व. **स्थितधी:** - स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. धी वि.पु.प्र.ए.व. **मुनि:** - मुनि पु.प्र.ए.व. **उच्यते** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अनुद्विग्नमना:** - न उद्विग्नम्-न प्रक्षुभितं दु:खप्राप्तौ मनो यस्य सोऽयमनुद्विग्नमना: = नाही क्षुब्ध-खिन्न दु:खप्राप्तीमध्ये मन ज्याचे तो हा अनुद्विग्नमन**(ष.ब.स.)** **विगतस्पृह:** - विगता-निर्गता, स्पृहा-इच्छा-रसनादीन्द्रियलौल्यं यस्य स विगतस्पृह: = गेली इच्छा-रसनादिक इंद्रियांची लोलुपता ज्याची तो विगतस्पृह**(ष.ब.स.)** **वीतरागभयक्रोध:** - रागश्च-प्रीतिश्च भयश्च-भीतिश्च क्रोधश्चेति रागभयक्रोधा:, वीता:-निर्गता रागभयक्रोधा यस्मात् स वीतरागभयक्रोध: = आसक्ती, भिती आणि क्रोध असे रागभयक्रोध गेले ज्याच्यापासून तो वीतरागभयक्रोध**(पं.ब.स.)** **दु:खेषु** - दु:खानि त्रिविधानि शोकमोहज्वरशिरोरोगादिनिमित्तान्याध्यात्मिकानि व्याघ्रसर्पादिप्रयुक्तान्याधिभौतिकानि अतिवातातिवृष्ट्यादिहेतुकान्याधिदैविकानि तेषु दु:खेषु = दु:ख तीन प्रकारचे आहेत आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक शोकमोहज्वरशिरोरोगादिने युक्त आध्यात्मिक, व्याघ्रसर्पादिने युक्त आधिभौतिक, अतिवात अतिवृष्ट्यादिने युक्त आधिदैविक अशा या दु:खामध्ये**(परिभाषा)**

**य: सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ।**

**नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥५७॥**

**अन्वय:** - य:, सर्वत्र, अनभिस्नेह:, तत्, तत्, शुभाशुभम्, प्राप्य, न, अभिनन्दति, न, द्वेष्टि, तस्य, प्रज्ञा, प्रतिष्ठिता ।

**अन्वयार्थ:** - **य:** - जो पुरुष **सर्वत्र** - सर्व ठिकाणी **अनभिस्नेह:** - अत्यंत राग रहित **तत् तत्** - ते ते **शुभाशुभम्** - शुभ आणि अशुभ **प्राप्य** - प्राप्त होवून **न अभिनन्दति** - जो हर्ष युक्त होत नाही आणि **न द्वेष्टि** - द्वेषयुक्त होत नाही म्हणजे हर्षाला आणि द्वेषाला पात्र होत नाही **तस्य** - त्याची **प्रज्ञा** - बुद्धी **प्रतिष्ठिता** - स्थिर झाली असे समजावे.

**विवरण** - साधारण पुरुषाला कदाचित अनुकूल वस्तूचा संयोग प्राप्त झाला तर त्याच्यापासून त्याला मोठा हर्ष होतो आणि प्रतिकूल वस्तूचा संयोग झाला तर त्याचे अंत:करण क्षोभयुक्त होते. परंतु, या विपरीत स्थिरबुद्धी पुरुषाला अनुकूल वस्तूचा तथा प्रतिकूल वस्तूचा संयोग जरी प्राप्त झाला तरी अनुकूल वस्तूचे अ भिनंदन करीत नाही आणि प्रतिकूल वस्तूविषयी द्वेष करीत नाही; कारण, त्याचे अंत:करण प्रत्येक वस्तूच्या प्राप्तीविषयी सम, शांत आणि निर्विकार झालेले असते याप्रमाणे कोणत्याही विकारापासून विचलित न होणाऱ्या पुरुषाची बुद्धी स्थिर झाली असे समजावे.

**व्याकरणम्** - **य:** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **सर्वत्र** - त्रल् प्रत्ययान्त सप्तम्यन्त त.अ. **अनभिस्नेह:** - अन्+अ भि+स्नेह पु.प्र.ए.व. **तत् तत्** - तत् सर्व.न.द्वि.ए.व. **शुभाशुभम्** - शुभ वि. अशुभ वि.न.द्वि.ए.व. **प्राप्य** - प्र+आप् पं.ग.प.प.ल्यबन्त अ. **न** - न अ. **अभिनन्दति** - अभि+नन्द् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **द्वेष्टि** - द्विष् द्वि.ग.उ.प.(प.प.)लट् वर्त.तृ.पु.ए.व. **तस्य** - तत् सर्व.पु.ष.ए.व. **प्रज्ञा** - प्रज्ञा स्त्री.प्र.ए.व. **प्रतिष्ठिता** - प्र+स्था प्र.ग.प.प.कर्त.भूत.धा.वि.स्त्री.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अनभिस्नेह:** - न अभिस्नेह इत्यनभिस्नेह:-अत्यन्तासक्तिरहित: = नाही विशेष प्रीति असा अनभिस्नेह-अत्यंत आसक्तिरहित**(न.त.स.)** **शुभाशुभम्** - शुभश्च अशुभश्चेति शुभाशुभे शुभाशुभयो: समाहार: शुभाशुभम् = शुभ आणि अशुभ असे शुभाशुभ शुभाशुभाचा समाहार शुभाशुभ**(समाहार द्व.स.)** **सर्वत्र** - सर्वस्मिन् काल इति सर्वत्र = सर्व कालामध्ये असे सर्वत्र**(कालार्थे त.वि.)** **प्रतिष्ठिता** - समाधावेव तिष्ठति तस्यैव प्रज्ञा प्रतिष्ठिता = समाधीमध्येच रहातो त्याचीच प्रज्ञा स्थिर-स्थित**(वि.)**

तिसऱ्या प्रश्नाच्या उत्तरात कासवाचा दृष्टांत देवून इंद्रियनिग्रह करण्याकरिता सांगतात -

**यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वश: ।**

**इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥५८॥**

**अन्वय:** - च, कूर्म:, अङ्गानि, इव, यदा, अयम्, इन्द्रियार्थेभ्य:, इन्द्रियाणि, सर्वश:, संहरते, तस्य, प्रज्ञा, प्र तिष्ठिता ।

**अन्वयार्थ:** - **च** - आणि **कूर्म:** - ज्याप्रमाणे कासव **अङ्गानि इव** - आपले सर्व अवयव सर्व बाजूंनी आवरून घेतो त्याचप्रमाणे **यदा** - जेव्हा **अयम्** - हा स्थिरबुद्धी पुरुष **इन्द्रियार्थेभ्य:** - विषयांपासून **इन्द्रियाणि** - इंद्रिये **सर्वश:** - सर्व प्रकारे **संहरते** - आवरून घेतो त्यावेळी **तस्य** - त्याची **प्रज्ञा** - बुद्धी **प्रतिष्ठिता** - स्थिर झाली आहे असे समजावे.

**विवरण** - या श्लोकांत भगवान कासवाचा दृष्टांत देऊन स्थिरबुद्धी पुरुषाचे वर्णन करतात. ज्याप्रमाणे कासव आपले समस्त अवयव सर्व बाजूंनी एकदम आवरून घेतो त्याचप्रमाणे ज्याची इंद्रिये सर्व बाजूंनी सर्व प्रकारांनी अधीन झालेली असून, पुन: त्यांत मन आणि बुद्धिमध्ये विषयाला आकर्षित करण्याची य

त्किंचितही शक्ती राहिलेली नसते. अशा वश झालेल्या इंद्रियांना जो पुरुष सर्वथा विषयापासून आवरून घेतो त्यावेळी त्याची बुद्धी स्थिर झालेली असते असे समजावे म्हणजे त्याची प्रज्ञा प्रतिष्ठित झालेली असते असे समजावे.

**व्याकरणम्** - **च** - च उभ.अ. **कूर्मः** - कूर्म पु.प्र.ए.व. **अङ्गानि** - अङ्ग् प्र.ग.प.प./द.ग.उ.प.+अच्=अङ्ग न.द्वि.ब.व. **इव** - इव अ. **अयम्** - इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **यदा** - यदा कालवाचक त.अ. **इन्द्रियार्थेभ्यः** - इंद्रिय न. अर्थ पु.पं.ब.व. **इन्द्रियाणि** - इंद्रिय न.द्वि.ब.व. **सर्वशः** - सर्वशस् शस् प्रत्ययान्त त.अ. **संहरते** - सम्+हृ प्र.ग.उ.प.(आ.प.)लट् वर्त.तृ.पु.ए.व. **तस्य** - तत् सर्व.पु.ष.ए.व. **प्रज्ञा** - स्त्री.प्र.ए.व. **प्रतिष्ठिता** - प्र+स्था प्र.ग.प.प.कर्त.वर्त.धा.वि.स्त्री.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **इन्द्रियार्थेभ्यः** - इन्द्रियाणामर्थाः-शब्दादिविषयास्तेभ्य इन्द्रियार्थेभ्यः-शब्दादिविषयेभ्यः = इंद्रियांचे अर्थ शब्दादि विषय त्या इंद्रियांच्या अर्थांपासून-शब्दादि विषयांपासून**(ष.त.स.)**

स्थितप्रज्ञाचे रसनादि विषयही सुटतात -

**विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः।**

**रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥५९॥**

**अन्वयः** - निराहारस्य, देहिनः, रसवर्जम्, विषयाः, विनिवर्तन्ते, अस्य, रसः, अपि, परम्, दृष्ट्वा, निवर्तते।

**अन्वयार्थः** - **निराहारस्य** - इंद्रियद्वारा विषय ग्रहण न करणाऱ्या **देहिनः** - अशा तपस्वी पुरुषाचे **रसवर्जम्** - रसविषय सोडून **विषयाः** - शब्दस्पर्शादि विषय **विनिवर्तन्ते** - निवृत्त होतात **अस्य** - या स्थितप्रज्ञाचा (स्थिरबुद्धी पुरुषाचा) **रसः** - विषयासक्तिरूप रस **अपि** - सुद्धा **परम् दृष्ट्वा** - परब्रह्म तत्त्वाचे ज्ञान झाल्यावर **निवर्तते** - निवृत्त होतो.

**विवरण** - इंद्रियांच्याद्वारा विषय ग्रहण न करणाऱ्या पुरुषांचे विषय तर निवृत्त होतात परंतु त्यात राहिलेली मूल आसक्ति मात्र निवृत्त होत नाही. ती आसक्ति म्हणजे विषयासक्तिरूप रस केवळ परमात्म्याचा साक्षात्कार झाल्यावरच निवृत्त होते. म्हणजे परमात्मसाक्षात्कार झाल्यावर कोणत्याही सांसारिक पदार्थाविषयी य त्किंचितही आसक्ति रहात नाही. कारण की, आसक्तिचे कारण अविद्या आहे. त्या अविद्येचा परमात्म साक्षात्कार झाल्यावर अभाव होतो. त्यामुळे त्यांच्या ठिकाणी असलेली विषयासक्ति सर्वथा नष्ट होते.

**व्याकरणम्** - **निराहारस्य** - निर्+आ+हृ प्र.ग.उ.प.+घञ्=निराहार पु.ष.ए.व. **देहिनः** - देहिन् पु.ष.ए.व. **विषयाः** - वि+सि पं.ग./न.ग.उ.प.+अच्,षत्व=विषय पु.प्र.ब.व. **रसवर्जम्** - रस पु. वर्ज पु.द्वि.ए.व. **वि निवर्तन्ते** - वि+नि+वृत् प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व. **अस्य** - इदम् सर्व.पु.ष.ए.व. **रसः** - रस पु.प्र.ए.व. **अपि** - अपि अ. **परम्** - पर पु.द्वि.ए.व. **दृष्ट्वा** - दृश् प्र.ग.प.प.त्वान्त अ. **निवर्तते** - नि+वृत् प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **निराहारस्य** - आन्हियन्ते विषया यैस्त आहारा-इन्द्रियाणि, नियमार्थं तेभ्यो निर्गतो यः स निराहारः-इन्द्रियनिग्रहवान्-तापसस्तस्य निराहारस्य = हरण केले जातात विषय ज्यांनी ते आहार-इंद्रिय, नियमाकरिता त्यांच्यापासून निघून गेला तो निराहार-इंद्रियनिग्रहवान् - अथवा तपस्वी त्या तपस्वी निराहारीचे**(तृ.ब.स.)** **रसवर्जम्** - विषयेषु यो रसः-रागस्तं वर्जयित्वा रसवर्जम् = विषयांविषयीचा जो रस-राग-आसक्ति-प्रीति, त्या रसाला टाकून-सोडून निवृत्त होतात ते रसवर्ज**(वि.)** **देहिनः** - देहोऽस्यास्तीति देही तस्य देहिनः-देहाभिमानिनः = देह ह्याचा आहे असा देही, त्या देहधारण करणाऱ्याचे-देहाभिमान्याचे **(अस्त्यर्थे त.वि.)**

इंद्रियांच्या प्रबलतेचे निरूपण -

**यततो ह्यपि कौन्तेय पुरुषस्य विपश्चितः।**

**इन्द्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मनः ॥६०॥**

**अन्वयः** - हि, कौन्तेय, यततः, विपश्चितः, पुरुषस्य, मनः, अपि, प्रमाथीनि, इन्द्रियाणि, प्रसभम्, हरन्ति।

**अन्वयार्थः** - **हि** - कारण **कौन्तेय** - हे अर्जुना! **यततः** - प्रयत्न करीत असलेल्या **विपश्चितः पुरुषस्य** - बुद्धिमान पुरुषाच्या **मनः** - मनाला **अपि** - सुद्धा **प्रमाथीनि इन्द्रियाणि** - उच्छृंखल असलेली (व्याकुळ करणारी)ही इंद्रिये **प्रसभम्** - बलात्काराने **हरन्ति** - हरण करितात.

**विवरण** - जो श्रवण, मनन आदि तथा अनेक प्रकारच्या विवेक-विचाराच्याद्वारा विषयांच्या दोषाला जाणतो आणि इंद्रिये विषयापासून आवरण्याचा प्रयत्नही करतो. परंतु, ज्याच्या आसक्तिचा पूर्णतया नाश झालेला नाही अशा बुद्धिमान विवेकी प्रयत्नशील पुरुषाची व्याकुळ करणारी इंद्रिये मनाला बलात्काराने विषयामध्ये प्रवृत्त करतात. म्हणून स्थितप्रज्ञ अवस्था प्राप्त करणाऱ्या पुरुषाला आसक्तिचा सर्वथा त्याग करून इंद्रियांना आपल्या अधीन करण्याचा प्रयत्न करायला पाहिजे.

**व्याकरणम्** - **हि** - क्रि.वि.अ. **कौन्तेय** - कौन्तेय पु.संबो.ए.व. **यततः** - यत् प्र.ग.आ.प.कर्त.शतृ=यतत् वि.पु.ष.ए.व. **मनः** - मनस् न.द्वि.ए.व. **अपि** - अपि अ. **विपश्चितः** - विपश्चित् पु.ष.ए.व. **पुरुषस्य** - पुरुष पु.ष.ए.व. **प्रमाथीनि** - प्रमाथिन् वि.न.प्र.ब.व. **इन्द्रियाणि** - इन्द्रिय न.प्र.ब.व. **प्रसभम्** - प्रसभम् अ. **हरन्ति** - हृ प्र.ग.उ.प.(प.प.)लट् कर्त.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **प्रमाथीनि** - प्रकर्षेण मथितुम्-विषयदर्शनमात्रेण व्याकुलीकर्तुम्-क्षोभयितुं शीलं स्वभावो येषां तानि प्रमाथीनि-प्रमथनशीलानि = विशेष प्रकारे मंथन करण्यास-विषयदर्शन मात्राने व्याकुळ करण्यास-क्षोभ करण्यास-शील किंवा स्वभाव ज्यांचा ते प्रमाथीनि**(ष.ब.स.)** **मनः** - मनुते ब्रह्मानेनेति मनः = विचार केले जाते ब्रह्म ज्याच्या द्वारा असे मन**(वि.)**

मन व इंद्रियांना भगवत्परायण करण्याची प्रेरणा तसेच इंद्रियविजयी पुरुषांची प्रशंसा -

**तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः।**

**वशे हि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥६१॥**

**अन्वयः** - तानि, सर्वाणि, संयम्य, युक्तः, मत्परः, आसीत, हि, इन्द्रियाणि, यस्य, वशे, तस्य, प्रज्ञा, प्रतिष्ठिता।

**अन्वयार्थः** - **तानि सर्वाणि** - त्या सर्व इंद्रियांना **संयम्य** - संयमन करून म्हणजे आपल्या अधीन ठेवून **युक्तः** - योगयुक्त होवून आणि **मत्परः** - माझ्या ठिकाणी ज्याचे चित्त आसक्त आहे असा होवून **आसीत** - रहावे **हि** - कारण **इन्द्रियाणि** -इंद्रिये **यस्य** - ज्याच्या **वशे** - स्वाधीन आहेत **तस्य** - त्याची **प्रज्ञा** - प्रज्ञा **प्रतिष्ठिता** - स्थिर झाली आहे असे समजावे.

**विवरण** - इंद्रियांचा विषयांपासून चांगल्या प्रकारांनी निरोध करून जर मन आपल्या ताब्यात म्हणजे आधीन ठेवले नाही तर त्याचा परिणाम विपरीत म्हणजे पतन भोगण्याकरिता कारण होतो. म्हणून भगवान म्हणतात

की, प्रथम मनासह इंद्रियांचे चांगल्या प्रकारांनी संयमन करून म्हणजे त्यांना आपल्या ताब्यात ठेवून तथा समाहितचित्त होऊन आणि माझ्याच ठिकाणी ज्याचे निरंतर चित्त आसक्त आहे, असे होऊन राहावे. कारण ज्याच्या आधीन इंद्रिये आहेत त्याचीच प्रज्ञा प्रतिष्ठित असते म्हणजे बुद्धी स्थिर असते असे जाणावे.

**व्याकरणम्** - **तानि** - तत् सर्व.न.द्वि.ब.व. **सर्वाणि** - सर्व सर्व.न.द्वि.ब.व. **संयम्य** - सम्+यम् प्र.ग.प.प.ल्यबन्त अ. **मत्परः** - मत् अस्मत् सर्व.पु.प्र.ए.व. **पर** - पर वि.पु.प्र.ए.व. **युक्तः** - युज् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **आसीत** - आस् द्वि.ग.आ.प.विध्यर्थ तृ.पु.ए.व. **यस्य** - यत् सर्व.पु.ष.ए.व. **इन्द्रियाणि** - इन्द्रिय न.द्वि.ब.व. **हि** - हि अ. **वशे** - वश वि.पु.स.ए.व. **तस्य** - तत् सर्व.पु.ष.ए.व. **प्रज्ञा** - प्रज्ञा स्त्री.प्र.ए.व. **प्रतिष्ठिता** - प्र+स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.स्त्री.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **मत्परः** - अहमेव-परमात्मा वासुदेव एव परः-श्रेष्ठः यस्य स मत्परः = मीच-परमात्मा वासुदेवच श्रेष्ठ ज्याचा तो मत्पर**(ष.ब.स.)** यद्वा **मत्परः** - अहमेव परः परमात्मेति परस्मिन्नेव ब्रह्मण्यहं धीर्यस्य स मत्परः = मीच श्रेष्ठ परमात्मा अशी परमात्म्यामध्येच-ब्रह्मामध्येच मी बुद्धी ज्याची तो मत्पर **(ष.ब.स.)** **प्रज्ञा** - प्रकर्षेण-प्रकृष्टरूपेण ज्ञानमिति प्रज्ञा = विशेषकरून ज्ञान असणे अशी प्रज्ञा**(वि.)**

विषयाच्या चिंतनाने आसक्ति आदि अवगुणांची प्राप्ती आणि अधःपतनाचे कथन -

**ध्यायतो विषयान्पुंसः सङ्गस्तेषूपजायते ।**

**सङ्गात्सञ्जायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥६२॥**

**अन्वयः** - विषयान्, ध्यायतः, पुंसः, तेषु, सङ्गः, उपजायते, सङ्गात्, कामः, सञ्जायते, कामात्, क्रोधः, अ भिजायते ।

**अन्वयार्थः** - **विषयान् ध्यायतः पुंसः** - विषयांचे ध्यान करीत असणाऱ्या पुरुषाची **तेषु** - त्या विषयांच्या ठिकाणी **सङ्गः** - आसक्ति **उपजायते** - उत्पन्न होते **सङ्गात्** - आसक्तिमुळे **कामः** - काम (इच्छा) **सञ्जायते** - उत्पन्न होते **कामात्** - कामामुळे **क्रोधः** - क्रोध **अभिजायते** - उत्पन्न होतो.

**विवरण** - परमात्म्याचा आधार नसलेले मन इंद्रियांच्याद्वारा विषयाचे चिंतन करीत राहाते त्यामुळे ते सर्वथा विचलित होते. अशा मनाकडून चिंतन करणाऱ्या पुरुषाला विषयाच्या ठिकाणी आसक्ति उत्पन्न होते आणि त्या आसक्तिपासून विषयांची कामना उत्पन्न होते आणि कामना अपूर्ण राहिली की क्रोध उत्पन्न होतो.

**व्याकरणम्** - **विषयान्** - विषय पु.द्वि.ब.व. **ध्यायतः** - ध्यै प्र.ग.प.प.कर्त.वर्त.धा.वि.पु.ष.ए.व. **पुंसः** - पू न.ग.उ.प.+डुमसुन्=पुंस् पु.ष.ए.व. **तेषु** - तत् सर्व.स.ब.व. **सङ्गः** - सङ्ग पु.प्र.ए.व. **उपजायते** - उप+जन् च.ग.आ.प.कर्त.वर्त.तृ.पु.ए.व. **सङ्गात्** - सङ्ग पु.पं.ए.व. **कामः** - कम् प्र.ग.आ.प.+णिङ्+घञ्=काम पु.प्र.ए.व. **सञ्जायते** - सम्+जन् च.ग.आ.प.कर्त.वर्त.तृ.पु.ए.व. **कामात्** - काम पु.पं.ए.व. **क्रोधः** - क्रोध पु.प्र.ए.व. **अभिजायते** - अभि+जन् च.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **ध्यायतः** - ध्यायतीति ध्यायन् तस्य ध्यायतः = ध्यान करतो असा ध्यान करणारा त्या ध्यान करणाऱ्याचे**(वि.)**

**क्रोधाद्भवति सम्मोहः सम्मोहात्स्मृतिविभ्रमः ।**

**स्मृतिभ्रंशाद् बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥६३॥**

**अन्वयः** - क्रोधात्, सम्मोहः, भवति, सम्मोहात्, स्मृतिविभ्रमः, स्मृतिभ्रंशात्, बुद्धिनाशः, बुद्धिनाशात्, प्रणश्यति ।

**अन्वयार्थः - क्रोधात्** - क्रोधापासून **सम्मोहः** - अत्यंत मूढभाव **भवति** - उत्पन्न होतो **सम्मोहात्** - संमोहापासून **स्मृतिविभ्रमः -** स्मृतिभ्रंश उत्पन्न होतो **स्मृतिभ्रंशात् -** स्मृतिभ्रंशापासून **बुद्धिनाशः** - बुद्धिचा नाश होतो **बुद्धिनाशात्** - बुद्धिच्या नाशामुळे **प्रणश्यति** - पुरुष आपल्या स्थितीपासून खाली येतो- पुरुषार्थाला योग्य होत नाही.

**विवरण** - क्रोधापासून अविवेक उत्पन्न होतो. अविवेकापासून मला काय कर्तव्य करायला पाहिजे काय कर्तव्य करायला नको आहे अशा प्रकारच्या शास्त्रोपदेशाची आठवण रहात नाही आणि स्मृतिभ्रंश झाला की बुद्धिनाश होतो. त्यामुळे आपणाला करणे योग्य शास्त्रविहित कर्तव्य कर्माचे आचरण न करता केवळ अकर्तव्य कर्मामध्ये प्रवृत्त होतो. अशा प्रकारे आपल्या स्थितीला सोडून खाली आलेला पुरुष पुरुषार्थाला योग्य होत नाही.

**व्याकरणम् - क्रोधात्** - क्रोध पु.पं.ए.व. **सम्मोहः** - सम्मोह वि.पु.प्र.ए.व. **भवति** - भू प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **सम्मोहात्** - सम्मोह पु.पं.ए.व. **स्मृतिविभ्रमः** - स्मृ प्र.ग.प.प.+क्तिन्=स्मृति स्त्री. वि+भ्रंश पु.प्र.ए.व. **स्मृतिभ्रंशात् -** स्मृति स्त्री. भ्रंश पु.पं.ए.व. **बुद्धिनाशः** - बुद्धि स्त्री. नश् च.ग.प.प.+घञ्=नाश पु.प्र.ए.व. **बुद्धिनाशात्** - बुद्धि स्त्री. नाश पु.पं.ए.व. **प्रणश्यति** - प्र+नश् च.ग.प.प.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - स्मृतिविभ्रमः** - शास्त्राचार्योपदेशाहितसंस्कारजनितायाः स्मृतेः विभ्रमः-भ्रंशः स्मृति विभ्रमः-स्मृत्युत्पत्तिनिमित्तप्राप्तौ अनुत्पत्तिः = शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशापासून अंतःकरणावर झालेले जे संस्कार त्यापासून झालेल्या स्मृतिचा विभ्रम-भ्रंश असा तो स्मृतिविभ्रम म्ह. स्मृति उत्पत्तिचे निमित्त प्राप्त झाले असताही ती उत्पन्न न होणे**(ष.त.स.) स्मृतिभ्रंशात्** - शास्त्राचार्योपदेशाहितसंस्कारजनितायाः स्मृतेः- भ्रंशः स्मृतिभ्रंशस्तस्मात् स्मृतिभ्रंशात् = शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशापासून अंतःकरणावर झालेले जे संस्कार त्यापासून झालेल्या स्मृतिचा भ्रंश त्या स्मृतिभ्रंशापासून**(ष.त.स.) बुद्धिनाशः** - बुद्धेः कार्याकार्य विषयविवेकायोग्यता नाशः-विलोप इति बुद्धिनाशः = बुद्धिची-कार्याकार्याविषयी विवेकायोग्यता असा बुद्धिनाश**(ष.त.स.) बुद्धिनाशात्** - बुद्धेर्नाश इति बुद्धिनाशस्तस्मात् बुद्धिनाशात् = बुद्धिचा नाश असा बुद्धिनाश त्या बुद्धिनाशापासून**(ष.त.स.)**

रागद्वेषाने रहित होवून कर्म करणाऱ्याला प्रसादाची प्राप्ती, दुःखाचा नाश आणि बुद्धि स्थिर होण्याचे कथन -

**रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन् ।**

**आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥६४॥**

**अन्वयः** - तु, रागद्वेषवियुक्तैः, आत्मवश्यैः, इन्द्रियैः, विषयान्, चरन्, विधेयात्मा, प्रसादम्, अधिगच्छति ।

**अन्वयार्थः - तु** - परंतु **रागद्वेषवियुक्तैः** - प्रीती व द्वेष यांनी रहित **आत्मवश्यैः** - आपल्या स्वाधीन अस-

लेल्या **इन्द्रियै:** - इंद्रियांनी **विषयान्** - विषयांचा **चरन्** - उपभोग करीत असणारा **विधेयात्मा** - ज्याने आपल्या अंत:करणाला स्वाधीन केले आहे असा पुरुष **प्रसादम्** - मनाच्या प्रसन्नतेला **अधिगच्छति** - प्राप्त होतो.

**विवरण** - साधारण मनुष्याची इंद्रिये स्वतंत्र असतात. पुन्हा अशा या अधीन नसलेल्या इंद्रियांच्या ठिकाणी रागद्वेष परिपूर्ण भरलेले असतात. त्यामुळे कर्तव्य काय आहे व अकर्तव्य काय आहे हे तो जाणतच नाही. केवळ भोगासक्त असतो परंतु जो अधिकारी मुमुक्षु असतो तो मात्र राग, द्वेष आपल्या स्वाधीन ठेवून अंत:करणाला आपल्या इच्छेच्या विपरीत जाऊ देत नाही आणि केवळ जीवन जगण्याकरिता यत्किंचित विषयांचेच सेवन करतो त्यामुळे त्याच्या अंत:करणाला स्वास्थ्य प्राप्त होते.

**व्याकरणम्** - **तु** - तु उभ.अ. **रागद्वेषवियुक्तै:** - रञ्ज् च.ग./प्र.ग.उ.प.+घञ्=राग पु. द्वेष पु. वि+युज् द.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.तृ.ब.व. **आत्मवश्यै:** - आत्म+वश्य वि.पु.तृ.ब.व. **इन्द्रियै:** - इन्द्रिय न.तृ.ब.व. **विषयान्** - विषय पु.द्वि.ब.व. **चरन्** - चर् प्र.ग.प.प.कर्त.शतृ=चरत् वि.पु.प्र.ए.व. **विधेयात्मा** - वि+धा तृ.ग.उ.प.कर्म.विध्यर्थ धा.वि.आत्मन् पु.प्र.ए.व. **प्रसादम्** - प्रसाद पु.द्वि.ए.व. **अधिगच्छति** - अधि+गम् प्र.ग.प.प.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **रागद्वेषवियुक्तै:** - रागश्च द्वेषश्च रागद्वेषौ ताभ्यां वियुक्तानि-रहितानि रागद्वेषवियुक्तानि तै: रागद्वेषवियुक्तै: = आसक्ति आणि द्वेष रागद्वेष यांनी रहित रागद्वेषरहित त्या रागद्वेषांनी रहित**(द्व.ग.तृ.त.स.)** **आत्मवश्यै:** - आत्मन:-मनसो वश्यानि-वशीभूतानि आत्मवश्यानि तैरात्मवश्यै: = आत्म्याचे-मनाचे वशीभूत असलेले आत्मवशीभूत त्या आत्मवशीभूत असणाऱ्यांनी**(ष.त.स.)** **विधेयात्मा** - विधेय:-वशवर्ति, आत्मा-मनो यस्य स विधेयात्मा = ताब्यात आत्मा-मन ज्याचे तो विधेयात्मा**(ष.त.स.)** यद्वा **विधेयात्मा** - इन्द्रियशुद्ध्या समाधिना च निर्मुक्तरागादिदोषतया शुद्धत्वेन स्वाधीन आत्मा-मनो यस्य स विधेयात्मा = इंद्रियशुद्धीने किंवा समाधीने रागद्वेषांनी रहित व शुद्ध झाल्यामुळे स्वाधीन आत्मा-मन ज्याचे तो विधेयात्मा**(ष.त.स.)**

**प्रसादे सर्वदु:खानां हानिरस्योपजायते ।**

**प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धि: पर्यवतिष्ठते ॥६५॥**

**अन्वय:** - प्रसादे, अस्य, सर्वदु:खानाम्, हानि:, उपजायते, हि, प्रसन्नचेतस:, बुद्धि:, आशु, पर्यवतिष्ठते ।

**अन्वयार्थ:** - **प्रसादे** - अंत:करण प्रसन्न झाले असता **अस्य** - ह्याच्या **सर्वदु:खानाम्** - संपूर्ण दु:खांची **हानि:** - निवृत्ति **उपजायते** - होते **हि** - कारण **प्रसन्नचेतस:** - प्रसन्न चित्त आहे ज्याचे असा कर्मयोगी त्याची **बुद्धि:** - बुद्धि **आशु** - शीघ्र **पर्यवतिष्ठते** - सर्वबाजूंचा त्याग करून परमात्म्याच्या ठिकाणी स्थिर होते.

**विवरण** - उपर्युक्त योग्याला आध्यात्मिक सात्विक प्रसन्नतेचा अनुभव प्राप्त झाल्यानंतर कोणत्याही वस्तूच्या संयोग आणि वियोगापासून त्याला यत्किंचितही दु:ख प्राप्त होत नाही. कारण, सदैव त्याच्याठिकाणी संपूर्ण दु:खाचा अभाव असतो. अशा या समाहितचित्त पुरुषाची बुद्धि शीघ्रातिशीघ्र सर्व बाजूंनी स्थिर होते.

**व्याकरणम् - प्रसादे** - प्र+सद्+घञ्=प्रसाद पु.स.ए.व. **अस्य** - इदम् सर्व.पु.ष.ए.व. **सर्वदु:खानाम्** - सर्व वि. दुख न.ष.ब.व. **हानि:** - हानि स्त्री.प्र.ए.व. **उपजायते** - उप+जन् च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**प्रसन्नचेतसः** - प्र+सद् प्र.ग./ष.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. चेतस् वि.न.ष.ए.व. **हि** - हि क्रि.वि.अ. **बुद्धिः** - बुद्धि स्त्री.प्र.ए.व. **आशु** - अश् पं.ग.आ.प.+उण्=आशु न.प्र.ए.व./अ. **पर्यवतिष्ठते** - परि+अव+स्था प्र.ग.प.प.(आ.प.)लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **सर्वदुःखानाम्** - सर्वाणि च तानि दुःखानि सर्वदुःखानि तेषां सर्वदुःखानाम् = सर्व आणि दुःख सर्वदुःख त्या सर्वदुःखांचा**(क.स.) प्रसन्नचेतसः** - प्रसन्नं चेतः-अन्तःकरणं यस्य स प्रसन्नचेतास्तस्य प्रसन्नचेतसः = प्रसन्न अंतःकरण ज्याचे तो प्रसन्नचेतस**(ष.ब.स. )**

अयुक्त पुरुषाला श्रेष्ठ बुद्धि, भगवच्चिंतन, शांति आणि सुखाचा अभाव याचे कथन -

**नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना ।**

**न चाभावयतः शान्तिरशान्तस्य कुतः सुखम् ॥६६॥**

**अन्वयः** - अयुक्तस्य, बुद्धिः, न, अस्ति, च, अयुक्तस्य, भावना, न, विद्यते, च, अभावयतः, शान्तिः, न, अस्ति, अशान्तस्य, सुखम्, कुतः ।

**अन्वयार्थः** - **अयुक्तस्य** - ज्याचे अंतःकरण स्थिर झालेले नसते त्याची **बुद्धिः** - आत्म्याविषयी बुद्धी **न अस्ति** - नसते **च** - आणि **अयुक्तस्य** - ज्याचे अंतःकरण स्थिर झालेले नसते त्याला आत्म्याविषयी **भावना** - भावना **न विद्यते** - नसते **च** - आणि **अभावयतः** - ज्याला स्थिरतेची इच्छा नाही त्याला **शान्तिः** - शांति **न अस्ति** - नसते **अशान्तस्य** - आणि शांतिरहित पुरुषाला **सुखम्** - सुख **कुतः** - कुठचे म्हणजे सुख कोठून प्राप्त होणार.

**विवरण** - मन आणि इंद्रियांना आपल्या वश न ठेवता केवळ मन आणि इंद्रियांच्या अधीन असा जो विषयासक्त पुरुष त्याच्या ठिकाणी निश्चयात्मिका बुद्धि रहात नाही. तसेच त्याचे चित्त सदैव विक्षिप्त असते. अशा विक्षिप्त पुरुषाकडून परमात्मस्वरूपाचे सतत चिंतन होत नाही. सतत चिंतन न झाल्यामुळे शांति प्राप्त होत नाही आणि शांति न प्राप्त झाल्यामुळे अनर्थाची निवृत्ति होत नाही. अशा या संसारसागरात फसलेल्या अशांत, अस्थिर पुरुषाला सुख कोठून मिळणार.

**व्याकरणम्** - **अयुक्तस्य** - अ+युज् द.ग.प.प.अधिकरणे क्त.वि.पु.ष.ए.व. **बुद्धिः** - बुद्धि स्त्री.प्र.ए.व. **न** - न अ. **अस्ति** - अस् द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **अयुक्तस्य** - अ+युज् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.ष.ए.व. **भावना** - भावना स्त्री.प्र.ए.व. **न** - न अ. **विद्यते** - विद् च.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **अभावयतः** - अ+भू प्र.ग.प.प.+णिच्+कर्त.शतृ=अभावयत् वि.पु.ष.ए.व. **शान्तिः** - शम् च.ग.प.प.+क्तिन्=शान्ति स्त्री.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अस्ति** - अस् द्वि.ग.प.प.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **अशान्तस्य** - अशान्त च.ग.प.प.कर्त.भू.धा. वि.पु.ष.ए.व. **सुखम्** - सुख न.प्र.ए.व. **कुतः** - कुतस् अ.

**समासविग्रहार्थाः** - **अयुक्तस्य** - समत्वबुद्धिलक्षणेन-कर्मयोगेन न युक्त इत्ययुक्तस्तस्य अयुक्तस्य = समत्वबुद्धिलक्षण-कर्मयोगाने नाही युक्त असा अयुक्त त्या अयुक्ताचे**(न.त.स.) अशान्तस्य** - न शान्तस्येत्यशान्तस्य = नाही शांत असा अशांत त्या अशांताचे**(न.त.स.) अभावयतः** - न भावयत इत्यभावयतः = नाही भावना अशा भावनारहिताचे**(न.त.स.)**

वायु आणि नावेच्या दृष्टांताच्या समान इंद्रियाला आणि बुद्धिला हरण करणे म्हणजे स्थिर होऊ न देणे याचे कथन -

**इन्द्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते ।**

**तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवाम्भसि ॥६७॥**

**अन्वयः** - हि, चरताम्, इन्द्रियाणाम्, यत्, मनः, अनुविधीयते, तत्, अस्य, प्रज्ञाम्, अम्भसि, वायुः, नावम्, इव, हरति ।

**अन्वयार्थः** - **हि** - कारण **चरताम् इन्द्रियाणाम्** - विषयामध्ये स्वैर संचार करणाऱ्या इंद्रियांच्या **यत् मनः** - जे मन **अनुविधीयते** - पाठीमागे जाते **तत्** - ते **अस्य** - या अयुक्त पुरुषाच्या **प्रज्ञाम्** - बुद्धिला **अम्भसि** - पाण्यामध्ये **वायुः** - वारा **नावम् इव** - जसा नावेला भलतीकडे नेतो अगदी त्याचप्रमाणे **हरति** - हरण करते.

**विवरण** - वायुचा दृष्टांत देवून या श्लोकांत अस्थिर बुद्धियुक्त पुरुषाचे वर्णन करतात. ज्याप्रमाणे प्रबल वायु पाण्यातील नावेला भलत्याच मार्गाने नेत असतो. त्याचप्रमाणे इंद्रिये स्वाधीन नसलेल्या पुरुषाचे मन इं द्रियांच्या द्वारा विषयाचे चिंतन करीत राहते. असे हे चंचल झालेले मन आत्मानात्म विवेक करणाऱ्या स्थिर बुद्धिला विचलित करते म्हणजे स्वाधीन ठेवते-स्थिर होवू देत नाही.

**व्याकरणम्** - **हि** - हि क्रि.वि.अ. **चरताम्** - चर् प्र.ग.प.प.कर्त.शतृ=चरत् वि.न.ष.ब.व. **इन्द्रियाणाम्** - इ न्द्रिय न.ष.ब.व. **यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **मनः** - मनस् न.प्र.ए.व. **अनुविधीयते** - अनु उपसर्ग वि+धा तृ.ग.उ.प.(आ.प.)लट् वर्त.कर्म.तृ.पु.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **अस्य** - इदम् सर्व.पु.ष.ए.व. **प्रज्ञाम्** - प्रज्ञा स्त्री.द्वि.ए.व. **अम्भसि** - अम्भस् न.स.ए.व. **वायुः** - वा द्वि.ग.आ.प.+उण्, युक् आगम=वायु पु.प्र.ए.व. **नावम्** - नौ स्त्री.द्वि.ए.व. **इव** - इव अ. **हरति** - हृ-हर् प्र.ग.उ.प.(प.प.)लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **चरताम्** - चरन्तीति चरन्तस्तेषां चरताम् = प्रवृत्त होतात असे प्रवृत्त होणारे त्या प्रवृत्त होणाऱ्यांचा**(वि.)**

स्थिरबुद्धि पुरुषाच्या लक्षणामध्ये निग्रहाची प्रधानता -

**तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ।**

**इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥६८॥**

**अन्वयः** - तस्मात्, महाबाहो, यस्य, इन्द्रियाणि, इन्द्रियार्थेभ्यः, सर्वशः, निगृहीतानि, तस्य, प्रज्ञा, प्रतिष्ठिता ।

**अन्वयार्थः** - **तस्मात्** - म्हणून **महाबाहो** - हे अर्जुना! **यस्य** - ज्याची **इन्द्रियाणि** - इंद्रिये **इन्द्रियार्थेभ्यः** - विषयांपासून **सर्वशः** - पूर्णपणे **निगृहीतानि** - निगृहीत केलेली असतात **तस्य** - त्याची **प्रज्ञा** - बुद्धी **प्रति ष्ठिता** - आत्मस्वरूपी स्थिर झालेली असते.

**विवरण** - विषयभोगामध्ये इंद्रियांची प्रवृत्ति स्वाभाविक असते. कारण की, अनादि काळापासून इंद्रिये विषयांचे भोग करीत आलेले आहेत. त्यामुळे इंद्रियांच्याद्वारा पुरुषाची भोगामध्ये आसक्ति झालेली असते.

परंतु इंद्रियावर ज्याचे पूर्णतया आधिपत्य आहे म्हणजे त्यांच्या स्वातंत्र्यावर शिस्त लावून ज्याने आपल्या स्वाधीन करून घेतलेली आहेत. अशा इंद्रियांवर विजय प्राप्त केलेल्या पुरुषाची बुद्धि स्थिर झालेली असते.

**व्याकरणम्** - **तस्मात्** - तत् सर्व.पु.पं.ए.व./अ. **महाबाहो** - महाबाहु पु.संबो.ए.व. **यस्य** - यत् सर्व.पु.ष.ए.व. **इन्द्रियाणि** - इंद्रिय न.प्र.ब.व. **इन्द्रियार्थेभ्य:** - इन्द्रिय न. अर्थ पु.पं.ब.व. **सर्वश:** - सर्वशस् अ. **निगृहीतानि** - नि+ग्रह् न.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ब.व. **तस्य** - तत् सर्व.पु.ष.ए.व. **प्रज्ञा** - प्रज्ञा स्त्री.प्र.ए.व. **प्रतिष्ठिता** - प्र+स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.स्त्री.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **इन्द्रियार्थेभ्य:** - इन्द्रियाणामर्था:-विषयास्तेभ्य इन्द्रियार्थेभ्य: = इंद्रियांचे अर्थ-विषय त्या विषयांपासून**(ष.त.स.)**

**या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।**

**यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुने: ॥६९॥**

**अन्वय:** - सर्वभूतानाम्, या, निशा, तस्याम्, संयमी, जागर्ति, यस्याम्, भूतानि, जाग्रति, सा, पश्यत:, मुने:, निशा ।

**अन्वयार्थ:** - **सर्वभूतानाम्** - सर्व प्राणीमात्रांची **या** - जी **निशा** - रात्र असते **तस्याम्** - तिच्यामध्ये **संयमी** - स्थितप्रज्ञ योगी **जागर्ति** - जागृत असतो **यस्याम्** - आणि जिच्यामध्ये **भूतानि** - प्राणिमात्र **जाग्रति** - जागतात **सा** - ती **पश्यत: मुने:** - ज्ञानवान मुनिची **निशा** - रात्र आहे.

**विवरण:** - परमार्थ दर्शन ही सर्व भूतांची रात्र आहे. कारण की, परमात्माप्राप्तिरूपी सूर्य उगवल्यानंतर वास्त विक शांति आणि नित्यानंदाचा प्रत्यक्ष अनुभव होतो. परंतु, परमात्मतत्त्व न समजणाऱ्या अज्ञानी पुरुषाकरिता परमार्थ दर्शन ही रात्र आहे. कारण, लोक आणि परलोकामध्ये जेवढे काही भोग आहेत ते सर्व नाशवान, क्षणिक, अनित्य आणि दु:खरूप आहेत. परंतु, त्या भोगाला अनादिसिद्ध अंधकारमय अज्ञानामुळे, विषयासक्त पुरुष नित्य आणि सुखरूप मानतात आणि विषय भोगाला प्राप्त करण्याकरिता दिवस -रात्र जागतात हा प्राणिमात्रांचा दिवस आहे. परमार्थतत्त्व समजणाऱ्या ज्ञानी पुरुषाकरिता तो दिवस रात्रिच्या समान आहे.

**व्याकरणम्** - **सर्वभूतानाम्** - सर्व वि. भूत भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.ष.ब.व. **या** - यत् सर्व.स्त्री.प्र.ए.व. **निशा** - निशा स्त्री.प्र.ए.व. **तस्याम्** - तत् सर्व.स्त्री.स.ए.व. **संयमी** - सम्+यम् प्र.ग./द.ग.प.प.+णिनि=संयमिन् वि.पु.प्र.ए.व. **जागर्ति** - जागृ द्वि.ग.प.प.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **यस्याम्** - यत् सर्व.स्त्री.स.ए.व. **जाग्रति** - जागृ द्वि.ग.प.प.लट् वर्त.तृ.पु.ब.व. **भूतानि** - भू प्र.ग.प.प.कर्म.भू.धा. वि.न.प्र.ब.व. **सा** - तत् सर्व.स्त्री.प्र.ए.व. **निशा** - निशा स्त्री.प्र.ए.व. **पश्यत:** - दृश् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.धा.वि.पु.ष.ए.व. **मुने:** - मुनि पु.ष.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **सर्वभूतानाम्** - सर्वाणि च तानि भूतानि च सर्वभूतानि तेषां सर्वभूतानाम् = सर्व आणि ती भूते सर्वभूते त्या सर्वभूतांचा**(क.स.)** यद्वा **सर्वभूतानाम्** - प्राचीनकर्मफलानुभूत्यै पुन:पुनर्भवन्ति जायन्त इति भूतानि तेषां सर्वभूतानां-सर्वप्राणिनाम् = पूर्वकर्मफलानुभूतिसाठी पुन:पुन: उत्पन्न होतात अशी भूते त्या सर्व भूतांची-प्राण्यांची**(वि.)** **संयमी** - संयमोऽस्यास्तीति संयमी = संयम आहे ज्याचा असा संयमी**(अस्यार्थे त.**

वि.)

समुद्राच्या दृष्टांताने ज्ञानी महापुरुषांच्या महिमेचे वर्णन -

**आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमाप: प्रविशन्ति यद्वत् ।**

**तद्वत्कामा यं प्रविशन्ति सर्वे स शान्तिमाप्नोति न कामकामी ॥७०॥**

**अन्वय:** - यद्वत्, आप:, आपूर्यमाणम्, अचलप्रतिष्ठम्, समुद्रम्, प्रविशन्ति, तद्वत्, सर्वे, कामा:, यम्, प्रविशन्ति, स:, शान्तिम्, आप्नोति, न, कामकामी ।

**अन्वयार्थ:** - **यद्वत्** - ज्याप्रमाणे **आप:** - पाणी **आपूर्यमाणम्** - चहूकडून परिपूर्ण झालेले असतांनाही **अचलप्रतिष्ठम्** - जो थोडा सुद्धा विचलीत होत नाही म्हणजे आपली मर्यादा सोडीत नाही अशा **समुद्रम्** - समुद्रामध्ये **प्रविशन्ति** - प्रवेश करते **तद्वत्** - त्याचप्रमाणे **सर्वे कामा:** - सर्व इच्छा **यम्** - ज्या पुरुषामध्ये **प्रविशन्ति** - प्रवेश करतात **स:** - तो **शान्तिम्** - शांतिला **आप्नोति** - प्राप्त होतो **न कामकामी**- विषयाची इच्छा करणारा शांतीला प्राप्त होत नाही.

**विवरण** - समुद्राचा दृष्टांत सांगून भगवान या श्लोकांत ज्ञानी पुरुषाच्या स्थितीचे वर्णन करतात. ज्याप्रमाणे अनेक प्रकारचे मोठे वादळ अथवा चहूकडून हजारो नद्यांचे पाणी जरी एकाच क्षणी आले तरी समुद्र आपल्या स्थितीपासून विचलित होत नाही. म्हणजे मर्यादेचा त्याग करीत नाही. त्याचप्रमाणे प्रारब्धानुसार इंद्रिये आणि विषयाचे अनुकूल प्रतिकूल होणारे संयोग आणि त्यांत राहणारे हर्ष-शोक, राग-द्वेष, काम-क्रोध, लोभ-मोह आणि उद्वेग हे सर्व विकार त्याच्या ठिकाणी प्राप्त झाले तरी ते त्याला आपल्या अचल स्थितीपासून अथवा मर्यादेपासून विचलित करू शकत नाहीत. असा भोगामध्ये आसक्तिरहित जो पुरुष तो परमशांतीला प्राप्त होतो. परंतु, भोगाची आसक्ति ज्याच्या अंत:करणामध्ये सदैव असते तो पुरुष मात्र परम शांतिला प्राप्त होत नाही.

**व्याकरणम्** - **यद्वत्** - यद्वत् अ. **आप:** - अप् स्त्री.प्र.ब.व. **आपूर्यमाणम्** - आ+पृ तृ.ग.आ.प.कर्म.वर्त.धा.वि.पु.द्वि.ए.व. **अचलप्रतिष्ठम्** - अचल वि. प्रति+स्था+अच्/क वि.पु.द्वि.ए.व. **समुद्रम्** - समुद्र पु.द्वि.ए.व. **प्रविशन्ति** - प्र+विश् ष.ग.प.प.लट् वर्त.तृ.पु.ब.व. **तद्वत्** - तद्वत् अ. **सर्वे** - सर्व सर्व.पु.प्र.ब.व. **कामा:** - काम पु.प्र.ब.व. **यम्** - यत् सर्व.पु.द्वि.ए.व. **प्रविशन्ति** - प्र+विश् ष.ग.प.प.लट् वर्त.तृ.पु.ब.व. **स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **शान्तिम्** - शम् च.ग.प.प.+क्तिन्=शान्ति स्त्री.द्वि.ए.व. **आप्नोति** - आप् पं.ग.प.प.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **न** - न अ. **कामकामी** - काम पु. कामिन् वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अचलप्रतिष्ठम्** - अचलतया प्रतिष्ठा-अवस्थितिर्यस्य स तमचलप्रतिष्ठम् = ज्याची प्रतिष्ठा -अवस्थिति अचलतेने असते-ज्याचे स्वरूप अगदी अचल असते त्यात वृद्धि किंवा क्षय हे विकार होत नाहीत त्या अचलप्रतिष्ठ समुद्रास**(ष.ब.स.)** यद्वा **अचलप्रतिष्ठम्** - अचला-चलनवर्जिता प्राक्तनस्वीयलक्षणमनतिक्रान्ता वृद्धिक्षयशून्या प्रतिष्ठा जलस्थितिमर्यादा यस्य सोऽचलप्रतिष्ठस्तमचलप्रतिष्ठम् = अचल-चलवर्जित पूर्वीच्या आपल्या लक्षणाचा त्याग न करता वृद्धिक्षयाने शून्य प्रतिष्ठा-जलाच्या स्थितिची मर्यादा ज्याची आहे तो अचलप्रतिष्ठ त्या अचलप्रतिष्ठ समुद्रास**(ष.ब.स.)** **कामकामी** - काम्यन्त इति

कामा:-विषयास्तान् कामयितुं शीलं यस्य स कामकामी = इच्छा केल्या जातात असे काम-विषय त्या इच्छा करण्याचे शील ज्याचे तो कामकामी**(ष.ब.स.)**

कामना, इच्छा, ममता व अहंकार आदिने रहित होणाऱ्या पुरुषाला श्रेष्ठ शांतिची प्राप्ती -

**विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निःस्पृहः ।**

**निर्ममो निरहङ्कारः स शान्तिमधिगच्छति ॥७१॥**

**अन्वयः** - यः, पुमान्, सर्वान्, कामान्, विहाय, निःस्पृहः, निर्ममः, निरहङ्कारः, चरति, सः, शान्तिम्, अधिगच्छति ।

**अन्वयार्थः - यः -** जो **पुमान्** - पुरुष **सर्वान् कामान्** - संपूर्ण कामनांचा **विहाय -** त्याग करून **निःस्पृहः** - स्पृहारहित **निर्ममः** - ममतारहित **निरहङ्कारः** - अहंकार रहित **चरति** - विचरतो **सः -** तो **शान्तिम्** - शांतिला **अधिगच्छति** - प्राप्त होतो.

**विवरण** - अज्ञानी पुरुष अनेक कामनांनी युक्त असतात. त्यांच्या कामवासना केव्हाही समाप्त होत नाहीत. परंतु ज्ञानी पुरुष त्याच्या विपरीत वर्तन करतो. कारण, तो एकही कामना अवशिष्ट न ठेवता संपूर्ण कामनांचा त्याग करतो. केवळ प्रारब्धानुसार शरीर (यात्रा) चालविण्याकरिता आवश्यकतेनुसार व्यवहार करतो. त्याचा तो व्यवहार निरिच्छ, ममतारहित आणि अहंकाररहित असतो. असा जो संपूर्ण कामनापासून तथा विकारापासून निवृत्त झालेला पुरुष परम शांतिला प्राप्त होतो.

**व्याकरणम्** - **यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **पुमान्** - 'पूञ् पवने'+डुमसुन्-असुन्+नुम् =पुमान् पु.प्र.ए.व. **सर्वान्** - सर्व सर्व.पु.द्वि.ब.व. **कामान्** - काम पु.द्वि.ब.व. **विहाय** - वि+हा तृ.ग.प.प.ल्यबन्त अ. **निःस्पृहः** - निःस्पृह वि.पु.प्र.ए.व. **निर्ममः** - निर्मम वि.पु.प्र.ए.व. **निरहङ्कारः** - निरहङ्कार वि.पु.प्र.ए.व. **चरति** - चर् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **शान्तिम्** - शान्ति स्त्री.द्वि.ए.व. **अधिगच्छति** - अधि+गम् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **निःस्पृहः** - निर्गता स्पृहा-इच्छा यस्य स निःस्पृहः = गेली इच्छा ज्याची तो निस्पृह **(ष.ब.स.) निर्ममः** - निर्गतो ममः-ममताबन्धो यस्य स निर्ममः = गेला माझेपणा ज्याचा तो निर्मम **(ष.ब.स.) निरहङ्कारः** - ब्रह्मैवाऽहमिति ब्रह्मण्येव निरूढात्मत्वाभिनिवेशेन देहान्निर्गतोऽहङ्कारोऽहमात्मिका बुद्धिर्यस्य स निरहङ्कारः **=** ब्रह्मच मी अशा प्रकारे ब्रह्मामध्येच आरूढ आत्मत्त्व अभिनिवेशाने देहापासून गेला आहे मी आत्मा आहे असा बुद्धिरूप अहंकार ज्याचा तो निरहंकार**(ष.ब.स.)**

ब्राह्मी स्थितिच्या माहात्म्याचे वर्णन करून अध्यायाचा उपसंहार -

**एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति ।**

**स्थित्वाऽस्यामन्तकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥७२॥**

**अन्वयः-** पार्थ, एषा, ब्राह्मी, स्थितिः, एनाम्, प्राप्य, न, विमुह्यति, अन्तकाले, अपि, अस्याम्, स्थित्वा, ब्रह्मनिर्वाणम्, ऋच्छति ।

**अन्वयार्थः** - **पार्थ** - हे अर्जुना! **एषा** - ही **ब्राह्मी स्थितिः** - ब्रह्माला प्राप्त होणाऱ्या पुरुषांची स्थिती आहे

**एनाम्** - या स्थितिला **प्राप्य** - प्राप्त करून **न विमुह्यति** - पुरुष मोहित होत नाही आणि **अन्तकाले अपि** - अंतकाली देखील **अस्याम्** - या ब्राह्मी अवस्थेमध्ये **स्थित्वा** - स्थित होवून **ब्रह्मनिर्वाणम्** - तो ब्रह्मानंदाला **ऋच्छति** - प्राप्त होतो.

**विवरण:** - हे अर्जुना! जो पुरुष उपर्युक्त कथित अहंकार, ममता, आसक्ति, स्पृहा आणि संपूर्ण कामनारहित होवून, सर्वथा निर्विकार आणि निश्चल भावाने परमात्म्याच्या स्वरूपामध्ये निरंतर निमग्न असतो. हीच त्याची ब्राह्मी स्थिती आहे. त्या स्थितीला प्राप्त झाल्यावर तो केव्हाही मोहित होत नाही. मरण समयाला सुद्धा तो ब्राह्मी स्थितीमध्ये स्थित होवून तो ब्रह्मानंदाला म्हणजे मोक्षाला प्राप्त होतो.

**व्याकरणम्** - **पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **एषा** - एतत् सर्व.स्त्री.प्र.ए.व. **ब्राह्मी** - ब्रह्मन्+अण्, टिलोप,ङीष्=ब्राह्मी स्त्री.प्र.ए.व. **स्थिति:** - स्था प्र.ग.प.प.+क्तिन्=स्थिति स्त्री.प्र.ए.व. **एनाम्** - एतत् सर्व.स्त्री.द्वि.ए.व. **प्राप्य** - प्र+आप् पं.ग.प.प.ल्यबन्त अ. **न** - क्रि.वि.अ. **विमुह्यति** - वि+मुह् च.ग.प.प.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **अन्तकाले** - अन्तकाल पु.स.ए.व. **अपि** - अपि अ. **अस्याम्** - इदम् सर्व.स्त्री.स.ए.व. **स्थित्वा** - स्था प्र.ग.प.प.त्वान्त अ. **ब्रह्मनिर्वाणम्** - ब्रह्म न. निर्+वा द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.द्वि.ए.व. **ऋच्छति** - ऋ प्र.ग.प.प.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **ब्रह्मनिर्वाणम्** - ब्रह्मणि निर्वाणम्-लयम्-निवृत्तिरिति ब्रह्मनिर्वाणम् = ब्रह्मामध्ये शेवट-लय निवृत्ति असे ब्रह्मनिर्वाण**(स.त.स.)** **पार्थ** - स्वस्वरूपं प्रकाश्य मुमुक्षुं संसारमृत्यो: पातीति प:-परमात्मा तमेवाऽर्थयते वाञ्छतीति पार्थस्तत्सम्बुद्धौ पार्थ = स्वस्वरूपाला प्रकाशित करून मुमुक्षुला संसाररूपी मृत्युपासून रक्षण करतो असा परमात्मा त्याचीच इच्छा करतो असा पार्थ त्याचे संबोधनामध्ये हे पार्थ**(वि.)** **ब्राह्मी** - ब्रह्मण इयमिति ब्राह्मी = ब्रह्माची ही अशी ब्राह्मी**(वि.)**

**ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे**

**श्रीकृष्णार्जुनसंवादे साङ्ख्ययोगो नाम द्वितीयोऽध्याय: ॥२॥**

**-: अध्याय दुसरा समाप्त :-**

**ॐ श्रीपरमात्मने नम:**

**अथ तृतीयोऽध्याय:**

**अर्जुन उवाच** - अर्जुन म्हणाला -

**ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन ।**

**तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ॥१॥**

**अन्वय:** - जनार्दन, चेत्, ते, कर्मण:, बुद्धि:, ज्यायसी, मता, तत्, केशव, माम्, घोरे, कर्मणि, किम्, नियोजयसि ।

**अन्वयार्थ:** - **जनार्दन** - हे श्रीकृष्णा! **चेत्** - जर **ते** - तुला **कर्मण:** - कर्मापेक्षा **बुद्धि:** - ज्ञान **ज्यायसी** - श्रेष्ठ **मता** - संमत आहे **तत्** - तर **केशव** - हे केशवा! **माम्** - मला **घोरे कर्मणि** - घोर कर्मात **किम्** - का **नियोजयसि** - नियुक्त करीत आहेस?

**विवरण** - दुसऱ्या अध्यायामध्ये भगवंताने एक सांख्यबुद्धि आणि दुसरी योगबुद्धि अशा दोन बुद्धिचे प्र तिपादन केलेले आहे. त्यामध्ये योगबुद्धिपेक्षा सांख्यबुद्धि श्रेष्ठ सांगितलेली आहे. कारण की, सांख्यबुद्धि हा निवृत्तिचा विषय आहे व योगबुद्धि हा प्रवृत्तिचा विषय आहे. सांख्यबुद्धि साध्य आहे आणि योगबुद्धि साधन आहे. या कारणास्तव योगबुद्धि सांख्यबुद्धिपेक्षा निकृष्ट आहे. असे असूनही भगवान सांगतात 'तू कर्म कर, तुझा कर्मामध्येच अधिकार आहे. कर्म न करण्याविषयी तू आग्रह करू नकोस.' म्हणजे ज्ञाननिष्ठेपेक्षा कर्म निकृष्ट आहे असे समजू नकोस. अधिकारानुरूप ज्ञान, कर्म यामध्ये श्रेष्ठ कनिष्ठ भाव आहे. परंतु त्या कर्मानेच तू कृतार्थ होशील असे काही सांगितले नाही; उलट 'कर्म बुद्धियोगाहून अत्यंत निकृष्ट आहे' असे सांगितले आहे. त्यामुळे अर्जुन व्याकुळ होवून म्हणतो की, हे कृष्णा! कर्मापेक्षा ज्ञान जर तुला श्रेष्ठ आहे तर मला युद्धरूपी घोर कर्मामध्ये कशाकरता नियुक्त करतोस.

**व्याकरणम्** - **जनार्दन** - जनार्दन पु.संबो.ए.व. **चेत्** - चेत् अ. **ते** - युष्मत् सर्व.ष.ए.व. **कर्मण:** - कर्मन् न.पं.ए.व. **बुद्धि:** - बुद्धि स्त्री.प्र.ए.व. **ज्यायसी** - वि.स्त्री.प्र.ए.व. **मता** - मन् च.ग.आ.प.कर्म.भूत.धा. वि.स्त्री.प्र.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व./अ. **केशव** - केशव पु.संबो.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **घोरे** - घोर वि.स.ए.व. **कर्मणि** - कर्मन् न.स.ए.व. **किम्** - किम् अ. **नियोजयसि** - नि+युज् स.ग.उ.प.+ णिच् लट्=नियोजय द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **जनार्दन** - जनं जननं तत्कारणमज्ञानं च स्वसाक्षात्कारेणाऽर्दयति-हिनस्तीति जनार्दनस्तत्सम्बुद्धौ जनार्दन = जन्म व त्याचे कारण अज्ञानास स्वसाक्षात्काराने अर्दन-नाश करतो असा जनार्दन त्याचे संबोधनामध्ये हे जनार्दन**(वि.)** यद्वा **जनार्दन** - जनान्-दुष्टजनान् अर्दयति-हिंसयतीति जनार्दनस्तत्सम्बुद्धौ जनार्दन = जनांना-दुष्टजनांना पीडा देतो असा जनार्दन त्याचे संबोधनामध्ये हे जनार्दन **(उप.स.)** यद्वा **जनार्दन** - सर्वैर्जनैरर्द्यते याच्यते स्वाभिलषितसिद्धय इति जनार्दनस्तत्सम्बुद्धौ हे जनार्दन = सर्व लोकांच्या द्वारा आपल्या अभिलषित वस्तुंच्या प्राप्तिकरिता आपण अर्दित-याचित-प्रार्थित होतो म्ह. आपण प्रार्थना करण्याकरिता योग्य आहे असा जनार्दन त्याचे संबोधनामध्ये हे जनार्दन**(वि.)** **केशव** - ब्रह्मा विष्णुरुद्रान् वाति-गच्छति नियामकत्वेनेति केशवस्तत्सम्बुद्धौ हे केशव = ब्रह्मा, विष्णु, महेश यांचे नियमन

करतो तो केशव त्याचे संबोधनामध्ये हे केशव **(वि.)** यद्वा **केशव** - ब्रह्माविष्णुरुद्रान्, वष्टि-इच्छति-तृणेढि सर्गादिकार्यायेति केशव: = ब्रह्मा विष्णु रुद्रांना सृष्ट्यादि कार्याकरिता नियमन करतो असा केशव**(वि.)** यद्वा **केशव** - केशिनामानं दैत्यं वाति-हिनस्ति, क्षणोति, तृणेढि, तृणतीति केशवस्तत्सम्बुद्धौ केशव = केशी नावाच्या दैत्याला मारतो असा केशव त्यांचे संबोधनामध्ये हे केशव**(वि.)**

**व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे ।**

**तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥२॥**

**अन्वय:** - व्यामिश्रेण, इव, वाक्येन, मे, बुद्धिम्, मोहयसि, इव, तत्, एकम्, निश्चित्य, वद, येन, अहम्, श्रेय:, आप्नुयाम् ।

**अन्वयार्थ: - व्यामिश्रेणेव** - अत्यधिक घोटाळ्यासारख्या **वाक्येन** - वाक्याने **मे** - माझ्या **बुद्धिम्** - बुद्धिला **मोहयसि इव** - मोह पाडल्यासारखे करीत आहेस **तत्** - यास्तव **एकम्** - एक **निश्चित्य** - निश्चित करून **वद** - मला सांग **येन** - ज्याच्यायोगाने **अहम्** - मी **श्रेय:** - श्रेष्ठ श्रेयाला **आप्नुयाम्** - प्राप्त होईल.

**विवरण** - आतापर्यंतच्या प्रतिपादित उपदेशामध्ये विरोध प्रगट होत असल्यामुळे आणि विचार करण्याची बुद्धि नष्ट झाल्यामुळे मी माझ्या कर्तव्याचा निश्चय करण्याकरिता असमर्थ झालो आहे. कारण एका ठिकाणी सांगतात की 'बुद्धियोगापेक्षा कर्म अत्यन्त निकृष्ट आहे, यास्तव तू बुद्धियोगाचाच आश्रय कर' आणि एका ठिकाणी सांगतो की, 'तुझा कर्मामध्येच अधिकार आहे म्हणून तू निष्काम भावाने कर्मच कर' अशा या मिश्रित वाक्याने माझी बुद्धि मोहित झालेली आहे. यास्तव माझे ज्याच्या योगाने परम कल्याण होईल असे श्रेय असणारे मला सांग.

**व्याकरणम् - व्यामिश्रेण** - व्यामिश्र वि.न.तृ.ए.व. **इव** - इव अ. **वाक्येन** - वाक्य न.तृ.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **बुद्धिम्** - बुद्धि स्त्री.द्वि.ए.व. **मोहयसि** - मुह् च.ग.प.प.+णिच्=मोहय लट् द्वि.पु.ए.व. **इव** - इव अ. **तत्** - तत् सर्व.न.द्वि.ए.व. **एकम्** - एक संख्या.वि.न.द्वि.ए.व. **निश्चित्य** - निश्चित्य निस्+चि पं.ग.उ.प.+ल्यबन्त अ. **वद** - वद् प्र.ग.प.प.लोट्-आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **येन** - यत् सर्व.पु.तृ.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **श्रेय:** - श्रेयस् वि.न.द्वि.ए.व. **आप्नुयाम्** - आप् पं.ग.प.प.विधिलिङ् प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - वाक्येन** - वक्तुम्-भाषितुं योग्यम्-हितकारकमिति वाक्यं तेन वाक्येन = बोलण्यास-भाषण करण्यास योग्य-हितकारक असे वाक्य त्या वाक्याने**(योग्यार्थे कृ.वि.) बुद्धिम्** - बोधनं क्रियत इति बुद्धिस्ताम् बुद्धिम् = ज्ञान केले जाते अशी बुद्धि त्या बुद्धिला**(वि.)** यद्वा **बुद्धिम्** - बोधनमिति बुद्धिस्ताम्बुद्धिम् = ज्ञान अशी बुद्धि त्या बुद्धिला**(वि.)**

अधिकार भेदाने दोन निष्ठेचे वर्णन -

**श्रीभगवानुवाच** - भगवान म्हणाले -

**लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानघ ।**

**ज्ञानयोगेन साङ्ख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥३॥**

**अन्वय:** - अनघ, अस्मिन्, लोके, द्विविधा, निष्ठा, मया, पुरा, प्रोक्ता, साङ्ख्यानाम्, ज्ञानयोगेन, योगिनाम्,

कर्मयोगेन ।

**अन्वयार्थ: - अनघ -** हे निष्पाप अर्जुना! **अस्मिन् लोके-** या लोकामध्ये **द्विविधा निष्ठा -** दोन प्रकारची निष्ठा **मया -** मी **पुरा -** पूर्वी **प्रोक्ता -** सांगितली **सांख्यानाम् -** सांख्ययोगी-ज्ञानी पुरुषांची निष्ठा **ज्ञानयोगेन -** ज्ञानयोगाने व **योगिनाम् -** योगी-कर्माधिकाऱ्यांची निष्ठा **कर्मयोगेन -** कर्मयोगाने होते.

**विवरण -** भगवान म्हणतात की, ही दोन प्रकारची निष्ठा आज मी तुला नवीन सांगण्याकरिता प्रारंभ केलेला नाही; कारण सृष्टीच्या आदिकालापासून तसेच भिन्न भिन्न अवतारामध्ये देखील या दोन्ही निष्ठेचे स्वरूप पृथक् पृथक् रूपाने सांगत आलेलो आहे. ज्ञान म्ह. परमार्थवस्तुचा-आत्म्याचा साक्षात्कार हाच परब्रह्माशी तादात्म्य पावण्याचा उपाय आहे या द्वारे सांख्यनिष्ठा सांगितली. सांख्य म्ह. आत्मा व अनात्मा यांच्या विवेकज्ञानाने युक्त असलेले म्ह. ज्ञानवान महात्मे व ते सुद्धा पुत्रादि एषणात्रयांचा त्याग केलेले व श्रवण, मनन, निदिध्यासनाच्या योगाने वेदांतविज्ञानाने पुरुषार्थ पूर्णपणे निश्चित केला आहे असे जे ब्रह्मनिष्ठ पुरुष आहेत अशा ब्रह्मनिष्ठांची-सांख्यांची ज्ञानयोगाने निष्ठा सांगितली व ज्यांचे चित्त शुद्ध झालेले नाही अशा कर्माधिकाऱ्यांना शास्त्रविहित तसेच वर्णाश्रमानुसार ज्या पुरुषाला ज्या कर्माचे विधान केलेले आहे त्याच कर्माचे श्रद्धापूर्वक अनुष्ठान करणे तसेच कर्माच्या फलाविषयी आसक्ति, ममता आणि कर्तृत्वाचा सर्वथा त्याग करून सिद्धि आणि असिद्धिमध्ये समता ठेवणे अशा या कर्मयोगाने योग्यांची-कर्माधिकाऱ्यांची निष्ठा सांगितली. याप्रकारे तुझ्याकरिताच मी ही दोन प्रकारची निष्ठा पृथक् पृथक् रूपाने करून सांगितली आहे.

**व्याकरणम् - अनघ -** अन्+अघ वि.पु.संबो.ए.व. **अस्मिन् -** इदं सर्व.पु.स.ए.व. **लोके -** लोक पु.स.ए.व. **द्विविधा -** द्वि+विधा द्विविधा संख्यावाचक वि.स्त्री.प्र.ए.व. **निष्ठा -** निष्ठा स्त्री.प्र.ए.व. **मया -** अस्मत् सर्व.तृ.ए.व. **पुरा -** पुरा अ. **प्रोक्ता -** प्र+वच् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.स्त्री.प्र.ए.व. **साङ्ख्यानाम् -** सांख्य वि.पु.ष.ब.व. **ज्ञानयोगेन -** ज्ञान न. योग पु.तृ.ए.व. **योगिनाम् -** योगिन् पु.ष.ब.व. **कर्मयोगेन -** कर्मयोग पु.तृ.ए.व.

**समासविग्रहार्था: - अनघ -** न विद्यते अघम्-पापं यस्य सोऽनघस्तत्सम्बुद्धौ हे अनघ = नाही अघ-पाप ज्याचे तो अनघ त्याचे संबोधनामध्ये हे अनघ**(ष.ब.स.) अनघ -** नास्ति अघम्-पापं दु:खं व्यसनं कालुष्यं वा यस्य सोऽनघस्तत्सम्बुद्धौ हे अनघ = नाही अघ-पाप, दु:ख, व्यसन अथवा कालुष्य ज्याचे तो अनघ त्याचे संबोधनामध्ये हे अनघ**(ब.स.) ज्ञानयोगेन -** ब्रह्मविद् ब्रह्मणा युज्यत एकीक्रियतेऽनेनेति योगो ज्ञानमेव योग इति ज्ञानयोगस्तेन ज्ञानयोगेन = ब्रह्मज्ञानी ब्रह्माशी जोडल्या जातो अथवा एक-ब्रह्मरूप केल्या जातो ज्याच्याने असा योग, ज्ञानच योग ज्ञानयोग त्या ज्ञानयोगाने**(क.स.) कर्मयोगेन -** युज्यते अभ्युदयोऽनेनेति योग: कर्मैव योग इति कर्मयोगस्तेन कर्मयोगेन = ज्याच्या द्वारा अभ्युदय-कल्याण प्राप्त केल्या जातो असा योग कर्मच योग कर्मयोग त्या कर्मयोगाने**(क.स.) द्विविधा -** द्वौ प्रकारौ यस्या: सा द्विविधा = दोन प्रकार जिचे ती द्विविधा**(प्रकारार्थे धाप्रत्ययान्त त.वि.) साङ्ख्यानाम्** - वेदान्तै: सर्वै: सम्यक् ख्यायते तात्पर्येण प्र तिपाद्यत इति सांख्यम्-निर्विशेषं परं ब्रह्म तदेव स्वात्मत्त्वेन ये विदुस्ते साङ्ख्या:-ब्रह्मविदस्तेषां साङ्ख्यानाम् -यतीनाम्-ब्रह्मज्ञानाम् = सर्व वेदांताच्याद्वारा चांगल्या प्रकारे सांगितल्या जाते तात्पर्याने प्रतिपादन केले जाते असे सांख्य-निर्विशेष परब्रह्म तेच स्वात्मत्त्वाने जे जाणतात ते सांख्य-ब्रह्मज्ञानी त्या सांख्यांची-संन्याशांची-ब्रह्मज्ञान्यांची**(वि.)**

कोणत्याही निष्ठेच्या सिद्धिसाठी कर्माच्या त्यागाचा स्वरूपाने निषेध -

**न कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ।**

**न च सन्न्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ।।४।।**

**अन्वयः** - पुरुषः, कर्मणाम्, अनारम्भात्, नैष्कर्म्यम्, न, अश्नुते, च, सन्न्यसनात्, एव, सिद्धिम्, न, स धिगच्छति ।

**अन्वयार्थः - पुरुषः** - मनुष्य **कर्मणाम्** - शास्त्रविहित कर्मानुष्ठानाचा **अनारम्भात्** - आरंभ केल्यावाचून **नैष्कर्म्यम्** - नैष्कर्म्य स्थितिला-ज्ञानयोग निष्ठेला **न अश्नुते** - प्राप्त होत नाही **च** - आणि **सन्न्यसनात् एव सि द्धिम्** - केवळ कर्माच्या त्यागमात्राने सिद्धि अथवा ज्ञानयोग निष्ठेला **न समधिगच्छति** - प्राप्त होत नाही.

**विवरण** - कर्माचे अनुष्ठान केल्यावाचून पुरुष सर्वकर्मशून्यतारूप ज्ञाननिष्ठेला प्राप्त होत नाही, कारण श्रुतिने ज्या कर्माचा आत्मज्ञानामध्ये विनियोग केलेला आहे. अशा त्या कर्माचे जर अनुष्ठान केले नाही तर चित्तशुद्धी होणार नाही आणि चित्तशुद्धी न झाल्यामुळे ज्ञानास अयोग्य आणि बहिर्मुख पुरुष नैष्कर्म्य-सर्वकर्मशून्यता म्हणजे ज्ञानयोगाच्याद्वारा निष्ठेला प्राप्त करण्याकरिता योग्य होत नाही आणि केवळ संन्यास धारण करूनही कोणी पुरुष सिद्धिला प्राप्त करू शकत नाही कारण; कर्मजनित चित्तशुद्धिच्या शिवाय संन्यास होवू शकत नाही. जरी उत्सुकता युक्त होऊन संन्यास ग्रहण केला तरी तो पुरुष सिद्धिला म्हणजे ज्ञाननिष्ठेला प्राप्त होत नाही.

**व्याकरणम् - पुरुषः** - पुरुष पु.प्र.ए.व. **कर्मणाम्** - कर्मन् न.ष.ब.व. **अनारम्भात्** - अन्+आरंभ पु.पं.ए.व. **नैष्कर्म्यम्** - निष्कर्मन्+ष्यञ्=नैष्कर्म्य न.द्वि.ए.व. **न** - न अ. **अश्नुते** - अश् पं.ग.आ.प.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **सन्न्यसनात्** - सम्+नि+अस् च.ग.प.प.+ल्युट्=सन्न्यसन न.पं.ए.व. **एव** - एव क्रि. वि.अ. **सिद्धिम्** - सिद्धि स्त्री.द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **समधिगच्छति** - सम्+अधि+गम् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अनारम्भात्** - देहेन्द्रियादिभिरेवाऽऽरभ्यते क्रियत इति आरम्भः, न आरम्भ इति अनारम्भस्तस्मादनारम्भात् = देहेंद्रियादिकांनीच आरंभ केला जातो असा आरंभ, नाही आरंभ असा अनारंभ त्या अनारंभाहून**(न.त.स.) नैष्कर्म्यम्** - न यत्र कर्म तन्निष्कर्म ब्रह्म 'निष्कलं निष्क्रियम्' इति श्रुतेः, तस्य भावो नैष्कर्म्यम् = नाही जेथे कर्म ते निष्कर्म-ब्रह्म 'निष्कल निष्क्रिय' या श्रुतिप्रमाणावरून, त्याचा भाव नैष्कर्म्य त्या नैष्कर्म्याला**(त.वि.)**

क्षणमात्राकरिता सुद्धा कर्माचा कोणत्याही प्रकारे त्यागाचा असंभव दाखविणे -

**न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।**

**कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ।।५।।**

**अन्वयः** - हि, कश्चित्, क्षणम्, अपि, अकर्मकृत्, जातु, न, तिष्ठति, प्रकृतिजैर्गुणैः, अवशः, सर्वः, कर्म, कार्यते ।

**अन्वयार्थः - हि** - कारण **कश्चित्** - कोणीही पुरुष **क्षणमपि** - क्षणमात्र देखील **अकर्मकृत्** - कर्म न करता

**जातु** - केव्हाही **न तिष्ठति** - रहात नाही (**हि**-कारण) **प्रकृतिजैर्गुणैः** - प्रकृतिजनित गुणांच्या द्वारा **अवशः** - परवश असलेला **सर्वः** - संपूर्ण मनुष्य समुदाय **कर्म** - कर्म **कार्यते** - (करण्याकरिता भाग पाडला जातो) करविला जातो.

**विवरण** - कोणीही पुरुष क्षणमात्रदेखील लौकीक अथवा वैदिक कर्माचे अनुष्ठान केल्यावाचून केव्हाही राहू शकत नाही कारण चित्तशुद्धिने रहित सत्त्व, रज आणि तमोगुणांच्याद्वारा अथवा आपल्या स्वभावजनित रागद्वेषादि गुणांच्याद्वारा अस्वतंत्र म्हणजे परवश असलेला पुरुषसमुदाय लौकीक आणि वैदिक कर्माचे अनुष्ठान करण्याकरिता बलात्काराने व्यग्र म्हणजे बाध्य केला जातो.

**व्याकरणम्** - **हि** - हि क्रि.वि.अ. **कश्चित्** - चित् प्रत्ययान्त किम् सर्व.अ. **क्षणम्** - क्षण पु.प्र.ए.व. **अपि** - अपि अ. **अकर्मकृत्** - अकर्म+कृ+कर्त.क्विप् 'ह्रस्वस्य पिति कृति तुक्' तुक्आगम=अकर्मकृत् अ.ग.उ.प. वि.पु.प्र.ए.व. **जातु** - जातु अ. **न** - न क्रि.वि.अ. **तिष्ठति** - स्था प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **प्रकृतिजैः** - प्र+कृ+क्तिन्=प्रकृति+ज=प्रकृतिज वि.पु.तृ.ब.व. **गुणैः** - गुण पु.तृ.ब.व. **अवशः** - अवश वि.पु.प्र.ए.व. **सर्वः** - सर्व वि.पु.प्र.ए.व. **कर्मः** - कर्मन् न.प्र.ए.व. **कार्यते** - कृ अ.ग.उ.प. प्रयोजक कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **अकर्मकृत्** - न कर्मकृदित्यकर्मकृत् = नाही कर्म करणारा असा अकर्मकृत**(न.त.स.)** **अवशः** - न वश इत्यवशः = नाही वश असा अवश**(न.त.स.)** **प्रकृतिजैः**- सत्वरजस्तमोगुणात्मिका मूल प्रकृतिस्तस्याः सकाशाज्जाताः प्रकृतिजास्तैः प्रकृतिजैः = सत्वरजतमोगुणात्मक मूल प्रकृतिपासून उत्पन्न झालेले प्रकृतिज त्या प्रकृतिपासून झालेल्या**(पं.त.स.)**

कर्म न करणाऱ्या व विषयाचे चिंतन करणाऱ्या या पुरुषास मिथ्याचारी दाखविणे -

**कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ।**

**इन्द्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥६॥**

**अन्वयः**- यः, विमूढात्मा, कर्मेन्द्रियाणि, संयम्य, मनसा, इन्द्रियार्थान्, स्मरन्, आस्ते, सः, मिथ्याचारः, उच्यते ।

**अन्वयार्थः** - **यः** - जो **विमूढात्मा** - अत्यंत मूढबुद्धि पुरुष **कर्मेन्द्रियाणि** - कर्मेन्द्रियांचे **संयम्य** - संयमन करून **इन्द्रियार्थान्** - विषयांचे **मनसा** - मनाने **स्मरन्** - स्मरण करीत **आस्ते** - राहातो **सः** - तो **मिथ्याचारः** - दांभिक **उच्यते** - म्हटला जातो.

**विवरण** - रागद्वेषादिने युक्त अंतःकरणवाला जो मूढबुद्धि पुरुष वाक्, पाणि आदि कर्मेन्द्रियांचे संयमन करून केवळ बाह्येंद्रियांच्या द्वारा कर्म न करता रागादि प्रेरित मनाच्या द्वारा इंद्रियांच्या शब्दादिविषयांचे चिंतन करीत राहतो. असा चित्तशुद्धिने रहित तसेच फलाला प्राप्त करण्याकरीता अयोग्य पुरुष पापाचारी म्हणजे ढोंगी म्हटला जातो.

**व्याकरणम्** - **यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **विमूढात्मा** - विमूढ वि+मुह् च.ग.प.प.कर्त.भूत.धा.वि. आत्मन् पु.प्र.ए.व. **कर्मेन्द्रियाणि** - कर्मन् न. इन्द्रिय न.द्वि.ब.व. **संयम्य** - सम्+यम् प्र.ग.प.प.ल्यबन्त अ. **मनसा** - मनस् न.तृ.ए.व. **इन्द्रियार्थान्** - इन्द्रिय न. अर्थ पु.द्वि.ब.व. **स्मरन्** - स्मृ प्र.ग.प.प.कर्त.वर्त.शतृ=स्मरत्

वि.पु.प्र.ए.व. **आस्ते** - आस् द्वि.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **मिथ्याचारः** - मिथ्या+आचार पु.प्र.ए.व. **उच्यते** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - विमूढात्मा** - विशेषेण मूढ इति विमूढः-कार्याकार्यविवेकरहित आत्मा-बुद्धिर्यस्य स विमूढात्मा = विशेषकरून मूर्ख (अज्ञानी) असा विमूढ-कर्तव्य व अकर्तव्य यांच्या विवेकाने रहित आत्मा-बुद्धि ज्याची तो विमूढात्मा म्हणजे विशेष अज्ञानी**(ष.ब.स.) इन्द्रियार्थान्** - इन्द्रियाणामर्थाः-शब्दादिविषया इतीन्द्रियार्थास्तानिन्द्रियार्थान् = इंद्रियांचे अर्थ-शब्दादिविषय असे इंद्रियार्थ त्या इंद्रियार्थांना-शब्दादि विषयांना**(ष.त.स.) मिथ्याचारः** - मिथ्याभूत आचारो यस्य स मिथ्याचारः = मिथ्याभूत आचार ज्याचा तो मिथ्याचार**(ष.ब.स.) कर्मेन्द्रियाणि** - कर्मसाधनानि इंद्रियाणीति कर्मेन्द्रियाणि = कर्माची साधने इंद्रिये अशी कर्मेंद्रिये**(मध्यमपदलोपी स.)**

मनाने इंद्रियांचे संयमन करून अनासक्त भावाने कर्म करणाऱ्याची स्तुति -

**यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन।**

**कर्मेन्द्रियैःकर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥७॥**

**अन्वयः** - अर्जुन, तु, यः, इन्द्रियाणि, मनसा, नियम्य, असक्तः, कर्मेन्द्रियैः, कर्मयोगम्, आरभते, सः, वि शिष्यते।

**अन्वयार्थः - अर्जुन** - हे अर्जुना! **तु** - परंतु **यः** - जो **इन्द्रियाणि** - ज्ञानेंद्रियांचा **मनसा** - मनाने **नियम्य** - निग्रह करून **असक्तः** - अनासक्त भावाने **कर्मेन्द्रियैः** - कर्मेन्द्रियांच्या द्वारा **कर्मयोगम्** - कर्मयोगाचा **आरभते** - आरंभ करतो **सः** - तो पुरुष **विशिष्यते** - विशेष म्हणजे श्रेष्ठ म्हटला जातो.

**विवरण** - हे अर्जुना उपर्युक्त प्रतिपादित चित्तशुद्धिरहित पुरुषाच्या विपरीत जो शुद्ध अंतःकरणयुक्त विवेकी पुरुष आहे. तो श्रोत्रादि ज्ञानेंद्रियांचे विवेक युक्त मनाने नियमन करून तसेच पापाला कारण असणारी जी विषयासक्ति तिचादेखील पूर्णतया त्याग करून म्हणजे आसक्तिरहित होवून वाक्, पाणि आदि कर्मेन्द्रियांच्या द्वारा शास्त्रविहित कर्माचे अनुष्ठान म्हणजे कर्मयोगाचा आरंभ करतो तो पुरुष मिथ्याचारी पुरुषापेक्षा अधिक फलाला प्राप्त करीत असल्यामुळे अधिक श्रेष्ठ म्हटला जातो.

**व्याकरणम् - अर्जुन** - पु.संबो.ए.व. **तु** - उभ.अ. **यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **इन्द्रियाणि** - इन्द्रिय न. द्वि.ब.व. **नियम्य** - नि+यम् प्र.ग.प.प.ल्यबन्त अ. **असक्तः** - अ+'षञ्ज् सङ्गे' प्र.ग.प.प.कर्म.भू.धा. वि.पु.प्र.ए.व. **कर्मेन्द्रियैः** - कर्मन् न. इन्द्रिय न.तृ.ब.व. **कर्मयोगम्** - कर्म+योग पु.द्वि.ए.व. **आरभते** - आ+रभ् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **विशिष्यते** - वि+शिष् स.ग.प.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - कर्मयोगम्** - कर्म एव योग इति कर्मयोगस्तम् कर्मयोगम् = कर्मच योग असा कर्मयोग त्या कर्मयोगाला**(क.स.) असक्तः** - न सक्त इत्यसक्तः = नाही सक्त असा असक्त**(न.त.स.)**

कर्म न करण्यापेक्षा कर्म करणे श्रेष्ठ व कर्माशिवाय देहनिर्वाह असंभव हे दाखवून असक्त भावाने कर्म करण्याची आज्ञा -

**नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मण: ।**

**शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मण: ॥८॥**

**अन्वय:** - त्वम्, नियतम्, कर्म, कुरु, हि, अकर्मण:, कर्म, ज्याय:, च, अकर्मण:, ते, शरीरयात्रा, अपि, न, प्रसिद्ध्येत् ।

**अन्वयार्थ:** - **त्वम्** - तूं **नियतम् कर्म** - शास्त्रविहित नित्य कर्म **कुरु** - कर **हि** - कारण **अकर्मण:** - कर्म न करण्यापेक्षा **कर्म** - कर्म करणे **ज्याय:** - अधिक चांगले आहे **च** - आणि **अकर्मण:** - कर्म न करण्याने **ते** - तुझा **शरीरयात्रा अपि** - शरीर निर्वाहही **न प्रसिद्ध्येत्** - सिद्धिला जाणार नाही.

**विवरण** - वर सांगितल्याप्रमाणे तूं शास्त्रविहित नित्य, नैमित्तिक कर्माचे अनुष्ठान कर कारण कर्म न करण्यापेक्षा कर्म करणे हे अत्यधिक चांगले आहे. जर कर्म नाही केले तर चित्त शुद्ध होणार नाही, चित्त शुद्ध झाले नाही तर वांछित फल प्राप्त होणार नाही. यास्तव कर्म न करण्यापेक्षा चित्त शुद्धिकरिता उपर्युक्त शास्त्रवि हित अशा प्रकारचे कर्म करणे हे श्रेयस्कर आहे आणि कर्म न करण्याने तुझी शरीरयात्रा देखील चालणार नाही कारण शरीर सुद्धा कर्माच्याद्वारा निर्माण झालेले आहे यास्तव कर्मरहित होवून राहण्यापेक्षा कर्म करणे हे आत्यंतिक श्रेयस्कर आहे.

**व्याकरणम्** - **त्वम्** - युष्मत् सर्व.प्र.ए.व. **नियतम्** - नि+यम् प्र.ग.प.प.भावे क्त वि.न.द्वि.ए.व. **कर्म** - कर्मन् न.द्वि.ए.व. **कुरु** - कृ अ.ग.उ.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **हि** - हि क्रि.वि.अ. **अकर्मण:** - अ+कर्मन् न.पं.ए.व. **कर्म** - कर्मन् न.प्र.ए.व. **ज्याय:** - ज्यायस् वि.न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **अकर्मण:** - अ+कर्मन् न.पं.ए.व. **ते** - युष्मत् सर्व.ष.ए.व. **शरीरयात्रा** - शॄ न.ग.प.प.+ईरन्=शरीर न. यात्रा स्त्री.प्र.ए.व. **अपि** - अ. **न** - न क्रि.वि.अ. **प्रसिद्ध्येत्** - प्र+षिध् च.ग.प.प.कर्त.विधिलिङ् तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अकर्मण:** - न कर्म, इत्यकर्म तस्मादकर्मण: = नाही कर्म असे अकर्म त्या अकर्माहून **(न.त.स.)** **अकर्मण:** - येन न संभाव्यते कर्मबन्ध: पुरुषस्य स कर्मसन्न्यासस्तस्मादकर्मण: = ज्याने नाही संभवत कर्मबंध पुरुषाचा तो अकर्म अर्थात् कर्मसंन्यास त्या कर्मसंन्यासाहून **(न.त.स.)**

कर्म बंधाला कारण होत असल्यामुळे तू ईश्वरप्रीत्यर्थ आसक्तिरहित होवून कर्म कर अशी आज्ञा -

**यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धन: ।**

**तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसङ्ग: समाचर ॥९॥**

**अन्वय:** - यज्ञार्थात्, कर्मण:, अन्यत्र, अयम्, लोक:,कर्मबन्धन:, (तस्मात्), कौन्तेय, मुक्तसङ्ग:, तदर्थम्, कर्म, समाचर ।

**अन्वयार्थ:** - **यज्ञार्थात् कर्मण:** - यज्ञार्थ-ईश्वरप्रीत्यर्थ केलेल्या कर्मावाचून **अन्यत्र** - दुसऱ्या कर्मांत (प्रवृत्त झालेला) **अयम् लोक:** - हा मनुष्य समुदाय **कर्मबन्धन:** - कर्मांनी बांधला जातो (**तस्मात्** - म्हणून) **कौन्तेय** - हे कुन्तीपुत्र अर्जुना! **मुक्तसङ्ग:** - कर्मफलाविषयी आसक्तिरहित होवून **तदर्थम्** - ईश्वरप्रीत्यर्थ **कर्म** - कर्म **समाचर** - कर.

**विवरण** - 'यज्ञो वै विष्णु:'- यज्ञच विष्णु आहे या श्रुतिवरून यज्ञ-परमेश्वर प्रीत्यर्थ केल्या जाणाऱ्या कर्माच्या

अतिरिक्त जे अन्य कर्म आहे अशा त्या कर्माच्याद्वारा कर्माधिकारी पुरुष बंधाला कारणीभूत होतो. म्हणजे त्याला अन्य कर्म बंधाला कारण होते. 'कर्मणा बध्यते जन्तु:, विद्यया च विमुच्यते' म्हणून भगवान म्हणतात की हे अर्जुना! आसक्तिचा त्याग करून परमेश्वराची आराधना करीत चांगल्या प्रकाराने कर्माचे आचरण कर.

**व्याकरणम् - यज्ञार्थात् -** यज्ञ पु. अर्थ पु.पं.ए.व. **कर्मण: -** कर्मन् न.पं.ए.व. **अन्यत्र -** त्रल् प्रत्ययान्त सप्तम्यन्त तद्धि.अ. **अयम् -** इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **लोक: -** लोक पु.प्र.ए.व. **कर्मबन्धन: -** कर्म+बंधन पु.प्र.ए.व. **तस्मात् -** तत् सर्व.पु.पं.ए.व./अ. **कौन्तेय -** कौन्तेय पु.संबो.ए.व. **मुक्तसङ्ग: -** मुच् ष.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि. सङ्ग पु.प्र.ए.व. **तदर्थम् -** तत् सर्व. अर्थ पु.द्वि.ए.व. **कर्म -** कर्मन् न.द्वि.ए.व. **समाचर -** सम्+आ+चर् प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - यज्ञार्थात् -** यज्ञो विष्णु: तस्यार्थ:-आराधनं यस्मिन् स यज्ञार्थस्तस्माद्यज्ञार्थात् = यज्ञ विष्णु त्याचा अर्थ-पूजा ज्याच्यामध्ये तो यज्ञार्थ त्या यज्ञार्थाहून (विष्णुपूजेहून)**(स.ब.स.)** यद्वा **यज्ञार्थात् -** 'यज्ञो वै विष्णु:' इति श्रवणाद्यज्ञस्यश्रीविष्णो: परमेश्वरस्याऽर्थम् सन्तुष्टिनिमित्तं यत्कर्म क्रियते वैदिकं तद्यज्ञार्थं तस्माद्यज्ञार्थात् = 'यज्ञच विष्णु आहे' अशा श्रवणामुळे यज्ञ श्रीविष्णुच्या-परमेश्वराच्या संतुष्टिनिमित्त जे कर्म केले जाते ते यज्ञार्थ त्या यज्ञार्थाहून**(च.त.स.) कर्मबन्धन: -** कर्मैव बंधनं जन्मादेर्निबन्धनं हेतुर्यस्य स कर्मबन्धन: = कर्मच बंधन-जन्मादिकाचे निबंधन-कारण ज्याचे तो कर्मबंधन**(ष.ब.स.) मुक्तसङ्ग: -** मुक्त:-त्यक्त: सङ्ग:-कर्मफलसङ्गो येन स मुक्तसङ्ग: = मुक्त म्हणजे कर्मफलाचा त्याग ज्याने केला तो मुक्तसङ्ग**(तृ.ब.स.) तदर्थम् -** तस्मै परमेश्वराय अर्थम्(तदर्थम्)-सन्तुष्टिनिमित्तम्-प्रीत्यर्थं यत्कर्म क्रियते तत्तदर्थम् = त्या परमेश्वरसंतुष्टीनिमित्त-प्रीतिकरिता जे कर्म केले जाते ते तदर्थ**(च.त.स.)**

प्रजापतिची आज्ञा असल्यामुळे कर्माच्या कर्तव्यतेचे कथन -

**सहयज्ञा: प्रजा: सृष्ट्वा पुरोवाच प्रजापति: ।**

**अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥१०॥**

**अन्वय: -** पुरा, प्रजापति:, सहयज्ञा:, प्रजा:, सृष्ट्वा, अनेन, प्रसविष्यध्वम्, एष:, व:, इष्टकामधुक्, अस्तु, इति, उवाच ।

**अन्वयार्थ: - पुरा -** कल्पाच्या आरंभी **प्रजापति: -** प्रजापति ब्रह्मदेव **सहयज्ञा: -** यज्ञासहित वर्तमान **प्रजा: -** प्रजा **सृष्ट्वा -** उत्पन्न करून **अनेन -** त्या यज्ञाच्या योगाने **प्रसविष्यध्वम् -** तुम्ही आपली वाढ करून घ्या **एष: -** हा यज्ञ **व: -** तुमच्या लोकांचे **इष्टकामधुक् -** इच्छित भोग प्रदान करणारा **अस्तु -** होवो **इति -** असे **उवाच -** प्रजापति म्हणाला.

**विवरण -** प्रजापतिने कल्पाच्या आरंभी यज्ञासहित प्रजेची रचना करून (प्रजापति ब्रह्मदेव प्रजेला म्हणतो की) 'या यज्ञाच्या द्वारा तुम्ही आपापली उत्तरोत्तर वृद्धी प्राप्त करून घ्या. हा जो शास्त्रविधिच्या द्वारा प्रतिपादित यज्ञ आहे, तो तुमच्या अंत:करणामध्ये विहित असणाऱ्या अभीष्ट फलाला प्राप्त करणारा होवो' असे प्रजापति म्हणाला.

**व्याकरणम् - पुरा -** पुरा अ. **प्रजापति: -** प्रजा स्त्री. पति पु.प्र.ए.व. **सहयज्ञा: -** सह अ. यज्ञ पु.प्र.ब.व. **प्रजा: -** प्रजा स्त्री.द्वि.ब.व. **सृष्ट्वा -** सृज् च.ग.आ.प./ष.ग.प.प.त्वान्त अ. **अनेन -** इदम् सर्व.पु.तृ.ए.व.

**प्रसविष्यध्वम् -** प्र+सू च.ग.आ.प.आज्ञार्थ कर्म.द्वि.पु.ब.व. **एषः -** एतत् सर्व.पु.प्र.ए.व. **वः -** युष्मत् सर्व.ष.ब.व. **इष्टकामधुक् -** इष् ष.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. काम पु. दुह् पु.प्र.ए.व. **अस्तु -** अस् द्वि.ग.प.प.आज्ञार्थ तृ.पु.ए.व. **इति -** इति क्रि.वि.अ. **उवाच -** वच् द्वि.ग.प.प.परोक्ष भूत.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - प्रजापतिः -** प्रजानां पतिरिति प्रजापतिः = प्रजेचा स्वामी असा प्रजापति**(ष.त.स.) इष्टकामधुक् -** दोग्धीति धुग्, इष्टानाम्-कामानां धुगितीष्टकामधुक् = दोहन करतो असा धुक् इच्छित कामांचे दोहन करणारा असा इष्टकामधुक्**(ष.त.स.) सहयज्ञाः -** यज्ञेन सह-विहितकर्मकलापेन सह वर्तन्त इति सहयज्ञाः = यज्ञासह-विहित कर्मकलापाच्या बरोबर राहतात असे सहयज्ञ**(तृ.त.स.)**

**देवान्भावयतानेन ते देवा भावयन्तु वः ।**

**परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ ॥११॥**

**अन्वयः -** अनेन, देवान्, भावयत, ते, देवाः, वः, भावयन्तु, एवम्, परस्परम्, भावयन्तः, परम्, श्रेयः, अवाप्स्यथ ।

**अन्वयार्थः - अनेन -** या यज्ञाच्या द्वारा **देवान् -** तुम्ही इंद्रादि देवांना **भावयत -** संतुष्ट करा **ते -** ते **देवाः -** देव **वः -** तुमची **भावयन्तु -** वृद्धि करोत **एवम् -** याप्रमाणे **परस्परम् भावयन्तः -** निःस्वार्थभावाने एक दुसऱ्याची वृद्धि करणारे असे तुम्ही सर्व **श्रेयः -** स्वर्गरूप परम कल्याण **अवाप्स्यथ -** प्राप्त करून घ्याल.

**विवरण -** असा जो उपर्युक्त प्रतिपादित यज्ञ आहे. त्याच्या द्वारा तुम्ही देवतांची तृप्ति करा आणि त्याचप्रमाणे तुमच्याद्वारा तृप्त झालेले देवतालोक वृष्टि आदीच्या द्वारा अन्न उत्पन्न करून तुमची वृद्धि म्हणजे तृप्ति करतील याप्रमाणे एक दुसऱ्याला तृप्त करणारे तुम्ही आणि देवता लोक परमश्रेय म्हणजे आपापल्या अभीष्ट अर्थाला प्राप्त कराल म्हणजे देवलोक व तुम्ही आपल्या परम श्रेयाला प्राप्त कराल.

**व्याकरणम् - अनेन -** इदम् सर्व.पु.तृ.ए.व. **देवान् -** देव पु.द्वि.ब.व. **भावयत -** भू प्र.ग.प.प.प्रयोजक आज्ञार्थ द्वि.पु.ब.व. **ते -** तत् सर्व.पु.प्र.ब.व. **देवाः -** देव पु.प्र.ब.व. **वः -** युष्मत् सर्व.द्वि.ब.व. **भावयन्तु -** भू प्र.ग.प.प.+णिच्=भावय लोट् तृ.पु.ब.व. **एवम् -** क्रि.वि.अ. **परस्परम् -** परस्पर वि.पु.द्वि.ए.व. **भावयन्तः -** भू प्र.ग.प.प.+णिच्+कर्त.शतृ=भावयत् वि.पु.प्र.ब.व. **परम् -** पर वि.न.द्वि.ए.व. **श्रेयः -** श्रेयस् वि.न.द्वि.ए.व. **अवाप्स्यथ -** अव+आप् पं.ग.प.प.लृट् द्वि.भवि.द्वि.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - देवाः -** दिव्यन्ति प्रकाशयन्तीति देवाः - प्रकाशित करतात किंवा प्रकाशरूप असतात असे देव**(वि.) परस्परम् -** परं परं प्रति परस्परम्-अन्योऽन्यम् = एकमेकास-एक दुसऱ्याला**(वि.)**

**इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविताः ।**

**तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुङ्क्ते स्तेन एव सः ॥१२॥**

**अन्वयः -** यज्ञभाविताः, देवाः, वः, इष्टान्, भोगान्, हि, दास्यन्ते, तैः, दत्तान्, एभ्यः, अप्रदाय, यः, भुङ्क्ते, सः, स्तेनः, एव ।

**अन्वयार्थः - यज्ञभाविताः देवाः -** यज्ञाच्यायोगाने संतुष्ट झालेले देव **वः -** तुम्हाला **इष्टान् भोगान् हि -** इच्छित असलेले भोगच **दास्यन्ते -** देतील **तैः -** त्यांनी **दत्तान् -** दिलेल्या वस्तूंना **एभ्यः -** त्या देवांना

**अप्रदाय** - न देवून किंवा न देता **य:** - जो **भुङ्क्ते**- स्वयं उपभोग घेतो **स:** - तो **स्तेन: एव** - चोरच आहे असे समजावे.

**विवरण** - यज्ञाच्याद्वारा तृप्त झालेले देवतालोक तुम्हाला इष्ट म्हणजे पशु, अन्न आणि सुवर्ण आदि इच्छित भोग प्रदान करतील जर त्यांनी ऋणाच्या हेतूने प्रदान केलेल्या भोगांचा त्यांच्या प्रीत्यर्थ विनियोग न करता केवळ आपला देह आणि इंद्रियांची तृप्ति करतो असा तो पुरुष देवतांच्या धनाचा हरण करणारा चोरच आहे असे समजावे.

**व्याकरणम्** - **यज्ञभाविता:** - यज्ञ पु. भू प्र.ग.प.प.प्रयोजक कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **देवा:** - देव पु.प्र.ब.व. **व:** - युष्मत् सर्व.च.ब.व. **इष्टान्** - इष् ष.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.द्वि.ब.व. **भोगान्** - भोग पु. द्वि.ब.व. **हि** - हि क्रि.वि.अ. **दास्यन्ते** - दा प्र.ग.प.प.द्वि.भवि.कर्त.तृ.पु.ब.व. **तै:** - तत् सर्व.पु.तृ.ब.व. **दत्तान्** - दा प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.द्वि.ब.व. **एभ्य:** - इदम् सर्व.च.ब.व. **अप्रदाय** - अ+प्र+दा प्र.ग.प.प.ल्यबन्त अ. **य:** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **भुङ्क्ते** - भुज् स.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **स्तेन:** - स्तेन पु.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ.

**समासविग्रहार्था:** - **यज्ञभाविता:** - श्रौतै: स्मार्तैश्च यज्ञैर्भाविता यज्ञभाविता: = श्रौत यज्ञांनी आणि स्मार्त यज्ञांनी संतुष्ट झालेले यज्ञभावित **(तृ.त.स.)**

यज्ञशिष्ट अन्नाने सर्व पापांचा नाश आणि यज्ञ न करणारांना पापी दाखविणे -

**यज्ञशिष्टाशिन: सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषै: ।**

**भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात् ॥१३॥**

**अन्वय:** - यज्ञशिष्टाशिन:, सन्त:, सर्वकिल्बिषै:, मुच्यन्ते, तु, ये, आत्मकारणात्, पचन्ति, ते, पापा:, अघम्, भुञ्जते ।

**अन्वयार्थ:** - **यज्ञशिष्टाशिन:** - यज्ञ करून अवशिष्ट राहिलेले अन्न भक्षण करणारे **सन्त:** - श्रेष्ठ पुरुष **सर्व किल्बिषै:** - संपूर्ण पापापासून **मुच्यन्ते** - मुक्त केले जातात **तु** - परंतु **ये** - जे **आत्मकारणात्** - आपले स्वत:चे शरीर पोषण करण्याकरिता **पचन्ति** - पाक सिद्धि करतात **ते पापा:** - ते पापी लोक **अघम्** - पापाला **भुञ्जते** - भक्षण करतात.

**विवरण** - जे श्रेष्ठ पुरुष वैश्वदेवादि यज्ञ करून अवशिष्ट राहिलेले अन्न म्हणजे अमृत भक्षण करतात. ते 'कण्डनी पेषणी चुल्ली उदकुम्भी च मार्जनी' तसेच भूत आणि भविष्यकालीन संपूर्ण पापापासून मुक्त होतात. परंतु जे वैश्वदेवादि यज्ञ न करणारे पुरुष केवळ आपले शरीर श्रेष्ठ (पुष्ट) करण्याकरिताच पाक सिद्धि करतात, ते पांच प्रकारच्या तसेच भूत आणि भविष्यकालीन संपूर्ण पापापासून मुक्त न होणारे पापी लोक केवळ पापच भक्षण करतात.

**व्याकरणम्** - **यज्ञशिष्टाशिन:** - यज्ञ पु. शिष् स.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. अशिन् पु.प्र.ब.व. **सन्त:** - अस् द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.धा.वि.पु.प्र.ब.व. **सर्वकिल्बिषै:** - सर्व वि. किल्बिष वि.न.तृ.ब.व. **मुच्यन्ते** - मुच् ष.ग.उ.प.कर्म.वर्त.तृ.पु.ब.व. **तु** - तु निश्चयार्थक अ. **ते** - तत् सर्व.पु.प्र.ब.व. **पापा:** - पाप वि.पु.प्र.ब.व. **अघम्** - अघ न.द्वि.ए.व. **भुञ्जते** - भुज् स.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व. **ये** - यत्

सर्व.पु.प्र.ब.व. **आत्मकारणात्** - आत्मन् पु. कारण पु.पं.ए.व. **पचन्ति** - पच् प्र.ग.उ.प.लट् वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - यज्ञशिष्टाशिनः** - यज्ञेभ्यः शिष्टम्-अवशिष्टं यज्ञशिष्टम्, यज्ञशिष्टमश्नन्ति ते यज्ञशिष्टाशिनः = यज्ञ केल्यानंतर शिल्लक राहते ते यज्ञशिष्ट, यज्ञशिष्टाला भक्षण करणारे ते यज्ञशिष्टाशी**(पं.ग.उप.स.)** यद्वा **यज्ञशिष्टाशिनः** - देवयज्ञादीन् निर्वर्त्य तच्छिष्टमशनममृताख्यमशितुं शीलं येषां ते यज्ञशिष्टाशिनः = देवयज्ञ, पितृयज्ञ, मनुष्ययज्ञ, भूतयज्ञ व ब्रह्मयज्ञ असे यज्ञ करून त्यातून अवशिष्ट राहिलेले अमृत या नावाचे अन्न खाण्याचे ज्यांचे शील-स्वभाव आहे ते यज्ञशिष्ट अन्न भक्षण करणारे**(ष.ब.स.)** **सर्वकिल्बिषैः** - सर्वाणि च तानि किल्बिषाणि-चुल्ल्यादि पञ्चसूनाजनितपातकानि च सर्वकिल्बिषाणि तैः सर्वकिल्बिषैः = चुल्ल्यादि सर्व पापे त्या सर्व पापांकडून**(क.स.)** **आत्मकारणात्** - आत्मनः कारणमात्मकारणं तस्मादात्मकारणात् = स्वतःचे शरीर स्वशरीर त्या स्वतःच्या शरीराकरिता**(ष.त.स.)**

सृष्टिचक्राचे वर्णन व सर्वव्यापी परमेश्वराला यज्ञरूप साधनामध्ये नित्य प्रतिष्ठित दाखविणे -

**अन्नाद्भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसम्भवः ।**

**यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥१४॥**

**अन्वयः** - अन्नात्, भूतानि, भवन्ति, पर्जन्यात्, अन्नसम्भवः, यज्ञात्, पर्जन्यः, भवति, यज्ञः, कर्मसमुद्भवः, भवति ।

**अन्वयार्थः - अन्नात्** - तांदूळ, गहू इ. भक्षण केलेल्या अन्नापासून **भूतानि** - भूते **भवन्ति** - उत्पन्न होतात **पर्जन्यात्** - वृष्टिपासून **अन्नसम्भवः** - अन्नाची उत्पत्ति होते **यज्ञात्** - यज्ञापासून **पर्जन्यः** - पाऊस **भवति** - होतो **यज्ञः** - अपूर्व नावाचा यज्ञ **कर्मसमुद्भवः** - कर्मापासून **भवन्ति** - उत्पन्न होतो.

**विवरण** - वीर्य आणि रजाच्या रूपाने परिणत झालेल्या म्हणजे भक्षण केलेल्या अन्नापासून प्राण्यांचे शरीर उत्पन्न होते. पर्जन्यापासून अन्नाची उत्पत्ति होते. कारिरी तसेच अग्निहोत्रादि यज्ञापासून (अपूर्वसंज्ञक धर्माच्याद्वारा) पर्जन्य उत्पन्न होतो आणि यज्ञ यजमान, ऋत्विज् इत्यादिकांच्या कर्मापासून उत्पन्न होतो.

**व्याकरणम् - अन्नात्** - अद् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.पं.ए.व. **भूतानि** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा. वि.न.प्र.ब.व. **भवन्ति** - भू प्र.ग.प.प.लट् वर्त.तृ.पु.ब.व. **पर्जन्यात्** - पर्जन्य पु.पं.ए.व. **अन्नसम्भवः** - अद् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. संभव पु.प्र.ए.व. **यज्ञात्** - यज्ञ पु.पं.ए.व. **पर्जन्यः** - पर्जन्य पु.प्र.ए.व. **भवति** - भू प्र.ग.प.प.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **यज्ञः** - यज्+नङ्=यज्ञ पु.प्र.ए.व. **कर्मसमुद्भवः** - कर्म न. सम्+उद्भव पु.प्र.ए.व. **भवति** - भू प्र.ग.प.प.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अन्नसंभवः** - अन्नस्य संभवोऽन्नसंभवः = अन्नाची उत्पत्ति अन्नसंभव**(ष.त.स.)** **कर्मसमुद्भवः** - ऋत्विग्यजमानादिभिः क्रियमाणहोममन्त्रतन्त्रादिक्रिया वैदिकी कर्मेत्युच्यते तस्मात् सम्यगुद्भवो यस्य स कर्मसमुद्भवः = ऋत्विज आणि यजमानादिच्या द्वारा क्रियमाण होम,मंत्र,तंत्र,आदि वैदिकी क्रिया-कर्म, त्यापासून उत्पन्न झालेल्या अपूर्वाची उत्पत्ति तो यज्ञ कर्मसमुद्भव**(पं.त.ग.ष.ब.स.)** यद्वा **कर्मसमुद्भवः** - ऋत्विग्यजमानयोः व्यापारः कर्म ततः समुद्भवो यस्य यज्ञस्य-अपूर्वस्य स यज्ञः कर्मसमुद्भवः = ऋत्विक् व यजमान या दोघांचा जो व्यापार-शरीरेंद्रियांची हालचाल ते कर्म, त्यापासून ज्या यज्ञाची म्ह. अपूर्वाची उत्तम

प्रकारे उत्पत्ति होते तो यज्ञ कर्मसमुद्भव**(पं.त.ग.ष.ब.स.)**

**कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम्।**

**तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥१५॥**

**अन्वय:** - कर्म, ब्रह्मोद्भवम्, विद्धि, ब्रह्म, अक्षरसमुद्भवम्, विद्धि, तस्मात्, ब्रह्म, सर्वगतम्, नित्यम्, यज्ञे, प्रतिष्ठितम्।

**अन्वयार्थ: - कर्म** - कर्मसमुदाय **ब्रह्मोद्भवम्** - वेदापासून उद्भवलेला आहे असे **विद्धि** - तू जाण **ब्रह्म** - वेद **अक्षरसमुद्भवम्** - अविनाशी परमात्म्यापासून उत्पन्न झालेला आहे **विद्धि** - असे तू जाण **तस्मात्** - म्हणून **ब्रह्म** - वेद **सर्वगतम्** - सर्वव्यापी परम् अक्षर परमात्मा **नित्यम्** - सर्वदा **यज्ञे** - यज्ञामध्ये **प्रतिष्ठितम्** - स्थिर-स्थित आहे.

**विवरण** - कर्मसमुदाय वेदापासून उत्पन्न झालेला आहे. तसेच वेद अविनाशी परमात्म्यापासून आविर्भूत झालेला आहे असे तू जाण. अशा प्रकारे सर्वांचे प्रकाशक तसेच अविनाशी ब्रह्म सर्वदा यज्ञामध्ये प्रतिष्ठित आहे तू समज.

**व्याकरणम् - कर्म** - कर्मन् न.द्वि.ए.व. **ब्रह्मोद्भवम्** - ब्रह्म न. उद्भव वि.न.द्वि.ए.व. **विद्धि** - विद् द्वि.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **ब्रह्म** - ब्रह्मन् न.द्वि.ए.व. **अक्षरसमुद्भवम्** - अक्षर वि. सम्+उद्भव वि.न. द्वि.ए.व. **विद्धि** - विद् द्वि.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **तस्मात्** - तत् सर्व.पु.पं.ए.व./अ. **सर्वगतम्** - सर्व वि. गम् प्र.ग.प.प.भावे.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **ब्रह्म** - ब्रह्मन् न.प्र.ए.व. **नित्यम्** - नित्य वि.न.प्र.ए.व. **यज्ञे** - यज्ञ पु.स.ए.व. **प्रतिष्ठितम्** - प्रति+स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - सर्वगतम्** - सर्वेषु गतम्-प्राप्तमिति सर्वगतम् = सर्वांमध्ये गेलेले प्राप्त असलेले असे सर्वगत**(स.त.स.) ब्रह्मोद्भवम्** - ब्रह्म-वेद: स एव उद्भव:-कारणं यस्य तत्कर्म ब्रह्मोद्भवम् = ब्रह्म म्हणजे वेद तोच उद्भव-कारण आहे ज्याचा ते कर्म ब्रह्मोद्भव**(ष.ब.स.) अक्षरसमुद्भवम्** - अक्षरम्-ब्रह्म-परमात्मा समुद्भव:-आविर्भावो यस्य तदक्षरसमुद्भवम् = अक्षर-ब्रह्म-परमात्मा, ते अक्षर ज्याचे कारण आहे ते ब्रह्म-तो वेद अक्षरसमुद्भव**(ष.ब.स.)**

सृष्टिचक्राच्या अनुसार न वागणारांची निंदा -

**एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह य:।**

**अघायुरिन्द्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥१६॥**

**अन्वय:** - पार्थ, य:, इह, एवम्, प्रवर्तितम्, चक्रम्, न, अनुवर्तयति, स:, अघायु:, इन्द्रियाराम:, मोघम्, जीवति।

**अन्वयार्थ: - पार्थ** - हे अर्जुना! **य:** - जो **इह** - या लोकी **एवम्** - वर वर्णन केल्याप्रमाणे **प्रवर्तितम्** - प्रवृत्त केलेल्या **चक्रम्** - संसारचक्रास **न अनुवर्तयति** - अनुसरून वागत नाही **स:** - तो पुरुष **अघायु:** - पापी आहे आणि **इन्द्रियाराम:** - इंद्रियांच्या भोगामध्ये रममाण होणारा असून या मृत्युलोकी **मोघम्** - व्यर्थ **जीवति** - आपले जीवन व्यतीत करतो.

**विवरण -** शास्त्रविहित कर्मापासून यज्ञ, यज्ञापासून पर्जन्य, वृष्टिपासून अन्न, अन्नापासून प्राणिमात्र आणि पुन्हा प्राण्यांपासून कर्म, असे चक्र अनादिकालापासून चालत आले आहे. असेच विहित कर्मानुसार चालणे म्हणजेच सृष्टिचक्राप्रमाणे चालणे होय. जो आपल्या कर्तव्याला विसरून सृष्टिचक्रानुसार चालत नाही केवळ इंद्रियांच्या द्वारा भोगामध्ये रममाण होतो, असा जो पापी मनुष्य आहे तो आपले जीवन व्यर्थ व्यतीत करतो.

**व्याकरणम् - पार्थ -** पार्थ पु.संबो.ए.व. **यः -** यत् सर्व.पु.प्र.ए.व. **इह -** इह अ. **एवम् -** एव क्रि.वि.अ. **प्रवर्तितम् -** प्र+वृत् प्र.ग.आ.प.+णिच्+कर्म.क्त=प्रवर्तित वि.न.द्वि.ए.व. **चक्रम् -** चक्र न.द्वि.ए.व. **न -** न क्रि.वि.अ. **अनुवर्तयति -** अनु+वृत् प्र.ग.आ.प.+णिच्=अनुवर्तय लट् वर्त.तृ.पु.ए.व. **सः -** तत् सर्व.पु.प्र.ए.व. **अघायुः -** अघायु पु.प्र.ए.व. **इन्द्रियारामः -** इन्द्रिय न. आराम वि.पु.प्र.ए.व. **मोघम् -** मुह् च.ग.प.प.+अच्=मोघ न.प्र.ए.व. **जीवति -** जीव् प्र.ग.प.प.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अघायुः -** अघम्-पापरूपं आयुर्जीवनं यस्य सोऽघायुः **=** पापरूप आयुष्य-जीवन ज्याचे तो अघायु**(ष.ब.स.) इन्द्रियारामः -** इन्द्रियैर्विषयेषु आरामः- आरमणम्-आक्रीडा यस्य स इन्द्रियारामः = इंद्रियांच्या योगाने विषयांमध्ये आराम-आरमण-क्रीडा चालते ज्याची तो इंद्रियाराम**(व्यधि.ब.स.)**

आत्मज्ञान्याकरिता कर्तव्याच्या अभावाचे कथन -

**यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः ।**
**आत्मन्येव च सन्तुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥१७॥**

**अन्वयः -** तु, यः, मानवः, आत्मरतिः, एव, स्यात्, च, आत्मतृप्तः, च, आत्मनि, एव, संतुष्टः, तस्य, कार्यम्, न, विद्यते ।

**अन्वयार्थः - तु -** परंतु याच्याउलट **यः मानवः -** जो मनुष्य **आत्मरतिः एव स्यात् -** आत्म्याच्याच ठिकाणी रत असतो **च -** आणि **आत्मतृप्तः -** आत्म्यामध्येच तृप्त असतो **च -** आणि **आत्मनि एव -** आत्म्याच्या ठिकाणीच **सन्तुष्टः -** संतुष्ट असतो **तस्य -** त्याचे **कार्यम् -** शास्त्रविहित काही कर्तव्य शिल्लक **न विद्यते -** रहात नाही.

**विवरण -** इंद्रियाराम पुरुष माला, चंदन आणि स्त्री आदि भोगांमध्ये प्रीतिचा अनुभव करतो. रुचिकर अन्न पात्रादिमध्ये तृप्ति मानतो आणि त्याचप्रमाणे सुवर्णादि प्राप्त झाल्यावर तसेच रोगादिकांच्या अभावामध्ये संतोषाचा अनुभव करतो. या विषयांचा अनुभव झाल्यानंतर त्याच्या ठिकाणी अप्रीति, अतृप्ति आणि अतुष्टि पाहिली जाते. परंतु या विपरीत जो परमात्म्याला प्राप्त झालेला महापुरुष, तो सांसारिक कोणत्याही वस्तुमध्ये रममाण न होता केवळ एकमात्र परमात्म्याच्याच ठिकाणी रममाण होतो आणि आत्म्यामध्येच तृप्त तसेच संतुष्ट असतो. म्हणून त्याला शास्त्राचे काहीएक कर्तव्य शिल्लक रहात नाही. कारण त्याचे सर्व कर्तव्य समाप्त झालेले असते म्हणून शास्त्र त्याच्यावर शासन करू शकत नाही.

**व्याकरणम् - तु -** तु उभ.अ. **यः -** यत् सर्व.पु.प्र.ए.व. **मानवः -** मनु+अण्=मानव पु.प्र.ए.व. **आत्मरतिः -** आत्मन् पु. रति स्त्री.प्र.ए.व. **एव -** एव क्रि.वि.अ. **स्यात् -** अस् द्वि.ग.प.प.विधिलिङ् तृ.पु.ए.व. **च -** च उभ.अ. **आत्मतृप्तः -** आत्मन् पु. तृप् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **च -** च उभ.अ. **आत्मनि -** आत्मन् पु.स.ए.व. **एव -** एव अ. **सन्तुष्टः -** सम्+तुष् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **तस्य -** तत्

सर्व. पु.ष.ए.व. **कार्यम्** - कार्य न.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **विद्यते** - विद् च.ग.आ.प.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - आत्मरति: -** 'अहं ब्रह्मास्मि' इति श्रुत्युक्तरीत्या स्वात्मना साक्षात्कृते नित्यानदैकरसेऽद्वितीये परे ब्रह्मण्येव रतिरन्त:करणस्य रमणम्-क्रीडा-सर्वदा विहार:, प्रीतिर्न विषयेषु यस्य स आत्मरति: = 'मी ब्रह्म आहे' अशा श्रुतिने सांगितलेल्या रीतिने आत्मरूपाने साक्षात्कार केल्या गेलेल्या नित्य आनंदैकरस अद्वितीय परब्रह्मामध्येच रति-अन्त:करणाची सदा क्रीडा-प्रेम, विषयामध्ये नाही ज्याची तो आत्मरति **(ष.ब.स.)** यद्वा **आत्मरति:** - आत्मनि एव रतिर्न विषयेषु यस्य स आत्मरति: = ज्याचे आत्म्यामध्येच प्रेम आहे विषयामध्ये नाही असा तो आत्मरति**(ब.स.)आत्मतृप्त: -** आत्मना एव तृप्तो नान्नरसादिना तृप्त इत्यात्मतृप्त: = आत्म्याच्या द्वाराच तृप्त, अन्नरसाच्या द्वारा तृप्त नाही असा तो आत्मतृप्त.

कर्म करणे आणि न करण्यामध्ये ज्ञान्याला प्रयोजनाचा अभाव -

**नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ।**

**न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रय: ॥१८॥**

**अन्वय: -** तस्य, इह, कश्चन, अर्थ:, न, एव, अथवा, अकृतेन, (कश्चन), अर्थ:, न, च, अस्य, सर्वभूतेषु, कश्चित्, अर्थव्यपाश्रय:, न, अस्ति ।

**अन्वयार्थ: - इह** - या लोकामध्ये **तस्य** - त्या महापुरुषाचे **कृतेन** - केलेल्या कर्माने **कश्चन** - काही **अर्थ:** - फल **न एव अस्ति** - नाहीच, त्याचप्रमाणे त्याच्या **अकृतेन** - न केलेल्या कर्माने (**कश्चन** - कोणत्याही प्रकारचा) **अर्थ:** - प्रत्यवाय **न** - नाही **च** - आणि **अस्य** - या पुरुषाचा **सर्वभूतेषु** - कोणत्याही प्राण्याच्या ठिकाणी **कश्चित्** - काही **अर्थव्यपाश्रय:** - लाभ अथवा प्रयोजनाचा आश्रय अथवा स्वार्थाचा संबंध **न अस्ति** - नसतो.

**विवरण** - उपर्युक्त कथित महापुरुषाची पुष्टी करण्याकरिता याठिकाणी भगवान म्हणतात की, जो पुरुष सदैव परमात्म्यामध्ये सन्तुष्ट असतो. त्यामुळे त्याचे कोणत्याही कर्माच्या द्वारा कोणतेही लौकीक आणि पारलौकीक प्रयोजन सिद्ध करण्याचे अवशिष्ट रहात नाही. तो त्या कर्माच्या त्यागद्वारा या लोकामध्ये निन्दित होत नाही अथवा प्रत्यवाय-दोषही त्याला लागत नाही . म्हणून त्याच्याकरिता न तो कर्म करण्याचे विधान, न तो कर्म न करण्याचे विधान आहे. कारण वर सांगितल्याप्रमाणे तो सर्वथा शास्त्राच्या शासनापासून मुक्त झालेला असतो. त्याच्यावर शास्त्र शासन करू शकत नाही आणि त्याचप्रमाणे स्थावर आणि जंगम कोणत्याही प्राण्यांच्या ठिकाणी त्याचा कोणत्याही प्रकारचा स्वार्थाचा संबंध रहात नाही.

**व्याकरणम् - तस्य** - तत् सर्व.पु.ष.ए.व. **इह** - इह अ. **कृतेन** - कृ अ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.तृ.ए.व. **कश्चन** - किम् सर्व.+चन=कश्चन अ. **अर्थ:** - अर्थ पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **एव** - एव अ. **अकृतेन** - अ+कृ अ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.तृ.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **च** - च उभ.अ. **अस्य** - इदम् सर्व.पु.ष.ए.व. **सर्वभूतेषु** - सर्व वि. भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.स.ब.व. **कश्चित्** - किम् सर्व.+ चित्=कश्चित् अ. **अर्थव्यपाश्रय:** - अर्थ पु. व्यपाश्रय पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अस्ति** - अस् द्वि.ग.प.प.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - अर्थव्यपाश्रय:** - अर्थस्य व्यपाश्रय इत्यर्थव्यपाश्रय:-प्रयोजनाश्रय: = प्रयोजनाचा आश्रय **(ष.त.स.) सर्वभूतेषु** - सर्वाणि च तानि भूतानीति सर्वभूतानि तेषु सर्वभूतेषु = सर्व ती भूते सर्वभूते त्या सर्वभूतांमध्ये**(क.स.)**

निष्काम कर्माचे फल परमात्मप्राप्ति आणि अर्जुनाला असक्त भावाने कर्म करण्याची आज्ञा -

**तस्मादसक्त: सततं कार्यं कर्म समाचर।**

**असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुष: ॥१९॥**

**अन्वय:** - तस्मात्, असक्त:, सततम्, कार्यम्, कर्म, समाचार, हि, असक्त:, कर्म, आचरन्, पूरुष:, परम्, आप्नोति।

**अन्वयार्थ: - तस्मात्** - म्हणून **असक्त:** - अनासक्त होवून **सततम्** - सर्वदा **कार्यम् कर्म** - शास्त्रविहित आपल्या कर्तव्याला आलेले नित्य कर्म **समाचर** - तू कर **हि** - कारण **असक्त:** - फलामध्ये आसक्त न होता **कर्म आचरन्** - ईश्वरप्रीत्यर्थ निष्काम बुद्धिने कर्म करीत असता **पूरुष:** - पुरुष **परम्** - मोक्षाला **आप्नोति** - प्राप्त होतो.

**विवरण** - हे अर्जुना आसक्तिरहित होवून शास्त्रविहित कर्तव्य कर्माचे पालन कर म्हणजे अनासक्त भावाने कर्माचे आचरण कर; कारण की मनुष्य क्षणभर सुद्धा कर्म केल्याविना रहात नाही कारण तो कोणते ना कोणते कर्म केल्याशिवाय राहात नसतो आणि कर्म करीत असताना त्याच्या फलामध्ये आसक्त होतो आणि त्या आसक्तिपासून कामना उत्पन्न होते. अशा कामनांनी युक्त जो पुरुष आहे. तो परमात्म्याला केव्हाही प्राप्त करू शकत नाही म्हणून तू ईश्वरार्पण बुद्धिने कर्म कर; कारण की त्या कर्माच्या द्वारा चित्त शुद्धी होऊन परंपरेने तो पुरुष मोक्षाला प्राप्त होतो.

**व्याकरणम् - तस्मात्** - तत् सर्व.पु.पं.ए.व./अ. **असक्त:** - अ+सञ्ज् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **सततम्** - सम्+तन् अ.ग.उ.प.+कर्म क्त,समः अन्त्यलोप:=सततम् वि.द्वि.ए.व./अ. **कार्यम्** - कार्य वि.न. द्वि.ए.व. **कर्म** - कर्मन् न.द्वि.ए.व. **समाचर** - सम्+आ+चर् प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **हि** - हि क्रि. वि.अ. **असक्त:** - अ+षञ्ज् सङ्गे प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **कर्म** - कर्मन् न.द्वि.ए.व. **आचरन्** - आ+चर् प्र.ग.प.प+कर्त.शतृ=आचरत् वि.पु.प्र.ए.व. **पूरुष:** - पूर्+कुषन्=पूरुष पु.प्र.ए.व. **परम्** - पर पु. द्वि.ए.व. **आप्नोति** - आप् पं.ग.प.प.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - असक्त:** - न सक्त इत्यसक्त: = नाही सक्त असा असक्त-नाही फलाची इच्छा असा असक्त**(नञ् त.स.) कार्यम्** - कर्तुम्-विधातुं योग्यमिति कार्यम् = करण्यास-विधान करण्यास योग्य असे कार्य**(कृ.वि.)**

जनकादिकांच्या दृष्टान्ताने कर्म करण्याकरिता आज्ञा -

**कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादय:।**

**लोकसङ्ग्रहमेवापि सम्पश्यन्कर्तुमर्हसि ॥२०॥**

**अन्वय:** - हि, जनकादय:, कर्मणा, एव, संसिद्धिम्, आस्थिता:, लोकसङ्ग्रहम्, सम्पश्यन्, अपि, कर्तुम्,

एव, अर्हसि।

**अन्वयार्थ: - हि** - कारण **जनकादय:** - जनक, अश्वपति, इक्ष्वाकु, प्रल्हाद, अम्बरीष आदि ज्ञानीजन **कर्मणा एव** - कर्माच्याच योगाने **संसिद्धिम्** -सिद्धिस-मोक्षास **आस्थिता:** - प्राप्त करते झाले **लोकसङ्ग्रहम्** - लोकांनी शास्त्ररहित मार्गाने जावू नये याचेकडे **सम्पश्यन् अपि-** दृष्टि ठेवूनही **कर्तुम् एव** - कर्म करण्याकरिताच **अर्हसि** - तू योग्य आहेस.

**विवरण** - प्राचीन कालामध्ये सुद्धा जनकादि प्रधान महापुरुषसुद्धा आसक्तिरहित होवून कर्माच्याद्वारा परमसिद्धिला (मोक्षाला) प्राप्त झाले. त्याप्रमाणे परमकल्याणाची इच्छा करणारा तूं ही आसक्तिरहित होवून लोकसंग्रहाकरिता म्हणजे लोकांनी धर्माच्या ठिकाणी प्रवृत्त व्हावे आणि विपरीत मार्गाचा त्याग करावा यासाठी देखील तुला कर्म करणे योग्य आहे. जर तू शास्त्रविहित कर्माचे आचरण केले नाही तर लोकही तुझे अनुकरण करून शास्त्रविहित कर्म करण्यास प्रवृत्त होणार नाहीत. त्यामुळे सृष्टिमध्ये विप्लव होवून संपूर्ण व्यवस्था नाशाला प्राप्त होईल. म्हणून तू क्षत्रिय कुलामध्ये उत्पन्न झालेला आहेस लोकसंग्रहाकडे पाहणाऱ्या तुला स्वधर्मरूप कर्मच करणे योग्य आहे.

**व्याकरणम् - हि** - हि क्रि.वि.अ. **जनकादय:** - जनक पु. आदि वि.पु.प्र.ब.व. **कर्मणा** - कर्मन् न.तृ.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **संसिद्धिम्** - सम्+सिद्धि स्त्री.द्वि.ए.व. **आस्थिता:** - आ+स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा. वि.पु.प्र.ब.व. **लोकसङ्ग्रहम्** - लोक पु. सङ्ग्रह पु.द्वि.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **अपि** - अपि अ. **सम्पश्यन्** - सम्+दृश् प्र.ग.प.प.कर्त.शतृ=सम्पश्यत् वि.पु.प्र.ए.व. **कर्तुम्** - कृ अ.ग.प.प.तुमन्त अ. **अर्हसि** - अर्ह् प्र.ग.प.प.लट् वर्त.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - जनकादय:** - जनको वैदेह आदिर्येषां ते जनकादय:-जनक अश्वपति भगीरथधर्मराजप्रभृत्यादय: = जनक वैदेह प्रथम ज्यांच्यामध्ये ते जनकादिक जनक, अश्वपति, भगीरथ, धर्मराज, प्रभृति इ.**(ष.ब.स.) लोकसङ्ग्रहम्** - लोक:-पामरजनस्तस्य संग्रह:-सत्कर्ममार्गप्रदर्शनेन तारणम्-उन्मार्गान्निवारणमिति लोकसंग्रह: = लोक-पामरजन त्यांचा संग्रह-सत्कर्ममार्गप्रदर्शनाने उन्मार्गाचे निवारण असा लोकसंग्रह**(ष.त.स.)** यद्वा **लोकसङ्ग्रहम्** - स्वयं कृतकृत्ये सति लोकहितार्थं मूढतारणार्थश्च यत् कर्म क्रियते तल्लोकसंग्रहस्तं लोकसंग्रहम् = स्वत: कृतकृत्य होवून लोकहिताकरिता मूढलोकांना तारण्याकरिता जे कर्म केले जाते ते कर्म लोकसंग्रह, त्या लोकसंग्रहाला**(ष.त.स.)**

श्रेष्ठ पुरुषाचे आचरण प्रमाण आहे त्याचे कथन -

**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जन:।**

**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥२१॥**

**अन्वय:** - श्रेष्ठ:, यत्-यत्, आचरति, तत्-तत्, एव, इतर:, जन:, स:, यत्, प्रमाणम्, कुरुते, लोक:, तत्, अनुवर्तते।

**अन्वयार्थ: - श्रेष्ठ:** - श्रेष्ठ पुरुष **यत् यत्** - जे जे **आचरति** - आचरण करतो **तत् तत् एव** - ते तेच आचरण **इतर: जन:** - अन्य लोक करतात **स:** - तो मुख्य पुरुष **यत् प्रमाणम्** - जी गोष्ट प्रमाण **कुरुते** - करतो-मानतो **लोक:** - लोक **तत्** - त्याचेच **अनुवर्तते** - अनुकरण करतात.

**विवरण -** संसारामध्ये चांगल्या गुणांच्या आणि आचरणाच्याद्वारा महापुरुष प्रख्यात होतो. त्या महापुरुषाने जर आपल्या वर्णाश्रमधर्माचा त्याग न करता चांगल्या प्रकारांनी त्याचे आचरण केले तर लोकही त्याचे पाहून आचरण करतील आणि सृष्टिची व्यवस्था चांगल्या प्रकारांनी चालेल. जर तो महापुरुष वर्णाश्रमधर्माचा त्याग करून निषिद्ध कर्माचे आचरण करू लागला, तर लोकांवर त्याचा प्रभाव पडून लोकही निषिद्ध कर्माचे आ-चरण करू लागतील आणि संपूर्ण वर्णव्यवस्था नाशाला प्राप्त होईल; म्हणून श्रेष्ठ पुरुषाकडून धर्माची अव-हेलना न होता लोकमर्यादा राखण्यासाठी शास्त्रविहित कर्माचे आचरण करणे आवश्यक आहे. कारण की सामान्य लोक श्रेष्ठ पुरुषाचेच अनुकरण करत असतात.

**व्याकरणम् - श्रेष्ठः -** श्रेष्ठ पु.प्र.ए.व. **यत् यत् -** यत् सर्व.न.द्वि.ए.व. **आचरति -** आ+चर् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **तत् तत् -** तत् सर्व.न.द्वि.ए.व. **एव -** एव क्रि.वि.अ. **इतरः -** इतर सर्व.पु.प्र.ए.व. **जनः -** जन् च.ग.आ.प.+अच्=जन पु.प्र.ए.व. **सः -** तत् सर्व.पु.प्र.ए.व. **यत् -** यत् सर्व.न.द्वि.ए.व. **प्रमाणम् -** प्र+मा+ल्युट्=प्रमाण न.द्वि.ए.व. **कुरुते -** कृ अ.ग.उ.प.(आ.प.)लट् वर्त.तृ.पु.ए.व. **लोकः -** लोक पु.प्र.ए.व. **तत् -** तत् सर्व.न.द्वि.ए.व. **अनुवर्तते -** अनु+वृत् प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - श्रेष्ठः -** अतिशयेन प्रशस्य इति श्रेष्ठः = अत्यंत प्रंशसनीय असे श्रेष्ठ**(अतिशयार्थे त.वि.)**
**प्रमाणम् -** प्रमीयत अनेनेति प्रमाणम् = प्रमाणाने-यथार्थ ज्ञानाने प्राप्त केले जाते असे प्रमाण**(वि.)**

कर्म करण्याने लाभ व न करण्याने हानि याविषयी भगवान स्वतः चा दृष्टांत देऊन सांगतात -

**न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किञ्चन ।**

**नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥२२॥**

**अन्वयः -** पार्थ, मे, त्रिषु, लोकेषु, किञ्चन, कर्तव्यम्, न, अस्ति, अनवाप्तम्, अवाप्तव्यम्, न, अस्ति, च, कर्मणि, एव, वर्ते ।

**अन्वयार्थः - पार्थ -** हे अर्जुना **मे -** मला **त्रिषु लोकेषु -** त्रैलोक्यामध्ये **किञ्चन -** काही **कर्तव्यम् न अस्ति -** कर्तव्य कर्म राहिले नाही **च -** आणि **अनवाप्तम् -** अप्राप्त वस्तु **अवाप्तव्यम् -** मला प्राप्त करावयाची रा हिलेली **न अस्ति -** नाही तरी पण **कर्मणि एव -** मी कर्मामध्येच **वर्ते -** वर्तन करतो म्हणजे कर्म करण्यामध्येच तत्पर असतो.

**विवरण -** भगवान् म्हणतात की, हे अर्जुना! मला साधारण मनुष्याप्रमाणे समजू नकोस; कारण की, मी स्वयं सर्वांच्या कर्तव्याचा विधान करणारा साक्षात् परमेश्वर आहे आणि स्वर्ग, पाताळ आणि मृत्युलोकावर माझे आधिपत्य असल्यामुळे मला या तिन्ही लोकात काहीही मिळवायचे शिल्लक राहिलेले नाही. तरीपण मी लोकसंग्रहाला पाहून म्हणजे लोकांवर दया करण्याच्या दृष्टीने कर्माचा त्याग न करता केवळ कर्मामध्येच रत असतो. म्हणजे अन्य कोणत्याही कारणाने मला कर्म करण्याची आवश्यकता नसली तरीपण मी लोकांवर दृ ष्टि ठेवून कर्म करण्यामध्येच तत्पर असतो.

**व्याकरणम् - पार्थ -** पार्थ पु.संबो.ए.व. **मे -** अस्मत् सर्व.ष.ए.व. **त्रिषु -** त्रि संख्या. वि.पु.स.ब.व. **लोकेषु -** लोक पु.स.ब.व. **किञ्चन -** किम् सर्व.+चन =किञ्चन अ. **कर्तव्यम् -** कृ अ.ग.उ.प.कर्म.तव्य प्रत्ययान्त

वि.न.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ **अस्ति** - अस् द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **अनवाप्तम्** - अन्+अव+आप् पं.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.वि.न.प्र.ए.व. **अवाप्तव्यम्** - अव+आप् पं.ग.प.प.कर्म.तव्यत् प्रत्ययान्त वि.न.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अस्ति** - अस् द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **कर्मणि** - कर्मन् न.स.ए.व. **च** - च अ. **वर्ते** - वृत् प्र.ग.आ.प.लट् वर्त.प्र.पु.ए.व. **एव** - एव अ.

**समासविग्रहार्था:** - **कर्तव्यम्** - कर्तुं योग्यमिति कर्तव्यम् = करण्यास योग्य असे कर्तव्य**(योग्यार्थे त.वि.)** **अवाप्तव्यम्** - अवाप्तुं योग्यमित्यवाप्तव्यम् = प्राप्त करण्यास योग्य असे अवाप्तव्य**(योग्यार्थे त.वि.)**

**यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतन्द्रितः।**

**मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥२३॥**

**अन्वयः** - हि, यदि, अहम्, अतन्द्रितः, कर्मणि, जातु, न, वर्तेयम्, पार्थ, मनुष्याः, सर्वशः, मम, वर्त्म, अनुवर्तन्ते।

**अन्वयार्थः** - **हि** - कारण **यदि** - जर **अहम्** - मी परमात्मा **अतन्द्रितः** - सावध होवून अथवा आळस सोडून **कर्मणि** - कर्मामध्ये अथवा कर्म करण्याविषयी **जातु** - कदाचित् **न वर्तेयम्** - निष्काळजी राहील म्हणजे वर्तन न करील तर **पार्थ** - हे अर्जुना! **मनुष्याः** - सर्व मनुष्य **सर्वशः** - सर्वप्रकारे **मम** - माझ्या **वर्त्म** - मार्गाचेच **अनुवर्तन्ते** - अनुसरण करतील.

**विवरण** - जर महान शक्तिशाली श्रेष्ठ अवतार घेऊन धर्माची स्थापना करणारा असा मर्यादापुरुषोत्तम मी सावधान होवून म्हणजे आळसाचा त्याग करून कदाचित् शास्त्रविहित कर्म करण्याविषयी तत्पर न राहील तर लोकही माझेच सर्वप्रकारांनी अनुकरण करतील म्हणजे शास्त्राने स्वीकारलेल्या वर्णाश्रमाप्रमाणे धर्माचरण मी केले नाही तर इतर लोक देखील शास्त्रविहित कर्माचे आचरण करणार नाहीत.

**व्याकरणम्** - **हि** - हि क्रि.वि.अ. **यदि** - यदि उभ.अ. **अतन्द्रितः** - अतन्द्रित वि.पु.प्र.ए.व. **कर्मणि** - कर्मन् न.स.ए.व. **जातु** - जातु अ. **न** - न क्रि.वि.अ. **वर्तेयम्** - वृत् प्र.ग.आ.प.विध्यर्थ प्र.पु.ए.व. **पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **सर्वशः** - सर्वशस् अ. **मनुष्याः** - मनुष्य पु.प्र.ब.व. **मम** - युष्मत् सर्व.ष.ए.व. **वर्त्म** - वृत् प्र.ग.आ.प.+मनिन्=वर्त्मन् न.द्वि.ए.व. **अनुवर्तन्ते** - अनु+वृत् प्र.ग.आ.प.लट् वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **अतन्द्रितः** - तन्द्रा-निद्रा सञ्जाता अस्य स तन्द्रितो न तन्द्रितोऽतन्द्रितः-अनालसः = जो तंद्रित नाही तो अतंद्रित-निद्रारहित**(त.वि.)**

**उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम्।**

**सङ्करस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥२४॥**

**अन्वयः** - (यदि), अहम्, कर्म, न, कुर्याम्, चेत्, इमे, लोकाः, उत्सीदेयुः, च, सङ्करस्य, कर्ता, स्याम्(च), इमाः, प्रजाः, उपहन्याम्।

**अन्वयार्थः** - (**यदि** - जर) **अहम्** - मी **कर्म** - कर्म **न कुर्याम्** - न करील **चेत्** - तर **इमे लोकाः** - हा सर्व मनुष्य समुदाय **उत्सीदेयुः** - नाश पावेल **च** - आणि **सङ्करस्य** - वर्णसंकराचा **कर्ता** - कर्ता म्हणजे वर्णसंकराचे निमित्त **स्याम्** - मी होईल (**च** - आणि) **इमाः प्रजाः** - या सर्व प्रजांना **उपहन्याम्** - मी मारले

असे प्रसिद्ध होईल.

**विवरण** - भगवान म्हणतात की, मी जर शास्त्रविहित कर्म केले नाही तर माझे पाहून लोकही कर्म करणार नाहीत आणि राग-द्वेषांच्या वश होऊन निषिद्ध कर्म करू लागतील आणि एक दुसऱ्याचे अनुकरण करून संपूर्ण लोक स्वार्थपरायण, भ्रष्टाचारी आणि उच्छृंखल होवून मी या लोकांचा घातच केल्यासारखे देखील होईल आणि मला (ईश्वराला) अनुरूप नसलेली गोष्ट घडेल.

**व्याकरणम्** - (**यदि** - यदि.अ) **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **कर्म** - कर्मन् न.द्वि.ए.व. **न** - न क्रि.अ. **कुर्याम्** - कृ अ.ग.उ.प.विध्यर्थ प्र.पु.ए.व. **चेत्** - चेत् उभ.अ. **इमे** - इदम् सर्व.पु.प्र.ब.व. **लोका:** - लोक पु.प्र.ब.व. **उत्सीदेयु:** - उद्+सद् प्र.ग.प.प.विधिलिङ् तृ.पु.ब.व. **च** - च उभ.अ. **सङ्करस्य** - सम्+कृ अ.ग.उ.प.+अप्=सङ्कर पु.ष.ए.व. **कर्ता** - कृ+तृच्=कर्तृ पु.प्र.ए.व. **स्याम्** - अस् द्वि.ग.प.प.विधिलिङ् प्र.पु.ए.व. **इमा:** - इदम् सर्व.स्त्री.प्र.ब.व. **प्रजा:** - प्रजा स्त्री.प्र.ब.व. **उपहन्याम्** - उप+हन् द्वि.ग.प.प.विधि लिङ् प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **कर्ता** - क्रियानिष्पादनहेतवे करोतीति कर्ता अथवा क्रियायां स्वातन्त्र्येन विवक्षितोऽर्थ इति कर्ता = क्रियासिद्धिकरिता प्रयत्न करतो असा तो कर्ता अथवा क्रियेमध्ये स्वतन्त्ररूपाने विवक्षित अर्थ असतो तो कर्ता(**परिभाषा**) **प्रजा:** - प्रकर्षेण जायन्ते-उत्पद्यन्त इति प्रजा: = प्रकृष्टरूपाने-आधिक्याने निर्माण केली जाते अशी प्रजा(**वि.**)

ज्ञान्याला लोकसंग्रहाकरिता कर्म करणे आणि दुसऱ्याकडून कर्म करवून घेण्याचे विधान -

**सक्ता: कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत।**

**कुर्याद्विद्वांस्तथासक्तश्चिकीर्षुर्लोकसङ्ग्रहम्॥२५॥**

**अन्वय:** - भारत, यथा, अविद्वांस:, कर्मणि, सक्ता:, कुर्वन्ति, तथा, लोकसङ्ग्रहम्, चिकीर्षु:, विद्वान्, असक्त:, सन्, कुर्यात्।

**अन्वयार्थ:** - **भारत** - हे भरतकुलोत्पन्न अर्जुना! **यथा** - ज्याप्रमाणे **अविद्वांस:** - सामान्य लोक **कर्मणि सक्ता:** - कर्मामध्ये आसक्त होवून **कुर्वन्ति** - कर्म करतात **तथा** - त्याचप्रमाणे **लोकसङ्ग्रहम् चिकीर्षु:** - लोकसंग्रहाची इच्छा करणाऱ्या **विद्वान्** - ज्ञानी पुरुषाने देखील **असक्त: सन्** - अनासक्त होवून **कुर्यात्** - कर्म करावे.

**विवरण** - शास्त्रविहित कर्मामध्ये तसेच त्याच्या फलामध्ये श्रद्धा, प्रेम आणि आसक्ति करणारे आणि त्याचप्रमाणे शास्त्रविहितपूर्वक आप-आपल्या अधिकारानुसार अनुष्ठान करणारे सकाम कर्मी पुरुष 'या कर्माचा कर्ता मी आहे, मला या कर्माचे फल अवश्य प्राप्त झाले पाहिजे' अशा या अभिमानाने कर्मामध्ये आसक्त झालेले अज्ञानी पुरुष जसे कर्म करतात त्याप्रमाणे लोकसंग्रहाची इच्छा करणाऱ्या विद्वानाने सुद्धा आसक्तिरहित होवून मी या कर्माचा कर्ता आणि भोक्ता असा अभिनिवेश सोडून कर्म करावे.

**व्याकरणम्** - **भारत** - पु.संबो.ए.व. **यथा** - थाल् प्रत्ययान्त त.अ. **अविद्वांस:** - अ+विद्वस् पु.प्र.ब.व. **कर्मणि** - कर्मन् न.स.ए.व. **सक्ता:** - षञ्ज् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **कुर्वन्ति** - कृ अ.ग.उ.प.लट् वर्त.तृ.पु.ब.व. **तथा** - थाल् प्रत्ययान्त त.अ. **लोकसङ्ग्रहम्** - लोक पु. सङ्ग्रह पु.द्वि.ए.व. **चिकीर्षु:** - कृ अ.ग.उ.प.+इच्छार्थे सन्+उ=चिकीर्षु पु.प्र.ए.व. **विद्वान्** - विद्वस् पु.प्र.ए.व. **असक्त:** - अ+सञ्ज्

प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **कुर्यात् -** कृ अ.ग.उ.प.विधिलिङ् तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - लोकसङ्ग्रहम् -** लोकस्य सङ्ग्रहमिति लोकसङ्ग्रहम् = लोकांचा संग्रह असा लोकसंग्रह **(ष.त.स.) अविद्वांस: -** न विद्वांस इत्यविद्वांस:-अनात्मज्ञा: = नाही आत्मज्ञानी असे अज्ञानी**(नञ् त.स.) चिकीर्षु: -** कर्तुमिच्छतीति चिकीर्षु: = करण्याकरिता इच्छा करतो असा चिकीर्षु**(इच्छार्थे सन्नन्त वि.)**

**न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसङ्गिनाम् ।**

**जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्त: समाचरन् ॥२६॥**

**अन्वय: -** कर्मसङ्गिनाम्, अज्ञानाम्, बुद्धिभेदम्, न, जनयेत्, विद्वान्, युक्त:, समाचरन्, सर्वकर्माणि, जोषयेत् ।

**अन्वयार्थ: - कर्मसङ्गिनाम् -** कर्मामध्ये आसक्त असलेल्या **अज्ञानाम् -** अज्ञानी पुरुषांचा **बुद्धिभेदम् -** बुद्धिभेद **न जनयेत् -** उत्पन्न करू नये. (शास्त्रविहित जी लोकांची श्रद्धा आहे तिचा बुद्धिभेद करू नये.) तर **विद्वान् -** ज्ञानी पुरुषाने **युक्त: -** समाहितचित्त होवून **समाचरन् -** स्वत: कर्म करत असता त्यांच्याकडून देखील **सर्वकर्माणि -** सर्व शास्त्रविहित कर्मे **जोषयेत् -** आवडीने करवून घ्यावीत.

**विवरण -** अज्ञानी पुरुष जरी कर्मामध्ये आसक्त होवून सर्व कर्मे करीत असले तरी पण विद्वानाने अविवेकी लोकांच्या बुद्धिचा भेद करू नये; कारण की, शास्त्रविहित कर्माचे श्रद्धापूर्वक सकाम भावाने अनुष्ठान करणाऱ्या पुरुषांना जर निष्काम कर्म आणि तत्त्वज्ञानाचा उपदेश केला आणि त्यांना त्या उपदेशाचे आचरण करणे कठीण जावू लागले तर त्यामध्ये अश्रद्धा आणि संशय उत्पन्न होवून ते संपूर्ण शास्त्रविहित सकाम कर्माचासुद्धा त्याग करतील यास्तव विद्वानाने समाहितचित्त होऊन शास्त्रविहित कर्माचे आचरण करावे आणि त्यांच्याकडून सुद्धा सर्व कर्मे करवून घ्यावीत.

**व्याकरणम् - कर्मसङ्गिनाम् -** कर्म न. सङ्गिन् वि.पु.ष.ब.व. **अज्ञानाम् -** अज्ञ वि.पु.ष.ब.व. **बुद्धिभेदम् -** बुद्धि स्त्री. भेद पु.द्वि.ए.व. **न -** न क्रि.वि.अ. **जनयेत् -** जन् च.ग.प.प.+णिच् प्रयोजक विधिलिङ् तृ.पु.ए.व. **विद्वान् -** विद्वस् पु.प्र.ए.व. **युक्त: -** युज् च.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **समाचरन् -** सम्+आ+चर् प्र.ग.प.प.कर्त.वर्त.शतृ प्रत्ययान्त धा.वि.पु.प्र.ए.व. **सर्वकर्माणि -** सर्व वि. कर्मन् वि.न.द्वि.ब.व. **जोषयेत् -** जुष् ष.ग.आ.प.प्रयोजक विधिलिङ् तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - कर्मसङ्गिनाम् -** कर्मसु सङ्ग आसक्तिर्येषां ते कर्मसङ्गिनस्तेषां कर्मसङ्गिनाम् = कर्मामध्ये आसक्ति ज्यांची ते कर्मसंगी त्या कर्मसंगी पुरुषांचा**(व्यधि.ब.स.)** यद्वा **कर्मसङ्गिनाम् -** देहेन्द्रियादिभिरेव क्रियमाणेषु कर्मस्वहं कर्ता भोक्तेत्यभिमान: सङ्ग:-आसक्तिर्येषां ते कर्मसङ्गिनस्तेषां कर्मसङ्गिनाम्-अतत्त्वविदां मूढानाम् = देहेन्द्रियांनीच केल्या जाणाऱ्या कर्मामध्ये मी कर्ता, भोक्ता असा अभिमान संग-आसक्ति ज्यांची ते कर्मसंगी, त्या कर्मसंग्यांचा-अज्ञानी मूढांचा-तत्त्वज्ञान नसलेल्या अविवेक्यांचा**(व्यधि.ब.स.) बुद्धिभेदम् -** बुद्धेर्भेद इति बुद्धिभेदस्तं बुद्धिभेदम् = बुद्धिचा भेद असा बुद्धिभेद त्या बुद्धिभेदाला**(ष.त.स.) अज्ञानम् -** जानन्तीति ज्ञा न ज्ञा इत्यज्ञास्तेषामज्ञानाम् = जाणतात असे जाणणारे, न जाणणारे असे अज्ञानी त्या अज्ञान्यांचे**(नञ् त.स.) समाचरन् -** सम्यक् प्रकारेण यथाशास्त्रं आचरतीति समाचरन् = चांगल्या प्रकाराने जसे शास्त्र असेल त्याप्रमाणे आचरण करणारा**(वि.)**

कर्मासक्त जनसमुदायाच्यापेक्षा सांख्य योगाच्या विलक्षणतेचे प्रतिपादन -

**प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।**

**अहङ्कारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते ॥२७॥**

**अन्वयः -** प्रकृतेः, गुणैः, सर्वशः, कर्माणि, क्रियमाणानि, अहङ्कारविमूढात्मा, अहम्, कर्ता, इति, मन्यते ।

**अन्वयार्थः - प्रकृतेः -** प्रकृतिच्या **गुणैः -** त्रिगुणांच्या द्वारा म्ह. शरीर-इन्द्रियरूप विकारांकडून **सर्वशः -** सर्व प्रकारांनी **कर्माणि -** कर्मे **क्रियमाणानि -** केली जातात परंतु **अहङ्कारविमूढात्मा -** ज्याचे अन्तःकरण अहंकाराच्या योगाने मोहित झालेले आहे असा अज्ञानी पुरुष **अहम् -** मीच **कर्ता -** कर्ता **इति -** आहे असे **मन्यते -** मानतो.

**विवरण -** अनादिसिद्ध अहंकाराच्याद्वारा ज्याचे अंतःकरण अत्यंत मोहित झालेले आणि ज्याची विवेकशक्ति लुप्त झालेली असल्यामुळे आत्मानात्म वस्तुचे यथार्थ विवेचन करून स्वतःला शरीरापासून भिन्न शुद्ध आत्मा अथवा परमात्म्याचा सनातन अंश न समजणारा असा अज्ञानी पुरुष चोवीस तत्त्वांच्या संघाताचा अभिमान धरून वास्तविक विकारांकडून सर्व लौकिक आणि शास्त्रीय कर्मे केली जातात, परंतु त्या कर्माचा मी कर्ता आहे असे समजतो.

**व्याकरणम् - प्रकृतेः -** प्रकृति स्त्री.ष.ए.व. **गुणैः -** गुण वि.पु.तृ.ब.व. **सर्वशः -** सर्वशस् त.अ. **कर्माणि -** कर्मन् न.द्वि.ब.व. **क्रियमाणानि -** कृ अ.ग.आ.प.+यक्+शानच्=क्रियमाण वि.न.द्वि.ब.व. **अहङ्कार विमूढात्मा -** अहंकार पु.वि+मुह् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. आत्मन् पु.प्र.ए.व. **अहम् -** अस्मत् सर्व.प्र.ए.व. **कर्ता -** कर्तृ पु.प्र.ए.व. **इति -** इति क्रि.वि.अ. **मन्यते -** मन् च.ग.आ.प.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अहङ्कारविमूढात्मा -** अहङ्कारेण देहेन्द्रियादिषु आत्माध्यासेन विमूढ आत्मा-बुद्धिर्यस्य सोऽहङ्कारविमूढात्मा = अहंकाराने देहेंद्रियादिकांमध्ये आत्माध्यासाने मूढ आत्मा-बुद्धि ज्याची तो अहंकार विमूढात्मा**(ष.ब.स.)** यद्वा **अहङ्कारविमूढात्मा -** देहेन्द्रियादिष्वहङ्कारेण विमोहितो द्रष्टाऽहं, स्प्रष्टाऽहं, श्रोता, घ्राता, रसयिता, मन्ता, बोद्धा, कर्ता, भोक्तेति तत्तदुपाधिसम्बधः संभावितविपरीतवृत्तीनां विषयतां गमित आत्मा प्रत्यग्लक्षणो येन सोऽहङ्कारविमूढात्मा = देहेंद्रियांच्या ठिकाणी अहंकार करण्याने मोहित झालेला म्ह. मी द्रष्टा, स्प्रष्टा, श्रोता, वास घेणारा, रससेवन करणारा, विचार करणारा, जाणणारा, कर्ता, भोक्ता आहे याप्रमाणे त्या त्या उपाधिसंबंधाने विपरीत ज्ञानाच्या विषयतेला प्राप्त केला आहे प्रत्यग्रूप आत्मा ज्याने तो अहंकारविमूढात्मा**(ब.स.)** यद्वा **अहङ्कारविमूढात्मा -** देहेन्द्रियादिष्वहङ्करणेन विमोहितोऽहंप्रत्ययार्थत्वेनाऽविदित आत्मा येन सोऽहङ्कारविमूढात्मा = देहेंद्रियादिंच्या ठिकाणी अहंकार करण्याने विमोहित होवून ज्याने अहंप्रत्ययाच्या अर्थरूपाने आत्म्याला जाणले नाही असा तो अहंकारविमूढात्मा**(ब.स.)**

**तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः ।**

**गुणा गुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते ॥२८॥**

**अन्वयः -** तु, महाबाहो, गुणकर्मविभागयोः, तत्त्ववित्, गुणाः, गुणेषु, वर्तन्ते, इति, मत्वा, न, सज्जते ।

**अन्वयार्थः - तु -** परन्तु **महाबाहो -** हे महाबाहो अर्जुना **गुणकर्मविभागयोः -** गुणविभाग व कर्मविभाग यांचे

**तत्त्ववित्** - तत्त्व जाणणारा **गुणाः** - इन्द्रियात्मक गुण **गुणेषु** - विषयात्मक गुणांमध्ये **वर्तन्ते** - प्रवृत्त होतात **इति** - असे **मत्त्वा** - मानून-समजून **न सज्जते** - आसक्त होत नाही.

**विवरण** - सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांचा कार्यरूप चोवीस तत्त्वांचा समुदायच गुणविभाग आहे. त्या गुणविभागापासून भिन्न-भिन्न क्रिया केली जाते. त्या क्रियेमध्ये कर्तृत्वाभिमान आणि आसक्ति केल्यामुळे मनुष्य बन्धनाला प्राप्त होतो. त्या संपूर्ण क्रियांचा समुदाय कर्मविभाग आहे म्हणून भगवान म्हणतात की, हे अर्जुना! गुणविभाग आणि कर्मविभाग यांचे तत्त्व जाणणारा ज्ञानयोगी इन्द्रियात्मक गुण विषयात्मक गुणांमध्ये प्रवृत्त होतात असे विचारपूर्वक समजून तो पुरुष त्याच्यामध्ये आसक्त होत नाही.

**व्याकरणम् - तु** - तु उभ.अ. **महाबाहो** - महाबाहु पु.संबो.ए.व. **गुणकर्मविभागयोः** - गुण वि. कर्म न. विभाग पु.ष.द्वि.व. **तत्त्ववित्** - तत्त्ववित् पु.प्र.ए.व. **गुणाः** - गुण वि.पु.प्र.ब.व. **गुणेषु** - गुण वि.पु.स.ब.व. **वर्तन्ते** - वृत् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **मत्वा** - मन् च.ग.आ.प.त्वान्त अ. **न** - न क्रि.वि.अ. **सज्जते** - सज्ज् प्र.ग.आ.प.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - गुणकर्मविभागयोः** - चक्षुरादयो वागादयो बुद्धिर्मनश्चेति गुणविभागः, दर्शनश्रवणादिक्रिया वचनादानादिक्रिया बुद्धेरेवाऽहङ्करणक्रिया मनस एव सङ्कल्पनक्रिया चेति कर्मविभागः, गुणविभागश्च कर्म विभागश्चेति गुणकर्मविभागौ तयोर्गुणकर्मविभागयोः = चक्षुरादिक-ज्ञानेंद्रिये, वागादिक-कर्मेंद्रिये, मन आणि बुद्धि असा गुणविभाग, ज्ञानेंद्रियांच्या दर्शनश्रवणादिक्रिया, कर्मेंद्रियांच्या वचनग्रहणादिक्रिया, बुद्धिची अहंकारक्रिया, मनाची संकल्पक्रिया असा कर्मविभाग, गुणविभाग आणि कर्मविभाग, गुणकर्मविभाग त्या गुणकर्मविभागांचे**(द्व.स.)**

ज्ञान्याकरिता साधारण मनुष्याला विचलित करण्याचा निषेध -

**प्रकृतेर्गुणसम्मूढाः सज्जन्ते गुणकर्मसु ।**

**तानकृत्स्नविदो मन्दान्कृत्स्नविन्न विचालयेत् ॥२९॥**

**अन्वयः** - प्रकृतेः, गुणसम्मूढाः, गुणकर्मसु, सज्जन्ते, तान्, अकृत्स्नविदः, मन्दान्, कृत्स्नवित्, न, विचालयेत् ।

**अन्वयार्थः - प्रकृतेः** - प्रकृतिजन्य **गुणसम्मूढाः** - गुणांनी विमूढ झालेले अज्ञानी पुरुष **गुणकर्मसु** - गुणांच्या आणि कर्मांच्या ठिकाणी **सज्जन्ते** - आसक्त होतात **तान्** - त्या **अकृत्स्नविदः** - पूर्णतया न समजणाऱ्या **मन्दान्** - मंदबुद्धि पुरुषांना **कृत्स्नवित्** - संपूर्णपणे जाणणाऱ्या ज्ञानी पुरुषाने **न विचालयेत्** - विचलित करू नये.

**विवरण** - प्रकृतिजन्य गुणांनी मोहित झालेले अज्ञानी पुरुष गुणांच्या आणि कर्मांच्या ठिकाणी आसक्त होतात अशा या गुणांच्या आणि कर्मांच्या ठिकाणी आसक्त झालेल्या म्हणजे पूर्णतया न समजणाऱ्या अज्ञानी पुरुषाला शास्त्रविहित कर्मापासून परावृत्त करणे आणि त्यामध्ये असणारी त्याची श्रद्धा आणि रुचि कमी करणे हे ज्ञानी पुरुषाचे कर्तव्य नाही. म्हणजे अशा प्रकारचा कर्मत्यागाचा उपदेश देवून त्यांचा बुद्धिभेद करू नये. अर्थात् शास्त्रविहित कर्मामध्ये त्यांचा विश्वास स्थिर ठेवून त्यांच्या कडून केल्या जाणाऱ्या कर्माची प्रशंसाच विद्वान पुरुषाने करावी.

**व्याकरणम् - प्रकृतेः -** प्रकृति स्त्री.ष.ए.व. **गुणसम्मूढाः -** गुण वि. सम्+मुह् च.ग.प.प.कर्त.भू.धा. वि.पु.प्र.ब.व. **गुणकर्मसु -** गुण वि. कर्मन् न.स.ब.व. **सज्जन्ते -** सज्ज् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व. **तान् -** तत् सर्व.पु.द्वि.ब.व. **अकृत्स्नविदः -** अ+कृत्स्न वि. विद् वि.पु.प्र.ब.व. **मन्दान् -** मन्द वि.पु.द्वि.ब.व. **कृत्स्नवित् -** कृत्स्न वि. विद् वि.पु.प्र.ए.व. **न -** न क्रि.वि.अ. **विचालयेत् -** वि+चल् प्र.ग.प.प.प्रयोजक विधिलिङ् तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - गुणसम्मूढाः -** गुणैः-सत्त्वरजतमोगुणैः सम्मूढाः-अज्ञा इति गुणसम्मूढाः = गुणांनी सत्वरजतम गुणांनी मोहित झालेले अज्ञानी गुणसंमूढ**(तृ.त.स.) गुणकर्मसु -** गुणाश्च कर्माणि च गुणकर्माणि तेषु गुणकर्मसु = गुण आणि कर्म गुणकर्म, त्या गुणकर्मामध्ये**(द्व.स.) कृत्स्नवित् -** कृत्स्नम्-सर्वं वेत्ति जानातीति कृत्स्नवित्-सर्वज्ञः = सर्व जाणतो असा कृत्स्नवित्-सर्वज्ञ**(उप.स.) अकृत्स्नविदः -** अकृत्स्नम्-अनात्मानं विदन्तीति तेऽकृत्स्नविदः = सर्व अनात्म पदार्थांना जाणतात ते अकृत्स्नविद**(उप.स.)** यद्वा **अकृत्स्नविदः -** विदन्तीति विदः, कृत्स्नस्य विदः कृत्स्नविदो न कृत्स्नविदोऽकृत्स्नविदः = जाणतात असे जाणणारे सर्वांचे जाणणारे ते सर्व जाणणारे नाही सर्व जाणणारे ते अकृत्स्नविद**(ष.ग.न.त.स.)**

अर्जुनास युद्ध करण्याची आज्ञा -

**मयि सर्वाणि कर्माणि सन्न्यस्याध्यात्मचेतसा ।**

**निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरः ॥३०॥**

**अन्वयः -** सर्वाणि, कर्माणि, अध्यात्मचेतसा, मयि, सन्न्यस्य, निराशीः, निर्ममः, विगतज्वरः, भूत्वा, युध्यस्व ।

**अन्वयार्थः - सर्वाणि कर्माणि -** सर्व कर्मे **अध्यात्मचेतसा -** अन्तर्यामी परमात्म्यामध्ये स्थापीत झालेल्या चित्तवृत्तिद्वारा **मयि -** माझ्या ठिकाणी **सन्न्यस्य -** संपूर्णतया अर्पण करून **निराशीः -** निरिच्छ **निर्ममः -** निरहंकार तसेच **विगतज्वरः -** शोकरहित **भूत्वा -** होवून **युध्यस्व -** तू युद्ध कर.

**विवरण -** जेवढी काही नित्य-नैमित्तिक कर्मे आहेत ती सर्वशक्तिमान, सर्वाधार, सर्वव्यापी, सर्वज्ञ, सर्वेश्वर, परमप्राप्य, परमहितैषी, परमप्रिय आणि परमदयाळू असणारा मी, त्या माझ्या ठिकाणी अर्पण करून फलाची आशा पुत्रादिकांविषयीची ममता आणि (माया) शोकाचा त्याग करून तूं युद्ध कर म्हणजे संपूर्ण कर्माचे ओझे माझ्यावर सोडून आशा, ममता आणि संतापरहित होवून माझ्या आज्ञेनुसार तू युद्ध कर.

**व्याकरणम् - सर्वाणि -** सर्व वि.न.द्वि.ब.व. **कर्माणि -** कर्मन् न.द्वि.ब.व. **अध्यात्मचेतसा -** अध्यात्म वि. चेतस् न.तृ.ए.व. **मयि -** अस्मत् सर्व.स.ए.व. **सन्न्यस्य -** सम्+नि+अस् च.ग.प.प.ल्यबन्त अ. **निराशीः -** निर्+आशिस् वि.पु.प्र.ए.व. **निर्ममः -** निर्मम वि.पु.प्र.ए.व. **विगतज्वरः -** वि+गम् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा. वि. ज्वर पु.प्र.ए.व. **भूत्वा -** भू प्र.ग.प.प.त्वान्त अ. **युध्यस्व -** युध् च.ग.आ.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अध्यात्मचेतसा -** अध्यात्मचेतसाऽऽत्मनीत्यध्यात्मं तत्र चेतोऽध्यात्मचेतस्तेनाऽध्यात्मचेतसा = आत्म्यामध्ये असे अध्यात्म तेथे चित्त अध्यात्मचित्त त्या आत्म्यामध्ये असणाऱ्या चित्ताद्वारा**(स.त.स.)** यद्वा **अध्यात्मचेतसा -** 'इदं सर्वं यदयमात्मा' इति श्रुत्युक्तरीत्याऽऽत्मानमधिकृत्य प्रवृत्तमध्यात्मम्, चेतः-ज्ञानम्, अध्यात्मं च तच्चेतश्च तेनाध्यात्मचेतसा = 'हे

सर्व हा आत्मा आहे' या श्रुतिने सांगितल्याप्रमाणे आत्म्याकरिता चित्ताने जे काही केल्या जाते ते अध्यात्म, चेतस म्ह. ज्ञान, अध्यात्मरूप चेतस म्ह. अध्यात्मचेतस, त्या अध्यात्मचेतसाने-त्या आत्मविषयक अंत:करणाने**(क.स.) निर्मम: -** निर्गतो मम:-ममत्वं यस्य स निर्मम:-देहपुत्रादिषु ममत्वशून्य: - गेले ममत्व ज्याचे तो निर्मम**(ष.ब.स.) विगतज्वर: -** विगत:-गत:, ज्वर:-संतापो यस्य स विगतज्वर: = गेला शोक-संताप ज्याचा तो विगतज्वर**(ष.ब.स.)**

भगवत् सिद्धांताच्या अनुकूल वागण्याने मुक्ति -

**ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठन्ति मानवा: ।**

**श्रद्धावन्तोऽनसूयन्तो मुच्यन्ते तेऽपि कर्मभि: ॥३१॥**

**अन्वय: -** ये, श्रद्धावन्त:, अनसूयन्त:, मानवा:, मे, इदम्, मतम्, नित्यम्, अनुतिष्ठन्ति, ते, अपि, कर्मभि:, मुच्यन्ते ।

**अन्वयार्थ: - ये -** जे **श्रद्धावन्त: -** श्रद्धावान **अनसूयन्त: -** असूयारहित **मानवा: -** पुरुष **मे इदम् -** माझ्या ह्या **मतम् -** मतास **नित्यम् -** सर्वदा **अनुतिष्ठन्ति -** अनुष्ठितात-अनुसरतात **ते -** ते पुरुष **अपि -** सुद्धा **कर्म भि: -** कर्मापासून **मुच्यन्ते -** मुक्त होतात.

**विवरण -** ज्यांची कोणत्याही प्रकारची माझ्यावर दोषदृष्टी नाही आणि ज्यांचा सदैव माझ्यावर विश्वास आहे आणि जे केवळ माझ्या मताचेच नित्य अनुष्ठान करतात म्हणजे माझ्या सांगण्याप्रमाणे आचरण करितात ते सुद्धा जन्ममरणरूप कर्मबंधनापासून नेहमी करिता मुक्त होतात.

**व्याकरणम् - ये -** यत् सर्व.पु.प्र.ब.व. **श्रद्धावन्त: -** श्रद्धा+मतुप्(वत्)=श्रद्धावत् वि.पु.प्र.ब.व. **अनसूयन्त: -** अन्+असू उपतापे कं.ग.शतृ प्रत्ययान्त वि.पु.प्र.ब.व. **मानवा: -** मानव पु.प्र.ब.व. **मे -** अस्मत् सर्व.ष.ए.व. **इदम् -** इदम् सर्व.न.द्वि.ए.व. **मतम् -** मन् च.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.न.द्वि.ए.व. **नित्यम् -** नित्य वि.न.द्वि.ए.व./अ. **अनुतिष्ठन्ति -** अनु+स्था प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब. **ते -** तत् सर्व.पु.प्र.ब.व. **अपि** अपि - अ. **कर्मभि: -** कर्मन् न.तृ.ब.व. **मुच्यन्ते -** मुच् ष.ग.उ.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था: - अनसूयन्त: -** न असूयन्त इत्यनसूयन्त: - नाही असूया करणारे असे अनसूयन्त**(नञ् त.स.) मानवा: -** मनोरपत्यानि-पुमांसो मानवा: - मनुची अपत्ये-पुरुष असे मानव-मनुष्य**(अपत्यार्थे त. वि.)**

भगवत् सिद्धांताच्यानुसार न वागणाऱ्याचे पतन -

**ये त्वेतदभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति मे मतम् ।**

**सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतस: ॥३२॥**

**अन्वय: -** तु, ये, अभ्यसूयन्त:, एतत्, मे, मतम्, न, अनुतिष्ठन्ति, तान्, सर्वज्ञानविमूढान्, नष्टान्, अचेतस:, विद्धि ।

**अन्वयार्थ: - तु -** परंतु **ये -** जे **अभ्यसूयन्त: -** असूया करणारे **एतत् -** हे **मे -** माझे **मतम् -** मत **न अनुतिष्ठ न्ति -** अनुसरत नाहीत **तान् -** त्यांना **सर्वज्ञानविमूढान् -** सर्व प्रकारच्या ज्ञानाविषयी मूढ **नष्टान् -** नष्ट आणि

**अचेतसः** - अविवेकी आहेत **विद्धि** - असे समज.

**विवरण** - माझ्याविषयी दोषदृष्टि ठेवणारे असे जे माझ्या मताचे अनुसरण करत नाहीत. अशा लोकांचे लौकिक आणि अलौकिक पतन होते आणि वर्तमान स्थितीसुद्धा भ्रष्ट होते. अशा लोकांना सर्व ज्ञानाविषयी अनेक प्रकारचे मूढ अविवेकी नष्ट झालेले असे समज.

**व्याकरणम्** - **तु** - उभ.अ. **ये** - यत् सर्व.पु.प्र.ब.व. **अभ्यसूयन्तः** - अभि+असूय्+शतृ=अभ्यसूयत् वि.पु.प्र.ब.व. **एतत्** - एतत् सर्व.न.द्वि.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **मतम्** - मन् च.ग.प.प.कर्त.भू.धा. वि.न.द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अनुतिष्ठन्ति** - अनु+स्था प्र.ग.प.प.वर्त तृ.पु.ब.व. **तान्** - तत् सर्व.पु. द्वि.ब.व. **सर्वज्ञानविमूढान्** - सर्व वि. ज्ञान न.वि+मुह् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.द्वि.ब.व. **नष्टान्** - नश् च.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.द्वि.ब.व. **अचेतसः** - अ+चित् प्र.ग.प.प.+असुन्=चेतस् वि.पु.द्वि.ब.व. **विद्धि** - विद् द्वि.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **सर्वज्ञानविमूढान्** - सर्वात्मकत्वाद् ब्रह्म सर्वमित्युच्यते तद्विषयकं ज्ञानं सर्वज्ञानं तस्मिन् विषये विशिष्य मूढास्तान् सर्वज्ञानविमूढान् = सर्वात्मक असल्यामुळे ब्रह्मास सर्व असे म्हटले जाते. तद्विषयक ज्ञान सर्वज्ञान, त्या विषयामध्ये विशेषरूपाने अविवेकी ते सर्वज्ञान अविवेकी, त्या सर्वज्ञान अविवेक्यांना**(क.ग.सप्त.त.स.)**

स्वाभाविक कर्मामध्ये प्रकृतिच्या प्रबलतेचे वर्णन -

**सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ।**

**प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥३३॥**

**अन्वयः** - ज्ञानवान्, अपि, स्वस्याः, प्रकृतेः, सदृशम्, चेष्टते, भूतानि, प्रकृतिम्, यान्ति, निग्रहः, किम्, करिष्यति ।

**अन्वयार्थः** - **ज्ञानवान् अपि** - विद्वान पुरुष सुद्धा **स्वस्याः** - आपल्या **प्रकृतेः सदृशम्** - स्वभावाला अनुसरून **चेष्टते** - प्रयत्न करतो **भूतानि** - संपूर्ण प्राणी **प्रकृतिम्** - आपल्या प्रकृतीवर म्हणजे स्वभावावर **यान्ति** - जातात म्हणजे आपआपल्या स्वभावाप्रमाणे कर्म करतात **निग्रहः** - त्या ठिकाणी निग्रहाचा **किम्** - काय **करिष्यति** - उपयोग म्हणजे त्या ठिकाणी निग्रह काय करणार?

**विवरण** - धर्म आणि अधर्माचे जे काही पूर्वजन्मी संपन्न केलेले ज्ञान आहे. त्यांचे संस्कार सूक्ष्मरूपाने अंतःकरणात राहतात. हेच संस्कार जन्माच्या आरंभी अभिव्यक्त होतात म्हणजे प्रकट होतात. तीच प्राणिमात्राची प्रकृति आहे. जो संपूर्ण गुणांपासून मुक्त झाला आहे त्या ज्ञानी पुरुषाला सुद्धा तिचे उल्लंघन करता येत नाही मग जे अज्ञानी पुरुष प्रकृतिच्या अधीन आहेत ते तिचे उल्लंघन कसे करू शकणार? म्हणजे ज्ञानी आणि अज्ञानी पुरुष आपल्या प्रकृतिच्या अधीन असल्यामुळे त्यांची इच्छा नसली तरी ते प्रकृतिप्रमाणे व्यवहार करणार म्हणून या ठिकाणी कोणाचाही हट्ट-निग्रह काय उपयोगाचा?

**व्याकरणम्** - **ज्ञानवान्** - ज्ञा+ल्युट्=ज्ञान(न.)+मतुप्=ज्ञानवत् वि.पु.प्र.ए.व. **अपि** - अपि अ. **स्वस्याः** - स्व सर्व.स्त्री.ष.ए.व. **प्रकृतेः** - प्रकृति स्त्री.ष.ए.व. **सदृशम्** - सदृश वि.न.प्र.ए.व. **चेष्टते** - चेष्ट् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व. **भूतानि** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.प्र.ब.व. **प्रकृतिम्** - प्रकृति स्त्री.

द्वि.ए.व. **यान्ति -** या द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **निग्रह: -** निग्रह पु.प्र.ए.व. **किम् -** किम् सर्व.न.प्र.ए.व. **करिष्यति -** कृ अ.ग.उ.प.लृट् द्वि.भवि.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - ज्ञानवान् -** ज्ञानमस्यास्तीति ज्ञानवान् = ज्ञान ह्याचे आहे असा ज्ञानवान् (ज्ञानाने युक्त) **(अस्त्यर्थे त.वि.)**

रागद्वेषाच्या ताब्यात न जाण्याची प्रेरणा -

**इन्द्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ।**

**तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपन्थिनौ ॥३४॥**

**अन्वय: -** इन्द्रियस्य, इन्द्रियस्य, अर्थे, रागद्वेषौ, व्यवस्थितौ, तयो:, वशम्, न, आगच्छेत्, हि, तौ, अस्य, परिपन्थिनौ ।

**अन्वयार्थ: - इन्द्रियस्य इन्द्रियस्य -** प्रत्येक इंद्रियाच्या **अर्थे -** अर्थामध्ये-विषयामध्ये **रागद्वेषौ -** राग आणि द्वेष **व्यवस्थितौ -** स्थित आहेत-अवश्य होणारे आहेत **तयो: -** त्यांच्या **वशम् -** स्वाधीन **न आगच्छेत् -** होवू नये म्हणजे त्यांच्या अधीन होवू नये **हि -** कारण **तौ -** ते राग आणि द्वेष **अस्य -** त्या माणसाचे **परिपन्थिनौ -** विघातक आहेत म्हणजे मानवाला विघ्न करणारे आहेत.

**विवरण -** अनुकूल विषयांच्या ठिकाणी इन्द्रियांचा संयोग झाला की, सुख प्राप्त होते आणि त्याच्यामध्ये तो आसक्त होतो, त्याला राग म्हणतात. विषयांचा इन्द्रियांना वियोग झाला की, दु:ख प्राप्त होते आणि त्याच्यामध्ये प्रतिकूल भावना होते, त्याला द्वेष म्हणतात. अशाप्रकारे इन्द्रिय आणि विषयांच्या संयोग-वियोगापासून होणारे जे राग-द्वेष आहेत त्यांच्या अधीन होवू नये. कारण पुरुष त्यांच्या अधीन झाला की विनाशशील भोगाला सुखाचे हेतू समजून कल्याण मार्गापासून भ्रष्ट होतो. म्हणजे ते राग आणि द्वेष त्या पुरुषाला विघ्न करणारे आहेत.

**व्याकरणम् - इन्द्रियस्य इन्द्रियस्य -** इन्द्रिय न.ष.ए.व. **अर्थे -** अर्थ पु.स.ए.व. **रागद्वैषौ -** राग पु. द्वेष पु.प्र. द्वि.व. **व्यवस्थितौ -** वि+अव+स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.द्वि.व. **तयो: -** तत् सर्व.पु.ष.द्वि.व. **वशम् -** वश वि.पु.द्वि.ए.व. **न -** न क्रि.अ. **आगच्छेत् -** आ+गम् प्र.ग.प.प.विध्यर्थ तृ.पु.ए.व. **हि -** हि हेत्वर्थक अ. **तौ -** तत् सर्व.पु.प्र.द्वि.व. **अस्य -** इदम् सर्व.पु.ष.ए.व. **परिपन्थिनौ -** परि+पन्थ् द.ग.उ.प.+ णिनि=परिपन्थिन् पु.प्र.द्वि.व.

**समासविग्रहार्था: - रागद्वेषौ -** रागश्चद्वेषश्चेति रागद्वेषौ = राग आणि द्वेष**(द्व.स.) परिपन्थिनौ -** चौरानामिव कुमार्गे तिष्ठत इति परिपन्थिनौ = चोराप्रमाणे कुमार्गाला (वाईट) असणारे-राहणारे असे परिपन्थी**(वि.)** यद्वा **परिपन्थिनौ -** श्रेयोमार्गस्य विघ्नकर्तारौ तस्कराविव पथि, इति परिपन्थिनौ = श्रेय मार्गाचे विघ्न करणारे-चोराप्रमाणे श्रेयमार्गामध्ये विघ्न करणारे**(वि.)**

स्वधर्म पालनाने कल्याण आणि परधर्म पालनाने हानी -

**श्रेयान्स्वधर्मो विगुण: परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**

**स्वधर्मे निधनं श्रेय: परधर्मो भयावह: ॥३५॥**

**अन्वय: -** स्वनुष्ठितात्, परधर्मात्, विगुण:, स्वधर्म:, श्रेयान्, स्वधर्मे, निधनम्, श्रेय:, परधर्म:, भयावह: ।

**अन्वयार्थ: - स्वनुष्ठितात् परधर्मात् -** चांगल्या प्रकारे आचरण केलेल्या परधर्मापेक्षा **विगुण: स्वधर्म:** - दोषयुक्त आपल्या स्वधर्माचेच अनुष्ठान करणे **श्रेयान्** - श्रेयस्कर आहे म्हणजे कल्याणकारक आहे **स्वधर्मे** - आपल्या धर्माचे अनुष्ठान करीत असता **निधनम्** - मृत्युसुद्धा **श्रेय:** - कल्याणकारक आहे **परधर्म:** - दुसऱ्याचा धर्म **भयावह:** - भयकारक आहे-नरकादि भय देणारा आहे.

**विवरण** - वर्णाश्रम आणि परिस्थितिनुसार ज्या पुरुषाचे जे कर्म शास्त्रानुसार नियत केले आहे, त्याच्याकरिता तोच स्वधर्म आहे. म्हणून शास्त्र नियत जो त्याचा स्वधर्म आहे, तो चांगल्या प्रकारे आचरण केलेल्या सर्वगुणसम्पन्न परधर्माहून गुणरहित, दोषयुक्त असला व त्यात हिंसा आदि अनेक दोष जरी असले तरी त्याचेच अनुष्ठान करणे अधिक श्रेयस्कर आहे. स्वधर्माचे अनुष्ठान करीत असताना मरण जरी आले तरी फार चांगले आहे. परन्तु दुसऱ्या धर्माचे पालन आदि सुखपूर्वक होत असले तरी पण तो नरकादि भय देणारा आहे.

**व्याकरणम्** - **स्वनुष्ठितात्** - सु+अनु+स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.पं.ए.व. **परधर्मात्** - पर वि. धर्म पु.पं.ए.व. **विगुण:** - विगुण वि.पु.प्र.ए.व. **स्वधर्म:** - स्व वि. धर्म पु.प्र.ए.व. **श्रेयान्** - श्रेयस् वि. पु.प्र.ए.व. **स्वधर्मे** - स्व वि. धर्म पु.स.ए.व. **निधनम् -** निधन न.प्र.ए.व. **श्रेय:** - श्रेयस् वि.न.प्र.ए.व. **परधर्म:** - पर वि. धर्म पु.प्र.ए.व. **भयावह: -** भयावह वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - स्वनुष्ठितात्** - यथाशास्त्रं सुसम्यग् नियमेन अनुष्ठितादाचरितादिति स्वनुष्ठितात् = शास्त्रानुसार, चांगल्या प्रकारे, नेमाने आचरलेल्यापासून-स्वनुष्ठिताहून**(गति स.) स्वधर्म:** - कर्तव्यत्वेन य: शास्त्रेण विहित: स एव धर्म:, स्वस्य धर्म इति स्वधर्म: = कर्तव्यरूपाने ज्याचे शास्त्राने विधान केले आहे तोच धर्म, स्वत:चा धर्म असा स्वधर्म**(ष.त.स.) परधर्मात्** - परेषाम्-अन्येषां धर्म: परधर्मस्तस्मात् परधर्मात् = दुसऱ्यांचा धर्म परधर्म, त्या परधर्मापासून**(ष.त.स.) भयावह: -** नियमेन सम्यगनुष्ठितोऽपि परधर्मो भयं यमदूतेभ्यो नरकं चाऽऽवहति सम्पादयतीति भयावह: = नियमपूर्वक चांगल्या प्रकारे अनुष्ठितही परधर्म यमदूतापासून होणाऱ्या भयाला व नरकाला देणारा म्हणजे नरकाची प्राप्ति करविणारा आहे असा भयावह **(उप.स.) श्रेयान् -** अयमनयोरतिशयेन प्रशस्य इति श्रेयान् = हा या दोन्हींमध्ये अतिशय प्रशस्य-स्तुत्य असा श्रेयान्**(त.वि.) विगुण:** - विशेषेण गत:-निर्गतो गुणो यस्मात् स विगुण: = विशेषरूपाने गेला आहे गुण ज्याच्यापासून तो विगुण**(पं.ब.स.)**

बलात्काराने मनुष्याला पापामध्ये प्रवृत्त कोण करतो या विषयांत अर्जुनाचा प्रश्न -

**अर्जुन उवाच** - अर्जुन म्हणाला -

**अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुष: ।**

**अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजित: ॥३६॥**

**अन्वय:** - वार्ष्णेय, अथ, अनिच्छन्, अपि, केन, प्रयुक्त:, अयम्, पुरुष:, बलात्, इव, नियोजित:, पापम्, चरति ।

**अन्वयार्थ: - वार्ष्णेय** - हे कृष्णा! **अथ** - आता **अनिच्छन् अपि** - स्वत: पाप करण्याची इच्छा नसताही **केन**

- कोणाकडून **प्रयुक्तः** - प्रेरित केलेला **अयम् पूरुषः -** हा पुरुष **बलात्** - बलात्काराने **इव नियोजितः -** नियुक्त केल्यासारखा अथवा करावयास लावल्याप्रमाणेच जणु काय **पापम्** - पाप **चरति** - आचरतो म्ह. पापाचे आचरण करतो?

**विवरण** - अर्जुन म्हणतो की हे भगवंता! ज्याच्या अंत:करणामध्ये पाप करण्याची इच्छा नसतानाही कोणाकडून प्रेरित केला गेलेला हा मनुष्य जणु काय करावयास लावल्याप्रमाणे पापाचे आचरण करतो?

**व्याकरणम्** - **वार्ष्णेय** - वृष्णि+ढक्=वार्ष्णेय पु.संबो.ए.व. **अथ** - अथ अ. **अनिच्छन्** - अन्+इष् ष.ग.प.प.कर्त.वर्त.धा.वि.पु.प्र.ए.व. **अपि** - अपि अ. **केन** - किम् सर्व.पु.तृ.ए.व. **प्रयुक्तः** - प्र+युज् स.ग./द.ग.उ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **अयम्** - इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **पूरुषः** - पूरुष पु.प्र.ए.व. **बलात्** - बल न.पं.ए.व. **इव** - इव अ. **नियोजितः** - नि+युज् स.ग.उ.प.कर्त.धा.वि.पु.प्र.ए.व. **पापम्** - पाप न. द्वि.ए.व. **चरति** - चर् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **अनिच्छन्** - न इच्छतीत्यनिच्छन् = इच्छा न करणारा असा**(नञ् त.स.) वार्ष्णेय** - वृष्णिवंशेऽवतीर्ण इति वार्ष्णेयस्तत्सम्बुद्धौ हे वार्ष्णेय-हे कृष्णा = वृष्णिवंशामध्ये अवतीर्ण झालेला त्याचे संबोधनामध्ये हे वार्ष्णेय**(त.वि.)** यद्वा **वार्ष्णेय** - ब्रह्मविदां ब्रह्मानंदामृतम् वर्षतीति वृष्णि: सम्यक् बोधस्तेनाऽवगम्यत इति वार्ष्णेय: परमात्मा तत्सम्बुद्धौ हे वार्ष्णेय = ब्रह्मज्ञानी लोकांच्यामध्ये ब्रह्मानंदरूप अमृताचा वर्षाव करतो तो वृष्णी-चांगले ज्ञान, त्याच्याकडून जो जाणला जातो असा वार्ष्णेय-परमात्मा त्याचे संबोधनामध्ये हे वार्ष्णेय.

बलात्काराने पाप करण्यामध्ये प्रवृत्त करतो अशा कामाच्या स्वरूपाचे वर्णन -

**श्रीभगवानुवाच** - भगवान म्हणाले -

**काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।**

**महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥३७॥**

**अन्वयः** - एषः, कामः, एषः, क्रोधः, रजोगुणसमुद्भवः, महाशनः, महापाप्मा, इह, एनम्, वैरिणम्, विद्धि।

**अन्वयार्थः** - **एषः कामः** - मनुष्य मात्राला पापाचरणात प्रवृत्त करण्याला कारण हा काम आहे **एषः क्रोधः** - हाच क्रोध आहे **रजोगुणसमुद्भवः** - रजोगुणापासून उत्पन्न झालेला हा काम **महाशनः** - मोठा खादाड आहे म्हणून तो **महापाप्मा** - महापापी आहे **इह** - या संसारात **एनम् -** या कामाला **वैरिणम्** - वैरी **विद्धि** - समज.

**विवरण** - कामाच्या पूर्ततेत लोभ उत्पन्न होतो आणि कामाच्या अपूर्ततेत क्रोध उत्पन्न होतो असा हा पुरुषाला पापात प्रवृत्त करणारा काम आणि क्रोध आहे. रजोगुणापासून उत्पन्न झालेल्या कामाची भोगाला भोगून केव्हाही तृप्ति होत नाही म्हणून हा काम मोठा खादाड आहे. तसेच मनुष्याला नाना प्रकारच्या भोगामध्ये आसक्त करुन त्याला बलात्काराने पापामध्ये प्रवृत्त करतो म्हणून हा मोठा पापी आहे अशा या लोकात (संसारात) या कामाला व क्रोधाला शत्रु समज.

**व्याकरणम्** - **एषः** - एतत् सर्व.पु.प्र.ए.व. **कामः** - काम पु.प्र.ए.व. **एषः** - एतत् सर्व.पु.प्र.ए.व. **क्रोधः** - क्रोध पु.प्र.ए.व. **रजोगुणसमुद्भवः** - रजस् न. गुण वि. समुद्भव पु.प्र.ए.व. **महाशनः** - महा वि. अश्

पं.ग.प.प.+ल्युट्=अशन पु.प्र.ए.व. **महापाप्मा** - महा वि.+पा+मनिन्, पुगागम=पाप्मन् पु.प्र.ए.व. **इह** - इह अ. **एनम्** - एतत् सर्व.पु.द्वि.ए.व. **वैरिणम्** - वैरिन् पु.द्वि.ए.व. **विद्धि** - विद् द्वि.ग.प.प.कर्त.लोट् आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **रजोगुणसमुद्भव:** - रजोगुणात् समुद्भव:-जन्म यस्य स काम:-रजोगुणोत्पत्तिक: = रजोगुणापासून उत्पत्ति आहे ज्याची तो रजोगुणसमुद्भव-काम**(पं.ब.स.)** यद्वा **रजोगुणसमुद्भव:** - रजश्च तद्गुणश्च स रजोगुण: स समुद्भव:-कारणं यस्य स कामो रजोगुणसमुद्भव: = रज असा जो गुण तो रजोगुण, तोच रजसंज्ञकगुण ज्या कामाचा समुद्भव म्हणजे कारण आहे तो काम रजोगुणसमुद्भव होय**(क.ग.ब.स.)** **महाशन:** - महत् अशनं अस्येति महाशन: = ज्याचे अशन-खाणे मोठे आहे असा महाशन**(वि.)** **महापाप्मा** - महान् पाप्मा दोषो यस्मात् पुरुषस्याऽऽयाति स महापाप्मा = महान दोष ज्याच्यापासून पुरुषाला प्राप्त होतो तो महापाप्मा**(वि.)**

कामरूप शत्रुने ज्ञान झाकलेले आहे या विषयाचे दृष्टान्तासहित वर्णन -

**धूमेनाव्रियते वह्निर्यथादर्शो मलेन च ।**

**यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥३८॥**

**अन्वय:** - यथा, धूमेन, वह्नि:, आव्रियते, च, मलेन, आदर्श:, यथा, उल्बेन, गर्भ:, आवृत:, तथा, तेन, इदम्, आवृतम् ।

**अन्वयार्थ:** - **यथा** - ज्याप्रमाणे **धूमेन** - धुरापासून अथवा धुराकडून **वह्नि:** - अग्नि **आव्रियते** - आच्छादित केला जातो **च** - आणि **मलेन** - मळाने **आदर्श:** - आरसा **यथा** - ज्याप्रमाणे **उल्बेन** - वेष्टनाने **गर्भ:** - गर्भ **आवृत:** - आच्छादित झालेला असतो **तथा** - त्याप्रमाणे **तेन** - त्या कामाने **इदम्** - हे दृश्य जगत् **आवृतम्** - आच्छादिले आहे अथवा झाकलेले आहे.

**विवरण** - ज्या प्रमाणे धुराकडून अग्नि आच्छादित केला जातो. मलाने आरसा आच्छादित केला जातो आ णि वेष्टनाने गर्भ आच्छादित केला जातो. त्याप्रमाणे हा काम मनुष्याच्या अंत:करणामध्ये नाना प्रकारच्या भोगाची तृष्णा वाढवून त्यांना विक्षिप्त करतो आणि त्यांच्याकडून नाना प्रकारचे पापाचरण करून अंत:करणामध्ये दोषाची वृद्धि करतो आणि त्यांची निद्रा, आळस आणि अकर्म यामध्ये सुखबुद्धि करवून त्यांना सर्वथा विवेकशून्य करतो. अशा या कामाने संपूर्ण दृश्य(विश्व) आच्छादित केले आहे.

**व्याकरणम्** - **यथा** - यथा क्रि.वि.अ. **धूमेन** - धूम पु.तृ.ए.व. **वह्नि** - वह् प्र.ग.उ.प.+नि=वह्नि पु.प्र.ए.व. **आव्रियते** - आ+वृ पं.ग.उ.प.(आ.प.)कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **मलेन** - मल पु.तृ.ए.व. **आदर्श:** - आदर्श पु.प्र.ए.व. **यथा** - यथा अ. **उल्बेन** - उल्ब न.तृ.ए.व. **गर्भ:** - गर्भ पु.प्र.ए.व. **तथा** - तथा क्रि.वि.अ. **तेन** - तत् सर्व.न.तृ.ए.व. **इदम्** - इदम् सर्व.न.प्र.ए.व. **आवृतम्** - आ+वृ द.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **आवृतम्** - आव्रियतेऽनेनेत्यावृतम् = आच्छादित केल्या जाते ज्याच्याद्वारा ते आवृत **(वि.)**

**आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा ।**

**कामरूपेण कौन्तेय दुष्पूरेणानलेन च ॥३९॥**

**अन्वयः** - कौन्तेय, ज्ञानिनः, नित्यवैरिणा, दुष्पूरेण, च, अनलेन, एतेन, कामरूपेण, ज्ञानम्, आवृतम्।

**अन्वयार्थः** - **कौन्तेय** - हे अर्जुना **ज्ञानिनः** - ज्ञानी पुरुषाचा **नित्यवैरिणा** - नित्यवैरी **दुष्पूरेण** - ज्याची पूर्तता कधीच होत नाही **च** - आणि **अनलेन** - ज्याला कधी समाधान वाटतच नाही अशा **एतेन कामरूपेण** - या इच्छारूप शत्रुने **ज्ञानम्** - ज्ञान **आवृतम्** - आवृत्त केले आहे.

**विवरण** - घृत(तुप) इंधनाच्या योगाने जसा अग्नि अधिकच भडकतो म्हणजे त्याची कधीच तृप्ति होत नाही त्याचप्रमाणे हा काम जसा जसा मनुष्य विषयांचा भोग घेतो तसा तसा अग्निप्रमाणे वाढत चालतो म्हणजे त्याची कधीच तृप्ति होत नाही म्हणून त्याला दुष्पूर असे म्हटले आहे. अशा प्रकारचा जो काम ज्ञानी पुरुषाचा नित्यवैरी असून अशा या इच्छारूप शत्रुने ज्ञानही आच्छादित केले आहे.

**व्याकरणम्** - **कौन्तेय** - कौन्तेय पु.संबो.ए.व. **ज्ञानिनः** - ज्ञान+इनि=ज्ञानिन् वि.पु.ष.ए.व. **नित्यवैरिणा** - नि+त्यप्=नित्य वि.+वैर+इनि=नित्यवैरिन् पु.तृ.ए.व. **दुष्पूरेण** - दुष्पूर वि.पु.तृ.ए.व. **च** - च उभ.अ. **अनलेन** - अनल पु.तृ.ए.व. **एतेन** - एतत् सर्व.पु.तृ.ए.व. **कामरूपेण** - कामरूप वि.पु.तृ.ए.व. **ज्ञानम्** - ज्ञान न.प्र.ए.व. **आवृतम्** - आ+वृ द.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **अनेलन** - न विद्यतेऽलं पर्याप्तिर्यस्य सोऽनलस्तेनाऽनलेन = नाही समाप्ति (पूर्णता) ज्याची तो अनल त्या अनलाने**(ष.ब.स.)** **दुष्पूरेण** - दुःखेन-कष्टेन पूरणमिष्टप्रापणं यस्य स दुष्पूरस्तेन दुष्प-ूरेण = ज्याची अभीष्टाची प्राप्ति दुःखाने भरलेली असते तो दुष्पूर त्या दुष्पूराकडून**(तृ.त.स.)** यद्वा **दुष्पूरेण** - दुःखेन-कष्टेन पूरितुम्-पूर्णकर्तुमशक्य इति दुष्पूरस्तेन दुष्पूरेण = दुःखाने, कष्टाने पूर्ण करण्यास अशक्य असा दुष्पूर त्या दुष्पूराने**(तृ.त.स.)** यद्वा **दुष्पूरेण** - दुःखेन पूरणमस्येति दुष्पूरस्तेन दुष्पूरेण = दुःखाने याचे पूरण-पूर्ति-भरती होते म्ह. दुष्पूर त्या दुष्पूराने**(तृ.त.स.)** **कामरूपेण** - कामः-इच्छैव रूपमस्येति कामरूपस्तेन कामरूपेण = काम-इच्छाच रूप ह्याचे असा कामरूप त्या कामरूपाने**(क.ग.ब.स.)** यद्वा **कामरूपेण** - काम्यत इति कामो विषयस्तमेव सर्वत्र रूपयति-गोचरयति न क्वचिद्ब्रह्मेति कामरूपस्तेन कामरूपेण = ज्याची इच्छा केली जाते तो काम-विषय त्यालाच सर्व ठिकाणी दाखवितो आणि ब्रह्माला कोणत्याही ठिकाणी दाखवीत नाही असा कामरूप त्या कामरूपाने**(वि.)** **ज्ञानिनः** - ज्ञानमस्यास्तीति ज्ञानी तस्य ज्ञानिनः = ज्ञान ह्याचे आहे असा ज्ञानी त्या ज्ञान्याचे**(अस्त्यर्थे त.वि.)**

कामाच्या निवासस्थानांचे कथन -

**इन्द्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते ।**

**एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥४०॥**

**अन्वयः** - इन्द्रियाणि, मनः, बुद्धिः, अस्य, अधिष्ठानम्, उच्यते, एषः, एतैः, ज्ञानम्, आवृत्य, देहिनम्, विमोहयति।

**अन्वयार्थः** - **इन्द्रियाणि** - इन्द्रिये **मनः** - मन **बुद्धिः** - आणि बुद्धि हे **अस्य** - महाशनरूप कामाचे **अधिष्ठानम्** - आश्रयस्थान **उच्यते** - आहे असे म्हटल्या जाते **एषः** - हा काम **एतैः** - या **(इन्द्रियादिभिः आश्रयैः)** - इन्द्रियादिकांच्या योगाने **ज्ञानम्** - ज्ञानाला **आवृत्य** - आच्छादन करून **देहिनम्** - जीवात्म्याला

**विमोहयति** - अनेक प्रकाराने मोहित करतो.

**विवरण** - कल्याणविरोधी असणारा दुर्जय शत्रु काम, इन्द्रिये, मन आणि बुद्धिला विषयभोगरूप मिथ्या सुखाचे प्रलोभन देवून त्या सर्वांवर आपला अधिकार करून मन, बुद्धि आणि इन्द्रियद्वारा विषय सुखरूप आहेत. या लोभाने जीवात्म्याच्या ज्ञानाला आच्छादित करून जीवात्म्याला मोहमय संसाररूपी जाळामध्ये टाकतो. म्ह. या देहाभिमानी आत्म्याला अनेक प्रकारे मोहित करतो.

**व्याकरणम्** - **इन्द्रियाणि** - इन्द्रिय न.प्र.ब.व. **मनः** - मनस् न.प्र.ए.व. **बुद्धिः** - बुद्धि स्त्री.प्र.ए.व. **अस्य** - इदम् सर्व.पु.ष.ए.व. **अधिष्ठानम्** - अधि+स्था प्र.ग.प.प.+ल्युट्=अधिष्ठान न.प्र.ए.व. **उच्यते** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **एषः** - एतत् सर्व.पु.प्र.ए.व. **एतैः** - एतत् सर्व.न.तृ.ब.व. **ज्ञानम्** - ज्ञान न.द्वि.ए.व. **आवृत्य** - आ+वृ पं.ग.उ.प.ल्यबन्त अ. **देहिनम्** - देहिन् पु.द्वि.ए.व. **विमोहयति** - वि+मुह् च.ग.प.प.+णिच्=विमोहय लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **देहिनम्** - देहोऽस्यास्तीति देही तं देहिनम् = देह ज्याचा आहे असा देही त्या देहिला **(अस्त्यर्थे त.वि.) अधिष्ठान्** - आश्रयत्वेनाऽधितिष्ठति यत्रेत्यधिष्ठानम् = आश्रयाने स्थित असतो ज्या ठिकाणी असे अधिष्ठान**(वि.)**

इंद्रियांना वश करून कामाला मारण्याची आज्ञा -

**तस्मात्त्वमिन्द्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।**

**पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥४१॥**

**अन्वयः** - भरतर्षभ, तस्मात्, त्वम्, आदौ, इन्द्रियाणि, नियम्य, एनम्, ज्ञानविज्ञाननाशनम्, पाप्मानम्, प्रजहि ।

**अन्वयार्थः - भरतर्षभ** - हे अर्जुना **तस्मात्** - म्हणून **त्वम्** - तू **आदौ** - प्रथम **इन्द्रियाणि** - आपली इन्द्रिये **नियम्य** - नियमित करून **एनम् -** या **ज्ञानविज्ञाननाशनम् -** ज्ञान आणि विज्ञान यांचा नाश करणाऱ्या **पाप्मानम्** - पाप्याला (पाप्याचा) **प्रजहि** - सोड (परित्याग कर).

**विवरण** - संपूर्ण अनर्थाचे कारण काम आहे. हा काम प्रथम इंद्रियामध्ये प्रविष्ट होवून त्याच्या द्वारा मन आणि बुद्धिला मोहित करून नंतर जीवात्म्याला मोहित करतो. त्याचे राहण्याचे मुख्य स्थान मन, बुद्धि आणि इन्द्रिये आहेत. म्ह. प्रथम इन्द्रियांवर अधिकार करून म्ह. इन्द्रियांला अधीन ठेवून शास्त्र, ज्ञान आणि आत्मसाक्षात्काररूप ज्ञानाचा नाश करणाऱ्या महान पापी कामाला तू अवश्य मार. म्ह. या पाप्यांचा परित्याग कर.

**व्याकरणम्** - **भरतर्षभ** - भरतर्षभ पु.संबो.ए.व. **तस्मात्** - तत् सर्व.पु.पं.ए.व./अ. **त्वम्** - युष्मत् सर्व.प्र.ए.व. **आदौ** - आदि वि.पु.स.ए.व. **इन्द्रियाणि -** इन्द्रिय न.द्वि.ब.व. **नियम्य** - नि+यम् प्र.ग.प.प.ल्यबन्त अ. **एनम् -** इदम् सर्व.पु.द्वि.ए.व. **पाप्मानम् -** पाप्मन् पु.द्वि.ए.व. **ज्ञानविज्ञाननाशनम् -** ज्ञान न. विज्ञान न. नाशन न.वि.पु.द्वि.ए.व. **प्रजहि -** प्र+हा तृ.ग.प.प.कर्त.लोट् आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **ज्ञानविज्ञाननाशनम्** - ज्ञानं शास्त्राचार्योपदेशश्च विज्ञानं निदिध्यासनश्च ज्ञानविज्ञाने

तयोर्नाशनम्-विध्वंसकमिति ज्ञानविज्ञाननाशनम् = ज्ञान-शास्त्राचार्योपदेश आणि विज्ञान-निदिध्यासन असे ज्ञानविज्ञान त्यांचा नाश करणारा, त्या ज्ञानविज्ञाननाशनाला**(द्व.स.)** यद्वा **ज्ञानविज्ञाननाशनम्** - ज्ञानम्-शास्त्रत आचार्यतश्चाऽऽत्मादीनामवबोध:, विज्ञानम्-विशेषतस्तदनुभवस्तयोर्ज्ञानविज्ञानयोर्नाशनम्-नाशकरमिति ज्ञानविज्ञाननाशनम् = शास्त्र आणि आचार्यांच्या उपदेशाने जो आत्मा आणि अनात्मा, विद्या, अविद्या, इ. पदार्थाचा बोध होतो ते ज्ञान, त्याचा विशेष रूपाने अनुभव होतो ते विज्ञान, त्या ज्ञानविज्ञानाला आपल्या कल्याणाच्या कारणाला नाश करणारा**(द्व.ग.ष.त.स.)** **भरतर्षभ** - भरते-भरतवंशे ऋषभ:-श्रेष्ठ इति भरतर्षभस्तत्सम्बुद्धौ भरतर्षभ = भरतामध्ये-भरतवंशामध्ये श्रेष्ठ असा भरतर्षभ त्याचे संबोधनामध्ये हे भरतर्षभ**(स.त.स.)**

इंद्रिय, मन, बुद्धि या पेक्षा आत्म्याच्या श्रेष्ठतेचे वर्णन -

**इन्द्रियाणि पराण्याहुरिन्द्रियेभ्य: परं मन: ।।**

**मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धे: परतस्तु स: ।।४२।।**

**अन्वय:** - इन्द्रियाणि, पराणि, आहु:, इन्द्रियेभ्य:, परं, मन:, तु, मनस:, बुद्धि:, परा, तु, बुद्धे:, परत:, स:, (आहु:) ।

**अन्वयार्थ:** - **इन्द्रियाणि** - ज्ञानेंद्रिये **पराणि** - बाह्य स्थूल देहाच्या अपेक्षेने श्रेष्ठ आहेत **आहु:** - असे पंडित म्हणतात **इन्द्रियेभ्य: -** इन्द्रियाहून **मन:** - मन **परम्** - श्रेष्ठ आहे **तु** - आणि **मनस:** - संकल्पविकल्पात्मक मनाच्या पेक्षा **बुद्धि: परा** - बुद्धि श्रेष्ठ आहे **तु** - परंतु **बुद्धे:** - निश्चयस्वरूप बुद्धिपेक्षा **परत: -** श्रेष्ठ **स:** - आत्मा आहे (**आहु:** - असे पंडित म्हणतात.)

**विवरण** - इन्द्रिये स्थूल शरीरापासून पर म्ह. श्रेष्ठ आणि सूक्ष्म आहेत. इंद्रियाहून मन श्रेष्ठ आहे. मनापेक्षा बुद्धि श्रेष्ठ आहे. बुद्धिपेक्षा आत्मा श्रेष्ठ आहे. म्ह. बुद्धिच्या पलीकडे अत्यन्त सूक्ष्म आत्मतत्त्व आहे. अशा प्रकारे सर्वांच्या पेक्षा आत्म्याची सूक्ष्मता प्रगट केली आहे.

**व्याकरणम्** - **इन्द्रियाणि -** इन्द्रिय न.द्वि.ब.व. **पराणि** - पर न.द्वि.ब.व. **आहु:** - ब्रू द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व. **इन्द्रियेभ्य: -** इन्द्रिय न.पं.ब.व. **मन: -** मनस् न.प्र.ए.व. **परम्** - पर न.प्र.ए.व. **तु** - तु उभ.अ. **मनस: -** मनस् न.पं.ए.व. **परा -** पर वि.स्त्री.प्र.ए.व. **बुद्धि:** - बुद्धि स्त्री.प्र.ए.व. **बुद्धे:** - बुद्धि स्त्री.पं.ए.व. **परत: -** पर+तस्=परतस् अ. **स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **आहु: -** ब्रू द्वि.ग.उ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व.

बुद्धिहून पलीकडे असलेल्या आत्म्याला जाणून बुद्धिद्वारा मनाचा संयम करून कामाला मारण्याची आज्ञा देवून अध्यायाची समाप्ति -

**एवं बुद्धे: परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ।**

**जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ।।४३।।**

**अन्वय:** - महाबाहो, एवम्, बुद्धे:, परम्, बुद्ध्वा, आत्मानम्, आत्मना, संस्तभ्य, दुरासदम्, कामरूपम्, शत्रुम्, जहि ।

**अन्वयार्थः** - **महाबाहो** - हे पराक्रमी अर्जुना! **एवम्** - याप्रमाणे **बुद्धेः** - बुद्धिपेक्षा अथवा बुद्धिहून **परः** - श्रेष्ठ असलेल्या आत्म्याला **बुद्ध्वा** - जाणून **आत्मानम्** - कामाचा आश्रयभूत अशा मनाला **आत्मना** - अखंड एकरस पूर्ण आत्मस्वरूपाशीच **संस्तभ्य** - जोडून म्ह. नियमन करून **दुरासदम्** - ज्याचे ठाणे जिंकण्यास कठीण आहे अशा **कामरूपम् शत्रुम्** - या कामरूप शत्रुला **जहि** - तू ठार मार.

**विवरण** - बुद्धिच्या अत्यन्त पलीकडे असलेल्या आत्म्याला जाणून मनाला आत्मस्वरूपाशी जोडून म्ह. आत्मस्वरूपात स्थिर करून म्ह. मनोनाश व वासनाक्षय करून/कामाचा आश्रय अशा मनाचा बाध म्ह. दृढ मिथ्यात्वनिश्चय करून या कामरूप दुर्जय शत्रुला तू ठार मार. कारण की आत्म्यामध्ये अत्यन्त बल आहे. त्याचे बल प्राप्त करून सर्व बलवान होतात आणि क्रियाशील होतात अशा या आत्म्याला प्राप्त करून सर्व अनर्थाला मूळ कारण जो काम आहे त्या कामाला तू ठार मार.

**व्याकरणम्** - **महाबाहो** - महाबाहु पु.संबो.ए.व. **एवम्** - एवम् क्रि.वि.अ. **बुद्धेः** - बुद्धि स्त्री.ष.ए.व. **परम्** - पर वि.पु.द्वि.ए.व. **आत्मानम्** - अत् प्र.ग.प.प.+मनिन्=आत्मन् पु.द्वि.ए.व. **बुद्ध्वा** - बुध् प्र.ग.उ.प.त्वान्त अ. **आत्मना** - आत्मन् पु.तृ.ए.व. **संस्तभ्य** - सम्+स्तंभ् प्र.ग.आ.प.ल्यबन्त अ. **दुरासदम्** - दुरासद वि.पु.द्वि.ए.व. **कामरूपम्** - कामरूप वि.पु.द्वि.ए.व. **शत्रुम्** - शत्रु पु.द्वि.ए.व. **जहि** - हन् द्वि.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **कामरूपम्** - कामश्च रूपश्चेति कामरूपस्तं कामरूपम् = काम आणि रूप असा कामरूप त्या कामरूपाला**(द्व.स.)** यद्वा **कामरूपम्** - काम एव-तृष्णा एव रूपम्-स्वरूपं यस्य स कामरूपस्तं कामरूपम् = कामच-तृष्णाच रूप-स्वरूप आहे ज्याचे तो कामरूप त्या कामरूपाला**(क.ग.ब.स.)** **दुरासदम्** - दुःखेन कष्टेन आसादितुं विनाशितुं योग्यं दुरासदम् = दुःखाने कष्टाने नाश करण्यास योग्य त्या दुरासदाला **(तृ.त.स.)** यद्वा **दुरासदम्** - दुःखेन आसदः-आसादनं प्राप्तिर्यस्य तं दुरासदम् = दुःखाने प्राप्ति ज्याची त्या दुरासदाला अनेक प्रकारे जाणण्यास कठीण असणाऱ्याला**(तृ.ग.ब.स.)** यद्वा **दुरासदम्** - दुःखेन आसाद्यते प्राप्यत इति तं दुरासदम् = दुःखाने प्राप्त केला जातो असा दुरासद त्या दुरासदाला म्हणजे मोठ्या कष्टाने हाती लागणाऱ्या कामाला**(तृ.त.स.)**

**ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे**

**श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मयोगो नाम तृतीयोऽध्यायः ॥३॥**

**-: अध्याय तिसरा समाप्त :-**

**ॐ श्रीपरमात्मने नम:**

**अथ चतुर्थोऽध्याय:**

दोन अध्यायांनी सांगितलेल्या या कर्मयोगाच्या उपायाने प्राप्य अशा या ज्ञाननिष्ठारूप योगाचे परंपरा रूपाने कथन -

**श्री भगवानुवाच** - भगवान म्हणाले -

**इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।**

**विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥१॥**

**अन्वय: -** अहम्, इमम्, अव्ययम्, योगम्, विवस्वते, प्रोक्तवान्, विवस्वान्, मनवे, प्राह, (च), मनु:, इक्ष्वाकवे, अब्रवीत् ।

**अन्वयार्थ:- अहम् -** मी **इमम् अव्ययम् योगम्** - केव्हाहि नाश न पावणारा हा ज्ञानयोग **विवस्वते** - सूर्याला **प्रोक्तवान्** - सांगितला होता **विवस्वान्** - सूर्याने **मनवे** - मनुला **प्राह** - सांगितला **(च -** व **)मनु: -** मनुने **इक्ष्वाकवे** - इक्ष्वाकु नावाच्या आपल्या पुत्राला **अब्रवीत् -** सांगितला.

**विवरण** - भगवान म्हणतात की, हे अर्जुना! हा जो कर्मयोगासह ज्ञानयोग मी तुला सांगितला, तो काही नवीन नाही. सूर्यवंशियांचा प्रथम पुरुष विवस्वानाला हा अविनाशी योग मी सांगितला, विवस्वानाने मनुला सांगितला आणि मनुने आपल्या इक्ष्वाकु नावाच्या पुत्राला सांगितला.

'एकं साङ्ख्यं च योगं च य: पश्यति स पश्यति' या भगवद्वचनानुसार साध्य ज्ञानयोग व साधन कर्मयोग या दोन्हीचेही फल मोक्ष हे एकच असल्यामुळे या दोघांच्याही ठिकाणी एकतेचा उपचार करून भगवान इमं या पदाने कर्मयोगप्राप्य ज्ञानयोगाचे कथन करतात.

**व्याकरणम् - अहम्** - अस्मत् सर्व.पु.प्र.ए.व. **इमम्** - इदम् सर्व.पु.द्वि.ए.व. **अव्ययम्** - अव्यय वि.पु. द्वि.ए.व. **योगम्** - योग पु.द्वि.ए.व. **विवस्वते** - विवस्वत् पु.च.ए.व. **प्रोक्तवान्** - प्र+वच् द्वि.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **विवस्वान्** - विवस्वत् पु.प्र.ए.व. **मनवे** - मनु पु.च.ए.व. **प्राह** - प्र+ब्रू द्वि.ग.प.प.कर्त.लङर्थे (प्र.भू.अर्थे)लट् तृ.पु.ए.व. **च.** च अ. **मनु:** - मनु पु.प्र.ए.व. **इक्ष्वाकवे** - इक्ष्वाकु पु.च.ए.व. **अब्रवीत्** - ब्रू द्वि.ग.प.प.कर्त.लङ्.प्र.भू.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - अव्ययम् -** न विद्यते व्यय:-नाशो यस्य सोऽव्ययस्तमव्ययम् = नाही व्यय-नाश ज्याचा तो अव्यय, त्या अव्ययाला**(ष.ब.स.)** यद्वा **अव्ययम्** - वैदिकप्रमाणत्वादव्ययस्तमव्ययम् = वैदिक प्रमाण असल्यामुळे अव्यय, त्या अव्ययाला**(परिभाषा)** यद्वा **अव्ययम्** - अव्ययफलत्वादव्ययस्तमव्ययम् = अव्यय फल असल्यामुळे अव्यय, त्या अव्ययाला**(परि.) विवस्वते -** विवांसि-किरणानि विद्यन्ते यस्य स विवस्वान् तस्मै विवस्वते = किरणे आहेत ज्याची तो, त्या विवस्वानाला**(ष.ब.स.)**

**एवं परम्पराप्राप्तमिमं राजर्षयो विदु: ।**

**स कालेनेह महता योगो नष्ट: परन्तप ॥२॥**

**अन्वय: -** एवम्, परम्पराप्राप्तम्, इमम्, राजर्षय:, विदु:, परन्तप, महता, कालेन, स:, योग:, इह, नष्ट: ।

**अन्वयार्थ: - एवम्** - याप्रकारे **परम्पराप्राप्तम्** - त्यांनी योगाचे अनुष्ठान केले 'स्वयंतीर्ण: परान्तारयति' परंपरेने प्राप्त झालेल्या **इमम्** - या योगाला **राजर्षय:** - राजर्षी **विदु:** - जाणते झाले **परन्तप** - हे अर्जुना **महता कालेन** - परंतु पुष्कळ काळ मध्ये व्यतीत झाल्यामुळे **स: योग:** - तो योग **इह** - यावेळी **नष्ट:** - प्राय: नष्ट झाला.

**विवरण** - या प्रमाणे गुरुशिष्यपरंपरेने अनादिकालापासून चालत आलेल्या या योगाला प्राय: राजर्षी लोक जाणत होते. परंतु यावेळी दीर्घकाळ लोटल्यामुळे परंपरेने आलेल्या योगाचा संप्रदाय 'पित्याने आपल्या पुत्राला' असा हा परंपरागत आलेला योग यावेळी प्राय: नष्ट झाला.

**व्याकरणम् - एवम्** - एवम् क्रि.वि.अ. **परम्पराप्राप्तम्** - परम्परा स्त्री.वि. प्राप्तम्-प्र+आप् पं.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.द्वि.ए.व. **इमम्** - इदम् सर्व.पु.द्वि.ए.व. **राजर्षय:** - राजन्+ऋषि पु.प्र.ब.व. **विदु:** - विद् द्वि.ग.प.प.कर्त.लिट् परो.भू.तृ.पु.ब.व. **परन्तप** - परन्तप पु.संबो.ए.व. **महता** - महत् वि.पु.तृ.ए.व. **कालेन** - काल पु.तृ.ए.व. **स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **योग:** - योग पु.प्र.ए.व. **इह** - इह क्रि. वि.अ. **नष्ट:** - नश् च.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - परम्पराप्राप्तम्** - परम्परया-आदित्यमारभ्य गुरुशिष्यपरम्परया उपदेशक्रमेण प्राप्त:-लब्धस्तं परम्पराप्राप्तम् = परंपरेने- सूर्यापासून आरंभ करून गुरुशिष्य परंपरेने उपदेश क्रमाने प्राप्त झालेला, त्या परंपरेने प्राप्त झालेल्यास**(तृ.त.स.) राजर्षय:** - राजानश्च ते ऋषयश्चेति राजर्षय: = राजे आणि ते ऋषी असे राजर्षी**(क.स.) परन्तप** - शौर्यतेजोगभस्तिभिर्भानुरिव तापयतीति परन्तपस्तत्संबुद्धौ हे परन्तप = शौर्यरूप तेजाच्या किरणांनी सूर्याच्या समान तापतो तो परंतप, त्याचे संबोधनामध्ये हे परंतप**(उप.स.)**

पुरातन योगाची प्रशंसा -

**स एवायं मया तेऽद्य योग: प्रोक्त: पुरातन: ।**

**भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥३॥**

**अन्वय: -** स, एव, अयम्, पुरातन:, योग:, मया, ते, अद्य, प्रोक्त:, मे, भक्त:, असि, च, सखा, (असि), इ ति, हि, एतत्, उत्तमम्, रहस्यम् ।

**अन्वयार्थ: - स एव अयम् पुरातन: योग:** - तोच हा पुरातन अथवा प्राचीन योग **मया** - मी **ते** - तुला **अद्य** - यावेळी **प्रोक्त:** - कथन केला (का केला तर तू) **मे भक्त:** - माझा भक्त **असि** - आहेस **च** - आणि **सखा** - सखा (**असि** - आहेस) **इति** - म्हणून सांगितला **हि** - कारण **एतत्** - हे **उत्तमम्** - श्रेष्ठ **रहस्यम्** - ज्ञान आहे म्हणून गुप्त ठेवण्यायोग्य विषय आहे.

**विवरण** - तोच हा पुरातन योग म्ह. ज्ञानयोग मी तुला आज सांगितला, कारण तू माझा भक्त आहेस आणि सखा आहेस. हा योग एक उत्तम रहस्य आहे आणि उत्तम रहस्याची गोष्ट भक्त आणि मित्राला सांगणे योग्य आहे म्हणून मी तुला सांगतो. ज्ञानयोग उत्कृष्ट साधन आहे आणि मोक्षाचा सर्वोत्तम मार्ग आहे अर्थात् आत्मकल्याणाचा हा मोठा आणि सोपा पंथ आहे.

**व्याकरणम् - स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **अयम्** - इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **पुरातन:** -

पुरातन वि.पु.प्र.ए.व. **योग:** - योग पु.प्र.ए.व. **मया** - अस्मत् सर्व.तृ.ए.व. **ते** - युष्मत् सर्व.च.ए.व. **अद्य** - अद्य क्रि.वि.अ. **प्रोक्त:** - प्र+वच् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **भक्त:** - भज् प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **असि** - अस् द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.द्वि.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **सखा** - सखि पु.प्र.ए.व. **इति हि** - इति, हि क्रि.वि.अ. **एतत्** - एतत् सर्व.न.प्र.ए.व. **उत्तमम्** - उद्+तमप्=उत्तम वि.न.प्र.ए.व. **रहस्यम्** - रहस्य वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **भक्त:** - भजतीति भक्त: = भक्ति करतो असा भक्त**(वि.)** **पुरातन:** - पुरा-पूर्वस्मिन् काले भव: पुरातन: = पूर्व कालामध्ये असलेला पुरातन**(त.वि.)**

श्रीकृष्ण भगवंताचा आधुनिक जन्म मानून अर्जुनाचा प्रश्न -

**अर्जुन उवाच -** अर्जुन म्हणाला -

**अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वत: ।**

**कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ।।४।।**

**अन्वय:** - भवत:, जन्म, अपरम्, विवस्वत:, जन्म, परम्, आदौ, प्रोक्तवान्, इति, एतद्, कथम्, विजानीयाम् ।

**अन्वयार्थ: - भवत: जन्म** - आपला (तुमचा) जन्म तर **अपरम्** - अलीकडचा वसुदेवाच्या घरी झालेला अर्थात काही वर्षांपूर्वी झालेला (आणि) **विवस्वत: जन्म -** सूर्याचा जन्म **परम्** - सृष्टीच्या प्रारंभी म्ह. कल्पाच्या आरंभी झालेला आहे, तेव्हा **त्वम्** - तू **आदौ** - आरंभी **प्रोक्तवान् -** हा योग सूर्याला सांगितलास **इति एतत् -** अशा प्रकारचे हे सांगणे **कथम्** - मी कसे **विजानीयाम् -** खरे जाणावे ?

**विवरण** - अर्जुन म्हणाला, सर्गाच्या प्रारम्भी सूर्याचा जन्म झाला आणि तुझा जन्म आत्ताच काही वर्षांपूर्वी झाला, तर मग सृष्टिच्या आरम्भाला असलेल्या सूर्याला आत्ताच्या-अलिकडच्या काळातील तू हा योग सां गितला, हे मी कसे ओळखावे-खरे मानावे?

**व्याकरणम्** - **भवत: -** भवत् सर्व.पु.ष.ए.व. **जन्म** - जन्मन् न.प्र.ए.व. **अपरम्** - अपर वि.न.प्र.ए.व. **विवस्वत: -** विवस्वत् पु.ष.ए.व. **जन्म** - जन्मन् न.प्र.ए.व. **परम्** - पर वि.न.प्र.ए.व. **त्वम्** - युष्मत् सर्व.प्र.ए.व. **आदौ** - आदि वि.पु.स.ए.व. **प्रोक्तवान्** - प्र+वच् द्वि.ग.प.प.क्तवतु प्रत्यय कर्त.भू.धा. वि.पु.प्र.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **एतत्** - एतत् सर्व.न.प्र.ए.व. **कथम्** - कथम् क्रि.वि.अ. **विजानीयाम्** - वि+ज्ञा न.ग.प.प.कर्त.विध्यर्थ प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - अपरम्** - न परमित्यपरम् = नाही पर असे अपर**(नञ् त.स.)** **विवस्वत: -** सर्वं जगत्प्रकाशकरूपतेजोऽस्यास्तीति विवस्वान्-सूर्यस्तस्य विवस्वत: = सर्व जगत् प्रकाशित करण्याचे तेज ह्याचे आहे असा विवस्वत**(अस्त्यर्थे त.वि.)**

श्री भगवन्ताकडून आपले आणि अर्जुनाचे पुष्कळ जन्म होवून गेले याचे वर्णन -

**श्री भगवानुवाच** - श्रीभगवान म्हणाले -

**बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।**

**तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परन्तप ॥५॥**

**अन्वयः-** अर्जुन, मे, तव, च, बहूनि, जन्मानि, व्यतीतानि,अहम्, तानि, सर्वाणि, वेद, परन्तप, त्वम्, न, वेत्थ ।

**अन्वयार्थः - अर्जुन** - हे अर्जुना! **मे च तव -** माझे आणि तुझे **बहूनि जन्मानि -** पुष्कळ जन्म **व्यतीतानि** - होऊन गेले आहेत **अहम् -** मी **तानि सर्वाणि** - त्या सर्व जन्मांना **वेद** - जाणतो-मला त्याचे विस्मरण झाले नाही **परन्तप -** हे अर्जुना! **त्वम्** - तू **न वेत्थ -** त्यांना जाणत नाहीस-तुला त्याचे स्मरण नाही. अर्थात् तुझी ज्ञानशक्ति आवृत्त झालेली असल्यामुळे तू जाणत नाहीस.

**विवरण** - भगवान म्हणतात की, हे अर्जुना! तुझे आणि माझे अनेक जन्म होवून गेले आहेत. मी त्या सर्व जन्मांना जाणतो आणि तू जाणत नाहीस. याचे कारण हे आहे की, तुझी जी जाणण्याची ज्ञानशक्ति आहे ती मोहामुळे प्रतिबद्ध झाली आहे आणि मी नित्य, शुद्ध-बुद्ध असल्यामुळे माझी ज्ञानशक्ति कुंठित झाली नाही आणि मी त्रिकालज्ञानी असल्यामुळे मागच्या सर्व जन्मांचे परिपूर्ण रूपाने ज्ञान मला आहे म्हणून मी मागे झालेल्या सर्व जन्मांना जाणतो आणि तू त्रिकालज्ञानी नसल्यामुळे मागे झालेले अनेक जन्म तू जाणत नाहीस.

**व्याकरणम् - अर्जुन** - अर्जुन पु.संबो.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **तव** - युष्मत् सर्व.ष.ए.व. **च -** च उभ.अ. **बहूनि** - बहु वि.न.द्वि.ब.व. **जन्मानि** - जन्मन् न.द्वि.ब.व. **व्यतीतानि** - वि+अति+इ द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.द्वि.ब.व. **अहम्** - अस्मत् सर्व.पु.प्र.ए.व. **तानि -** तत् सर्व.न.द्वि.ब.व. **सर्वाणि** - सर्व सर्व.न.द्वि.ब.व. **वेद** -विद् द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.प्र.पु.ए.व. **परन्तप** - परन्तप पु.संबो.ए.व. **त्वम्** - युष्मत् सर्व.प्र.ए.व. **न -** न क्रि.वि.अ. **वेत्थ** - विद् द्वि.ग.प.प.लट् वर्त.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - परन्तप** - परम्-कामक्रोधादिरूपं शत्रुगणं शौर्येण बलवता विवेकेन तपसा च भानुरिव तापयतीति परन्तपस्तत्सम्बुद्धौ परन्तप = पर-कामक्रोधादिरूप शत्रुसमुदायाला आपल्या शौर्य, बल, विवेक, तप यांच्याद्वारा सूर्याप्रमाणे संताप देतो तो परंतप, त्याचे संबोधनामध्ये हे परंतप**(उप.स.)**

भगवंताच्या जन्माची अलौकिकता -

**अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् ।**

**प्रकृतिं स्वामधिष्ठाय सम्भवाम्यात्ममायया ॥६॥**

**अन्वयः -** (अहम्,) अजः, अपि, सन्, अव्ययात्मा, (अपि, सन्), भूतानाम्, ईश्वरः, अपि, सन्, स्वाम्, प्रकृतिम्, अधिष्ठाय, आत्ममायया, सम्भवामि ।

**अन्वयार्थः - (अहम्** - मी अन्तर्यामी परमात्मा) **अजः अपि सन्** - जन्मरहित असूनसुद्धा **अव्ययात्मा(अपि सन्) -** माझे ज्ञानशक्तिस्वरूप केव्हाही क्षीण न होणारे असे असूनसुद्धां **भूतानाम् ईश्वरः अपि सन् -** आब्रह्मस्तंबापर्यंत प्राणिमात्रांचा ईश्वर नियमन करणारा असूनसुद्धां **स्वां प्रकृतिम्** - आपल्या त्रिगुणात्मक मायेला **अधिष्ठाय -** अधीन करून **आत्ममायया** - आपल्या अचिन्त्य सामर्थ्यशक्तिने **सम्भवामि -** जन्म घेतो; जणुं काय मी शरीर धारण केल्यासारखा होतो.

**विवरण** - यद्यपि मी अजन्मा अपरिवर्तनशील आत्मा आहे आणि संपूर्ण प्राणिमात्रांचा ईश्वर असूनसुद्धा मी आपल्या प्रकृतिला स्वाधीन करून आपल्या आत्मशक्तिच्या द्वारा शरीर धारण केल्यासारखा होतो अर्थात आपल्या संकल्पबलाने प्रादूर्भूत होतो.

**व्याकरणम्** - **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **अजः** - अज वि.पु.प्र.ए.व. **अपि** - अपि क्रि.वि.अ. **सन्** - अस् द्वि.ग.प.प.कर्त.वर्त.धा.वि.पु.प्र.ए.व. **अव्ययात्मा** - अव्यय वि. आत्मन् पु.प्र.ए.व. **भूतानाम्** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.ष.ब.व. **ईश्वरः** - ईश् द्वि.ग.आ.प.+वरच्=ईश्वर पु.प्र.ए.व. **अपि** - अपि क्रि. वि.अ. **स्वाम्** - स्व सर्व.स्त्री.द्वि.ए.व. **प्रकृतिम्** - प्रकृति स्त्री.द्वि.ए.व. **अधिष्ठाय** - अधि+स्था प्र.ग.प.प.ल्यबन्त अ. **आत्ममायया** - आत्मन् पु. माया स्त्री.तृ.ए.व. **सम्भवामि** - सम्+भू प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **अव्ययात्मा** - निरवयवत्वेन विनाशकारणसामग्रीसम्बन्धायोगादव्ययो नाशनक्रियाया अ विषय आत्मा-स्वभावो यस्य सोऽव्ययात्मा-नित्यः = निरवयव असल्यामुळे विनाशकारणसामुग्रीसंबंध नसल्यामुळे अव्यय-नाशनक्रियेचा अविषय आत्मा-स्वभाव आहे ज्याचा तो अव्ययात्मा-नित्य**(ब.स.)**

श्री भगवंतांनी अवतार घेण्याच्या वेळेचे वर्णन -

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**

**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥७॥**

**अन्वयः** - भारत, यदा, यदा, धर्मस्य, ग्लानिः, भवति, (च,) अधर्मस्य, अभ्युत्थानम्, तदा, हि, अहम्, आत्मानम्, सृजामि ।

**अन्वयार्थः**- **भारत** - हे भरतवंशी! **यदा यदा** - ज्या ज्या वेळी **धर्मस्य** - धर्माचा **ग्लानिः** - ऱ्हास-हानि **भव ति** - होतो (**च** - आणि) **अधर्मस्य** - अधर्माचा **अभ्युत्थानम्** - प्रादुर्भाव होतो **तदा हि** - त्या त्या वेळीच **अहम्** - मी कूटस्थ आत्मा **आत्मानम्** - स्वतःला **सृजामि** - उत्पन्न करितो म्हणजे शरीर धारण करतो.

**विवरण** - वर्ण आणि आश्रमाच्या अभ्युदय आणि निःश्रेयसाची सिद्धि ज्या वैदिक धर्माने होते, अशा धर्माचा ज्यावेळी ह्रास-हानि होतो आणि धूमकेतुच्या समान सर्व अनर्थांचा हेतू अधर्म त्याचा ज्यावेळी उदय होतो, त्यावेळी धर्माचे रक्षण आणि अधर्माचा नाश करण्याकरिता सर्वांचा नियन्ता मी ईश्वर मायाच्या द्वारा योग्य शरीर धारण करतो.

**व्याकरणम्** - **भारत** - भारत पु.संबो.ए.व. **यदा यदा** - यदा क्रि.वि.अ. **धर्मस्य** - धर्म पु.ष.ए.व. **ग्लानिः** - ग्लानि स्त्री.प्र.ए.व. **भवति** - भू प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **अधर्मस्य** - अधर्म पु.ष.ए.व. **अभ्युत्थानम्** - अभि+उद् पूर्वक 'ष्ठा गतिनिवृत्तौ' स्था ल्युट् प्रत्ययान्त प्र.ग.प.प.न.प्र.ए.व. **तदा** - तदा क्रि.वि.अ. **हि** - हि प्रसिध्द्यर्थक क्रि.वि.अ. **अहम्** - अस्मत् सर्व.पु.प्र.ए.व. **आत्मानम्** - आत्मन् पु.द्वि.ए.व. **सृजामि** - सृज् ष.ग.प.प.कर्त.लट् वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **भारत** - भरतस्य गोत्रापत्यमिति भारतस्तत्सम्बुद्धौ हे भारत = भरत गोत्राचे अपत्य असा भारत त्याचे संबोधनामध्ये हे भारत**(त.वि.)** **अभ्युत्थानम्** - अभितः सर्वत्राऽऽश्रमेषु-वर्णेषु सर्वानर्थहेतोरधर्मस्योत्थानं धूमकेतोरिवोत्पत्तिरित्यभ्युत्थानम् = सर्व आश्रमामध्ये आणि वर्णामध्ये सर्व

अनर्थाला कारण अधर्माचे प्रगट होणे धूमकेतु प्रमाणे उत्पत्ति, असे अभ्युत्थान**(वि.)** **यदा** - यस्मिन् काल इति यदा = ज्या कालामध्ये असे यदा**(कालार्थे त.वि.)**

श्री भगवंताला अवतार घेण्याच्या कारणाचे कथन -

**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।**

**धर्मसंस्थापनार्थाय सम्भवामि युगे युगे ॥८॥**

**अन्वयः** - साधूनाम्, परित्राणाय, च, दुष्कृताम्, विनाशाय, धर्मसंस्थापनार्थाय, युगे, युगे, सम्भवामि ।

**अन्वयार्थः** - **साधूनाम्** - सन्मार्गस्थांचे अथवा सज्जनांचे **परित्राणाय** - चांगल्या प्रकारे रक्षण करण्याकरिता **च** - आणि **दुष्कृताम्** - दुर्जनांच्या **विनाशाय** - विनाशाकरिता आणि **धर्मसंस्थापनार्थाय** - धर्माची चांगल्या प्रकारे स्थापना करण्यासाठी मी **युगे युगे** - प्रत्येक युगामध्ये **सम्भवामि** - उत्पन्न होतो, अवतार घेतो.

**विवरण** - प्राण गेला तरी आपल्या धर्माला न सोडणारे असे धर्म करणारे सज्जन त्यांच्या रक्षणाकरिता आणि गतप्राण झाले तरी आपल्या दुष्कृत्याला न विसरणारे असे अधर्म करणारे जे पापी त्यांच्या विनाशाकरिता आणि चांगल्या प्रकारे धर्माची स्थापना करण्याकरिता प्रत्येक युगामध्ये मी अवतार धारण करतो.

**व्याकरणम्** - **साधूनाम्** - साध् प.ग.प.प.+उन्=साधु वि.पु.ष.ब.व. **परित्राणाय** - परि+त्रै प्र.ग.आ.प.+'आदेच उपदेशेऽशिति **६/१/४५**' ल्युट्=परित्राण वि.पु.च.ए.व. **च** - च उभ.अ. **दुष्कृताम्** - दुष्कृत् वि.पु.ष.ब.व. **विनाशाय** - विनाश पु.च.ए.व. **धर्मसंस्थापनार्थाय** - धर्म पु. सम्+स्थापन न. अर्थ पु.च.ए.व. **युगे युगे** - युज् स.ग.उ.प.+घञ्,कुत्वं न गुणः(गुणनिषेध)=युग न.स.ए.व. **संभवामि** - सम्+भू प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **दुष्कृताम्** - ये तु त्रिभिरपि करणैः निषिद्धमेव कुर्वन्ति नान्यत्ते दुष्कृतः-जगद्दूषणास्तेषां दुष्कृताम्-पापकारिणाम् = जे तीन करणांनी (काया वाचा मनाने अर्थात् इंद्रियांच्याद्वारा) शास्त्रनिषिद्धच आचरण करतात, दुसरे काही करत नाहीत, असे ते दुष्कृत-जगद्दूषण त्यांचा**(वि.)** **धर्मसंस्थापनार्थाय** - धर्मस्य संस्थापनं तस्मै धर्मसंस्थापनार्थाय = धर्माची संस्थापना धर्मसंस्थापना त्या धर्मसंस्थापनेकरिता **(ष.त.स.)** यद्वा **धर्मसंस्थापनार्थाय** - धर्मसंस्थापनमेवार्थः प्रयोजनम् तस्मै धर्मसंस्थापनार्थाय = धर्माची संस्थापना हाच अर्थ- प्रयोजन, त्या धर्मसंस्थापनेकरिता **(क.स.)**

भगवंताच्या जन्माला आणि कर्माला अलौकिक जाणण्याचे फल -

**जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः ।**

**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥९॥**

**अन्वयः** - यः, मे, एवम्, दिव्यम्, जन्म, च, कर्म, तत्त्वतः, वेत्ति, अर्जुन, सः, देहम्, त्यक्त्वा, पुनर्जन्म, न, एति, माम्, एति ।

**अन्वयार्थः** - **यः** - जो **मे** - माझ्या **एवम्** - मागे सांगितलेल्याप्रमाणे **द्विव्यम्** - अलौकिक **जन्म च कर्म** - जन्म व कर्मास **तत्त्वतः** - यथार्थ रूपाने **वेत्ति** - जाणतो **अर्जुन** - हे अर्जुना! **सः** - तो **देहम् त्यक्त्वा** - देहास त्यागल्यानंतर **पुनर्जन्म** - पुन्हा जन्मास **न एति** - प्राप्त होत नाही तर **माम्** - मला **एति** - प्राप्त होतो.

**विवरण** - दुसऱ्याच्या अपेक्षेविना जो स्वयं प्रकाशित होतो त्याला दिव्य म्हटले आहे. म्हणून दिव्य शब्दाचा अर्थ स्वयंप्रकाश निर्विशेष चिदेकरस असे परब्रह्म आहे व ते परब्रह्म अज असूनही मायेच्या द्वारा जन्म ग्रहण करते व अव्यय असूनही कर्म करते व निर्विशेष स्वयंप्रकाश-दिव्य ब्रह्मस्वरूपाच्या ठिकाणी जे काही जन्म व कर्म कल्पित प्रतीत होतात ते सर्व दिव्यच असतात म्हणजे परब्रह्मस्वरूपच असतात असे जो जाणतो किंवा परमात्म्याच्या ठिकाणी हे जन्म व कर्म वास्तव नाहीत मायाकृत आहेत असे जो तत्त्वत:-यथार्थ रूपाने जाणतो तो पुरुष पुनर्जन्माला प्राप्त न होता मोक्षाला प्राप्त होतो अर्थात् माझे स्वरूप होवून राहतो.

**व्याकरणम्** - **य:** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.पु.ष.ए.व. **एवम्** - एवम् क्रि.वि.अ. **दिव्यम्** - दिव् च.ग.प.प.+यत्=दिव्य वि.न.द्वि.ए.व. **जन्म** - जन्मन् न.द्वि.ए.व. **च** - च समुच्चयार्थक अ. **कर्म** - कर्मन् न.द्वि.ए.व. **तत्त्वत:** - तत्+त्व=तत्त्व+तसिल्=तत्त्वत: अ. **वेत्ति** - विद् द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **अर्जुन** - अर्जुन पु.संबो.ए.व. **स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **देहम्** - देह पु.द्वि.ए.व. **त्यक्त्वा** - त्यज् प्र.ग.प.प.त्वान्त अ. **पुनर्जन्म** - पुनर् क्रि.वि.अ. जन्मन् न.द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **एति** - इ द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.पु.द्वि.ए.व. **एति** - इ द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **दिव्यम्** - इतरानपेक्षया स्वयमेव स्वप्रकाशेन दीव्यति-प्रकाशयतीति निर्विशेषं परं ब्रह्म = इतराची अपेक्षा न करता निरपेक्षेने स्वत:च स्वप्रकाशाने प्रकाशित होते असे परब्रह्म**(वि)**

भगवंताच्या आश्रित होण्याचे फल -

**वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिता: ।**

**बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागता: ॥१०॥**

**अन्वय:** - वीतरागभयक्रोधा:, मन्मया:, माम्, उपाश्रिता:, बहव:, ज्ञानतपसा, पूता:, मद्भावम्, आगता: ।

**अन्वयार्थ:** - **वीतरागभयक्रोधा:** - विषयप्रीति, भय व क्रोध ज्यांच्यापासून निघून गेले-नष्ट झाले आहेत असे **मन्मया:** - माझ्यामध्ये अनन्य प्रेमाने स्थित राहिलेले-आपल्याला ईश्वराभिन्न समजणारे **माम् उपाश्रिता:** - माझाच परिपूर्णरूपाने आश्रय केलेले असे **बहव:** - अनेक मुमुक्षुलोक आतापर्यंत **ज्ञानतपसा** - ईश्वरा विषयीच्या ज्ञानरूपी तपाने **पूता:** - पवित्र झालेले **मद्भावम्** - माझ्या भावाला-स्वरूपाला **आगता:** - प्राप्त झाले आहेत.

**विवरण** - भोग आणि उपकार संबंधी रागाने, आध्यात्मिकादि उपद्रव संबंधी भयाने, अपकार संबंधी क्रोधाने रहित असे जे वामदेवादि अनेक मुमुक्षु ज्ञानरूप तपाने पवित्र होवून माझ्या स्वरूपाला प्राप्त झाले आहेत.

**व्याकरणम्** - **वीतरागभयक्रोधा:** - वि+इ द्वि.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. राग पु. भय न. क्रोध पु.प्र.ब.व. **मन्मया:** - अस्मत् सर्व.मयट् प्रत्ययान्त पु.प्र.ब.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **उपाश्रिता:** - उप+आ+श्रि प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **बहव:** - बहु वि.पु.प्र.ब.व. **ज्ञानतपसा** - ज्ञान न. तपस् न.तृ.ए.व. **पूता:** - पू न.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **मद्भावम्** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **भाव** - भाव पु.द्वि.ए.व. **आगता:** - आ+गम् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **वीतरागभयक्रोधा:** - रागश्च-विषयाभिलाषश्च, भयश्च-भीतिश्च, क्रोधश्च-द्वेषश्चेति

रागभयक्रोधास्तीव्रमोक्षेच्छया सदसद्विवेकवैराग्याभ्यां वीता:-निर्गता रागभयक्रोधा येषां ते वीतरागभयक्रोधा: = राग-विषयाभिलाषा, भय-भीति, क्रोध-द्वेष असे रागभयक्रोध तीव्र मोक्षाच्या इच्छेने सदसद्विवेक-वैराग्याच्याद्वारा गेले राग, भय, क्रोध ज्यांचे ते वीतरागभयक्रोध**(ष.ब.स.)** **मन्मया:** - मत्प्रधानोऽहं वासुदेवो लौकिके वैदिके च कर्मणि वर्तनं येषां ते मन्मया: = मीच प्रधान वासुदेव मुख्य-श्रेष्ठ लौकिक वैदिक कर्मामध्ये, असे ज्यांचे वर्तन चांगले ते मन्मय**(ष.ब.स.)** **मन्मया:** - मन्मया मां परमात्मानं तत्पदार्थं त्वंपदार्थाभेदेन साक्षात्कृतवन्तो मदेकचित्ता वा = मन्मय-मला तत्पदाचा अर्थ असलेला त्वंपदाच्या अर्थाशी अभेदरूपाने साक्षात्कार केलेले किंवा माझ्यामध्येच एकचित्त असलेले**(द्वि.)** **मद्भावम्** - मम भावो मद्भावस्तम्मद्भावम् = माझा भाव त्या मद्भावाला**(ष.ब.स.)** **ज्ञानतपसा** - ज्ञानमेवात्मविषयकं तपो ज्ञानतप:, तेन ज्ञानतपसा = ज्ञानच आत्मविषयक तप त्या ज्ञानतपाने**(क.स.)** यद्वा **ज्ञानतपसा** - ज्ञानं ब्रह्मैवाऽहमिति साक्षाद् ब्रह्मण्येवाऽऽत्मत्ववेदनमप्रतिबद्धं यज्ज्ञानं तदेव तपस्तेन = मी ब्रह्मच आहे अशा प्रकारच्या ब्रह्मामध्येच अप्रतिबद्ध आत्मत्वाला जाणणेरूप जे ज्ञान तेच तप अशा ज्ञानरूप तपाने**(क.स.)** **पूता:** - सम्यग्विनष्टानात्मस्वभावत्वेन शुद्ध आत्मा मनो येषां ते पूता:-शुद्धात्मान: = अनात्मस्वभाव नष्ट झाल्यामुळे ज्यांचा आत्मा-मन शुद्ध झाले आहे असे ते पूत-शुद्धात्मा**(ब.स.)**

भावनेनुसार भगवद्भक्तीचे फल -

**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।**

**मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्या: पार्थ सर्वश: ॥११॥**

**अन्वय:** - ये, माम्, यथा, प्रपद्यन्ते, तान्, तथा, एव, अहम्, भजामि, पार्थ, मनुष्या:, सर्वश:, मम, वर्त्म, अनुवर्तन्ते ।

**अन्वयार्थ:** - **ये** - जे भक्त **माम्** - मला **यथा** - जसे **प्रपद्यन्ते** - भजतात **तान्** - त्यांना **तथा एव** - त्याचप्रमाणे **अहम्** - मी **भजामि** - भजतो-त्याचप्रमाणे त्यांच्यावर कृपा करतो. **पार्थ** - हे अर्जुना! **मनुष्या:** - मनुष्यमात्र **सर्वश:** - सर्व प्रकारे **मम** - माझ्या **वर्त्म** - मार्गाचे **अनुवर्तन्ते** - अनुसरण करतात.

**विवरण** - जो पुरुष ज्या ज्या फलाची अभिलाषा करून माझ्या ज्या ज्या स्वरूपाची अर्थात् ज्ञानयोगाची किंवा कर्मयोगाची उपासना करतात मी त्यांच्या उपासनेच्यानुसार त्यांना ते ते फल देतो; म्हणून हे अर्जुना! मी सांगितलेले जे ज्ञान, तप, कर्म आणि भक्ति या मार्गाचे ते मुमुक्षुजन अनुसरण करतात.

**व्याकरणम्** - **ये** - यत् सर्व.पु.प्र.ब.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **यथा** - यथा क्रि.वि.अ. **प्रपद्यन्ते** - प्र+पद् च.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व. **तान्** - तत् सर्व.पु.द्वि.ब.व. **तथा एव** - तथा एव क्रि.वि.अ. **अहम्** - अस्मत् सर्व.पु.प्र.ए.व. **भजामि** - भज् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.प्र.पु.ए.व. **पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **मनुष्या:** - मनुष्य पु.प्र.ब.व. **सर्वश:** - सर्वशस् क्रि.वि.अ. **मम** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **वर्त्म** - वर्त्मन् न.द्वि.ए.व. **अनुवर्तन्ते** - अनु+वृत् प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **यथा** - येन प्रकारेण यथा - ज्या प्रकाराने यथा**(त.वि.)**

देवतांच्या उपासनेचे शीघ्रफल -

**काङ्क्षन्त: कर्मणां सिद्धिं यजन्त इह देवता: ।**

**क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥१२॥**

**अन्वयः** - कर्मणाम्, सिद्धिम्, काङ्क्षन्तः, इह, देवताः, यजन्ते, हि, मानुषे, लोके, कर्मजा, सिद्धिः, क्षिप्रम्, भवति ।

**अन्वयार्थः** - **कर्मणाम्** - कर्माच्या **सिद्धिम्** - सिद्धिची **काङ्क्षन्तः** - इच्छा करणारे अधिकारी पुरुष **इह** - या लोकामध्ये **देवताः** - इंद्र, अग्नि इ. देवतांची **यजन्ते** - उपासना करतात **हि** - कारण **मानुषे लोके** - या मनुष्य लोकामध्ये **कर्मजा सिद्धिः** - कर्मापासून होणारी सिद्धि **क्षिप्रम्** - लवकर **भवति** - होते अर्थात् कर्मफले लवकर प्राप्त होतात.

**विवरण** - या लोकामध्ये इन्द्र, अग्नि आदि देवांच्या संतुष्टीकरिता योग करणारे अथवा श्रौत आदि कर्माच्या द्वारा अन्तःकरणशुद्धिची इच्छा करणारे पुरुष माझ्या अनुसार कर्ममार्गाचे अनुसरण करतात. त्यांना मनुष्य लोकामध्ये कर्मानुष्ठानजन्य चित्तशुद्धी आदि अतिशीघ्र प्राप्त होते.

**व्याकरणम्** - **कर्मणाम्** - कर्मन् न.ष.ब.व. **सिद्धिम्** - सिद्धि स्त्री.द्वि.ए.व. **काङ्क्षन्तः** - काङ्क्ष् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.धा.वि.पु.प्र.ब.व. **इह** - इह क्रि.वि.अ. **देवताः** - देवता स्त्री.द्वि.ब.व. **यजन्ते** - यज् प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व. **हि** - हि क्रि.वि.अ. **मानुषे** - मानुष वि.पु.स.ए.व. **कर्मजा** - कर्मन् न. ज वि.स्त्री.प्र.ए.व. **सिद्धिः** - सिद्धि स्त्री.प्र.ए.व. **क्षिप्रम्** - क्षिप्रम् क्रि.वि.अ. **भवति** - भू प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **कर्मजा** - कर्मणो जाता इति कर्मजा = कर्मापासून उत्पन्न झाले ते कर्मज**(त.वि.)** **काङ्क्षन्तः** - काङ्क्षन्ति-इच्छन्ति ते काङ्क्षन्तः = आकांक्षा-इच्छा करतात ते काङ्क्षन्त**(वि.)** **मानुषे** - मनोरपत्यमिति मानुषस्तस्मिन् मानुषे = मनुचे अपत्य असा मानुष त्यामध्ये**(अपत्यर्थे त.वि.)**

आपल्या कर्मदिव्यतेचे तत्त्व -

**चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।**

**तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥१३॥**

**अन्वयः** - मया, गुणकर्मविभागशः, चातुर्वर्ण्यम्, सृष्टम्, तस्य, कर्तारम्, अपि, माम्, अकर्तारम्, अव्ययम्, विद्धि ।

**अन्वयार्थः** - **मया** - मी **गुणकर्मविभागशः** - गुणांचा विभाग व कर्माचा विभाग करून त्या गुणकर्मानुसार **चातुर्वर्ण्यम्** - ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, व शूद्र असे चार वर्णाचे लोक **सृष्टम्** - उत्पन्न केले आहेत **तस्य कर्तारम् अपि माम्** - मायिक व्यवहार दृष्ट्या मी जरी त्यांचा कर्ता असलो तरी तत्त्वदृष्टिने **अकर्तारम्** - अकर्ता आहे व त्यानुसार मी **अव्ययम्** - अविनाशी आहे **विद्धि** - असे तू समज.

**विवरण** - सृष्टिच्या आरंभाला सत्त्वादि गुणांचा आणि शमादि कर्माचा विभाग करून मी चार वर्ण आणि चार आश्रम निर्माण केले. यद्यपि मायिकदृष्ट्या मी त्यांचा कर्ता आहे तथापि तत्त्वदृष्टीने मी अकर्ता व अभोक्ता आहे असे समज.

**व्याकरणम्** - **मया** - अस्मत् सर्व.तृ.ए.व. **गुणकर्मविभागशः** - गुण पु. कर्मन् न. विभाग पु.शस् प्रत्ययान्त

अ. **चातुर्वर्ण्यम्** - चातुर्वर्ण्य न.प्र.ए.व. **सृष्टम्** - सृज् ष.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **तस्य** - तत् सर्व.पु.ष.ए.व. **कर्तारम्** - कृ अ.ग.उ.प.+तृच्=कर्तृ पु.द्वि.ए.व. **अपि** - अपि क्रि.वि.अ. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **अव्ययम्** - अव्यय वि.पु.द्वि.ए.व. **अकर्तारम्** - अ+कर्तृ पु.द्वि.ए.व. **विद्धि** - विद् द्वि.ग.प.प.कर्त.लोट् आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **चातुर्वर्ण्यम्** - चत्वारो वर्णा एव चातुर्वर्ण्यम् = चार वर्णच चातुर्वर्ण्य**(त.वि.)** **अकर्तारम्** - न विद्यते कर्ता यस्य सोऽकर्ता तमकर्तारम् = नाही कर्ता ज्याचा तो अकर्ता, त्या अकर्त्याला**(ष.ब.स.)** **गुणकर्मविभागशः** - गुणाश्च कर्माणि च गुणकर्माणि तेषां विभागो गुणकर्मविभागस्तेन इति शस् गुणकर्म विभागशः = गुण आणि कर्म त्यांचा विभाग गुणकर्मविभाग त्या गुणकर्मविभागाद्वारे**(समाहार द्व.स.)**

**न मां कर्माणि लिम्पन्ति न मे कर्मफले स्पृहा ।**

**इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बध्यते ॥१४॥**

**अन्वयः** - माम्, कर्माणि, न, लिम्पन्ति, कर्मफले, मे, स्पृहा, न (अस्ति), इति, माम्, यः, अभिजानाति, सः, कर्मभिः, न, बध्यते ।

**अन्वयार्थः** - **माम्** - मला **कर्माणि** - कर्मे **न लिम्पन्ति** - लिप्त करीत नाहीत अथवा बन्धन करीत नाहीत. **कर्मफले** - कर्माच्या फळामध्ये **मे** - माझी **स्पृहा** - आसक्ति **न (अस्ति)** - नाही **इति** - याप्रमाणें **माम्** - मला ईश्वर स्वरूप आत्म्याला **यः** - जो **अभिजानाति** - चांगल्या प्रकारे जाणतो **सः** - तो **कर्मभिः** - कर्मांनी **न बध्यते** - बांधला जात नाही.

**विवरण** - मी कर्म करतो असा कोणत्याही प्रकारचा अभिमान नसल्यामुळे माझी कर्म आणि कर्मफळाच्या ठिकाणी कोणत्याही प्रकारची स्पृहा नाही म्हणून मी कोणत्याही कर्माच्या द्वारा लिप्त होत नाही अशा प्रकारे माझ्या स्वरूपाला यथार्थरूपाने-आत्मरूपाने जो जाणतो तो मनुष्य कर्माच्या द्वारा बद्ध केला जात नाही.

**व्याकरणम्** - **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **कर्माणि** - कर्मन् न.प्र.ब.व. **न** - न क्रि.वि.अ. **लिपन्ति** - लिप् ष.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व. **कर्मफले** - कर्मन् न. फल न.स.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **स्पृहा** - स्पृहा स्त्री.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **इति** - इति क्रि.वि.अ. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **अभिजानाति** - अभि+ज्ञा न.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **कर्मभिः** - कर्मन् न.तृ.ब.व. **न** - न क्रि.वि.अ. **बध्यते** - बन्ध् न.ग.प.प.कर्म लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **कर्मफले** - कर्मणः फलमिति कर्मफलं तस्मिन् कर्मफले = कर्माचे फल असे कर्मफल, त्या कर्मफलामध्ये**(ष.त.स.)**

पूर्वीच्या मुमुक्षुंचे उदाहरण -

**एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः ।**

**कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥१५॥**

**अन्वयः** - पूर्वैः, अपि, मुमुक्षुभिः, एवम्, ज्ञात्वा, कर्म, कृतम्, तस्मात्, त्वम्, पूर्वैः, पूर्वतरम्, कृतम्, कर्म, एव, कुरु ।

**अन्वयार्थः - पूर्वैः अपि मुमुक्षुभिः** - पूर्वीच्या मुमुक्षूंनीही **एवम्** - अशा प्रकारे **ज्ञात्वा** - जाणून **कर्म** - कर्म **कृतम्** - केले. **तस्मात्** - म्हणून **त्वम्** - तूं - **पूर्वैः** - पूर्वीच्या मुमुक्षूंनी **पूर्वतरम्** - त्यांच्याही पूर्वीचे अथवा परंपरागत आलेले कर्मच केले. नवीन उत्पन्न केले नाही **कृतम्** - असे केलेले **कर्म एव** - कर्मच **कुरु** - तू ही कर.

**विवरण** - निष्काम कर्माच्या रहस्याला जाणून अर्थात् मी कर्ता नाही मला कर्मफलाची इच्छा नाही असे जाणून पूर्वीच्या मोक्षाची इच्छा करणाऱ्या साधकांनी पूर्वजांपासून चालत आलेले कर्मच केले आहे म्हणून तू सुद्धा तेच कर्म कर.

**व्याकरणम् - पूर्वैः** - पूर्व सर्व.पु.तृ.ब.व. **अपि -** अपि क्रि.वि.अ. **मुमुक्षुभिः** - मुमुक्षु इच्छादर्शक पु.तृ.ब.व. **एवम्** - एवम् क्रि.वि.अ. **ज्ञात्वा** - ज्ञा न.ग.उ.प.त्वान्त अ. **कर्म** - कर्मन् न.प्र.ए.व. **कृतम्** - कृ अ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **तस्मात्** - तत् सर्व.पु.पं.ए.व./अ. **त्वम्** - युष्मत् सर्व.प्र.ए.व. **पूर्वैः** - पूर्व सर्व.पु.तृ.ब.व. **पूर्वतरम्** - पूर्वतर न.प्र.ए.व. **कृतम्** - कृ अ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **कर्म** - कर्मन् न.प्र.ए.व. **एव - एव** क्रि.वि.अ. **कुरु** - कृ अ.ग.प.प.कर्त.लोट् आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - मुमुक्षुभिः** - संसारान्मोक्तुमिच्छन्ति ते मुमुक्षवस्तैर्मुमुक्षुभिः - संसारापासून मुक्त होण्याची इच्छा करतात ते मुमुक्षु त्या मुमुक्षुंनी**(कृ.वि.)** यद्वा **मुमुक्षुभिः** - अविद्याबन्धेभ्यो मोचयितुमिच्छद्भिर्मुमुक्षुभिः = अविद्यारूप बन्धनापासून मुक्त होण्याची इच्छा करणाऱ्या मुमुक्षुंकडून**(कृ.वि.)पूर्वतरम्** - अतिशयेन पूर्वमि ति पूर्वतरम् = अत्यंत पूर्व असे पूर्वतर**(अतिशयार्थे त.वि.)**

कर्म आणि अकर्म यांना तत्त्वाने जाणण्याचे फल -

**किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः।**

**तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्॥१६॥**

**अन्वयः -** कर्म, किम्, अकर्म, किम्, इति, अत्र, कवयः, अपि, मोहिताः, (अतः), तत्, कर्म, ते, प्रवक्ष्या मि, यत्, ज्ञात्वा, अशुभात्, मोक्ष्यसे।

**अन्वयार्थः - कर्म किम्** - कर्म कोणते व **अकर्म किम्** - अकर्म कोणते **इति अत्र** - या विषयी निर्णय करण्यामध्ये **कवयः अपि -** बुद्धिमान पुरुष सुद्धा **मोहिताः** - मोहित झालेले आहेत **(अतः -** म्हणून) **तत्** - ते **कर्म** - कर्म, अकर्म व विकर्म काय आहे ते **ते प्रवक्ष्यामि** - मी तुला सांगतो **यत्** - जे कर्माकर्मादि **ज्ञात्वा** - जाणून **अशुभात् -** अशुभ अशा संसारापासून **मोक्ष्यसे** - तू मुक्त होशील.

**विवरणः** - कर्म काय आहे आणि अकर्म काय आहे याचा निर्णय करण्याकरिता मोठ-मोठे विद्वान सुद्धा मो हित झालेले आहेत म्ह. त्यांना सुद्धा यांचा निर्णय लागू शकला नाही; म्हणून मी तुला कर्म आणि अकर्माचे स्वरूप सांगेन. त्या स्वरूपाला जाणून तू अशुभ संसारापासून मुक्त होशील.

**व्याकरणम् - कर्म -** कर्मन् न.प्र.ए.व. **किम् -** किम् क्रि.वि.अ. **अकर्म** - अकर्मन् न.प्र.ए.व. **किम् इति अत्र** - किम् इति अत्र क्रि.वि.अ. **कवयः** - कु प्र.ग.आ.प.+इन्+गुण=कवि पु.प्र.ब.व. **अपि** - अपि क्रि. वि.अ. **मोहिताः** - मुह् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **ते** - युष्मत् सर्व.च.ए.व. **कर्म** - कर्मन् न.प्र.ए.व. **प्रवक्ष्यामि** - प्र+वच् द्वि.ग.प.प.कर्त.लृट् वर्त.प्र.पु.ए.व. **यत्** - यत्

सर्व.न.द्वि.ए.व. **अशुभात्** - अशुभात् अ+शुभ न.पं.ए.व. **मोक्ष्यसे** - मुच् ष.ग.आ.प.कर्त.लृट् द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अकर्म** - न कर्मेत्यकर्म = नाही कर्म असे अकर्म**(न.त.स.)** यद्वा **अकर्म** - श्रुतिस्मृतिभ्यां यदविहितं तदकर्मेति केचित् पण्डिता आहु: = श्रुतिस्मृतिंच्या द्वारा जे अविहित ते अकर्म असे काही पंडित म्हणतात**(न.त.स.)** **अशुभात्** - न शुभमित्यशुभं तस्मादशुभात् = नाही शुभ ते अशुभ त्या अशुभापासून (संसारापासून)**(न.त.स.)**

कर्म, विकर्म आणि अकर्माच्या स्वरूपाला जाणण्याची प्रेरणा -

**कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मण: ।**

**अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गति: ॥१७॥**

**अन्वय:** - हि, कर्मण:, अपि, बोद्धव्यम् (अस्ति), च, विकर्मण:, बोद्धव्यम् (अस्ति), च, अकर्मण:, बोद्धव्यम् (अस्ति), कर्मण:, गति:, गहना ।

**अन्वयार्थ: - हि** - कारण **कर्मण: अपि** - शास्त्रविहित कर्माचेही स्वरूप **बोद्धव्यम् (अस्ति)** - जाणले पा हिजे **च विकर्मण:** - व प्रतिषिद्ध-शास्त्रनिषिद्ध कर्माचेही स्वरूप **बोद्धव्यम्** - जाणणे आवश्यक आहे **च** - आणि **अकर्मण:** - सर्व कर्मांचा त्याग करून मूक वाणीने बसणे या अवस्थेचेही स्वरूप **बोद्धव्यम् (अस्ति)** - समजावून घेणे उचित आहे कारण **कर्मण:** - कर्माचे **गति:** - यथार्थ स्वरूप **गहना** - गहन आहे.

**विवरण** - मुक्तिची इच्छा करणाऱ्या विवेकी मनुष्याने करणे योग्य कर्माचे तत्त्व सुद्धा समजून घेतले पाहिजे आणि निषिद्ध कर्माचे तत्त्वसुद्धा जाणून घेतले पाहिजे व अकर्माच्या तत्त्वाचे सुद्धा परिज्ञान करून घेतले पा हिजे कारण कर्म, अकर्म, आणि विकर्म यांचे तत्त्व कळणे फार कठीण आहे अर्थात विद्वानाला सुद्धा यांचे तत्त्व कळणे दुर्विज्ञेय आहे.

**व्याकरणम्** - **हि** - हि क्रि.वि.अ. **कर्मण:** - कर्मन् न.ष.ए.व. **अपि** - अपि क्रि.वि.अ. **बोद्धव्यम्** - बुध् प्र.ग.उ.प.कर्म.धा.वि.तव्यत् प्रत्ययान्त न.प्र.ए.व. **अस्ति** - अस् द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **विकर्मण:** - वि+कर्मन् न.ष.ए.व. **बोद्धव्यम्** - बुध् प्र.ग.उ.प.कर्म.विध्यर्थ धा.वि.न.प्र.ए.व. **अकर्मण:** - अ+कर्मन् न.ष.ए.व. **बोद्धव्यम्** - बुध् प्र.ग.उ.प.कर्म.धा.वि. तव्यत् प्रत्ययान्त न.प्र.ए.व. **कर्मण:** - कर्मन् न.ष.ए.व. **गति:** - गम् प्र.ग.प.प.+क्तिन्=गति स्त्री.प्र.ए.व. **गहना** - गहना वि.स्त्री.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - अकर्मण:** - न कर्मेत्यकर्म तस्य अकर्मण: = नाही कर्म असे अकर्म, त्या अकर्माचे **(न.त.स.)** **विकर्मण:** - प्रतिषिद्धम्-निन्दितं कर्मेति विकर्म तस्य विकर्मण: = प्रतिषिद्ध-निन्दित कर्म असे विकर्म**(गति स.)** **बोद्धव्यम्** - बोद्धुम्-ज्ञातुं योग्यं बोद्धव्यम् = जाणण्यास योग्य बोद्धव्य**(कृ.वि.)**

कर्मामध्ये अकर्म आणि अकर्मामध्ये कर्माला तत्त्वाने जाणण्याचे फल-

**कर्मण्यकर्म य: पश्येदकर्मणि च कर्म य: ।**

**स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्त: कृत्स्नकर्मकृत् ॥१८॥**

**अन्वय:** - य:, कर्मणि, अकर्म, पश्येत्, च, य:, अकर्मणि, कर्म, पश्येत् , स:, मनुष्येषु, बुद्धिमान, स:,

युक्तः, कृत्स्नकर्मकृत् ।

**अन्वयार्थः - यः**:- जो बुद्धिमान मनुष्य **कर्मणि** - शरीर, इन्द्रिये, प्राण यांच्या प्रत्येक क्रियेमध्ये-यांच्या प्रत्येक व्यापारामध्ये **अकर्म** - आत्मतत्त्वाचे अकर्तृत्त्व **पश्येत्** - पाहतो **च यः** - आणि जो **अकर्मणि** - अकर्मामध्ये-मूक वाणीने बसणे या अवस्थेत **कर्म** - कर्तृत्त्व **पश्येत्** - पाहतो **सः** - तो **मनुष्येषु** - सर्व मनुष्यांमध्ये **बुद्धिमान्** - मोठा बुद्धिमान **सः** - तो **युक्तः** - योगी **सः** - तो **कृत्स्नकर्मकृत्**- संपूर्ण कर्मे करणारा तोच आहे.

**विवरण** - जो लौकिक आणि वैदिक व्यापाररूप संपूर्ण क्रियांमध्ये कर्माच्या अभावाला पहातो आणि देह, इन्द्रियादि व्यापाराच्या उपरामरूप अकर्मामध्ये कर्माला पहातो. जसे नाव वेगाने जात असताना त्या नावेत बसलेल्या पुरुषाला वृक्षाचे गमन-चालणे दिसले, तरी ते वृक्ष निष्क्रिय-स्थिरच असतात, त्याचप्रमाणे देह, इंद्रिये विषयांमध्ये स्वच्छंद प्रवृत्त झाली तरी त्यामध्ये असणारे आत्मतत्त्व निष्क्रिय आहे, असे समजणे यालाच कर्ममध्ये अकर्म पाहणे असे म्हणतात. आणि अकर्मामध्ये कर्म कसे, तर जसे दूरप्रदेशातून जाणारे लोक चालत असताही 'उभे आहेत' असा भ्रम होतो वास्तविक ते चालतच आहेत असे समजणे; त्याचप्रमाणे डोळे बंद केल्यानंतर स्तब्ध अवस्थेत देहेंद्रियांची बाहेरची क्रिया दिसत नसली म्हणजे 'मी काही करत नाही' असे समजणे हा भ्रम आहे, आतमध्ये वृत्तिचे चलन-वलन चालूच असते, असे समजणे यालाच अकर्मामध्ये कर्म पाहणे असे म्हणतात. असा जो कर्मामध्ये अकर्म आणि अकर्मामध्ये कर्म पहातो तोच संपूर्ण मनुष्यांमध्ये बुद्धिमान, योगी, त्याचप्रमाणे सम्पूर्ण श्रौत आणि स्मार्त कर्माचे अनुष्ठान करणारा सुद्धा तोच आहे.

**व्याकरणम्** - **यः**:- यत् सर्व.पु.प्र.ए.व. **कर्मणि** - कर्मन् न.स.ए.व. **अकर्म** - अ+कर्मन् न.द्वि.ए.व. **पश्येत्** - दृश् प्र.ग.प.प.कर्त.विधिलिङ् तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **अकर्मणि** - अ+कर्मन् न.स.ए.व. **कर्म** - कर्मन् न.प्र.ए.व. **पश्येत्** - दृश् प्र.ग.प.प.कर्त.विधिलिङ् तृ.पु.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **मनुष्येषु** - मनुष्य पु.स.ब.व. **बुद्धिमान्** - बुध् प्र.ग.प.प./च.ग.आ.प.+क्तिन्=बुद्धि+मतुप्=बुद्धिमत् वि.पु.प्र.ए.व. **युक्तः** - युज् स.ग.प.प.अधिकरणे क्त.वि.पु.प्र.ए.व. **कृत्स्नकर्मकृत्** - कृत्स्न वि. कर्मन् न. कृत् वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थः - बुद्धिमान्** - बुद्धिरस्यास्तीति बुद्धिमान् = बुद्धि ज्याची आहे असा बुद्धिमान्**(अस्त्यर्थे त. वि.) कृत्स्नकर्मकृत्** - कृत्स्नानि च-श्रौतस्मार्तसर्वाणि च तानि कर्माणि चेति कृत्स्नकर्माणि, कृत्स्नकर्माणि करोतीति कृत्स्नकर्मकृत् = श्रौत, स्मार्त सर्व आणि ती कर्मे सर्वकर्मे, सर्व कर्मे करतो असा कृत्स्नकर्मकृत् **(कर्मधा.स.)**

कामना आणि संकल्परहित आचरण करणाऱ्या ज्ञान्याची प्रशंसा -

**यस्य सर्वे समारम्भाः कामसङ्कल्पवर्जिताः ।**

**ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पण्डितं बुधाः ॥१९॥**

**अन्वयः** - यस्य, सर्वे, समारम्भाः, कामसङ्कल्पवर्जिताः, तम्, ज्ञानाग्निदग्धकर्माणम्, बुधाः, पण्डितम्, आहुः ।

**अन्वयार्थः - यस्य** - ज्या बुद्धिमान मनुष्याचे **सर्वे समारम्भाः** - संपूर्ण कर्मे **कामसङ्कल्पवर्जिताः -**

कामसंकल्प यांनी रहित असतात **तम्** - त्या महापुरुषाला **ज्ञानाग्निदग्धकर्माणम् -** ज्ञानरूप अग्निने ज्याची कर्मे जळून भस्म झाली आहेत अशा त्याला **बुधा:** - ज्ञानी लोक **पण्डितम्** - पंडित **आहु:** - म्हणतात.

**विवरण** - ज्या ब्रह्मज्ञान्याच्या प्राणरक्षणाकरिता केले जाणारे शरीर इंद्रियादिकांचे संपूर्ण व्यापार, काम आणि संकल्पाने वर्जित आहेत आणि ज्या पुरुषाने ज्ञानरूपी अग्निने आपली कर्मे जाळून टाकली आहेत अशा पुरुषाला शास्त्रज्ञ लोक पण्डित म्हणतात.

**व्याकरणम्** - **यस्य:** - यत् सर्व.पु.ष.ए.व. **सर्वे** - सर्व सर्व.पु.प्र.ब.व. **समारम्भा:** - सम् वि. आरंभ पु.प्र.ब.व. **कामसङ्कल्पवर्जिता: -** काम पु. संकल्प पु. वृज् द.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **तम् -** तत् पु.द्वि.ए.व. **ज्ञानाग्निदग्धकर्माणम्** ज्ञान न. अग्नि पु. दह् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. कर्मन् न.वि.पु.द्वि.ए.व. **बुधा:** - बुध पु.प्र.ब.व. **पण्डितम्** - पण्डित वि.पु.द्वि.ए.व. **आहु: -** ब्रू द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **कामसङ्कल्पवर्जिता: -** कामश्च सङ्कल्पश्च कामसङ्कल्पौ ताभ्यां वर्जिता: कामसङ्कल्पवर्जिता: = काम आणि संकल्प कामसंकल्प, यांनी रहित कामसंकल्पवर्जित**(द्व.गर्भि.तृ.त.स.) ज्ञानाग्निदग्धकर्माणम्** - ज्ञानमेवाग्निर्ज्ञानाग्नि:, ज्ञानाग्निना दग्धानि कर्माणि यस्य स ज्ञानाग्निदग्धकर्मा तं ज्ञानाग्निदग्धकर्माणम् = ज्ञानच अग्नि ज्ञानाग्नि, त्या ज्ञानाग्निने जळून गेली कर्मे ज्याची तो ज्ञानाग्निदग्धकर्मा, त्या ज्ञानाग्निदग्धकर्मी पुरुषाला **(कर्म.गर्भि.तृ.त.गर्भि.ष.ब.स.) समारम्भा: -** सम्यग्देहेन्द्रियादिभिरेव कर्माणि समारभ्यन्ते-क्रियन्त इति समारम्भा: - सर्व कर्मे उत्तम प्रकारे देहेन्द्रियांच्या द्वारा आरंभ केल्या जातात असे समारंभ**(त.वि.) पण्डितम्** - पण्डा-आत्मविषया बुद्धिर्यस्य स पण्डितस्तं पण्डितम् = आत्म्याला विषय करण्याची बुद्धि ज्याची तो प ण्डित त्या पंडिताला**(ष.ब.स.)** यद्वा **पण्डितम्** - पण्डा-कल्याणी सर्वत्र ब्रह्ममात्रावगाहिन्यखण्डात्मिका वृत्तिरस्य संजातेति पण्डितस्तमेव पण्डितं वदन्ति नान्यमित्यर्थ: = पण्डा-कल्याणी अर्थात् सर्व ठिकाणी ब्रह्ममात्रालाच केवळ जाणणारी अखण्डस्वरूपवृत्ति ज्याला प्राप्त झाली तो पंडित-त्याला पंडित म्हणतात. दुसऱ्याला म्हणत नाहीत, हा अर्थ आहे.**(संजातार्थे त.वि.)**

कर्मफलासक्तिचा त्याग करून कर्म करण्याची प्रशंसा -

**त्यक्त्वा कर्मफलासङ्गं नित्यतृप्तो निराश्रय: ।**

**कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किञ्चित्करोति स: ॥२०॥**

**अन्वय:** - (य:)कर्मफलासङ्गम्, त्यक्त्वा, नित्यतृप्त:, निराश्रय:, स:, कर्मणि, अभिप्रवृत्त:, अपि, किञ्चित्, न, करोति, एव ।

**अन्वयार्थ:** - (**य:** - जो) **कर्मफलासङ्गम्** - कर्माविषयी अभिमान व फलासक्ति **त्यक्त्वा** - टाकून **नित्यतृप्त:** - परमात्म्यामध्ये नित्यतृप्त असल्यामुळे विषयाविषयीची इच्छा न करणारा व **निराश्रय:** - भौतिक आश्रयाने रहित असणारा असा **स: -** तो **कर्मणि -** कर्मामध्ये **अभिप्रवृत्त: अपि** - सर्व प्रकारे जरी प्रवृत्त झाला असला तरी **किञ्चित् न करोति एव -** काहीच करीत नाही.

**विवरण** - ब्रह्मानन्दामध्ये तृप्त असणारा, कामनारहित पुरुष देहाच्या ठिकाणी असणारा तादात्म्यरूप अ भिमान टाकून, जरी कर्मामध्ये प्रवृत्त होत असला तरीसुद्धा तो काही करत नाही. अर्थात कोणत्याही कर्माने

तो लिप्त होत नाही; कारण त्याला सर्वकर्मशून्य आत्म्याचे ज्ञान झालेले असते, त्यामुळे तो लोकदृष्ट्या कर्म करीत असला तरी तो त्या कर्माने लिप्त होत नाही.

**व्याकरणम्** - **कर्मफलासङ्गम्** - कर्मन् न. फल न. आ+सङ्ग पु.द्वि.ए.व. **त्यक्त्वा** - त्यज् प्र.ग.प.प.त्वान्त अ. **नित्यतृप्तः** - नित्य वि. तृप् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **निराश्रयः** - निराश्रय वि.पु.प्र.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **कर्मणि** - कर्मन् न.स.ए.व. **अभिप्रवृत्तः** - अभि+प्र+वृत् प्र.ग.आ.प.कर्त.भू.धा. वि.पु.प्र.ए.व. **अपि किञ्चत् न** - अपि, किञ्चत्, न क्रि.वि.अ. **करोति** - कृ अ.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ.

**समासविग्रहार्थाः** - **कर्मफलासङ्गम्** - कर्मफलेषु सङ्गः-आसक्तिः कर्मफलसङ्गस्तंकर्मफलासङ्गम् = कर्मफलामध्ये आसक्ति कर्मफलसंग, त्या कर्मफलसंगाला-कर्मफलासक्तिला**(स.त.स.)** **नित्यतृप्तः** - नित्येन -निजानंदेन तृप्तः नित्यतृप्तः = नेहमी स्वतःच्या आनंदाने तृप्त, नित्यतृप्त**(तृ.त.स.)** **निराश्रयः** - आश्रयो देहे न्द्रियादिरद्वैतदर्शनेननिर्गतो यस्मात्स निराश्रयः-देहेन्द्रियाद्यभिमानशून्यः = अद्वैत दर्शनाने देहेन्द्रियादि आश्रय ज्याच्यापासून निघून गेला तो निराश्रय**(प.ब.स.)** यद्वा **निराश्रयः** - येन ससाधनं कर्म पुमान् आश्रयति स आश्रयः-कामस्तस्मान्निर्गतो यः स निराश्रयः-निष्कामः = ज्याच्यामुळे साधनासह कर्माचा पुरुष आश्रय करतो तो आश्रय-काम त्यापासून वेगळा झाला तो निराश्रय-निष्काम**(प.ब.स.)**

केवळ शरीरासंबंधी कर्म करणाऱ्या संन्याशाला पाप न स्पर्श करण्याचे कथन -

**निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः ।**

**शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥२१॥**

**अन्वयः** - निराशीः, यतचित्तात्मा, त्यक्तसर्वपरिग्रहः, केवलम्, शारीरम्, कर्म, कुर्वन्, अपि, किल्बिषम्, न, आप्नोति ।

**अन्वयार्थः** - **निराशीः** - आशारहित **यतचित्तात्मा** - चित्त व बाह्यशरीरेंद्रिय संघात ज्याने स्वाधीन करून घेतला आहे असा आणि **त्यक्तसर्वपरिग्रहः** - ज्याने सर्व परिग्रहाचा त्याग केला आहे असा ज्ञाननिष्ठ यति **केवलम् शारीरम् कर्म** - केवळ शरीरस्थितिकरिता कारण होणारे कर्म **कुर्वन् अपि** - जरी करीत असला तरी **किल्बिषम्** - पापाला **न आप्नोति** - प्राप्त होत नाही म्हणजे त्याला कोणत्याहि प्रकारचा दोष लागत नाही.

**विवरण** - ज्या पुरुषाने शरीर आणि अन्तःकरण चांगल्या प्रकाराने स्वाधीन केले आहे आणि सर्व प्रकारच्या संग्रहाचा परित्याग केला आहे असा तो आशारहित कर्मयोगी केवल शरीररक्षणार्थ कर्म करीत असला तरी तो पापाला प्राप्त होत नाही; कारण की, आपले कर्तव्य कर्म करीत असणारा जो पुरुष तो कोणत्याही पापाच्या दोषाने लिप्त होत नाही.

**व्याकरणम्** - **निराशीः** - निर्+आशिस् वि.स्त्री.प्र.ए.व. **यतचित्तात्मा** - यम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. चित् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि आत्मन् पु.प्र.ए.व. **त्यक्तसर्वपरिग्रहः** - त्यज् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. सर्व वि. प रिग्रह पु.प्र.ए.व. **केवलम्** - वि.न.द्वि.ए.व. **शारीरम्** - शारीर वि.न.द्वि.ए.व. **कर्म** - कर्मन् न.द्वि.ए.व. **कुर्वन्** - कृ अ.ग.उ.प.कर्त.वर्त.धा.वि.पु.प्र.ए.व. **अपि** - अपि क्रि.वि.अ. **किल्बिषम्** - किल्बिष न. द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **आप्नोति** - आप् पं.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - निराशी: -** निर्गताऽऽशीर्यस्य सो निराशी: - गेली आशा ज्याची तो निराशी**(ष.ब.स.)** यद्वा **निराशी: -** नि:शेषं गता आशिषो वैषयिक्य: कामना यस्मात् स निराशी: = ज्याच्यापासून आशिष-विषयाची कामना समूळ निघून गेली आहे तो निराशी**(पं.ब.स.) यतचित्तात्मा** - चित्तम्-अंत:करणम्, आत्मा-बाह्यकार्यकारणसङ्घातस्तावुभौ यतौ-संयतौ-निरुद्धौ येन स यतचित्तात्मा = चित्त-अंत:करण, आत्मा -बाह्यकार्यकारणसंघात चित्तात्मा, या दोहींना ज्याने निग्रहीत केले आहे असा तो यतचित्तात्मा**(ष.ब.स.)** यद्वा **यतचित्तात्मा** - यतम्-संस्थापितम् चित्तमात्मन्येव न क्वचिदनात्मनि येन स यतचित्तात्मा = स्थिर केले चित्त आत्म्यामध्येच नाही केव्हाही अनात्म्यामध्ये ज्याने तो यतचितात्मा**(तृ.ब.स.) त्यक्तसर्वपरिग्रह: -** सर्वे च परिग्रहाश्च सर्वपरिग्रहा:, त्यक्ता: कौपीनकन्थातिरिक्ता: सर्वपरिग्रहा येन स त्यक्तसर्वपरिग्रह: - सर्व आणि परिग्रह सर्वपरिग्रह; कौपीन, कंथा (कंबल) सोडून सर्वपरिग्रहाचा त्याग केला ज्याने तो त्यक्तसर्वपरिग्रह **(तृ.ब.स.)**

निष्काम कर्मयोगाच्या साधकाचे लक्षण व कर्माने बद्ध न होण्याचे कथन-

**यदृच्छालाभसन्तुष्टो द्वन्द्वातीतो विमत्सर: ।**

**सम: सिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबध्यते ॥२२॥**

**अन्वय: -** यदृच्छालाभसन्तुष्ट:, द्वन्द्वातीत:, विमत्सर:, सिद्धौ, च, असिद्धौ, सम:, कृत्त्वा, अपि, न, निबध्यते ।

**अन्वयार्थ: - यदृच्छालाभसन्तुष्ट: -** प्रारब्धवश जे मिळेल त्यानुसार तृप्त राहणारा **द्वन्द्वातीत: -** सुखदु:खादि द्वंद्वांनी रहित **विमत्सर: -** कोणाचाही मत्सर न करणारा-ईर्ष्येच्या संपूर्ण अभावाने युक्त असणारा **सिद्धौ -** लाभ झाला असता **च -** व **असिद्धौ -** लाभ झाला नसता **सम: -** दोहींमध्ये एकसारखा राहणारा संन्यासी **कृत्वा अपि -** शरीरनिर्वाहाकरिता अवश्य भिक्षाटनादि कर्म करताना दिसत असला तरी तो (त्या कर्माने) **न निबध्यते** - लिप्त होत नाही.

**विवरण** - प्रारब्धवश जेवढे मिळेल त्यात संतुष्ट होणारा सुखदु:खादि द्वंद्वाने रहित, मात्सर्यशून्य सिद्धि व असिद्धिमध्ये सम राहणारा आणि हर्ष व विषादाने रहित असा जो यति शरीरस्थितीला अवश्य असणारे भिक्षाटनादि कर्म करूनही तो बद्ध होत नाही.

**व्याकरणम् - यदृच्छालाभसन्तुष्ट: -** यदृच्छा स्त्री. लाभ पु. सम्+तुष् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **द्वन्द्वातीत: -** द्वन्द्व पु. अति+इ द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **विमत्सर: -** वि+मत्सर वि.पु.प्र.ए.व. **च -** च उभ.अ. **सिद्धौ** - सिद्धि स्त्री.स.ए.व. **असिद्धौ** - अ+सिद्धि स्त्री.स.ए.व. **सम: -** सम वि.पु.प्र.ए.व. **कृत्वा -** कृ अ.ग.उ.प.त्वान्त अ. **अपि न** - अपि न क्रि.वि.अ. **निबध्यते** - नि+बन्ध् न.ग.प.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - यदृच्छालाभसन्तुष्ट: -** अयत्नप्राप्तो लाभो यदृच्छालाभस्तेनैव सन्तुष्ट:-परितृप्तिं प्राप्त इति यदृच्छालाभसन्तुष्ट: = न मागता प्राप्त झालेला लाभ यदृच्छालाभ, त्या प्राप्तीने संतुष्ट-तृप्त यदृच्छालाभासंतुष्ट **(तृ.त.स.)** यद्वा **यदृच्छालाभसन्तुष्ट: -** अप्रार्थितोपनतो लाभो यदृच्छालाभस्तेनैव सन्तुष्ट इति यदृच्छालाभसन्तुष्ट: = याचना केल्यावांचून आपण होवून चालून आलेला जो लाभ तो यदृच्छालाभ त्याने

संतुष्ट तो यदृच्छालाभासंतुष्ट**(तृ.त.स.) द्वन्द्वातीतः -** द्वन्द्वेभ्यः-त्वमहमिति, इदमद इति, इष्टमनिष्टमिति, शुद्धमशुद्धमिति, द्वैतमद्वैतमित्यादिविपरीतज्ञानेभ्योऽतीत इति द्वन्द्वातीतः = द्वंद्वांनी तू व मी, हे व ते, इष्ट आ णि अनिष्ट, शुद्ध व अशुद्ध, द्वैत व अद्वैत इ.विपरीतज्ञानरूप द्वंद्वांपासून अतीत असा द्वन्द्वातीत**(पं.त.स.)** यद्वा **द्वन्द्वातीतः -** द्वन्द्वैः शीतोष्णादिभिर्हन्यमानोऽप्यविषण्णचित्तो द्वन्द्वातीतः = शीतोष्णादि द्वन्द्वांकडून पीडा दिली जात असली तरी ज्याचे चित्त खिन्न होत नाही त्याला द्वन्द्वातीत म्हटले जाते.**(तृ.त.स.)**

यथार्थ कर्म करणाऱ्या ज्ञानी पुरुषाचे संपूर्ण कर्म नष्ट होण्याचे कथन -

**गतसङ्गस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः ।**

**यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥२३॥**

**अन्वयः** - गतसङ्गस्य, मुक्तस्य, ज्ञानावस्थितचेतसः, यज्ञाय, आचरतः, कर्म, समग्रम्, प्रविलीयते ।

**अन्वयार्थः** - **गतसङ्गस्य** - ज्याची कर्म व फल या ठिकाणी असणारी आसक्ति समाप्त झाली आहे **मुक्तस्य** - त्या कारणामुळेच धर्माधर्मादि बंधापासून जो मुक्त झाला आहे **ज्ञानावस्थितचेतसः** - ज्याचे चित्त ज्ञानाच्या ठिकाणी स्थिर झाले आहे असा जो **यज्ञाय** - यज्ञाकरिता **आचरतः** - कर्माचरण करतो अशा त्या पुरुषाचे **कर्म** - ते सर्व कर्म **समग्रम्** - फलासह **प्रविलीयते** - विनाश पावते-पूर्णपणे विलीन होऊन जाते.

**विवरण** - अहंता, ममता इत्यादिने रहित असल्यामुळे त्याची कोणत्याही पदार्थाविषयी आसक्ति राहत नाही म्हणून धर्माधर्मादि बन्धनापासून तो मुक्त झाला आहे. ज्याची बुद्धि स्वरूपज्ञानामध्ये अवस्थित आहे अशा प्रकारे केवळ यज्ञाकरिता कर्म करणाऱ्या पुरुषाचे संपूर्ण कर्म फलासह समाप्त होते.

**व्याकरणम्** - **गतसङ्गस्य** - गम् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.संग पु.ष.ए.व. **मुक्तस्य** - मुच् ष.ग.उ.प.कर्त.भू.धा.वि.पु.ष.ए.व. **ज्ञानावस्थितचेतसः** - ज्ञान न. अव+स्था प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. चेतस् न.वि.पु.ष.ए.व. **यज्ञाय** - यज्ञ पु.च.ए.व. **आचरतः** - आ+चर् प्र.ग.प.प.कर्त.वर्त.धा.वि.पु.ष.ए.व. **कर्म** - कर्मन् न.प्र.ए.व. **समग्रम्** - समग्र वि.न.प्र.ए.व. **प्रविलीयते** - प्र+वि+ली न.ग.प.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **गतसङ्गस्य** - गतः सङ्गः-कर्तृत्वाद्यभिनिवेशः-फलाभिलाषो यस्य स गतसङ्गस्तस्य गतसङ्गस्य = गेला संग-कर्तृत्वाचा अभिनिवेश किंवा कर्तेपणाचा अभिमान किंवा फलाभिलाष ज्याचा तो गतसंग, त्या आसक्तिरहिताचे**(ष.ब.स.)** यद्वा **गतसङ्गस्य** - सज्जते पुमाननेन कर्मस्विति सङ्गः-कामः स गतो यस्य स गतसङ्गस्तस्य गतसङ्गस्य-निष्कामस्य = आसक्त होतो ज्याने पुरुष कर्मामध्ये असा संग-काम, तो गेला ज्याचा तो गतसंग, त्या गतसंगाचे**(ष.ब.स.) ज्ञानावस्थितचेतसः** - ज्ञानम्-निर्विकल्पकब्रह्मात्मैक्यबोध एव अथवा सर्वत्र ब्रह्मदर्शनलक्षणं तत्रैवाऽवस्थितं चेतः-अंतःकरणं यस्य स ज्ञानावस्थितचेतास्तस्य ज्ञानाव स्थितचेतसः = ज्ञान-निर्विकल्पक ब्रह्मात्मैक्यबोध अथवा सर्वत्र ब्रह्मदर्शनलक्षण, त्यामध्ये स्थिर चित्त-अन्तःकरण ज्याचे तो ज्ञानावस्थितचेता, त्या ज्ञानावस्थितचित्त असलेल्याचे**(ष.ब.स.) आचरतः** - आचरतीति आचरन् तस्य आचरतः = आचरण करतो असा आचरण करणारा, त्या आचरण करणाऱ्याचे**(वि.)**

ब्रह्मयज्ञाचे कथन -

**ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ।**

**ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥२४॥**

**अन्वय: -** अर्पणम्, ब्रह्म, हवि:, ब्रह्म, ब्रह्माग्नौ, ब्रह्मणा, हुतम्, ब्रह्मकर्मसमाधिना, तेन, ब्रह्म, एव, गन्तव्यम् ।

**अन्वयार्थ: - अर्पणम् ब्रह्म** - जुहु, स्रुक्, मंत्र इत्यादि साधनाने ज्या यज्ञात हवि अर्पण करतो, ते साधन ब्रह्म **हवि: ब्रह्म** - तूप, भात इत्यादि अग्नीत होम करावयाचे पदार्थही ब्रह्म **ब्रह्माग्नौ** - ज्यामध्ये होम करावयाचा तो अग्नि ब्रह्म **ब्रह्मणा** - हवन करणारा यजमान ब्रह्म **हुतम्** - आहुती देणे ही होमक्रिया ब्रह्मच **ब्रह्मकर्मसमाधिना तेन** - ब्रह्मच कर्म त्यात ज्याच्या चित्ताची स्थिरता-समाधि आहे अशा त्या ज्ञानी पुरुषाकडून **ब्रह्म एव** - ब्रह्मच **गन्तव्य** - प्राप्तव्य फल आहे अर्थात् प्राप्त करुन घेण्यास योग्य फळ सुद्धा ब्रह्मच आहे.

**विवरण** - अग्निमध्ये चमस, स्रुक्, स्रुवा अशा या साधनाने हवि अर्पण करतो ते साधन ब्रह्म, अग्नीत हवन करण्याची तूपभातादि सामुग्री ब्रह्म, ज्यामध्ये हवन केले जाते असा अग्नि ब्रह्म, ब्रह्मरूप कर्त्याच्या द्वारा ब्रह्मरूप अग्नीत आहुति देण्याच्या क्रिया ब्रह्म, ज्या पुरुषाची ब्रह्मरूप कर्मामध्येच समाधि झाली तिच्या द्वारा प्राप्त करणेयोग्य फलही ब्रह्मच आहे.

**व्याकरणम्** - **अर्पणम्** - अर्पण न.प्र.ए.व. **ब्रह्म** - ब्रह्मन् न.प्र.ए.व. **हवि:** - हविस् न.प्र.ए.व. **ब्रह्माग्नौ** - ब्रह्मन् न. अग्नि पु.स.ए.व. **ब्रह्मणा** - ब्रह्मन् न.तृ.ए.व. **हुतम्** - हु तृ.ग.प.प.कर्म.भूत.धा.वि.न.प्र.ए.व. **ब्रह्मकर्मसमाधिना** - ब्रह्मन् न. कर्मन् न. समाधि पु.तृ.ए.व. **तेन** - तत् सर्व.पु.तृ.ए.व. **ब्रह्म** - ब्रह्मन् न.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **गन्तव्यम्** - गम् प्र.ग.प.प.कर्म.विध्यर्थ धा.वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **ब्रह्माग्नौ** - ब्रह्मैवाग्निर्ब्रह्माग्निस्तस्मिन् ब्रह्माग्नौ = ब्रह्मच अग्नि ब्रह्माग्नि त्या ब्रह्माग्निमध्ये **(क.स.) ब्रह्मकर्मसमाधिना** - ब्रह्मैव कर्म ब्रह्मकर्म ब्रह्मकर्मणि समाधि:-चित्तैकाग्र्यं यस्य स ब्रह्मकर्मसमाधिस्तेन ब्रह्मकर्मसमाधिना = ब्रह्मच कर्म ब्रह्मकर्म ब्रह्मकर्मामध्ये समाधि-चित्ताची एकाग्रता ज्याची तो ब्रह्मकर्मसमाधि, त्या ब्रह्मकर्मसमाधिवान पुरुषाकडून**(कर्म.गर्भि.ष.त.स.)** यद्वा **ब्रह्मकर्मसमाधिना** - सर्वस्य ब्रह्ममात्रत्वदर्शनं यत्तद् ब्रह्मकर्म तस्मिन् ब्रह्मकर्मणि समाधिश्चित्तस्य स्थापनं यस्य तेन ब्रह्मकर्मसमाधिना = सर्वामध्ये जे ब्रह्ममात्रत्वदर्शन ते ब्रह्मकर्म, त्या ब्रह्मकर्मामध्ये समाधि-चित्ताचे स्थापन ज्याचे त्या ब्रह्मकर्मसमाधिवान पुरुषाकडून**(कर्म.गर्भि.ष.त.स.) अर्पणम्** - अर्प्यतेऽनेनेत्यर्पणम् = ज्याच्याद्वारा अर्पण केले जाते असे अर्पण**(वि.) गन्तव्यम्** - गन्तुम्-प्राप्तुम्, योग्यमिति गन्तव्यम् = प्राप्त करण्यास किंवा मिळविण्यास योग्य असे गन्तव्य**(कृ.वि.)**

दैवयज्ञाचे आणि ज्ञानयज्ञाचे कथन-

**दैवमेवापरे यज्ञं योगिन: पर्युपासते ।**

**ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥२५॥**

**अन्वय:** - अपरे, योगिन:, दैवम्, एव, पर्युपासते, अपरे, यज्ञम्, ब्रह्माग्नौ, यज्ञेन, एव, उपजुह्वति ।

**अन्वयार्थ: - अपरे:** - दुसरे काही **योगिन: -** योगी लोक **दैवम् एव यज्ञम्** - दैव हाच यज्ञ-इंद्रादिक देव ज्यामध्ये पूजिले जातात अशा यज्ञाची **पर्युपासते** - उपासना करितात. **अपरे -** दुसरे काही योगी लोक **यज्ञम् -** आत्म्याला-बुद्ध्यादि उपाधिने युक्त असलेल्या जीवाला **ब्रह्माग्नौ** - ब्रह्मरूप अग्नीत **यज्ञेन एव -** निरूपा

धिक परब्रह्मरूपानेच **उपजुह्वति** - हवन करितात.

**विवरण -** इंद्रादि देवतांच्या उद्देशाने केल्या गेलेल्या यज्ञाला दैव यज्ञ म्हटले जाते. मोक्षाची इच्छा करणारे कर्मयोगी अशा या श्रौत आणि स्मार्तरूप दैव यज्ञाची चित्तशुद्धिकरिता उपासना करतात. कर्मयोग्याच्या अति रिक्त अन्य जे यति ज्यांनी श्रवणादिकांच्या द्वारा आत्मतत्त्वाला जाणले आहे, असे जे यति सत्, चित् आणि आनन्दरूप निर्विशेष ब्रह्मरूप अग्निमध्ये बुद्ध्यादिकांच्या उपाधिने युक्त असणाऱ्या सोपाधिक आत्म्याचे हवन करतात अर्थात् सोपाधिक आत्म्याचा निरुपाधिक आत्मरूपाने अनुभव करतात.

**व्याकरणम् - अपरे** - अपर सर्व.पु.प्र.ब.व. **योगिनः** - योगिन् पु.प्र.ब.व. **दैवम्** - दैव वि.पु.द्वि.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **यज्ञम्** - यज्ञ पु.द्वि.ए.व. **पर्युपासते** - परि+उप+आस् द्वि.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व. **अपरे** - अपर सर्व.पु.प्र.ब.व. **यज्ञम्** - यज्ञ पु.द्वि.ए.व. **ब्रह्माग्नौ** - ब्रह्मन् न. अग्नि पु.स.ए.व. **यज्ञेन** - यज्ञ पु.तृ.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **उपजुह्वति** - उप+हु तृ.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - ब्रह्माग्नौ -** ब्रह्मरूपश्चासौ अग्निश्च ब्रह्माग्निस्तस्मिन् ब्रह्माग्नौ = ब्रह्मरूप आणि हा अग्नि ब्रह्मा ग्नि, त्या ब्रह्माग्नीमध्ये**(क.स.)** यद्वा **ब्रह्माग्नौ -** ब्रह्माग्नौ 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' 'आनंदो ब्रह्म' 'तदेतद्ब्रह्मा पूर्वमनपरम्' इत्यादिश्रुतिप्रसिद्धं निरस्ताशेषविशेषं सच्चिदानन्दघनं यत्परं ब्रह्म तदेवाऽग्निरविद्या तत्कार्यदावदाहकत्वात् सोपाधिकात्माहुतिप्रक्षेपास्याऽधिकरणत्वाच्च परं ब्रह्म तस्मिन् ब्रह्माग्नौ = 'सत्य ज्ञान अनंत ब्रह्म', 'आनंद ब्रह्म,' 'असे ते ब्रह्म कार्यकारणरहित आहे' इ. श्रुतिमध्ये अशेषविशेषाने रहित स च्चिदानंदघन जे परब्रह्म आहे तेच अग्नि आहे; कारण अविद्या आणि अविद्येच्या कार्याला अग्निप्रमाणे जाळणारे आणि सोपाधिक आत्म्याच्या आहुतिच्या प्रक्षेपाचे स्थान म्हणून परब्रह्मच अग्नि, त्या ब्रह्माग्निमध्ये **(कर्म.धा.स.)**

इंद्रियसंयमरूप यज्ञ आणि विषय हवनरूप यज्ञाचे कथन -

**श्रोत्रादीनीन्द्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति ।**

**शब्दादीन्विषयानन्य इन्द्रियाग्निषु जुह्वति ॥२६॥**

**अन्वय** - अन्ये, श्रोत्रादीनि, इन्द्रियाणि, संयमाग्निषु, जुह्वति, अन्ये, शब्दादीन्, विषयान्, इन्द्रियाग्निषु, जुह्वति ।

**अन्वयार्थः - अन्ये** - दुसरे मुमुक्षु श्रेयस् साधनांचे अनुष्ठान करणारे **श्रोत्रादीनि इन्द्रियाणि** - श्रोत्रादिक इंद्रियें **संयमाग्निषु -** पांच इन्द्रियांचा पाच प्रकारचा निग्रह हाच अग्नी त्यामध्ये **जुह्वति** - होमितात(हवन करतात) **अन्ये** - दुसरे काही योगी **शब्दादीन् विषयान्** - शब्दादि विषयांना **इन्द्रियाग्निषु** - श्रोत्रादि ज्ञानेन्द्रियरूप अग्नीमध्ये **जुह्वति** - हवन करतात.

**विवरण** - याच्या व्यतिरिक्त अन्य नैष्ठिक ब्रह्मचारी आदि मुमुक्षु लोक श्रोत्रादि इंद्रियांच्या संयमरूप अग्निमध्ये हवन करतात, अर्थात इंद्रियनिग्रहरूप यज्ञाचे अनुष्ठान करतात. दुसरे काही गृहस्थ मुमुक्षु पुरुष शब्दादि विषयांचे इंद्रिय संयमरूप अग्निमध्ये हवन करतात, अर्थात अनिषिद्ध विहित विषयांचा इंद्रियांच्याद्वारा अनुभव करतात.

**व्याकरणम् - अन्ये** - अन्य सर्व.पु.प्र.ब.व. **श्रोत्रादीनि** - श्रोत्र न. आदि वि.न.द्वि.ब.व. **इन्द्रियाणि** - इंद्रिय

न.द्वि.ब.व. **संयमाग्निषु** - संयम पु. अग्नि पु.स.ब.व. **जुह्वति** - हु तृ.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व. **शब्दादीन्** - शब्द पु. आदि वि.पु.द्वि.ब.व. **विषयान्** - विषय पु.द्वि.ब.व. **इन्द्रियाग्निषु** - इन्द्रिय न. अग्नि पु.स.ब.व. **जुह्वति** - हु तृ.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - श्रोत्रादीनि** - श्रोत्रमादिर्येषां तानि इन्द्रियाणि श्रोत्रादीनि = श्रोत्र आहे आदि ज्यांच्या ती इंद्रिये श्रोत्रादि**(ष.ब.स.) संयमाग्निषु** - संयमो नाम तत्तदिन्द्रियस्य तत्तद्विषयात् एव विनिवर्त्य तत्तत्स्थाने निग्रह इन्द्रियाणां बहुत्वात्संयमा बहवस्त एवाऽग्नयस्तेषु संयमाग्निषु = संयम-त्या त्या इन्द्रियांना त्या त्या विषयापासूनच वेगळे करून म्ह. त्या त्या स्थानामध्ये येऊन न देणे यालाच संयम म्हणतात. इंद्रिये अनेक असल्यामुळे संयमसुद्धा अनेक आहेत. अशा या इंद्रियसंयमरूप अग्निमध्ये**(क.स.) इन्द्रियाग्निषु** - इन्द्रियाणि -श्रोत्रादीनि तान्येव अग्नयस्तेषु इन्द्रियाग्निषु = इंद्रिये-श्रोत्रादि तेच अग्नी, त्या इंद्रियाग्निमध्ये**(क.स.)** यद्वा **इन्द्रियाग्निषु** - इन्द्रियरूपाश्च ते अग्नयश्च इन्द्रियाग्नयस्तेषु इन्द्रियाग्निषु = त्या इंद्रियरूप अग्निमध्ये**(क.स.)**

अत:करणसंयमरूप यज्ञ -

**सर्वाणीन्द्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ।**

**आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥२७॥**

**अन्वयः-** अपरे, इन्द्रियकर्माणि, च, प्राणकर्माणि, ज्ञानदीपिते, आत्मसंयमयोगाग्नौ, जुह्वति ।

**अन्वयार्थः - अपरे** - दुसरे काही मुमुक्षु **सर्वाणि इन्द्रियकर्माणि** - इंद्रियांच्या सर्व क्रिया **च** - आणि **प्राणकर्माणि -** प्राणापानादिकांच्या सर्व क्रिया **ज्ञानदीपिते** - विवेक ज्ञानाने प्रदीप्त झालेल्या **आत्मसंयमयोगाग्नौ** - आत्मसंयमयोगरूप अग्निमध्ये **जुह्वति** - हवन करतात.

**विवरण** - अन्य काही विवेकज्ञानाने प्रदीप्त केलेल्या योगाग्नीत ज्ञानेंद्रिय आणि कर्मेंद्रियांच्या श्रवण, दर्शन, वचन, आदान आदि व्यापारांचे त्याचप्रमाणे प्राणाच्या श्वास, प्रश्वास, उच्छ्वास आदि व्यापारांचे हवन करतात अर्थात् सर्व व्यापारांचा निरोध करून आत्मस्वरूपामध्ये चित्ताला स्थिर करतात.

**व्याकरणम् - अपरे** - अपर सर्व.पु.प्र.ब.व. **सर्वाणि** - सर्व न.द्वि.ब.व. **इन्द्रियकर्माणि** - इद्रिय न. कर्मन् न. द्वि.ब.व. **प्राणकर्माणि** - प्राण पु. कर्मन् न.द्वि.ब.व. **ज्ञानदीपिते** - ज्ञान न. दीपित वि.पु.स.ए.व. **आत्मसंयम योगाग्नौ** - आत्मन् पु. संयम पु. योग पु. अग्नि पु.स.ए.व. **जुह्वति** - हु तृ.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - इन्द्रियकर्माणि** - ज्ञानेन्द्रियाणां कर्मेन्द्रियाणां च कर्माणि- श्रवणदर्शनादीनि वचनादानादीनि च इन्द्रियकर्माणि = ज्ञानेंद्रियांची कर्मे श्रवण,दर्शनादि आणि कर्मेंद्रियांची कर्मे वचन,आदानादि अशी इंद्रियकर्मे**(ष.त.स.) प्राणकर्माणि** - प्राणानाम्-प्राणापानव्यानोदानसमानाख्यानां पञ्चानां कर्माणि- श्वासप्रश्वासोच्छ्वासादीनीति प्राणकर्माणि = प्राणांची-प्राण, अपान, व्यान, उदान, समान यांची पांच कर्मे- श्वास, प्रश्वास, उच्छ्वासादि अशी प्राणकर्मे**(ष.त.स.) आत्मसंयमयोगाग्नौ** - आत्मनः संयम इत्यात्मसंयम आत्मसंयम एव योग आत्मसंयमयोगः-समाधिः स एवाग्निरिति तस्मिनात्मसंयमयोगाग्नौ = आत्म्याचा संयम असा आत्मसंयम, तोच योग आत्मसंयमयोग, तोच अग्नी असा आत्मसंयमयोगाग्नी, त्या आत्मसंयमयोगाग्निमध्ये**(ष.ग.कर्म.ग.कर्म.स.) ज्ञानदीपिते** - ज्ञानेन-आत्मविषयकज्ञानेन दीपिते सम्यगवगमित इति ज्ञानदीपिते = ज्ञानाने-आत्मविषयक ज्ञानाने प्रकाशित केलेल्या अथवा चांगल्या प्रकारे जाणल्या गेलेल्या अशा

(आत्मसंयमयोगरूप अग्निमध्ये) **ज्ञानदीपिते** - ज्ञानं वेदान्तवाक्यजन्यो ब्रह्मात्मैक्यसाक्षात्कारस्तेना विद्यातत्कार्यनाशद्वारा दीपितेऽत्यन्तोज्ज्वलिते बाधपूर्वके समाधौ = ज्ञान-वेदान्तवाक्यांपासून उत्पन्न होणारा जो ब्रह्मात्मैक्यसाक्षात्कार त्याद्वारे अविद्या आणि अविद्याकार्यनाशद्वारा दीपित-अत्यन्त उज्ज्वलित अशा अग्निमध्ये म्ह. बाधपूर्वक-दृढमिथ्यात्वनिश्चयपूर्वक समाधिमध्ये **(तृ.त.स.)**

द्रव्ययज्ञ, तपयज्ञ, योगयज्ञ आणि स्वाध्यायरूप ज्ञानयज्ञाचे कथन -

**द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे ।**

**स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥२८॥**

**अन्वयः** - द्रव्ययज्ञाः, तपोयज्ञाः, तथा, अपरे, योगयज्ञाः, स्वाध्यायज्ञानयज्ञाः, च, संशितव्रताः, यतयः ।

**अन्वयार्थः** - **द्रव्ययज्ञाः** - सत्पात्री द्रव्याचे दान यज्ञाच्या भावनेने जे करितात ते द्रव्ययज्ञ **तपोयज्ञाः** - जे कृच्छ्रचान्द्रायणादि तपश्चर्या करितात ते तपोयज्ञ **तथा अपरे योगयज्ञाः** - तसेच जे दुसरे योगी अष्टाङ्गयोगाचा अभ्यास करितात ते योगयज्ञ **स्वाध्यायज्ञानयज्ञाः** - जे यथाविधी ऋग्वेदादिकांचा अभ्यास अथवा आवृत्ति करितात ते स्वाध्याययज्ञ व जे शास्त्रार्थाचा सतत अभ्यास करून शास्त्राच्या अर्थाचे ज्ञान प्राप्त करितात ते ज्ञानयज्ञ **च संशितव्रताः** - व ज्यांनी अनुष्ठाने अतिशय कठोर केली आहेत असे **यतयः** - संन्यासी हे व्रतयज्ञ.

**विवरण** - दुसरे काही मुमुक्षु सत्पात्राच्या ठिकाणी द्रव्यदानरूप द्रव्ययज्ञ करतात. काही चांद्रायण आदिरूप तपयज्ञ करतात. काही आसन, प्राणायम आदिरूप अंगाने युक्त योगयज्ञ करतात. काही वेदपारायणरूप स्वाध्याययज्ञ करतात. काही शास्त्रपरिशीलनरूप ज्ञानयज्ञाचे अनुष्ठान करतात आणि काही अनेक यति मोक्षाकरिता कठोर व्रताचे अनुष्ठान करतात.

**व्याकरणम्** - **द्रव्ययज्ञाः** - द्रव्य न. यज्ञ पु.प्र.ब.व. **तपोयज्ञाः** - तपस् न. यज्ञ पु.प्र.ब.व. **तथा** - तथा क्रि. वि.अ. **अपरे** - अपर सर्व.पु.प्र.ब.व. **योगयज्ञाः** - योग पु. यज्ञ पु.प्र.ब.व. **स्वाध्याययज्ञाः** - स्व वि. अध्याय पु. यज्ञ पु.प्र.ब.व. **ज्ञानयज्ञाः** - ज्ञान न. यज्ञ पु.प्र.ब.व. **च** - च उभ.अ. **संशितव्रताः** - सम्+शो च.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. वृ पं.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **यतयः** - यत् प्र.ग.आ.प.+इन्=यति पु.प्र.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **द्रव्ययज्ञाः** - तीर्थेषु सत्पात्रार्थं यज्ञबुद्ध्या द्रव्यविनियोगं ये कुर्वन्ति ते द्रव्ययज्ञाः = तीर्थांमध्ये सत्पात्राकरिता यज्ञबुद्धिने जे द्रव्याचा विनियोग करतात ते द्रव्ययज्ञ**(तृ.त.स.)** यद्वा **द्रव्ययज्ञाः** - सत्पात्रेषु नियमेन श्रद्धया द्रव्यनिक्षेपणमयमेवाऽस्माकं यज्ञ इति ये कुर्वन्ति ते द्रव्ययज्ञाः = सत्पात्र पाहून नियमाने श्रद्धापूर्वक द्रव्य निक्षेपण करतात, हाच आमचा यज्ञ आहे असे समजून द्रव्य दान करतात, ते द्रव्ययज्ञ**(तृ.त.स.)** **तपोयज्ञाः** - तपः कृच्छ्रचान्द्रायणप्राजापत्याद्युपवासादिरूपं वा इदमेवाऽस्माकं यज्ञ इति ये कुर्वन्ति ते तपोयज्ञाः = काही कृच्छ्रचांद्रायण प्राजापत्य, उपवासादि व्रतवैकल्य करून तप करतात हाच आमचा यज्ञ आहे असे समजतात ते तपोयज्ञ**(क.स.)** **(१)कृच्छ्रव्रत** - प्रथम तीन दिवस प्रातःकाली कोंबडीच्या अंड्याप्रमाणे सव्वीस ग्रास आहार करावा. नंतर तीन दिवस संध्याकाळी वरील प्रमाणेच बत्तीस ग्रास आहार करावा. नंतर काही याचना न करता वरील प्राप्त झालेले चोवीस ग्रास ग्रहण करावे. नंतर तीन दिवस उपवास करावा त्यास कृच्छ्रव्रत म्हणतात.

**(२)चान्द्रायण व्रत** - शुक्लपक्षाच्या प्रतिपदेपासून मोराच्या अंड्याप्रमाणे प्रत्येक दिवशी एका ग्रासाला वाढवून पौर्णिमेच्या दिवशी पंधरा ग्रास ग्रहण करणे, नंतर कृष्णपक्ष प्रतिपदेला चौदा ग्रास, द्वितीयेला तेरा ग्रास याप्रमाणे कमी-कमी करीत अमावस्येला उपवास करावा यास चांद्रायण व्रत म्हणतात.

**(३)सान्तपन व्रत** - प्रथम दिवस आहारानंतर त्यागपूर्वक आठ मासे ताम्रवर्णगाईचे मूत्र आणि १६ मासे श्वेत वर्ण गाईचे शेण आणि १२ मासे म्ह. (एक तोळा) कांचनवर्ण गाईचे दूध, आणि १० मासे नीळवर्ण गाईचे तुप, आणि त्या मध्ये अर्ध परिमाण कुश तसेच पाणी मिळवून ग्रहण करावे आणि दुसऱ्या दिवशी उपवास करावा हे सांतपनव्रत आहे. **योगयज्ञाः** - योगः-प्राणायामप्रत्याहारादिलक्षणः, यद्वा चित्तवृत्तिनिरोधोऽष्टाङ्गो यज्ञो येषां ते योगयज्ञाः = योग-प्राणायामप्रत्याहारादिलक्षण अथवा चित्तवृत्तिनिरोध अष्टाङ्ग यज्ञ आहे ज्यांचा ते योगयज्ञ**(ष.ब.स.)** **स्वाध्याययज्ञाः** - यथाविध्यृग्वेदाद्यभ्यासो यद्वा वेदपठणं यज्ञो येषां ते स्वाध्याययज्ञाः = यथाविधि ऋग्वेदादि अभ्यास अथवा वेदपठण यज्ञ आहे ज्यांचा ते स्वाध्याययज्ञ**(ष.ब.स.)** यद्वा **स्वाध्याययज्ञाः** - सर्वदा वेदपारायणमेवाऽस्माकं यज्ञ इत्यध्ययनविधिं नियमेन ये कुर्वन्ति ते स्वाध्याययज्ञाः **=** सतत वेदपारायणच आमचा यज्ञ आहे, याप्रमाणे जे अध्ययनविधि नियमाने करतात, ते स्वाध्याययज्ञ **(क.स.)** **ज्ञानयज्ञाः** - ज्ञानम्-शास्त्रार्थपरिज्ञानं यज्ञो येषां ते ज्ञानयज्ञाः = काही लोक ज्ञान-शास्त्रार्थाचे परिज्ञान तोच ज्यांचा यज्ञ आहे ते ज्ञानयज्ञ**(ष.ब.स.)** यद्वा **ज्ञानयज्ञाः** - ज्ञानम्-ज्ञानशास्त्रपरिशीलनमिदं नो यज्ञ इति सदा ये कुर्वन्ति ते ज्ञानयज्ञाः = ज्ञान-ज्ञानशास्त्राचे सदा परिशीलनच आमचा यज्ञ आहे, असे सतत जे करतात, ते ज्ञानयज्ञ**(ष.ब.स.)** **संशितव्रताः** - सम्यक् शितानि तनूकृतानि-तीक्ष्णीकृतानि व्रतानि येषां ते संशितव्रताः-दृढव्रताः = संशितव्रत म्ह. उत्तम प्रकारे ज्यांनी व्रते शित-तनु-तीक्ष्ण अतिदृढ केलेली आहेत, ते संशितव्रत**(ष.ब.स.)** **यतयः** - यतन्ति ते यतयः = प्रयत्न करितात ते यति**(वि.)**

यज्ञरूपाने त्रिविध प्राणायामाचे कथन -

**अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथापरे ।**

**प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥२९॥**

**अन्वयः** - अपरे, अपाने, प्राणम्, तथा, प्राणे, अपानम्, जुह्वति, प्राणापानगती, रुद्ध्वा, प्राणायामपरायणाः ।

**अन्वयार्थः** - **अपरे** - अन्ये काही योगीजन **अपाने** - अपान वायूमध्ये **प्राणम्** - प्राणाला **तथा** - त्याचप्रमाणे **प्राणे** - प्राणवायूमध्ये **अपानम्** - अपानाला **जुह्वति** - हवन करितात **प्राणापानगती** - प्राण व अपान यांच्या गती **रुद्ध्वा** - बंद करून **प्राणायामपरायणाः** - प्राणायामामध्ये परायण होतात.

**विवरण** - दुसरे काही मुमुक्षु लोक अपानवृत्तिमध्ये प्राणाचे हवन करितात. अर्थात पूरकात्मक प्राणायाम करितात. अन्य काही लोक प्राणवृत्तिमध्ये अपान वृत्तिचे हवन करितात. अर्थात रेचकात्मक प्राणायाम करितात आणि काही लोक प्राण आणि अपान वृत्तिच्या गतिचा अवरोध करून प्राणायामात तत्पर राहातात. अर्थात् कुम्भक प्राणायाम करितात.

**व्याकरणम्** - **अपरे** - अपर सर्व.पु.प्र.ब.व. **अपाने** - अपान पु.स.ए.व. **प्राणम्** - प्र+अण् च.ग.आ.प.+अच्=प्राण पु.द्वि.ए.व. **तथा** - तथा क्रि.वि.अ. **प्राणे** - प्राण पु.स.ए.व. **अपानम्** - अपान पु.द्वि.ए.व. **जुह्वति** - हु तृ.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व. **प्राणापानगती** - प्राण पु. अपान पु. गति स्त्री.

द्वि.द्वि.व. **रुद्ध्वा** - रुध् स.ग.उ.प.त्वान्त अ. **प्राणायामपरायणाः** - प्राणायाम पु. परायण वि.पु.प्र.ब.व.

**समासविग्रहार्थाः - प्राणायामपरायणाः** - प्राणायामे परायणा इति प्राणायामपरायणाः = प्राणांच्या निग्रहात प्रवीण-निष्णात असे प्राणायामपरायण**(स.त.स.)** यद्वा **प्राणायामपरायणाः** - आयामः-निरोधः प्राणस्य आयामः प्राणायामः स परमयनं परागतिर्येषां ते प्राणायामपरायणाः = आयाम-निरोध, प्राणाचा आयाम प्राणायाम, तो श्रेष्ठ अयन-परम गति ज्यांची ते प्राणायामपरायण**(ष.त.ग.ष.ब.स.) प्राणापानगती** - प्राणश्च अपानश्चेति प्राणापानौ प्राणापानयोर्गतिरिति प्राणापानगती = प्राण आणि अपान असे प्राणापान, प्राणापानाची गति, अशी प्राणापानगति(मुख आणि नासिका यातून बाहेर निघणे ही प्राणवायूची गती व त्याच्या उलट त्यातून आत शिरणे ही अपानवायुची गति)**(द्व.गर्भि.ष.त.स.)**

यज्ञरूपाने चतुर्थ प्राणायामाचे कथन आणि सर्व प्रकारचे यज्ञ करणाऱ्यांची प्रशंसा -

**अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति ।**

**सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥३० ॥**

**अन्वयः** - अपरे, नियताहाराः, प्राणान्, प्राणेषु, (एव), जुह्वति, एते, सर्वे, अपि, यज्ञविदः, यज्ञक्ष पितकल्मषाः ।

**अन्वयार्थः - अपरे** - दुसरे कित्येक **नियताहाराः** - नियमित आहार करणारे **प्राणान् -** प्राणापानादिकांना **प्राणेषु (एव) -** प्राणामध्येच **जुह्वति** - हवन करितात **एते सर्वे अपि** - हे सर्वच **यज्ञविदः** - यज्ञाला जाणणारे व यज्ञ करणारे आपापल्या साधनांना यज्ञ जाणून त्याचे अनुष्ठान करणारे **यज्ञक्षपितकल्मषाः** - यज्ञाने पापाचा नाश केलेले असे होतात म्हणजे यज्ञाच्या योगाने निष्पाप होतात.

**विवरण** - तथा अन्ये काही अभ्यासु लोक नियमित आहार करून प्राणादिकास प्राणामध्येच हवन करितात हे सर्व यज्ञाला जाणणारे व यज्ञ करणारे असे यज्ञाच्या योगाने निष्पाप होतात.

**व्याकरणम् - अपरे** - अपर सर्व.पु.प्र.ब.व. **नियताहाराः** - नि+यम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.सा.वि. आहार पु.प्र.ब.व. **प्राणान्** - प्राण पु.द्वि.ब.व. **प्राणेषु** - प्राण पु.स.ब.व. **जुह्वति** - हु तृ.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व. **एते** - एतत् सर्व.पु.प्र.ब.व. **सर्वे** - सर्व सर्व.पु.प्र.ब.व. **अपि** - अपि क्रि.वि.अ. **यज्ञविदः** - यज्ञविद् वि.पु.प्र.ब.व. **यज्ञक्षपितकल्मषाः** - यज्ञ पु. क्षप् द.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि. कल्मष वि.पु.प्र.ब.व.

**समासविग्रहार्थाः - नियताहाराः** - नियतः-परिमित आहारो येषां ते नियताहाराः = नियत-परिमित आहार ज्यांचा ते नियताहार**(ष.ब.स.) यज्ञविदः** - यज्ञान्-द्वादशयज्ञान् विदन्ति-अनुतिष्ठन्ति ते यज्ञविदः = यज्ञांना-बारा यज्ञांना(चे)जाणतात-अनुष्ठान करतात ते यज्ञविद**(उप.स.) यज्ञक्षपितकल्मषाः** - यज्ञैः-द्वादशयज्ञै र्नियमेनाऽनुष्ठितैर्क्षपितम्-नाशितम्, कल्मषम्-वासनारूपपापं येषां ते यज्ञक्षपितकल्मषाः = यज्ञांनी-द्वादश यज्ञांनी नियमित अनुष्ठानांनी नष्ट केले वासनारूप पाप ज्यांनी ते यज्ञक्षपितकल्मष**(तृ.ब.स.)**

यज्ञ करणाऱ्यांना भगवत्प्राप्ति आणि न करणाऱ्यांची निंदा -

**यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम् ।**

**नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम ॥३१॥**

**अन्वय:** - यज्ञशिष्टामृतभुज:, सनातनम्, ब्रह्म, यान्ति, कुरुसत्तम, अयज्ञस्य, अयम्, लोक:, न, अस्ति, कुत:, अन्य: ।

**अन्वयार्थ:** - **यज्ञशिष्टामृतभुज:** - यज्ञ झाल्यावर शिल्लक राहिलेल्या अन्नाला अमृत समजून त्याचे जे भक्षण करणारे मुमुक्षु **सनातनम् ब्रह्म** - चित्तशुद्धि होवून ज्ञानप्राप्तिच्याद्वारा नित्य ब्रह्माला **यान्ति** - प्राप्त होतात **कुरुसत्तम** - हे कुरुवंशातील श्रेष्ठ अर्जुना! **अयज्ञस्य** - एकही यज्ञ न करणाऱ्या पुरुषाला **अयम् लोक:** - हा लोक **न अस्ति** - नाही **कुत: अन्य:** - मग दुसरा कोठून प्राप्त होणार?

**विवरण** - पूर्वोक्त सांगितलेले यज्ञ करून अवशिष्ट राहिलेल्या अन्नालाच अमृत समजून त्याचे जे भक्षण करतात, ते सनातन ब्रह्माला प्राप्त होतात; परंतु वर सांगितलेल्या यज्ञामधून एकही यज्ञ जे करीत नाहीत, त्यांना हा मनुष्यलोक सुखदायक होत नाही, तर परलोक कोठून सुखदायक होणार? म्ह. त्याला हा लोक नाही तर परलोक कोठून मिळणार ?

**व्याकरणम्** - **यज्ञशिष्टामृतभुज:** - यज्ञ पु. शिष् स.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. अमृत न. भुज् स.ग.आ.प.धा. वि.पु.प्र.ब.व. **सनातनम्** - सनातन वि.न.द्वि.ए.व. **ब्रह्म** - ब्रह्मन् न.द्वि.ए.व. **यान्ति** - या द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व. **कुरुसत्तम** - कुरु पु. सत्तम वि.पु.संबो.ए.व. **अयज्ञस्य** - अ+यज्ञ पु.ष.ए.व. **अयम्** - इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **लोक:** - लोक पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अस्ति** - अस् द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **कुत:** - कुतस् क्रि.वि.अ. **अन्य:** - अन्य सर्व.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **यज्ञशिष्टामृतभुज:** - भुञ्जत इति भुजो यज्ञेभ्यो शिष्टमिति यज्ञशिष्टं तदेव अमृतमिति यज्ञ शिष्टामृतं तस्य भुजो यज्ञशिष्टामृतभुज: = सेवन करतात असे सेवन करणारे, यज्ञापासून शिल्लक असे यज्ञशिष्ट, तेच अमृत असे यज्ञशिष्टामृत, त्याचे सेवन करणारे, यज्ञशिष्टामृतभुज(**पं.त.ग.क.ग.ष.त.स.**) यद्वा **यज्ञ शिष्टामृतभुज:** - यज्ञानां शिष्टं यज्ञशिष्टम्, यज्ञशिष्टश्च तदमृतश्च यज्ञशिष्टामृतं, तद् भुञ्जत इति यज्ञशिष्टामृतभुज: = यज्ञाचे शिष्ट ते यज्ञशिष्ट, यज्ञशिष्ट असे अमृत ते यज्ञशिष्टामृत, ते खाणारे यज्ञशिष्टामृत(**ष.ग.क.स.**) **अयज्ञस्य** - यथोक्तानां यज्ञानां एकोऽपि यज्ञो यस्य न विद्यते सोऽयज्ञस्तस्याऽयज्ञस्य = वर सांगितलेल्या यज्ञांपैकी एकसुद्धा यज्ञ नाही करत जो तो अयज्ञ, त्या यज्ञ न करणाऱ्याचा(**न.त.स.**)

यज्ञाला तत्त्वाने जाणण्याचे फल -

**एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे ।**

**कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ॥३२॥**

**अन्वय:** - एवम्, बहुविधा:, यज्ञा:, ब्रह्मण:, मुखे, वितता:, तान्, सर्वान्, कर्मजान्, विद्धि, एवम्, ज्ञात्वा, विमोक्ष्यसे ।

**अन्वयार्थ:** - **एवम्** - अशा प्रकारे **बहुविधा:** - बहुत प्रकारचे **यज्ञा:** - यज्ञ **ब्रह्मण:** - वेदाच्या **मुखे** - मुखांतून अथवा वेदद्वारा **वितता:** - विस्तार केलेले आहेत **तान् सर्वान्** - त्या सर्वांना **कर्मजान्** - कर्मापासून झालेले **विद्धि** - तूं समज **एवम्** - अशा प्रकारे **ज्ञात्वा** - तत्त्वत: जाणून **विमोक्ष्यसे** - तूं अशुभ संसारापासून मुक्त होशील.

**विवरण** - आतापर्यंत अनेक प्रकारच्या यज्ञाचे वेदाच्या द्वारा प्रतिपादन केले. त्या सर्व यज्ञांना कर्मज अर्थात्

कर्मापासून उत्पन्न झाले आहेत असे तू समज. अशा प्रकारे जाणून तू या अशुभ संसारापासून मुक्त होशील.

**व्याकरणम्** - **एवम्** - एवम् क्रि.वि.अ. **बहुविधाः** - बहु वि. विध पु.प्र.ए.व. **यज्ञाः** - यज्ञ पु.प्र.ब.व. **ब्रह्मणः** - ब्रह्मन् पु.ष.ए.व. **मुखे** - मुख न.स.ए.व. **वितताः** - वि+तन् अ.ग.उ.प.कर्म.भू.धा. वि.पु.प्र.ब.व. **तान्** - तत् सर्व.पु.द्वि.ब.व. **सर्वान्** - सर्व सर्व.पु.द्वि.ब.व. **कर्मजान्** - कर्म न. ज वि.पु. द्वि.ब.व. **विद्धि** - विद् द्वि.ग.प.प.कर्त.लोट् आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **एवम्** - एवम् क्रि.वि.अ. **ज्ञात्वा** - ज्ञा न.ग.उ.प.त्वान्त अ. **विमोक्ष्यसे** - वि+मुच् ष.ग.आ.प.कर्त.लृट् द्वि.भवि.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **कर्मजान्** - कर्मभ्यः-वाङ्मनःकायकर्मभ्यो जाताः-उत्पन्नाः कर्मजास्तान् कर्मजान् = कर्मापासून-वाणी, मन, शरीर यांच्या कर्मापासून उत्पन्न झालेले कर्मज त्या कर्मापासून उत्पन्न होणाऱ्यांना **(पं.त.स.)** यद्वा **कर्मजान्** - कर्मकारकेभ्यो जाताः कर्मजा-वागादीन्द्रियसम्भवास्तान् कर्मजान् = कर्मकारकापासून उत्पन्न कर्मज-वागादींद्रियांपासून उत्पन्न अशा त्या कर्मज यज्ञांना**(पं.त.स.)** **बहुविधाः** - बहुप्रकारा इति बहुविधाः = अनेक प्रकार असे बहुविध**(त.वि.)**

ज्ञानयज्ञाची प्रशंसा -

**श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परन्तप ।**

**सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥३३॥**

**अन्वयः** - परन्तप, द्रव्यमयात्, यज्ञात्, ज्ञानयज्ञः, श्रेयान्, पार्थ, सर्वं, कर्म, अखिलम्, ज्ञाने, परिसमाप्यते ।

**अन्वयार्थः** - **परन्तप** - हे अर्जुना **द्रव्यमयात् यज्ञात्** - द्रव्यादि साधनांनी प्राप्त होणाऱ्या यज्ञाहून **ज्ञानयज्ञः** - ज्ञानयज्ञ **श्रेयान्** - अधिक श्रेष्ठ आहे **पार्थ** - हे अर्जुना **सर्वम् कर्म** - सर्व कर्मे **अखिलम्** - अवशिष्ट न राहता अथवा निःशेष रूपाने **ज्ञाने** - ज्ञानामध्ये **परिसमाप्यते** - अन्तर्भूत होतात.

**विवरण** - हे परंतप अर्जुना! उक्त द्रव्यमय यज्ञांहून ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे; कारण ज्याच्या द्वारा कल्याण कारक मोक्ष प्राप्त होतो; पुनः संपूर्ण कर्म ज्ञानामध्ये परिसमाप्त होते; म्हणून या ठिकाणी ज्ञानयज्ञाची श्रेष्ठता दाखविली आहे.

**व्याकरणम्** - **परन्तप** - हे परन्तप पु.संबो.ए.व. **द्रव्यमयात्** - द्रव्य न. मयट् प्रत्ययान्त पु.पं.ए.व. **यज्ञात्** - यज्ञ पु.पं.ए.व. **ज्ञानयज्ञः** - ज्ञान न. यज्ञ पु.प्र.ए.व. **श्रेयान्** - श्रेयस् पु.प्र.ए.व. **पार्थ** - हे पार्थ पु.संबो.ए.व. **सर्वम्** - सर्व सर्व.वि.न.प्र.ए.व. **कर्म** - कर्मन् न.प्र.ए.व. **अखिलम्** - अखिल वि.न.प्र.ए.व. **ज्ञाने** - ज्ञान न.स.ए.व. **परिसमाप्यते** - परि+सम्+आप् पं.ग.प.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **ज्ञानयज्ञः** - ज्ञानमेव यज्ञ इति ज्ञानयज्ञः = ज्ञानच यज्ञ असा ज्ञानयज्ञ**(क.स.)** **अखिलम्** - खिलम्-शेषम् न विद्यते यत्र तदखिलम्-निःशेषम् = शेष नाही ते अखिल**(न.त.स.)** **द्रव्यमयात्** - द्रव्यप्रचुर इति द्रव्यमयस्तस्माद्द्रव्यमयात् = द्रव्य पुष्कळ ज्यामध्ये असे द्रव्यमय, त्या द्रव्यमयापासून**(त.वि.)**

हे ज्ञान कोणत्या साधनाने प्राप्त होते ते तद्विद्धि या श्लोकाने सांगितले जाते. त्या ज्ञानाकरिता ज्ञानवानाला जाणण्याचे कथन -

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।**

**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिन: ॥३४॥**

**अन्वय:** - तत्, प्रणिपातेन, परिप्रश्नेन, सेवया, विद्धि, तत्त्वदर्शिन:, ज्ञानिन:, ते, ज्ञानम्, उपदेक्ष्यन्ति ।

**अन्वयार्थ:** - **तत्** - ते उत्तम ज्ञान **प्रणिपातेन** - आचार्यांजवळ जाऊन साष्टांग नमस्कार करून **परिप्रश्नेन** - त्यांना बंध मोक्षादिकाविषयी प्रश्न करून व **सेवया** - त्यांची सेवा करून तू **विद्धि** - ते ज्ञान संपादन करून घे **तत्त्वदर्शिन: ज्ञानिन:** - ज्ञानसंपन्न तथा अनुभवी ज्ञानी **ते** - तुला **ज्ञानम्** - ते तत्त्वज्ञान **उपदेक्ष्यन्ति** - स्पष्ट रूपाने सांगतील.

**विवरण** - असे जे वर सांगितलेले श्रेष्ठ ज्ञान तत्त्वदर्शी आचार्यांना प्रणिपात-साष्टाङ्ग नमस्कार करून संपादन कर. कसे,तर बंध-मोक्षाविषयी तू अनेक प्रकारचे प्रश्न विचार व त्यांची सेवा कर असे केल्यानंतर ते तुझ्यावर प्रसन्न होतील आणि तुला ज्ञानाचा उपदेश करतील.

**व्याकरणम्** - **तत्** - तत् सर्व.न.द्वि.ए.व. **प्रणिपातेन** - प्रणिपात पु.तृ.ए.व. **परिप्रश्नेन** - परिप्रश्न पु.तृ.ए.व. **सेवया** - सेवा स्त्री.तृ.ए.व. **विद्धि** - विद् द्वि.ग.प.प.कर्त.लोट् आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **तत्त्वदर्शिन:** - तत्त्व न. दर्शिन् वि.पु.प्र.ब.व. **ज्ञानिन:** - ज्ञानिन् पु.प्र.ब.व. **ते** - युष्मत् सर्व.च.ए.व. **ज्ञानम्** - ज्ञान न.द्वि.ए.व. **उपदेक्ष्यन्ति** - उप+दिश् ष.ग.प.प.कर्त.लृट् द्वि.भवि.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **प्रणिपातेन** - आचार्यान् अभिगम्य प्रकर्षेण नीचै: पतनं प्रणिपात:-दीर्घनमस्कारस्तेन प्र णिपातेन = आचार्यांजवळ जावून विशेषरूपाने उंच-नीच, चिखल, काटे आदिचा विचार न करता एकनिष्ठेने (दण्डाप्रमाणे) खाली पडणे-प्रणिपात, त्या प्रणिपाताने**(तृ.त.स.)** **तत्त्वदर्शिन:** - तत्त्वं द्रष्टुं शीलमस्यास्तीति तत्त्वदर्शी ते तत्त्वदर्शिन: = तत्त्व जाणण्याचा स्वभाव आहे ज्याचा असा तत्त्वदर्शी, ते तत्त्वदर्शी**(अस्त्यर्थे त. वि.)** **ज्ञानिन:** - ज्ञानमस्यास्तीति ज्ञानी ते ज्ञानिन: = ज्ञान ज्याचे-ज्यास आहे असा ज्ञानी, ते ज्ञानी**(अस्त्यर्थे त.वि.)** **ज्ञानम्** - ज्ञायते आत्मतत्त्वमनेनेति ज्ञानम् = ज्याच्या द्वारा आत्मतत्त्व जाणल्या जाते ते ज्ञान**(त.वि.)**

ज्ञानाचे फल -

**यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पाण्डव ।**

**येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥३५॥**

**अन्वय:** - पाण्डव, यत्, ज्ञात्वा, पुन:, एवम्, मोहम्, न, यास्यसि, येन, अशेषेण, भूतानि, आत्मनि, अथो, मयि, द्रक्ष्यसि ।

**अन्वयार्थ:** - **पाण्डव** - हे अर्जुना! **यत्** - जे ज्ञान **ज्ञात्वा** - जाणल्यावर **पुन:** - पुन्हा **एवम्** - याप्रमाणे **मोहम्** - मोहाला **न यास्यसि** - तूं प्राप्त होणार नाहीस **येन** - ज्या ज्ञानाच्या योगाने **अशेषेण भूतानि** - सर्वभूतांना **आत्मनि** - आपल्यामध्ये **अथो** - आणि **मयि** - माझ्या ठिकाणी-परमेश्वराच्या ठिकाणी **द्रक्ष्यसि** - पाहशील.

**विवरण** - ज्या ज्ञानाला जाणून तू 'अहम्', 'मम' अशा प्रकारच्या मिथ्या ज्ञानाचा त्याग करशील; ज्या ज्ञानाच्या द्वारा संपूर्ण प्राणिमात्रांना आपल्यामध्ये पाहाशील; नंतर मी जो अद्वितीय परब्रह्म परमात्मा त्यामध्ये संपूर्ण भूतांना पाहशील अर्थात् आत्म्याला परब्रह्मस्वरूप पाहशील.

**व्याकरणम्** - **पाण्डव** - पण्डु+अण्=पाण्डव पु.संबो.ए.व. **यत्** - यत् सर्व.न.द्वि.ए.व. **ज्ञात्वा** - ज्ञा न.ग.उ.प.त्वान्त अ. **पुन:** - पुनस् क्रि.वि.अ. **एवम्** - एवम् क्रि.वि.अ. **मोहम्** - मोह पु.द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **यास्यसि** - या द्वि.ग.प.प.लृट् द्वि.भवि.द्वि.पु.ए.व. **येन** - यत् सर्व.पु.तृ.ए.व. **अशेषेण** - अशेष वि.न.तृ.ए.व. **भूतानि** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.द्वि.ब.व. **आत्मनि** - आत्मन् पु.स.ए.व. **अथो** - अथो उभ.अ. **मयि** - अस्मत् सर्व.स.ए.व. **द्रक्ष्यसि** - दृश् प्र.ग.प.प.कर्त.लृट् द्वि.भवि.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अशेषेण** - न शेष इत्यशेषस्तेनाऽशेषेण = नाही शेष असा अशेष, त्या अशेषाने **(न.त.स.)**

ज्ञानरूप नौकेच्या द्वारा अतिशय पाप करणाऱ्या प्राण्याचासुद्धा उद्धार -

**अपि चेदसि पापेभ्य: सर्वेभ्य: पापकृत्तम: ।**

**सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं सन्तरिष्यसि ॥३६॥**

**अन्वय:** - सर्वेभ्य:, पापेभ्य:, पापकृत्तम:, अपि, असि, चेत्, ज्ञानप्लवेन, एव, सर्वं, वृजिनं, सन्तरिष्यसि ।

**अन्वयार्थ:** - **सर्वेभ्य: पापेभ्य:** - सर्व पाप करणाऱ्या पाप्यांहून **पापकृत्तम: अपि** - अत्यधिक पाप करणाराही **असि चेत्** - जरी तूं असलास तरी **ज्ञानप्लवेन एव** - ज्ञानरूपी नौकेच्या द्वाराच **सर्वं वृजिनम्** - सर्व पापाला **सन्तरिष्यसि** - काही सायास न करता तरून जाशील.

**विवरण** - संपूर्ण पाप करणाऱ्या पाप्यांहून जरी पापकृत्तम असलास, तरी अर्थात् सर्व पाप करणारे जे पापी त्या सर्व पाप्यांच्या पापांचे आचरण तू एकटा जरी करीत असलास, तरी ज्ञानरूपी नौकेच्याद्वारा साधारण पातक, उपपातक, महापातक इत्यादि सर्व पापाला तू चांगल्या प्रकारे तरून जाशील.

**व्याकरणम्** - **सर्वेभ्य:** - सर्व सर्व.पु.पं.ब.व. **पापेभ्य:** - पाप पु.पं.ब.व. **पापकृत्तम:** - पाप न. कृत् वि. तमप् प्रत्ययान्त पु.प्र.ए.व. **अपि** - अपि क्रि.वि.अ. **असि** - अस् द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.द्वि.पु.ए.व. **चेत्** - चेत् उभ.अ. **ज्ञानप्लवेन** - ज्ञान न. प्लव वि.न.तृ.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **सर्वम्** - सर्व सर्व.न. द्वि.ए.व. **वृजिनम्** - वृजिन न.द्वि.ए.व. **सन्तरिष्यसि** - सम्+तृ प्र.ग.प.प.कर्त.लृट् द्वि.भवि.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **पापकृत्तम:** - करोतीति कृत् पापस्य कृदिति पापकृदतिशयेन पापकृदिति पापकृत्तम: = अ तिशयाने पाप करणारा असा पापकृत्तम**(ष.त.ग.त.वि.)** **ज्ञानप्लवेन** - ज्ञानमेव प्लव:-नौका ज्ञानप्लवस्तेन ज्ञानप्लवेन = ज्ञानच प्लव-नौका त्या ज्ञाननौकेने**(क.स.)**

अग्निच्या दृष्टांताने ज्ञानाचे वर्णन -

**यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन ।**

**ज्ञानाग्नि: सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥३७॥**

**अन्वय:** - अर्जुन, यथा, समिद्ध:, अग्नि:, एधांसि, भस्मसात्, कुरुते, तथा, ज्ञानाग्नि:, सर्वकर्माणि, भस्मसात्, कुरुते ।

**अन्वयार्थ:** - **अर्जुन** - हे अर्जुना! **यथा** - ज्याप्रमाणे **समिद्ध: अग्नि:** - चांगला प्रदीप्त झालेला अग्नि **एधांसि**

**-** काष्ठांना **भस्मसात् कुरुते** - जाळून भस्म करतो **तथा** - त्याप्रमाणे **ज्ञानाग्निः** - ज्ञानरूप अग्नि **सर्वकर्माणि** - सर्व संचित व क्रियमाण अथवा सर्व पुण्यपापरूप कर्मे **भस्मसात्** - जाळून भस्म **कुरुते** - करतो.

**विवरण** - ज्याप्रमाणे प्रदीप्त अग्नि अनेक प्रकारच्या काष्ठांना भस्म करतो, त्याप्रमाणे ज्ञानाग्नि अज्ञानाचा नाश करून वर्तमान शरीर असेपर्यन्त होणारी व अतीत होऊन गेलेल्या अनेक जन्मी केलेली संचित, आगामी सर्व कर्मे भस्मसात् करतो.

**व्याकरणम्** - **अर्जुन** - हे अर्जुना पु.संबो.ए.व. **यथा** - यथा क्रि.वि.अ. **समिद्धः** - सम्+इन्ध् स.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **अग्निः** - अग्नि पु.प्र.ए.व. **एधांसि** - एधस् न.द्वि.ब.व. **भस्मसात्** - भस्मन् न. सात् प्रत्यय शब्दयोगी अ. **कुरुते** - कृ अ.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **तथा** - तथा क्रि. वि.अ. **ज्ञानाग्निः** - ज्ञान न. अग्नि पु.प्र.ए.व. **सर्वकर्माणि** - सर्व वि. कर्मन् न.द्वि.ब.व. **भस्मसात्** - शब्दयोगी अ. **कुरुते** - कृ अ.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **सर्वकर्माणि** - सर्वाणि-सम्पूर्णानि च तानि कर्माणि चेति सर्वकर्माणि-पुण्यपाप मिश्ररूपकर्माणि = सर्व-संपूर्ण आणि ती कर्मे सर्वकर्मे-पुण्यपाप मिश्ररूप कर्मे**(क.स.)**

**न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।**

**तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विन्दति ॥३८॥**

**अन्वयः** - ज्ञानेन, सदृशम्, पवित्रम्, इह, न, हि, विद्यते, तत्, आत्मनि, ज्ञानम्, कालेन, योगसंसिद्धः, स्वयम्, विन्दति ।

**अन्वयार्थः** - **ज्ञानेन सदृशम्** - ज्ञानाच्या समान **पवित्रम्** - पवित्र करणारे **इह** - या जगामध्ये **न हि विद्यते** - कांहीच नाही **तत् आत्मनि ज्ञानम्** - ते आत्म्याला विषय करणारे ज्ञान **कालेन** - दीर्घ कालाने **योगसंसिद्धः** - कर्मयोगाच्याद्वारा व समाधियोगाच्याद्वारा सुसंस्कृत झालेला साधक **स्वयम् विन्दति** - सायास न करता प्राप्त करतो अर्थात् आपण स्वत:च प्राप्त करून घेतो.

**विवरणः** - असे वर सांगितलेले आत्मज्ञान संपूर्ण कर्माचा नाश करते म्हणून या संसारामध्ये ज्ञानाच्या समान कोणतीही वस्तु पवित्र नाही, असे जे आत्मविषयक ज्ञान, दीर्घकालानंतर कर्मयोगाचरणाने व समाधियोगाने ज्याचे अंत:करण शुद्ध झाले आहे, असा साधक त्या ज्ञानाला आपल्या आत्म्यामध्ये प्राप्त करतो.

**व्याकरणम्** - **ज्ञानेन** - ज्ञान न.तृ.ए.व. **सदृशम्** - सदृश वि.न.प्र.ए.व. **पवित्रम्** - पू न.ग.उ.प.+इत्र=पवित्र वि.न.प्र.ए.व. **इह न हि** - इह, न, हि क्रि.वि.अ. **विद्यते** - विद् च.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.द्वि.ए.व. **आत्मनि** -आत्मन् पु.स.ए.व. **ज्ञानम्** - ज्ञान न.द्वि.ए.व. **कालेन** - काल पु.तृ.ए.व. **योगसंसिद्धः** - योग पु. सम्+सिध् च.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **स्वयम्** - स्वयम् क्रि.वि.अ. **विन्दति** - विद् ष.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **योगसंसिद्धः** - योगेन-कर्मयोगेन समाधियोगेन च संसिद्धः-संस्कृतो योग्यतामापन्न इति योगसंसिद्धः = योगाने-कर्मयोगाने आणि समाधियोगाने संसिद्ध-सुसंस्कृत योग्यतेला प्राप्त झालेला असा योगसंसिद्ध**(तृ.त.स.)** **पवित्रम्** -पवेः संसारात् त्रायते, इति पवित्रम् = पवि-संसारापासून तारते असे पवित्र **(वि.)** **कालेन** - कलते कलयति वा सर्वमिति कालस्तेन कालेन = सर्वांना उत्पन्न करतो अथवा प्रेरित अथवा

गणना करतो तो काल, अशा त्या कालाने**(त.वि.)**

ज्ञानाचा अधिकारी आणि ज्ञानाने परम शांतिच्या प्राप्तिचे कथन -

**श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः ।**

**ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति ॥३९॥**

**अन्वयः** - श्रद्धावान्, तत्परः, संयतेन्द्रियः, ज्ञानम्, लभते, ज्ञानम्, लब्ध्वा, पराम्, शान्तिम्, अचिरेण, अधिगच्छति ।

**अन्वयार्थः** - **श्रद्धावान्** - श्रद्धावान पुरुष **तत्परः** - गुरुच्या उपासनेमध्ये आणि श्रवण, मनन इत्यादि ज्ञानप्राप्तिच्या साधनामध्ये अत्यंत आसक्तचित्त व **संयतेन्द्रियः** - जितेंद्रिय-विषयांपासून इंद्रियांना ज्याने अधीन केले आहे असा **ज्ञानम्** - ज्ञानाला **लभते** - प्राप्त होतो **ज्ञानम्** - ज्ञान **लब्ध्वा** - प्राप्त झाल्याबरोबर **पराम् शान्तिम्** - निरतिशय सुखरूप शांतिला **अचिरेण** - शीघ्रातिशीघ्र **अधिगच्छति** - प्राप्त होतो.

**विवरण** - ज्या साधकाने विषयांपासून इंद्रिये निवृत्त केली, असा जितेंद्रिय, साधनपरायण, ज्ञानप्राप्त करण्याकरिता ज्याच्या अंतःकरणामध्ये श्रद्धा आहे, असा श्रद्धावान पुरुष ज्ञान प्राप्त करतो. ज्ञान प्राप्त झाल्यावर तत्काल निरतिशय सुखरूप शांति त्याला प्राप्त होते.

**व्याकरणम्** - **श्रद्धावान्** - श्रद्धावत् वि.पु.प्र.ए.व. **तत्परः** - तत्पर वि.पु.प्र.ए.व. **संयतेन्द्रियः** - सम्+यम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. इन्द्रिय न.वि.पु.प्र.ए.व. **ज्ञानम्** - ज्ञान न.द्वि.ए.व. **लब्ध्वा** - लभ् प्र.ग.आ.प.त्वान्त अ. **पराम्** - परा वि.द्वि.ए.व. **शान्तिम्** - शान्ति स्त्री.द्वि.ए.व. **अचिरेण** - अ+चिर न.तृ.ए.व. **अधिगच्छति** - अधि+गम् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **श्रद्धावान्** - श्रद्धा-विश्वासोऽस्यास्तीति श्रद्धावान् = श्रद्धा-विश्वास ज्याचा आहे असा श्रद्धावान्**(अस्त्यर्थे त.वि.)** यद्वा **श्रद्धावान्** - 'तत्त्वमसि' इति श्रुत्या ब्रह्मात्मैकत्वमुच्यते तदेव गुरुणोपदिश्यते तत्र श्रुतिवाक्ये गुरूक्तौ च सत्यत्वबुद्धिः श्रद्धा 'अस्तीत्येवोपलब्धव्यः' इति श्रवणात् तादृश्यव्यभिचारिणी श्रद्धा यस्याऽस्ति स श्रद्धावान् = 'तत्त्वमसि' या श्रुतिने ब्रह्म आणि आत्म्याचे एकत्व सांगितले, त्याचा गुरूने उपदेश केला आहे, त्या श्रुतिवाक्यामध्ये आणि गुरूच्या कथनामध्ये सत्यत्वबुद्धिच श्रद्धा म्हटली आहे; कारण, 'अस्तित्त्वरूपाने आत्म्यास जाणले पाहिजे', असे शास्त्रवचन आहे, अशा प्रकारे अटळ श्रद्धा ज्याचे जवळ आहे तो श्रद्धावान्**(ब.स.)** **तत्परः** - तदेव ज्ञानमेव परम्-श्रेष्ठः पुरुषार्थो यस्य स तत्परः = तेच ज्ञानच श्रेष्ठ पुरुषार्थ ज्याचा तो तत्पर**(प.ब.स.)** यद्वा **तत्परः** - सर्वदा तस्मिन्नेव वृत्तेरन्तर्बहिर्ब्रह्माकारत्वापादन एव पर आसक्तचित्तस्तत्परः = सर्वदा त्यामध्येच वृत्तिच्या आत आणि बाहेर ब्रह्माकारतेच्या आपादानामध्येच पर आसक्तचित्तवान-तत्पर**(स.त.स.)** **संयतेन्द्रियः** - विषयेभ्यः संयतानि-निगृहीतानि-निवर्तितानि इन्द्रियाणि यस्य येन वा स संयतेन्द्रियः = नियमित-निग्रहित केली विषयांपासून बहिर्मुख इंद्रिये ज्याची/ज्याने तो संयतेंद्रिय**(ब.स.)**

श्रद्धारहित संशययुक्त अज्ञान्याच्या दुर्गतिचे कथन -

**अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।**

**नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥४०॥**

**अन्वयः** - अज्ञः, च, अश्रद्दधानः, च, संशयात्मा, विनश्यति, संशयात्मनः, अयम्, लोकः, न, अस्ति, परः, न, सुखम्, न।

**अन्वयार्थः** - **अज्ञः** - आत्मतत्त्वाला न जाणणारा **च** - आणि **अश्रद्दधानः** - श्रद्धारहित **च** - आणि **संशयात्मा** - संशयी पुरुष **विनश्यति** - नाश पावतो **संशयात्मनः** - संशयी मनुष्याला **अयम् लोकः** - इह लोक **न अस्ति** - नाही **परः न** - परलोकही नाही **सुखम् न** - सुखही मिळत नाही.

**विवरणः** - मोक्षाचे कारण श्रवणादि आणि त्याचे कारण गुरुशुश्रूषा, शम, दम, तितिक्षा इत्यादिकांच्या ठिकाणी तत्पर होऊन आत्मज्ञानाला संपादन करीत नाही असा हा अज्ञानी.ज्याचा उपदेश करणारे गुरु आणि ज्ञानाने होणाऱ्या मोक्षाच्या ठिकाणी विश्वास नाही असा अश्रद्धावान आणि कर्माने मोक्ष होतो की, ज्ञानाने मोक्ष होतो, असा संशय ज्याच्या अंत:करणामध्ये आहे, असा तो संशयात्मा निश्चितरूपाने विनाशाला प्राप्त होतो. अशा मनुष्याला ऐहिकसुख तथा पारलौकिकसुख प्राप्त होत नाही आणि विषयसुखसुद्धा मिळत नाही.

**व्याकरणम्** - **अज्ञः** - अज्ञ वि.पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **अश्रद्धधानः** - अश्रद्धधान वि.पु.प्र.ए.व. **संशयात्मा** - संशय पु. आत्मन् पु.प्र.ए.व. **विनश्यति** - वि+नश् च.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **संशयात्मनः** - संशय पु. आत्मन् पु.ष.ए.व. **अयम्** - इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **लोकः** - लोक पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अस्ति** - अस् द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **परः** - पर वि.पु.प्र.ए.व. **सुखम्** - सुख न.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ.

**समासविग्रहार्थाः** - **अज्ञः** - जानातीति ज्ञो न ज्ञ इत्यज्ञः = जाणतो असा जाणणारा न जाणणारा असा अज्ञ **(न.त.स.)** **संशयात्मा** - संशयरूप आत्मा-अन्तःकरणं यस्य स संशयात्मा = संशयरूप आहे आत्मा-अंत:करण ज्याचे तो संशयात्मा**(ष.ब.स.)** यद्वा **संशयात्मा** - 'ज्ञानादेव तु कैल्यम्' इति श्रुतिवाक्येन ज्ञानेन मुक्तिरिति प्रतिपाद्यते, 'अपाम सोमममृता अभूम' इति श्रुतिवाक्येन कर्मणा मुक्तिरिति प्रतिपाद्यते, ततः कर्मणा वा ज्ञानेन वा मुक्तिरिति संशय आत्मनि-चित्ते यस्य स संशयात्मा = 'ज्ञानानेच मोक्ष होतो' या वाक्याने ज्ञान मुक्ति प्रतिपादक आहे, त्याचप्रमाणे 'आम्ही सोमरस पिऊन अमर झालो' या वाक्याने कर्म हे मुक्तिचे कारण आहे, असे प्रतिपादन केल्या जाते; मग कर्माने मुक्ति आहे, का ज्ञानाने मुक्ति आहे, असा संशय आत्म्यामध्ये -चित्तामध्ये ज्याच्या तो संशयात्मा**(ब.स.)**

संशयरहित निष्काम कर्म केले असता योगी पुरुषाकरिता कर्मबंधनाचा निषेध -

**योगसन्न्यस्तकर्माणं ज्ञानसञ्छिन्नसंशयम्।**

**आत्मवन्तं न कर्माणि निबध्नन्ति धनञ्जय ॥४१॥**

**अन्वयः** - धनञ्जय, ज्ञानसञ्छिन्नसंशयम्, योगसन्न्यस्तकर्माणम्, आत्मवन्तम्, कर्माणि, न, निबध्नन्ति।

**अन्वयार्थः** - **धनञ्जय** - हे अर्जुना! **ज्ञानसञ्छिन्नसंशयम्** - आत्मा व ईश्वर यांच्या अद्वैत ज्ञानाने ज्याचा संशय समाप्त झाला आहे व त्यामुळे **योगसन्न्यस्तकर्माणम्** - ब्रह्ममात्रत्वरूप योगाने ज्या परमार्थदर्शी पुरुषाने धर्म व अधर्म या नावाची कर्मे सोडली आहेत अशा **आत्मवन्तम्** - आत्मवेत्त्या पुरुषाला **कर्माणि** - धर्माधर्मरूप कर्मे **न निबध्नन्ति** - बांधत नाहीत.

**विवरण:** - हे अर्जुना! तत्त्वमसि या महावाक्याच्या उपदेशापासून होणाऱ्या ज्ञानाने ज्याचे संशय नष्ट झाले आहेत आणि 'हे सर्व मी ब्रह्म आहे' अशा या ब्रह्ममात्रत्त्वदर्शनयोगाने ज्याचे संपूर्ण कर्म नष्ट झाले आहे अशा ब्रह्मज्ञानी पुरुषाला कर्म बंधन करीत नाही.

**व्याकरणम् - धनञ्जय** - हे धनञ्जय पु.संबो.ए.व. **ज्ञानसञ्छिन्नसंशयम्** - ज्ञान न. सम्+छिद् स.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि. संशय पु.द्वि.ए.व. **योगसन्न्यस्तकर्माणम्** - योग पु. सम्+नि+अस् च.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. कर्मन् न.वि.पु.द्वि.ए.व. **आत्मवन्तम्** - आत्मवत् वि.पु.द्वि.ए.व. **कर्माणि** - कर्मन् न.प्र.ब.व. **न** - न क्रि.वि.अ. **निबध्नन्ति** - नि+बंध् न.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था: - योगसन्न्यस्तकर्माणम्** - योगेन-परमार्थदर्शनलक्षणयोगेन सन्न्यस्तानि कर्माणि येन परमार्थदर्शिना धर्माधर्माख्यानि स योगसन्न्यस्तकर्मा तं योगसन्न्यस्तकर्माणम् = योगाने-परमार्थदर्शनलक्षण योगाने टाकली-त्याग केली कर्मे ज्याने तो योगसंन्यस्तकर्मा, त्याला**(तृ.ब.स.) ज्ञानसञ्छिन्नसंशयम्** - ज्ञानेन -अकर्तात्मबोधेन यद्वा ज्ञानेन-आत्मनिश्चय लक्षणेन सञ्छिन्न:-नष्ट: संशय:-देहाद्यभिमानलक्षणसंशयो यस्य स ज्ञानसञ्छिन्नसंशयस्तं ज्ञानसञ्छिन्नसंशयम् = ज्ञानाने-अकर्तात्मबोधाने अथवा ज्ञानाने-आत्मनिश्चयलक्षणाने नष्ट झाला संशय-देहादि अभिमानलक्षण संशय ज्याचा तो ज्ञानसंछिन्नसंशय, त्या ज्ञानसंछिन्नसंशयाला **(ष.ब.स.)** यद्वा **ज्ञानसञ्छिन्नसंशयम्** - आत्मेश्वरैकत्वदर्शनलक्षणेन ज्ञानेन यस्य संशय: सञ्छिन्न: स ज्ञानसं छिन्नसंशय: = आत्मा व ईश्वर-ब्रह्म यांचे एकत्वदर्शन याच स्वरूपाच्या ज्ञानाने ज्याचा संशय पार तुटून गेला आहे तो ज्ञानसंछिन्नसंशय**(ब.स.) आत्मवन्तम्** - आत्मा-निश्चयात्मिकाबुद्धिरस्यास्तीति आत्मवान् तमात्मवन्तम् = निश्चयात्मिका बुद्धि आहे ज्याची, अशा त्या आत्मवंताला**(अस्त्यर्थे त.वि.)**

निष्काम योगामध्ये स्थित होऊन युद्ध करण्याची आज्ञा -

**तस्मादज्ञानसम्भूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मन: ।**

**छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥४२॥**

**अन्वय:** - तस्मात्, अज्ञानसम्भूतम्, हृत्स्थम्, आत्मन:, एनम्, संशयम्, ज्ञानासिना, छित्त्वा, योगम् , आ तिष्ठ, भारत, उत्तिष्ठ।

**अन्वयार्थ: - तस्मात्** - म्हणून **अज्ञानसम्भूतम्** - अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या **हृत्स्थम्** - बुद्धिस्थ असलेल्या **आत्मन:** - आत्म्याविषयीच्या **एनम् संशयम्** - या संशयाला **ज्ञानासिना** - ज्ञानरूपी खड्गाने **छित्त्वा** - तोडून **योगम्** - आपल्या धर्माला उचित असे कर्मानुष्ठान **आतिष्ठ** - कर **भारत** - हे अर्जुना! **उत्तिष्ठ** - आता युद्धाला उभा राहा.

**विवरण** - हे अर्जुना! अज्ञानजनित चित्तगत (मोक्षाचे साधन ज्ञान आहे अथवा अन्य सविज्ञान आहे ते परोक्षज्ञान आहे अथवा अपरोक्ष ज्ञान आहे. जर अपरोक्ष ज्ञान आहे तर त्या अपरोक्ष ज्ञानाने अविद्या आणि तिच्या कार्याची निवृत्ति होते अथवा नाही? इत्यादि रूप) संशयाला ज्ञानरूप तलवारीने तोडून कर्मयोगाचे अनुष्ठान कर अर्थात् युद्ध कर.

**व्याकरणम् - तस्मात्** - तस्मात् क्रि.वि.अ. **अज्ञानसम्भूतम्** - अज्ञान न. सम्+भू प्र.ग.प.प.कर्म.भू.धा. वि.पु.द्वि.ए.व. **हृत्स्थम्** - हृद् न. स्थ वि.पु.द्वि.ए.व. **आत्मन:** - आत्मन् पु.ष.ए.व. **एनम्** - एतत् सर्व.पु.

द्वि.ए.व. **संशयम्** - सम्+शी द्वि.ग.उ.प.+अच्=संशय पु.द्वि.ए.व. **ज्ञानासिना** - ज्ञान न. असि पु.तृ.ए.व. **छित्वा** - छिद् स.ग.उ.प.त्वान्त अ. **योगम्** - योग पु.द्वि.ए.व. **आतिष्ठ** - आ+स्था प्र.ग.प.प.कर्त.लोट् आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **भारत** - हे भारत पु.संबो.ए.व. **उत्तिष्ठ** - उद्+स्था प्र.ग.प.प.कर्त.लोट् आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **ज्ञानासिना** - शोकमोहादिदोषहरणं सम्यग्दर्शनं ज्ञानं तदेव असिः-खड्गस्तेन ज्ञानासिना = शोकमोहादि दोष हरण करणारे सम्यक् दर्शन ज्ञान, तीच तलवार-खड्ग, त्या यथार्थज्ञानरूप तलवारीने **(क.स.)** **अज्ञानसम्भूतम्** - अज्ञानात्-अविवेकात् सम्भूतः-उत्पन्न इत्यज्ञानसम्भूतस्तमज्ञानसम्भूतम् = अज्ञानापासून-अविवेकापासून उत्पन्न झालेला असा अज्ञानसंभूत त्या अज्ञानसंभूताला**(पं.त.स.)** **हृत्स्थम्** - हृदि-बुद्धौ तिष्ठतीति हृत्स्थस्तम् हृत्स्थम् = हृदयामध्ये राहतो असा हृत्स्थ-हृदयस्थ त्या हृदयामध्ये असलेल्या**(वि.)**

**ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे**

**श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानकर्मसन्न्यासयोगो नाम चतुर्थोऽध्यायः ॥४॥**

**-: अध्याय चवथा समाप्त :-**

**ॐ श्रीपरमात्मने नम:**

**अथ पञ्चमोऽध्याय:**

'छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठ' या ४२ व्या श्लोकानुसार तू कर्मयोगाचे अनुष्ठान कर परंतु कर्म अनुष्ठान व कर्म संन्यास या दोघांची स्थिति व गति भिन्न भिन्न आहे. म्हणजे परस्पर विरुद्ध असल्यामुळे एकाच पुरुषाला एकाच वेळी त्याचे अनुष्ठान करता येणे अशक्य आहे आणि भिन्न भिन्न काली एकाच पुरुषाने या दोन्हीचे अनुष्ठान करावे असेही विधान नाही. अर्थातच त्या दोन्हीमधून काही तरी एक अवश्य कर्तव्य आहे, अशी प्राप्ती झाली असता जे प्रशस्त आहे ते करावे असे समजणारा अर्जुन प्रश्न करतो -

**अर्जुन उवाच -** अर्जुन म्हणाला

**सन्न्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि ।**

**यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥१॥**

**अन्वय:** - कृष्ण, कर्मणाम्, सन्न्यासम्, च, पुन:, कर्मणाम्, योगम्, शंससि, एतयो:, यत्, एकम्, श्रेय:, तत्, मे, सुनिश्चितम्, ब्रूहि ।

**अन्वयार्थ:** - **कृष्ण** - हे कृष्णा! **कर्मणाम्, सन्न्यासम्** - कर्मांचा त्याग(एका वेळी) **च पुन:** - आणि पुन्हा **कर्मणाम्, योगम्** - शास्त्राने सांगिलेल्या कर्मांचे अनुष्ठान करण्याकरिता **शंससि** - सांगतोस(म्हणून) **एतयो:** - या दोहोमधील **यत्, एकम्** - जे एक **श्रेय:** - अधिक चांगले कल्याणाचे साधन असेल **तत्** - ते **मे** - मला **सु निश्चितम्** - चांगल्या प्रकारे निश्चित **ब्रूहि** - सांग.

**विवरण** - अर्जुन भगवंताला म्हणतो की तू एके ठिकाणी कर्माचा त्यागही सांगतोस आणि एके ठिकाणी कर्म करण्याकरिता प्रवृत्त करतोस या दोन्हीचा परस्पर विरोध असल्यामुळे एकाच वेळी दोन्हीचे अनुष्ठान होऊ शकत नाही म्हणून या दोन्हीमधून जे अत्यंत कल्याणकारी साधन असेल तेच मला तू सांग.

**व्याकरणम्** - **कृष्ण** - कृष्ण पु.संबो.ए.व. **कर्मणाम्** - कर्मन् न.ष.ब.व. **संन्यासम्** - सम्+नि+अस् च.ग.आ.प.+घञ्=संन्यास पु.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **पुन:** - पुनर् क्रि.वि.अ. **कर्मणाम्** - कर्मन् न.ष.ब.व. **योगम्** - योग पु.द्वि.ए.व. **शंससि** - शंस् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.द्वि.पु.ए.व. **एतयो:** - एतत् सर्व.पु.स.द्वि.व. **यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **एकम्** - एक संख्यावाचक वि.न.प्र.ए.व. **श्रेय:** - श्रेयस् न.प्र.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.च.ए.व. **सुनिश्चितम्** - सु क्रि.वि.अ. निर् अ. चि पं.ग.उ.प.भावे.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **ब्रूहि** - ब्रू द्वि.ग.प.प.कर्त.लोट् द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - संन्यासम्** - सम्यक्-सुष्ठुप्रकारेण, न्यास:-त्याग: संन्यासस्तं संन्यासम् = चांगल्या प्रकारे त्याग-संन्यास त्या संन्यासाला**(वि.)**

संन्यासापेक्षा कर्मयोगाच्या श्रेष्ठतेचे वर्णन -

**श्रीभगवानुवाच -** श्रीभगवान म्हणाले

**सन्न्यास: कर्मयोगश्च नि:श्रेयसकरावुभौ ।**

**तयोस्तु कर्मसन्न्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥२॥**

**अन्वय:** - सन्न्यास:, च, कर्मयोग:, उभौ, नि:श्रेयसकरौ, तु, तयो:, कर्मसन्न्यासात्, कर्मयोग:, विशिष्यते ।

**अन्वयार्थ:** - **सन्न्यास:** - अज्ञानी साधकाने केलेला कर्माचा परित्याग **च** - आणि त्याने केलेले **कर्मयोग:** - कर्मानुष्ठान **उभौ** - ही दोन्ही साधने **नि:श्रेयसकरौ** - मोक्षाला देणारी आहेत **तु** - परंतु **तयो:** - त्या दोन साधनामधील **कर्मसन्न्यासात्** - अज्ञानाच्या कर्मत्यागाहून **कर्मयोग:** - कर्मानुष्ठान प्राप्त करण्यास सुलभ असल्यामुळे **विशिष्यते** - अत्याधिक श्रेष्ठ आहे.

**विवरण** - भगवंताने म्हटले आहे की कर्मसंन्यास आणि कर्मयोग हे दोन्ही मोक्ष प्राप्त करून देण्याकरिता अत्यंत श्रेयस्कर साधने आहेत परंतु या दोन्हींमधून अज्ञानी पुरुषाकरिता कर्मसंन्यासापेक्षा कर्मयोग अत्यधिक श्रेष्ठतर आहे म्हणून साधनशून्य अविद्वानाला प्राय: संन्यासाचे ग्रहण न करता केवल कर्माचेच ईश्वरार्पण बुद्धीने अनुष्ठान करणे श्रेयस्कर आहे.

**व्याकरणम्** - **सन्न्यास:** - सन्न्यास पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **कर्मयोग:** - कर्मन् न. योग पु.प्र.ए.व. **उभौ** - उभ सर्व.पु.प्र.द्वि.व. **नि:श्रेयसकरौ** - निस्+श्रेयसकर वि.पु.प्र.द्वि.व. **तु** - तु उभ.अ. **तयो:** - तत् सर्व.पु.स.द्वि.व. **कर्मसन्न्यासात्** - कर्मन् न. सन्न्यास पु.पं.ए.व. **कर्मयोग:** - कर्मन् न. योग पु.प्र.ए.व. **वि शिष्यते** - वि+शिष् स.ग.प.प.कर्म.लट् आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **नि:श्रेयसकरौ** - करोतीति करो नि:श्रेयसस्य कर इति नि:श्रेयसकरस्तौ नि:श्रेयसकरौ= ते दोघे करतात असे करणारे नि:श्रेयसाचे करणारे असे नि:श्रेयसकर**(ष.त.स.)** **कर्मसन्न्यासात्** - कर्मणां सन्न्यास: कर्मसन्न्यासस्तस्मात् कर्मसन्न्यासात् = कर्मांचा संन्यास-त्याग कर्मत्याग त्या कर्मत्यागापासून **(ष.त.स.)** **कर्मयोग:** - कर्मणां योग: कर्मयोग: = कर्माचा योग कर्मयोग**(ष.त.स.)**

निष्काम कर्मयोगाची प्रशंसा -

**ज्ञेय: स नित्यसन्न्यासी यो न द्वेष्टि न काङ्क्षति ।**

**निर्द्वन्द्वो हि महाबाहो सुखं बन्धात्प्रमुच्यते ॥३॥**

**अन्वय:** - य:, न, द्वेष्टि, न, काङ्क्षति, स:, नित्यसन्न्यासी, ज्ञेय:, हि, महाबाहो, निर्द्वन्द्व:, बन्धात्, सुखम्, प्रमुच्यते ।

**अन्वयार्थ:** - **य:** - जो **न द्वेष्टि** - कोणाचाही द्वेष करीत नाही **न काङ्क्षति** - कोणत्याही पदार्थाची इच्छा करीत नाही **स:** - तो **नित्यसन्न्यासी** - सदा संन्यासीच **ज्ञेय:** - समजावा **हि** - कारण **महाबाहो** - हे महापराक्रमी अर्जुना! **निर्द्वन्द्व:** - द्वंद्वरहित पुरुष **बन्धात्** - संसारबंधनापासून **सुखम्** - कोणत्याही प्रकारचा सायास न करता **प्रमुच्यते** - सर्वथा मुक्त होतो.

**विवरण** - जो पुरुष आपल्या वाट्याला आलेले कर्तव्य कर्म करीत असता कोणाचा द्वेष करीत नाही आणि कोणत्याही पदार्थाची आकांक्षा करीत नाही अशा त्या कर्मयोग्याला नित्य संन्यासी समजावे कारण की द्वंद्वाने रहित असलेला पुरुष सुखपूर्वक संसार बंधनापासून मुक्त होतो.

**व्याकरणम्** - **य:** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **द्वेष्टि** - द्विष् द्वि.ग.प.प.कर्त लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**न** - न क्रि.वि.अ. **काङ्क्षति** - काङ्क्ष् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **नित्यसन्न्यासी** - नित्य वि. सन्न्यास+णिनि-सन्न्यासिन् पु.प्र.ए.व. **ज्ञेय:** - ज्ञा न.ग.उ.प.कर्म.यत् वि.पु.प्र.ए.व. **हि - हि** क्रि.वि.अ. **महाबाहो** - महाबाहु पु.संबो.ए.व. **निर्द्वन्द्व:** - निर्+द्वन्द्व पु.प्र.ए.व. **बन्धात्** - बन्ध पु. तव्यत् प्रत्ययान्त पु.पं.ए.व. **सुखम्** - सुख न.प्र.ए.व. **प्रमुच्यते** - प्र+मुच् ष.ग.उ.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **नित्यसन्न्यासी** - नित्यश्चासौ सन्न्यासीति नित्यसन्न्यासी = नित्य असा संन्यासी नित्यसंन्यासी**(क.स.)** यद्वा **नित्यसन्न्यासी** - नित्यं सन्न्यसितुं शीलमस्येति नित्यसन्न्यासी = नेहमी त्याग करण्याचा स्वभाव ह्याचा असा नित्यसंन्यासी**(उप.स.)** **निर्द्वन्द्व:** - निर्गतानि द्वन्द्वानि, शीतोष्णस-ुखदु:खलाभालाभादीनि यस्मात् स निर्द्वन्द्वो = निघून गेले द्वंद्व-शीतोष्ण, सुखदु:ख, लाभालाभ आदि ज्यांच्यापासून तो निर्द्वंद्व**(ष.ब.स.)**

सांख्ययोग आणि निष्कामकर्मयोगाची फलामध्ये एकता -

**साङ्ख्ययोगौ पृथग्बाला: प्रवदन्ति न पण्डिता: ।**

**एकमप्यास्थित: सम्यगुभयोर्विन्दते फलम् ॥४॥**

**अन्वय:** - बाला:, साङ्ख्ययोगौ, पृथक्, प्रवदन्ति, पण्डिता:, न, एकम्, अपि, सम्यक्, आस्थित:, उभयो:, फलम्, विन्दते ।

**अन्वयार्थ:** - **बाला:** - अज्ञानी लोक **साङ्ख्ययोगौ** - सांख्य आणि योग **पृथक्** - वेगळे वेगळे फल देणारे आहेत असे **प्रवदन्ति** - म्हणतात **पण्डिता: न** - परंतु पंडित लोक त्याप्रमाणे सांगत नाहीत **एकम्, अपि** - त्या दोहोमधील एका साधनाचाही **सम्यक्** - चांगल्या प्रकारे **आस्थित:** - अनुष्ठान करणारा पुरुष **उभयो:** - ह्या दोहोच्या **फलम्** - फलाला **विन्दते** - प्राप्त करतो.

**विवरण** - सांख्ययोग व कर्मयोग हे निरनिराळे फल देणारे आहेत असे अज्ञानी लोक म्हणतात. परंतु पंडित लोक दोन्हीचे फल एकच आहे असे सांगतात. कारण दोन्हीमधून एकाचे उत्तम प्रकारे अनुष्ठान करणारा पुरुष दोन्हीच्या फलास प्राप्त करू शकतो.

**व्याकरणम्** - **बाला:** - बल्+अन्-बाल्+अच्-बाल वि.पु.प्र.ब.व. **साङ्ख्ययोगौ** - साङ्ख्य पु. योग पु.प्र. द्वि.व. **पृथक्** - पृथक् क्रि.वि.अ. **प्रवदन्ति** - प्र+वद् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व. **पण्डिता:** - पण्डा+इतच्-पण्डित वि.पु.प्र.ब.व. **न** - न क्रि.वि.अ. **एकम्** - एक संख्यावाचक वि.न.द्वि.ए.व. **अपि** - अपि क्रि.वि.अ. **सम्यक्** - सम्यक् वि.पु.प्र.ए.व. **आस्थित:** - आ+स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा. वि.पु.प्र.ए.व. **उभयो:** - उभ सर्व.पु.ष.द्वि.व. **फलम्** - फल न.द्वि.ए.व. **विन्दते** - विद् ष.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **साङ्ख्ययोगौ** - साङ्ख्यश्च-आत्मानात्मविवेकजं तत्त्वज्ञानश्च योगश्च-कर्मानुष्ठानश्च साङ्ख्ययोगौ = सांख्य-आत्मानात्म विवेकापासून उत्पन्न झालेले तत्त्वज्ञान आणि योग-कर्माचे अनुष्ठान सांख्ययोग**(द्व.स.)** यद्वा **साङ्ख्ययोगौ** - साङ्ख्यम्-सर्ववेदान्तै: सम्यक्तत्परत्वेन ख्यायते प्रतिपाद्यत इति साङ्ख्यं परं ब्रह्म तत्प्राप्ते: परमकारणत्वात्साङ्ख्यं ज्ञाननिष्ठाङ्गभूत: संन्यास:, योग:-कर्मयोगस्तावुभौ

साङ्ख्ययोगौ = सर्व वेदांताच्याद्वारा चांगल्या तात्पर्याने ज्याचे व्याख्यान-प्रतिपादन केले जाते ते सांख्य-परब्रह्म त्याच्या प्राप्तिचे परमकारण असल्यामुळे ज्ञाननिष्ठेचा अंगभूत संन्यास सांख्य आहे, योग-कर्मयोग ते दोन्ही सांख्ययोग**(द्व.स.)**

फलामध्ये सांख्ययोग आणि निष्काम कर्मयोगाची एकता -

**यत्साङ्ख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ।**

**एकं साङ्ख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥५॥**

**अन्वयः** - यत्, स्थानम्, साङ्ख्यैः, प्राप्यते, तत्, योगैः, अपि, गम्यते, यः, साङ्ख्यम्, च, योगम्, एकम्, पश्यति, सः, च, पश्यति ।

**अन्वयार्थः** - **यत्, स्थानम्** - जे परम स्थान **साङ्ख्यैः** - सांख्यांच्याकडून **प्राप्यते** - संपादन केले जाते **तत्** - ते **योगैः अपि** - योग्यांच्याकडूनही **गम्यते** - क्रमाने संपादन केले जाते म्हणून **यः** - जो **साङ्ख्यम्, च योगम्** - सांख्य-ज्ञानलक्षण संन्यास आणि योग-निष्काम ईश्वरप्रीत्यर्थ कर्मानुष्ठान **एकम्** - एकच आहे असे **पश्यति** - पहातो **सः च** - तोच यथार्थ **पश्यति** - पाहतो-समजतो.

**विवरण** - जे स्थान सांख्ययोग्यांकडून प्राप्त केले जाते तेच स्थान कर्मयोग्यांकडून क्रमाने संपादन केले जाते म्हणून सांख्ययोग आणि कर्मयोग एकाच फलाला देणारे आहे असे जो पहातो तोच खरा यथार्थ ज्ञानी आहे.

**व्याकरणम्** - **यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **स्थानम्** - स्था प्र.ग.प.प.+ल्युट्=स्थान वि.न.प्र.ए.व. **साङ्ख्यैः** - साङ्ख्य वि.पु.तृ.ब.व. **प्राप्यते** - प्र+आप् पं.ग.प.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **योगैः** - योग पु.तृ.ब.व. **अपि** - अपि क्रि.वि.अ. **गम्यते** - गम् प्र.ग.प.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **साङ्ख्यम्** - साङ्ख्य पु.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **योगम्** - योग पु.द्वि.ए.व. **एकम्** - एक संख्यावाचक वि.न.प्र.ए.व. **पश्यति** - दृश् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **सः**- तत् सर्व.पु.प्र.ए.व. **सम्यक्** - सम्यक् वि.पु.प्र.ए.व. **पश्यति** - दृश् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **योगैः** - फलाभिसंधिवर्जितमीश्वरप्रीत्यै क्रियमाणं वैदिकं कर्म मोक्षपायत्वाद्योग इत्युच्यते स योगो येषामस्ति ते योगास्तैर्योगैः-कर्मनिष्ठैः = फलेच्छा वर्जित ईश्वरप्रीतिकरिता केले जाणारे वैदिक कर्म मोक्षसाधनाचा उपाय तो योग ज्यांचा आहे ते योगी त्या कर्मयोग करणाऱ्यांकडून**(ष.ब.स.)** **साङ्ख्यैः** - साङ्ख्यम्-परं ब्रह्म तदात्मत्वेन ये विदुस्ते साङ्ख्यास्तैः साङ्ख्यैः-ज्ञाननिष्ठैः = सांख्य-परब्रम्ह त्याला जो आत्मरूपाने जे जाणतात ते सांख्य त्या सांख्यांच्याद्वारा-ज्ञाननिष्ठांच्याद्वारा**(तृ.त.स.)**

निष्काम कर्मयोगापेक्षा सांख्ययोगाच्या साधनातील काठिण्याचे कथन -

**सन्न्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः ।**

**योगयुक्तो मुनिर्ब्रह्म नचिरेणाधिगच्छति ॥६॥**

**अन्वयः** - महाबाहो, तु, सन्न्यासः, अयोगतः, आप्तुम्, दुःखम्, योगयुक्तः, मुनिः, ब्रह्म, नचिरेण, अधिगच्छ ति ।

**अन्वयार्थः** - **महाबाहो** - हे पराक्रमी अर्जुना! **तु** - परंतु **सन्न्यासः** - ज्ञाननिष्ठारूप संन्यास **अयोगतः** -

कर्मयोगाशिवाय **आप्तुम्** - प्राप्त होणे **दुःखम्** - अत्यंत कठिण आहे **योगयुक्तः** - वैदिक कर्मानुष्ठानाने युक्त असलेला **मुनिः** - ईश्वरस्वरूपाचे मनन करणारा मुनि **ब्रह्म** - परब्रह्म परमात्म्याला **नचिरेण** - शीघ्रातिशीघ्र **अधिगच्छति** - प्राप्त करून घेतो.

**विवरण** - कर्मयोगाच्या अनुष्ठानाने चित्तशुद्धि आणि चित्तशुद्धिच्या योगाने संन्यास होतो म्हणून कर्मयोगाच्या अनुष्ठानाच्याविना संन्यास प्राप्त हाणे फार कठीण आहे. म्हणून कर्मयोगाने युक्त असणारा यति परमार्थ संन्यासाला-ब्रह्माला शीघ्रातिशीघ्र प्राप्त होतो.

**व्याकरणम्** - **महाबाहो** - महाबाहु पु.संबो.ए.व. **तु** - तु उभ.अ. **सन्यासः** - संन्यास पु.प्र.ए.व. **अयोगतः** - अ+योगतस् क्रि.वि.अ. **आप्तुम्** - आप् पं.ग.प.प.तुमन्त अ. **दुःखम्** - दुःख न.प्र.ए.व. **योगयुक्तः** - योग पु. युज् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **मुनिः** - मुनि पु.प्र.ए.व. **ब्रह्म** - ब्रह्मन् न.द्वि.ए.व. **न चिरेण** - न क्रि.वि.अ., चिर न.तृ.ए.व. **अधिगच्छति** - अधि+गम् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अयोगतः** - न योग इत्ययोगोऽयोगादित्ययोगतः = नाही योग असा अयोग अयोगापासून असे अयोगत**(पं.त.स.)** यद्वा **अयोगतः** - अन्तःकरणशोधकं शास्त्रीयं कर्मान्तरेण हठादेव यः कृतः सन्न्यासः स तु दुःखमाप्तुमेव भवति अयोगतः = अंतःकरणशोधक शास्त्रीय कर्मरूप योगाच्याशिवाय आग्रहाने जो केला जातो तो संन्यास परंतु असा संन्यास दुःखप्राप्तिला कारण होतो**(परिभाषा)योगयुक्तः** - ईश्वरसमर्पितरूपेण फल निरपेक्षेण वैदिकेन कर्मयोगेन युक्त इति योगयुक्तः = ईश्वर समर्पितरूप फलनिरपेक्ष वैदिक कर्मयोगाने युक्त असा योगयुक्त**(तृ.त.स.)** यद्वा **योगयुक्तः** - योगेन-योगानुष्ठानसंभूतचित्तप्रसादेन युक्तः-संयुक्त इति योगयुक्तः = योगाने योगानुष्ठानापासून झालेल्या चित्तप्रसादाने संयुक्त असा योगयुक्त**(तृ.त.स)**

निष्काम कर्मयोगी कर्म करीत असतानासुद्धा लिप्त होत नाही या विषयाचे कथन -

**योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेन्द्रियः ।**

**सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥७॥**

**अन्वयः** - योगयुक्तः, विशुद्धात्मा, विजितात्मा, जितेन्द्रियः, सर्वभूतात्मभूतात्मा, कुर्वन्, अपि, न, लिप्यते ।

**अन्वयार्थः - योगयुक्तः** - उपर्युक्त निष्काम कर्मानुष्ठानाने युक्त असल्यामुळे **विशुद्धात्मा** - ज्याचे अंतःकरण अत्यंत शुद्ध झाले आहे **विजितात्मा** - ज्याने आपल्या देहाला स्वतःच्या आधीन करून ठेविले आहे आणि **जितेन्द्रियः** - ज्याने इंद्रियांनाही आपल्या वश केले आहे तो **सर्वभूतात्मभूतात्मा** - ज्याचा आत्मा सर्व प्राणीमात्रांच्या आत्मरूप झाला आहे असा **कुर्वन्, अपि** - देह हालचालीकरीता कर्म जरी करीत असला तरी **न लिप्यते** - त्या कर्मापासून बद्ध होत नाही.

**विवरण** - निष्काम कर्मानुष्ठानाने युक्त असल्यामुळे ज्याचे अंतःकरण अत्यधिक निर्मल झाले आहे. ज्याने आपल्या देहाला स्वाधीन ठेवले आहे आणि इंद्रिय ज्याने आपल्या वश केली आहेत. ज्याचा आत्मा संपूर्ण प्राणीमात्रांचा स्वरूपभूत आत्मा आहे अर्थात ज्याचा आत्मा सर्वभूतांचा आत्मा आहे असा जो यति लोकसंग्रहाकरिता कर्मे जरी करीत असला तरी त्या कर्मांने तो बद्ध होत नाही.

**व्याकरणम् - योगयुक्तः** - योग पु. युज् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **विशुद्धात्मा** - वि+शुध् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. आत्मन् पु.प्र.ए.व. **विजितात्मा** - वि+जि प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. आत्मन्

पु.प्र.ए.व. **जितेन्द्रियः** - जि प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. इंद्रिय न.वि.पु.प्र.ए.व. **सर्वभूतात्मभूतात्मा** - सर्व वि. भूत-भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. आत्मन् पु. भूत-भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा. वि. आत्मन् पु.प्र.ए.व. **कुर्वन्** - कृ अ.ग.प.प.कर्त.शतृ वि.पु.प्र.ए.व. **अपि** - अपि क्रि.वि.अ. **न** - न क्रि.वि.अ. **लिप्यते** - लिप् ष.ग.उ.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व

**समासविग्रहार्थाः - योगयुक्तः** - योगेन-कर्मयोगेन युक्त इति योगयुक्तः = योगाने-कर्मयोगाने युक्त असा योगयुक्त**(तृ.त.स.)** यद्वा **योगयुक्तः** - योगेन-सन्न्यासयोगेन-ब्रह्मनिष्ठालक्षणेन युक्त इति योगयुक्तः = योगाने -संन्यासयोगाने-ब्रह्मनिष्ठालक्षणाने युक्त असा योगयुक्त**(तृ.त.स.) विशुद्धात्मा** - विशुद्धो रजस्तमोभ्यामकलुषित आत्मा-अन्तःकरणरूपं सत्त्वं यस्य स विशुद्धात्मा = विशुद्ध रजतमोगुणांनी अकलुषित-अदूषित आत्मा -अंतःकरणरूप सत्त्व आहे ज्याचे तो विशुद्धात्मा**(ष.ब.स.)** यद्वा **विशुद्धात्मा** - रागद्वेषादिदोषैर्निःशेषो वियुक्त आत्मा-मनो यस्य स विशुद्धात्मा = रागद्वेषादि दोषांनी रहित आत्मा-मन आहे ज्याचे तो विशुद्धात्मा **(ष.ब.स.) विजितात्मा** - विशेषेण जितः-वशीकृत आत्मा-मनो येन स विजितात्मा = विशेषरूपाने जिंकला -वशीभूत केला आत्मा-मन ज्याने तो विजितात्मा**(तृ.ब.स.)** यद्वा **विजितात्मा** - आत्मा-'यत्नधृतिस्वान्तस्वभावपरमात्मसु'इत्यभिधानाद्विजितः-निर्जितः-निर्यापित आत्मा-स्वभावो बाह्यवासनालक्षणो येन स विजितात्मा = यत्न, धृति, अंतकरण, स्वभाव आणि परमात्म्यामध्ये आत्मशद्वाचा प्रयोग होतो या कथनाने विजित म्ह. जिंकला आहे अथवा दूर केला आहे आत्मा-बाह्यवासनारूपस्वभाव ज्याने तो विजितात्मा**(तृ.ब.स.) जितेन्द्रियः** - जितानि-वशीकृतानि इन्द्रियाणि-ज्ञानकर्मसाधनानि येन स जितेन्द्रियः = जिंकली-वशीभूत केली इंद्रिये-ज्ञानकर्मसाधने ज्याने तो जितेंद्रिय**(तृ.ब.स.)** यद्वा **जितेन्द्रियः** - जितानि विषयग्रहणवैमुख्यं प्रापितान्युभयेन्द्रियाणि येन स जितेन्द्रियः = विषय ग्रहणापासून उभयेंद्रिये विमुख केली आहे ज्याने तो जितेंद्रिय**(तृ.ब.स.) सर्वभूतात्मभूतात्मा** - सर्वाणि च तानि भूतानि च सर्वभूतानि सर्वेषाम्-ब्रह्मादिस्तम्बान्तानाम्, भूतानाम्-प्राणिनामात्मभूतः-स्वरूपभूत आत्मा-प्रत्यग्लक्षणः स्वात्मा यस्य स सर्वभूतात्मभूतात्मा = सर्व आणि ती भूते सर्वभूते ज्याचा आत्मा ब्रह्मापासून तर स्तंबापर्यंत सर्वभूतांचा-प्राणिमात्रांचा आत्मा-प्रत्यग्लक्षणस्वरूपभूत आहे ज्याचा तो सर्वभूतात्मभूतात्मा अर्थात ज्याचा आत्मा ब्रह्मदेवापासून तो शेवट किडामुंगीपर्यंत सर्वभूतांच्या स्वरूपाने भासतो**(कर्म.ग.ष.ग.ष.ब.स.)**

सांख्ययोग्याचे लक्षण -

**नैव किञ्चित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित्।**

**पश्यञ्शृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपञ्श्वसन्॥८॥**

**प्रलपन्विसृजन्गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि।**

**इन्द्रियाणीन्द्रियार्थेषु वर्तन्त इति धारयन्॥९॥**

**अन्वयः** - तत्त्ववित्, पश्यन्, शृण्वन्, स्पृशन्, जिघ्रन्, अश्नन्, गच्छन्, स्वपन्, श्वसन्, प्रलपन्, विसृजन्, गृह्णन्, उन्मिषन्, निमिषन्, अपि, इन्द्रियाणि, इन्द्रियार्थेषु, वर्तन्ते, इति, धारयन्, किञ्चित्, न, एव, करोमि, इति, युक्तः, मन्येत।

**अन्वयार्थः - तत्त्ववित्** - तत्त्ववित पुरुष **पश्यन्** - डोळ्यांनी पहात असता **शृण्वन्**- कानांनी ऐकत असता

**स्पृशन्** - त्वगिंद्रियाने स्पर्श करीत असता **जिघ्रन्** - नाकाने वास घेत असता **अश्नन् -** जिभेने रस चाखीत असता **गच्छन् -** पायाने चालत असता **स्वपन् -** झोप घेत असता **श्वसन्** - श्वासोच्छ्वास करीत असता **प्रलपन्** - वागिंद्रियाने बोलत असता **विसृजन्** - पायु इंद्रियाने विष्ठेचा त्याग करीत असता **गृह्णन्** - हातांनी ग्रहण करीत असता **उन्मिषन्** - पापण्या उघडीत असता व **निमिषन् अपि** - पापण्या झाकीत असतानाही **इन्द्रियाणि** - इंद्रियें **इन्द्रियार्थेषु -** विषयामध्ये **वर्तन्ते** - प्रवृत्त होत आहेत **इति** - असे **धारयन् -** मनात समजून **किञ्चित्** - कोणत्याही प्रकारची क्रिया **न एव करोमि** - मी स्वत: काही करीत नाही **इति** - असे **युक्तः** - आत्मस्वरूपामध्ये चित्ताला स्थिर करून **मन्येत -** तत्त्ववित् पुरुषाने असे चिंतन करावे.

**विवरण** - आत्म्याच्या यथार्थ स्वरूपाला जाणणारा तत्त्ववित पुरुष शब्दादि विषयांमध्ये इंद्रिये ही व्यापार करीत आहेत असे पहाणे, ऐकणे इत्यादि क्रिया मी करीत नाही. मी निष्क्रिय आहे अशी वृत्ति सदासर्वदा धारण करून साक्षिरूपाने मौन धारण करून रहावे.

**व्याकरणम् - तत्त्ववित्** - तत्त्ववित् वि.पु.प्र.ए.व. **पश्यन्** - दृश् प्र.ग.प.प.कर्त.शतृ वि.पु.प्र.ए.व. **शृण्वन्** - श्रु+शतृ-शृण्वत् पं.ग.प.प.वि.प्र.ए.व. **स्पृशन्** - स्पृश्+शतृ-स्पृशत् ष.ग.प.प.वि.प्र.ए.व. **जिघ्रन्** - घ्रा+शतृ-जिघ्रत् प्र.ग.प.प.वि.प्र.ए.व. **अश्नन्** - अश्+शतृ-अश्नत् न.ग.प.प.वि.प्र.ए.व. **गच्छन्** - गम्+शतृ-गच्छत् प्र.ग.प.प.वि.प्र.ए.व. **स्वपन्** - स्वप्+शतृ-स्वपत् द्वि.ग.प.प.वि.प्र.ए.व. **श्वसन्** - श्वस्+शतृ-श्वसत् द्वि.ग.प.प.वि.प्र.ए.व. **प्रलपन्** - प्र+लप्+शतृ-प्रलपत् प्र.ग.प.प.वि.प्र.ए.व. **विसृजन्** - वि+सृज्+शतृ-विसृजत् ष.ग.प.प.वि.प्र.ए.व. **गृह्णन्** - गृह्+शतृ-गृह्णत् न.ग.प.प.वि.प्र.ए.व. **उन्मिषन्** - उद्+मिष्+शतृ-उन्मिषत् ष.ग.प.प.वि.प्र.ए.व. **निमिषन्** - नि+मिष्+शतृ-निमिषत् ष.ग.प.प.वि.प्र.ए.व. **अपि** - अपि क्रि.वि.अ. **इन्द्रियाणि** - इन्द्रिय न.प्र.ब.व. **इन्द्रियार्थेषु** - इन्द्रिय न. अर्थ पु.स.ब.व. **वर्तन्ते** - वृत् प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व. **इति -** इति क्रि.वि.अ. **धारयन्** - धृ प्र.ग.उ.प.णिच् कर्त.शतृ वि.पु.प्र.ए.व. **किञ्चित् न एव** - किञ्चित् न एव क्रि.वि.अ. **करोमि** - कृ अ.ग.प.प.कर्त.लट् वर्त.प्र.पु.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **युक्तः** - युज् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **सन्** - अस् द्वि.ग.प.प.कर्त.वर्त.धा.वि.पु.प्र.ए.व. **मन्येत** - मन् च.ग.आ.प.कर्म.विध्यर्थ तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - इन्द्रियार्थेषु** - इन्द्रियाणाम्-श्रोत्रादिकरणानामर्थाः-शब्दादि विषयास्तेषु इन्द्रियार्थेषु = इंद्रियांचे-श्रोत्रादिज्ञानेंद्रियांचे अर्थ-शब्दादि विषय त्या शब्दादि विषयामध्ये**(ष.त.स.) धारयन्** - धारयतीति धारयन् = धारण करतो असा धारण करत असता**(वि.)**

भगवंताकरिता निर्लेपतेने कर्म करणाऱ्याकरिता पद्मपत्राचा दृष्टांत -

**ब्रह्मण्याधाय कर्माणि सङ्गं त्यक्त्वा करोति यः।**

**लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवाम्भसा ॥१०॥**

**अन्वयः** - यः, कर्माणि, ब्रह्मणि, आधाय, सङ्गम्, त्यक्त्वा, करोति, सः, अम्भसा, पद्मपत्रम्, इव, पापेन, न, लिप्यते।

**अन्वयार्थः - यः** - जो पुरुष **कर्माणि** - शास्त्रीय कर्मे **ब्रम्हणि** - परमात्म्यामध्ये **आधाय** - समर्पण करून **सङ्गम्** - फलासक्ति **त्यक्त्वा** - टाकून **करोति** - करतो **सः** - तो पुरुष **अम्भसा** - पाण्याने **पद्मपत्रम्, इव** -

कमलाचे पान किंवा पाकळी अलिप्त असते त्याप्रमाणे **पापेन** - तो पापाने **न लिप्यते** - लिप्त होत नाही.

**विवरण** - जो पुरुष फलाची अभिलाषा सोडून परमात्म्यामध्ये संपूर्ण कर्म अर्पण करून नित्य, नैमित्तिक कर्म करत असता तो जसे कमळाच्या पानाला जलाचा स्पर्श होत नाही त्याप्रमाणे तो पापाने लिप्त होत नाही अर्थात् कमळाचे पान पाण्याने ओले होत नाही त्याप्रमाणे त्याला कोणत्याही प्रकारचे पाप स्पर्श करीत नाही.

**व्याकरणम्** - **यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **कर्माणि** - कर्मन् न.द्वि.ब.व. **ब्रह्मणि** - ब्रह्मन् न.स.ए.व. **आधाय** - आ+धा तृ.ग.उ.प.ल्यबन्त अ. **सङ्गम्** - सङ्ग पु.द्वि.ए.व. **त्यक्त्वा** - त्यज् प्र.ग.प.प.त्वान्त अ. **करोति** - कृ अ.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **अम्भसा** - अम्भस् न.तृ.ए.व. **पद्मपत्रम्** - पद्म न. पत्र.न.प्र.ए.व. **इव** - इव क्रि.वि.अ. **पापेन** - पाप न.तृ.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **लिप्यते** - लिप् ष.ग.उ.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **पद्मपत्रम्** - पद्मस्य-कमलस्य, पत्रम्-दलमिति पद्मपत्रम् = पद्माचे-कमळाचे पान-दल असे पद्मपत्र**(ष.त.स.)**

आत्मशुद्धिकरिता योगाच्या कर्माचरणाचे कथन -

**कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिन्द्रियैरपि ।**

**योगिनः कर्म कुर्वन्ति सङ्गं त्यक्त्वात्मशुद्धये ॥११॥**

**अन्वयः** - योगिनः, (केवलेन)कायेन, (केवलेन)मनसा, (केवलया)बुद्ध्या, केवलैः, इन्द्रियैः, अपि, सङ्गम्, त्यक्त्वा, आत्मशुद्धये, कर्म, कुर्वन्ति ।

**अन्वयार्थः** - **योगिनः** - ममत्त्वबुद्धीचा त्याग केलेला असा कर्मयोगी **(केवलेन)कायेन** - केवल शरीराने **(केवलेन)मनसा** - केवल मनाने **(केवलया)बुद्ध्या** - केवल बुद्धिने व **केवलैः इन्द्रियैः अपि** - केवल इंद्रियांच्याद्वारा **सङ्गम्** - फलासक्ति **त्यक्त्वा** - टाकून **आत्मशुद्धये** - अंतःकरण शुद्ध होण्याकरिता **कर्म** - नित्य व नैमित्तिक कर्मे **कुर्वन्ति** - करितात.

**विवरण** - कर्मयोगी मुमुक्षु शरीराने, मनाने, बुद्धीने आणि केवळ इंद्रियाच्याद्वारा आत्मा-अंतःकरण शुद्धिकरिता फलाभिलाषा सोडून वैदिक कर्म नियमाने करितात अर्थात बुद्धिने निश्चय केलेला विष्णु त्याचे मनाने ध्यान, श्रोत्रेंद्रियाने श्रवण, नेत्राने दर्शन, वाणीने स्वाध्याय, पायाने तीर्थाटन आदि ईश्वराच्या प्रीतिकरिता हे सर्व कर्म करितात.

**व्याकरणम्** - **योगिनः** - योगिन् पु.प्र.ब.व. (**केवलेन** - केवल वि.पु.तृ.ए.व.) **कायेन** - काय पु.तृ.ए.व. (**केवलेन** - केवल न.तृ.ए.व.) **मनसा** - मन्+असुन्-मनस् न.तृ.ए.व. (**केवलया** - केवला वि.स्त्री.तृ.ए.व.) **बुद्ध्या** - बुध्+क्तिन्-बुद्धि स्त्री.तृ.ए.व. **केवलैः** - केवल वि.न.तृ.ब.व. **इन्द्रियैः** - इंद्रिय न.तृ.ब.व. **अपि** - अपि क्रि.वि.अ. **सङ्गम्** - सङ्ग पु.द्वि.ए.व. **त्यक्त्वा** - त्यज् प्र.ग.प.प.त्वान्त अ. **आत्मशुद्धये** - आत्मन् पु.शुद्धि स्त्री.च.ए.व. **कर्म** - कर्मन् न.द्वि.ए.व. **कुर्वन्ति** - कृ अ.ग.प.प.कर्त.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **आत्मशुद्धये** - आत्मनः-अज्ञानकार्यकर्तृत्वादिना कलुषितस्य मनसः शुद्धिः-आत्मशु

द्धिस्तस्यै आत्मशुद्धये-चित्तशुद्धये = आत्म्याची-अज्ञानकार्य कर्तृत्वादिकाने मलिन झालेल्या मनाची शुद्धी-आत्मशुद्धि त्या आत्मशुद्धिकरिता म्हणजे चित्तशुद्धिकरिता**(ष.त.स.)**

कर्मफलाच्या त्यागाने शांती आणि कामनेने बंधन -

**युक्त: कर्मफलं त्यक्त्वा शान्तिमाप्नोति नैष्ठिकीम् ।**

**अयुक्त: कामकारेण फले सक्तो निबध्यते ॥१२॥**

**अन्वय:** - युक्त:, कर्मफलम्, त्यक्त्वा, नैष्ठिकीम्, शान्तिम्, आप्नोति, अयुक्त:, कामकारेण, फले, सक्त:, निबध्यते ।

**अन्वयार्थ:** - **युक्त:** - सर्व कर्मे परमात्म्यासाठी आहेत माझ्या फलाकरिता नाहीत असे जाणून मन स्थिर असलेला असा कर्मयोगी मुमुक्षु **कर्मफलम्** - कर्माच्या फलाला **त्यक्त्वा** - टाकून **नैष्ठिकीम्, शान्तिम्** - निष्ठेमधल्या मोक्षनामक शांतीला **आप्नोति** - प्राप्त होतो **अयुक्त:** - अस्थिर मन असणारा असा तो सकाम पुरुष **कामकारेण** - कामाने प्रेरित झाल्यामुळे **फले सक्त:** - फलाच्याठिकाणी आसक्त असलेला असा तो **निबध्यते** - अत्यधिक बद्ध होतो.

**विवरण** - कर्मफलाचा त्याग करून ईश्वरार्पण बुद्धिने कर्म करणारा विवेकी पुरुष कर्मनिष्ठेच्याद्वारा उत्पन्न चित्त शुद्धिने होणारी ज्ञानाच्याद्वारा प्रकाशित शांतिला-मुक्तिला प्राप्त होतो. परंतु अस्थिर मन असणारा पुरुष कामनेने प्रेरित झाल्यामुळे फलाच्याठिकाणी आसक्त असलेला असा तो अज्ञानी पुरुष अत्यंत बद्धतेला प्राप्त होतो.

**व्याकरणम्** - **युक्त:** - युज् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **कर्मफलम्** - कर्मन् न. फल न.द्वि.ए.व. **त्यक्त्वा** - त्यज् प्र.ग.प.प.त्वान्त अ. **नैष्ठिकीम्** - निष्ठा+ठक्-नैष्ठिकी वि.स्त्री.द्वि.ए.व. **शान्तिम्** - शम्+क्तिन्-शान्ति स्त्री.द्वि.ए.व. **आप्नोति** - आप् पं.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **अयुक्त:** - अ+युज् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **कामकारेण** - कामकार वि.पु.तृ.ए.व. **फले** - फल न.स.ए.व. **सक्त:** - सञ्ज् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **निबध्यते** - नि+बन्ध् न.ग.प.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **कर्मफलम्** - कर्मण: फलमिति कर्मफलम् = कर्माचे फल असे कर्मफल त्या कर्मफलाला **(ष.त.स.)** **कामकारेण** - कामेन-फलाभिलाषेण कार:-प्रेरित इति कामकारस्तेन कामकारेण = कामाने-फला भिलाषाने प्रेरित असा कामकार त्या कामकाराने-कामाच्या योगाने**(तृ.त.स.)** यद्वा **कामकारेण** - करणं कार: कामस्य कार: कामकारस्तेन कामकारेण-कामप्रेरिततया = करण हाच कार कामाचा कार कामकार त्या कामकाराने-कामाकडून प्रेरित झाल्यामुळे**(ष.त.स.)** **नैष्ठिकीम्** - अन्तोऽवसानं निष्ठा निष्ठाया जाता इति नै ष्ठिकी तां नैष्ठिकीम् = अंत-अवसान अशी जी निष्ठा त्यापासून उत्पन्न झाली असी नैष्ठिकी त्या नैष्ठिकीला**(त. वि.)** यद्वा **नैष्ठिकीम्** - कर्मनिष्ठासमुत्पन्नचित्तशुद्धिसम्भावितज्ञानप्रकाशितां शान्तिं मुक्तिं नैष्ठिकीम् = कर्मनिष्ठेने प्राप्त होणारी चित्तशुद्धी व त्यानंतर प्राप्त होणारे ज्ञान नंतर प्रकाशीत होणारी परमशांती प्राप्त होते**(परिभाषा)** यद्वा **नैष्ठिकीम्** - सदसद्विवेकी मोक्षेच्छया कर्मफलं त्यक्त्वा स्वेनाऽनुष्ठीयमानानां कर्मणां फलमनपेक्ष्य युक्तो भवति लाभालाभयो: सिद्ध्यसिद्ध्योश्च समो भूत्वा परमेश्वरप्रीतय एव य: कर्म करोति स एव नैष्ठिकीम्-कर्म निष्ठाजन्यां शान्तिं चित्तशुद्धिम् = जो सदसद्विवेकी मोक्षाच्या इच्छेने कर्मफलाचा त्याग करून स्वानुष्ठीत

कर्मफलाची आशा न करता लाभालाभ, सिद्धि, असिद्धि यांचे विषयी समभावना ठेऊन परमेश्वर प्रीति प्रसन्नता मिळावी म्हणून कर्मे करतो तोच अशा नैष्ठिकी-कर्मनिष्ठाजन्य शांति ला (प्राप्त होतो)**(परिभाषा)**

**सर्वकर्माणि मनसा सन्न्यस्यास्ते सुखं वशी ।**

**नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥१३॥**

**अन्वयः** - वशी, देही, सर्वकर्माणि, मनसा, सन्न्यस्य, नवद्वारे, पुरे, न, कुर्वन्, न, एव, कारयन्, सुखम्, आस्ते ।

**अन्वयार्थः - वशी** - इंद्रियसंयमी **देही** - शरीरधारी पुरुष **सर्वकर्माणि** - नित्य नैमित्तिकादि सर्व कर्मे **मनसा -** मनाने **सन्न्यस्य -** टाकून **नवद्वारे पुरे** - नऊ द्वारांनी युक्त अशा देहरूपी नगरात **न कुर्वन्** - सर्व करूनही स्वत: काही एक न करीता **न एव कारयन्** - दुसऱ्याकडून काही न करविता **सुखम्** - आनंदाने **आस्ते -** (परमात्म्याच्या स्वरुपात) राहतो

**विवरण** - आत्मसंयमी देहधारी पुरुष मनाने संपूर्ण कर्माचा त्याग करून नऊद्वारांनी युक्त असणाऱ्या अशा शरीरांत स्वत: काही एक न करीत आणि दुसऱ्याकडून काही एक न करवीत सुखपूर्वक आपल्या स्वरूपभूत चैतन्यरूपाने राहातो.

**व्याकरणम् - वशी** - वशिन् वि.पु.प्र.ए.व. **देही** - देहिन् पु.प्र.ए.व. **सर्वकर्माणि** - सर्व वि. कर्मन् न. द्वि.ब.व. **मनसा** - मनस् न.तृ.ए.व. **सन्न्यस्य** - सम्+नि+अस् च.ग.प.प.ल्यबन्त अ. **नवद्वारे** - नव वि. द्वार न.स.ए.व. **पुरे** - पुर न.स.ए.व. **कुर्वन्** - कृ अ.ग.प.प.कर्त.वर्त.धा.वि.पु.प्र.ए.व. **न एव** - न एव क्रि. वि.अ. **कारयन्** - कृ अ.ग.प.प.णिच् कर्त.शतृ-कारयत् वि.पु.प्र.ए.व. **सुखम्** - सुख न.द्वि.ए.व. **आस्ते** - आस् द्वि.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थः - वशी** - इन्द्रियाणि वशे अधीने विद्यन्तेऽस्य स वशी = इंद्रिये ताब्यात आहे ह्याच्या तो वशी**(अस्त्यर्थे त.वि.) नवद्वारे** - चक्षुर्भ्याम्, श्रोत्राभ्याम्, नासिकाभ्याम्, वक्त्रेण च पायूपस्थाभ्याञ्च नवसंख्याकानि द्वाराणि सूर्याद्यधिदैवतरक्षितानि यस्य तन्नवद्वारं तस्मिन् नवद्वारे = दोन डोळे, दोन कान, दोन नाकपुड्या, एक मुख असे मस्तकात सात आणि दोन गुद आणि शिश्न नावाचे खाली असे नवद्वार युक्त त्या नवद्वारामध्ये**(द्विगु स.) सर्वकर्माणि** - नित्यं नैमित्तिकं काम्यं प्रतिसिद्धश्चेति सर्वाणि च कर्माणि तानि सर्वकर्माणि = नित्य नैमित्तिक काम्य आणि निषिद्ध अशी सर्वकर्मे त्या सर्वकर्मांना**(कर्म.स.)**

परमात्म्यामध्ये कर्तेपणाच्या अभावाचे कथन -

**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः ।**

**न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥१४॥**

**अन्वयः** - प्रभुः, लोकस्य, कर्तृत्वम्, न, सृजति, कर्माणि, न, (सृजति) च, कर्मफलसंयोगम्, न, (सृजति) तु, स्वभावः, प्रवर्तते ।

**अन्वयार्थः - प्रभुः** - देही-आत्मा **लोकस्य** - लोकांचे **कर्तृत्वम्** - कर्तृत्व तू असे कर असे सांगून **न सृजति** - उत्पन्न करीत नाही **कर्माणि -** वित्त, अन्न धान्यादि कर्त्याला अत्यंत इष्ट असलले पदार्थ **न (सृजति) -**

निर्मीत नाही **च** - आणि **कर्मफलसंयोगम्** - रथादि पदार्थ करणाऱ्या कर्त्याला कर्माच्या फलाशी संयुक्त-रथ, घट, मठ इत्यादि कर्त्याला अतिशय इष्ट असलेले पदार्थ **न(सृजति)** - करीत नाही-उत्पन्न करीत नाही **तु** - परंतु **स्वभाव:** - हे सर्व अविद्यारूपी प्रकृतिकडून **प्रवर्तते** - होत असते.

**विवरण** - स्वयं आत्मा लोकांची कर्मामध्ये प्रवृत्ति करीत नाही आणि इष्टप्रद आणि अनिष्टप्रद पदार्थ उत्पन्न करीत नाही आणि त्याचप्रमाणे प्राणिमात्रांच्या पुण्य-पापांच्या फलाचा अनुभव करीत नाही परंतु स्वभाव-प्रकृतिही त्या सर्वांना उत्पन्न करते. आत्मा तो साक्षी आणि अविक्रिय आहे तो काही करीत नाही आणि करवीत नाही.

**व्याकरणम्** - **प्रभु:** - प्र+भू प्र.ग.प.प.+डु-प्रभु पु.प्र.ए.व. **लोकस्य** - लोक पु.ष.ए.व. **कर्तृत्वम्** - कृ+तृच्+त्व-कर्तृत्व न.द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **सृजति** - सृज् ष.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **कर्माणि** कर्मन् न.द्वि.ब.व. **(सृजति)** - सृज् ष.ग.प.प.कर्त.लट्.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **कर्मफलसंयोगम्** - कर्मन् न. फल न. संयोग पु.द्वि.ए.व. **(सृजति)**- सृज् ष.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **तु** - तु उभ.अ. **स्वभाव:** - स्वभाव पु.प्र.ए.व. **प्रवर्तते** - प्र+वृत् प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **कर्मफलसंयोगम्** - कर्मण: फलमिति कर्मफलं कर्मफलस्य संयोग: कर्मफलसंयोगस्तंकर्मफलसंयोगम् = कर्माचे फल असे कर्मफल कर्मफलाचा संयोग कर्मफलसंयोग त्या कर्मफलसंयोगाला**(ष.त.स.)** **प्रभु:** - प्रभवतीति प्रभुर्वा सर्वासु क्रियासु सामर्थ्यातिशयवानिति प्रभुर्वा प्रभवति शक्नोति सृष्ट्यादिषु सर्वकर्मस्विति प्रभुर्वा प्रकर्षेण स्वयमेव सर्वत्र भाति सर्वं भासयतीति वा सर्वात्मना स्वयमेव भातीति वा प्रभुरात्मा = उत्पन्न करतो असा प्रभु किंवा सर्वक्रियामध्ये अतिशय सामर्थ्यवान प्रभु किंवा सृष्ट्यादिकामध्ये-सर्वकर्मामध्ये विशेष उत्पन्न करण्यामध्ये समर्थ असतो असा प्रभु किंवा विशेषत्वाने स्वत:च सर्वठिकाणी भासतो, सर्वांचा प्रकाश करतो, सर्वांच्या आत्मस्वरूपाने स्वत:च भासतो असा प्रभु-आत्मा**(वि.)** **स्वभाव:** - स्वो भाव: इति स्वभाव: अविद्यालक्षणा प्रकृति:-माया = आपला जो भाव तो स्वभाव म्ह. अविद्यारूपप्रकृति-माया**(वि.)**

परमात्मा कोणाच्याही पापपुण्याचे ग्रहण करीत नाही या विषयाचे कथन -

**नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभु: ।**

**अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तव: ॥१५॥**

**अन्वय:** - विभु:, कस्यचित्, पापम्, न, आदत्ते, च, सुकृतम्, न, एव, (आदत्ते), ज्ञानम्, अज्ञानेन, आवृत्तम्, तेन, जन्तव:, मुह्यन्ति ।

**अन्वयार्थ:** - **विभु:** - सर्वव्यापी असणारा आत्मा **कस्यचित्** - कोणाचे **पापम्** - पाप **न आदत्ते** - ग्रहण करीत नाही **च** - आणि **सुकृतम्** - कोणाचे पुण्य ही **न एव(आदत्ते)** - ग्रहण करीत नाही **ज्ञानम्** - केवळ विवेकज्ञानाला **अज्ञानेन** - अज्ञानाने **आवृतम्** - आवृत्त केले आहे **तेन** - त्या कारणामुळे **जन्तव:** - जीव **मुह्यन्ति** - मोहाला प्राप्त होतात.

**विवरण** - देहेंद्रियाहून भिन्न, अविक्रिय, चिद्रूप, परिपूर्ण, अखण्डानंदैकरस परमात्मा कोणाचे पाप ग्रहण करीत नाही किंवा कोणाचे पुण्य ग्रहण करीत नाही अज्ञानाच्याद्वारा ज्ञान आवृत्त झाल्यामुळे जीव मोहीत

होतात. परंतु पण्डित आणि अपण्डित सुद्धा स्नान, संध्या, अनुष्ठान, यज्ञ, दानादिपासून उत्पन्न होणारे फल ईश्वराला अर्पण करतात आणि ईश्वर त्याचे ग्रहण करतो परंतु वर सांगितले की ईश्वर कोणाचे काहीच ग्रहण करीत नाही तर याचे समाधान असे आहे की अज्ञानाने ज्ञान आवृत्त झाल्यामुळे विवेकहीन पुरुष मोहीत होतात. मी करतो-करवितो, भोग घेतो-घेववितो अशा प्रकाराने मोहाला प्राप्त होतात.

**व्याकरणम्** - **विभुः** - विभु वि.पु.प्र.ए.व. **कस्यचित्** - किम् सर्व.पु.ष.ए.व. चित् प्रत्ययान्त पु.प्र.ए.व. **पापम्** - पाप न.द्वि.ए.व. **आदत्ते** - आ+दा तृ.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **सुकृतम्** - सु+कृ अ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.द्वि.ए.व. **न एव** - न एव क्रि.वि.अ. **आदत्ते** - आ+दा तृ.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **ज्ञानम्** - ज्ञान न.प्र.ए.व. **अज्ञानेन** - अज्ञान न.तृ.ए.व. **आवृतम्** - आ+वृ प्र.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **तेन** - तत् सर्व.पु.तृ.ए.व. **जन्तवः** - जन्तु पु.प्र.ब.व. **मुह्यन्ति** - मुह् च.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **विभुः** - विविधम्-नानाविधं भवति यस्मादिति विभुः-व्यापकः = अनेकप्रकार उत्पन्न होतात ज्याच्यापासून असा विभु-व्यापक परमात्मा**(वि.) अज्ञानेन** - न ज्ञानमिति अज्ञानं तेनाज्ञानेन = नाही ज्ञान असे अज्ञान त्या अज्ञानाने**(न.त.स.) सुकृतम्** - सुष्ठुम्-शोभनं कृतमिति सुकृतम् = चांगले केले असे सुकृत**(वि.) जन्तवः** - जननशीला इति जन्तवः-जीवाः = उत्पन्न होण्याचा स्वभाव असे जंतु-जीव**(वि.)**

सूर्याच्या दृष्टांताने ज्ञानाचे महत्त्व -

**ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः ।**

**तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥१६॥**

**अन्वयः** - तु, येषाम्, तत्, आत्मनः, अज्ञानम्, ज्ञानेन, नाशितम्, तत्, ज्ञानम्, आदित्यवत्, परम्, प्रकाशय ति ।

**अन्वयार्थः** - ज्ञानाशिवाय दुसऱ्या कोणत्याही उपायाने अज्ञानाचा नाश होत नाही, हे सूचित करण्याकरिता तु हा शब्द आहे **तु** - परंतु **येषाम्** - ज्यांचे **तत्, आत्मनः अज्ञानम्** - ते आत्म्याविषयीचे अज्ञान **ज्ञानेन** - आत्म्याच्या ज्ञानाने **नाशितम्** - नष्ट केले गेले आहे **तेषाम्** - त्यांचे **तत्, ज्ञानम्** - ते ज्ञान **आदित्यवत्** - सूर्याप्रमाणे **परम्** - परमार्थतत्त्वाला **प्रकाशयति** - प्रकाशित करते

**विवरण** - ज्याप्रमाणे उदित झालेला सूर्य अंधकाराला दूर करून पदार्थांना प्रकाशित करतो त्याचप्रमाणे ज्याच्या आत्मविषयक ज्ञानाने बुद्धिनिष्ठ अज्ञान नष्ट झाले आहे त्याचेच ज्ञान परमात्मवस्तुला प्रकाशित करते.

**व्याकरणम्** - **तु** - तु उभ.अ. **येषाम्** - यत् सर्व.पु.ष.ब.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **आत्मनः** - आत्मन् पु.ष.ए.व. **अज्ञानम्** - अज्ञान न.प्र.ए.व. **ज्ञानेन** - ज्ञान न.तृ.ए.व. **नाशितम्** - नश् च.ग.प.प. णिच् कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **तेषाम्** - तत् सर्व.पु.ष.ब.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **ज्ञानम्** - ज्ञान न.प्र.ए.व. **आदित्यवत्** - आदित्य वत् प्रत्ययान्त न.प्र.ए.व. **परम्** - पर वि.पु.द्वि.ए.व. **प्रकाशयति** - प्र+काश् प्र.ग.आ.प.प्रयोजक प.प.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **आदित्यवत्** - आदित्येवेत्यादित्यवत् = सूर्यासारखे-सूर्याप्रमाणे असे**(त.वि.) अज्ञानम्** -

न ज्ञानमिति अज्ञानम् = जे ज्ञान नाही ते अज्ञान**(न.त.स.)**

परमात्म्यामध्ये तद्रूप झालेल्या महात्म्यांना परमगतीची प्राप्ती -

**तद्‌बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः ।**

**गच्छन्त्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥१७॥**

**अन्वयः** - तद्‌बुद्धयः, तदात्मानः, तन्निष्ठाः, तत्परायणाः, ज्ञाननिर्धूतकल्मषाः, (सन्तः), अपुनरावृत्तिम्, गच्छन्ति ।

**अन्वयार्थः** - **तद्‌बुद्धयः** - परब्रह्माच्या ठिकाणी ज्यांची बुद्धी आहे **तदात्मानः** - परब्रह्मामध्ये जे तद्रूप झालेले आहेत **तन्निष्ठाः** - त्या परब्रह्मामध्येच ज्यांची निष्ठा आहे **तत्परायणाः** - ते परमतत्त्व हीच ज्यांची परा गति आहे **ज्ञाननिर्धूतकल्मषाः सन्तः** - आणि ज्ञानाच्या योगाने पाप समूळ नाहीसे झाले आहे असे ते **अपुनरावृत्तिम्** - देहसंबंधरहित मोक्षाला **गच्छन्ति** - प्राप्त होतात.

**विवरण** - सर्व ठिकाणी परब्रह्म वस्तुचे दर्शन करणारे, त्यामध्येच तद्रुप झालेले, त्यामध्येच वृत्तिला स्थिर करणारे असे अद्वितीय आत्मतत्त्वपरायण यति ज्ञानाने संपूर्ण पापाला समाप्त करून देहसंबंधरहित मुक्तिला प्राप्त होतात.

**व्याकरणम्** - **तद्‌बुद्धयः** - तत् सर्व. बुद्धि स्त्री.वि.पु.प्र.ब.व. **तदात्मानः** - तत् सर्व. आत्मन् पु.प्र.ब.व. **तन्निष्ठाः** - तत् सर्व. निष्ठा स्त्री.वि.पु.प्र.ब.व. **तत्परायणाः** - तत् सर्व. परायण वि.पु.प्र.ब.व. **ज्ञाननिर्धूतकल्मषाः** - ज्ञान न. निर्+धू न.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. कल्मष वि.पु.प्र.ब.व. **अपुनरावृत्तिम्** - अ+पुनर्+आवृत्ति स्त्री.द्वि.ए.व. **गच्छन्ति** - गम् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **तद्‌बुद्धयः** - तस्मिन् परमार्थतत्त्वे गता बुद्धिः-ब्रह्मैवेति निश्चयात्मिका मतिर्येषां ते तद्‌बुद्धयः = त्यामध्ये-ज्ञानरूपब्रह्मामध्ये ब्रह्मच अशी निश्चयात्मक बुद्धी ज्यांची ते तद्‌बुद्धिय**(ष.ब.स.)** यद्वा **तद्‌बुद्धयः** - आदित्येन रूपमिव श्रवणादिजन्यज्ञानेन प्रकाशितं सर्ववेदान्तप्रसिद्धं सच्चिदानन्दैकरसं सर्वात्मकं यत्परं ब्रह्म तस्मिन्नेव बुद्धिर्येषां ते तद्‌बुद्धयः = आदित्याने प्रकाशितरूपाच्या समान श्रवणादिजन्यज्ञानाने प्रकाशित सर्ववेदांतामध्ये प्रसिद्ध सच्चिदानंदैकरस सर्वात्मक जे परब्रह्म आहे त्यामध्ये बुद्धी ज्यांची आहे ते तद्‌बुद्धी**(ब.स.)** यद्वा **तद्‌बुद्धयः** - यत् परं ज्ञानं प्रकाशितं तस्मिन् गता बुद्धिर्येषां ते तद्‌बुद्धयः = प्रकाशित झालेले जे परम ज्ञान त्या परमार्थतत्त्वामध्ये ज्यांची बुद्धी प्रवृत्त झाली आहे ते तद्‌बुद्धी**(ब.स.)** यद्वा **तद्‌बुद्धयः** - तस्मिञ्ज्ञानप्रकाशिते परमात्मतत्त्वे सच्चिदानन्दघन एव बाह्यसर्वविषयपरित्यागेन साधनपरिपाकात्पर्यवसिता बुद्धिः-अन्तःकरणवृत्तिः साक्षात्कारलक्षणा येषां ते तद्‌बुद्धयः = ज्ञानाने प्रकाशित त्या सच्चिदानंदघन परमात्मतत्त्वामध्येही बाहेरच्या सर्वविषयाच्या परित्यागाने साधनपरिपाकापासून पर्यवसित-परिनिष्पन्न-स्थित झाली आहे बुद्धी-साक्षात्काररूपा अंतःकरणाची वृत्ति ज्यांची ते तद्‌बुद्धी**(ब.स.)** **तदात्मानः** - तदेव परं ब्रह्म आत्माऽहंप्रत्ययार्थो येषां ते तदात्मानः = तेच परब्रह्म आत्मा अहं प्रत्ययाचा अर्थ आहे ज्यांचा ते तदात्मा **(ष.ब.स.)** **तन्निष्ठाः** - सर्वाणि कर्माणि संन्यस्य ब्रह्मण्येव अवस्थानं येषां ते तन्निष्ठाः = सर्व कर्माचा त्याग करून ब्रह्मामध्येच 'मीच ते' अशारूपाने जे अवस्थित-अवस्थान आहे ज्यांचे ते तन्निष्ठ**(ष.ब.स.)** यद्वा **तन्निष्टाः** - तस्मिन् ब्रह्मण्यात्माकारप्रत्ययकरणमेव निष्ठा-अहंबुद्धेर्नैश्चल्यं येषां ते तन्निष्ठाः = ब्रह्मामध्ये

आत्माकार प्रत्यय करणेही निष्ठा-अहं बुद्धिची निश्चलता आहे ज्यांचे ते तन्निष्ठ**(ष.ब.स.)** यद्वा **तन्निष्ठा:** - तस्मिन्नेव ब्रह्मणि सर्वकर्मानुष्ठान विक्षेप निवृत्त्या निष्ठा-स्थितिर्येषां ते तन्निष्ठा: = सर्वकर्मानुष्ठानरूप विक्षेपाच्या निवृत्तिद्वारा त्या ब्रह्मामध्येही निष्ठा-स्थिति आहे ज्यांची ते तन्निष्ठ**(ष.ब.स.)** **तत्परायणा:** - तदेव परमयनम्-परागतिर्येषां भवति ते तत्परायणा: = तेच परब्रह्म परम अयन-परा गति ज्यांची आहे ते तत्परायण**(ष.ब.स.)** यद्वा **तत्परायणा:** - तदेव परमयनम्-प्राप्तव्यं येषां ते तत्परायणा: = तेच ब्रह्म परम अयन-प्राप्तव्य आहे ज्यांचे ते तत्परायण**(ष.ब.स.)** यद्वा **तत्परायणा:** - तत्सच्चिदानन्दैकरसमद्वितीयं स्वात्मनाऽधिगतं परं ब्रह्मैव बहिरन्त: सदा बुद्धिवृत्तेश्चक्षुषो रूपवत् परं नियतमयनं गतिर्येषां ते तत्परायणा: = सच्चिदानंदैकरस, अद्वितीय आपल्या आत्मरूपाने जाणले जाणारे परब्रह्मच बाहेर आंत सदा बुद्धिवृत्तिच्या चक्षुरूपाच्या समान नियत अयन-गति आहे ज्यांची ते तत्परायण**(ष.ब.स.)** **ज्ञाननिर्धूतकल्मषा:** - ज्ञानेन-स्वरूप साक्षात्कारेण निर्धूत:-नाशित:, कल्मष:-पापादिसंसारकारणदोषो येषां ते ज्ञाननिर्धूतकल्मषा: = ज्ञानाने-स्वरूपसाक्षात्काराने कल्मष-संसाराला कारण होणारा पापादि दोष नाहीसा झालेला आहे ज्यांचा ते ज्ञाननिर्धूतकल्मष**(ष.ब.स.)** यद्वा **ज्ञान निर्धूतकल्मषा:** - ज्ञानेन निर्धूतं समूलमुन्मूलितं पुनर्देह संबन्धकारणं कल्मषम्-पुण्य पापात्मकं कर्म येषां ते ज्ञाननिर्धूतकल्मषा: = ज्ञानाने समूळ उन्मूळित झाले आहे कल्मष-पुन: देह संबंधाला कारणीभूत पुण्य पापरूप कर्म ज्यांचे ते ज्ञाननिर्धूतकल्मष**(ष.ब.स.)** यद्वा **ज्ञाननिर्धूतकल्मषा:** - ज्ञानेनोक्तान्तरङ्गसाधनचतुष्टयानुष्ठित्याप्रतिबद्धतां गतेन निर्धूतं नि:शेषं प्रक्षालितं कल्मषं बौद्धं जगद् ब्रह्मणोर्ब्रह्मात्मनोश्च भेदग्रहलक्षणं येषां ते ज्ञाननिर्धूतकल्मषा: = ज्ञानाने-चार अंतरंग साधनाच्या अनुष्ठानाने अप्रतिबद्धतेला प्राप्त झालेल्या ज्ञानाने निर्धूत-नि:शेषप्रक्षालित कल्मष बौद्ध जगत् आणि ब्रह्माचा त्याच प्रमाणे ब्रह्म आणि आत्म्याचा भेदग्रहणरूप बुद्धिचा कल्मष ज्यांचा निघून गेला आहे ते ज्ञाननिर्धूतकल्मष**(ष.ब.स.)**

ज्ञानी पुरुषाच्या समत्त्वभावाचे कथन आणि त्याचे महत्त्व -

**विद्याविनयसम्पन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।**

**शुनि चैव श्वपाके च पण्डिता: समदर्शिन: ॥१८॥**

**अन्वय:** - विद्याविनयसम्पन्ने, ब्राह्मणे, गवि, हस्तिनि, शुनि, च, एव, श्वपाके, च, पण्डिता:, समदर्शिन: ।

**अन्वयार्थ:** - **विद्याविनयसम्पन्ने ब्राह्मणे** - विद्या व नम्रता यांनी युक्त असलेल्या ब्राह्मणाचे ठिकाणी **गवि** - गायीमध्ये **हस्तिनि** - हत्तीमध्ये **शुनि** - कुत्र्याच्या ठिकाणी **च श्वपाके** - आणि चांडालाच्या ठिकाणी **पण्डिता:** - ज्ञानी पुरुष **समदर्शिन:** - समब्रह्म पहात असतात.

**विवरण** - उंच-नीच-तुच्छ भेदभाव सोडून ज्यांचे सर्वत्र समानरूपाने ब्रह्म पहाण्याचे शील आहे त्यांनाच समदर्शी पण्डित म्हटले जाते.

**व्याकरणम्** - **विद्याविनयसम्पन्ने** - विद्या स्त्री. विनय पु. सम्+पद् च.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.पु.स.ए.व. **ब्राह्मणे** - ब्राह्मण पु.स.ए.व. **गवि** - गो स्त्री.स.ए.व. **हस्तिनि** - हस्त+इनि-हस्तिन् पु.स.ए.व. **शुनि** - श्वन् पु.स.ए.व. **च** - च उभ.अ. **श्वपाके** - श्वपाक पु.स.ए.व. **पण्डिता:** - पण्डित वि.पु.प्र.ब.व. **समदर्शिन:** - सम+दृश्+णिनि-समदर्शिन् वि.पु.प्र.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **विद्याविनयसम्पन्ने** - विद्या-आत्मनो बोधश्च विनय:-उपशमश्च विद्याविनयौ विद्या

विनयाभ्यां सम्पन्न:-युक्त इति विद्याविनयसम्पन्नस्तस्मिन् विद्याविनयसम्पन्ने = विद्या आत्मबोध आणि विनय -गर्वराहित्य विद्याविनय विद्याविनयांनी युक्त असा विद्याविनयसंपन्न त्या विद्याविनयसंपन्नामध्ये **(द्वं.ग.तृ.त.स.)** यद्वा **विद्याविनयसम्पन्ने** - विद्या-सर्ववेदशास्त्राधीतिस्तदर्थज्ञानं वा विनय:-नम्रता विद्या विनयौ विद्याविनयाभ्यां सम्पन्न:-युक्त इति विद्याविनयसम्पन्नस्तस्मिन् विद्याविनयसम्पन्ने = विद्या-सर्ववेदशास्त्राचे अध्ययन अथवा त्यांच्या अर्थाचे ज्ञान विनय-नम्रता विद्याविनय विद्याविनयानी युक्त असा विद्याविनयसंपन्न त्या विद्याविनयसंपन्नामध्ये**(द्वं.ग.तृ.त.स.)** **श्वपाके** - श्वानमपि पचतीति श्वपाक:-चाण्डालस्तस्मिन् श्वपाके = कुत्र्याचे मांस सुद्धा पचवितो असा श्वपाक-चांडाळ त्या चांडाळामध्ये**(उप.स.)** **समदर्शिन:** - सममेकमविक्रियं ब्रह्म सर्वत्र द्रष्टुं शीलं येषां ते पण्डिता:-समदर्शिन: = एक अविक्रिय ब्रह्म सर्व ठिकाणी पहाण्याचा स्वभाव ज्यांचा ते पण्डित-समदर्शी**(ष.ब.स.)**

**इहैव तैर्जित: सर्गो येषां साम्ये स्थितं मन: ।**

**निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिता: ॥१९॥**

**अन्वय:** - येषाम्, मन:, साम्ये, स्थितम्, तै:, इह, एव, सर्ग:, जित:, हि, ब्रह्म, निर्दोषम्, समम्, तस्मात्, ते, ब्रह्मणि, स्थिता: ।

**अन्वयार्थ:** - **येषाम्, मन:** - ज्यांचे मन **साम्ये** - सर्व प्राणिमात्राच्या ठिकाणी समरूपाने **स्थितम्** -स्थित असते **तै:** - त्यांच्याकडून **इह एव** - या देहामध्ये जीवंतपणीच **सर्ग:** - पुढचा जन्म **जित:** - जिंकला आहे **हि** - कारण **ब्रह्म** - सच्चिदानंदघन अक्षर आत्मतत्त्व **निर्दोषम्** - विकाररहित **समम्** - सर्व ठिकाणी सम आहे **तस्मात्** - म्हणून **ते** - ते सर्व **ब्रह्मणि** - ब्रह्माच्या ठिकाणी **स्थिता:** - स्थित असतात.

**विवरण** - सर्वत्र आत्मदर्शन करणारे असे जे यति त्यांनी याच देहात संसाराला जिंकून आणि ज्यांनी आपले अंत:करण समतारूप ब्रह्मामध्ये स्थित केले आहे कारण ते समतारूप ब्रह्म दोषाने रहित आहे म्हणून ते ब्रह्मामध्ये स्थित असतात.

**व्याकरणम्** - **येषाम्** - यत् सर्व.पु.ष.ब.व. **मन:** - मनस् न.प्र.ए.व. **साम्ये** - साम्य न.स.ए.व. **स्थितम्** - स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **तै:** - तत् सर्व.पु.तृ.ब.व. **इह एव** - इह एव क्रि.वि.अ. **सर्ग:** - सृज् च.ग.आ.प./ष.ग.प.प.+घञ्=सर्ग पु.प्र.ए.व. **जित:** - जि प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **हि** - हि क्रि.वि.अ. **ब्रह्म** - ब्रह्मन् न.प्र.ए.व. **निर्दोषम्** - निर्दोष वि.न.प्र.ए.व. **समम्** - सम न.प्र.ए.व. **तस्मात्** - तस्मात् क्रि.वि.अ. **ते** - तत् सर्व.पु.प्र.ब.व. **ब्रह्मणि** - ब्रह्मन् न.स.ए.व. **स्थिता:** - स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **निर्दोषम्** - निर्गत:-निष्क्रान्त:, दोष:-रागद्वेषादिनिखिलसंसारदोषो यस्मात् तन्निर्दोषम् = गेला दोष-रागद्वेषादिक संपूर्ण संसारदोष ज्याच्यापासून ते निर्दोष**(पं.ब.स.)**

ब्रह्मज्ञान्याचे लक्षण -

**न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाप्रियम् ।**

**स्थिरबुद्धिरसम्मूढो ब्रह्मविद् ब्रह्मणि स्थित: ॥२०॥**

**अन्वय:** - प्रियम्, प्राप्य, न, प्रहृष्येत्, च, अप्रियम्, प्राप्य, न, उद्विजेत्, स्थिरबुद्धि:, असम्मूढ:, ब्रह्मवित्, ब्रह्मणि, स्थित: ।

**अन्वयार्थ:** - **प्रियम्** - प्रिय वस्तूला किंवा चांगल्या परिस्थितीला **प्राप्य** - प्राप्त होऊन **न प्रहृष्येत्** - अत्यधिक हर्षित होऊ नये **च** - आणि त्याचप्रमाणे **अप्रियम्** - अप्रिय वस्तूला किंवा वाईट अवस्थेला **प्राप्य** - प्राप्त होऊन **न उद्विजेत्** - दु:खित होऊ नये **स्थिरबुद्धि:** - ज्याची बुद्धी अस्थिर नाही ब्रह्म निर्दोष व सम आहे या विषयामध्ये ज्याला संदेह नाही **असम्मूढ:** - त्यामुळे तो मोहरहित आहे असा **ब्रह्मवित्** - ब्रह्मवेत्ता **ब्रह्मणि** - ब्रह्मामध्ये **स्थित:** - नित्य स्थित असतो.

**विवरण** - ब्रह्मस्वरूपाला प्राप्त झालेला यति इष्ट वस्तु प्राप्त झाली असता हर्षित होत नाही आणि अनिष्ट वस्तु प्राप्त झाली असता दु:खित होत नाही असा जो स्थिरबुद्धी तथा मोहरहित ब्रह्मज्ञानी सदा सर्वदा ब्रह्मामध्ये स्थित राहतो.

**व्याकरणम्** - **प्रियम्** - प्रिय वि.पु.द्वि.ए.व. **प्राप्य** - प्र+आप् पं.ग.प.प.ल्यबन्त अ. **न** - न क्रि.वि.अ. **प्रहृष्येत्** - प्र+हृष् च.ग.प.प.कर्त.विधिलिङ् तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **अप्रियम्** - अ+प्रिय पु.द्वि.ए.व. **प्राप्य** - प्र+आप् पं.ग.प.प.ल्यबन्त अ. **उद्विजेत्** - उद्+विज् स.ग.प.प.कर्त.विधिलिङ् तृ.पु.ए.व. **स्थिरबुद्धि:** - स्थिर वि. बुद्धि स्त्री.वि.पु.प्र.ए.व. **असम्मूढ:** - अ+सम्+मुह् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **ब्रह्मवित्** - ब्रह्मविद् वि.पु.प्र.ए.व. **ब्रह्मणि** - ब्रह्मन् न.स.ए.व. **स्थित:** - स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा. वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **स्थिरबुद्धि:** - स्थिरा-निश्चला बुद्धि:-मतिर्यस्य स स्थिरबुद्धि: = स्थिर-निश्चल बुद्धी-मती ज्याची तो स्थिरबुद्धी**(ष.ब.स.) असंमूढ:** - सम्यक् मूढ इति सम्मूढो न सम्मूढ इत्यसम्मूढ:-निवृत्तमोह: = चांगल्या मोहाने युक्त असा संमूढ, संमूढ नाही असा असंमूढ-मोहरहित**(न.त.स.) ब्रह्मवित्** - ब्रह्म वेत्तीति ब्रह्मविद् = ब्रह्माला जाणणारा.**(वि.)**

ब्रह्मज्ञानी पुरुषाला अक्षय सुखाची प्राप्ती -

**बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विन्दत्यात्मनि यत्सुखम् ।**

**स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षयमश्नुते ॥२१॥**

**अन्वय:** - बाह्यस्पर्शेषु, असक्तात्मा, आत्मनि, यत्, सुखम, (तत्), विन्दति, स:, ब्रह्मयोगयुक्तात्मा, अक्षयम्, सुखम्, अश्नुते ।

**अन्वयार्थ:** - **बाह्यस्पर्शेषु** - शब्दादि बाह्य विषयाच्या ठिकाणी **असक्तात्मा** - ज्याचे मन आसक्त नाही असा तो **आत्मनि** - प्रत्यगात्म्यामध्ये **यत्** - जे **सुखम्** - आत्मसाक्षात्कारजनितसुख असते **(तत्)** - ते **विन्दति** - अनुभवितो **स:** - तो **ब्रह्मयोगयुक्तात्मा** - ब्रह्माच्या ध्यानरूप योगामध्ये अभिन्न भावाने ज्याचा आत्मा-मन स्थित आहे असा तो **अक्षयम्, सुखम्** - अक्षय सुखाचा **अश्नुते** - अनुभवितो-अनुभव घेतो.

**विवरण** - विषयासक्तिरूप आवरण दूर झाल्यामुळे ज्याचे बाह्य विषयामध्ये अंत:करण आसक्त होत नाही असा जो पुरुष आत्मसाक्षात्कार करून आत्मसाक्षात्कारजनित सुखाचा अनुभव घेतो आणि तोच ब्रह्मयोगयुक्तात्मा होऊन अक्षय सुख अनुभवितो.

**व्याकरणम् - बाह्यस्पर्शेषु** - बाह्य वि. स्पर्श पु.स.ब.व. **असक्तात्मा** - अ+सञ्ज् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. आत्मन् पु.प्र.ए.व. **आत्मनि** - आत्मन् पु.स.ए.व. **यत्** - यत् सर्व.न.द्वि.ए.व. **सुखम्** - सुख न.द्वि.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.द्वि.ए.व. **ब्रह्मयोगयुक्तात्मा -** ब्रह्मन् न. योग पु. युज् च.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि. **आत्मन्** - पु.प्र.ए.व. **अक्षयम्** - अक्षय वि.न.द्वि.ए.व. **सुखम्** - सुख न.द्वि.ए.व. **अश्नुते** - अश् पं.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **बाह्यस्पर्शेषु** - मूढैरात्मनो बहिरेव कल्पिता बाह्याः, इन्द्रियैः स्पृश्यन्ते गृह्यन्त इति स्पर्शाः, बाह्याश्च-आत्मनो बहिर्भूताश्च ते स्पर्शाश्च-शुरादिविषयाश्चेति बाह्यस्पर्शास्तेषु बाह्यस्पर्शेषु = मूढ पुरुषाच्याद्वारा आत्म्याहून पृथक् कल्पित पदार्थ बाह्य, इंद्रिय स्पर्श करतात ते स्पर्श, बाह्य-आत्म्याहून बाहेर असलेले ते, स्पर्श-शब्दादि विषय बाह्यस्पर्श त्या बाह्यविषयामध्ये**(द्व.स.) असक्तात्मा -** असक्तः-निस्पृह आत्मा-चित्तं यस्य सोऽसक्तात्मा = आसक्त नसलेला-निस्पृह, आत्मा-चित्त ज्याचे तो असक्तात्मा **(ष.ब.स.) ब्रह्मयोगयुक्तात्मा** - ब्रह्मणि-परमात्मनि योगः-समाधिर्ब्रह्मयोगो ब्रह्मयोगेन युक्त-समाहित इति ब्रह्मयोगयुक्तस्तस्मिन् व्यापृत आत्मा अन्तकरणं यस्य स ब्रह्मयोगयुक्तात्मा = ब्रह्मामध्ये-परमात्म्यामध्ये, योग -समाधि ब्रह्मयोग ब्रह्मयोगाने युक्त-ऐक्य प्राप्त झालेला आत्मा ज्याचा तो ब्रह्मयोगयुक्तात्मा**(ष.ब.स.)** यद्वा **ब्रह्मयोगयुक्तात्मा** - नामरूपग्रहणमकृत्वा चिदाकारवृत्त्या बहिरन्तः सर्वत्र ब्रह्ममात्रदर्शनं ब्रह्मयोगस्तस्मिन् सर्वत्र सदा ब्रह्मदर्शन एव युक्तः-नियमित आत्मा-मनो यस्य स ब्रह्मयोगयुक्तात्मा = नाम आणि रूप ग्रहण न करता केवल चिदाकारवृत्तिने बाहेर आंत सर्वत्र ब्रह्ममात्रदर्शनामध्येही युक्त-नियमित आत्मा-मन ज्याचे तो ब्रह्मयोगयुक्तात्मा**(ष.ब.स.)**

विषयभोगाची निंदा-

**ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते ।**

**आद्यन्तवन्तः कौन्तेय न तेषु रमते बुधः ॥२२॥**

**अन्वयः** - हि, ये, संस्पर्शजाः, भोगाः, ते, दुःखयोनयः, एव, आद्यन्तवन्तः, कौन्तेय, बुधः, तेषु, न, रमते ।

**अन्वयार्थः** - **हि** - कारण **ये** - जे **संस्पर्शजाः** - इंद्रिये व विषय यांच्या संयोगाने उत्पन्न होणारे **भोगाः** - भोग **ते** - ते सर्व **दुःखयोनयः एव** - दुःखालाच कारण आहेत त्याचप्रमाणे ते **आद्यन्तवन्तः** - उत्पत्ति व विनाशशील आहेत **कौन्तेय** - हे अर्जुना! **बुधः** - ज्ञानी पुरुष **तेषु** - त्या विषयसुखामध्ये **न रमते** - रममाण होत नाही.

**विवरण** - इंद्रिय आणि विषयांच्या संयोगापासून उत्पन्न झालेले जे सुख आहे, ते उत्पत्ति-विनाशशील असल्यामुळे दुःखाला कारणीभूत आहे, म्हणून ब्रह्मवेत्ता पुरुष त्यामध्ये रममाण होत नाही.

**व्याकरणम् - हि** - हि क्रि.वि.अ. **ये** - यत् सर्व.पु.प्र.ब.व. **संस्पर्शजाः** - सम्+स्पर्श पु. ज वि.पु.प्र.ब.व. **भोगाः** - भोग पु.प्र.ब.व. **ते** - तत् सर्व.पु.प्र.ब.व. **दुःखयोनयः** - दुःख न. योनि पु.प्र.ब.व. **एव** - एव क्रि. वि.अ. **आद्यन्तवन्तः** - आदि वि. अन्तवत् वि.पु.प्र.ब.व. **कौन्तेय** - कौन्तेय पु.संबो.ए.व. **बुधः** - बुध पु.प्र.ए.व. **तेषु** - तत् सर्व.पु.स.ब.व. **न** - न क्रि.वि.अ. **रमते** - रम् प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **संस्पर्शजाः** - इन्द्रियाणां विषयाणाञ्च संस्पर्शः-परस्परसंयोगस्तस्मादेव जायन्त इति

संस्पर्शजा: = विषय आणि इंद्रियांच्या परस्परसंयोगापासून उत्पन्न झालेले असे संस्पर्शज**(पं.त.स.)** **दु:खयोनय:** - दु:खानां योनय इति दु:खयोनय:-दु:खहेतव: = दु:खाचे कारण असे दु:खयोनिय-दु:खहेतु **(ष.त.स.)** **आद्यन्तवन्त:** - आदि:-उत्पत्तिश्च, अन्त:-विनाशश्च आद्यन्तौ विद्येते येषां ते आद्यन्तवन्त: = आदि-उत्पत्ति नाश-अंत आहे ज्यांचे ते आदि अंतवान**(द्वं.ग.ष.ब.स.)** यद्वा **आद्यन्तवन्त:** - आदिर्विषयेन्द्रिय संयोगोऽन्तश्च तद्वियोग एव तौ आद्यन्तौ विद्येते येषां ते आद्यन्तवन्त: = आरंभ विषयेंद्रियाचा संयोग आणि अंत त्याचा वियोग याप्रमाणे ते दोन आहे ज्यांचे ते आदि अंतवान**(द्वं.ग.ष.ब.स.)**

कामक्रोधाच्या वेगाला जिंकणाऱ्या योग्याची प्रशंसा -

**शक्नोतीहैव य: सोढुं प्राक्शरीरविमोक्षणात् ।**

**कामक्रोधोद्भवं वेगं स युक्त: स सुखी नर: ॥२३॥**

**अन्वय:** - य:, इह, एव, प्राक्शरीरविमोक्षणात्, कामक्रोधोद्भवम्, वेगम्, सोढुम्, शक्नोति, स:, युक्त:, स:, सुखी, नर: ।

**अन्वयार्थ:** - **य:** - जो पुरुष **इह एव** - मरणाच्या अगोदर(जीवंतपणीच) **प्राक्शरीरविमोक्षणात्** - शरीराचा नाश होण्यापूर्वीच **कामक्रोधोद्भवम्, वेगम्** - काम व क्रोध यापासून उत्पन्न होणाऱ्या वेगाला **सोढुम्** - सहन करण्यास **शक्नोति** - समर्थ आहे **स:** - तो **युक्त:** - योगी व **स:** - तो **सुखी** - सुखी **नर:** - पुरुष आहे.

**विवरण** - जो मुमुक्षु जीवंतपणीच शीघ्रातिशीघ्र मोक्षाच्या इच्छेने उत्पन्न तितिक्षाच्याद्वारा कामक्रोधापासून जायमान (उत्पन्न होणाऱ्या) वेगाला सहन करण्यास समर्थ होतो तोच योगी सुखी पुरुष आहे.

**व्याकरणम्** - **य:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **इह एव** - इह एव क्रि.वि.अ. **प्राक्** - प्राक् क्रि.वि.अ. **शरीर विमोक्षणात्** - शरीर न. विमोक्षण न.पं.ए.व. **कामक्रोधोद्भवम्** - काम पु. क्रोध पु. उद्भव पु.द्वि.ए.व. **वेगम्** - वेग पु.द्वि.ए.व. **सोढुम्** - सह् प्र.ग.उ.प.तुमन्त अ. **शक्नोति** - शक् पं.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **युक्त:** - युज् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **सुखी** - सुखिन् पु.प्र.ए.व. **नर:** - नर पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **शरीरविमोक्षणात्** - शरीरस्य-देहस्य विमोक्षणम्-मरणमिति शरीरविमोक्षणं तस्मात् शरीर विमोक्षणात् = शरीराचे-देहाचे विमोक्षण-मरण असे शरीरविमोक्षण त्या शरीरविमोक्षणापासून**(ष.त.स.)** **कामक्रोधोद्भवम्** - काम:-इष्टविषयाभिलाष:, क्रोध:-अभिलाषानाशेन गात्रकम्पनादिरूप इति कामक्रोधौ कामक्रोधाभ्यां सम्यगुद्भव:-उत्पत्तिर्यस्य स कामक्रोधोद्भवस्तं कामक्रोधोद्भवम् = काम-इष्ट विषयाची इच्छा, क्रोध-इच्छेच्या नाशाने गात्र-अवयव कंपनादिक होणे असे कामक्रोध कामक्रोधापासून उत्पत्ती ज्याची तो कामक्रोधोद्भव त्या कामक्रोधोद्भवाला**(ष.ब.स.)** यद्वा **कामक्रोधोद्भवम्** - स्मृते श्रुते दृष्टे प्राप्ते च भोग्यपदार्थे या भोगेच्छा सत्वरा स काम:, अप्रियवस्तुनि स्मृते श्रुते दृष्टे च सति मन:क्षोभको यो द्वेषपरिपाक: स क्रोधस्तौ कामक्रोधौ ताभ्यामुद्भवो यस्य वेगस्य स: कामक्रोधोद्भवस्तं कामक्रोधोद्भवम् = भोग्य पदार्थाचे स्मरण करणे, श्रवण करणे, दर्शन करणे इत्यादि घडले असता शीघ्रमेव भोगवासना उत्पन्न होते त्यास काम असे म्हणतात. अप्रिय वस्तूचे स्मरण, श्रवण, दर्शन केले असता मन क्षुब्ध होवून जाते त्यास क्रोध असे म्हणतात. अशा कामक्रोधापासून उत्पत्ती ज्याची तो कामक्रोधोद्भव त्या कामक्रोधोद्भवाला**(ष.ब.स.)** **सुखी** - सुखमस्यास्ती

ति सुखी = सुख ह्याचे आहे असा सुखी(**अस्त्यर्थे त.वि.**)

ज्ञानी महात्म्याचे लक्षण आणि त्याला निर्वाण ब्रह्माची प्राप्ती -

**योऽन्त:सुखोऽन्तरारामस्तथान्तर्ज्योतिरेव य: ।**

**स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥२४॥**

**अन्वय:** - य:, अन्त:सुख:, अन्तराराम:, तथा, य:, अन्तर्ज्योति:, एव, स:, योगी, ब्रह्मभूत:, (सन्), ब्रह्म निर्वाणम्, अधिगच्छति ।

**अन्वयार्थ:** - **य:** - जो **अन्त:सुख:** - अंतरात्म्यामध्येच सुख मानतो असा व **अन्तराराम:** - आत्म्यामध्येच ज्याचा आराम-करमणूक आहे **तथा** - त्याचप्राणे **य:** - जो **योगी** - आत्मनिष्ठ **ब्रह्मभूत: (सन्)** - ब्रह्मस्वरूप होऊन **ब्रह्मनिर्वाणम्** - ब्रह्मामध्ये निर्वाणाला-परिपूर्ण शांतिला **अधिगच्छति** - प्राप्त होतो.

**विवरण** - ज्याचे सदा आत्म्यामध्ये साधनापेक्षा आत्मीय सुख आहे, आत्म्यामध्येच ज्याचा आराम आहे अर्थात आत्म्यामध्येच रममाण होणारा, आत्माच ज्याची अंतर्ज्योति आहे असा तो ब्रह्मवेत्ता यति स्वयं ब्रह्मभूत होऊन ब्रह्मनिवार्णाला प्राप्त होतो अर्थात ब्रह्मस्वरूपाला प्राप्त होतो.

**व्याकरणम्** - **य:** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **अन्त:सुख:** - अन्तस् क्रि.वि.अ. सुख न.वि.पु.प्र.ए.व. **अन्तराराम:** - अन्तर् क्रि.वि.अ. आराम वि.पु.प्र.ए.व. **तथा** - तथा क्रि.वि.अ. **य:** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **अन्तर्ज्योति:** - अन्तर् अ. ज्योतिष् वि.पु.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **योगी** - योगिन् पु.प्र.ए.व. **ब्रह्मभूत:** - ब्रह्मन् न. भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **सन्** - अस् द्वि.ग.प.प.कर्त.वर्त.धा.वि.पु.प्र.ए.व. **ब्रह्मनिर्वाणम्** - ब्रह्मन् न. निर्वाण न.द्वि.ए.व. **अधिगच्छति** - अ धि+गम् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अन्त:सुख:** - अन्तरे-आत्मन्येव सुखं यस्य स अन्त:सुख: = आत-आत्म्यामध्येच सुख ज्याचे तो अंतसुख(**ष.ब.स.**) **अन्तराराम:** - अन्तरेव-आत्मन्येव आराम:-आक्रीडा यस्य सोऽन्तराराम: = आत-आत्म्यामध्येच आराम-क्रीडा ज्याची तो अंतराराम(**ष.ब.स.**) **अन्तर्ज्योति:** - अन्तरात्मन्येव ज्योति:-प्रकाशो यस्य सोऽन्तर्ज्योति: = आत-आत्म्यामध्ये ज्योति-प्रकाश ज्याची तो अंतर्ज्योति(**ष.ब.स.**) **ब्रह्म निर्वाणम्** - ब्रह्मणि-अन्तरात्मनि मोक्षमिति ब्रह्मनिर्वाणम् = ब्रह्मामध्ये-अंतरात्म्यामध्ये निर्वाण-मुक्ति त्या बह्मनिर्वाणाला(**स.त.स.**)

**लभन्ते ब्रह्मनिर्वाणमृषय: क्षीणकल्मषा: ।**

**छिन्नद्वैधा यतात्मान: सर्वभूतहिते रता: ॥२५॥**

**अन्वय:** - क्षीणकल्मषा:, छिन्नद्वैधा:, यतात्मान:, सर्वभूतहिते, रता:, ऋषय:, ब्रह्मनिर्वाणम्, लभन्ते ।

**अन्वयार्थ:** - **क्षीणकल्मषा:** - ज्यांचे पापदि दोष नष्ट झाले आहेत **छिन्नद्वैधा:** - ज्यांचे सर्व प्रकारचे संशय समाप्त झाले आहेत **यतात्मान:** - ज्यांनी इंद्रियांचे संयमन केले व **सर्वभूतहिते रता:** - सर्व भूतांच्या हितामध्ये रत आहेत असे **ऋषय:** - ज्ञानी पुरुष **ब्रह्मनिर्वाणम्** - ब्रह्मामध्ये निर्वाणाला-शांतिला **लभन्ते** - प्राप्त होतात.

**विवरण** - ब्रह्मयोगनिष्ठेने ज्याचे पाप क्षीण झाले आहे अर्थात मनाचा वासनात्मक कल्मष निघून गेला आहे.

'स्थाणुर्वापुरुषो वा' इत्यादि व्यवहाराच्या संशयाप्रमाणे आत्मा चिद्रूप या अचिद्रूप जर चिद्रूप आहे तर तो नित्य या अनित्य जर नित्य आहे तर तो देहेंद्रियाहून भिन्न या अभिन्न इत्यादि अनेक प्रकारचे संशय ज्याचे नष्ट झाले आहेत आणि ज्यांनी आपल्या मनाला स्वाधीन केले आहे आणि सर्व प्राणिमात्रांच्या हितामध्ये रत आहेत असे जे ऋषि ते विदेह कैवल्याला प्राप्त होतात.

**व्याकरणम्** - **क्षीणकल्मषा:** - क्षि प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. कल्मषम् वि.पु.प्र.ब.व. **छिन्नद्वैधा:** - छिद् स.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि. द्वैध वि.पु.प्र.ब.व. **यतात्मान:** - यम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. आत्मन् पु.प्र.ब.व. **सर्वभूतहिते रता:** - सर्व वि. भूत वि. हित-धा तृ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.स.ए.व. रम् प्र.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **ऋषय:** - ऋष् ष.ग.प.प.+इन्=ऋषि पु.प्र.ब.व. **ब्रह्मनिर्वाणम्** - ब्रह्मन् न. निर्+वा द्वि.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.द्वि.ए.व. **लभन्ते** - लभ् प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **क्षीणकल्मषा:** - क्षीणम्-विवेकज्ञानेन नाशितं कल्मषम्-जन्ममरणबीजभूताज्ञानं येषां ते क्षीणकल्मषा: = क्षीण झालेले-विवेक ज्ञानाने नष्ट झालेले पाप-जन्ममरणाला कारण असणारे अज्ञान ज्यांचे ते क्षीणकल्मष**(ष.ब.स.)** यद्वा **क्षीणकल्मषा:** - क्षीणम्-नि:शेषक्षयं गतं कल्मषम्-मन:कषायरूपं वासनाश द्वितं येषां ते क्षीणकल्मषा: = क्षीण-नि:शेष नष्ट झाले आहे कल्मष-मनाचा कषाय-वासनामय पाप ज्यांचे ते क्षीणकल्मष**(ष.ब.स.)** **छिन्नद्वैधा:** - छिन्नम्-निवृत्तं द्वैधम्-संशयजातं येषां ते छिन्नद्वैधा: = तुटले निवृत्त झाले संशयाचे समुदाय ज्यांचे ते छिन्नद्वैध**(ष.ब.स.)** **यतात्मान:** - यत:-संयत आत्मा-अन्त:करणं येषां ते यतात्मान: = नियमित आत्मा-मन ज्यांचे ते यतात्मा**(ष.ब.स.)** यद्वा **यतात्मान:** - यत:-संयमित:-बाह्यप्रणवतावैमुख्यं आत्मा-मनो येषां ते यतात्मान: = वश केला गेला आहे-जिंकला गेला आहे अथवा बाहेर गमनापासून विमुख केला गेला आहे आत्मा-मन ज्यांचे ते यतात्मा**(ष.ब.स.)** **सर्वभूतहिते रता:** - सर्वा णिच तानि भूतानिचेति सर्वभूतानि सर्वेषाम्-भूतानां हिते-आनुकूल्ये रता:-अहिंसका इति सर्वभूतहिते रता: = सर्व आणि ती भूते अशी सर्वभूते सर्वभूतांच्या हितामध्ये असणारे अथवा कोणाचीही हिंसा न करणारे असे सर्वभूतहिते रत**(कर्म.ग.ष.ग.स.त.स.)**

**कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ।**

**अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥२६॥**

**अन्वय:** - कामक्रोधवियुक्तानाम्, यतचेतसाम्, विदितात्मनाम्, यतीनाम्, ब्रह्मनिर्वाणम्, अभित:, वर्तते ।

**अन्वयार्थ:** - **कामक्रोधवियुक्तानाम्** - काम व क्रोध यांनी विरहित असलेल्या **यतचेतसाम्** - मन ताब्यात ठेवणाऱ्या **विदितात्मनाम्** - आत्म्याला साक्षात जाणणाऱ्या **यतीनाम्** - संन्याशांचा **ब्रह्मनिर्वाणम्** - मोक्ष **अ भित:** - वर्तमान देहात व मेल्यावरही **वर्तते** - असतो.

**विवरण** - काम आणि क्रोध हे दोन्ही श्रवण, मनन आणि समाधिच्या विनाशाला कारण आहेत अर्थात त्या दोन्हीने युक्त असणाऱ्या पुरुषाला ज्ञान होत नाही आणि ज्ञान न झाल्यामुळे मोक्ष होत नाही, म्हणून काम आ णि क्रोधाने रहित आणि चित्ताचे संयमन करून आत्म्याला साक्षात जाणणारे असे जे मुमुक्षु त्यांचा मोक्ष वर्तमान देहात आणि मेल्यावरही असतो म्हणजेच जीवंतपणी जीवन्मुक्ती आणि मरणानंतर विदेहमुक्ती असते.

**व्याकरणम्** - **कामक्रोधवियुक्तानाम्** - काम पु. क्रोध पु. वि+युज् प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.ष.ब.व. **यतचेतसाम्** - यम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. चेतस् न.वि.पु.ष.ब.व. **विदितात्मनाम्** - विद् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. आत्मन् पु.ष.ब.व. **यतीनाम्** - यति पु.ष.ब.व. **ब्रह्मनिर्वाणम्** - ब्रह्मन् न. निर्+वा द्वि.ग.प.प.भावे.भू.धा.वि.न.द्वि.ए.व. **अभितः** - अभितस् क्रि.वि.अ. **वर्तते** - वृत् प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **कामक्रोधवियुक्तानाम्** - कामश्च क्रोधश्च कामक्रोधौ कामक्रोधाभ्यां वियुक्ताः-विधुराः कामक्रोधवियुक्तास्तेषां कामक्रोधवियुक्तानाम् = काम आणि क्रोध कामक्रोध कामक्रोधांनी रहित कामक्रोध वियुक्त त्या कामक्रोधवियुक्तांचे**(द्वं.ग.तृ.त.स.)** **यतचेतसाम्** - सर्वात्मनि-प्रत्यगभिन्ने ब्रह्मण्येव, यतम्-नियमितं चेतः-अन्तःकरणं येषां ते यतचेतसस्तेषां यतचेतसाम् = सर्वात्म्यामध्ये-प्रत्यगभिन्नब्रह्मामध्येच नियमित अंतःकरण ज्यांचे ते यतचेतस त्या यतचेतसांचे**(ष.ब.स.)** **विदितात्मनाम्** - विदितः-साक्षात्कृत आत्मा-कूटस्थो यैस्ते विदितात्मनस्तेषां विदितात्मनाम् = जाणला-साक्षात केला आत्मा कूटस्थ ज्यांनी ते विदितात्मान त्या विदितात्म्यांचे किंवा त्या आत्म्याल्या साक्षात जाणणाऱ्यांचे**(तृ.ब.स.)** यद्वा **विदितात्मनाम्** - अयमेवाऽहमिति साक्षात्स्वात्मत्वेन विदितः सर्वात्मक आत्मा-निर्विशेषः परमात्मा यैस्ते विदितात्मनस्तेषां विदितात्मनाम् = हा मी आहे या प्रकारे आपल्या आत्मरूपाने सर्वात्मक आत्मा-निर्विशेष परमात्मा ज्यांनी जाणला ते विदितात्मान त्या विदितात्म्यांचे**(तृ.ब.स.)**

संक्षेपाने फलासहित ध्यानयोगाचे कथन -

**स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवान्तरे भ्रुवोः ।**

**प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यन्तरचारिणौ ॥२७॥**

**यतेन्द्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः ।**

**विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥२८॥**

**अन्वयः** - यः, मुनिः, बाह्यान्, स्पर्शान्, बहिः, एव, कृत्वा, च, चक्षुः, भ्रुवोः, अन्तरे, कृत्वा, नासाभ्यन्तरचारिणौ, प्राणापानौ, समौ, कृत्वा, यतेन्द्रियमनोबुद्धिः, मोक्षपरायणः, विगतेच्छाभयक्रोधः, सः, सदा, मुक्तः, एव ।

**अन्वयार्थः** - **यः मुनिः** - जो मुनि **बाह्यान् स्पर्शान्** - शब्दस्पर्शादि बाह्य विषयभोगांना **बहिः एव कृत्वा** - बाहेरच करून **च** - आणि **चक्षुः** - चक्षुरिंद्रिय **भ्रुवोः अन्तरे कृत्वा** - दोन्ही भुवयांच्या मध्यभागी स्थिर करून **नासाभ्यन्तरचारिणौ** - नासिका व कंठादि अभ्यंतर भागामध्ये संचार करणारे **प्राणापानौ** - प्राण आणि अपान ह्या वायुंना **समौ** - सम **कृत्वा** - करून **यतेन्द्रियमनोबुद्धिः** - ज्याने इंद्रिये मन आणि बुद्धी यांचे नियमन केले आहे असा **मोक्षपरायणः** - जो मोक्ष परायण झाला आहे **विगतेच्छाभयक्रोधः** - इच्छा भय व क्रोध ज्याच्यापासून निघून गेले आहेत **सः** - असा तो **सदा** - नेहमी **मुक्तः एव** - मुक्तच आहे.

**विवरण** - शब्दादि विषयाला बाहेर करून अर्थात मनाने कोणत्याही विषयांचे चिंतन न करता व इकडे तिकडे न पहाता चक्षुरिंद्रिय दोन्ही भुवयाच्या मध्यभागी स्थिर करून नासिकेच्या आभ्यंतर संचार करणारे प्राण आणि अपान या वायुंना सम करून ज्याने इंद्रिय, मन आणि बुद्धी यांना स्वाधीन केले आहे आणि मोक्ष

साधानामध्ये निष्ठायुक्त आहे. इच्छा, भय आणि क्रोध ज्याच्यापासून निघून गेले आहे असा तो यति सदा मुक्तच आहे.

**व्याकरणम् - यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **मुनिः** - मुनि पु.प्र.ए.व. **बाह्यान्** - बाह्य वि.पु.द्वि.ब.व. **स्पर्शान्** - स्पर्श पु.द्वि.ब.व. **बहिः** - बहिस् क्रि.वि.अ. **एव** - एव क्रि.वि.अ. **कृत्वा** - कृ अ.ग.उ.प.त्वान्त अ. **च** - च उभ.अ. **चक्षुः** - चक्षुस् न.द्वि.ए.व. **भ्रुवोः** - भ्रू स्त्री.ष.द्वि.व. **अन्तरे** - अन्तर वि.न.स.ए.व. **कृत्वा** - कृ अ.ग.उ.प.त्वान्त अ. **नासाभ्यान्तरचारिणौ** - नासा स्त्री. अभ्यंतर वि. चारिन् वि.पु.द्वि.द्वि.व. **प्राणापानौ** - प्राण पु. अपान पु.द्वि.द्वि.व. **समौ** - सम वि.पु.द्वि.द्वि.व. **कृत्वा** - कृ अ.ग.उ.प.त्वान्त अ. **यतेन्द्रियमनोबुद्धिः** - यम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. इंद्रिय न. मनस् न. बुद्धि स्त्री.वि.पु.प्र.ए.व. **मोक्षपरायणः** - मोक्ष पु. परायण वि.पु.प्र.ए.व. **विगतेच्छाभयक्रोधः** - वि+गम् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. इच्छा स्त्री. भय न. क्रोध पु.प्र.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **सदा** - सदा क्रि.वि.अ. **मुक्तः** - मुच् ष.ग.उ.प.कर्म.भू.धा. वि.पु.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ.

**समासविग्रहार्थाः - बहिर्बाह्यान्** - श्रोत्रादिद्वारेण अन्तर्बुद्धौ प्रवेशिताः शब्दादयो विषयास्तान् अचिन्तयतः बाह्या बहिरेव कृता भवन्ति ते बहिर्बाह्यास्तान् बहिर्बाह्यान् = श्रोत्रादि इंद्रियांच्या द्वारा आत बुद्धिमध्ये शब्दादी विषय शिरलेले असतात. त्यांचे चिंतन न करणाऱ्या पुरुषाचे ते विषय बाह्यच होतात म्ह. ज्यांना बाहेरच ठेविले आहे, असे होतात ते बहिर्बाह्य त्यांना बहिर्बाह्यांना**(कर्म.स.) नासाभ्यन्तरचारिणौ** - नासयोः-नासिकाया अभ्यन्तरे-मध्यभागो नासाभ्यन्तरा नासाभ्यन्तरे चरतः सञ्चारं कुर्वतस्तौ नासाभ्यन्तरचारिणौ = नासिकेच्या आत मध्यभागी नासाभ्यंतर नासाभ्यंतरात फिरणारे संचार करणारे ते नासाभ्यंतरचारीण **(ष.त.ग.स.त.स.) यतेन्द्रियमनोबुद्धिः** - इन्द्रियानि च मनश्च बुद्धिश्चेति इन्द्रियमनोबुद्धयो यताः-संयताः-स्वस्वविषयवैमुख्यं गमिता इन्द्रियमनोबुद्धयो यस्य स यतेन्द्रियमनोबुद्धिः = इंद्रिय, मन आणि बुद्धी असे इंद्रियमनबुद्धी नियमित केले-आपआपल्या विषयापासून विमुख केले इंद्रियमनबुद्धी ज्याचे तो यतेंद्रियमनोबुद्धी **(ष.ब.स.) मुनिः** - मननं वस्तुध्यानं नियमेन तदेव करोतीति मुनिः = मनन-वस्तुध्यानालाही नियमाने करतो असा मुनि**(त.वि.)** यद्वा **मुनिः** - मननात् मुनिः = मननामुळे मुनि**(त.वि.) विगतेच्छाभयक्रोधः** - इच्छा च-कामश्च भयञ्च-भीतिश्च क्रोधश्च-द्वेषश्चेति इच्छाभयक्रोधा विशिष्यबुद्धिं परित्यज्य विगताः-निवृत्ता इच्छाभयक्रोधा यस्मात् स विगतेच्छाभयक्रोधः = इच्छा-काम, भय-भीति, क्रोध-द्वेष इच्छाभयक्रोध विशेष रूपाने बुद्धीचा त्याग करून गेले-निवृत्त झाले इच्छाभयक्रोध ज्याच्यापासून तो विगतेच्छाभयक्रोध**(प.ब.स.) मोक्षपरायणः** - मोक्षः-मुक्तिः श्रेष्ठमयनं स्थानं यस्य स मोक्षपरायणः = मोक्ष-मुक्ती श्रेष्ठ स्थान ज्याचे तो मोक्षपरायण**(ष.ब.स.)** यद्वा **मोक्षपरायणः** - मोक्ष एव परमयनम्-परागतिर्यस्य सोऽयं मोक्षपरायणः = मोक्षच आहे परम स्थान श्रेष्ठ गति ज्याची असा तो मोक्षपरायण**(ष.ब.स.)**

**भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् ।**

**सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति ॥२९॥**

**अन्वयः -** यज्ञतपसाम्, भोक्तारम्, सर्वलोकमहेश्वरम्, सर्वभूतानाम्, सुहृदम्, माम्, ज्ञात्वा, शान्तिम्, ऋच्छति ।

**अन्वयार्थः - यज्ञतपसाम्** - यज्ञ व तप यांच्या **भोक्तारम्** - भोक्त्याला **सर्वलोकमहेश्वरम्** - सर्व लोकांच्या

महेश्वराला **सर्वभूतानाम् सुहृदम्** - सर्व भूतांच्या अपेक्षारहित उपकार करणाऱ्या **माम्** - अशा मला **ज्ञात्वा** - जाणून **शान्तिम्** - सर्व संसारनिवृत्तिरूप मोक्षाला **ऋच्छति** - प्राप्त होतो.

**विवरण** - साधनसंपन्न निदिध्यासन करणारा यति श्रौत, स्मार्त यज्ञाचा तथा सत्य, श्रुत, शांति तपांचा त्याच प्रमाणे अन्य कर्माचे जे फल आहे त्याचा भोक्ता संपूर्ण लोकाचा महान ईश्वर तथा संपूर्ण प्राणिमात्रांचा सुहृद मला जाणून शांतिला प्राप्त होतो.

**व्याकरणम्** - **यज्ञतपसाम्** - यज्ञ पु. तपस् न.ष.ब.व. **भोक्तारम्** - भुज्+तृच्-भोक्तृ वि.पु.द्वि.ए.व. **सर्वलोकमहेश्वरम्** - सर्व वि. लोक पु. महेश्वर पु.द्वि.ए.व. **सर्वभूतानाम्** - सर्व वि. भूत-भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.ष.ब.व. **सुहृदम्** - सुहृद् वि.पु.द्वि.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **ज्ञात्वा** - ज्ञा न.ग.उ.प.त्वान्त अ. **शान्तिम्** - शांति स्त्री.द्वि.ए.व. **ऋच्छति** - ऋच्छ् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **सर्वलोकमहेश्वरम्** - महान्-महत्तमः स्वसन्निधिमात्रेण सर्वमिष्टे चेष्टयतीतीश्वरो महांश्चासावीश्वरश्च महेश्वरः लोक्यत इति लोकाः सर्वे च ते लोकाश्च सर्वलोकाः सर्वलोकानाम्-भूतभौतिकानां महेश्वर इति सर्वलोकमहेश्वरस्तं सर्वलोकमहेश्वरम् = आपल्या सन्निधिमात्रे सर्वाचे गमनागमन करवितो तो ईश्वर मोठा आणि हा ईश्वर महेश्वर जे पाहिले जातात ते लोक सर्व आणि ते लोक सर्वलोक लोकांचा-भूतभौतिक लोकांचा महेश्वर त्या सर्वलोकमहेश्वराला**(कर्म.ग.ष.त.स.)** **यज्ञतपसाम्** - यज्ञाश्च-अश्वमेधादयश्च, तपांसिच-अनुष्ठानानिचेति यज्ञतपांसि तेषां यज्ञतपसाम् = यज्ञ-अश्वमेधादिक, तपे-अनुष्ठानादी यज्ञतपे असे यज्ञतप त्या यज्ञतपांचा**(द्वं.स.)** **भोक्तारम्** - भुङ्क्त इति भोक्ता तम् भोक्तारम् = भोगतो असा भोक्ता त्या भोक्त्याला**(त. वि.)**

**ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे**

**श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मसन्न्यासयोगो नाम पञ्चमोऽध्यायः ॥५॥**

**-: अध्याय पाचवा समाप्त :-**

**ॐ श्रीपरमात्मने नम:**

**अथ षष्ठोऽध्याय:**

नुकत्याच संपलेल्या पाचव्या अध्यायाच्या शेवटी सम्यग् दर्शनाचे म्ह. आत्म साक्षात्काराचे अंतरंग साधन असा तो ध्यानयोग त्याचे 'स्पर्शान् कृत्वा' इत्यादि श्लोकाच्या विवरण स्थानी असलेल्या अशा ह्या सहाव्या अध्यायाचा आरंभ केला जात आहे. त्यामुळे पाचवा व सहावा या अध्यायाचा हेतु-हेतुमद्भाव संबंध आहे. पाचव्या अध्यायाच्या शेवटी जे सांगितले आहे त्याचाच विस्तार सहाव्या अध्यायात केला आहे म्हणून सहाव्या अध्यायाचा प्रारंभ केला जात आहे.

निष्काम कर्मयोग्याची प्रशंसा -

**अनाश्रित: कर्मफलं कार्यं कर्म करोति य: ।**

**स सन्न्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रिय: ॥१॥**

**अन्वय: -** कर्मफलम्, अनाश्रित:, य:, कार्यम्, कर्म, करोति, स:, सन्न्यासी, योगी, च, निरग्नि:, न, च, अ क्रिय:, न ।

**अन्वयार्थ: - कर्मफलम्, अनाश्रित: -** कर्मफलाचा आश्रय न करता **य:** - जो गृहस्थ पुरुष **कार्यम्, कर्म** - कर्तव्यकर्म म्ह. नित्यनैमित्तिक अग्निहोत्रादि कर्म **करोति** - करतो **स:** - तो **सन्न्यासी** - संन्यासी आहे **योगी च** - व योगी आहे केवल **निरग्नि: न** - अग्निचा त्याग करतो तो संन्यासी नव्हे **च अक्रिय: न** - व क्रियांचा त्याग करतो तो योगी नव्हे.

**विवरण** - कर्मफलाची इच्छा न करता, काम्यकर्म न सोडता जो ब्राम्हण कर्तव्यरूप नित्य नैमित्तिक अ ग्निहोत्रादिरूप कर्म नियमाने करतो तो संन्यासी तसेच योगी आहे. किंतु अग्निचा त्याग तसेच क्रियांचा त्याग करणारा संन्यासी तसेच योगी होऊ शकत नाही.

**व्याकरणम्** - **कर्मफलम्** - कर्मन् न. फल न.द्वि.ए.व. **अनाश्रित:** - अन्+आ+श्रि प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा. वि.पु.प्र.ए.व. **य:** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **कार्यम्** - कृ अ.ग.उ.प.कर्म.विध्यर्थ धा.वि.न.द्वि.ए.व. **कर्म** - कर्मन् न.प्र.ए.व. **करोति** - कृ अ.ग.प.प.कर्त.वर्त.तृ.पु.ए.व. **स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **सन्न्यासी** - सन्न्या सिन् पु.प्र.ए.व. **च** - च अ. **योगी** - योगिन् पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **निरग्नि:** - निर्+अग्नि पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अक्रिय:** - अ+क्रिय वि.पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ.

**समासविग्रहार्था: - कर्मफलम्** - कर्मणां फलम्-स्त्रीपुत्रधनपशुस्वर्गादिलक्षणमिति कर्मफलम् = कर्माचे फल-स्त्री,पुत्र,धन,पशु,स्वर्गादिकलक्षण असे कर्मफल(**ष.त.स.**) **निरग्नि:** - निर्गतोऽग्निर्यस्मात् स निरग्नि: = गेला अग्नी ज्यापासून तो निरग्नी(**पं.त.स.**) **अक्रिय:** - न विद्यते क्रिया-कर्मानुष्ठानं यस्य सोऽक्रिय: = नाही क्रिया-कर्मानुष्ठान ज्याचे तो अक्रिय(**न.ब.स.**) **अनाश्रित: -** न आश्रितो नापेक्षमाण इत्यनाश्रित: = नाही आश्रित-नाही अपेक्षित असा अनाश्रित(**न.त.स.**) **कार्यम्** - कर्तुम्-विधातुं योग्यमिति कार्यम् = करण्यास विधान करण्यास योग्य असे कार्य(**कृ.वि.**) **सन्न्यासी** - सम्यक् प्रकारेण न्यास:-परित्यागो यस्यास्ति स सन्न्यासी =

चांगल्या प्रकारे त्याग ज्याचा आहे तो संन्यासी**(ब.स.) योगी** - योग:-चित्तसमाधानं यस्यास्ति स योगी = **(ब.स.)**

**यं सन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पाण्डव ।**

**न ह्यसन्यस्तसङ्कल्पो योगी भवति कश्चन ॥२॥**

**अन्वय: -** पाण्डव, यम्, सन्न्यासम्, इति, प्राहु:, तम्, योगम्, विद्धि, हि, असन्न्यस्तसङ्कल्प:, कश्चन, योगी, न, भवति ।

**अन्वयार्थ:** - **पाण्डव** - हे अर्जुना! पण्डित लोक **यम्** - ज्याला **सन्न्यासम्, इति** - संन्यास असे **प्राहु:** - म्हणतात **तम्** - त्याला तू **योगम्** - योग **विद्धि** - जाण **हि** - कारण **असन्न्यस्तसङ्कल्प:** - ज्याने संकल्पाचा त्याग केला नाही असा **कश्चन -** कोणी पुरुष **योगी** - योगी **न भवति** - होत नाही-होऊ शकत नाही.

**विवरण** - हे अर्जुना! पण्डित लोक ज्याला संन्यास म्हणतात त्यालाच तू योग जाण अर्थात निष्काम कर्मापासून चित्त शुद्ध होऊन ज्ञान होते. ज्ञानाचे उत्पादक असल्यामुळे संन्यासाचे कर्म अंग आहे. अंग आणि अंगी या दोन्हीचा एकाच कार्याबरोबर संबंध असल्यामुळे दोन्ही एका फलाला देणारे असतात, म्हणून त्यांना तू अभेदरूपाने पहा कारण संकल्पाचा त्याग न करणारा कोणीही पुरुष योगी होऊ शकत नाही.

**व्याकरणम् - पाण्डव** - पाण्डव पु.संबो.ए.व. **यम्** - यत् सर्व.पु.द्वि.ए.व. **सन्न्यासम्** - संन्यास पु.द्वि.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **प्राहु:** - प्र+ब्रू द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ब.व **तम्** - तत् सर्व.पु.द्वि.ए.व. **योगम्** - योग पु.द्वि.ए.व. **विद्धि** - विद् द्वि.ग.प.प.कर्त.लोट् आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **हि** - हि क्रि.वि.अ. **असन्न्यस्तसङ्कल्प:** - अ+सम्+नि+अस् च.ग.प.प.कर्म.भू.धा.सा.वि. सङ्कल्प पु.प्र.ए.व. **कश्चन** - कश्चन क्रि.वि.अ. **योगी** - योगिन् पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **भवति** - भू प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **सन्न्यासम्** - सम्यक्-उत्तमप्रकारेण न्यास इति सन्न्यासस्तं सन्न्यासम् = उत्तम प्रकारे त्याग असा संन्यास त्या संन्यासाला**(त.वि.) असन्न्यस्तसङ्कल्प:** - असन्न्यस्त:-अपरित्यक्त: फलविषय: सङ्कल्प:-अभिसन्धिर्येन सोऽसन्न्यस्तसङ्कल्प: = ज्याने फलाविषयीचा संकल्प-आशय टाकलेला नाही असा तो असंन्यस्तसंकल्प**(न.त.स.)** यद्वा **असन्न्यस्तसङ्कल्प:** - सन्न्यस्त:-मोक्षैककामनया सम्यक् परित्यक्त: सङ्कल्प: कर्मफलविषयकं मननं येन मुमुक्षुणा च सन्न्यस्तसङ्कल्पस्तद्विलक्षणोऽसन्न्यस्तसङ्कल्प: = संन्यस्त-एकमात्र मोक्षाच्या कामनेने एकदम परित्याग केला संकल्प-फलविषयक विचार ज्या मुमुक्षुने तो संन्यस्तसंकल्प त्याच्या विपरीत लक्षणवाला असा तो असंन्यस्तसंकल्प**(ब.ग.न.त.स.)**

**आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते ।**

**योगारूढस्य तस्यैव शम: कारणमुच्यते ॥३॥**

**अन्वय:** - योगम्, आरुरुक्षो:, मुने:, कर्म, कारणम्, उच्यते, तस्य, एव, योगारूढस्य, शम:, कारणम्, उच्यते ।

**अन्वयार्थ:** - **योगम्** - ध्यानयोगाला **आरुरुक्षो: मुने:** - प्राप्त करण्याची इच्छा करणाऱ्या मुमुक्षु गृहस्थाला **कर्म** - निष्काम कर्मानुष्ठान हे **कारणम्** - साधन **उच्यते** - सांगितले जाते **तस्य एव योगारूढस्य** - परंतु तोच

मुनी निष्काम कर्माभ्यासाने योगारूढ झाला असता त्याला **शमः** - उपशम-सर्व कर्मापासून निवृत्त होणे हे **कारणम्** - साधन **उच्यते** - सांगितले जाते.

**विवरण** - ज्ञान योगाला प्राप्त करण्याची इच्छा करणाऱ्या यतिकरिता ज्ञान योगाच्या प्राप्तिकरिता कर्म हे साधन आहे आणि ज्ञान योगावर आरूढ होणाऱ्या मुनिकरिता योगावर आरूढ होण्याकरिता सर्व कर्मापासून उपरम होणे हे साधन आहे अर्थात् शम हे साधन सांगितले आहे.

**व्याकरणम्** - **योगम्** - योग पु.द्वि.ए.व. **आरुरुक्षोः** - आ+रुह्+सन्+उ-आरुरुक्षु पु.ष.ए.व. **मुनेः** - मुनि पु.ष.ए.व. **कर्म** - कर्मन् न.प्र.ए.व. **कारणम्** - कृ अ.ग.उ.प.+णिच्+ल्युट्=कारण न.प्र.ए.व. **उच्यते** - वच् द्वि.ग.प.प.कर्म लट् वर्त.तृ.पु.ए.व. **तस्य** - तत् सर्व.पु.ष.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **योगारूढस्य** - योग पु. आ+रुह् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.सा.वि.पु.ष.ए.व. **शमः** - शम पु.प्र.ए.व. **कारणम्** - कारण न.प्र.ए.व. **उच्यते** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **योगारूढस्य** - योगे-ध्यानयोगे आरूढ इति योगारूढस्तस्य योगारूढस्य = योगामध्ये-ध्यानयोगामध्ये आरूढ-सिद्ध झालेला असा योगारूढ त्या योगारूढाचे**(स.त.स.)** **मुनेः** - मननशीलो मुनिस्तस्य मुनेः = मनन करण्याचा स्वभाव असणारा मुनी त्या मुनीचे**(शीलार्थे त.वि.)** **आरुरुक्षोः** - आरोढुमिच्छतीत्यारुरुक्षुस्तस्य आरुरुक्षोः = आरुढ होण्याची इच्छा करतो असा आरुरुक्षु त्या आरुरुक्षुची**(इच्छार्थे सन्नन्त वि.)**

**यदा हि नेन्द्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते ।**

**सर्वसङ्कल्पसन्न्यासी योगारूढस्तदोच्यते ॥४॥**

**अन्वयः** - यदा, हि, इन्द्रियार्थेषु, न, अनुषज्जते, कर्मसु, (न अनुषज्जते), सर्वसङ्कल्पसन्न्यासी, तदा, योगारूढः, उच्यते ।

**अन्वयार्थः** - **यदा हि** - ज्यावेळी योगी **इन्द्रियार्थेषु** - इन्द्रियांच्या भोगामध्ये **न अनुषज्जते** = आसक्त होत नाही तसेच **कर्मसु** - नित्य नैमित्तिकादि स्नानशौचादि कर्मामध्ये **(न अनुषज्जते)** - आसक्त होत नाही असा तो **सर्वसङ्कल्पसन्न्यासी** - सर्व संकल्पाचा संन्यास करतो **तदा** - त्यावेळी **योगारूढः** - त्याला योगारूढ **उच्यते** - म्हटला जातो.

**विवरण** - ज्या अवस्थेमध्ये स्थित मुनि विषयांच्या भोगामध्ये आणि कर्मामध्ये आसक्त होत नाही त्या अवस्थेमध्ये संपूर्ण संकल्पाचा त्यागी मुनि योगारूढ म्हटला जातो.

**व्याकरणम्** - **यदा** - यदा क्रि.वि.अ. **हि** - हि क्रि.वि.अ. **इन्द्रियार्थेषु** - इन्द्रिय न. अर्थ पु.स.ब.व. **न** - न क्रि.वि.अ. **अनुषज्जते** - अनु+सस्ज् प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **कर्मसु** - कर्मन् न.स.ब.व. **सर्वसङ्कल्पसन्न्यासी** - सर्व वि. सङ्कल्प पु. सन्न्यासिन् पु.प्र.ए.व. **तदा** - तदा क्रि.वि.अ. **योगारूढः** - योग पु. आ+रुह् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.प्र.ए.व. **उच्यते** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **इन्द्रियार्थेषु** - इन्द्रियाणां अर्थाः तेषु इन्द्रियार्थेषु = इंद्रियांचे अर्थ त्या इंद्रियांच्या अर्थामध्ये**(वि.)** **सर्वसङ्कल्पसन्न्यासी** - सर्वे च ते सङ्कल्पाश्च सर्वसङ्कल्पाः सर्वसङ्कल्पान् सन्न्यसितुम्-त्यक्तुम् शीलम्-स्वभावो यस्य स सर्वसङ्कल्पसन्न्यासी = सर्व आणि ते संकल्प सर्वसंकल्प सर्वसंकल्पांना त्याग

करण्याचा शील-स्वभाव ज्याचा तो सर्वसंकल्पसंन्यासी**(क.ग.शीलार्थे ब.स.)** यद्वा **सर्वसङ्कल्पसन्यासी** - सङ्कल्पाः-द्रव्यगुणकर्मादिगोचराः समीचीनत्त्वबुद्धयः सर्वविषयाः सङ्कल्पाः सङ्कल्पास्तान् सन्न्यसितुं शीलमस्यास्तीति सर्वसङ्कल्पसन्न्यासी = संकल्प-द्रव्य, गुण, कर्मादिला विषय करणारी समीचीनत्त्व बुद्धी-सर्व विषयांचा संकल्प सर्वसंकल्प त्यांना त्यागण्याचा स्वभाव आहे ज्याचा तो सर्वसंकल्पसंन्यासी**(शीलार्थे त.वि.)** **योगारूढः** - योगे-समाधौ आरुढ इति योगारूढः = योगामध्ये-समाधिमध्ये स्थित योगारूढ **(स.त.स.)**

**उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ।**

**आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः ॥५॥**

**अन्वयः** - आत्मना, आत्मानम्, उद्धरेत्, आत्मानम्, न, अवसादयेत्, हि, आत्मा, एव, आत्मनः, बन्धुः, आत्मा, एव, आत्मनः, रिपुः ।

**अन्वयार्थः** - **आत्मना** - आत्म्याने श्रवणादिजनित आत्मज्ञानाने युक्त **आत्मानम्** - आत्म्याला-आपल्याला **उद्धरेत्** - उद्धरावे-संसार सागरातून वर काढावे **आत्मानम्** - आत्म्याला-आपल्याला **न अवसादयेत्** - अध-ोगतीला नेऊ नये **हि** - कारण **आत्मा एव** - आपण स्वतःच **आत्मनः** - आपल्या आत्म्याचा **बन्धुः** - बंधु आहो व **आत्मा एव** - आपणच **आत्मनः** - आपल्या आत्म्याचा **रिपुः** - शत्रू आहो.

**विवरण** - श्रद्धा भक्तिने आराधित ईश्वरप्रसादाने युक्त सदसद्विवेक, वैराग्य, शमदमादि साधनाने संपन्न श्रवणा दिसाधनाच्याद्वारा उत्पन्न आत्मज्ञानाने युक्त साधकाने आपणच आपला उद्धार करावा. केव्हाही उपर्युक्त सां गितलेल्या साधनाला बहिर्मुख होऊन आपणच आपला विनाश करून घेऊ नये. कारण की अशा प्रकारचे कार्य करणारा आपणच आपला मित्र आणि आपणच आपला शत्रू आहे.

**व्याकरणम्** - **आत्मना** - आत्मन् पु.तृ.ए.व. **आत्मानम्** - आत्मन् पु.द्वि.ए.व. **उद्धरेत्** - उद्+हृ प्र.ग.प.प.कर्त.विधिलिङ् तृ.पु.ए.व. **आत्मानम्** - आत्मन् पु.द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अवसादयेत्** - अव+सद् प्र.ग./ष.ग.प.प.प्रयोजक विध्यर्थ तृ.पु.ए.व. **हि** - हि क्रि.वि.अ. **आत्मा** - आत्मन् पु.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **आत्मनः** - आत्मन् पु.ष.ए.व. **बन्धुः** - बन्धु पु.प्र.ए.व. **आत्मा** - आत्मन् पु.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **आत्मनः** - आत्मन् पु.ष.ए.व. **रिपुः** - रिपु पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **बन्धुः** - संसारदुःखाद् मोचयित्त्वा निरतिशयमोक्षसुखेन बध्नातीति बन्धुः-संसारदुःखा ब्धितारकः = संसारबंधातून सोडवून निरतिशय मोक्षसुखाने जो बांधतो त्यास बंधु असे म्हणतात म्हणजे संसारतारकबंधु**(वि.)** **रिपुः** - स्वोद्धरणाय यत्नमकुर्वाणो यो बहिर्मुखः स एव स्वस्य स्वयं शत्रुः = आत्मोद्धारासाठी प्रयत्न न करणारा असा जो बहिर्मुख तो स्वतःच-आपणच आपला शत्रू आहे**(वि.)**

**बन्धुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः ।**

**अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥६॥**

**अन्वयः** - येन, आत्मा, एव, आत्मना, जितः, तस्य, आत्मनः, आत्मा, बन्धुः, तु, अनात्मनः, आत्मा, एव, शत्रुवत्, शत्रुत्वे, वर्तेत ।

**अन्वयार्थ:** - **येन** - ज्या पुरुषाने **आत्मा एव** - शरीरेंद्रियसमुदायावरच **आत्मना** - स्वत: **जित:** - विजय प्राप्त केला आहे असा **तस्य आत्मन:** - त्याचा म्हणजे आपला-स्वत:चा **आत्मा** - आत्मा **बन्धु:** - बंधु म्हणजे हितकर्ता आहे **तु** - परंतु **अनात्मन:** - ज्याने आपल्या शरीरेंद्रियसमुदायावर विजय प्राप्त केला नाही अशा त्या अनात्म्याचा **आत्मा एव** - आत्माच **शत्रुवत्** - शत्रूप्रमाणे **शत्रुत्वे** - शत्रुत्व करण्यामध्ये **वर्तेत** - तत्पर असतो.

**विवरण** - श्रवणादि साधनाने उत्पन्न, आत्मतत्त्वज्ञानाने युक्त मुनि, राग द्वेषाने रहित होऊन ज्याने शरीरेंद्रियावर विजय प्राप्त केला तोच आपला बंधु आहे. ज्याने रागद्वेषाला स्वाधीन न ठेवून शरीरेंद्रियसंघातावर विजय प्राप्त केला नाही तो आपणच आपला शत्रु आहे.

**व्याकरणम्** - **येन** - येन सर्व.पु.तृ.ए.व. **आत्मा** - आत्मन् पु.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **आत्मना** - आत्मन् पु.तृ.ए.व. **जित:** - जि प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **तस्य** - तत् सर्व.पु.ष.ए.व. **आत्मन:** - आत्मन् पु.ष.ए.व. **आत्मा** - आत्मन् पु.प्र.ए.व. **बन्धु:** - बन्धु पु.प्र.ए.व. **तु** - तु उभ.अ. **अनात्मन:** - अन्+आत्मन् पु.ष.ए.व. **आत्मा** - आत्मन् पु.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **शत्रुवत्** - शत्रु वि.पु.प्र.ए.व. **शत्रुत्वे** - शत्रुत्व न.स.ए.व. **वर्तेत** - वृत् प्र.ग.आ.प.कर्त.विध्यर्थ तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अनात्मन:** - न आत्मा इत्यनात्मा तस्यानात्मन: = नाही आत्मा असा अनात्मा**(न.त.स.)** **शत्रुत्वे** - शत्रोर्भाव: शत्रुत्वं तस्मिन् शत्रुत्वे = शत्रुचा भाव शत्रुत्व त्या शत्रुत्वामध्ये**(त.वि.)**

**जितात्मन: प्रशान्तस्य परमात्मा समाहित: ।**

**शीतोष्णसुखदु:खेषु तथा मानापमानयो: ।।७।।**

**अन्वय:** - जितात्मन:, प्रशान्तस्य, परमात्मा, समाहित:, शीतोष्णसुखदु:खेषु, तथा, मानापमानयो: ।

**अन्वयार्थ:** - **जितान्मन:** - ज्याने शरीरेंद्रिय संघातावर विजय प्राप्त केला आहे व त्यामुळे **प्रशान्तस्य** - ज्याने आपल्या अंत:करणाला अत्यंत प्रसन्न केले आहे अशा संन्याशाचा **परमात्मा** - सच्चिदानंदरूप आत्मा **समा हित:** - प्रत्यक्ष आत्मभावाने राहतो तसेच **शीतोष्णसुखदु:खेषु** - शीत, उष्ण, सुख, दु:ख इत्यादि द्वंद्व **तथा** - त्याचप्रमाणे **मानापमानयो:** - मान व अपमान प्राप्त झाले असता तो त्यामध्ये सम असतो.

**विवरण** - आपले चित्त आपल्या स्वाधीन ठेवून प्रसन्न मनाने परमात्म्यामध्ये समाहित अशा योग्याच्या ठिकाणी शीतोष्ण, सुखदु:ख, मानापमान प्राप्त झाले तरी तो आपल्या तत्त्वज्ञानापासून पराजित केला जात नाही.

**व्याकरणम्** - **जितात्मन:** - जि प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. आत्मन् पु.ष.ए.व. **प्रशान्तस्य** - प्र+शम् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.ष.ए.व. **परमात्मा** - परम वि. आत्मन् पु.प्र.ए.व. **समाहित:** - सम्+आ+धा तृ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **शीतोष्णसुखदु:खेषु** - शीत वि. उष्ण वि. सुखदु:ख न.स.ब.व. **तथा** - तथा क्रि.वि.अव्यय: **मानापमानयो:** - मान् प्र.ग.आ.प./द.ग.उ.प./मन् च.ग.आ.प.+घञ्=मान पु. अपमान पु.स.द्वि.व. **सम:** - सम वि.पु.प्र.ए.व. **स्यात्** - अस् द्वि.ग.प.प.कर्त.विधिलिङ् तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **जितात्मन:** - जित:-वशीकृत:-अधीनीकृत: आत्मा-अन्त:करणं येन स जितात्मा तस्य जितात्मन: = जिंकलेला-वश केलेला आत्मा-अंतकरण ज्याने तो जितात्मा त्या जितात्म्याचे**(तृ.ब.स.)**

यद्वा **जितात्मनः** - कार्यकारणादिसङ्घात आत्मा-शरीरं जितः-अधीनीकृतो येन स तस्य जितात्मनः = कार्यकारणादिसंघात आत्म्याला-शरीराला ज्याने अधीन केले आहे असा तो जितात्मा त्या जितात्म्याचे **(तृ.ब.स.)** यद्वा **जितात्मनः** - जितः-निर्जितः समाधिना सर्ववासनापटलसंक्षये सति विपरीतग्रहो यथा न स्यात्तथा वशीकृतो विपरीतग्रहवैमुख्यं प्रापित आत्मा मनो यस्य स जितात्मा तस्य जितात्मनः = जिंकलेला-समाधिद्वारा सर्व वासनांच्या समूहाचा क्षय झाल्यामुळे वश केला-विपरीत ग्रहणाने विमुख झाला आत्मा-मन ज्याचा तो जितात्मा त्या जितात्म्याचे**(तृ.ब.स.)** **शीतोष्णसुखदुःखेषु** - शीतश्च उष्णश्च सुखश्च दुःखश्च शीतोष्णसुखदुःखानि तेषु शीतोष्णसुखदुःखेषु = शीत, उष्ण, सुख आणि दुःख शीतोष्णसुखदुःख त्या शीतोष्णसुखदुःखामध्ये**(इतरेतर द्वं.स.)** **मानापमानयोः** - मानश्चापमानश्च मानापमानौ तयोर्मानापमानयोः = मान आणि अपमान मानापमान त्या मान अपमानामध्ये**(द्वं.स.)**

**ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेन्द्रियः ।**

**युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकाञ्चनः ॥८॥**

**अन्वयः** - ज्ञानविज्ञानतृप्तात्मा, कूटस्थः, विजितेन्द्रियः, समलोष्टाश्मकाञ्चनः, योगी, युक्तः, इति, उच्यते ।

**अन्वयार्थः** - **ज्ञानविज्ञानतृप्तात्मा** - शास्त्रोक्त पदांच्या अर्थाचे ज्ञान व त्याचा तसाच अनुभव यांच्या योगाने ज्याचे अंतकःरण तृप्त झाले आहे त्यामुळे जो **कूटस्थः** - विपरीत प्रत्ययाच्याद्वारा हर्ष-विषाद, काम-क्रोध यांचा द्वारा विचलित न होणारा व **विजितेन्द्रियः** - ज्याने चांगल्या प्रकारे इंद्रियांना जिंकले आहे असा तो **समलोष्टाश्मकाञ्चनः** - ज्याला मातीचे ढेकूळ, दगड व सोने यांच्या ठिकाणी ज्याची समदृष्टि आहे अशा **योगी** - योग्याला **युक्तः** - पण्डिताद्वारा योगारूढ समाहित **इति** - असे **उच्यते** - कथन केले जाते अथवा बोलले जाते.

**विवरण** - शास्त्राच्या अर्थाचे ज्ञान, त्याचा अनुभव, याच्या योगाने ज्याचे अंतःकरण तृप्त झाल्यामुळे कोणत्याही विपरीत प्रत्ययापासून विचलित न होणाऱ्या योग्याला मातीचे ढेकूळ, दगड आणि सोने ही समानरूपाने प्रतीतिला येतात. अशा योग्याला पण्डिताद्वारा योगारूढ म्हटले जाते.

**व्याकरणम्** - **ज्ञानविज्ञानतृप्तात्मा** - ज्ञान न. विज्ञान न. तृप् द.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि. आत्मन् पु.प्र.ए.व. **कूटस्थः** - कूटस्थ वि.पु.प्र.ए.व. **विजितेन्द्रियः** - वि+जि प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. इंद्रिय न.वि.पु.प्र.ए.व. **समलोष्टाश्मकाञ्चनः** - सम वि. लोष्ट न. अश्मन् पु. काञ्चन न.वि.पु.प्र.ए.व. **योगी** - योगिन् पु.प्र.ए.व. **युक्तः** - युज् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **उच्यते** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **ज्ञानविज्ञानतृप्तात्मा** - ज्ञानम्-शास्त्रोक्तपदार्थानां परिज्ञानं विज्ञानम्-तु शास्त्रतो ज्ञातानां तथा एव स्वानुभवकरणमिति ज्ञानविज्ञाने ताभ्यां तृप्तः-सन्तुष्ट आत्मा-अन्तःकरणं यस्य स ज्ञानविज्ञानतृप्तात्मा = ज्ञान म्हणजे शास्त्रयुक्त पदार्थाचे परिज्ञान-परोक्षज्ञान, विज्ञान म्हणजे शास्त्रावरुन ज्ञात झालेल्या पदार्थांचे तसेच स्वानुभवकरण-शास्त्रात सांगितल्या प्रमाणे आत्मादि पदार्थांचा साक्षात् अनुभव घेणे या ज्ञान विज्ञानांच्या योगाने ज्याचा आत्मा म्ह.अंतकरण तृप्त झाले आहे असा तो ज्ञानविज्ञानतृप्तात्मा**(ष.ब.स.)** **विजितेन्द्रियः** - विशेषेण जितानि-वशीकृतानि इन्द्रियाणि येन स विजितेन्द्रियः = विशेषरूपाने जिंकले-आधीन केले इंद्रिय

ज्याने तो विजितेंद्रिय**(तृ.ब.स.)** यद्वा **विजितेन्द्रियः** - सदसद्विवेकजन्यतीव्रमोक्षेच्छाभ्यां विशिष्य जितानि-वि जितानि विषयग्रहणवैमुख्यं गमितानीन्द्रियाणि बाह्याभ्यन्तरकरणानि येन स विजितेन्द्रियः = सत् असत्च्या विवेकाने आणि तीव्रमोक्षाच्या इच्छेने युक्त होवून विशेषरूपाने जिंकले आहे-विषयग्रहणानेविमुख केली आहे बाहेरची आणि आतली इंद्रिये ज्याने तो विजितेंद्रिय**(तृ.ब.स.)** **समलोष्टाश्मकाञ्चनः** - लोष्टश्च-पांसुपिण्डश्च अश्माच-पाषाणश्च काञ्चनञ्च-सुवर्णश्चेति लोष्टाश्मकाञ्चनानि समानि-तुल्यानि लोष्टाश्मकाञ्चनानि यस्य स समलोष्टाश्मकाञ्चनः = लोष्ट-मातीचा पिंड, दगड-पाषाण, सुवर्ण-सोने, असे लोष्टाश्मकाञ्चन हे आहे समान ज्याचे तो समलोष्टाश्मकाञ्चन**(ष.ब.स.)** यद्वा **समलोष्टाश्मकाञ्चनः** - समानि-चिदाकारवृत्त्या समत्वेन ब्रह्ममात्रतया दृष्टानि लोष्टाश्मकाञ्चनानि येन स समलोष्टाश्मकाञ्चनः = चिदाकारवृत्तिच्याद्वारा समरूपाने पाहिले गेले मातीचे ढेकुळ, दगड आणि सोने ज्याने तो समलोष्टाश्मकाञ्चन-सर्वत्र ब्रह्ममात्रदर्शी**(तृ.ब.स.)**

सर्वामध्ये समबुद्धी असणाऱ्या योग्याची प्रशंसा -

**सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबन्धुषु ।**

**साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥९॥**

**अन्वयः** - सुहृद्, मित्र, अरि, उदासीन, मध्यस्थ, द्वेष्य, बन्धुषु, साधुषु, अपि, च, पापेषु, समबुद्धिः, वि शिष्यते ।

**अन्वयार्थः** - **सुहृद्** - सुहृद **मित्र** - मित्र **अरि** - शत्रू **उदासीन** - उदासीन **मध्यस्थ** - मध्यस्थ **द्वेष्य** - द्वेष्य **बन्धुषु** - बांधवांच्या ठिकाणी **साधुषु** - शास्त्रानुसार वर्तन करणाऱ्यां धर्मात्म्या पुरुषाचे ठिकाणी **अपि च** - आणि त्याचप्रमाणे **पापेषु** - शास्त्रनिषिद्ध आचरण करणाऱ्यां पापी पुरुषाचे ठिकाणी **समबुद्धिः** - समान दृष्टी ठेवणारा अथवा त्या सर्वांकडे समान दृष्टीने वर्तन करणारा **विशिष्यते** - अत्यंत श्रेष्ठ आहे.

**विवरण** - कोणत्याही प्रकारची अपेक्षा न ठेवता उपकार करणारा सुहृद; देतो, घेतो, भोजन करतो, करवितो, गुप्त बोलतो व ऐकतो इत्यादि लक्षणाने युक्त मित्र; परोक्ष व अपरोक्ष रूपाने अपकार करणारा शत्रु; अ प्रियवादी असल्यामुळे द्वेष करण्यामध्ये योग्य द्वेष्य; वादी आणि प्रतिवादी दोन्हीमध्ये सम मध्यस्थ; सर्व ठिकाणी उपेक्षा करणारा उदासीन; संबंधिला प्रिय असणारे बांधव-बंधु; शास्त्राप्रमाणे वर्तन करणारे साधु; दुराचारामध्ये रत असणारे पापी; या सर्वांच्या ठिकाणी समबुद्धी ठेवणारा असा योगी त्याला यथार्थरूपाने योगारूढ म्हटल्या जाते.

**व्याकरणम्** - **सुहृद्मित्रारिउदासीनमध्यस्थद्वेष्यबन्धुषु** - सुहृद् वि. मित्र न. अरि वि. उदासीन वि. मध्यस्थ वि. द्विष् द्वि.ग.प.प.कर्म.ण्यत् वि. बन्धु पु.स.ब.व. **साधषु** - साधु वि.पु.स.ब.व. **अपि** - अपि क्रि.वि.अ. **च** - च उभ.अ. **पापेषु** - पाप पु.स.ब.व. **समबुद्धिः** - सम वि. बुद्धि स्त्री.वि.पु.प्र.ए.व. **विशिष्यते** - वि+ शिष् स.ग.प.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **सुहृद्मित्रारिउदासीनमध्यस्थद्वेष्यबन्धुषु** - सुहृच्च मित्रश्च अरिश्च उदासीनश्च मध्यश्च द्वेष्यश्च बन्धुश्चेति सुहृद्मित्रारिउदासीनमध्यस्थद्वेष्यबन्धवस्तेषु सुहृद्मित्रारिउदासीनमध्यस्थद्वेष्यबन्धुषु = सुहृद्, मित्र, शत्रू, उदासीन, मध्यस्थ, द्वेष्य, बन्धु यांच्यामध्ये**(वि.)** **सुहृद्** - सुष्ठु हृदयं यस्य स सुहृद् = सरळ अंत:करण आहे ज्याचे तो सुहृद्**(वि.)समबुद्धिः** - समा-ब्रह्मदर्शनेनैकरूपा बुद्धिः-मतिर्यस्य स समबुद्धिः = सारखी-

ब्रह्मदर्शनाने एकरूप बुद्धी-मति ज्याची तो समबुद्धी**(ष.ब.स.)**

**योगी युञ्जीत सततमात्मानं रहसि स्थितः।**

**एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः॥१०॥**

**अन्वयः** - योगी, रहसि, स्थितः, एकाकी, यतचित्तात्मा, निराशीः, अपरिग्रहः, (सन्), आत्मानम्, सततम्, युञ्जीत।

**अन्वयार्थः** - **योगी** - ध्यानाचा अभ्यास करणारा योगी **रहसि स्थितः** - एकांत स्थानी बसलेला **एकाकी** - एकटाच **यतचित्तात्मा** - ज्याने आपले चित्त व देह यांना स्वाधीन केले आहे असा **निराशीः** - तृष्णारहित **अपरिग्रहः** - कंथा, कौपीन याच्या अतिरिक्त सर्व परिग्रहरहित (**सन्** - असा असणारा त्याने) **आत्मानम्** - अंतःकरणाला **सततम्** - निरंतर **युञ्जीत** - समाहित करावे-चित्ताला शांत-स्थिर करावे.

**विवरण** - योगाभ्यास करणारा योगी एकांतात राहून तीव्र वैराग्याने युक्त सर्व प्रकारच्या विषय भोगाच्या इच्छेने रहित कौपीन, कंथा आदिच्या अतिरिक्त परिग्रहाने शून्य, एकांतामध्ये स्थित अशा योग्याने आपल्या अंतःकरणाला समाहित करावे अर्थात स्थिर करावे.

**व्याकरणम्** - **योगी** - योगिन् पु.प्र.ए.व. **रहसि** - रहस् पु.स.ए.व. **स्थितः** - स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा. वि.पु.प्र.ए.व. **एकाकी** - एकाकिन् वि.पु.प्र.ए.व. **यतचित्तात्मा** - यम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. चित् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. आत्मन् पु.प्र.ए.व. **निराशीः** - निर्+आशिस् वि.स्त्री.प्र.ए.व. **अपरिग्रहः** - अप रिग्रह वि.पु.प्र.ए.व. (**सन्** - अस् द्वि.ग.प.प.कर्त.शतृ वि.पु.प्र.ए.व.) **आत्मानम्** - आत्मन् पु.द्वि.ए.व. **सततम्** - सतत वि.पु.द्वि.ए.व. **युञ्जीत** - युज् स.ग.आ.प.कर्त.विधिलङ् तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **यतचित्तात्मा** - यतौ-वासनया प्राप्ततत्तद्व्यापृतेः सकाशान्निगृहीतौ चित्तं चात्मदेहे न्द्रियसङ्घातश्च तावुभौ येन स यतचित्तात्मा = आधीन केले गेले आहे-वासनेने प्राप्त तत्तद्व्यापाराच्याद्वारा निगृहीत केले गेले आहे चित्त तसेच देहेंद्रियांचे संघात ज्याने तो यतचित्तात्मा**(तृ.ब.स.)** यद्वा **यतचित्तात्मा** - चित्तम्-अन्तःकरणमात्मा देहश्चेति चित्तात्मानौ संयतौ-योगप्रतिबन्धकव्यापारशून्यौ यस्य स यतचित्तात्मा = चित्त-अंतःकरण आत्मा-देह हे दोन्ही संयत झाले-योगाच्या प्रतिबंधकव्यापाराने शून्य झाले ज्याचे तो यत चित्तात्मा**(ष.ब.स.)** **अपरिग्रहः** - न विद्यते परिग्रहः-चित्तविक्षेपकरो यस्य सोऽपरिग्रहः-परिग्रहेणशून्यः = नाही परिग्रह-चित्तविक्षेप करणारा ज्याचा तो अपरिग्रह**(न.त.स.)** यद्वा **अपरिग्रहः** - कौपीनकन्थाव्यतिरिक्तः परिग्रहो यस्य नास्ति सोऽपरिग्रहः = कौपीन कंथाच्या अन्य परिग्रह नाही ज्याचा तो अपरिग्रह**(न.त.स.)** **निराशीः** - सर्वाभ्य आशीर्भ्यो विषयभोगाशाभ्यस्तीव्रमोक्षेच्छावैराग्याभ्यां निर्गतो यः स निराशीः = ज्याने मोक्षाच्या तीव्र इच्छेने व वैराग्याने सर्व विषयभोगाच्या आशेचा त्याग केला आहे तो निराशी**(प्र.ब.स.)** **योगी** - ब्रह्मणि चित्तं योक्तुम्-स्थापयितुं शीलमस्यास्तीति योगी = ब्रह्मामध्ये चित्त स्थापन करण्याचा स्वभाव आहे असा योगी**(अस्त्यर्थे त.वि.)**

**शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः।**

**नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम्॥११॥**

**तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेन्द्रियक्रियः।**

**उपविश्यासने युञ्ज्याद्योगमात्मविशुद्धये ॥१२॥**

**अन्वयः** - शुचौ, देशे, आत्मनः, नात्युच्छ्रितम्, नातिनीचम्, चैलाजिनकुशोत्तरम्, आसनम्, स्थिरम्, प्रतिष्ठाप्य, तत्र, आसने, उपविश्य, यतचित्तेन्द्रियक्रियः, मनः, एकाग्रम्, कृत्वा, आत्मविशुद्धये, योगम्, युञ्ज्यात् ।

**अन्वयार्थः - शुचौ देशे** - पवित्र देशात **आत्मनः** - आपले स्वतःचे **नात्युच्छ्रितम्** - अति उंच नाही **नातिनीचम्** - अति खाली नाही असे **चैलाजिनकुशोत्तरम्** - खाली दर्भ त्यावर हरिणाचे चर्म किंवा व्याघ्राचे चर्म व त्यावर मऊ वस्त्र असे **आसनम्** - आसन **स्थिरम्** - स्थिर-अचल **प्रतिष्ठाप्य** - स्थापन करून **तत्र आसने** - त्या आसनावर **उपविश्य** - बसून **यतचितेन्द्रियक्रियः** - चित्त व इंद्रिये यांच्या क्रिया ज्याने आपल्या स्वाधीन केल्या आहेत असा होऊन **मनः एकाग्रम्, कृत्वा** - मनाला एकाग्र करून **आत्मविशुद्धये** - चित्तशुद्धीसाठी **योगम्** - ध्यानयोग **युञ्ज्यात्** - करावा.

**विवरण** - वर सांगितलेला समाहित सुस्थिर अंतःकरणाने युक्त योगी स्वभावाने पवित्र नदीतटावर अथवा गुहा आदि प्रदेशामध्ये स्वतःचे आसन अत्यंत उंच नाही, फार खाली नाही, पडण्याच्या भीतिने उंच नसावे, जमिनीच्या शीतल स्पर्शाने शरीराला वातादिकांचा संसर्ग न व्हावा म्हणून फार खाली नसावे. त्यावर दर्भ, त्यावर हरणाचे अथवा व्याघ्राचे चर्म, त्यावर मऊ वस्त्र, असे आसन स्थिर करून त्यावर बसून अंतःकरणामध्ये ब्रह्मसाक्षात्काराच्या योग्यतेकरिता चित्त आणि इंद्रियांच्या व्यापाराने रहित होऊन मनाला एकाग्र करून ध्यान करावे.

**व्याकरणम् - शुचौ** - शुचि वि.पु.स.ए.व. **देशे** - देश पु.स.ए.व. **आत्मनः** - आत्मन् पु.ष.ए.व. **नात्युच्छ्रितम्** - न क्रि.वि.अ. अति+उद्+श्रि प्र.ग.उ.प.भावे.भू.धा.वि.न.द्वि.ए.व. **नातिनीचम्** - न क्रि.वि.अ. अति+नीच वि.न.द्वि.ए.व. **चैलाजिनकुशोत्तरम्** - चैल न. अजिन न. कुश पु. उत्तर न.द्वि.ए.व. **आसनम्** - आस्+ल्युट्-आसन न.द्वि.ए.व. **स्थिरम्** - स्थिर वि.न.द्वि.ए.व. **प्रतिष्ठाप्य** - प्रति+स्था प्र.ग.प्रयोजक ल्यबन्त अ. **तत्र** - तत्र क्रि.वि.अ. **आसने** - आसन न.स.ए.व. **उपविश्य** - उप+विश् ष.ग.प.प.ल्यबन्त अ. **यतचित्तेन्द्रियक्रियः** - यम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. चित् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. इन्द्रिय न. क्रिया वि.पु.प्र.ए.व. **सन्** - अस् द्वि.ग.प.प.कर्त.शतृ वि.पु.प्र.ए.व. **मनः** - मनस् न.द्वि.ए.व. **एकाग्रम्** - एकाग्र वि.न.द्वि.ए.व. **कृत्वा** - कृ अ.ग.उ.प.त्वान्त अ. **आत्मविशुद्धये** - आत्मन् पु. विशुद्धि स्त्री. वि.च.ए.व. **योगम्** - योग पु.द्वि.ए.व. **युञ्ज्यात्** - युज् स.ग.प.प.कर्त.विधिलिङ् तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - चैलाजिनकुशोत्तरम्** - चैलम्-मृदुवस्त्रम्, अजिनम्-मृदु व्याघ्रचर्म, कुशाः-दर्भा उत्तरमुपर्युपरि व्युत्क्रमेण यस्मिन् आसने तच्चैलाजिनकुशोत्तरम् = चैल-मृदुवस्त्र, अजिन-मृदु व्याघ्रादिचर्म आणि हरिणचर्म, कुश-दर्भ उत्तर-वरवर उलट्या क्रमाने ज्यामध्ये आहे ते चैलाजिनकुशोत्तर**(स.ब.स.) नात्युच्छ्रितम्** - अति-अत्यन्तम्, उच्छ्रितम्-उच्चं न भवति तद् नात्युच्छ्रितम् = अधिक उंच नाही ते नात्युत्छ्रित **(न.त.स.) नातिनीचम्** - अति-अत्यन्तम्, नीचम्-निम्नं न भवति तद् नातिनीचम् = अधिक खाली नाही ते नातिनीच**(न.त.स.) आसनम्** - आस्यते-उपविश्यतेऽस्मिन्नित्यासनम् = बसले जाते ज्याच्यावर ते आसन **(त.वि.) आत्मविशुद्धये** - आत्मनः-अन्तःकरणस्य, विशुद्धिः-सर्वविक्षेपशून्यत्वेनातिसूक्ष्मतयाब्रह्मसाक्षात्कारयोग्यता तस्यै आत्मविशुद्धये = आत्म्याची-अंतःकरणाची विशुद्धि-सर्व विक्षेपाने

रहित झाल्यामुळे अत्यंत सूक्ष्म झाल्यामुळे ब्रम्हसाक्षात्कारयोग्यता त्या आत्मविशुद्धिकरिता**(ष.त.स.) यत चित्तेन्द्रियक्रिय:** - चित्तश्च इन्द्रियाणि च चित्तेन्द्रियाणि तेषां क्रिया:-स्वाभाविकी चेष्टा इति चित्तेन्द्रियक्रिया:, यता:-संयताश्चित्तेन्द्रियक्रिया यस्य स यतचित्तेन्द्रियक्रिय: = चित्त आणि इंद्रिये चित्तेंद्रिये त्यांच्या क्रिया चित्तें द्रियक्रिया नियमित केल्या चित्ताच्या वृत्ति आणि इंद्रियांच्या क्रिया ज्याने तो यतचित्तेंद्रियक्रिय **(द्वं.ग.ष.ग.ष.ब.स.) एकाग्रम्** - एकमग्रं विषयो यस्य तद् एकाग्रम् = एकच ध्यान विषय आहे ज्याचे ते **(ब.स.)योगम्** - ब्रह्मण्येवाऽऽत्मभावेन पुरुषं योजयतीति योग: समाधिस्तं योगम् = ब्रह्मामध्येच आत्मभावाने पुरुषाला योजितो असा योग-समाधि त्या योगाला**(वि.)**

**समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिर: ।**

**सम्प्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥१३॥**

**प्रशान्तात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थित: ।**

**मन:संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्पर: ॥१४॥**

**अन्वय:** - कायशिरोग्रीवम्, समम्, अचलम्, धारयन्, स्थिर:, स्वम्, नासिकाग्रम्, सम्प्रेक्ष्य, (इव), च, दिश:, अनवलोकयन्, प्रशान्तात्मा, विगतभी:, ब्रह्मचारिव्रते, स्थित:, मन:, संयम्य, मच्चित्त:, युक्त:, मत्पर:, आसीत ।

**अन्वयार्थ:** - **कायशिरोग्रीवम्** - शरीराचा मध्यभाग, शिर व मान यांना **समम्** - सरळ व **अचलम्** - निश्चल-अचल **धारयन्** - धारण करणारा असा **स्थिर:** - स्थिर होऊन **स्वम्, नासिकाग्रम्** - नासिकेच्या अग्रभागावर **सम्प्रेक्ष्य** - दृष्टी ठेऊन **च दिश:** - व इकडच्या तिकडच्या दिशाकडे **अनवलोकयन्** - न पहणारा **प्रशान्तात्मा** - अंत:करण अतिशय स्थिर असलेला **विगतभी:** - भयरहित **ब्रह्मचारिव्रते स्थित:** - ब्रह्मचर्यव्रतामध्ये स्थित होऊन **मन:** - मनाला **संयम्य** - स्वाधीन करून **मच्चित्त:** - माझ्या ठिकाणी ज्यांचे चित्त आहे असा **युक्त:** - समाहित-सावधान ध्यान योगाने **मत्पर:** - मत्पर होऊन **आसीत** - रहावे.

**विवरण** - कायेचा-शरीराचा कंबरेपासून वरचा भाग, मान आणि मस्तक यांना सरळ व अचलरूपाने धारण करून, स्थाणूच्या समान निश्चल होऊन, इकडे तिकडे न पहाता आपल्या नासिकेच्या अग्रभागावर दृष्टि ठेवून, प्रसन्न चित्त तसेच भयरहित ब्रह्मचारी व्रतामध्ये स्थित होऊन तसेच मनाला स्वाधीन करून, माझ्यामध्ये चित्त ठेवून आणि ब्रह्मग्राहक वृत्तिने युक्त होऊन, उपर्युक्त सांगितलेल्या आसनावर मत्पर होऊन रहावे.

**व्याकरणम्** - **कायशिरोग्रीवम्** - काय न. शिरस् न. ग्रीव.वि.पु.द्वि.ए.व. **समम्** - सम वि.न.द्वि.ए.व. **अचलम्** - अचल वि.न.द्वि.ए.व. **धारयन् -** धृ द.ग.प.प.कर्त.वर्त.धा.वि.पु.प्र.ए.व. **स्थिर:** - स्थिर वि.पु.प्र.ए.व. **स्वम्** - स्व सर्व.पु.द्वि.ए.व. **नासिकाग्रम्** - नासिका स्त्री. अग्र वि.न.द्वि.ए.व. **सम्प्रेक्ष्य** - सम्+प्र+ईक्ष् प्र.ग.आ.प.ल्यबन्त अ. **इव** - इव क्रि.वि.अ. **च** - च उभ.अ. **दिश:** - दिश् ष.ग.उ.प.+ क्विन्=दिश् स्त्री.प्र.ब.व. **अनवलोकयन्** - अन्+अव+लोक्+णिच्+कर्त.शतृ-अनवलोकयन् वि.पु.प्र.ए.व. **प्रशान्तात्मा** - प्र+शम् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. आत्मन् पु.प्र.ए.व. **विगतभी:** - वि+गम् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. भी स्त्री.वि.पु.प्र.ए.व. **ब्रह्मचारिव्रते** - ब्रह्मचारिन् वि. वृ पं.ग.उ.प.कर्म.भू.धा.

वि.न.स.ए.व. **स्थित:** - स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **मन:** - मनस् न.द्वि.ए.व. **संयम्य** - सम्+यम् प्र.ग.प.प.ल्यबन्त अव्यय: **मच्चित्त:** - अस्मत् सर्व.पं.ए.व. चित् प्र.ग.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **युक्त:** - युज् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **मत्पर:** - अस्मत् सर्व.पं.ए.व. पर वि.पु.प्र.ए.व. **आसीत** - आस् द्वि.ग.आ.प.कर्त.विधिलिङ् तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **नासिकाग्रम्** - नासिकाया अग्रमिति नासिकाग्रम् = नाकाचे अग्रभाग असे ना सिकाग्र**(ष.त.स.)** **अनवलोकयन्** - नावलोकयतीत्यनवलोकयन् = जो नाही पाहत असा न पाहणारा**(न.त.स.)** **कायशिरोग्रीवम्** - कायश्च-शरीरमध्यभागश्च-कटेरुर्ध्वप्रदेशश्च, शिरश्च-मस्तकश्च ग्रीवा चेति काय शिरोग्रीवम् = काय-शरीराचा मध्यभाग-कटीचा वरचा भाग, शीर-मस्तक व मान असा कायशिरोग्रीव **(समाहार द्वं.स.)** **अचलम्** - न स्वरूपात्-न सामर्थ्यात् चलनं विद्यतेऽस्येति तदचलम् = नाही स्वरूपाहून-नाही सामर्थ्याहून चलन आहे ह्याचे असे ते अचल**(न.ब.स.)** **धारयन्** - धारयतीति धारयन् = धारण करतो असा धारण करणारा**(वि.)** **प्रशान्तात्मा** - प्रकर्षेण शान्त:-रागादिदोषरहित आत्मा-अन्त:करणं यस्य स प्रशान्तात्मा = विशेषरूपाने शांत-रागादिदोषरहित, आत्मा-अंत:करण ज्याचे तो प्रशांतात्मा**(ष.ब.स.)** **विगतभी:** - विशिष्य गता विगता-नि:शेषविनष्टाभिरन्नादानविसर्गातिरिक्तस्य दन्तधावनमुखक्षालनादे: शास्त्री यस्य सर्वस्य च कर्मण: परित्यागे शिष्टा निन्दिष्यन्तीति या भीति: सा यस्य न विद्यते स विगतभी: = विशेषरूपाने-नि:शेषरूपाने निघून गेली ज्याची भीति-भोजन, आदान, प्रदान, विसर्ग, दंतधावन, मुखप्रक्षालन आदि शास्त्रीय, लौकीक कर्म परित्यागाने शिष्ट पुरुष आपली निंदा करतील अशा प्रकारची भिती ज्याची नाही तो विगतभी**(ष.ब.स.)** **ब्रह्मचारिव्रते** - ब्रह्मचारिण:-ब्रह्मचर्यं गुरुशुश्रूषाभिक्षाभुक्त्यादेर्व्रतम्-अनुष्ठानं तस्मिन् ब्रह्मचारिव्रते = ब्रह्मचाऱ्याचे-ब्रह्मचर्य गुरुसेवा भोजनादिकाचे व्रत-अनुष्ठान असे ब्रह्मचा रिव्रत त्या ब्रह्मचारिव्रतामध्ये**(ष.त.स.)** **मच्चित्त:** - मयि-परमेश्वरे प्रत्यक्चिति सगुणे निर्गुणे वा चित्तम्-अन्त:करणं यस्य स मच्चित्त: = माझ्यामध्ये-परमेश्वरामध्ये प्रत्यक्चेतन सगुणामध्ये किंवा निर्गुणामध्ये चित्त-अंत:करण ज्याचे तो मच्चित्त**(ष.ब.स.)** यद्वा **मच्चित्त:** - मयि-बुद्धितद्वृत्तिसाक्षिणि चिदेकरसे प्रत्यग्रूपे चित्तं यस्य स मच्चित्त: = माझ्यामध्ये-बुद्धी आणि तिच्या वृत्तिचा साक्षी चिदेकरस, प्रत्यक्रूपब्रह्मामध्ये आहे ज्याचे चित्त तो मच्चित्त**(ष.ब.स.)** **मत्पर:** - अहमेव पर:-परमेत्म्येति मत्पर:। यद्वा अहमेव परमानन्दरूपत्वात् पर: पुरुषार्थ: प्रियो यस्य स मत्पर: = मीच पर-परमात्मा असे मत्पर अथवा मीच परमानंदस्वरूप असल्यामुळे श्रेष्ठ पुरुषार्थ प्रिय आहे ज्याचा तो मत्पर**(ष.ब.स.)**

**युञ्जन्नेवं सदात्मानं योगी नियतमानस: ।**

**शान्तिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति ॥१५॥**

**अन्वय:** - एवम्, आत्मानम्, सदा, युञ्जन्, योगी, नियतमानस:, निर्वाणपरमाम्, मत्संस्थाम्, शान्तिम्, अ धिगच्छति ।

**अन्वयार्थ:** - **एवम्** - अशाप्रकारे **आत्मानम्** - अंत:करणाला **सदा युञ्जन्** - सतत आत्म्यामध्ये समाहित करणारा **योगी** - योगी पुरुष-योगाभ्यास करणारा **नियतमानस:** - नियतचित्त होऊन **निर्वाणपरमाम्** - मोक्ष हीच जिची पराकाष्ठा आहे अशा व **मत्संस्थाम्** - माझ्या स्वाधीन असलेल्या संसारनिवृत्तिरूप **शान्तिम्** - शांतीला **अधिगच्छति** - प्राप्त होतो.

**विवरण** - अशा प्रकारे आसनादि विधानाने मनाचे संयमन करून, आत्मस्वरूपामध्ये समाहित योगनिष्ठ परायण यति मोक्षामध्ये जिचे पर्यवसान आहे अशा मत्स्वरूप शांतिला प्राप्त होतो. अर्थात संसारनिवृत्तिरूप शांतिला प्राप्त होतो.

**व्याकरणम्** - **एव** - एव क्रि.वि.अ. **आत्मानम्** - आत्मन् पु.द्वि.ए.व. **सदा** - सदा क्रि.वि.अ. **युञ्जन्** - युज् स.ग.प.प.कर्त.शतृ=युञ्जत् वि.पु.प्र.ए.व. **योगी** - योगिन् पु.प्र.ए.व. **नियतमानसः** - नि+यम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. मानस वि.पु.प्र.ए.व. **निर्वाणपरमाम्** - निर्+वा द्वि.ग.प.प.भावे.भू.धा.वि. परमा वि.स्त्री.द्वि.ए.व. **मत्संस्थाम्** - अस्मत् सर्व.स.ए.व. संस्था स्त्री.द्वि.ए.व. **शान्तिम्** - शांति स्त्री.द्वि.ए.व. **अधिगच्छति** - अधि+गम् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **नियतमानसः** - श्रद्धया तीव्रमुमुक्षया चिरकालं नित्यनिरन्तरसमनुष्ठितसमाध्यभ्यासबलेन नियतम्-निश्चलं सर्वबाह्यवासनानिःशेषसंक्षयवशाद् विपरीतप्रत्ययानुत्पत्तौ निर्विकारात्मना स्थितं मानसं 'मनसैवानुद्रष्टव्यम्' इति श्रवणान्मनुत इदमेवाहमस्मीति स्वात्मना ब्रह्म साक्षात्क्रियतेऽनेनेति मनो मन एव मानसम् यस्य स नियतमानसः = श्रद्धेने तीव्रमुमुक्षुने तसेच चिरकाल नित्य निरंतर अनुष्ठित समाधिच्या अभ्यासाच्या बलाने नियत-निश्चलरूपाने सर्वबाह्यवासनांचा निःशेष क्षय झाल्यावर विपरीत प्रत्यय उत्पन्न होत नसल्यामुळे निर्विकारस्वरूपाने स्थित आहे मानस 'मनानेही पाहिले पाहिजे' या श्रुतिने ज्याच्याद्वारा मनन केले जाते ते मी आहे या प्रमाणे आपल्या आत्मरूप ब्रह्माचा साक्षात्कार केला जातो ते मन आहे मनच मानस आहे ज्याचे तो नियतमानस**(तृ.ब.स.)** **निर्वाणपरमाम्** - निर्वाणम्-शरीरसम्बधरहितं परमं परमपुरुषार्थलक्षणं कैवल्यं यया सा निर्वाणपरमा तां निर्वाणपरमाम् = निर्वाण-शरीरसंबंधाने रहित परमपुरुषार्थ कैवल्य जिच्याने ती निर्वाणपरमा त्या निर्वाण श्रेष्ठतेला**(तृ.ब.स.)** यद्वा **निर्वाणपरमाम्** - निर्वाणम्-मोक्षरूपं परमं निरतिशयसुखं यस्यां सा तां निर्वाणपरमाम् = निर्वाण-मोक्षरूप श्रेष्ठ निरतिशय सुख जिच्यामध्ये त्या निर्वाणश्रेष्ठतेला**(स.ब.स.)** **मत्संस्थाम्** - मामेव संस्था-स्थितिर्यत्र सा मत्संस्था तां मत्संस्थाम् = माझीच संस्था-स्थिती ज्याठिकाणी ती मत्संस्था त्या मत्संस्थाला**(स.त.स.)** यद्वा **मत्संस्थाम्** - ममरूपेण संस्था यया सा मत्संस्था तां मत्संस्थाम् = माझ्यारूपाने संस्था जिच्याने ती मत्संस्था त्या मत्संस्थेला**(तृ.त.स.)** यद्वा **मत्संस्थाम्** - मयि संस्थां मत्संस्थाम् = माझ्या मध्ये स्थित असलेली ती संस्था त्या मत्संस्थेला**(स.त.स.)** यद्वा **मत्संस्थाम्** - मत्संस्थाम्-मदधीनामधिगच्छति-प्राप्नोति = माझ्यामध्ये उत्तम प्रकारे स्थित असलेली-माझ्या अधीन असलेली मद्रूप-ब्रह्मस्वरूपावस्थानरूप शान्तीला प्राप्त होतो**(परी.)**

**नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकान्तमनश्नतः ।**

**न चाति स्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥१६॥**

**अन्वयः** - तु, अत्यश्नतः, योगः, न, अस्ति, च, एकान्तम्, अनश्नतः, (योगः), न, (अस्ति), अतिस्वप्नशीलस्य, न, च, अर्जुन, जाग्रतः, न, एव ।

**अन्वयार्थः** - **तु** - परंतु **अत्यश्नतः** - आपल्या उदर परिमाणाच्या अधिक अन्न खाणाऱ्या पुरुषाला **योगः** - चित्तवृत्तिनिरोध योगाभ्यास **न अस्ति** - होत नाही **च एकान्तम्, अनश्नतः** - व मुळीच अन्न न खाणाऱ्या पुरुषालाही **(योगः) न (अस्ति)** - योगाचा अभ्यास करता येत नाही **अतिस्वप्नशीलस्य** - अति झोपण्याचा ज्याचा स्वभाव आहे त्यालाही **न च** - योगाभ्यास सिद्ध होत नाही तसेच **अर्जुन** - हे अर्जुना! **जाग्रतः न एव**

- अति जागणाऱ्या पुरुषाकडून योग सिद्ध होऊ शकत नाही.

**विवरण** - परंतु हे अर्जुना! शरीराला नियमाने जेवढ्या अन्नाची आवश्यकता असते त्याहून अधिक अन्न खाणारा अथवा मुळीच न खाणारा, अति झोप घेणारा अथवा अतिशय जागणारा असा जो पुरुष आहे त्याला समाधिनिष्ठ योग प्राप्त होत नाही.

**व्याकरणम्** - **तु** - तु उभ.अ. **अत्यश्नतः** - अति अ. अश् न.ग.प.प.कर्त.शतृ-अत्यश्नत वि.पु.ष.ए.व. **योगः** - योग पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अस्ति** - अस् द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **एकान्तम्** - एकान्त वि.न.द्वि.ए.व. **अनश्नतः** - अन्+अश् न.ग.प.प.कर्त.वर्त.धा.वि.पु.ष.ए.व. **योगः** - योग पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अस्ति** - अस् द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **अतिस्वप्नशीलस्य** - अति+स्वप्न पु. शील वि.न.ष.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **च** - च उभ.अ. **अर्जुन** - हे अर्जुन पु.संबो.ए.व. **जाग्रतः** - जागृ द्वि.ग.प.प.कर्त.शतृ-जाग्रत् वि.पु.ष.ए.व. **न एव** - न एव क्रि.वि.अ.

**समासविग्रहार्थाः** - **अनश्नतः** - नाश्नातीत्यनश्नन् तस्य अनश्नतः = नाही खात असा न खाणारा त्या न खाणाऱ्याचा**(न.त.स.)** **जाग्रतः** - जागर्तीति जाग्रन् तस्य जाग्रतः = जागतो असा जागणारा त्या जागणाऱ्याचा**(वि.)** **अतिस्वप्नशीलस्य** - अत्यन्तं स्वप्नः-निद्रायुक्तं शीलम्-स्वभावो यस्य सोऽतिस्वप्नशीलस्तस्यातिस्वप्नशीलस्य = अत्यंत झोपण्याचे शील-स्वभाव ज्याचा तो अतिस्वप्नशील त्या अतिस्वप्नाशीलाचा किंवा अति झोप घेणाऱ्याचा**(ष.ब.स.)** **अत्यश्नतः** - स्वोदरपरिमाणमतिक्रम्य जरयितुमशक्यमन्नमश्नतो बह्वाशिनो योगिनो यतेर्न योगोऽस्तीत्यश्नतः = उदर परिमाणापेक्षा अधिक भक्षण करणाऱ्या पचनक्रियेस जड जाईल अशा बहुभक्षी पुरुषाचा योग घडत नाही अशा अखाणाऱ्या**(गति स.)** यद्वा **अत्यश्नतः** - आत्मसंमितं अन्नपरिमाणमतीत्याश्नत इत्यत्यश्नतः = देहाला योग्य अन्नपरिमाण उल्लंघून खाणाऱ्याचा अर्थात-अधिक खाणाऱ्याचा योग होत नाही असे अत्यश्नत**(गति स.)**

**युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।**

**युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥१७॥**

**अन्वयः** - युक्ताहारविहारस्य, कर्मसु, युक्तचेष्टस्य, युक्तस्वप्नावबोधस्य, योगः, दुःखहा, भवति ।

**अन्वयार्थः** - **युक्ताहारविहारस्य** - ज्याचे खाणे, जाणे आणि येणे परिमित असते त्याचा **कर्मसु** - कर्मामध्ये **युक्तचेष्टस्य** - परिमित चेष्टा करणाऱ्या योग्याचा **युक्तस्वप्नावबोधस्य** - झोपणे व जागणे ही दोन्ही ज्याचे नियमित असते त्याचा **योगः** - योग **दुःखहा** - आध्यात्मिकादि सर्व दुःखांचा नाश करणारा **भवति** - होतो.

**विवरण** - ज्याचे खाणे, येणे आणि जाणे परिमित असते असा यथायोग्य आहार-विहार करणाऱ्याला, त्याचप्रमाणे व्यावहारिक सर्वक्रिया नियमित असतात. ज्याची निद्रा व जागरण परिमित असते अशा योग्याचा अनुष्ठित योग आध्यात्मिक आधिभौतिक आधिदैविक संसाररूपी दुःखाचा नाश करणारा होतो.

**व्याकरणम्** - **युक्ताहारविहारस्य** - युज् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. आहार पु. विहार पु.ष.ए.व. **कर्मसु** - कर्मन् न.स.ब.व. **युक्तचेष्टस्य** - युज् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. चेष्ट न.वि.ष.ए.व. **युक्तस्वप्नावबोधस्य** - युज् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. स्वप्न पु. अवबोध पु.ष.ए.व. **योगः** - योग पु.प्र.ए.व. **दुःखहा** - दुःख न. हन् द्वि.ग.प.प.पु.प्र.ए.व. **भवति** - भू प्र.ग.प.प.कर्त लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - युक्ताहारविहारस्य** - आह्रियत इत्याहारश्च-अन्नश्च, विहारश्च-सञ्चारश्चेति आहारविहारौ युक्तौ-परिमितौ योगानुकूलौ योगशास्त्रोक्तौ आहारविहारौ यस्य स युक्ताहारविहारस्तस्य युक्ताहारविहारस्य = ज्याचे उदरात आहरण केले जाते तो आहार-अन्न आणि विहार-संचार असे आहारविहार युक्त-परिमित योगानुकूल योगशास्त्राने सांगितलेले आहारविहार ज्याचे तो युक्त आहारविहार त्या युक्ताहारविहाराचे **(द्वं.ग.ब.स.) युक्तस्वप्नावबोधस्य** - स्वप्नश्च-निद्रा च, अवबोधश्च-जागरश्चेति स्वप्नावबोधौ, युक्तौ-परि मितौ स्वप्नावबोधौ यस्य स युक्तस्वप्नावबोधस्तस्य युक्तस्वप्नावबोधस्य = स्वप्न-निद्रा आणि अवबोध-जागर असे स्वप्नावबोध युक्त-परिमित स्वप्नावबोध आहे ज्याचे तो त्या युक्तस्वप्नावबोधाचे**(द्वं.ग.ब.स.) दुःखहा** - योगवैकल्यं दुःखं अथवा जन्ममरणदुःखं हन्तीति दुःखहा = योगवैकल्य दुःख किंवा जन्ममरण दुःख घालवितो-नष्ट करतो असा दुःखहा**(उपपद स.)** यद्वा **दुःखहा** - दुःखान्याध्यात्मिकादीनि जन्मादीनि च सर्वाणि स्वानुष्ठानसमुत्पन्नाप्रतिबद्धबोधेन हन्तीति दुःखहा = दुःखे-आध्यात्मिकादी दुःखे आणि जन्मादिक दुःखे या सर्वांचा अनुष्ठानाने उत्पन्न झालेल्या प्रतिबंधरहित ज्ञानाने नाश करतो असा दुःखहा**(उप.स.)** यद्वा **दुःखहा** - सर्वाणि दुःखानि हन्तीति हा दुःखस्य हा, इति दुःखहा = आध्यात्मिकादि सर्व दुःखाचा नाश करतो म्हणून दुःखहा**(ष.त.स.)**

**यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते ।**

**निःस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा ॥१८॥**

**अन्वयः** - यदा, विनियतम्, चित्तम्, आत्मनि, एव, अवतिष्ठते, सर्वकामेभ्यः, निस्पृहः, तदा, युक्तः, इति, उच्यते ।

**अन्वयार्थः - यदा** - जेव्हा **विनियतम्, चित्तम्** - विशेषरूपाने नियत केलेले म्ह. स्थिरतेस प्राप्त झालेले चित्त **आत्मनि एव** - आत्म्याच्या ठिकाणीच **अवतिष्ठते** - लय पावते आणि त्यावेळी योगी **सर्वकामेभ्यः** - संपूर्ण कामनापासून-दृष्ट व अदृष्ट विषयांपासून **निस्पृहः** - निरिच्छ होतो-ऐहिक व पारलौकिक सर्व विषयां विषयीच्या तृष्णेने रहित असा होतो **तदा** - तेव्हां **युक्तः** - त्याला योग सिद्ध झाला **इति** - असे **उच्यते** - म्हटले जाते.

**विवरण** - जेव्हा सर्व बाजूनी नियमित केलेले चित्त आत्म्याच्या ठिकाणी समाहित होते. त्यावेळी सर्वप्रकारच्या कामनाविषयी योगी निरिच्छ असतो अशा त्या योग्याला योगारूढ म्हटले जाते.

**व्याकरणम् - यदा** - यदा क्रि.वि.अ. **विनियतम्** - वि+नि+यम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **चित्तम्** - चित् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **आत्मनि** - आत्मन् पु.स.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **अव तिष्ठते** - अव+स्था प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **सर्वकामेभ्यः** - सर्व वि. काम पु.पं.ब.व. **निःस्पृहः** - निस्+स्पृह वि.पु.प्र.ए.व. **तदा** - तदा क्रि.वि.अ. **युक्तः** - युज् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **उच्यते** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.लट् वर्त.आ.प.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - सर्वकामेभ्यः** - काम्यन्त इति कामाः-शब्दादयः सर्वे च ते कामाश्च सर्वकामास्तेभ्यः सर्वकामेभ्यः = इच्छिले जातात असे काम-शब्दादिक सर्व आणि ते काम सर्वकाम त्या सर्वकामांपासून **(कर्म.स.) यदा** - यस्मिन् काले यदा = ज्या कालामध्ये जेव्हा**(त.वि.)**

**यथा दीपो निवातस्थो नेङ्गते सोपमा स्मृता ।**

**योगिनो यतचित्तस्य युञ्जतो योगमात्मनः ॥१९॥**

**अन्वयः** - यथा, निवातस्थः, दीपः, न, इङ्गते, सा, उपमा, आत्मनः, योगम्, युञ्जतः, योगिनः, यतचित्तस्य, स्मृता ।

**अन्वयार्थः** - **यथा** - ज्याप्रमाणे **निवातस्थः दीपः** - वायुरहित प्रदेशामध्ये असलेल्या दिव्याची ज्योति **न इङ्गते** - इकडे तिकडे न हालता निश्चल असते **सा उपमा** - त्या दीपज्योतिची उपमा **आत्मनः योगम्, युञ्जतः** - आत्म्याच्या योगाचे अनुष्ठान करणाऱ्या **योगिनः** - योग्याच्या **यतचित्तस्य** - स्वाधीन चित्ताला **स्मृता** - सांगितली गेली आहे.

**विवरण** - आत्म्याच्या ठिकाणी लय पावणाऱ्या योग्याच्या चित्ताला वायुरहित प्रदेशामध्ये असणाऱ्या दिव्याच्या ज्योतीची उपमा दिली आहे अर्थात निवाऱ्याच्या ठिकाणी असलेला दिवा ज्याप्रमाणे हालत नाही त्याप्रमाणे समाधिनिष्ठ योग्याचे चित्त परिपूर्ण रूपाने स्थिर असते अर्थात ध्येयापासून विचलित होत नाही.

**व्याकरणम्** - **यथा** - यथा क्रि.वि.अ. **निवातस्थः** - नि+वा द्वि.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. स्थ वि.पु.प्र.ए.व. **दीपः** - दीप पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **इङ्गते** - इङ्ग् प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **सा** - तत् सर्व.स्त्री.प्र.ए.व. **उपमा** - उपमा स्त्री.प्र.ए.व. **आत्मनः** - आत्मन् पु.ष.ए.व. **योगम्** - योग पु.द्वि.ए.व. **युञ्जतः** - युज् स.ग.प.प.कर्त.शतृ वि.पु.ष.ए.व. **योगिनः** - योगिन् पु.ष.ए.व. **यतचित्तस्य** - यम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. चित् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.ष.ए.व. **स्मृता** - स्मृ प्र.ग.प.प.कर्म.भू.धा. वि.स्त्री.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **निवातस्थः** - निर्गतम्-रहितम् वातम्-वायुर्यत्र स निवातो निवाते तिष्ठतीति निवातस्थः = वायु रहित प्रदेशामध्ये स्थित असा तो निवातस्थ**(ब.ग.स.त.स.)** यद्वा **निवातस्थः -** निवाते-वातवर्जिते देशे स्थित इति निवातस्थः = निवात-वायुरहित प्रदेशामध्ये असलेला असा तो निवातस्थ**(स.त.स.) उपमा** - उपमीयते अनया इति उपमा = जिच्या योगाने तुलना केली जाते ती उपमा**(उपमीति स.) योगिनः -** योगोऽस्यास्तीति योगी तस्य योगिनः = योग आहे ज्याचा असा योगी त्या योग्याचा**(त.वि.) यतचित्तस्य** - यतम्-संयतम्-एकाग्रतामापन्नं चित्तं येन स यतचित्तस्तस्य यतचित्तस्य = यत-संयत एकाग्रतेला प्राप्त झालेले चित्त आहे ज्याच्याद्वारा तो यतचित्त त्या यतचित्ताचा**(तृ.ब.स.)** यद्वा **यतचित्तस्य** - यतम्-ब्रह्मण्येव ब्रह्माकारेण निश्चलतया सदा स्थापितं चित्तं येन स यतचित्तस्तस्य यतचित्तस्य = यत-ब्रह्मामध्येच ब्रह्माकाराने निश्चल सतत स्थित चित्त आहे ज्याच्याद्वारा तो यतचित्त त्या यतचित्ताचा**(तृ.ब.स.)**

**यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ।**

**यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥२०॥**

**सुखमात्यन्तिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतीन्द्रियम् ।**

**वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः ॥२१॥**

**यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ।**

**यस्मिन्स्थितो न दु:खेन गुरुणापि विचाल्यते ॥२२॥**

**तं विद्याद् दु:ख संयोगवियोगं योगसञ्ज्ञितम् ।**

**स निश्चयेन योक्तव्यो योगोऽनिर्विण्णचेतसा ॥२३॥**

**अन्वय:** - यत्र, योगसेवया, निरुद्धम्, चित्तम्, उपरमते, च, यत्र, आत्मना, आत्मानम्, पश्यन्, आत्मनि, तुष्यति, यत्र, यत्, आत्यन्तिकम्, बुद्धिग्राह्यम्, अतीन्द्रियम्, सुखम्, तत्, वेत्ति, यत्र, अयम्, स्थित:, तत्त्वत:, न, एव, चलति, च, यम्, लब्ध्वा, अपरम्, लाभम्, तत:, अधिकम्, न, मन्यते, यस्मिन्, स्थित:, गुरुणा, अपि, दु:खेन, न, विचाल्यते, तम्, दु:खसंयोगवियोगम्, योगसञ्ज्ञितम्, विद्यात्, स:, योग:, निश्चयेन, अनिर्विण्णचेतसा, योक्तव्य: ।

**अन्वयार्थ:** - **यत्र** - जेव्हा **योगसेवया** - योगाभ्यासाने **निरुद्धम्** - नियमन केलेले अथवा सर्व बाजूंनी स्वाधीन केलेले **चित्तम्** - अंत:करण **उपरमते** - उपशमाला प्राप्त होते म्हणजे स्थिर होते **च** - आणि **यत्र** - जेव्हा **आत्मना** - परमात्म्याच्या ध्यानाने अति शुद्ध झालेल्या अंत:करणाने **आत्मानम्** - परमात्मस्वरूपाला **पश्यन्** - पाहणारा योगी **आत्मनि** - आत्मस्वरूपामध्ये **तुष्यति** - संतुष्ट होतो **यत्र** - ज्यावेळी **यत्** - जे **आत्यन्तिकम्** - आद्यन्तरहित **बुद्धिग्राह्यम्** - केवल आत्माकारवृत्तिने ग्रहण करण्यास योग्य **अतीन्द्रियम्** - इंद्रियांना अगोचर होणारे **तत् सुखम्** - ते सुख **वेत्ति** - तो अनुभव करतो **यत्र** - जेव्हा **अयम्** - हा योगी **स्थित:** - चिदेकरस आत्मस्वरूपात स्थित झाला असता **तत्त्वत:** - तो त्या परमार्थस्वरूपापासून **न एव चलति** - मूळीच विचलित होत नाही त्यावेळी त्याला योगसिद्धि होते **च** - आणि **यम्** - ज्या आत्मतत्त्वाला **लब्ध्वा** - प्राप्त होऊन **अपरम्, लाभम्** - अन्य लाभाला **तत:** - त्यापेक्षा **अधिकम्** - उत्कृष्ट लाभ **न मन्यते** - मानीत नाही **यस्मिन्** - ज्या आत्मस्वरूपामध्ये **स्थित:** - स्थित असलेला हा योगी **गुरुणा अपि दु:खेन** - फार मोठ्या दु:खाने देखील **न विचाल्यते** - डगमगत नाही अथवा मोठ्या दु:खांकडूनही विचलित केला जात नाही **तम्, दु:खसंयोगवियोगम्** - त्या दु:ख संयोगाने रहित अशा सुखाला **योगसञ्ज्ञितम्** - योग ही संज्ञा-नाव आहे असे **विद्यात्** - जाणावे **स: योग:** - तो योग **निश्चयेन** - निश्चयपूर्वक **अनिर्विण्णचेतसा** - आलस्यदोषाने रहित चित्ताने **योक्तव्य:** - करावा.

**विवरण** - २०,२१,२२,२३ हे श्लोक जेथे योग्याच्या निरंतर अभ्यासाने निरुद्ध झालेले चित्त उपशमाला प्राप्त होते आणि ज्या अवस्थेमध्ये ब्रह्माला आपल्या आत्मरूपाने पाहून योगी परमानंद सुखाला प्राप्त होतो असे जे उत्पत्ति विनाशाने शून्य, सर्वोत्कृष्ट, बुद्धिगम्य आणि इंद्रियांना अगोचर असणारे सुख अनुभव करीत असताना तो योगी आपल्या आत्मस्वरूपापासून विचलित होत नाही अशा निरतिशयसुखाचा योगी अनुभव करतो. अशा निरतिशय आत्मसुखापेक्षा दुसरा काही एक अधिकलाभ मानत नाही त्याचप्रमाणे अशा सुखाचा अनुभव करणारा योगी मोठ्या दु:खाने सुद्धा विचलित होत नाही त्या दु:खाच्या संबंध लेशाने शून्य अशा सुखाला योग ही संज्ञा आहे असे जाणावे. आलस्यदोषशून्य अंत:करणाने युक्त होऊन योगाचे अनुष्ठान करावे.

**व्याकरणम्** - **यत्र** - यत्र क्रि.वि.अ. **योगसेवया** - योग पु. सेवा स्त्री.तृ.ए.व. **निरुद्धम्** - नि+रुध् स.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **चित्तम्** - चित् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **उपरमते** - उप+रम् प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **एव यत्र** - एव यत्र क्रि.वि.अ. **आत्मना** - आत्मन्

पु.तृ.ए.व. **आत्मानम्** - आत्मन् पु.द्वि.ए.व. **पश्यन्** - दृश् प्र.ग.प.प.कर्त.शतृ वि.पु.प्र.ए.व. **आत्मनि** - आत्मन् पु.स.ए.व. **तुष्यति** - तुष् च.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **यत्र** - यत्र क्रि.वि.अ. **यत्** - यत् सर्व.न.द्वि.ए.व. **आत्यन्तिकम्** - अति+अन्तिक न.द्वि.ए.व. **बुद्धिग्राह्यम्** - बुद्धि स्त्री. गृह् द.ग.आ.प.कर्म.यत् प्रत्ययान्त धा.वि.न.द्वि.ए.व. **अतीन्द्रियम्** - अति+इन्द्रिय न.द्वि.ए.व. **सुखम्** - सुख न.द्वि.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.द्वि.ए.व. **वेत्ति** - विद् द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **यत्र** - यत्र क्रि. वि.अ. **अयम्** - इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **स्थितः** - स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **तत्त्वतः** - तत्त्वतस् न. तद्धित तसिल् पंचमी प्रत्ययान्त **न एव** - न एव क्रि.वि.अ. **चलति** - चल् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **यम्** - यत् सर्व.पु.द्वि.ए.व. **लब्ध्वा** - लभ् प्र.ग.आ.प.त्वान्त अ. **अपरम्** - अपर सर्व.पु.द्वि.ए.व. **लाभम्** - लाभ पु.द्वि.ए.व. **ततः** - ततस् तसिल् प्रत्ययान्त **अधिकम्** - अधिक वि.पु.द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **मन्यते** - मन् च.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **यस्मिन्** - यत् सर्व.पु.स.ए.व. **स्थितः** - स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **गुरुणा** - गुरु वि.पु.तृ.ए.व. **अपि** - अ पि क्रि.वि.अ. **दुःखेन** - दुःख न.तृ.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **विचाल्यते** - वि+चल् द.ग.उ.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **तम्** - तत् सर्व.पु.द्वि.ए.व. **दुःखसंयोगवियोगम्** - दुःख न. संयोग पु. वियोग पु.द्वि.ए.व. **योगसञ्ज्ञितम्** - योग पु. सञ्ज्ञ वि. इतज् तद्धित प्रत्ययान्त पु.द्वि.ए.व. **विद्यात्** - विद् द्वि.ग.प.प.कर्त.विधि लिङ् तृ.पु.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **योगः** - योग पु.प्र.ए.व. **निश्चयेन** - निश्चय पु.तृ.ए.व. **अनिर्विण्णचेतसा** - अ+निर्+विद् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि. चेतस् न.तृ.ए.व. **योक्तव्यः** - युज् च.ग.आ.प.कर्म.विध्यर्थ धा.वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **यत्र** - यस्मिन्निति यत्र = ज्या ठिकाणी**(त.वि.)** **योगसेवया** - योगस्य सेवा-शुश्रुषा योगसेवा तया योगसेवया-योगानुष्ठानेन = योगाची सेवा-योगसेवा त्या योगसेवेने-योगानुष्ठानाने**(ष.त.स.)** **पश्यन्** - पश्यतीति पश्यन् = पहातो असा पहाणारा**(वि.)** **बुद्धिग्राह्यम्** - ग्रहीतुं योग्यं ग्राह्यं बुद्ध्यैव-रजस्तमोमलरहितया सत्त्वमात्रवाहिन्यैव ग्राह्यमिति बुद्धिग्राह्यम् = ग्रहण करण्यास योग्य ग्राह्य बुद्धिनेच रज, तम, मलरहित सत्त्वमात्र ग्रहण करणाऱ्या बुद्धिने ग्राह्य असे बुद्धिग्राह्य**(कर्म.स.)** यद्वा **बुद्धिग्राह्यम्** - बुद्ध्यैव-इन्द्रियनिरपेक्षतया गृह्यत इति बुद्धिग्राह्यम् = बुद्धिग्राह्य-इंद्रियनिरपेक्षबुद्धिनेच ग्रहण केले जाते ते बुद्धिग्राह्य (येथे बुद्धी शब्दाचा अर्थ स्वानुभव आहे अर्थात जे सुख स्वानुभवगम्य आहे)**(कर्म.स.)** **अतीन्द्रियम्** - इन्द्रियाण्यतिक्रम्य वर्तत इत्यतीन्द्रियम्-इन्द्रिय गोचरातीतम् = इंद्रियांना अतिक्रमण करून रहाते असे अतींद्रिय म्ह. इंद्रियांचा विषय नाही**(अव्ययीभाव स.)** **आत्यन्तिकम्** - अन्तम्-नाशमतिक्रम्य वर्तत इत्यत्यन्तमत्यन्तमेवाऽऽत्यन्तिकम्-अनन्तम् = अंताला-नाशाला अतिक्रमण करून रहाते असे अत्यंत अत्यंतच असे आत्यंतिक**(द्वि.त.अव्य.स.)** **अपरम्** - न परमित्यपरम् = नाही पर असा अपर**(न.त.स.)** **दुःखसंयोगवियोगम्** - दुःखैः संयोगो दुःखसंयोगस्तेन वियोगो दुःखसंयोगवियोगस्तं दुःखसंयोगवियोगम् = दुःखांशी जो संयोग तो दुःखसंयोग त्याच्याशी जो वियोग तो दुःखसंयोगवियोग त्या दुःखसंयोगवियोगाला **(तृ.त.ग.तृ.त.स.)** यद्वा **दुःखसंयोगवियोगम्** - अत्र दुःखशब्देन तदनुबन्धि वैषयिकं सुखञ्च गृह्यते । सदुःखानाम्-आध्यात्मिकादीनां सुखानाञ्च संयोगः-संसर्गस्तेन वियोगो यस्य स दुःखसंयोगवियोगः-अप्रकाशितबाह्यसुखदुःखप्रत्ययो योन्तःकरणस्थितिविशेषस्तं दुःखसंयोगवियोगम् = या ठिकाणी दुःखशब्दाने त्याच्या संबंधी विषय सुखाचेही ग्रहण केले जाते. आध्यात्मिकादि दुःखांच्या आणि सुखांच्या संयोगाने

ज्याचा वियोग आहे तो दु:खसंयोगवियोग-दु:खसंयोगवियोगकाली ज्यामध्ये बाहेरच्या सुखदु:खांची प्रतीति होत नाही अशी विशेष प्रकारची जी अंत:करणाची स्थिती आहे अशा त्या दु:खसंयोगवियोगाला **(ष.त.ग.तृ.त.ग.ष.ब.स.)** **अनिर्विण्णचेतसा** - न निर्विण्णमित्यनिर्विण्णम्-निर्वेदरहितश्च तच्चेत:-अंत:करणश्चेत्यनिर्विण्णचेतस्तेनाऽनिर्विण्णचेतसा = नाही खिन्न असे अखिन्न-खेदरहित ते अंत:करण अनिर्विण्णचेत त्या खेदरहित अंतकरणाने **(न.त.ग.कर्म.स.)** **योगसंज्ञितम्** - योग इति संज्ञितं संज्ञा यस्य स योगसंज्ञितस्तं योगसंज्ञितम् = योग ज्याची संज्ञा आहे तो योगसंज्ञित त्या योगसंज्ञिताला **(ब.स.)** यद्वा **योगसंज्ञितम्** - योग: संजातोऽस्य योगसंज्ञितस्तं योगसंज्ञितम् = योग संज्ञा म्हणजे नाव ह्याचे तो योगसंज्ञित त्या योगसंज्ञेला अर्थात दु:खसंयोगाच्या वियोगाला योग ही संज्ञा आहे असे समजावे **(त.वि.)**

**सङ्कल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषत: ।**

**मनसैवेन्द्रियग्रामं विनियम्य समन्तत: ॥२४॥**

**शनै: शनैरुपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया ।**

**आत्मसंस्थं मन: कृत्वा न किञ्चिदपि चिन्तयेत् ॥२५॥**

**अन्वय:** - सङ्कल्पप्रभवान्, सर्वान्, कामान्, अशेषत:, त्यक्त्वा, मनसा, एव, इन्द्रियग्रामम्, समन्तत:, विनियम्य, धृतिगृहीतया, बुद्ध्या, शनै:, शनै:, उपरमेत्, मन:, आत्मसंस्थम्, कृत्वा, किञ्चित्, अपि, न, चिन्तयेत् ।

**अन्वयार्थ:** - **सङ्कल्पप्रभवान्** - संकल्पापासून उत्पन्न होणाऱ्या अशा **सर्वान्, कामान्** - सर्व कामांना **अशेषत:** - संपूर्णपणे **त्यक्त्वा** - टाकून **मनसा एव** - विवेकसहित मनानेच **इन्द्रियग्रामम्** - इंद्रियसंघाताला **समन्तत:** - सर्व बाजूंनी **विनयम्य** - स्वाधीन करून **धृतिगृहीतया** - धैर्याने निगृहीत अशा **बुद्ध्या** - बुद्धीने **शनै: शनै:** - हळूहळू **उपरमेत्** - बाह्यप्रपंचापासून उरपम करावा **मन:** - मनाला **आत्मसंस्थम्, कृत्वा** - आत्म्यामध्ये स्थापित करून **किञ्चित्, अपि न चिन्तयेत्** - परमात्म्या शिवाय अन्य कोणत्याहि प्रकारचे चिंतन करू नये.

**विवरण** - संकल्पापासून उत्पन्न संपूर्ण कामनांचा सर्वत: परित्याग करून, अंत:करणाने संपूर्ण इंद्रियांचे सर्व बाजूंनी नियमन करून, धैर्ययुक्त निगृहीत बुद्धिने हळू-हळू बाह्य विषयापासून मनाचा उपरम करावा आणि मनाला आत्म्याच्या ठिकाणी स्थिर करून बाह्य तसेच अंतर अन्य कशाचेही चितंन करू नये.

**व्याकरणम्** - **सङ्कल्पप्रभवान्** - सङ्कल्प पु. प्रभव पु.द्वि.ब.व. **सर्वान्** - सर्व सर्व.पु.द्वि.ब.व. **कामान्** - काम पु.द्वि.ब.व. **अशेषत:** - शिष् स.ग.प.प.+अच्+तसिल्=अशेषतस् अ. **त्यक्त्वा** - त्यज् प्र.ग.प.प.त्वान्त अ. **मनसा** - मनस् न.तृ.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **इन्द्रियग्रामम्** - इन्द्रिय न. ग्राम पु.द्वि.ए.व. **समन्तत:** - समन्ततस् क्रि.वि.अ. **विनयम्य** - वि+नि+यम् प्र.ग.प.प.ल्यबन्त अ. **धृतिगृहीतया** - धृति स्त्री. गृह् द.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.स्त्री.तृ.पु.ए.व. **बुद्ध्या** - बुद्धि स्त्री.तृ.ए.व. **शनै:शनै:** - शनैस् क्रि.वि.अ. **उपरमेत्** - उप+रम् प्र.ग.प.प.कर्त.विधिलिङ् तृ.पु.ए.व. **मन:** - मनस् न.द्वि.ए.व. **आत्मसंस्थम्** - आत्मन् पु. सम्+स्थ वि.पु.द्वि.ए.व. **कृत्वा** - कृ अ.ग.उ.प.त्वान्त अ. **किञ्चित् अपि न** - किञ्चित् अपि न क्रि.वि.अ. **चिन्तयेत्** - चिन्त् द.ग.प.प.कर्त.विधिलिङ् तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **इन्द्रियग्रामम्** - इन्द्रियाणां ग्राम:-समूहस्तमिन्द्रियग्रामम् = इंद्रियांचा गाव-समूह त्या इं

द्रियग्रामाला**(ष.त.स.) सङ्कल्पप्रभवान्** - सङ्कल्प: प्रभव:-उत्पत्तिर्येषां कामानां ते सङ्कल्पप्रभवा: कामास्तान् सङ्कल्पप्रभवान् कामान् = संकल्पप्रभव-उत्पत्ति ज्यांची कामांची ते संकल्पप्रभवकाम त्या संकल्पप्रभवांना कामांना**(ष.ब.स.)** यद्वा **सङ्कल्पप्रभवान्** - पदार्थेषु समीचीनत्वकल्पनमेव सङ्कल्पस्तस्मात् प्रभवन्तीति सङ्कल्पप्रभवास्तान् सङ्कल्पप्रभवान् = पदार्थांच्याठिकाणी समीचीनत्व-चांगली कल्पना ही संकल्प आहे त्या पासून उत्पत्ति असे ते संकल्पप्रभव त्या संकल्पप्रभवांना**(क.ग.पं.त.स.) कामान्** - काम्यन्त इति कामास्तान् कामान् = इच्छा केल्या जातात असे काम त्या कामांना**(वि.) धृतिगृहीतया** - धृत्या-धैर्येन गृहीता-निगृहीता धृतिगृहीता तया धृतिगृहीतया-बुद्ध्या = धृतिने-धैर्याने गृहीत म्ह. धैर्याने युक्त अशा बुद्धीने**(तृ.त.स.) आत्मसंस्थम्** - तिष्ठति तत्स्थं आत्मन्येव स्वस्मिन्नेव सम्यक् स्थम् यस्य तद् मन: आत्मसंस्थम् = राहतो ते स्थान आत्म्यामध्येच-स्वत:मध्येच चांगले ठिकाण ज्याचे ते मन आत्मसंस्थ**(स.त.ग.ष.ब.स.)** यद्वा **आत्मसंस्थम् -** आत्मनि-निरुपाधिके प्रतीचि संस्था समाप्तिर्यस्य तदात्मसंस्थम् = आत्म्यामध्ये-निरूपाधिक प्रत्यगात्म्यामध्येच आहे संस्था-समाप्ति ज्याची असे ते मन आत्मसंस्थ**(स.त.ग.ष.ब.स.)** यद्वा **आत्मसंस्थम् -** आत्मनि संस्थितम्-आत्मैव सर्वं न ततोऽन्यत् किञ्चिदस्तीत्येवमात्मसंस्थं कृत्वा = आत्म्यामध्ये संस्थित-आत्माच सर्व आहे त्याहून दुसरे काही नाही अशा प्रकारे मनाला आत्मसंस्थ करून**(स.त.पु.स.)**

**यतो यतो निश्चरति मनश्चञ्चलमस्थिरम् ।**

**ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥२६॥**

**अन्वय: -** मन:, चञ्चलम्,अस्थिरम्, यत:, यत:, निश्चरति, तत:,तत:, एतत्, नियम्य, आत्मनि, एव, वशम्, नयेत् ।

**अन्वयार्थ: - मन:**- अंत:करण **चञ्चलम्** - रागादि प्रकृतिदोषामुळे चंचल व त्यामुळे **अस्थिरम् -** स्थिर न होऊन **यत: यत:** - ज्या ज्या शब्दादि विषयांच्या योगाने **निश्चरति** - बाहेर संचरण करते अर्थात आत्मस्वरूपापासून दूर होते **तत: तत: -** त्या त्या शब्दादि विषयापासून **एतत् -** त्याला **नियम्य -** स्वाधीन करून **आत्मनि एव -** आत्मस्वरूपामध्येच **वशम् -** स्थिर करून **नयेत् -** त्यामध्ये प्रलीन करावे.

**विवरण** - रागादि दोषाने ग्रस्त झाल्यामुळे अस्थिर आणि वासनाच्या वेगाने चञ्चल मन ज्या ज्या विषयाकरिता बाहेर जाते त्या त्या विषयापासून नियमन करून त्या मनाला आत्म्याच्या ठिकाणी स्थिर करावे.

**व्याकरणम्- मन:** - मनस् न.प्र.ए.व. **चञ्चलम्** - चञ्चल वि.न.प्र.ए.व. **अस्थिरम्** -अ+स्थिर वि.न.प्र.ए.व. **यत: यत:** - यतस् क्रि.वि.अ. **निश्चरति** - निस्+चर् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **तत: तत:** - ततस् क्रि.वि.अ. **एतत् -** एतत् सर्व.न.द्वि.ए.व. **नियम्य -** नि+यम् प्र.ग.प.प.ल्यबन्त अ. **आत्मनि** - आत्मन् पु.स.ए.व. **एव -** एव क्रि.वि.अ. **वशम् -** वश वि.न.द्वि.ए.व. **नयेत्** - नी प्र.ग.प.प.कर्त.विधिलिङ् तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - अस्थिरम्** - न स्थिरमित्यस्थिरम् = नाही स्थिर असे अस्थिर**(न.त.स.) आत्मनि** - सर्व स्मिन् अतति-सर्वान् व्याप्नोतीत्यात्मा तस्मिनात्मनि-आत्मस्थम् = सर्व ठिकाणी जातो अथवा सर्वाला व्यापतो असा आत्मा त्या आत्म्यामध्ये**(वि.)**

**प्रशान्तमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् ।**

**उपैति शान्तरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ।।२७।।**

**अन्वयः -** प्रशान्तमनसम्, शान्तरजसम्, ब्रह्मभूतम्, अकल्मषम्, एनम्, योगिनम्, हि, उत्तमम्, सुखम्, उपैति ।

**अन्वयार्थः - प्रशान्तमनसम्** - ज्याचे मन चांगल्या प्रकारे स्थिर झाले आहे **शान्तरजसम्** - ज्यांचा मोहा दिक्लेशरूपी रजोगुण शांत झाला आहे अशा **ब्रह्मभूतम्** - सच्चिदानंदघन ब्रह्म स्वरूप झालेल्या **अकल्मषम्** - पाप पुण्यादिरहित **एनम्, योगिनम् हि -** अशा या प्रसिद्ध योग्याला **उत्तमम्, सुखम् -** श्रेष्ठ अतिशयरहित असे सुख **उपैति** - प्राप्त होते.

**विवरण -** ज्याचे मन शांत तसेच रजोगुण व तमोगुणाने रहित धर्माधर्मादि प्रतिबंधशून्य असा जो ब्रह्म स्वरूप झाला अशा योग्याला उत्तम सुखाची प्राप्ती होते.

**व्याकरणम् - प्रशान्तमनसम् -** प्र+शम् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. मनस् न.वि.पु.द्वि.ए.व. **शान्तरजसम् -** शम् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. रजस् न.वि.पु.द्वि.ए.व. **ब्रह्मभूतम् -** ब्रह्मन् न. भू प्र.ग.प.प.कर्म.भू.धा. वि.पु.द्वि.ए.व. **अकल्मषम् -** अकल्मष वि.पु.द्वि.ए.व. **एनम् -** एतत् सर्व.पु.द्वि.ए.व. **योगिनम् -** योगिन् पु. द्वि.ए.व. **हि** - हि क्रि.वि.अ. **उत्तमम्** - उत्तम वि.न.प्र.ए.व. **सुखम्** - सुख न.प्र.ए.व. **उपैति** - उप+इ द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - शान्तरजसम्** - शान्तम्-स्थिरं रजः-रजोगुणो यस्य स शान्तरजास्तं शान्तरजसम् = शांत-स्थिर रजोगुण ज्याचा तो शांतरज त्या शांतरजाला**(ब.स.)** यद्वा **शान्तरजसम्** - नित्यनिरन्तरसमाधिनिष्ठया शान्तो विनष्टो रजोगुणः । रज इति तमसोऽप्युपलक्षणम् । तमोगुणश्च स्वकार्यैः कामक्रोधलोभ मोहाहंकारममकारादिभिः सह यस्य स शान्तरजास्तं शान्तरजसम् = नित्य निरंतर समाधिनिष्ठेने नष्ट झाला रज -रजोगुण-रजशद्ब तमोगुणाचे उपलक्षण आहे. तमोगुणाचे कार्य काम, क्रोध, लोभ, मोह, अहंकार, ममकारा दिच्या बरोबर नष्ट झाला रज ज्याचा तो शांतरज त्या शांतरजाला**(ब.स.) प्रशान्तमनसम्** - प्रकर्षेण शान्तम्-प्रशान्तम् विषयाकारतामेव समापन्नं मनः-अन्तःकरणं यस्य स प्रशान्तमनास्तं प्रशान्तमनसम् = विशेषरूपाने शांत-प्रशांत विषयाच्या आकाराला प्राप्त झाले नाही ज्याचे मन-अंतःकरण तो प्रशांतमन त्या प्रशांतमनाला **(ब.स.)** यद्वा **प्रशान्तमनसम्** - प्रकर्षेण शान्तं निर्वृत्तिकतया निरुद्धं संस्कारमात्रशेषं मनो यस्य तं प्रशान्तमनसम्-वृत्तिशून्यतया निर्मनस्कम् = विशेषरूपाने शांत-प्रशांत अर्थात निर्वृत्तिकद्वारा निरुद्ध संस्कारमात्रावशिष्ट आहे मन ज्याचे तो प्रशांतमन-वृत्तिशून्याने निर्मनस्क त्याला**(ब.स.) अकल्मषम्** - न विद्यते कल्मषम्-अन्तकरणस्य भेदवासना-अधर्मादिहेतुः पापं यस्य सोऽकल्मषस्तं अकल्मषम् = नाही कल्मष-अंतःकरणाची भेदवासना-अधर्महेतु पाप ज्याचे असा तो अकल्मष त्या अकल्मषाला**(न.ष.ब.स.)** यद्वा **अकल्मषम्** - न विद्यते कल्मषं लयहेतुस्तमो यस्य सोऽकल्मषस्तमकल्मषम्-लयशून्यम् = नाही कल्मष लयाचा हेतुभूत तमोगुण ज्याचा असा तो अकल्मष त्या अकल्मषाला-लयशून्याला**(न.ष.ब.स.)** यद्वा **अकल्मषम्** - अन्तकरणस्य कल्मषं भेदवासनैव राजस्यस्तामस्यः सत्त्वमिश्रीभूतभौतिकगोचरायास्ताः सर्वा न विद्यन्ते यस्य चित्ते सोऽकल्मषस्तमकल्मषम् = अंतःकरणाचा कल्मष भेदवासनाही राजस आणि तामस सत्त्वाने मिश्रीभूत भौतिकाला विषय करणारे जे आहे ते सर्व ज्याच्या चित्तामध्ये नाही तो अकल्मष त्या

अकल्मषाला(**न.ष.ब.स.**) **उत्तमम्** - यस्मादुत्तमं नास्ति तदनुत्तमम् = ज्याच्यापासून उत्तम दुसरा नाही तो अनुत्तम(**न.स.**) **ब्रह्मभूतम्** - ब्रह्मभूतम्-जीवन्मुक्तं ब्रह्म एव सर्वमित्येवं निश्चयवन्तं ब्रह्मभूतम् = ब्रह्मभूत म्हणजे जीवन्मुक्त ब्रह्मच सर्व अशा प्रकारच्या निश्चयाने युक्त असलेला ब्रह्मभूत(**वि.**)

**युञ्जन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः ।**

**सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यन्तं सुखमश्नुते ॥२८॥**

**अन्वयः** - एवम्, सदा, आत्मानम्, युञ्जन्, विगतकल्मषः, योगी, ब्रह्मसंस्पर्शम्, अत्यन्तम्, सुखम्, सुखेन, अश्नुते ।

**अन्वयार्थः - एवम्** - अशा प्रकारे **सदा** - निरंतर **आत्मानम्, युञ्जन्** - मनाला अद्वितीय ब्रह्माच्या ठिकाणी स्थिर करणारा असल्यामुळे **विगतकल्मषः** - वासनाजनित भेददर्शनाने रहित **योगी** - विघ्नरहित योगाभ्यास करणारा योगी **ब्रह्मसंस्पर्शम्** - परब्रह्माशी ज्याचा निकट संबंध आहे अयत्नसिद्ध त्या ब्रह्मस्वरूपाला **अत्यन्तम्** - आत्यंतिक अक्षय नित्य **सुखम्** - सुखाला-सुख **सुखेन** - सहजा सहजी **अश्नुते** - प्राप्त होतो अथवा अनुभवितो.

**विवरण** - चिदानंदघन परिपूर्ण अद्वितीय परमात्म्याच्या ठिकाणी सर्वदा मनाला समाहित केल्यामुळे ज्याचे सर्व पाप नाहीसे झाले आहे, असा योगी अनायास ब्रह्मसाक्षात्काररूप असीम अक्षय सुखाला प्राप्त होतो.

**व्याकरणम् - एवम् सदा** - एवम् सदा क्रि.वि.अ. **आत्मानम्** - आत्मन् पु.द्वि.ए.व. **युञ्जन्** - युज् स.ग.प.प.कर्त.शतृ वि.पु.प्र.ए.व. **विगतकल्मषः** - वि+गम् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. कल्मष वि.पु.प्र.ए.व. **योगी** - योगिन् पु.प्र.ए.व. **ब्रह्मसंस्पर्शम्** - ब्रह्मन् न. सम्+स्पर्श पु.द्वि.ए.व. **अत्यन्तम्** - अत्यन्त वि.न.द्वि.ए.व. **सुखम्** - सुख न.द्वि.ए.व. **सुखेन** - सुख न.तृ.ए.व. **अश्नुते** - अश् पं.ग.आ.प.कर्त.लट्.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - विगतकल्मषः** - विगतम्-निवृत्तम्, कल्मषम्-पापं यस्य स विगतकल्मषः = गेले-निवृत्त झाले कल्मष-पाप ज्याचे तो विगतकल्मष(**ष.ब.स.**) यद्वा **विगतकल्मषः** - गतम्-विगतम्-निःशेषविनष्टं कल्मषम्-वासनाकृतभेददर्शनलक्षणं यस्य स विगतकल्मषः = गत-विशेषरूपाने नष्ट झालेले कल्मष-वासनाकृत भेददर्शन ज्याचे तो विगतकल्मष(**ष.ब.स.**) **ब्रह्मसंस्पर्शम्** - ब्रह्मणा-ब्रह्मात्मना संस्पर्शः यस्य तद् ब्रह्मसंस्पर्शं सुखम्-ब्रह्माभिन्नं चिदेकरसं सुखम् = परब्रह्माशी ज्याचा संस्पर्श-संबंध आहे ते ब्रह्मसंस्पर्शसुख-ब्रह्माभिन्न चिदेकरससुख(**ब.स.**) यद्वा **ब्रह्मसंस्पर्शम्** - संस्पृश्यते गृह्यतेऽनेनेति संस्पर्शः स्वरूपं ब्रह्मैव संस्पर्शो यस्य तद् ब्रह्मसंस्पर्शम् = ज्याच्याद्वारा ग्रहण केले जाते ते संस्पर्श, स्वरूपब्रह्मच संस्पर्श आहे ज्याचा ते ब्रह्मसंस्पर्श(**ब.स.**) **अत्यन्तम्** - अन्तम्-नाशमतीत्याऽतिक्रम्य वर्तत इत्यत्यन्तम्-उत्कृष्टम् = अंत-नाश उल्लंघून-अतिक्रमण करून असते असे अत्यंत(**गति स.**) **युञ्जन्** - युञ्जतीति युञ्जन् = जोडतो असा जोडणारा(**कृ.वि.**)

सर्वत्र आत्मदर्शनाचे कथन -

**सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।**

**ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥२९॥**

**अन्वय:** - योगयुक्तात्मा, सर्वत्र, समदर्शन:, आत्मानम्, सर्वभूतस्थम्, च, सर्वभूतानि, आत्मनि, ईक्षते ।

**अन्वयार्थ:** - **योगयुक्तात्मा** - ज्याचे मन योगाने युक्त म्ह. स्थिर आहे **सर्वत्र समदर्शन:** - आणि चिरकाल योगाच्या अभ्यासाने ज्याचे ज्ञान सर्व प्राणिमात्राच्या ठिकाणी सम आहे असा तो **आत्मानम्** - आपल्या आत्म्याला **सर्वभूतस्थम्** - सर्वप्राणिमात्रामध्ये स्थित **च सर्वभूतानि** - व सर्वप्राणिमात्रांना **आत्मनि** - आत्मस्वरूपामध्ये **ईक्षते** - पाहतो.

**विवरण** - योगाने ज्याचे अंत:करण समाहित झाल्यामुळे चिरकाळ योगाभ्यासाने सर्व ठिकाणी ज्याची समदृष्टी झाली असा तो योगी प्राणिमात्राच्या ठिकाणी आत्म्यास व आत्म्याच्या ठिकाणी प्राणिमात्रास पाहतो अर्थात सर्व ठिकाणी आत्मस्वरूपाने पाहतो.

**व्याकरणम् - योगयुक्तात्मा** - योग पु. युक्त-युज् च.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि. आत्मन् पु.प्र.ए.व. **सर्वत्र** - सर्वत्र क्रि.वि.अ. **समदर्शनम् -** सम वि. दर्शन न.वि.पु.द्वि.ए.व. **आत्मानम्** - आत्मन् पु.द्वि.ए.व. **सर्वभूतस्थम्** - सर्व वि. भूत वि. स्थ वि.पु.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **सर्वभूतानि** - सर्व वि. भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.द्वि.ब.व. **आत्मनि** - आत्मन् पु.स.ए.व. **ईक्षते** - ईक्ष् प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **सर्वभूतस्थम्** - सर्वाणि च तानि भूतानि सर्वभूतानि सर्वभूतेषु-स्थावरजंगमेषु तिष्ठतीति सर्वभूतस्थम् = सर्व आणि ती भूते सर्वभूते त्यामध्ये-स्थावर जंगमामध्ये रहातो अशा त्या सर्वभूताला **(कर्म.ग.स.त.स.) सर्वभूतानि** - सर्वाणि च तानि भूतानि च सर्वभूतानि = सर्व आणि भूते सर्वभूते त्या सर्वभूतांना**(कर्म.स.) योगयुक्तात्मा** - योगेन-वृत्तिनिरोधरूपयोगेन युक्त:-समाहित आत्मा-अन्त:करणं यस्य स योगयुक्तात्मा = योगाने-वृत्ति निरोधरूप योगाने युक्त-समाहित आत्मा-अंत:करण ज्याचे तो योगयुक्तात्मा **(ष.ब.स.)** यद्वा **योगयुक्तात्मा** - पुरुषं परमपुरुषार्थेन योजयति सङ्घट्टयतीति योग: बहुजन्मकृतं पुण्यपुञ्जप रिपाकजन्यं प्रत्यग्दर्शनं यस्मिन् सत्येवाऽप्रतिबन्धेन पुरुषस्य मोक्षस्तेन योगेन सम्यग्दर्शनेनैव युक्त आत्मा मनो यस्य स योगयुक्तात्मा = पुरुषाला जो परमपुरुषार्थाबरोबर जोडतो अथवा मिळवून देतो तो योग-अनेक जन्मामध्ये केले गेले पुण्यपुञ्जपाकापासून उत्पन्न सम्यग् दर्शन ज्याच्या होण्यानेही कोणत्याही प्रतिबंधाशिवाय पुरुषाला मोक्ष प्राप्त होतो अशा त्या योगाने-सम्यग्दर्शनाने समाहित अंत:करण ज्याचे तो योगयुक्तात्मा **(ब.स.)** यद्वा **योगयुक्तात्मा** - योगेन निर्विचारवैशारद्यरूपेन युक्त: प्रसादं प्राप्त आत्मा-अन्त:करणं यस्य स योगयुक्तात्मा = निर्विचारवैशारद्यरूप योगाने युक्त प्रसादाला प्राप्त आहे आत्मा-अंत:करण ज्याचे तो योगयुक्तात्मा**(ब.स.) समदर्शन:** - समम्-तुल्यम्, दर्शनम्-ज्ञानं यस्य स समदर्शन: **=** समान-तुल्य दर्शन-आत्मविषयक ज्ञान ज्याचे तो समदर्शन**(ष.ब.स.)** यद्वा **सर्वत्र समदर्शन:** - सर्वेषु ब्रह्मादि स्थावरान्तेषु विषमेषु सर्व भूतेषु समम्-निर्विशेषं ब्रह्मात्मैकत्वविषयं दर्शनम्-ज्ञानं यस्य स सर्वत्र समदर्शन: **=** सर्वत्र समदर्शन-ब्रह्मा दि स्थावरांत सर्व विषम भूतामध्ये ज्याचे सम-निर्विशेष ब्रह्मात्मैकविषय दर्शन-ज्ञान आहे तो सर्वत्र समदर्शन **(ष.ब.स.)** यद्वा **समदर्शन:** - समम्-समभावापन्नम्-विशेषग्रहणनिर्मुक्तं चिरकालयोगाभ्यासवशात् सर्वत्र सन्मात्रग्रहणशीलं दर्शनं यस्य स समदर्शन: **=** सम-समभावाला प्राप्त-विशेषग्रहणाने रहित चिरकाल योगाभ्यासाने सर्वत्र सन्मात्रग्रहणशील दर्शन आहे ज्याचे तो समदर्शन**(ष.ब.स.)**

सर्वत्र परमात्मदर्शनाचे फल -

**यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।**

**तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥३०॥**

**अन्वय:** - य:, माम्, सर्वत्र, पश्यति, च, सर्वम्, मयि, पश्यति, तस्य, अहम्, न, प्रणश्यामि, च, स:, मे, न, प्रणश्यति ।

**अन्वयार्थ:** - **य: माम्, सर्वत्र पश्यति** - जो मला सर्वप्राणिमात्रामध्ये पाहतो **च सर्वम्, मयि पश्यति** - व सर्व प्राणिमात्राला माझ्यामध्ये पहातो **तस्य अहम्, न प्रणश्यामि** - त्याला मी दृष्टि आड होत नाही अर्थात मी त्याला प्रत्यक्ष होतो **च स: मे न प्रणश्यति** - व तो मला दृष्टि आड होत नाही अर्थात तो मला प्रत्यक्ष असतो.

**विवरण** - जो मला-परमात्म्याला सर्वभूतांच्या ठिकाणी पहातो व प्राणिमात्रांस माझ्या ठिकाणी पहातो त्यामुळे मी त्याला कधी परोक्ष होत नाही व अनात्मपदार्थाच्या ठिकाणी तादात्म्याभिमानरहित असल्यामुळे तो मला कधी परोक्ष होत नाही अर्थात सर्वठिकाणी आत्मत्वबुद्धी झाल्यामुळे परस्परांना नेहमी आम्ही अपरोक्ष असतो.

**व्याकरणम्** - **य:** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.पु.द्वि.ए.व. **सर्वत्र** - सर्वत्र क्रि.वि.अ. **पश्यति** - दृश् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **सर्वम्** - सर्व वि.न.द्वि.ए.व. **मयि** - अस्मत् सर्व.स.ए.व. **पश्यति** - दृश् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **तस्य** - तत् सर्व.पु.ष.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **प्रणश्यामि** - प्र+नश् च.ग.प.प.कर्त.लट् वर्त.प्र.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.च.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **प्रणश्यति** - प्र+नश् च.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.प्र.व.

**समासविग्रहार्था:** - **सर्वत्र** - सर्वस्मिन् देश इति सर्वत्र = सर्व देशांमध्ये असे सर्वत्र**(त.वि.)**

सर्वव्यापी परमात्म्याचे एकभावाने ध्यान करणाऱ्या योग्याचे महत्व -

**सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थित: ।**

**सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ॥३१॥**

**अन्वय:** - एकत्वम्, आस्थित:, य:, सर्वभूतस्थितम् , माम्, भजति, स:, योगी, सर्वथा, वर्तमान:, अपि, म यि, वर्तते ।

**अन्वयार्थ:** - **एकत्वम्, आस्थित: य:** - एकत्वाचा पूर्ण आश्रय केलेला असा जो **सर्वभूतस्थितम्, माम्** - सर्वप्राणिमात्रामध्ये स्थित असलेल्या मला **भजति** - भजतो **स: योगी** - तो योगी **सर्वथा वर्तमान: अपि** - देहादि उपाधींनी युक्त असला तरी **मयि** - माझे **वर्तते** - स्वरूप होऊन राहतो-माझ्यामध्येच राहतो.

**विवरण** - जो ब्रह्मवित् योगी सर्वत्र आत्मा आहे अशा एकत्वाचा आश्रय करून सर्व प्राणिमात्राच्या ठिकाणी असलेल्या मला भजतो. प्रारब्धानुसार अनेक प्रकारे उन्मत्त होऊन हवा तसा वागत असला तरी पण तो माझे स्वरूप झालेला असतो.

**व्याकरणम्** - **एकत्वम्** - एकत्व न.द्वि.ए.व. **आस्थित:** - आ+स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **य:** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **सर्वभूतस्थितम्** - सर्व वि. भूत वि. स्थित प्र.ग.प.प.कर्त.भूत.धा.वि.पु.द्वि.ए.व. **माम्**

- अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **भजति** - भज् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **योगी** - योगिन् पु.प्र.ए.व. **सर्वथा** - सर्वथा क्रि.वि.अ. **वर्तमानः** - वृत् प्र.ग.आ.प.कर्त.वर्त.धा.वि.पु.प्र.ए.व. **अपि** - अपि क्रि.वि.अ. **मयि** - अस्मत् सर्व.स.ए.व. **वर्तते** - वृत् प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **सर्वभूतस्थितम्** - सर्वाणि च तानि भूतानि सर्वभूतानि तेषु स्थितः अधिष्ठाणरूपेन व्याप्त इति सर्वभूतस्थितस्तं सर्वभूतस्थितम् = सर्व आणि ती भूते सर्वभूते सर्वभूतामध्ये स्थित असलेला अधिष्ठानरूपाने व्याप्त असलेला असा सर्वभूतस्थित त्यामध्ये स्थित असलेल्या**(कर्म.ग.स.त.स.)** **एकत्वम्** - एकस्य भाव एकत्वम् = एकाचे असणे एकत्व**(त्वल् प्रत्ययान्त त.वि.)** **सर्वथा** - सर्व प्रकारेणेति सर्वथा = सर्व प्रकाराने असे सर्वथा**(थाल् प्रत्ययान्त त.वि.)**

परम योगी पुरुषाचे लक्षण -

**आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।**

**सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥३२॥**

**अन्वयः** - अर्जुन, यः, सर्वत्र, आत्मौपम्येन, सुखम्, वा, यदि, वा, दुःखम्, समम्, पश्यति, सः, परमः योगी, मतः ।

**अन्वयार्थः** - **अर्जुन** - हे अर्जुना! **यः** - जो **सर्वत्र** - सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी **आत्मौपम्येन** - आपल्या आत्मस्वरूप उपमेने **सुखम्, वा यदि वा दुःखम्** - सुख किंवा दुःख **समम्** - सम **पश्यति** - पाहतो **सः** - तो **परमः योगी** - अत्यंत श्रेष्ठ योगी **मतः** - मानलेला आहे असे माझे मत आहे.

**विवरण** - जो योगी आपल्या प्रमाणे सर्व भूतांच्या ठिकाणी सुख दुःख समान पहातो अर्थात जसे सुख मला इष्ट आहे आणि दुःख अनिष्ट आहे म्हणजे तो सर्वांना आपल्याहून भिन्न जानत नाही तो माझ्या दृष्टिने सर्वश्रेष्ठ योगी आहे.

**व्याकरणम्** - **अर्जुन** - अर्जुन पु.संबो.ए.व. **यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **सर्वत्र** - क्रि.वि.अ. **आत्मौपम्येन** - आत्मन् पु. उपम्य न.तृ.ए.व. **सुःखम्** - सुख न.द्वि.ए.व. **वा** - वा उभ.अ. **यदि** - यदि क्रि.वि.अ. **वा** - वा उभ.अ. **दुःखम्** - दुःख न.द्वि.ए.व. **समम्** - सम वि.न.द्वि.ए.व. **पश्यति** - दृश् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **परमः** - परम वि.पु.प्र.ए.व. **योगी** - योगिन् पु.प्र.ए.व. **मतः** - मन् च.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **आत्मौपम्येन** - आत्मा स्वयमेव उपमीयते अनया इति उपमा तस्या उपमाया भाव आत्मौपम्यं तेन आत्मौपम्येन = आत्मा स्वतःच जिच्या योगाने उपमिला जातो ती उपमा तिचा जो भाव ते आत्मौपम्य त्या आत्मौपम्याने**(भावार्थे त.वि.)** यद्वा **आत्मौपम्येन** - सर्वप्राणिसुखदुःखवेदनकर्मण्यात्मा स्वयमेवोपमा दृष्टान्तो यस्य स आत्मौपमस्तस्य भाव आत्मौपम्यं तेन आत्मौपम्येन-स्वसादृश्येन = सर्वप्राणी-मात्राच्या सुख दुःखाच्या ज्ञानरूप कर्मामध्ये आत्माच ज्याची उपमा (दृष्टान्त) आहे असा तो आत्मौपम त्याचा भाव आत्मौपम्य त्या आत्मौपम्याने-आपल्या सादृश्याने**(ब.गर्भि.भावार्थे त.वि.)**

मनाच्या चंचलतेने अर्जुनाचे ध्यानयोगाला आणि मनाच्या निग्रहाला कठीण मानणे-

**अर्जुन उवाच** - अर्जुन म्हणाला

**योऽयं योगस्त्वया प्रोक्त: साम्येन मधुसूदन ।**

**एतस्याहं न पश्यामि चञ्चलत्वात्स्थितिं स्थिराम् ॥३३॥**

**चञ्चलं हि मन: कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् ।**

**तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥३४॥**

**अन्वय:** - मधुसूदन, त्वया, य:, अयम्, योग:, साम्येन, प्रोक्त:, एतस्य, स्थिराम्, स्थितिम्, चञ्चलत्वात्, अहम्, न, पश्यामि, हि, कृष्ण, मन:, चञ्चलम्, प्रमाथि, बलवत्, दृढम्, अहम्, तस्य, निग्रह:, वायो:, इव, सुदुष्करम्, मन्ये ।

**अन्वयार्थ:** - **मधुसूदन** - हे मधुसूदना! **त्वया** - तुझ्या कडून **य: अयम्, योग:** - जो हा योग **साम्येन** - समत्वरूपाने **प्रोक्त:** - सांगितला **एतस्य** - या योगाची **स्थिराम्, स्थितिम्** - निश्चला स्थिती **चञ्चलत्वात्** - मनाच्या अत्यंत अस्थिरतेमुळे **अहम्** - मी **न पश्यामि** - पहात नाही **हि** - कारण की **कृष्ण** - हे कृष्णा! **मन: चञ्चलम्** - मन चंचल **प्रमाथि** - क्षोभकारक शरीर व इंद्रिये यांना अधीन करून व्याकुळ करणारे **बलवत्** - अतिशय दुर्निवार व **दृढम्** - अच्छेद्य आहे-अत्यन्त बळकट आहे **अहम्** - मी **तस्य** - त्याचा **निग्रह:** - निग्रह **वायो: इव** - वायूच्या निग्रहाप्रमाणे **सुदुष्करम्** - अतिदुष्कर-कठीण आहे **मन्ये** - असे मानतो.

**विवरण**- अर्जुन म्हणतो हे मधुसूदना! तू जो हा समदर्शनरूप योग सांगितला परंतु मन हे अतिशय अस्थिर असल्यामुळे माझ्या ठिकाणी निश्चल राहील असे मला वाटत नाही कारण हे कृष्णा! चंचल मन, शरीर व इंद्रियांना परवश करणारे अतिशय दुर्निवार व अच्छेद्य आहे त्याचा निग्रह करणे वायुच्या निग्रहाप्रमाणे अत्यंत कठीण आहे असे मला वाटते.

**व्याकरणम्** - **मधुसूदन** - हे मधुसूदन पु.संबो.ए.व. **त्वया** - युष्मत् सर्व.तृ.ए.व. **य:** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **अयम्** - इदम् सर्व.प्र.ए.व. **योग:** - योग पु.प्र.ए.व. **साम्येन** - साम्य न.तृ.ए.व. **प्रोक्त:** - प्र+वच् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **एतस्य** - एतत् सर्व.पु.ष.ए.व. **स्थिराम्** - स्थिर वि.स्त्री.द्वि.ए.व. **स्थितिम्** - स्थिति स्त्री.द्वि.ए.व. **चञ्चलत्वात्** - चञ्चलत्व वि.न.पं.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **पश्यामि** - दृश् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.प्र.पु.ए.व. **कृष्ण** - पु.संबो.ए.व. **मन:** - मन न.प्र.ए.व. **चञ्चलम्** - चञ्चल वि.न.प्र.ए.व. **प्रमाथि** - प्रमाथिन् न.प्र.ए.व. **बलवत्** - बलवत् वि.न.प्र.ए.व. **दृढम्** - दृढ वि.न.प्र.ए.व. **हि** - हि क्रि.वि.अ. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **तस्य** - तत् सर्व.पु.ष.ए.व. **निग्रहम्** - निग्रह पु.द्वि.ए.व. **वायो:** - वायु पु.ष.ए.व. **इव** - इव क्रि.वि.अ. **सुदुष्करम्** - सु अ. दुष्कर वि.पु.द्वि.ए.व. **मन्ये** - मन् च.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **मधुसूदन** - मधु-मधुनामानं दैत्यं सूदयतीति मधुसूदनस्तत्सम्बुद्धौ हे मधुसूदन = मधु नावाच्या दैत्याला मारतो असा मधुसूदन त्याचे संबोधनामध्ये हे मधुसूदन**(वि.) योग:** - युज्यतेऽनेनेति योग: -कर्मयोग: = जोडल्या जाते ज्याने असा योग-कर्मयोग**(वि.) चञ्चत्वात्** - चञ्चलस्य भाव: चञ्चलत्वं तस्मात् चञ्चलत्वात् = चंचलाचे असणे चंचलत्व त्या चंचलतेमुळे**(भावार्थे त.वि.) कृष्ण** - पापं कर्षतीति/ भक्तजनान् आकर्षतीति कृष्णस्तत्सम्बुद्धौ हे कृष्ण = पापाला आकर्षण करतो अथवा भक्तजनांना आकर्षित

करतो असा कृष्ण संबोधनामध्ये हे कृष्ण**(वि.)** यद्वा **कृष्ण** - भक्तानां पापादिदोषान् सर्वथा निवारयितुमशक्यानपि कृषयति-निवारयति तेषामेव सर्वथा प्राप्तुमशक्यानपि पुरुषार्थानाकर्षति प्रापयतीति वा कृष्णस्तत्सम्बुद्धौ हे कृष्ण = भक्तांच्या पापादिदोषांचे सर्व प्रकारे निवारण करण्यास अशक्य अशा पापादि दोषांचे कर्षण-निवारण करतो त्याचप्रमाणे त्या भक्तांचे सर्वप्रकारे प्राप्त होण्याकरिताही अशक्य अशा पुरुषार्थांचे आकर्षण करतो अर्थात पुरुषार्थ प्राप्त करवून देतो असा कृष्ण त्याचे संबोधनामध्ये हे कृष्ण**(वि.)**

अभ्यासाने व वैराग्याने मन स्वाधीन होण्याचे कथन -

**श्रीभगवानुवाच** - भगवान म्हणाले

**असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।**

**अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते ॥३५॥**

**अन्वयः** - महाबाहो, मनः, दुर्निग्रहम्, चलम् , असंशयम्, तु, कौन्तेय, अभ्यासेन, च, वैराग्येण, गृह्यते ।

**अन्वयार्थः** - **महाबाहो** - हे अर्जुना! **मनः** - मन **दुर्निग्रहम्** - निग्रह करण्यास अत्यंत कठीण आहे व **चलम्** - चंचल आहे यामध्ये **असंशयम्** - काही एक संशय नाही **तु कौन्तेय** - परंतु हे कुंतीपुत्र अर्जुना! **अभ्यासेन** - अभ्यासाने **च** - व **वैराग्येण**- वैराग्याने **गृह्यते** - त्याचा निग्रह करता येतो.

**विवरण** - भगवान श्रीकृष्ण म्हणतात कि, हे अर्जुना! यद्यपि मन हे निःसंशय अस्थिर असून निग्रह करण्याकरिता अतिशय कठीण आहे; तरीसुद्धा हे कुंतीनंदन! अभ्यास आणि वैराग्याच्या द्वारा त्याचा निग्रह होऊ शकतो अर्थात मोठ्या समुद्राच्या प्राशनाहूनही, सुमेरू पर्वताच्या उन्मूलनाहूनही व अग्नीभक्षणाहूनही मनाचा निग्रह करणे कठीण आहे तरीसुद्धा अभ्यास व वैराग्याच्या द्वारा त्याचा निग्रह करता येतो.

**व्याकरणम्** - **महाबाहो** - हे महाबाहु पु.संबो.ए.व. **मनः** - मन न.प्र.ए.व. **दुर्निग्रहम्** - दुर्+निग्रह वि.न.प्र.ए.व. **चलम्** - चल वि.न.प्र.ए.व. **असंशयम्** - अ+संशय न.प्र.ए.व. **तु** - तु उभ.अ. **कौन्तेय** - हे कौन्तेय पु.संबो.ए.व. **अभ्यासेन** - अभि+अस् च.ग.प.प.+घञ्=अभ्यास पु.तृ.ए.व. **च** - च उभ.अ. **वैराग्येण** - वि+रञ्ज्=विराग+ष्यञ्=वैराग्य न.तृ.ए.व. **गृह्यते** - गृह् प्र.ग.आ.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थः** - **महाबाहो** - महान्तौ साक्षान्महादेवेनापि सह कृतप्रहरणौ बाहू यस्य स महाबाहुस्तत्सम्बुद्धौ हे महाबाहो = महान साक्षात शंकराबरोबरही युद्ध-प्रहार करणारे बाहू आहेत ज्याचे तो महाबाहू त्याचे संबोधनामध्ये हे महाबाहो**(ष.ब.स.)** **दुर्निग्रहम्** - दुःखेनापि निगृहितुमशक्यमिति दुर्निग्रहम् = दुःखाने सुद्धा निग्रह करणे अशक्य असे दुर्निग्रह**(वि.)** **असंशयम्** - नास्ति संशयमित्यसंशयम् = नाही संशय असा असंशय **(नञ् त.स.)** यद्वा **असंशयम्** - संशयानामभाव इत्यसंशयस्तमसंशयम् = सशंयाचा अभाव असा असंशय त्या संशय नसलेल्याला**(न.त.स.)** **वैराग्येण** - विगतो रागः-तृष्णा यस्मात् स विरागो विरागस्य भावो वैराग्यं तेन वैराग्येन = गेला आहे राग-तृष्णा ज्याच्यापासून तो विराग विरागाचा भाव वैराग्य त्या वैराग्याने **(ब.ग.भावार्थे त.वि.)**

मनाच्या निग्रहाने ध्यान योगाची प्राप्ती -

**असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः ।**

**वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः ॥३६॥**

**अन्वयः -** असंयतात्मना, योगः, दुष्प्रापः, इति, मे, मतिः, तु, वश्यात्मना, यतता, उपायतः, अवाप्तुम्, शक्यः ।

**अन्वयार्थः** - **असंयतात्मना** - अभ्यास व वैराग्य यांच्या अभावाने ज्याचे अंत:करण स्वाधीन नसते असे त्याच्याकडून **योगः** - योग **दुष्प्रापः** - अत्यंत कष्टाने प्राप्त केला जातो **इति** - अशी **मे** - माझी **मतिः** - बुद्धी आहे **तु** - परंतु **वश्यात्मना** - ज्याने आपले अंत:करण अभ्यास वैराग्य यांच्या द्वारा स्वाधीन करून घेतले आहे व **यतता** - आणखी ज्याने प्रयत्न केला असता त्याच्याकडून **उपायतः** - वर सांगितलेल्या उपायाने योग **अवाप्तुम् शक्यः** - प्राप्त होणे शक्य आहे.

**विवरण** - अभ्यास व वैराग्य यांच्या अभावी ज्याचे अंत:करण स्वाधीन नाही तो योगाला प्राप्त करू शकत नाही परंतु ज्याने आपले मन आपल्या स्वाधीन करून घेतले आणि प्रयत्नशील आहे तो पुरुष योगाला प्राप्त करू शकतो असे माझे मत आहे.

**व्याकरणम्** - **असंयतात्मना** - अ+सम्+यम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. आत्मन् पु.तृ.ए.व. **योगः** - योग पु.प्र.ए.व. **दुष्प्रापः** - दुस्+प्राप वि.पु.प्र.ए.व. **इति -** इति क्रि.वि.अ. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **मतिः** - मन् च.ग.आ.प.+क्तिन्=मति स्त्री.प्र.ए.व. **तु -** तु उभ.अ. **वश्यात्मना** - वश्य वि. आत्मन् पु.तृ.ए.व. **यतता** - यत् प्र.ग.प.प.कर्त.शतृ वि.पु.तृ.ए.व. **उपायतः** - उप+आ+यम् प्र.ग.प.प.तसिल् प्रत्ययान्त वि.पु.प्र.ए.व. **अवाप्तुम्** - अव+आप् पं.ग.प.प.तुमन्त अ. **शक्यः** - शक् प.ग.प.प.+यत्=शक्य वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **असंयातात्मना** - अभ्यासवैराग्याभ्यां असंयत आत्मा-अन्त:करणं यस्य सोऽसंयतात्मा तेन असंयतात्मना = अभ्यास व वैराग्य याच्या योगाने असंयत-अनिगृहीत आत्मा-अंत:करण ज्याचे तो असंयतात्मा त्या असंयतात्म्याकडून**(ष.ब.स.)** यद्वा **असंयातात्मना** - उत्पन्नेऽपि तत्त्वसाक्षात्कारे वेद-न्तव्याख्यानादिव्यासङ्गादालस्यादिदोषाद्वाऽभ्यासवैराग्याभ्यां न संयतः-निरुद्ध आत्मा-अन्त:करणं येन सोऽसंयतात्मा तेन असंयतात्मना = तत्त्वसाक्षात्कार झाल्या नंतरही वेदांतव्याख्यानादिच्या व्यसनाने अथवा आलस्यादि दोषाने अभ्यास आणि वैराग्याच्याद्वारा ज्याने आत्मा-अंत:करणाला संयत-निरुद्ध नाही केले तो असंयतात्मा त्या असंयतात्म्याकडून**(तृ.ब.स.)** यद्वा **असंयतात्मना** - तीव्रमोक्षेच्छावैराग्याभावयुक्तेनासंयतात्मना असंयतो ज्ञातेऽप्यात्मनि तत्तद्वासनया बहिरेव प्रवृत्तिस्ततश्चिरकालं नित्यं निरन्तरमत्यन्तास्थया ब्रह्मण्यस्थापित आत्मा-मनो यस्य सोऽसंयतात्मा तेन असंयतात्मना = तीव्रमोक्षाची इच्छा व वैराग्याचा अभाव याने युक्त असलेले असंयत चित्त आहे, असे असंयत चित्त असल्यामुळे त्यास आत्मज्ञान झाले तरी बाह्य वासनाची प्रवृत्ति संभवते त्यामुळे चिरकालपर्यंत नित्य, निरंतर, अत्यंत आस्थेने युक्त ब्रह्म त्यामध्ये स्थापित नाही झाले आत्मा-मन ज्याचे तो असंयतात्मा त्या असंयतात्म्याकडून**(ष.ब.स.)** **वश्यात्मना** - वैराग्यपरिपाकेन वासनाक्षये सति वश्यः-स्वाधीनो विषयपारतन्त्र्यशून्य आत्मा-अन्त:करणं यस्य स वश्यात्मा तेन वश्यात्मना = वैराग्याच्या परिपाकाने वासनांचा क्षय झाल्यावर वश-स्वाधीन विषयपारतंत्र्याने शून्य-रहित आत्मा-अंत:करण ज्याचे तो वश्यात्मना त्याच्याकडून**(ष.ब.स.)** यद्वा **वश्यात्मना** - अभ्यासवैराग्याभ्यां वश्यत्वमापादित आत्मा मनो

यस्य सोऽयं वश्यात्मा तेन वश्यात्मना = अभ्यास व वैराग्य याच्या योगाने ज्याचा आत्मा-अंत:करण वश्यत्वास प्राप्त झाले आहे-मन ज्याच्या आधीन आहे तो हा वश्यात्मा त्या वश्यात्म्याकडून**(ष.ब.स.)** **दुष्प्राप:** - दु:खेन प्राप्त:-प्राप्तिर्यस्य स दुष्प्राप: = दु:खाने प्राप्ती ज्याची तो दुष्प्राप**(ष.ब.स.)** यद्वा **दुष्प्राप:** - दु:खेनापि प्राप्तुं न शक्यत इति दुष्प्राप: = दु:खानेसुद्धा प्राप्त केल्या जात नाही तो दुष्प्राप**(वि.)** **यतता** - यतती ति यतंस्तेन यतता = प्रयत्न करतो असा प्रयत्न करणारा त्याच्याकडून**(वि.)**

योगभ्रष्ट पुरुषाच्या संबंधाने अर्जुनाचा प्रश्न आणि उभयभ्रष्ट होण्याची शंका करणे -

**अर्जुन उवाच** - अर्जुन म्हणाला

**अयति: श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानस: ।**

**अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति ॥३७॥**

**कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति ।**

**अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मण: पथि ॥३८॥**

**एतन्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषत: ।**

**त्वदन्य: संशयस्यास्य छेत्ता न ह्युपपद्यते ॥३९॥**

**अन्वय:** - कृष्ण, अयति:, श्रद्धया, उपेत:, योगात्, चलितमानस:, योगसंसिद्धिम्, अप्राप्य, काम्, गतिम्, गच्छति, महाबाहो, उभयविभ्रष्ट:, अप्रतिष्ठ:, ब्रह्मण:, पथि, विमूढ:, छिन्नाभ्रम्, इव, न, नश्यति, कच्चित्, कृष्ण, मे, एतम्, संशयम्, अशेषत:, छेत्तुम्, अर्हसि, अस्य, संशयस्य, छेत्ता, त्वत्, अन्य:, न, हि, उपपद्यते ।

**अन्वयार्थ:** - **कृष्ण** - हे कृष्णा! **अयति:** - यत्नशील नसणारा **श्रद्धया उपेत:** - परंतु योगमार्गाविषयीची असणारी जी श्रद्धा त्या श्रद्धेने युक्त असलेला **योगात्, चलतिमानस:** - अंतकाली योगापासून ज्याचे अंत:करण चलित झाले आहे म्हणजे ज्याला योगाचे स्मरण झाले नाही असा तो **योगसंसिद्धिम्** - योगलभ्य फलाला **अप्राप्य** - प्राप्त न करून **काम्, गतिम्** - कोणत्या गतीला **गच्छति** - प्राप्त होतो **महाबाहो** - हे महापराक्रमी श्रीकृष्णा! **उभयविभ्रष्ट:** - कर्मफल व योगफल या दोन्ही फलापासून विभ्रष्ट झाल्यामुळे **अप्र तिष्ठ:** - आधारहीन झालेला **ब्रह्मण: पथि** - ब्रह्मप्राप्तीच्या मार्गामध्ये **विमूढ:** - अत्यंत बुद्धिहीन झालेला तो **छिन्नाभ्रम्, इव** - आपल्या आधारापासून तुटून वेगळ्या झालेल्या मेघाप्रमाणे **न नश्यति कच्चित्** - नाश तर पावत नाही ना? **कृष्ण** - हे कृष्णा! **मे एतम्, संशयम्** - माझ्या ह्या संशयास **अशेषत:** - पूर्णपणे **छेत्तुम्** - नाहीसा करण्याला **अर्हसि** - तू समर्थ आहेस कारण **अस्य संशयस्य छेत्ता** - या संशयाचा नाश करणारा **त्वत् अन्य:** - तुझ्या अतिरिक्त दुसरा कोणी **न हि उपपद्यते** - समर्थ दिसत नाही.

**विवरण**- अर्जुन म्हणतो कि, हे कृष्णा! मनुष्य श्रद्धेने युक्त असला तरी काही कालाने त्याचे मन योगापासून चलित झाल्यामुळे तो कोणत्याही प्रकारचे प्रयत्न करू शकला नाही त्यामुळे त्याला योगसिद्धि प्राप्त झाली नाही असा तो आत्मसाक्षात्काराला प्राप्त न होता कोणत्या गतीला प्राप्त होतो. अभ्युदय व नि:श्रेयस या दोन्हीपासून भ्रष्ट झालेला तो ब्रह्म प्राप्तीच्या मार्गामध्ये आधारहीन-मतिहीन झालेला इतर ढगापासून वेगळ्या

झालेल्या ढगाप्रमाणे नाश तर पावत नाही ना? हे कृष्णा! वर सांगितलेल्या माझ्या संशयाला पूर्णरूपाने निवृत्त करण्याकरिता तू समर्थ आहेस कारण कि, तुझ्याशिवाय दुसरा कोणी उक्त संशयाचे छेदन करण्याकरीता समर्थ नाही.

**व्याकरणम्** - **कृष्ण** - हे कृष्ण पु.संबो.ए.व. **अयतिः** - अ+यति पु.प्र.ए.व. **श्रद्धया** - श्रत्+द्धा=श्रद्धा स्त्री.तृ.ए.व. **उपेतः** - उप+इ द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **योगात्** - योग पु.पं.ए.व. **चलितमानसः** - चल् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. मानस् वि.पु.प्र.ए.व. **योगसंसिद्धिम्** - योग पु. सम्+सिध् क्तिन् प्रत्ययान्त स्त्री.द्वि.ए.व. **काम्** - किम् सर्व.स्त्री.द्वि.ए.व. **गतिम्** - गम् प्र.ग.प.प.+क्तिन्=गति स्त्री.द्वि.ए.व. **गच्छति** - गम् प्र.ग.प.प.कर्त.लट्.वर्त.तृ.पु.ए.व. **महाबाहो** - हे महाबाहु पु.संबो.ए.व. **उभयविभ्रष्टः** - उभय सर्व. वि+भ्रंश् प्र.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **अप्रतिष्ठः** - अ+प्रति+स्था प्र.ग.प.प.+कर्त.क्त भू.धा. वि.पु.प्र.ए.व. **ब्रह्मणः** - ब्रह्मन् न.ष.ए.व. **पथि** - पथिन् पु.स.ए.व. **विमूढः** - वि+मुह् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **छिन्नाभ्रम्** - छिद् स.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि. अभ्र न.द्वि.ए.व. **इव** - इव क्रि.वि.अ. **न** - न क्रि.वि.अ. **नश्यति** - नश् च.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **कच्चित्** - कच्चित् क्रि.वि.अ. **कृष्ण** - कृष्ण पु.संबो.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **एतम्** - एतत् सर्व.पु.द्वि.ए.व. **संशयम्** - संशय पु.द्वि.ए.व. **अशेषतः** - अशेषतस् क्रि.वि.अ. **छेत्तुम्** - छिद् स.ग.उ.प.तुमन्त अ. **अर्हसि** - अर्ह् प्र.ग.प.प.कर्त. लट् वर्त.द्वि.पु.ए.व. **अस्य** - इदम् सर्व.पु.ष.ए.व. **संशयस्य** - संशय पु.ष.ए.व. **छेत्ता** - छिद् तृच् प्रत्ययान्त प्र.ए.व. **त्वत्** - युष्मत् सर्व.पं.ए.व. **अन्यः** - अन्य सर्व.पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **हि** - हि क्रि.वि.अ. **उपपद्यते** - उप+पद् च.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **चलितमानसः** - चलितम्-भ्रष्टम्-योगफलमप्राप्तं मानसं अन्तःकरणं यस्य स च लितमानसः = चलित भ्रष्ट योगफलाला प्राप्त न झालेले मानस अंतःकरण ज्याचे तो चलितमानस**(ष.ब.स.)** यद्वा **चलितमानसः** - योगादन्तकालेऽपि चलितं मानसम्-मनो यस्य स चलितमानसः-भ्रष्टस्मृतिः = अंतकालीही ज्याचे मन चलित झाले आहे असा तो चलितमानस-भ्रष्टस्मृति झालेला**(ष.ब.स.)** यद्वा **च लितमानसः** - योगाच्छ्रवणादिपरिपाकलब्धजन्मनस्तत्त्वसाक्षात्काराच्चलितं तत्फलमप्राप्तं मानसं यस्य स च लितमानसः = योगापासून-श्रवणादिच्या परिपाकाने उत्पन्न झालेला तत्त्वसाक्षात्कारापासून फल प्राप्त केल्या शिवाय ज्याचे मन चलित तो चलितमानस**(ष.ब.स.)** यद्वा **चलितमानसः** - ब्रह्मैवाऽहमिति ब्रह्मण्येवाऽऽत्मना धीनैश्चल्यं योगस्तस्माद्योगादन्तकालेऽन्यथा वा चलितं बाह्यवासनया दुष्कर्मणा च विपरीतभावापन्नं मानसं यस्य स चलितमानसः = ब्रह्मच मी आहे अथवा ब्रह्ममध्येही आत्मरूपाने बुद्धिचे निश्चल होणे योग या योगाने अंतकालाच्यावेळी अथवा अन्यथा चलित बाह्यवासनाने आणि दुष्कर्माने विपरीतभावाला प्राप्त आहे मन ज्याचे तो चलितमानस**(ष.ब.स.)** **योगसंसिद्धिम्** - योगस्य-कर्मयोगस्य, सम्यक्-सुष्ठुः सिद्धिः-प्राप्तिरिति योगसंसिद्धिस्तां योगसंसिद्धिम् = योगाची-कर्मयोगाची चांगल्याप्रकारे सिद्धि-प्राप्ती त्या योगसंद्धिला **(ष.त.स.)** **अयतिः** - यतते-इति यति र्नयतिरयतिः = प्रयत्न करतो असा प्रयत्न करणारा नाही प्रयत्न करणारा असा अयति**(न.त.स.)** **उभयविभ्रष्टः** - उभयस्मादर्थात् कर्ममार्गात् योगामार्गाच्च विभ्रष्टः-विच्छिन्न इत्युभयविभ्रष्टः = कर्ममार्गापासून किंवा योगमार्गापासून भ्रष्ट झालेला असा उभयविभ्रष्ट**(पं.त.स.)** **विमूढः** - विशेषेण मूढ इति विमूढो ब्रह्मप्राप्तिमार्गे-ज्ञाने विमूढः-विचित्तः-विक्षिप्त इति विमूढः = विशेषरूपाने मूढ असा विमूढ ब्रह्मप्राप्तीमार्गामध्ये-ज्ञानामध्ये विमूढ-विक्षिप्तचित्त असा विमूढ**(स.त.स.)** यद्वा **विमूढः** - विशिष्य

मूढो विमूढ:-प्रतिबन्धककर्मदोषेण विपरीतभावं प्राप्त: समाधिनिष्ठाप्रच्युत: = विशेषकरून मूढ असा विमूढ-प्रतिबंधक कर्माच्या दोषाने विपरीतभावाला प्राप्त अर्थात समाधिनिष्ठेपासून पतित**(वि.)** **अप्रतिष्ठ:** - प्रतितिष्ठत्यनयेति प्रतिष्ठा आधारस्तद्रहितोऽप्रतिष्ठ:-निराश्रय:-ज्ञानकर्मान्यतरालम्बनरहित: = स्थापना केली जाते जिच्याद्वारा अशी प्रतिष्ठा-आधार तिने रहित अप्रतिष्ठ-निराश्रय अर्थात ज्ञानकर्मसाधनांनी रहित असा अप्रतिष्ठ**(न.त.स.)** यद्वा **अप्रतिष्ठ:-** अविद्यमाना प्रतिष्ठा यस्य सोऽप्रतिष्ठ: = नाही प्रतिष्ठा ज्याची तो अप्रतिष्ठ**(न.त.स.)** **अशेषत:** - न शेषत इत्यशेषत: = नाही अपूर्ण असा पूर्ण**(न.त.स.)**

**श्रीभगवानुवाच** - भगवान म्हणाले

**पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते ।**

**न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ॥४०॥**

**अन्वय:** - पार्थ, तस्य, विनाश:, इह, न, एव, अमुत्र, न, विद्यते, हि, तात, कश्चित् , कल्याणकृत्, दुर्गतिम्, न, गच्छति ।

**अन्वयार्थ:** - **पार्थ** - हे अर्जुना! **तस्य** - त्या पुरुषाचा **विनाश:** - विनाश **इह** - इह लोकी **न एव** - होत नाही (**च** - व) **अमुत्र** - परलोकीसुद्धा **न विद्यते** - होत नाही **हि** - कारण **तात** - अरे बाबा! **कश्चित्** - कोणीही पुरुष **कल्याणकृत्** - शुभकर्म करणारा **दुर्गतिम्** - दुर्गतीला **न गच्छति** - प्राप्त होत नाही.

**विवरण** - वर सांगितलेल्या प्रमाणे दोन्हीपासून भ्रष्ट झालेला असा तो त्याचा इहलोकी अथवा परलोकी विनाश होत नाही. कारण की, हे अर्जुना! शुभकर्माचे अनुष्ठान करणारा कोणीही दुर्गतिला प्राप्त होत नाही.

**व्याकरणम्** - **पार्थ** - हे पार्थ पु.संबो.ए.व. **तस्य** - तत् सर्व.पु.ष.ए.व. **विनाश:** - वि+नाश पु.प्र.ए.व. **इह** - इह क्रि.वि.अ. **न एव** - न एव क्रि.वि.अ. **अमुत्र** - अमुत्र क्रि.वि.अ. **न** - न क्रि.वि.अ. **विद्यते** - विद् च.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **तात** - तात पु.संबो.ए.व. **कश्चित्** - चित् प्रत्ययान्त किम् सर्व.पु.प्र.ए.व. **कल्याणकृत्** - कल्याण वि. कृत् वि.पु.प्र.ए.व. **दुर्गतिम्** - दुर्+गम्+क्तिन्-दुर्गति स्त्री. द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **गच्छति** - गम् प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **कल्याणकृत्** - करोतीतिकृत् कल्याणस्य-मंगलस्य कृदिति कल्याणकृत् = करतो असा करणारा कल्याणाचे-मंगलाचे कल्याण करणारा कल्याणकृत्**(ष.त.स.)** यद्वा **कल्याणकृत्** - कल्याणम्-मंगलं करोतीति कल्याणकृत् = कल्याणास-मंगलास करतो असा कल्याणकृत्**(उपपद स.)** **दुर्गतिम्** - दुष्टाश्चासौ गतिश्च दुर्गतिस्तां दुर्गतिम् = दुष्ट आणि गती दुर्गति त्या दुर्गतीला**(कर्म.स.)**

योगभ्रष्ट पुरुषाला स्वर्गलोक आणि पवित्र धनवानाच्या घरामध्ये जन्म प्राप्त होण्याचे कथन -

**प्राप्य पुण्यकृतां लोकानुषित्वा शाश्वती: समा: ।**

**शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥४१॥**

**अन्वय:** - योगभ्रष्ट:, पुण्यकृताम्, लोकान्, प्राप्य, शाश्वती:, समा:, उषित्वा, शुचीनाम्, श्रीमताम्, गेहे, अभिजायते ।

**अन्वयार्थ:** - **योगभ्रष्ट:** - योगमार्गापासून भ्रष्ट झालेला योगी **पुण्यकृताम्** - पुण्यकर्म करणाऱ्या श्रेष्ठ **लोकान्**

- लोकाला **प्राप्य** - प्राप्त होऊन **शाश्वती: समा:** - पुष्कळ वर्षापर्यंत **उषित्वा** - त्या लोकी राहून **शुचीनाम्, श्रीमताम्, गेहे** - शास्त्रोक्त आचरण करणाऱ्या श्रीमंताच्या कुलामध्ये **अभिजायते** - जन्म घेतो.

**विवरण** - योगभ्रष्ट पुरुष पुण्यकर्माने संपादित स्वर्गादि लोकाला जाऊन त्या ठिकाणी पुष्कळ वर्षे वास केल्यानंतर शुद्धाचरण करणाऱ्या श्रीमंत लोकाच्या कुलामध्ये जन्म घेतो.

**व्याकरणम् - योगभ्रष्ट:** - योग पु. भ्रंश् प्र.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **पुण्यकृताम्** - पुण्य वि. कृत् वि.पु.ष.ब.व. **लोकान्** - लोक पु.द्वि.ब.व. **प्राप्य** - प्र+आप् पं.ग.प.प.ल्यबन्त अ. **शाश्वती:** - शाश्वती वि.स्त्री.द्वि.ब.व. **समा:** - समा स्त्री.द्वि.ब.व. **उषित्वा** - वस् प्र.ग.प.प.त्वान्त अ. **शुचीनाम्** - शुचि वि.पु.ष.ब.व. **श्रीमताम्** - श्री+मतुप्-श्रीमत् वि.पु.ष.ब.व. **गेहे** - गेह न.स.ए.व. **अभिजायते** - अभि+जनी प्रादुर्भावे च.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - पुण्यकृताम्** - पुण्यं कुर्वन्ति ते पुण्यकृतस्तेषां पुण्यकृताम् = पुण्य करतात ते पुण्य करणारे त्या पुण्य करणाऱ्यांच्या**(उपपद स.)** यद्वा **पुण्यकृताम्** - कुर्वन्ति ते कृत: पुण्यस्य कृत इति पुण्यकृतस्तेषां पुण्यकृताम् = पुण्य करतात ते पुण्य करणारे त्या पुण्य करणाऱ्यांच्या**(ष.त.स.) योगभ्रष्ट:** - योगात्-कर्मयोगात् भ्रष्ट:-च्युत:-चलितमानस इति योगभ्रष्ट: = योगापासून-कर्मयोगापासून भ्रष्ट-चलितमानस असा योगभ्रष्ट-मनाने स्थिर नसलेला-अस्थिर मनाचा**(पं.त.स.) श्रीमताम्** - श्रीर्विद्यते येषां त इति श्रीमन्तस्तेषां श्रीमताम् = श्री आहे ज्याची ते असे श्रीमंत त्या श्रीमंतांच्या**(अस्त्यर्थे त.वि.)**

वैराग्यवान योगभ्रष्टांना ज्ञानी पुरुषाच्या कुलामध्ये जन्म मिळतो आणि साधनामध्ये स्वाभाविक प्रवृत्ति होण्याचे कथन -

**अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ।**

**एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ।।४२।।**

**अन्वय:** - अथवा, धीमताम्, योगिनाम्, एव, कुले, भवति, लोके, हि, यत्, ईदृशम्, जन्म, एतत्, दुर्लभतरम् ।

**अन्वयार्थ: - अथवा** - किंवा तो योगभ्रष्ट **धीमताम्, योगिनाम्, एव कुले** - बुद्धिमान दरिद्री योगी लोकांच्या कुलामध्ये **भवति** - उत्पन्न होतो **लोके हि** - या लोकी **यत्, ईदृशम्, जन्म** - अशा प्रकारच्या शुद्ध व विद्यावान दरिद्री कुळामध्ये झालेला जन्म **एतत् -** हे **दुर्लभतरम्** - अत्यंत दुर्लभ आहे.

**विवरण** - अथवा वैराग्यशील पुरुष त्या लोकांत न जाता श्रीमंतांच्या भिन्न दरिद्र शुद्ध बुद्धिमान अशा ज्ञानी योगी लोकांच्या कुळामध्ये जन्म घेतो अशा प्रकारचा शुद्ध कुळामध्ये जन्म होणे या लोकामध्ये अत्यंत दुर्लभ आहे.

**व्याकरणम् - अथवा** - उभ.अ. **धीमताम्** - धी+मतुप्-धीमत् वि.पु.ष.ब.व. **योगिनाम्** - योगिन् पु.ष.ब.व. **एव** - क्रि.वि.अ. **कुले** - कुल न.स.ए.व. **भवति** - भू प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **लोके** - लोक पु.स.ए.व. **हि** - क्रि.वि.अ. **यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **ईदृशम्** - ईदृश वि.न.प्र.ए.व. **जन्म** - जन्मन् न.प्र.ए.व. **एतत्** - न.प्र.ए.व. **दुर्लभतरम्** - दुर्+लभ्+अ-दुर्लभ+तरप्-दुर्लभतर वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थः - दुर्लभतरम्** - अतिशयेन दुर्लभमिति दुर्लभतरम् = अतिशयाने दुर्लभ असे दुर्लभतर(**अतिशयार्थे त.वि.**) **धीमताम्** - धीर्विद्यते येषां ते धीमन्तस्तेषां धीमताम् = बुद्धी आहे ज्याची ते बुद्धिवंत त्या बुद्धिवंतांच्या(**अस्त्यर्थे त.वि.**)

**तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ।**

**यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनन्दन ॥४३॥**

**अन्वयः** - तत्र, पौर्वदेहिकम्, तम्, बुद्धिसंयोगम्, लभते, च, कुरुनन्दन, संसिद्धौ, ततः, भूयः, यतते ।

**अन्वयार्थः - तत्र** - त्या दरिद्री ज्ञानवान् योग्यांच्या कुलामध्ये **पौर्वदेहिकम्, तम्, बुद्धिसंयोगम्** - पूर्व जन्मातील त्या बुद्धिसंयोगाला **लभते** - तो योगभ्रष्ट प्राप्त होतो **च कुरुनन्दन** - आणि हे कुरुनंदना! **संसिद्धौ** - योगसिद्धिसाठी **ततः** - पूर्वजन्मातील अभ्यासाच्या संस्कारामुळे **भूयः** - पूर्वीपेक्षाही अत्यधिकच **यतते** - प्रयत्न करतो.

**विवरण** - तेथे त्या पहिल्या शरीरात संग्रह केलेल्या बुद्धिसंयोगाला म्हणजे समत्वबुद्धिरूप योगाच्या संस्कारांना अनायासे प्राप्त होतो आणि हे कुरुनंदना! बुद्धिमान योगी पुरुषाच्या कुळामध्ये जन्म झाल्यामुळे पूर्वजन्मीच्या संस्काराने बुद्धियोगाला प्राप्त करतो आणि त्यानंतर तो पुन्हा या जन्मामध्ये योगसिद्धिसाठी पूर्वीपेक्षा अत्यधिक प्रयत्न करतो.

**व्याकरणम् - तत्र** - तत्र क्रि.वि.अ. **पौर्वदेहिकम्** - पार्वदेहिक वि.पु.द्वि.ए.व. **तम्** - तत् सर्व.पु.द्वि.ए.व. **बुद्धिसंयोगम्** - बुद्धि स्त्री. संयोग पु.द्वि.ए.व. **लभते** - लभ् प्र.ग.आ.प.कर्त.लट्.वर्त.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **कुरुनन्दन** - कुरु पु. नन्दन पु.संबो.ए.व. **संसिद्धौ** - सम्+सिध्+क्तिन्-संसिद्धि स्त्री.स.ए.व. **ततः** - ततस् क्रि.वि.अ. **भूयः** - भूयस् क्रि.वि.अ. **यतते** - यत् प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थः - बुद्धिसंयोगम्** - बुद्ध्या-ज्ञानेन पूर्वसंस्कारेण संयोगः-सम्बन्धो बुद्धिसंयोगस्तं बुद्धिसंयोगम् = बुद्धिने-ज्ञानाने पूर्वसंस्काराने संयोग-संबंध बुद्धिसंयोग त्या बुद्धिसंयोगाला(**तृ.त.स.**) **पौर्वदेहिकम्** - पूर्वदेहे-पूर्वजन्मनि भवः पौर्वदेहिकस्तं पौर्वदेहिकम् = पूर्व देहामध्ये-पूर्वजन्मामध्ये असणे पौर्वदेहिक त्या पूर्व देहामध्ये असणाऱ्याला(**भावार्थे त.वि.**)

**पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः ।**

**जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ॥४४॥**

**अन्वयः** - हि, तेन, एव, पूर्वाभ्यासेन, अवशः, अपि, सः, ह्रियते, योगस्य, जिज्ञासुः, अपि, शब्दब्रह्म, अतिवर्तते ।

**अन्वयार्थः - हि** - कारण **तेन एव पूर्वाभ्यासेन** - त्याच पूर्वजन्मी केलेल्या अभ्यासाने **अवशः अपि सः** - तो परवश असलेलाही योगभ्रष्ट **ह्रियते** - योगाभ्यासाकडे ओढला जातो **योगस्य जिज्ञासुः अपि** - योगाचे स्वरूप जाणण्याची इच्छा करणाराही **शब्दब्रह्म** - शब्दब्रह्माचे-वेदोक्त प्रतिपादित सकाम कर्मानुष्ठान फळाचे **अतिवर्तते** - अतिक्रमण करून जातो.

**विवरण** - तो श्रीमंतांच्या घरात जन्म घेणारा योगभ्रष्ट पराधीन असला तरी त्या पहिल्या जन्मीच्या

अभ्यासामुळेच नि:शंकपणे भगवंताकडे आकर्षिला जातो तसेच समबुद्धिरूप योगाचा जिज्ञासूदेखील वेदाने सांगितलेल्या सकाम कर्मांच्या फळांना ओलांडून जातो. संस्काररूप बुद्धिस्थ पूर्वजन्मीच्या अभ्यासाचा वेग त्याची इच्छा नसली तरी योगाभ्यासात त्याला प्रवृत्त करतो. योग संबंधी जिज्ञासु असूनही शब्दब्रह्माचे अ तिक्रमण करतो आणि श्रवणादिकांच्या ठिकाणी प्रवृत्त होतो.

**व्याकरणम् - हि** - हि क्रि.वि.अ. **तेन** - तत् सर्व.पु.तृ.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **पूर्वाभ्यासेन** - पूर्व वि. अभ्यास पु.तृ.ए.व. **अवश:** - अवश वि.पु.प्र.ए.व. **अपि** - अपि क्रि.वि.अ. **स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **ह्रियते** - ह्रि प्र.ग.उ.प.(आ.प.)कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **योगस्य** - योग पु.ष.ए.व. **जिज्ञासु:** - ज्ञा+सन्+उ -जिज्ञासु पु.प्र.ए.व. **अपि** - अपि क्रि.वि.अ. **शब्दब्रम्ह** - शब्द पु. ब्रम्हन् न.द्वि.ए.व. **अतिवर्तते** - अ ति+वृत् प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - पूर्वाभ्यासेन** - पूर्वश्चासौ अभ्यासश्च पूर्वाभ्यासस्तेन पूर्वाभ्यासेन = पूर्व आणि हा अभ्यास पूर्वाभ्यास त्या पूर्वाभ्यासाने**(कर्म.स.)** यद्वा **पूर्वाभ्यासेन** - पूर्वस्मिन्-पूर्वजन्मनि कृतोऽभ्यास: स पूर्वाभ्यासस्तेन पूर्वाभ्यासेन = पूर्व जन्मामध्ये केलेला अभ्यास तो पूर्वाभ्यास त्या पूर्वाभ्यासाने**(मध्यम पदलोपी स.)**

**प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिष: ।**

**अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥४५॥**

**अन्वय:** - तु, प्रयत्नात्, यतमान:, योगी, संशुद्धकिल्बिष:, अनेकजन्म, संसिद्ध:, (भवति), तत:, परां ग तिम्, याति

**अन्वयार्थ:** - **तु** - परंतु **प्रयत्नात्, यतमान: योगी** - अत्यधिक प्रयत्न करणारा योगी **संशुद्धकिल्बिष:** - अज्ञान तसेच तत्कार्यरूप पापाने रहित असा होऊन **अनेकजन्मसंसिद्ध: (भवति)** - अनेक जन्मांतील थोड्या थोड्या अभ्यासाने ज्ञानवान होतो **तत:** - पश्चात योगसंसिद्धिमुळे तो **पराम्, गतिम्** - अत्यंत श्रेष्ठ गतीला-मोक्षाला **याति** - प्राप्त होतो.

**विवरण** - योगसिद्धीसाठी भगीरथ प्रयत्न करणारा योगी प्रयत्नाची पराकाष्ठा झाली असता असा विद्वान निष्पाप होतो निरंतर म्हणजे नियमाने योगमार्गाचे प्रयत्नपूर्वक आचरण करणारा आणि अज्ञान तसेच त्याचे कार्यरूप पाप त्यापासून रहित असणारा योगी अनेक जन्मामध्ये ज्ञानवान होऊन अत्यंत श्रेष्ठ मोक्षाला प्राप्त होतो.

**व्याकरणम् - तु** - तु उभ.अ. **प्रयत्नात्** - प्रयत्न पु.पं.ए.व. **यतमान:** - यत् प्र.ग.आ.प.कर्त.शानच् वि.पु.प्र.ए.व. **योगी** - योगिन् पु.प्र.ए.व. **संशुद्धकिल्बिष:** - सम्+शुध् च.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. किल्बिष वि.पु.प्र.ए.व. **अनेकजन्मसंसिद्ध:** - अनेक वि. जन्मन् न. सम्+सिध् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **तत:** - ततस् क्रि.वि.अ. **पराम्** - पर वि.स्त्री.द्वि.ए.व. **गतिम्** - गति स्त्री.द्वि.ए. व. **याति** - या द्वि.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - संशुद्धकिल्बिष:** - निरंतरसमाधिनिष्ठया सम्यक् शोधितम्-निर्यापितं किल्बिषमज्ञानतत् कार्यलक्षणं यस्य स संशुद्धकिल्बिष: = निरंतर समाधि निष्ठेने उत्तम प्रकारे शुद्ध झाले-गेले अज्ञान आणि

अज्ञानाचे कार्यरूप पाप ज्याचे तो संशुद्धकिल्बिष-निर्मल अंत:करणवाला**(ष.ब.स.)** यद्वा **संशुद्धकिल्बिषः** - निरंतर समाधिनिष्ठया उत्तमप्रकारेणशुद्धम्-धौतम्, किल्बिषम्-ज्ञानप्रतिबंधकपापं यस्य स संशुद्धकिल्बिषः = निरंतर समाधि निष्ठेने उत्तम प्रकारे शुद्ध झाले आहे ज्ञानप्रतिबंधक पाप ज्याचे तो संशुद्धकिल्बिष-निर्मल अंत:करणवाला**(ष.ब.स.)**

**तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ।**

**कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ॥४६॥**

**अन्वयः** - तपस्विभ्यः, योगी, अधिकः, ज्ञानिभ्यः, अपि, अधिकः, मतः, योगी, कर्मिभ्यः, च, अधिकः, तस्मात्, अर्जुन योगी, भव ।

**अन्वयार्थः** - **तपस्विभ्यः** - सांतपन कृच्छ्र चांद्रायणादि तप करणाऱ्यांहून **योगी** - वर सांगितल्याप्रमाणे योगाभ्यास करणारा **अधिकः** - अत्यधिक श्रेष्ठ आहे **ज्ञानिभ्यः अपि** - शास्त्रज्ञानी पुरुषांहूनही योगी **अधिकः मतः** - अत्यधिक श्रेष्ठ मानलेला आहे **योगी** - योगाभ्यासी **कर्मिभ्यः च** - अग्निहोत्रादि कर्मे करणाऱ्यांहून **अधिकः** - अत्यधिक श्रेष्ठ आहे **अर्जुन** - हे अर्जुना! **तस्मात्** - म्हणून तूं **योगी** - योगी **भव** - हो.

**विवरण** - कृच्छ्र, चांद्रायण, सांतपन, पंचाग्नी आदि तप करणाऱ्याहून शास्त्राचे ज्ञान प्राप्त करणाऱ्या ज्ञानी पुरुषाहून तसेच अग्निहोत्रादि कर्माचे अनुष्ठान करणाऱ्या कर्मी पुरुषाहून ध्यानयोगी पुरुष श्रेष्ठ आहे म्हणून ध्यानयोग हे ज्ञानाचे सर्वांहून श्रेष्ठ साधन आहे म्हणूनच प्रत्येक मुमुक्षूने ध्यानयोगी अवश्य झाले पाहिजे हे सुचविण्यासाठी ध्यानयोगाचे श्रेष्ठत्व येथे प्रतिपादिले आहे म्हणून हे अर्जुना! तू ध्यानयोगी हो.

**व्याकरणम्** - **तपस्विभ्यः** - तपस्विन् पु.पं.ब.व. **योगी** - योगिन् पु.प्र.ए.व. **अधिकः** - अधिक वि.पु.प्र.ए.व. **ज्ञानिभ्यः** - ज्ञा+ल्युट्-ज्ञान+इनि-ज्ञानिन् पु.पं.ब.व. **अपि** - अपि क्रि.वि.अ. **अधिकः** - अधिक वि.पु.प्र.ए.व. **मतः** - मन् च.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **योगी** - योगिन् पु.प्र.ए.व. **कर्मिभ्यः** - कर्मन्+इनि-कर्मिन् वि.पु.पं.ब.व. **च** - च उभ.अ. **अधिकः** - अधिक वि.पु.प्र.ए.व. **अर्जुन** - अर्जुन पु.संबो.ए.व. **तस्मात्** - तस्मात् क्रि.वि.अ. **योगी** - योगिन् पु.प्र.व. **भव** - भू प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **तपस्विभ्यः** - तपो येषां ते तपस्विनस्तेभ्यस्तपस्विभ्यः = तप आहे ज्यांचे ते तपस्वी त्या तप करणाऱ्यांहून**(अस्त्यर्थे त.वि.)** **ज्ञानिभ्यः** - ज्ञानं येषां ते ज्ञानिनस्तेभ्यो ज्ञानिभ्यः = ज्ञान आहे ज्यांचे ते ज्ञानी त्या ज्ञान्यांहून**(अस्त्यर्थे त.वि.)** **कर्मिभ्यः** - कर्म येषां ते कर्मिणस्तेभ्यः कर्मिभ्यः = कर्म ज्यांचे ते कर्मी त्या कर्मींहून**(अस्त्यर्थे त.वि.)**

**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना ।**

**श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः ॥४७॥**

**अन्वयः** - सर्वेषाम्, योगिनाम् , अपि, यः, श्रद्धावान्, मद्गतेन, अन्तरात्मना, माम्, भजते, मे, युक्ततमः, मतः ।

**अन्वयार्थः** - **सर्वेषाम्, योगिनाम्, अपि** - विराट, हिरण्यगर्भ, ईश्वर इत्यादिकाचे ध्यान करणाऱ्या दुसऱ्या सर्व

योग्यामध्येही **यः श्रद्धावान्** - जो श्रद्धावान योगी **मद्गतेन अन्तरात्मना** - माझ्या ठिकाणी निश्चल केलेल्या अंतःकरणाने **मां भजते** - माझे भजन करतो **मे युक्ततमः** - तो मला अत्यधिक श्रेष्ठ योगी म्हणून **मतः** - मान्य आहे.

**विवरण** - जो सगुण किंवा निर्गुण भगवंताचे त्याच्या ठिकाणी अंतःकरण मोठ्या श्रद्धेने युक्त होऊन जो पुरुष म्हणजे माझ्या ठिकाणी जडलेल्या अंतःकरणाने सर्वदा अनुसंधान-भक्ति करतो तो संपूर्ण योग्यापेक्षा श्रेष्ठतम योगी आहे असे माझे मत आहे. अर्थात असा माझा सिद्धांत आहे. या अध्यायांत संन्यासाचे साधन असा जो कर्मयोग त्याची मर्यादा, तो कोठपर्यंत आचरावा ते सांगितले व ध्यानयोगाचे विवरण केले. मनोनिग्रहाच्या दोन उपायांचा उपदेश केला. योगभ्रष्टाचा आत्यंतिक नाश होतो की काय या शंकेचे समाधान केले आणि त्वंपदाचा अर्थ जाणणाऱ्या साधकाचे ज्ञाननिष्ठत्व सांगून वाक्यार्थज्ञानाने म्हणजे अपरोक्ष आत्मसाक्षात्काराने मुक्ति मिळते हे सिद्ध केले.

**व्याकरणम्** - **सर्वेषाम्** - सर्व.पु.ष.ब.व. **योगिनाम्** - योगिन् पु.ष.ब.व. **अपि** - अपि क्रि.वि.अ. **यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **श्रद्धावान्** - श्रद्धावत् वि.पु.प्र.ए.व. **मद्गतेन** - अस्मत् सर्व.स.ए.व. गत वि.पु.तृ.ए.व. **अन्तरात्मना** - अन्तर न. आत्मन् पु.तृ.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **भजते** - भज् प्र.ग.आ.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.च.ए.व. **युक्ततमः** - युज् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.तमप् प्रत्ययान्त पु.प्र.ए.व. **मतः** - मन् च.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **मद्गतेन** - मयि-भगवति वासुदेवे पुण्यपरिपाकविशेषाद्गतम्-प्राप्तं प्रीतिवशान्निविष्टं वा तेन मद्गतेन = माझ्यामध्ये म्हणजे भगवंतामध्ये वासुदेवामध्ये पुण्यपरिपाकविशेषापासून अथवा प्रेमापासून प्राप्त झालेला-निविष्ट झालेला त्या मद्रुप झालेल्या**(स.त.स.)**

**ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रम्हविद्यायां योगशास्त्रे**

**श्रीकृष्णार्जुनसंवादे आत्मसंयमयोगो नाम षष्ठोऽध्यायः ॥६॥**

**-: अध्याय सहावा समाप्त :-**

**ॐ श्रीपरमात्मने नम:**

**अथ सप्तमोऽध्याय:**

सहाव्या अध्यायामध्ये ज्ञानयोगामध्ये आरुढ होणाऱ्या इच्छावान पुरुषाकरिता कर्मच साधन आहे. योगामध्ये आरुढ पुरुषाकरिता सर्वकर्मसंन्यास साधन आहे. याप्रमाणे कर्म आणि कर्मसंन्यास दोन्ही क्रमाने चित्तशुद्धि आणि ज्ञानयोगसिद्धिकरिता कारण आहेत असे प्रतिपादन केले आहे. नंतर अंगासह आणि सलक्षण योगाचे निरूपण केले, त्यानंतर योगभ्रष्टाच्या विनाशाची शंका दूर करून, जो ब्रह्मविद आहे त्याची सदा ब्रह्मनिष्ठेमध्ये स्थिती राहिली पाहिजे असे सांगितले. असा जो ब्रह्माच्या निष्ठेमध्ये ब्रह्मविद स्थित राहतो. ते ब्रह्म कशा प्रकारचे आहे, त्याचे लक्षण काय आहे, ब्रह्मवेत्त्याला त्यामध्ये कसे स्थित राहिले पाहिजे, अशा शंकेचे उत्तर म्हणून सातवा अध्याय आहे.

**श्री भगवानुवाच -** भगवान म्हणाले.

**मय्यासक्तमना: पार्थ योगं युञ्जन्मदाश्रय: ।**

**असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु ॥१॥**

**अन्वय:** - पार्थ, मयि, आसक्तमना:, मदाश्रय:, योगम्, युञ्जन्, असंशयम्, समग्रम्, माम्, यथा, ज्ञास्यसि, तत्, शृणु ।

**अन्वयार्थ:** - **पार्थ** - हे अर्जुना! **मयि** - माझ्या ठिकाणी **आसक्तमना:** - ज्याने मन आसक्त केले आहे **मदाश्रय:** - अन्यव्यतिरिक्त ज्याने माझाच आश्रय केला आहे **योगम्, युञ्जन्** - असा तूं योगाचा अभ्यास करणारा **असंशयम्** - संशय रहित **समग्रम्, माम्** - संपूर्ण विभूति, बल, ऐश्वर्यादि पूर्णत्व गुणांनी युक्त अशा मला **यथा** - ज्याप्रमाणे योग्य रीतिने **ज्ञास्यसि** - जाणसील **तत्** - ते **शृणु** - ऐक.

**विवरण** - इहलोक तसेच परलोकाच्या भोगाविषयी ज्याच्या मनामध्ये यत्किञ्चिन्मात्र सुद्धा आसक्ति नाही म्हणजे ज्याने आपले मन परमेश्वराच्या ठिकाणी म्हणजे माझ्या ठिकाणी आसक्त केले आहे आणि ज्याने माझाच आश्रय केला आहे, असा योगाभ्यास करणारा तूं संपूर्ण विभूति, बल, ऐश्वर्यादि समस्त गुणांनी युक्त सर्वांचा आत्मरूप असणाऱ्या अशा मला संशयरहित कसा जाणशील ते मी सांगतो ऐक.

**व्याकरणम्** - **पार्थ** - हे पार्थ पु.संबो.ए.व. **मयि** - अस्मत् सर्व.स.ए.व. **आसक्तमना:** - आ+षञ्ज् प्र.ग.प.प.कर्म.भूत.धा.वि. मनस् न.वि.प्र.ए.व. **मदाश्रय:** - मत् अस्मत् सर्व.प्र.ए.व. आश्रय पु.प्र.ए.व. **योगम्** - योग पु.द्वि.ए.व. **युञ्जन्** - युज् च.ग.आ.प.कर्त.वर्त.धा.वि.पु.प्र.ए.व. **समग्रम्** - समग्र वि.पु. द्वि.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **यथा** - यथा क्रि.वि.अ. **असंशयम्** - अ+संशय पु.द्वि.ए.व. **ज्ञास्यसि** - ज्ञा न.ग.उ.प.(प.प.)द्वि.भवि.द्वि.पु.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.द्वि.ए.व. **शृणु** - श्रु प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **मदाश्रय:** - अहमेव सर्वात्मा सर्वान्तर्यामी भक्तत्राणपरायण: परमेश्वर आश्रय:-आलम्बनम् -शरणं यस्य स मदाश्रय: = मीच सर्वांचा आत्मा, सर्वांचा अंतर्यामी, भक्तरक्षणपरायण परमेश्वर आश्रय म्हणजे आधार आहे ज्याचा तो**(ब.स.)** यद्वा **मदाश्रय:** - मयि परमेश्वरे सकलजगदायतनत्वादिविविधविभू

तिभागिनि आसक्तं विषयान्तरपरिहारेण सर्वदा निविष्टं मनो यस्य स मदाश्रय:-मदेकशरण: = माझ्यामध्ये-सर्व जगाचे आश्रयत्वादि विविध विभूतिसंपन्न परमेश्वरामध्ये आसक्त-अन्य सर्व विषयांचे त्यागपूर्वक सर्वदा नि विष्ट-अवस्थित मन आहे ज्याचे तो मदाश्रय-मदेकशरण**(ब.स.) असंशयम् -** अविद्यमानं संशयं यत्र तदसंशयम् = नाही संशय ज्याच्याठिकाणी ते असंशय**(न.ब.स.) मय्यासक्तमना: -** मयि वक्ष्यमाणविशेषणे परमेश्वरे आसक्तं मनो यस्य स मय्यासक्तमना: = माझ्यामध्ये म्हणजे पुढे सांगितल्या जाणाऱ्या विशेषणांनी युक्त अशा परमेश्वरामध्ये ज्याचे मन आसक्त आहे तो मय्यासक्तमना**(ब.स.)**

**ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषत: ।**

**यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥२॥**

**अन्वय:** - अहम्, ते, इदम्, सविज्ञानम्, ज्ञानम्, अशेषत:, वक्ष्यामि, यत्, ज्ञात्वा, इह, भूय:, अन्यत्, ज्ञातव्यम्, न, अवशिष्यते।

**अन्वयार्थ: - अहम्** - मी **ते** - तुझ्याकरिता **इदम्** - हे **सविज्ञानम्, ज्ञानम्, अशेषत: -** विज्ञानासहित ज्ञान पूर्णपणे **वक्ष्यामि** - सांगेन **यत्** - जे तत्त्वज्ञान **ज्ञात्वा** - अनुभव करून **इह -** या लोकी **भूय:** - पुन्हा **अन्यत्** - दुसरे **ज्ञातव्यम्** - काही जाणणे योग्य **न अवशिष्यते** - अवशिष्ट रहात नाही.

**विवरण** - भगवंताच्या निर्गुण निराकार तत्त्वाचा जो प्रभाव-माहात्म्य आणि रहस्यासहित यथार्थ अनुभव त्याचेच नाव ज्ञान आहे. त्याप्रमाणे त्यांच्या सगुण निराकार आणि दिव्य सगुण साकार तत्त्वाच्या लीला, रहस्य, गुण, महत्त्व आणि प्रभावासहित यथार्थ ज्ञानाचे नाव विज्ञान आहे. अशा या उपर्युक्त कथन केलेल्या विज्ञानासहित अनुभवासहित तत्त्वज्ञानाला संपूर्णतया तुला मी सांगेन अशा त्या ज्ञानाला जाणून पुन: दुसरे जाणण्यास योग्य असे काही शिल्लक रहात नाही.

**व्याकरणम् - अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **ते** - युष्मत् सर्व.च.ए.व. **इदम्** - इदम् सर्व.न.द्वि.ए.व. **स विज्ञानम्** - सह अ. वि+ज्ञान न.द्वि.ए.व. **ज्ञानम्** - ज्ञान न.द्वि.ए.व. **अशेषत:** - अशेषतस् अ. **ते** - युष्मत् सर्व.च.ए.व. **वक्ष्यामि** - वच् द्वि.ग.प.प.द्वि.भवि.प्र.पु.ए.व. **यत्** - यत् सर्व.न.द्वि.ए.व. **ज्ञात्वा** - ज्ञा न.ग.उ.प.त्वान्त अ. **इह** - इह अ. **भूय:** - भूयस् अ. **अन्यत्** - अन्यत् अ. **ज्ञातव्यम्** - ज्ञा न.ग.आ.प.कर्म.विध्यर्थ धा.वि.न.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अवशिष्यते** - अव+शिष् स.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - सविज्ञानम्** - विज्ञानेन-अनुभवेन सहितमिति सविज्ञानम् = विज्ञान-अनुभवाने सहित असणारे असे सविज्ञान**(तृ.त.स.) अशेषत:** - न शेषत इत्यशेषत:-समग्रम् = जो शेष नाही तो अशेष म्हणजे समग्र**(न.त.स.)**

**मनुष्याणां सहस्त्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।**

**यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वत: ॥३॥**

**अन्वय:** - मनुष्याणाम्, सहस्त्रेषु, कश्चित्, सिद्धये, यतति, यतताम्, अपि, सिद्धानाम्, कश्चित्, माम्, तत्त्वत:, वेत्ति।

**अन्वयार्थः - मनुष्याणाम्, सहस्रेषु कश्चित्** - हजारो मनुष्यांमध्ये कोणी एखादा **सिद्धये** - तत्त्वज्ञान प्राप्त व्हावे याकरिता **यतति** - प्रयत्न करतो **यतताम्, अपि सिद्धानाम्** - या प्रयत्न करणाऱ्या योग्यांमध्ये सुद्धा **कश्चित्** - कोणी एखादाच (योगी साधक) **माम्** - मला (परमेश्वराला) **तत्त्वतः** - यथार्थरूपाने **वेत्ति** - जाणतो.

**विवरण** - हजारो मनुष्यांमध्ये एखाद्यालाच परमार्थबुद्धी होते व अशा परमार्थबुद्धी झालेल्यांमध्ये एखादाच साधक मला यथार्थ जाणू शकतो असा मी दुर्लभ आहे.

**व्याकरणम् - मनुष्याणाम्** - मनुष्य पु.ष.ब.व. **सहस्रेषु** - सहस्त्र न.स.ब.व. **कश्चित्** - कश्चित् अ. **सिद्धये** - सिद्धि स्त्री.च.ए.व. **यतति** - यत् प्र.ग.उ.प.(प.प.) वर्त.तृ.पु.ए.व. **यतताम्** - यत् प्र.ग.उ.प.(प.प.) कर्त.वर्त.धा.वि.पु.ष.ब.व. **अपि** - अपि अ. **सिद्धानाम्** - सिद् च.ग.प.प.कर्त क्त=सिद्ध वि.पु.ष.ब.व. **तत्त्वतः** - तत्त्वतस् तसिल् प्रत्ययान्त अ. **वेत्ति** - विद् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च।**

**अहङ्कार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥४॥**

**अन्वयः** - भूमिः, आपः, अनलः, वायुः, खम्, मनः, बुद्धिः, च, अहङ्कारः, इति, इयम्, अष्टधा, भिन्ना, मे, प्रकृतिः।

**अन्वयार्थः - भूमिः** - पृथ्वी **आपः** - जल **अनलः** - अग्नि **वायुः** - वायु **खम्** - आकाश **मनः** - मन **बुद्धिः** - बुद्धी **च** - आणि **अहङ्कारः** - अहंकार **इति** - अशी **इयम्** - ही **अष्टधा** - आठ प्रकारांनी **भिन्ना** - विभाजित झालेली **मे** - माझी **प्रकृति** - प्रकृति आहे.

**विवरण** - पृथ्वी, जल, अग्नि, वायु, आकाश, मन, बुद्धी आणि अहंकार अशा आठ प्रकारच्याद्वारा विभाजित म्हणजे आठ प्रकाराच्या भेदाला प्राप्त झालेली माझी अपरा म्हणजे जड प्रकृति आहे.

**व्याकरणम् - भूमिः** - भूमि स्त्री.प्र.ए.व. **आपः** - स्त्री.प्र.ब.व. **अनलः** - अनल पु.प्र.ए.व. **वायुः** - वायु पु.प्र.ए.व. **खम्** - ख न.प्र.ए.व. **मनः** - मनस् न.प्र.ए.व. **बुद्धिः** - बुद्धि स्त्री.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **एव** - एव क्रि.वि.अ. **इति** - इति क्रि.वि.अ. **इयम्** - इदम् सर्व.स्त्री.प्र.ए.व. **अष्टधा** - अष्टधा अ. **भिन्ना** - भिद् स.ग.उ.प.कर्म.भूत.धा.वि.स्त्री.प्र.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **प्रकृतिः** - प्रकृति स्त्री प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अनलः** - अलम्-पयाप्तिर्न विद्यतेऽस्येत्यनलः = केव्हाही समाधान-पर्याप्ति होत नाही ह्याची तो अनल**(न.ब.स.) वायुः -** वातीति-गच्छतीति वायुः = चलणारा तो वायु**(वि.)**

**अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम्।**

**जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥५॥**

**अन्वयः** - इयम्, अपरा, प्रकृतिः, तु, इतः, अन्याम्, जीवभूताम् , मे, पराम्, विद्धि, महाबाहो, यया, इदम्, जगत्, धार्यते।

**अन्वयार्थः - इयम्** - हि **अपरा** - (माझी) अपरा **प्रकृतिः** - प्रकृति आहे **तु** - परंतु **इतः** - या जड प्रकृतिहून **अन्याम्** - दुसऱ्या **जीवभूताम्** - जीवरूपा **मे** - माझ्या **पराम्** - परा अर्थात चेतन **प्रकृतिम् -** प्रकृतिला **विद्धि -** जाण **महाबाहो -** हे अर्जुना! **यया -** ज्या प्रकृतिच्या द्वारा **इदम्, जगत्** - हे जगत **धार्यते** - धारण केले

जाते.

**विवरण -** वर सांगितलेली आठ प्रकारच्या भेदाला प्राप्त झालेली अशी जी अपरा म्ह. अचेतन प्रकृती आहे आणि हे महाबाहो! हिच्याहून दुसरी जिच्यायोगाने हे सर्व जगत धारण केले जाते ती माझी जीवरूप परा म्ह. चेतन प्रकृती समज.

**व्याकरणम्** - **इयम्** - इदम् सर्व.स्त्री.प्र.ए.व. **प्रकृति:** - प्रकृति स्त्री.प्र.ए.व. **अपरा** - अपर सर्व.स्त्री.प्र.ए.व. **तु** - तु उभ.अ. **इत:** - इतस् तसिल् प्रत्ययान्त तद्धित पञ्चम्यन्त अ. **अन्याम्** - अन्य सर्व.स्त्री.द्वि.ए.व. **जीवभूताम्** - जीव पु. भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.स्त्री.द्वि.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **प्रकृतिम्** - प्रकृति स्त्री.द्वि.ए.व. **विद्धि** - विद् द्वि.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **महाबाहो** - महाबाहु पु.संबो.ए.व. **यया** - यत् सर्व.स्त्री.तृ.ए.व. **इदम्** - इदम् सर्व.न.प्र.ए.व. **जगत्** - गम्+क्विप्,निपातनाने द्वित्व,तुगागम=जगत् न.प्र.ए.व. **धार्यते** - धृ प्र.ग.प.प.उ.प.णिजन्त कर्म.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **जीवभूताम्** - जीवश्चासौभूताच जीवभूता तां जीवभूताम् = जीवभूत त्या जीवभूताला **(कर्म.स.) जगत्** - गच्छति-अततीति जगत् = चलणारे ते जगत**(वि.)**

**एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय ।**

**अहं कृत्स्नस्य जगत: प्रभव: प्रलयस्तथा ॥६॥**

**अन्वय:** - एतत्, योनीनि, सर्वाणि, भूतानि, इति, उपधारय, अहम्, कृत्स्नस्य, जगत:, प्रभव:, तथा, प्रलय:।

**अन्वयार्थ: - एतत्, योनीनि** - परा आणि अपरा या दोन प्रकृतीपासून **सर्वाणि भूतानि** - संपूर्ण प्राणी मात्र उत्पन्न झाले आहे **इति** - असे **उपधारय** - समज **अहम्** - मी **कृत्स्नस्य जगत:** - संपूर्ण जगाचा (संसाराचा) **प्रभव:** - जनक (उत्पत्तिकर्ता) **तथा** - त्याचप्रमाणे **प्रलय:** - संहारकर्ताही आहे.

**विवरण** - स्थावर आणि जंगम (अचर आणि चर) जेवढे काही लहान मोठे प्राणी आहेत अशा त्या सर्व प्राण्यांची उत्पत्ति, स्थिति, आणि वृद्धि परा आणि अपरा या दोन प्रकृतीच्या संयोगापासून झालेली आहे म्हणजे त्यांच्या उत्पत्तिला कारण या दोन प्रकृती आहेत असे तू समज. जड, चेतन आणि संपूर्ण चराचर विश्वाचा वाचक जगत शब्द आहे. त्याची उत्पत्ति, स्थिति आणि प्रलय माझ्यापासून होतो ज्याप्रमाणे घटाकाशाची उत्पत्ति, स्थिती, विलय, यास आकाश अधिष्ठान आहे तद्वत संपूर्ण विश्वाला मीच अधिष्ठान आहे.

**व्याकरणम्** - **एतद्** - एतत् सर्व.न.द्वि.ब.व. **योनीनि** - योनि न.द्वि.ब.व. **सर्वाणि** - सर्व सर्व.न.प्र.ब.व. **भूतानि** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.प्र.ब.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **उपधारय** - उप+धृ प्र.ग.उ.प.(प.प.)आज्ञार्थ णिजन्त द्वि.पु.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **कृत्स्नस्य** - कृत्स्न वि.न.ष.ए.व. **जगत:** - जगत् न.ष.ए.व. **प्रभव:** - प्र+भु+अप्=प्रभव पु.प्र.ए.व. **तथा** - तथा क्रि.वि.अ. **प्रलय:** - प्र+ली न.ग.प.प.+अच्=प्रलय वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **एतद्योनीनि** - एतन्निरुक्तलक्षणं प्रकृतिद्वयं योनि: कारणं येषां तानि एतद्योनीनि = उक्तलक्षणांनी युक्त असणारी अशी दोन प्रकृती ज्यांचे कारण आहेत ते एतद्योनीनि**(ब.स.)** यद्वा **एतद्योनीनि -**

एतेऽपरत्वेन परत्वेन च प्रागुक्ते क्षेत्रक्षेत्रज्ञलक्षणे प्रकृती योनिर्येषां भूतानां तानि एतद्योनीनि = या अपरा आणि पररूपाने पूर्वी सांगितलेली अशी क्षेत्ररूपा व क्षेत्रज्ञरूपा दोन प्रकारची प्रकृती ज्या भूतांची योनि-कारण आहे ती सर्व भूते एतद्योनीनि आहेत**(ब.स.)** **प्रलयः** - उपसर्गवशात् प्रलीयते निष्पाद्यतेऽनेनेति प्रलयः-निमित्तकारणम् = उपसर्गवश प्रलय केला जातो म्ह. निष्पादन केला जातो ह्याच्याद्वारा तो प्रलय-निमित्तकारण **(वि.)**

**मत्तः परतरं नान्यत्किञ्चिदस्ति धनञ्जय ।**

**मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥७॥**

**अन्वयः** - धनञ्जय, मत्तः, परतरम्, अन्यत्, किञ्चित्, न, अस्ति, सूत्रे, मणिगणाः, इव, मयि, इदम्, सर्वम्, प्रोतम् ।

**अन्वयार्थः** - **धनञ्जय** - हे अर्जुना! **मत्तः** - माझ्याहून **परतरम्, अन्यत्** - अत्यधिक श्रेष्ठ असे दुसरे **किञ्चित् न अस्ति** - काहीही नाही **सूत्रे मणिगणाः इव** - दोऱ्यामध्ये ओविलेल्या पुष्कळ मण्याप्रमाणे **मयि** - माझ्यामध्ये **इदम्, सर्वम्, प्रोतम्** - हे संपूर्ण जगत गुंफलेले आहे.

**विवरण** - मी या जगाचा कारण आणि आधार असल्यामुळे हे जगत माझेच स्वरूप आहे म्हणजे या जगतामध्ये माझ्याहून भिन्न दुसरी वस्तुच नाही ज्याप्रमाणे दोऱ्यामध्ये आणि मण्यामध्ये सर्वत्र केवळ सुतच व्याप्त असते. त्याचप्रमाणे संपूर्ण संसार माझ्यामध्येच व्याप्त आहे म्हणजे हे संपूर्ण जगत माझ्यामध्येच ओत-प्रोत भरलेले आहे.

**व्याकरणम्** - **धनञ्जय** - धनञ्जय पु.संबो.ए.व. **मत्तः** - मत् अस्मत् सर्व.+तसिल्=मत्तः पं.ए.व. **परतरम्** - परतर वि.न.प्र.ए.व. **अन्यत्** - अन्यत् सर्व.न.प्र.ए.व. **किञ्चित्** - किञ्चित् अ. **न** - क्रि.वि.अ. **अस्ति** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **सूत्रे** - सूत्र न.स.ए.व. **मणिगणाः** - मणि पु. गुण पु.प्र.ब.व. **इव** - इव क्रि.वि.अ. **मयि** - अस्मत् सर्व.स.ए.व. **इदम्** - सर्व.न.प्र.ए.व. **सर्वम्** - सर्व सर्व.न.प्र.ए.व. **प्रोतम्** - प्र+वेञ् तन्तुसन्ताने प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था** - **मणिगणाः** - मणीनां गणाः-समूहा इति मणिगणाः = मण्यांचा समूह असा मणिगण **(ष.त.स.)** **परतरम्** - अतिशयेन परमिति परतरम् = अत्यंत श्रेष्ठ **(अतिशयार्थे त.वि.)**

**रसोऽहमप्सु कौन्तेय प्रभाऽस्मि शशिसूर्ययोः ।**

**प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥८॥**

**अन्वयः** - कौन्तेय, अहम्, अप्सु, रसः, अस्मि, शशिसूर्ययोः, प्रभा, अस्मि, सर्ववेदेषु, प्रणवः, अस्मि, खे, शब्दः, च, नृषु, पौरुषम् (अस्मि) ।

**अन्वयार्थः** - **कौन्तेय** - हे कुंतिपुत्र अर्जुना! **अहम्** - मी **अप्सु रसः** - जलातील रस **(अस्मि** - आहे) **शशिसूर्ययोः** - चंद्रसूर्यामधील **प्रभा** - प्रकाश **अस्मि** - मी आहे **सर्ववेदेषु** - सर्व वेदांतील **प्रणवः** - ओंकार **अस्मि** - मी आहे **खे शब्दः** - आकाशातील शब्द मी आहे **(च** - आणि) **नृषु** - पुरुषामध्ये असणारे **पौरुषम्** - पुरुषत्व मी आहे.

**विवरण** - हे अर्जुना! मी जलामध्ये रसरूपाने, चंद्र आणि सूर्य यांच्यामध्ये तेजरूपाने (प्रभारूपाने), संपूर्ण वेदांमध्ये ओंकार रूपाने, आकाशामध्ये शब्दरूपाने आणि पुरुषामध्ये पुरुषत्वरूपाने ओतप्रोत भरलेला आहे.

**व्याकरणम् - कौन्तेय** - कौन्तेय पु.संबो.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **अप्सु** - अप् स्त्री.स.ब.व. **रस:** - रस पु.प्र.ए.व. (**अस्मि** = अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.) **सर्ववेदेषु** - सर्व वि. वेद पु.स.ब.व. **प्रणव:** - प्रणव पु.प्र.ए.व. **खे** - ख न.स.ए.व. **शब्द:** - शब्द पु.प्र.ए.व. **नृषु** - नृ पु.स.ब.व. **पौरुषम्** - पुरुष+(तस्येदम्) अण्=पौरुष वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **शशिसूर्ययो:** - शशीच सूर्यश्च शशिसूर्यौ तयो: शशिसूर्ययो: = चन्द्र आणि सूर्याची **(द्व.स.) सर्ववेदेषु** - सर्वे च ते वेदाश्च सर्ववेदास्तेषु सर्ववेदेषु = सर्व वेदांमध्ये**(क.स.) पौरुषम्** - पुरुषस्य भाव इति पौरुषम् = पुरुषाचा भाव पौरुष**(भावार्थे त.वि.) प्रणव:** - प्रणौतीति प्रणव: प्रणम्यत इति वा प्रणव: -ओंकार: = स्तुति करतो अथवा स्तुति केली जाते ज्याच्या द्वारा असा तो प्रणव-ओंकार**(वि.)** यद्वा **प्रणव:** - प्रकर्षेण नूयते-स्तूयते आत्मा स्वेष्टदेवता चानेनेति प्रणव:-ओंकार: = चांगल्या प्रकारे ज्याच्या द्वारा आत्मा अथवा इष्टदेवतेची स्तुति केली जाते तो प्रणव-ओंकार**(वि.)**

**पुण्यो गन्ध: पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ ।**

**जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥९॥**

**अन्वय:** - च, पृथिव्याम्, पुण्य:, गन्ध:, च, विभावसौ, तेज:, अस्मि, सर्वभूतेषु, जीवनम्, च, तपस्विषु, तप:, अस्मि ।

**अन्वयार्थ:** - **च** - आणि **पृथिव्याम्** - पृथ्वीमध्ये असणारा **पुण्य: गन्ध:** - पवित्र गंध **च** - आणि **विभावसौ** - अग्निमध्ये असणारे **तेज:** - तेज **अस्मि** - मी आहे **सर्वभूतेषु** - सर्वभूतांमधील **जीवन** - जीवन(चेतनत्व) **च** - आणि **तपस्विषु** - तपस्व्यांमध्ये असणारे **तप:** - तप **अस्मि** - मीच आहे

**विवरण** - मी पृथ्वीमधील पवित्र गंध आहे आणि अग्नीतील तेज आहे. तसेच सर्व भूतांचे जीवन आहे आणि तपस्व्यांतील तप आहे.

**व्याकरणम्** - **च** - च उभ.अ. **पृथिव्याम्** - पृथिवी स्त्री.स.ए.व. **पुण्य:** - पू न.ग.उ.प.+यत्,णुगागम्,ह्रस्व=पुण्य वि.पु.प्र.ए.व. **गन्ध:** - गन्ध पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **विभावसौ** - विभा+वसु=विभावसु पु.स.ए.व. **तेज:** - तिज् प्र.ग.आ.प./द.ग.प.प.+असुन्=तेजस् न.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **सर्वभूतेषु** - सर्व वि. भू प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.स.ब.व. **जीवनम्** - जीव्+ल्युट्=जीवन न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **तपस्विषु** - तपस्+विनि=तपस्विन् पु.स.ब.व. **तप:** - तप् च.ग.आ.प.+असुन्=तपस् न.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **जीवनम्** - येन जीवन्ति सर्वाणि भूताणि तद् जीवनम् = ज्याच्या द्वारा सर्व भूते जीवित राहातात ते जीवन **(वि.)तपस्विषु** - तप:-कृच्छ्रचान्द्रायणादिकं चित्तैकाग्र्यम् वा पञ्चाग्निमध्यावस्थानं वा येषामस्ति ते तपस्विनस्तेषु तपस्विषु = तप म्ह.कृच्छ्र, चान्द्रायण आदि अथवा चित्ताची एकाग्रता अथवा पञ्चाग्निच्यामध्ये स्थिति अशा प्रकारचे (तप) ज्याचे आहे ते तपस्वी त्या तपस्व्यांमध्ये**(ब.स.)**

**बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम् ।**

**बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ॥१०॥**

**अन्वयः** - पार्थ, सर्वभूतानाम्, सनातनम्, बीजम्, माम्, विद्धि, बुद्धिमताम्, बुद्धिः, अस्मि, तेजस्विनाम्, तेजः, अहम्, अस्मि।

**अन्वयार्थः** - **पार्थ** - हे पृथापुत्र अर्जुना! **सर्वभूतानाम्, सनातनम्, बीजम्** - संपूर्ण प्राणी मात्रांचे अनादि कारण **माम्** - मला **विद्धि** - तू समज **बुद्धिमताम्** - बुद्धिमान पुरुषामध्ये असणारी **बुद्धिः** - बुद्धी **अस्मि** - मी आहे **तेजस्विनाम्** - तेजस्वी लोकांचे **तेज** - तेज **अहम्** - मी **अस्मि** - आहे.

**विवरण** - हे अर्जुना! निरंतर राहणारे आणि केव्हाही नाश न पावणारे असे संपूर्ण भूतांचे सनातन कारण मी आहे असे तू जाण. तसेच संपूर्ण पदार्थांचा निश्चय करणारी आणि मनेंद्रियांना आपल्या ताब्यात ठेवून त्यांचे सञ्चालन करणारी अशी जी अंत:करणाची बोधमयी शक्ती म्हणजे बुद्धी ती ज्यांच्यामध्ये असते अशा त्या बु द्धिमान लोकांची जी बुद्धी ती मीच आहे आणि तेजस्वी लोकांमध्ये तेजरूपाने ओतप्रोत भरलेला मीच आहे.

**व्याकरणम्** - **पार्थ** - हे पार्थ पु.संबो.ए.व. **सर्वभूतानाम्** - सर्व वि. भू प्र.ग.प.प.कर्त.भूत.धा.वि.न.ष.ब.व. **सनातनम्** - सनातन वि.न.द्वि.ए.व. **बीजम्** - बीज न.द्वि.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **विद्धि** - विद् द्वि.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **बुद्धिमताम्** - बुद्धिमत् वि.पु.ष.ब.व. **बुद्धिः** - बुद्धि स्त्री.प्र.ए.व. **तेज स्विनाम्** - तेजस्विन् वि.ष.ब.व. **तेजः** - तेजस् न.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **बुद्धिमताम्** - बुद्धिरस्तीति येषां ते बुद्धिमन्तस्तेषां बुद्धिमताम् = बुद्धी आहे ज्याची ते बु द्धिमंत त्यांच्यामध्ये**(त.वि.)** **तेजस्विनः** - तेजोऽस्तीति येषां ते तेजस्विनस्तेषां तेजस्विनाम् = तेज आहे ज्याचे ते तेजस्वीन त्यांच्यामध्ये**(अस्त्यर्थे त.वि.)** **बुद्धिः** - बुध्यते आत्माऽनात्मा च धर्माधर्मा दिरप्यवगम्यतेऽनयेति बुद्धिः-प्रज्ञा = आत्मा आणि अनात्मा तसेच धर्म आणि अधर्म आदि हिच्याद्वारा जाणल्या जाते ती बुद्धी-प्रज्ञा**(वि.)**

**बलं बलवतां चाहं कामरागविवर्जितम्।**

**धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ॥११॥**

**अन्वयः** - बलवताम्, कामरागविवर्जितम्, बलम्, अहम्, अस्मि, च, भरतर्षभ, भूतेषु, धर्माविरुद्धः, कामः, अहम्, अस्मि।

**अन्वयार्थः** - **बलवताम्** - बलवानांचे **कामरागविवर्जितम्** - काम आणि आसक्ति दोन्हीने रहित असे **बलम्** - बल **अहम्** - मी **अस्मि** - आहे **च** - परंतु **भरतर्षभ** - हे अर्जुना! **भूतेषु** - भूतांच्या ठिकाणी **धर्माविरुद्धः** - धर्माच्या प्रतिकूल नसलेला म्हणजे धर्माच्या अनुकूल असलेला **कामः** - काम **अहम्** - मी **अस्मि**- आहे.

**विवरण** - बलवान लोकांची तृष्णा आणि आसक्ति यांनी रहित असलेले जे बल ते मीच आहे तसेच धर्माच्या विरुद्ध नसलेला जो सर्व भूतातील काम आहे तो मीच आहे.

**व्याकरणम्** - **बलवताम्** - बलवत् वि.पु.ष.ब.व. **कामरागविवर्जितम्** - काम पु. राग पु. वि+वृज् द्वि.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **बलम्** - बल न.प्र.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **भरतर्षभ** - हे भरत पु. ऋषभ पु.संबो.ए.व. **भूतेषु** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.स.ब.व. **धर्मा**

**विरुद्धः -** धर्म पु. अ+वि+रुध् स.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **कामः -** कम्+घञ्=काम पु.प्र.ए.व. **अस्मि -** अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - कामरागविवर्जितम् -** कामश्च-असन्निकृष्टेषु विषयेषु तृष्णाच रागश्च-रञ्जना प्राप्तेषु विषयेषु प्रीतिश्चेति कामरागौ ताभ्यां विवर्जितम्-रहितं कामरागविवर्जितम् = काम-इंद्रियांशी संबद्ध न झालेल्या-इं द्रियगोचर न झालेल्या विषयांविषयीची तृष्णा, राग प्राप्त झालेल्या विषयांतील रञ्जना-अनुराग-प्रीति-आस क्ति असे कामराग त्या कामरागांनी रहित ते कामरागविवर्जित**(द्वं.ग.तृ.त.स.)** यद्वा **कामरागविवर्जितम् -** कामेषु-विषयेषु वा कामानाम्-विषयानां रागः-तृष्णा कामरागस्तेन विवर्जितम्-विरहितमिति कामरागविव र्जितम् = कामामध्ये असणाऱ्या रागाने रहित अथवा कामाच्या रागांनी रहित असे कामराग त्या कामरागांनी र हित असे कामरागविवर्जित**(स./ष.ग.तृ.त.स.)** यद्वा **कामरागविवर्जितम् -** कामः सन्निकृष्ट विषयापेक्षा प्रकृष्ट प्रवृत्तिहेतुः, रागस्त्वप्राप्तविषयाशाप्रवृत्तिहेतुरिति कामरागौ ताभ्यां विवर्जितम्-रहितं कामरागविवर्जितम् = निकृष्ट विषयापेक्षा उत्कृष्ट विषयामध्ये प्रवृत्तिचा हेतु-काम आहे आणि अप्राप्त विषयाच्या आशेने जी प्रवृत्ति तिचा हेतु राग आहे असे कामराग त्या कामरागांनी रहित असे कामरागविवर्जित**(द्वं.ग.तृ.त.स.)** यद्वा **कामरागविवर्जितम् -** अप्राप्तो विषयः प्राप्तिकारणाभावेऽपि प्राप्यतामित्याकारश्चित्तवृत्तिविशेषः कामश्च प्राप्तो विषयः क्षयकारणे सत्यपि न क्षीयतामित्येवमाकारश्चित्तवृत्तिविशेषो रञ्जनात्मा रागश्चेति कामरागौ ताभ्यां विव र्जितम्-रहितं कामरागविवर्जितम् = अप्राप्त विषय प्राप्तिच्या कारणाचा अभाव असला तरीदेखील प्राप्त झाला पाहिजे अशी जी चित्ताची विशेष वृत्ति आहे तो काम तसेच प्राप्त विषय क्षयाचे-नाशाचे कारण राहात असूनसुद्धा नाश झाला नाही पाहिजे अशी जी चित्ताची विशेष वृत्ति आहे तो राग असे कामराग त्या कामरागांनी रहित असे कामरागविवर्जित**(द्वं.ग.तृ.त.स.) धर्माविरुद्धः -** धर्मस्य शास्त्रीयस्याविरुद्धस्त्वविरोधी स्वस्याऽऽश्रमधर्मस्य साधको न तु बाधक उत्पथहेतुश्च यः कामः स धर्माविरुद्धः = शास्त्रीय धर्माचे अविरुद्ध आपल्या आश्रमधर्माचा साधक न तु बाधक व उत्थानाचा हेतु असा जो काम तो धर्माविरुद्ध**(ब.स.)** **बलवताम् -** बलमस्ति येषां ते बलवन्तस्तेषां बलवताम् = बल आहे ज्यांचे ते बलवंत त्यांचे**(त.वि.)**

**ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये ।**

**मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि ॥१२॥**

**अन्वयः** - च, ये, सात्त्विकाः, भावाः, ये, राजसाः, च, तामसाः, एव, भावाः, तान्, मत्तः, एव, इति, वि द्धि, तु, अहम्, तेषु, न, (तु), ते, मयि, (सन्ति) ।

**अन्वयार्थः** - **च** - आणि **ये** - जे **सात्त्विकाः भावाः** - सत्त्वगुणापासून उत्पन्न झालेले भाव (पदार्थ) आहेत **ये** - जे **राजसाः च तामसाः एव भावाः** - रजोगुणापासून आणि तमोगुणापासुन उत्पन्न झालेले भाव-पदार्थ आ-हेत **तान्** - त्या भावांना (पदार्थांना) **मत्तः एव** - माझ्यापासूनच उत्पन्न झालेले आहेत **इति** - असे **विद्धि -** तू समज **तु** - परंतु **अहम्** - मी **तेषु** - त्यांच्यामध्ये **न** - नाही (**तु** - परंतु) **ते** - ते **मयि** - माझ्यामध्ये **सन्ति** - आहेत.

**विवरण** - मन, बुद्धी, अहंकार, इंद्रिय, इंद्रियाचे विषय, तन्मात्रा, महाभूते आणि संपूर्ण गुण आणि अवगुण तसेच कर्मादि जेवढे काही भाव पदार्थ आहेत. ते संपूर्ण सात्त्विक, राजस आणि तामस यांच्यापासून उत्पन्न झालेले आहेत. या संपूर्ण भावपदार्थांची उत्पत्ती आणि विस्तार माझ्या अपरा प्रकृतिपासूनच झालेला आहे

असे तू समज परंतु वास्तविक पाहिले तर मी त्यांच्या मध्ये नाही ते मात्र माझ्यामध्ये आहेत.

**व्याकरणम् - च** - च उभ.अ. **ये** - यत् सर्व.पु.प्र.ब.व. **सात्त्विका:** - सत्त्व+ठञ्=सात्त्विक वि.पु.प्र.ब.व. **ये** - यत् सर्व.पु.प्र.ब.व. **राजसा:** - रजस्+अण्=राजस वि.पु.प्र.ब.व. **च** - च उभ.अ. **तामसा:** - तमस्+अण्=तामस वि.पु.प्र.ब.व. **भावा: -** भाव पु.प्र.ब.व. **एव** - एव अ. **तान्** - तत् सर्व.पु.द्वि.ब.व. **मत्त:** - अस्मत् सर्व.पु.पं.ए.व.तद्धित तसिल् प्रत्ययान्त **एव** - एव निश्चयात्मक अ. **इति:** - इति क्रि.वि.अ. **विद्धि** - विद् द्वि.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **तु** - तु उभ.अ. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **तेषु** - तत् सर्व.पु.स.ब.व. **न** - न क्रि.वि.अ. **ते** - तत् सर्व.पु.प्र.ब.व. **मयि** - अस्मत् सर्व.स.ए.व. **सन्ति** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु. ब.व.

**समासविग्रहार्थ:** - **सात्त्विका:** - सत्त्वेन निर्वृता:-सम्पन्ना:-उत्पन्ना इति सात्त्विका: = सत्त्वगुणाच्या द्वारा संपन्न-उत्पन्न सात्त्विक**(वि.)** यद्वा **सात्त्विका:** - सत्त्वगुणे प्राधान्येन स्थिता इति सात्त्विका:-सत्त्वगुणप्रधाना एव भावा: पदार्था देवा ऋषयो ब्राह्मणा: शर्करादयश्च = सत्त्वगुणामध्ये प्रधानरूपाने स्थित राहणारे असे ते सात्त्विक-सत्त्वगुणप्रधानच भावपदार्थ-देव, ऋषि, ब्राह्मण, शर्करादि**(वि.) राजसा:** - रजसा निर्वृता:-सम्पन्ना:-उत्पन्ना: राजसा: = रजोगुणाच्या द्वारा निष्पन्न-उत्पन्न ते राजस**(वि.)** यद्वा **राजसा:** - रजोगुणे प्राधान्येन स्थिता इति राजसा:-रज:प्रधाना एव भावा गन्धर्वा, यक्षा: क्षत्रिया मरिचादय: पदार्था: = रजोगुणामध्ये प्रधानरूपाने स्थित असणारे ते राजस-रजप्रधानच भावपदार्थ-गंधर्व, यक्ष, क्षत्रिय, मरिची आदि**(वि.) तामसा:** - तमसा निर्वृता:-सम्पन्ना इति तामसा:-तम:प्रधाना: = तमोगुणाच्या द्वारा संपन्न ते तामस-तमप्रधान **(वि.)** यद्वा **तामसा:** - तमोगुणे प्राधान्येन स्थिता इति तामसा:-तम: प्रधाना एव भावा राक्षसा: क्रव्यादा: शूद्रा गृञ्जनादय: पदार्था: = तमोगुणामध्ये प्रधानरूपाने स्थित रहाणारे ते तामस-तमप्रधानच भावपदार्थ-राक्षस, क्रव्याद, शूद्र, गृञ्जन-गाजर लसुनादि**(वि.)**

**त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभि: सर्वमिदं जगत् ।**

**मोहितं नाभिजानाति मामेभ्य: परमव्ययम् ॥१३॥**

**अन्वय:** - एभि:, त्रिभि:, गुणमयै:, भावै:, सर्वम्, इदम्, जगत्, मोहितम्, एभ्य:, परम्, अव्ययम्, माम्, न, अभिजानाति ।

**अन्वयार्थ: - एभि: त्रिभि: गुणमयै: भावै:** - या तीन सात्त्विक राजस आणि तामस गुणमय (गुणांचे कार्यरूप) भावांच्या द्वारा **इदम्, जगत्** - हे संपूर्ण जगत **मोहितम्** - मोहित झालेले आहे. यास्तव हे मोहित झालेले लोक-जग **एभ्य: परम्, अव्ययम्, माम्** - त्या गुणांच्या पर आणि अव्यय अशा मला **न अभिजानाति** - ओळखत नाही.(जाणत नाही.)

**विवरण** - गुणांचे कार्य असणाऱ्या सात्त्विक, राजस, आणि तामस या तिन्ही प्रकारच्या पदार्थांनी हे सर्व जग -भूतसमुदाय मोहित झाले आहे त्या कारणामुळे या तिन्ही गुणांच्या पलीकडे असणाऱ्या अविनाशी अशा मला (परमात्म्याला) ते जाणत नाही.

**व्याकरणम्** - **एभि:** - इदम् सर्व.पु.तृ.ब.व. **त्रिभि:** - त्रि पु.तृ.ब.व. **गुणमयै:** - गुण वि.मयट् प्रत्ययान्त वि.पु.तृ.ब.व. **भावै:** - भाव पु.तृ.ब.व. **सर्वम्** - सर्व वि.न.प्र.ए.व. **इदम्** - इदम् सर्व.न.प्र.ए.व. **जगत्** -

जगत् न.प्र.ए.व. **मोहितम्** - मुह् च.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **एभ्यः** - इदम् सर्व.पु.पं.ब.व. **परम्** - पर वि.पु.द्वि.ए.व. **अव्ययम्** - अव्यय वि.पु.द्वि.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **न** - न क्रि वि.अ. **अ भिजानाति** - अभि+ज्ञा न.ग.उ.प.(प.प.)वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **गुणमयैः** - गुणानां विकारा गुणमयास्तैर्गुणमयैः-सत्त्वरजस्तमोगुणविकारैः = गुणांचे विकार गुणमय त्या गुणमयाच्याद्वारा म्ह. सत्त्वरजतमोगुणरूपी विकारांच्याद्वारा**(त.विकारार्थे प्रत्ययान्त वि.)** **भावैः** - सत्त्वादिगुणमयैस्त्रिविधैर्भावैरात्मन उपाधित्वेन भाव्यते इति भावाः-स्थूलसूक्ष्मकारणदेहास्तैर्भावैः = याप्रमाणे सत्त्व आदि गुणमय तीन प्रकारच्या भावांच्याद्वारा म्ह. आत्म्याच्या उपाधिरूपाने जे प्राप्त होतात ते भाव त्या भावांच्याद्वारा म्ह. स्थूल, सूक्ष्म आणि कारण देह त्यांच्याद्वारा**(वि.)**

आपल्या दुस्तर मायेपासून तरून जाण्याकरिता सोपा उपाय सांगतात -

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।**

**मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ॥१४॥**

**अन्वयः** - हि, एषा, मम, दैवी, गुणमयी, माया, दुरत्यया, (तु), ये, माम्, एव, प्रपद्यन्ते, ते, एताम्, मायाम्, तरन्ति ।

**अन्वयार्थः** - **हि** - कारण **एषा मम दैवी गुणमयी माया** - ही माझी त्रिगुणात्मिका दैवी अलौकिक माया आहे **दुरत्यया** - तिचे उल्लंघन करणे फार कठीण (दुष्कर) आहे (**तु** - परंतु) **ये** - जे पुरुष **माम्, एव** - केवळ मलाच **प्रपद्यन्ते** - शरण येतात **ते** - ते पुरुष **एताम्, मायाम्** - या मायेला **तरन्ति** - पार करून जातात म्हणजे ते या मायाचे उल्लंघन करून जातात.

**विवरण** - अशी जी उपर्युक्त-वर सांगितलेली सत्त्वरजतमरूप गुणसाम्यावस्थारूप माया तिचे उल्लंघन करणे फार कठीण आहे कारण भगवंताने माझी म्हणून तिला सांगीतली आहे कारण की, मोठ-मोठे मी-मी म्हणणारे अभिमानी लोक या मायेच्या तडाख्यातून सुटले-मुक्त झाले नाहीत म्हणजे ते सुद्धा या मायेचे उल्लंघन करू शकले नाहीत. अशी जरी उल्लंघन करण्याला कठीण असली तरी जे मलाच आपला आश्रय परमगति, परमप्रिय, परमप्राप्य मानतात तेच साधक किंवा मुमुक्षु या त्रिगुणात्मक मायेच्या बंधनातून मुक्त होतात.

**व्याकरणम्** - **हि** - हि क्रि.वि.अ. **एषा** - एतत् सर्व.स्त्री.प्र.ए.व. **दैवी** - देव+अण्=दैव+ई=दैवी वि.स्त्री.प्र.ए.व. **गुणमयी** - गुणमयी वि.स्त्री.प्र.ए.व. **मम** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **माया** - माया स्त्री.प्र.ए.व. **दुरत्यया** - दुरत्यया वि.स्त्री.प्र.ए.व. **ये** - यत् सर्व.पु.प्र.ब.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **एव** - एव क्रि. वि.अ. **प्रपद्यन्ते** - प्र+पद् च.ग.आ.प.वर्त. तृ.पु.ब.व. **एताम्** - एतत् सर्व.स्त्री.द्वि.ए.व. **मायाम्** - माया स्त्री.द्वि.ए.व. **तरन्ति** - तृ प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **दुरत्यया** - दुःखेन-कष्टेनात्ययोऽतिक्रमणं यस्याः सा दुरत्यया = जिचे दुःखाने अतिक्रमण केले जाते ती दुरत्यया**(व्यधिकरण ब.स.)** यद्वा **दुरत्यया** - बिम्बभूतेश्वरैक्यसाक्षात्कारमन्तरेणात्येतुं त रितुमशक्येति दुरत्यया = बिंबभूत ईश्वराच्या बरोबर ऐक्य-एकत्वाचा साक्षात्कार केल्याशिवाय हीचा अत्यय-तरण अशक्य-असंभव आहे ती दुरत्यया**(वि.)** **दैवी** - कालत्रयेऽप्यन्यानपेक्षया स्वयमेव दीव्यते प्रकाशत इ

ति देव:-परमात्मा निर्विशेषस्तस्मिन्नात्मन्याकाशे नीलिमवदाभासरूपेण मयि तिष्ठतीति दैवी = कालत्रयामध्ये अन्य प्रकाशक पदार्थांची अपेक्षा न करता जो स्वयंप्रकाश आहे अर्थात ज्याचे प्रकाशन अन्य प्रकाशकाचे आधीन नाही तो स्वयं प्रकाश देव आहे तो निर्विशेष परमात्मा आहे त्या आत्मस्वरूप माझ्या ठिकाणी (आकाशाचे ठिकाणी जसी निलिमा प्रतीत होते त्याप्रमाणे जी आभासरूपाने माझे ठिकाणी ) स्थित राहते अशी ती दैवी माया**(वि.)** यद्वा **दैवी** - 'तथाहि प्राज्ञे सैषा विद्या' इति श्रवणात् देवे-प्राज्ञे तिष्ठतीति दैवी-गुणमयी गुणात्मिका माया = देवाच्या-प्राज्ञाच्या ठिकाणी राहते अशी ती दैवी-गुणमयी गुणस्वरूप माया **(वि.)** यद्वा **दैवी** - देवस्य-मम ईश्वरस्येयं दैवी = देवाच्या-ईश्वराच्या संबंधी ती दैवी**(वि.)** **माया** - मा याती ति माया मा निषेधस्वरूपम्-तिरस्कारं याति दर्शयतीति माया = मा-निषेधस्वरूप-तिरस्काराला प्राप्त होते अथवा तिरस्काराला दाखविते ती माया**(वि.)** यद्वा **माया** - मीयतेऽपरोक्षवत् प्रदर्श्यतेऽनयेति माया = जिच्या द्वारा अपरोक्षाप्रमाणे प्रदर्शन केले जाते ती माया**(वि.)**

**न मां दृष्कृतिनो मूढा: प्रपद्यन्ते नराधमा: ।**

**माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिता: ॥१५॥**

**अन्वय:** - दृष्कृतिन:, मूढा:, मायया, अपहृतज्ञाना:, आसुरभावम्, आश्रिता:, नराधमा:, माम्, न, प्रपद्यन्ते ।

**अन्वयार्थ:** - **दृष्कृतिन:** - दुष्टाचरण करणारे **मूढा:** - अविवेकी **मायया अपहृतज्ञाना:** - ज्यांचे मायेने ज्ञान अपहृत (नष्ट) केले आहे असे **आसुरम्, भावम्, आश्रिता:** - आसुरी गुणांनी युक्त **नराधमा:** - अधम(पापी) लोक **माम्** - मला (परमेश्वराला) **न प्रपद्यन्ते** - शरण येत नाहीत.(म्हणजे मला भजत नाहीत.)

**विवरण** - उपर्युक्त-वर सांगीतलेल्या लोकाच्या विपरीत जे अविवेकी दुष्ट लोक आहेत ते जन्म जन्मांतरापासून पाप करीत आले असून या जन्मामध्ये सुद्धा जाणून पापामध्ये प्रवृत्त होतात असे जे विवेकहीन मूढ पुरुष आसुरभावांचा आश्रय करून ज्यांचे विपरीत भावना आणि अश्रद्धेच्या आधिक्यामुळे विवेक नष्ट-भ्रष्ट झालेले आहेत त्यामुळे ते लोक वेद, शास्त्र, गुरुपरंपरांचे सदुपदेश, ईश्वर, कर्मफल आणि पुनर्जन्माच्याविषयी विश्वास करीत नाहीत केवल मिथ्या कुतर्क एवं नास्तिकवादामध्ये प्रवृत्त होऊन दुसऱ्याचे अनिष्ट करीत राहतात असे जे अज्ञानी, विवेकहीन, पापी लोक मला शरण येत नाहीत.

**व्याकरणम्** - **दुष्कृतिन:** - दुस्+कृत्+इन्=दुष्कृतिन् वि.पु.प्र.ब.व. **मूढा:** - मुह् च.ग.प.प.कर्त.भू.धा. वि.पु.प्र.ब.व. **मायया** - माया स्त्री.तृ.ए.व. **अपहृतज्ञाना:** - अप+हृ प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि. ज्ञान न. वि.पु.प्र.ब.व. **आसुरम्** - असुर+अण्=आसुर वि.पु.द्वि.ए.व. **भावम्** - भाव पु.द्वि.ए.व. **आश्रिता:** - आ+श्रि प्र.ग.उ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **प्रपद्यन्ते** - प्र+पद् च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **नराधमा:** - नरेषु-पुरुषेषु अधमा:-पामरा इति नराधमा:-जैनचार्वाकबौद्धादय: = मनुष्यांमध्ये अधम म्ह. पामर-जैनचार्वाकबौद्धादि**(स.त.स.)** **अपहृतज्ञाना:** - कामादिरूपिण्याऽपहृतम्-तिरोभावितम्-प्रतिबद्धं ज्ञानं सदसद्विवेकलक्षणं येषां ते अपहृतज्ञाना:-मीमांसका: = कामादिरूपिणी मायेच्याद्वारा ज्ञान म्ह. सदसद्विवेकज्ञान अपहृत-तिरोभावित-प्रतिबद्ध-नष्ट झाले आहेत ज्यांचे ते अपहृज्ञान **(ब.स.)** यद्वा **अपहृतज्ञाना:** - शरीरेन्द्रियसंघाततादात्म्यभ्रान्तिरूपेण परिणतया मायया पूर्वोक्तयाऽपहृतं प्र

तिबद्धं ज्ञानम्-विवेकसामर्थ्यं येषां ते अपहृतज्ञाना: = शरीर आणि इंद्रियांच्या संघातामध्ये आत्मतादात्म्यभ्रांतिरूपाने परिणत पूर्वोक्त मायेने ज्यांचे ज्ञान-विवेकसामर्थ्य अपहरण-प्रतिबद्ध केले आहे ते अपहृतज्ञान **(ब.स.)** **दुष्कृतिन:** - क्रियत इति कर्म दुष्टम्-जन्ममरणादि दु:खप्रदं काम्यलक्षणं कर्म येषामस्ति ते दुष्कृतिन: = केल्या जाते ते कर्म दुष्ट म्ह. जन्ममरणादि दु:ख देणारे काम्यलक्षणरूप कर्म आहे ज्यांचे ते दुष्कृती**(ब.स.)** **आसुरम्** - असुषु-प्राणेषु रमन्त इति असुरा:, असुराणाम्-विषयपरायणानामयमासुरस्तमासुरम् = प्राणामध्ये रममाण असणारे असे असुर, हिंसा अनृत आदि स्वत:चे आणि दुसऱ्याचे प्राण घातक कर्मामध्ये रत रहाणारा असुर त्याचे जे भाव-आचार हिंसा आदि त्याला आसुर म्हणतात**(त.वि.)**

**चतुर्विधा भजन्ते मां जना: सुकृतिनोऽर्जुन।**

**आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥१६॥**

**अन्वय:** - भरतर्षभ, अर्जुन, आर्त:, जिज्ञासु:, अथार्थी, च, ज्ञानी, चतुर्विधा:, सुकृतिन:, जना:, माम्, भजन्ते।

**अन्वयार्थ:** - **भरतर्षभ अर्जुन** - हे भरतश्रेष्ठ अर्जुना! **आर्त:** - दु:खाने पीडित असलेला **जिज्ञासु:** - ज्ञानाची इच्छा करणारा **अथार्थी** - धनाची इच्छा करणारा **च** - आणि **ज्ञानी** - आत्मसाक्षात्कार झालेला **चतुर्विधा: सुकृतिन: जना:** - असे चार प्रकारचे भक्तजन **माम्** - मला **भजन्ते** - भजतात.

**विवरण** - अशा तऱ्हेने जे मला शरण येतात ते खरे पुण्यवानच होत त्यांमध्ये माझे भजन करणाऱ्याचे चार प्रकार आहेत. संकटकाळी माझे स्मरण करणारा तो आर्त, माझ्या स्वरूपाविषयी चिकित्सकबुद्धीने जो ज्ञानामध्ये प्रवृत्त होतो तो जिज्ञासु, केवळ अर्थ म्हणजे जड पदार्थाच्या आभिलाषेने जो माझी उपासना करतो तो अर्थार्थी आणि माझ्या स्वरूपाशी अनन्य होवून माझी निरपेक्ष भावनेने जो माझी भक्ती करतो तो ज्ञानी या संज्ञेला पात्र होतो. अशी चतुर्विध प्रकाराने माझी भक्ती करतात.

**व्याकरणम्** - **भरतर्षभ** - भरत वि.पु. ऋषभ पु.संबो.ए.व. **अर्जुन** - अर्जुन पु.संबो.ए.व. **आर्त:** - आर्त पु.प्र.ए.व. **जिज्ञासु:** - जिज्ञासु पु.प्र.ए.व. **अर्थार्थी** - अर्थ पु. अर्थिन् पु.प्र.ए.व. **चतुर्विधा:** - चतुर वि. विध वि.पु.प्र.ब.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **सुकृतिन:** - सुकृतिन् पु.प्र.ब.व. **जना:** - जन पु.प्र.ब.व. **च** - च उभ.अ. **ज्ञानी** - ज्ञानिन् पु.प्र.ए.व. **भजन्ते** - भज् प्र.ग.उ.प.(आ.प.)वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **चतुर्विधा:** - चत्वार: विधा:-प्रकारा: येषां ते चतुर्विधा: चतु: प्रकारा: = चार प्रकार ज्याचे ते चतुर्विधा**(ब.स.)** **सुकृतिन:** - ईश्वरार्पणबुद्ध्या सुष्ठु मंत्रतंत्राद्यलोपं यथा तथाऽनुष्ठितानि कृतानि श्रौतस्मार्तादीनि कर्माणि येषां सन्ति ते सुकृतिन:-पुण्यकर्माण: = ईश्वरार्पण बुद्धिने यथा योग्य मंत्रतंत्रादिकांचा लोप होणार नाही अशा पद्धतीने श्रौत-स्मार्तादि कर्मांची अनुष्ठाने ज्यांची आहेत ते सुकृति-पुण्यकर्म करणारे **(ब.स.)** **जिज्ञासु:** - नित्यानित्यपदार्थविवेकेनाऽऽत्मतत्त्वं ज्ञातुमिच्छतीति जिज्ञासु:-मुमुक्षु:-आत्मज्ञानार्थी = नित्य आणि अनित्य पदार्थांच्या विवेकाने आत्मतत्त्वाला जाणण्याची इच्छा करणारा**(त.वि.)** **ज्ञानी** - ज्ञानमस्यास्तीति ज्ञानी = ज्ञान आहे ज्याचे तो ज्ञानी**(त.वि.)** **आर्त:** - आसमन्तात् भावेन ऋत:-क्लेशप्राप्तमिति आर्त:-आध्यात्मिकाद्युपद्रवेण निष्पीडित: = चहुकडून क्लेशाला प्राप्त होणारा तो आर्त-आध्यात्मिक आदि उपद्रवाने पीडित**(वि.)** **अर्थार्थी** - अर्थाणामर्थी-प्रार्थी, इत्यर्थार्थी = धनाची इच्छा करणारा**(वि.)**

**तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते।**

**प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥१७॥**

**अन्वयः** - तेषाम्, नित्ययुक्तः, एकभक्तिः, ज्ञानी, विशिष्यते, हि, ज्ञानिनः, अहम्, अत्यर्थम्, प्रियः, च, सः, मम, प्रियः।

**अन्वयार्थः - तेषाम्** - त्या चार प्रकारच्या भक्तगणामध्ये **नित्ययुक्तः** - सतत भगवंतामध्ये समाहित झालेला **एकभक्तिः** - अन्य अतिरिक्त एकमात्र भगवंताचीच भक्ति करणारा असा **ज्ञानी** - ज्ञानीभक्त **विशिष्यते** - अत्यंत श्रेष्ठ आहे **हि** - कारण **ज्ञानिनः** - मला तत्त्वतः जाणणाऱ्या आत्मज्ञानी भक्ताला **अहम्** - मी **अत्यर्थम्** - अतिशय **प्रियः** - प्रिय आहे **च** - आणि **सः** - तो ज्ञानी **मम** - मला **प्रियः** - प्रिय असतो.

**विवरण** - उपर्युक्त-वर कथन केलेल्या चार प्रकारच्या भक्तांपैकी ज्ञानी माझा श्रेष्ठ भक्त आहे कारण तो एकमात्र परमात्म्यामध्ये स्थित असतो. त्याला जगतामध्ये दुसरा भजनीय पदार्थच दिसत नाही म्हणून माझ्यामध्ये आणि त्याच्यामध्ये यत्किञ्चितही व्यवधान नाही; कारण मी ज्ञानी भक्ताचा आत्माच आहे त्या अर्थी मी त्याला अतिशय प्रिय आहे आणि तो मला अतिशय प्रिय आहे.

**व्याकरणम्** - **तेषाम्** - तत् सर्व.पु.ष.ब.व. **नित्ययुक्तः** - नित्य वि. युज् च.ग./द.ग.प.प.कर्त.भूत.धा. वि.पु.प्र.ए.व. **एकभक्तिः** - एक संख्यावाचक सर्व.वि. भक्ति स्त्री.प्र.ए.व. **ज्ञानी** - ज्ञानिन् पु.प्र.ए.व. **वि शिष्यते** - वि+शिष् स.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व. **हि** - हि क्रि.वि.अ. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **ज्ञा निनः** - ज्ञानिन् पु.ष.ए.व. **अत्यर्थम्** - अति+ अर्थ पु.द्वि.ए.व. **प्रियः** - प्रिय पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **मम** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **प्रियः** - प्रिय पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **नित्ययुक्तः** - नित्ये-मयि आत्मस्वरूपे युक्तः-सक्तो नित्ययुक्तः-सर्वदा ब्रह्मण्येव समाहित चित्तः = आत्मस्वरूपात जो सक्त-तत्पर आहे तो नित्ययुक्त-सतत ब्रह्माच्याच ठिकाणी समाहित-स्थिर चित्ताने युक्त**(स.त.स.)** यद्वा **नित्ययुक्तः** - नित्ये-मायातत्कार्यसंबंधशून्यत्वादविक्रियेऽक्षरे परमात्मन्येव युक्तः -समाहितो नान्यदिति नित्ययुक्तः = माया व तत्कार्य यांचा संबंधशून्य असल्यामुळे अविकारी अक्षर परमात्म्यामध्ये युक्त-समाहित असतो व अन्यामध्ये नसतो तो नित्ययुक्त**(स.त.स.)** **एकभक्तिः** - एकस्मिन् भगवत्येव भक्तिः-अनुरक्तिर्यस्य स एकभक्तिः = एका परमात्म्यामध्ये भक्ती-अनुरक्ति आहे ज्याची तो एकभ क्ति**(ब.स.)** यद्वा **एकभक्तिः** - एका-असाधारणा भक्तिर्भजनं यस्य स एकभक्तिः = एक असाधारण म्ह. विशेषरूपाने भक्ति-भजन आहे ज्याचे तो एकभक्ति**(ब.स.)** यद्वा **एकभक्तिः** - स्वविषयीभूतवस्त्वाकारं भजतीति भक्तिरन्तःकरणवृत्तिरेकाऽहमिदमिति द्वैविध्यनिर्मुक्ता स्वस्य च ब्रह्मणश्चोभयोरेकत्वावगाहिन्य खण्डाकारा भक्तिर्वृत्तिर्यस्य स एकभक्तिः = आपल्या विषयीभूत वस्तुच्या आकाराला आत्मरूपाने जो भजतो ती भक्ति-अंतःकरणवृत्ति, एक-हे मीच आहे अशा प्रकारे द्वैतभेदाने रहित तसेच आपल्या आणि ब्रह्माच्या एकत्वाला ग्रहण करणारी अखंडाकारभक्ति (वृत्ति) आहे ज्याची तो एकभक्ति**(ब.स.)**

**उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम्।**

**आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥१८॥**

**अन्वयः** - एते, सर्वे, एव, उदाराः, तु, ज्ञानी, मे, आत्मा, एव, (इति), मे, मतम्, हि, सः, युक्तात्मा, माम्,

एव, अनुत्तमाम् ,गतिम्, आस्थित: ।

**अन्वयार्थ: - एते सर्वे एव उदारा:** - हे सर्वच भक्त अत्यंत उदार प्रकृतिचे आहेत **तु** - परंतु **ज्ञानी** - ज्ञानी भक्त **मे** - माझा **आत्मा एव** - आत्माच आहे **(इति) मे मतम्,** - (असे) माझे मत आहे **हि** - कारण **स:** - तो **युक्तात्मा** - माझ्या ठिकाणी स्थिर चित्त झालेला असा **माम्, एव** - मलाच **अनुत्तमाम्, गतिम्** - अत्यंत श्रेष्ठ गतिला **आस्थित:** - प्राप्त झालेला असतो.

**विवरण** - आर्त, अर्थार्थी, जिज्ञासु आणि ज्ञानी हे संपूर्ण भक्तगण अत्यधिक उदार प्रकृतिचे आहेत परंतु त्या उदार प्रकृतिच्या भक्तगणांमध्ये ज्ञानीभक्त अत्यंत श्रेष्ठ आहे कारण की, तो माझा आत्माच आहे म्हणून तो सदा सर्वदा माझ्यामध्येच स्थित असतो माझी जी उत्तम गति, त्या उच्चगतिला येवून पोहोचलेला असतो.

**व्याकरणम् - एते** - एतत् सर्व.पु.प्र.ब.व. **सर्वे** - सर्व सर्व.पु.प्र.ब.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **उदारा:** - उदार वि.पु.प्र.ब.व. **तु** - तु उभ.अ. **ज्ञानी** - ज्ञानिन् पु.प्र.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **आत्मा** - आत्मन् पु.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **मतम्** - मन् च.ग.आ.प.भावे.भूत.धा. वि.न.प्र.ए.व. **हि** - हि क्रि.वि.अ. **स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **युक्तात्मा** - युज् च.ग./ द.ग.प.प.कर्त.भूत.धा.वि. आत्मन् पु.प्र.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **अन-ुत्तमाम्** - अन्+उत्तमा वि.स्त्री.द्वि.ए.व. **गतिम्** - गति स्त्री.द्वि.ए.व. **आस्थित:** - आ+स्था प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - युक्तात्मा** - प्रत्यग्वृत्या सदा सर्वत्र मत्स्वरूपग्रहण एव युक्तोऽभिनिविष्ट आत्मा मनो यस्य स युक्तात्मा = प्रत्यग्वृत्तिने सदा सर्वत्र माझेच स्वरूप ग्रहण करण्यामध्येच युक्त-अभिनिविष्ट आत्मा-मन ज्याचे आहे तो युक्तात्मा**(ब.स.)** यद्वा **युक्तात्मा** - युक्त:-मयि स्थितोऽभिनिविष्टो वा आत्मा-चित्तं यस्य स युक्तात्मा = माझ्यामध्ये स्थित म्ह. अभिनिविष्ट आत्मा-चित्त आहे ज्याचे तो युक्तात्मा**(ब.स.) अनुत्तमाम्** - यस्या: नित्यत्वेन महत्त्वेन सूक्ष्मत्वेनाऽऽन्तरत्वेनाऽऽनन्दत्वेन ज्ञेयत्वेन प्राप्यत्वेन च लोकशास्त्रप्रसिद्ध उत्तम: पदार्थ: प्रमाणाबाधितो नाऽस्ति सानुत्तमा तामनुत्तमाम्-सर्वोत्तमाम् = जिच्या नित्यत्वाने, महत्त्वाने, सूक्ष्मत्वाने, आंतरत्वाने, आनंदत्वाने, ज्ञेयत्वाने, प्राप्यत्वाने, लोकशास्त्रप्रसिद्ध उत्तम पदार्थ प्रमाणाने अबा धित नाही ती अनुत्तमा त्या अनुत्तमाला**(न.त.स.) गतिम्** - ज्ञानेनैवैकेन गम्यते प्राप्यत इति गतिस्तां गतिम् = जी केवळ ज्ञानाच्या द्वाराच प्राप्त केली जाते ती गति**(वि.)**

**बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते ।**

**वासुदेव: सर्वमिति स महात्मा सुदुर्लभ: ॥१९॥**

**अन्वय:** - बहूनाम्, जन्मनाम्, अन्ते, ज्ञानवान्, सर्वम्, वासुदेव:, इति, माम्, प्रपद्यते, स:, महात्मा, सुदुर्लभ: ।

**अन्वयार्थ: - बहूनाम्, जन्मनाम्, अन्ते** - अनेक जन्मांच्या अंती (शेवटी) **ज्ञानवान्** - तत्त्वज्ञान प्राप्त झालेला ज्ञानी **सर्वम्, वासुदेव: इति** - या विश्वामध्ये सर्व काही वासुदेवच आहे **माम्, प्रपद्यते** - अशा प्रकारे मला शरण येतो **स:** - तो **महात्मा** - ज्ञानी पुरुष **सुदुर्लभ:** - अत्यंत दुष्प्राप्य आहे.

**विवरण** - अनेक जन्मामध्ये केलेल्या संपूर्ण पुण्यकर्मानुष्ठानापासून उत्पन्न झालेली जी चित्तशुद्धि तोच ज्ञानार्थ

संस्कार-वासना होय तशा ज्ञानार्थ संस्कारांनी युक्त, अशा अनेक जन्मांच्या शेवटी ज्याच्या ज्ञानाचा पूर्ण प रिपाक झाला आहे, असा ज्ञानी मला-वासुदेवाला आपल्या प्रत्यगात्म्याला प्रत्यक्षपणे शरण येतो. तो कसा? 'हे सर्व चराचर जगत् वासुदेव आहे' अशा प्रकारे मला शरण येतो जो ज्ञानी याप्रमाणे सर्वांचा आत्मा अशा मला शरण येतो तो महात्मा होय म्हणून तो ज्ञानी पुरुष अत्यंत दुर्लभ आहे.

**व्याकरणम्** - **बहूनाम्** - बहु वि.पु.ष.ब.व. **जन्मनाम्** - जन्मन् न.ष.ब.व. **अन्ते** - अन्त वि.पु.स.ए.व. **ज्ञानवान्** - ज्ञानवत् पु.प्र.ए.व. **सर्वम्** - सर्व वि.न.प्र.ए.व. **वासुदेवः** - वासुदेव पु.प्र.ए.व. **इति** - इति क्रि. वि.अ. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **प्रपद्यते** - प्र+पद् च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **महात्मा** - महा वि. आत्मन्=महात्मन् पु.प्र.ए.व. **सुदुर्लभः** - सु+दुर्+लभ्+खल्=सुदुर्लभ वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **महात्मा** - महान्-व्यापकः-विशाल आत्मा-अन्तःकरणं यस्य स महात्मा-जीवन्मुक्तः = महान-व्यापक-विशाल आत्मा-अंतःकरण आहे ज्याचे तो महात्मा**(ब.स.)** यद्वा **महात्मा** - महान् सर्वदा ब्रह्माकारेणैव वर्तत इति महानुत्कृष्ट आत्माऽन्तःकरणं यस्य स महात्मा-महानुभावः = महात्मा सर्वदा ब्रह्माकारवृत्तीनेच अनुवर्तन करीत असल्यामुळे महान-उत्कृष्ट आत्मा-अंतःकरण आहे ज्याचे तो महात्मा **(ब.स.)** **सुदुर्लभः** - सुतरामपि दुःखेन-कष्टेन लब्धुम्-प्राप्तुं शक्यः सुदुर्लभः = अत्यंत कठिणाच्या द्वारा जो प्राप्त होण्यास योग्य आहे अथवा अशक्य आहे तो सुदुर्लभ**(तृ.त.स.)** **ज्ञानवान्** - ज्ञानं विद्यते यस्य सः ज्ञानवान् = ज्ञान आहे ज्याचे तो ज्ञानवान**(वि.)**

**कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यन्तेऽन्यदेवताः ।**

**तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया ॥२०॥**

**अन्वयः** - तैः, तैः, कामैः, हृतज्ञानाः, स्वया, प्रकृत्या, नियताः, तम्, तम्, नियमम्, आस्थाय, अन्यदेवताः, प्रपद्यन्ते ।

**अन्वयार्थः** - **तैः तैः कामैः** - इहलोक आणि परलोकादि अनेक प्रकारच्या कामांनी **हृतज्ञानाः** - ज्या लोकांचे विवेकज्ञान लुप्त झालेले आहे **स्वया प्रकृत्या** - आपल्या स्वभावाकडून **नियताः** - प्रेरित झालेले **तम्, तम्, नियमम्** - त्या त्या नियमाला **आस्थाय** - धारण करून **अन्यदेवताः** - दुसऱ्या देवतेला **प्रपद्यन्ते** - शरण जातात.

**विवरण** - पुत्र, धन, पशु इत्यादि अनेक प्रकारच्या कामनांनी ज्याचे विवेकज्ञान नष्ट भ्रष्ट झाले आहे. असे जे अविवेकी लोक भिन्न भिन्न स्वभावाच्या मुळे भिन्न भिन्न देवतेची उपासना करितात आणि त्या भिन्न भिन्न उपासनेपासून त्यांना भिन्न भिन्न फल प्राप्त होते असे जे अन्यदेवतेची उपासना करणारे लोक आहेत ते परमश्रेष्ठ जो मी, त्या मला प्राप्त न होता अन्य देवतेला प्राप्त होतात.

**व्याकरणम्** - **तैः तैः** - तत् सर्व.पु.तृ.ब.व. **कामैः** - काम पु.तृ.ब.व. **हृतज्ञानाः** - हृ प्र.ग.प.प.कर्म.भू.धा. वि. ज्ञान न.वि.पु.प्र.ब.व. **स्वया** - स्व सर्व.स्त्री.तृ.पु.ए.व. **प्रकृत्या** - प्रकृति स्त्री.तृ.ए.व. **नियताः** - नि+यम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **तम् तम्** - तत् सर्व.पु.द्वि.ए.व. **नियमम्** - नि+यम्+अप्= नियम पु.द्वि.ए.व. **आस्थाय** - आ+स्था प्र.ग.प.प.ल्यबन्त अ. **अन्यदेवताः** - अन्य वि. देवता स्त्री.प्र.ब.व.

**प्रपद्यन्ते** - प्र+पद् च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था: - हृतज्ञाना:** - हृतम्-तिरोभावितं ज्ञानम्-नित्यानित्यपदार्थविवेचने नित्यपदार्थवेदने तदनुसंधाने तत्फलसंपादनेऽशक्तं विवेकज्ञानं येषां ते हृतज्ञाना:-मीमांसकास्तार्किका: शैवा: शाक्ता वैष्णवाश्चाऽन्ये सर्वे जना: = हरले गेले-लोपले गेले ज्ञान-नित्यानित्यपदार्थाच्या विवेचनामध्ये, नित्यपदार्थाच्या जाणण्यामध्ये, त्याचे अनुसंधान करण्यामध्ये आणि त्याच्या फलाचे संपादन करण्यामध्ये ज्यांचे विवेकज्ञान असमर्थ झाले आहे ते हृतज्ञान-पूर्वमीमांसक, तार्किक, शैव, शाक्त, वैष्णव व अन्य सर्वलोक**(ब.स.) अन्यदेवता:** - अन्या:-स्वात्मतत्त्वव्यतिरिक्ता:, देवता:-परस्य ब्रह्मणो भिन्ना इत्यन्यदेवता:-अन्येन्द्रादिदेवा: = अन्य-आत्मतत्त्वाहून अतिरिक्त देवता-परब्रह्माच्या भिन्न असे अन्यदेवता-दुसरे इंद्रादिदेवता**(कर्म.स.)**

**यो यो यां यां तनुं भक्त: श्रद्धयार्चितुमिच्छति ।**

**तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥२१॥**

**अन्वय:** - य:, य:, भक्त:, याम्, याम्, तनुम्, श्रद्धया, अर्चितुम्, इच्छति, तस्य तस्य, ताम्, एव, श्रद्धाम्, अहम्, अचलाम्, विदधामि ।

**अन्वयार्थ: - य: य: भक्त:** - जो जो भक्त **याम्, याम्, तनुम्** - ज्या ज्या मूर्तिरूप देवतेची **श्रद्धया अर्चितुम्** - श्रद्धेने भक्ती करण्याची **इच्छति** - इच्छा करतो **तस्य तस्य** - त्याच्या त्याच्या **ताम्, एव श्रद्धाम्** - त्याच श्रद्धेला **अहम्** - मी **अचलाम्** - त्या त्या देवतेच्या ठिकाणी स्थिर **विदधामि** - करतो.

**विवरण** - देवतेची उपासना करणारे सकामभक्त अनेक प्रकारचे असून आपआपल्या कामना आणि प्रकृतिच्या भेदाने त्या इष्ट देवताही अनेक प्रकारच्या असतात म्हणून भगवान म्हणतात की, जो सकाम भक्त आहे तो ज्या ज्या देवतेची श्रद्धापूर्वक (आराधना पूर्वक) पूजा करण्याची इच्छा करतो. त्या त्या पुरुषाच्या त्याच श्रद्धेला मी त्या देवतेच्या ठिकाणी स्थिर करतो म्हणजे देवतेच्या सत्तेमध्ये त्यांच्या प्रभाव आणि गुणामध्ये तसेच पूजा आणि फलामध्ये मी संपूर्णतया त्याचा विश्वास करून देतो.

**व्याकरणम् - य: य:** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **भक्त:** - भज् प्र.ग.प.प.(उ.प.)कर्त.भूत.धा.वि.पु.प्र.ए.व. **याम् याम्** - यत् सर्व.स्त्री.द्वि.ए.व. **तनुम्** - तनु स्त्री.द्वि.ए.व. **श्रद्धया** - श्रद्धा स्त्री.तृ.ए.व. **अर्चितुम्** - अर्च् प्र.ग.प.प.तुमन्त अ. **इच्छति** - इष् ष.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **तस्य तस्य** - तत् सर्व.पु.ष.ए.व. **ताम्** - तत् सर्व.स्त्री.द्वि.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **श्रद्धाम्** - श्रद्धा स्त्री.द्वि.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **अचलाम्** - अचला वि.स्त्री.द्वि.ए.व. **विदधामि** - वि+धा तृ.ग.उ.प.(प.प.)वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - अचलाम्** - चलतीति चला न चला अचला तामचलाम्-स्थिराम् = जी चल नाही ती अचला तिला**(न.त.स.)**

**स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते ।**

**लभते च तत: कामान्मयैव विहितान्हि तान् ॥२२॥**

**अन्वय:** - स:, तया, श्रद्धया, युक्त:, तस्य, आराधनम्, ईहते, च, तत:, मया, एव, हि, विहितान्, तान्,

कामान्, लभते ।

**अन्वयार्थः** - **सः** - तो पुरुष **तया श्रद्धया युक्तः** - त्या श्रद्धेने युक्त होऊन **तस्याः** - त्या देवतेचे **आराधनम्, ईहते** - पूजन करतो **च** - आणि **ततः** - त्या देवतेपासून **मया एव हि** - मीच **विहितान्** - निर्मिलेल्या **तान्,, कामान्** - त्या फलांना **लभते** - तो प्राप्त होतो म्हणजे इच्छित फल त्याला मिळते.

**विवरण** - तो पुरुष माझ्याद्वारा स्थापित केलेल्या श्रद्धेने युक्त होऊन तसेच विधिने त्या देवतेचे पूजन करतो त्या आराधनेचे फलस्वरूप उक्त देवतेच्याद्वारा त्याला तेच इच्छित फल मिळते की जे माझ्याद्वारा पूर्वीच निर्धारित केलेले होते मी जे इच्छित भोगाचे विधान केले आहे त्यापेक्षा अधिक किंवा कमी भोगप्रदान करण्याचे सामर्थ्य त्या देवतेच्या ठिकाणी नाही म्हणजे सर्वांना त्यांच्या आराधनानुसार फल देणारा मीच फलदाता आहे.

**व्याकरणम्** - **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **तया** - तत् सर्व.स्त्री.तृ.ए.व. **श्रद्धया** - श्रद्धा स्त्री.तृ.ए.व. **युक्तः** - युज् च.ग./द.ग.प.प.कर्म.भूत.धा.वि.पु.प्र.ए.व. **तस्याः** - तत् सर्व.स्त्री.ष.ए.व. **आराधनम्** - आ+राध्+ल्युट्=आराधन न.द्वि.ए.व. **ईहते** - ईह् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **ततः** - ततस् पञ्चम्यन्त तसिल् प्रत्ययान्त अ. **विहितान्** - वि+धा तृ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.द्वि.ब.व. **तान्** - तत् सर्व.पु.द्वि.ब.व. **कामान्** - काम पु.द्वि.ब.व. **लभते** - लभ् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **कामान्** - काम्यन्त इति कामास्तान् कामान् = कामना केल्या जातात ते काम त्या कामांना(**वि.**)

**अन्तवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् ।**

**देवान्देवयजो यान्ति मद्भक्ता यान्ति मामपि ॥२३॥**

**अन्वयः** - तु, तेषाम्, अल्पमेधसाम्, तत्, फलम्, अन्तवत्, भवति, देवयजः, देवान्, यान्ति, मद्भक्ताः, माम् अपि, यान्ति ।

**अन्वयार्थः** - **तु** - परंतु **तेषाम्, अल्पमेधसाम्** - त्या अल्पबुद्धी पुरुषाला प्राप्त झालेले **तत् फलम्** - ते फल **अन्तवत्** - विनाशी **भवति** - असते **देवयजः** - देवतांना आराधना करणारे **देवान्** - देवतेला **यान्ति** - प्राप्त होतात आणि **मद्भक्ताः** - माझे भक्त **माम्, अपि** - मलाच **यान्ति** - प्राप्त होतात.

**विवरण** - आसुर स्वभावाने युक्त भक्ती न करणारे तसेच पापाचरण करणाऱ्या मूढ अविवेकी लोकांच्या पेक्षा शास्त्रविधिने देवतेची उपासना करणारे भक्त अधिक श्रेष्ठ आहेत आणि आसुरभावाने युक्त तसेच सर्वदा-मूढ नाहीत परंतु नाशवान फल देणाऱ्या भोगाकरिता देवतेचे अनुष्ठान करणारे अविवेकी अल्पबुद्धिने जे युक्त असतात. त्यामुळे त्यांचे ते फलही नाशवान असते कारण ते अल्पप्रज्ञ असल्यामुळे विनाशी फल प्रदान करणाऱ्या भोगामध्येच श्रद्धा ठेवतात असे जे देवतेचे पूजन करणारे भक्त ते त्या देवतेलाच प्राप्त होतात आणि माझे भजन पूजन करणारे भक्त मलाच प्राप्त होतात.

**व्याकरणम्** - **तु** - तु अवधारणार्थक उभ.अ. **तेषाम्** - तत् सर्व.पु.ष.ब.व. **अल्पमेधसाम्** - अल्प वि. मेधस् पु.ष.ब.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **फलम्** - फल न.प्र.ए.व. **अन्तवत्** - अन्तवत् वि.न.प्र.व. **भवति** - भू प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **देवयजः** - देव पु. यज् पु.प्र.ब.व. **देवान्** - देव पु.द्वि.ब.व. **यान्ति** - या

**व्याकरणम्** - **अर्जुन** - अर्जुन पु.संबो.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व **समतीतानि** - सम्+अति+इ द्वि.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.द्वि.ब.व. **च** - च उभ.अ. **वर्तमानानि** - वर्तमान न.द्वि.ब.व. **च** - च उभ.अ. **भविष्याणि** - भविष्य न.द्वि.ब.व. **भूतानि** - भूत न.द्वि.ब.व. **वेद** - विद् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **तु** - तु उभ.अ. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **कश्चन** - कश्चन क्रि.वि.अ. **न** - न क्रि.वि.अ. **वेद** - विद् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **भूतानि** - भवन्तीति भूतानि = होतात ती भूते**(वि.)**

**इच्छाद्वेषसमुत्थेन द्वन्द्वमोहेन भारत ।**

**सर्वभूतानि सम्मोहं सर्गे यान्ति परन्तप ॥२७॥**

**अन्वय:** - भारत, परन्तप, सर्गे, इच्छाद्वेषसमुत्थेन, द्वन्द्वमोहेन, सर्वभूतानि, सम्मोहम्, यान्ति ।

**अन्वयार्थ:** - **भारत परन्तप** - हे भरत कुलोत्पन्न अर्जुना! **सर्गे** - जन्माच्या वेळी **इच्छाद्वेषसमुत्थेन** - इच्छा आणि द्वेष यापासून उत्पन्न **द्वन्द्वमोहेन** - सुखदु:खादिरूप द्वंद्वमोहाने **सर्वभूतानि** - सर्व प्राणिमात्र **सम्मोहम्** - संमोहाला **यान्ति** - प्राप्त होतात.

**विवरण** - उत्पत्तीच्या वेळी संपूर्ण प्राणीमात्र राग आणि द्वेष यांच्या पासून उत्पन्न झालेले हर्ष, शोक आणि सुखदु:खादिरूप मोहाच्या आधीन होऊन अविवेकास प्राप्त होतात. अशा संमोहाला प्राप्त झालेल्या अविवेकी लोकांना माझ्या स्वरूपाचे ज्ञान होत नसल्यामुळे ते मला आत्मभावाने भजत नाहीत कारण त्यांचे ज्ञान मोहाने प्रतिबद्ध केलेले असते अशा प्रतिबद्ध केलेल्या ज्ञानामध्ये मला जाणण्याची यत्किञ्चितही शक्ति नाही म्हणून मला न जाणल्यामुळे संपूर्ण प्राणिमात्र संमोहाला प्राप्त होतात.

**व्याकरणम्** - **भारत** - भारत पु.संबो.ए.व. **परन्तप** - परन्तप पु.संबो.ए.व. **सर्गे** - सर्ग पु.स.ए.व. **इच्छाद्वेषसमुत्थेन** - इच्छा स्त्री. द्वेष पु. सम्+उत्थ वि.पु.तृ.ए.व. **द्वन्द्वमोहेन** - द्वन्द्व पु. मोह पु.तृ.ए.व. **सर्वभूतानि** - सर्व वि. भूत न.प्र.ब.व. **सम्मोहम्** - सम्+मुह्+घञ्=सम्मोह वि.पु.द्वि.ए.व. **यान्ति** - या द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **इच्छाद्वेषसमुत्थेन** - इच्छा च द्वेषश्च इच्छाद्वेषौ ताभ्याम्-अनुकूलप्रतिकूलविषयाभ्यां समुत्तिष्ठतीति समुत्थ:-समुत्पत्तिरिच्छाद्वेषसमुत्थस्तेन इच्छाद्वेषसमुत्थेन = इच्छा आणि द्वेष इच्छाद्वेष त्यापासून-अनुकूल प्रतिकूल विषयापासून उत्पन्न असा इच्छाद्वेषसमुत्थ अशा त्या इच्छाद्वेषसमुत्थाकडून **(द्वं.ग.पं.त.स.)** यद्वा **इच्छाद्वेषसमुत्थेन** - इच्छानुकूले प्रीतिरननुकूले त्वप्रीतिर्द्वेष इति इच्छाद्वेषौ ताभ्यां इच्छाद्वेषाभ्याम् समुत्थस्तेन इच्छाद्वेषसमुत्थेन = अनुकूलाविषयी जी प्रीति ती इच्छा व प्रतिकूलाविषयी जी अप्रीति तो द्वेष असे इच्छा आणि द्वेष त्या इच्छाद्वेषापासून उत्पन्न असा इच्छाद्वेषसमुत्थ अशा त्या इच्छाद्वेषसमुत्थाकडून**(द्वं.ग.पं.त.स.)** **द्वन्द्वमोहेन** - द्वन्द्वयो:-सुखदु:खयो: शीतोष्णयोर्लाभालाभयोस्तत्साधनयोश्च विपरीतबुद्धिर्मोह इति द्वन्द्वमोहस्तेन द्वन्द्वमोहेन = द्वन्द्वाने होणाऱ्या मोहाच्या द्वारा**(ष./तृ.त.स.)**

**येषां त्वन्तगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् ।**

**ते द्वन्द्वमोहनिर्मुक्ता भजन्ते मां दृढव्रता: ॥२८॥**

द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **मद्भक्ता:** - मद् अस्मद् सर्व.ष.ए.व. भक्ता: भज् प्र.ग.उ.प.कर्त.भू.धा. वि.पु.प्र.ब.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **अपि** - अपि क्रि.वि.अ. **यान्ति** - या द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **अल्पमेधसाम्** - अल्पा-क्षुद्रा-सदसद्विवेकरहिता मेधा-बुद्धिर्येषां ते अल्पमेधसस्तेषां अल्पमेधसाम् = अल्प-क्षुद्र-सदसद विवेकरहित बुद्धी आहे ज्यांची ते अल्पमेधस त्यांचा**(ब.स.)** **अन्तवत्** - अन्त:-विनाशो विद्यते यस्य तदन्तवत्-विनाशि = अंत-विनाश आहे ज्याचा ते अंतवत-विनाशी**(ब.स.)** **देवयज:** - देवान् यजन्तीति देवयज: = देवाला यजन करणारे ते देवयज**(वि.)**

**अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धय: ।**

**परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम् ॥२४॥**

**अन्वयार्थ:** - अबुद्धय:, मम, अव्ययम्, अनुत्तमम्, परम्, भावम्, अजानन्त:, अव्यक्तम्, माम्, व्यक्तिम्, आपन्नम्, मन्यन्ते ।

**अन्वयार्थ:** - **अबुद्धय:** - बुद्धिहीन पुरुष **मम** - माझ्या **अव्ययम्, अनुत्तमम्, परम्, भावम्** - अविनाशी अत्यंत उत्तम श्रेष्ठ भावाला (स्वरूपाला) **अजानन्त:** - न जाणणारे **अव्यक्तम्, माम्** - इंद्रियातीत अव्यक्त असलेला **व्यक्तिम्, आपन्नम्** - मनुष्यरूपाने-मनुष्याच्या समान प्रगट झालेला **मन्यन्ते** - मानतात.

**व्याकरणम्** - **अबुद्धय:** - अ+बुद्धि स्त्री.वि.पु.प्र.ब.व. **मम** = अस्मत् सर्व.ष.ए.व. **परम्** - पर वि.पु. द्वि.ए.व. **अव्ययम्** - अव्यय वि.पु.द्वि.ए.व. **अनुत्तमम्** - अन्+उत्तम वि.पु.द्वि.ए.व. **भावम्** - भाव पु. द्वि.ए.व. **अजानन्त:** - अ+ज्ञा न.ग.उ.प.(प.प.)कर्त.वर्त.धा.वि.पु.प्र.ब.व. **अव्यक्तम्** - अ+व्यक्त वि.पु. द्वि.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **व्यक्तिम्** - वि+अञ्ज् द.ग.उ.प.+क्तिन्=व्यक्ति पु.द्वि.ए.व. **आपन्नम्** - आ+पद् च.ग.आ.प.कर्त.भतू.धा.वि.पु.द्वि.ए.व. **मन्यन्ते** - मन च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अबुद्धय:** - आत्मानात्मस्वरूपविवेचनतत्त्वाध्यवसायक्षमाबुद्धिर्मत्प्रसादजा येषां नास्ति तेऽबुद्धय:-अविवेकिन: = माझ्याप्रसादाने उत्पन्न होणारी आत्मानात्मविवेक तसेच आत्मस्वरूपाचा निश्चय करण्यास समर्थ बुद्धी नाही ज्यांचे जवळ ते अबुद्धिपुरुष-अविवेकी**(न.ब.स.)** **अव्यक्तम्** - व्यज्यत इति व्यक्त:-विकारो देहेन्द्रियादिस्तद्बंधरहितत्त्वादव्यक्तस्तमव्यक्तम्-व्यक्तरहितम् = जो व्यञ्जित होतो तो व्यक्त-विकार देहेंद्रियादि त्यांच्या संबंधाने रहित तो अव्यक्त त्या अव्यक्ताला म्ह. व्यक्तरहिताला**(न.त.स.)** **अनुत्तमम्** - न विद्यत उत्तमम्-श्रेष्ठं यस्मात्सोऽनुत्तमस्तमनुत्तमम् = ज्याच्याहून दुसरा कोणी उत्तम नाही तो अनुत्तम त्या अनुत्तमाला**(न.ब.स.)**

**नाहं प्रकाश: सर्वस्य योगमायासमावृत: ।**

**मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ॥२५॥**

**अन्वयार्थ:** - योगमायासमावृत:, अहम्, सर्वस्य, प्रकाश:, न, अयम्, मूढ:, लोक:, अजम्, अव्ययम्, माम्, न, अभिजानाति ।

**अन्वयार्थ:** - **योगमायासमावृत: अहम्** - योगमायेने माझे स्वरूप आच्छादित झाल्यामुळे मी **सर्वस्य** - सर्व

लोकाकरिता **प्रकाशः न** - प्रत्यक्ष होत नाही **अयम्, मूढः लोकः** - हा अज्ञानी जन समुदाय **अजम्, अव्ययम्, माम्** - जन्मरहित अविनाशी अशा मला **न अभिजानाति** - जाणत नाही.

**विवरण** - योगमायेच्याद्वारा मी आच्छादित झाल्यामुळे साधारण मनुष्याची दृष्टी मायेच्या पडद्यातून बाहेर जात नाही म्हणजे इंद्रियातीत असा जो मी त्याच्या दृष्टीचा विषय होत नाही त्यामुळे माझ्या अविनाशी जन्मर हित अशा स्वरूपाला ते जाणत नाहीत.

**व्याकरणम्** - **योगमायासमावृतः** - योग पु. माया स्त्री. सम्+आ+वृ न.ग.उ.प.कर्म.भूत.धा.वि.पु.प्र.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **सर्वस्य** - सर्व सर्व.पु.ष.ए.व. **प्रकाशः** - प्रकाश पु.प्र.ए.व. **न** - न क्रि. वि.अ. **अयम्** - इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **मूढः** - मुह् च.ग.प.प.कर्त.भूत.धा.वि.पु.प्र.ए.व. **लोकः** - लोक पु.प्र.ए.व. **अजम्** - अज वि.पु.द्वि.ए.व. **अव्ययम्** - अव्यय वि.पु.द्वि.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अभिजानाति** - अभि+ज्ञा न.ग.उ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **योगमायासमावृतः** - योगः-गुणानां युक्तिः-घटनं सा एव माया योगमाया तया योगमायया समावृतः-आच्छादितः-संच्छन्नः योगमायासमावृतः = योग-गुणांची युक्ति-घटना तीच माया-योगमाया त्या योगमायेने आवृत-आच्छादित असा तो योगमायासमावृत**(क.ग.तृ.त.स.)** यद्वा **योगमायासमावृतः** - स्ववृत्त्या पुरुषं जननमरणदुःखप्रवाहेण योजयतीति योगा सा चासौ माया च योगमाया तया तमोरूपया समावृतः योगमायासमावृतः = आपल्या व्यापाराच्याद्वारा पुरुषाला जन्म-मरण आणि दुःखाच्या प्रवाहाबरोबर जी जोडते ती योगा आणि माया योगमाया, त्या योगरूपमायेने समावृत-आच्छादित **(क.ग.तृ.त.स.)** यद्वा **योगमायासमावृतः** - योगः-मम संकल्पस्तद्वशवर्तिनी माया योगमाया तयाऽयमभक्तो जनो मां स्वरूपेण न जानात्वितिसंकल्पानुविधायिन्या मायया सम्यगावृत इति योगमायासमावृतः = योग-माझा संकल्प त्याच्या वश राहणारी जी माया ती योगमाया तिच्यामुळे जे अभक्तजन माझ्या-ईश्वराच्या स्वरूपाला जाणत नाहीत. या प्रकारे माझ्या संकल्पाचे अनुसरण करणाऱ्या मायेने चांगल्या प्रकारे आवृत-आच्छादित असे योगमायासमावृत**(तृ.त.स.)**

**वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन ।**

**भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ॥२६॥**

**अन्वयः** - अर्जुन, अहम्, समतीतानि, च, वर्तमानानि, च, भविष्याणि, भूतानि, वेद, तु, माम्, कश्चन, न, वेद ।

**अन्वयार्थः** - **अर्जुन** - हे अर्जुना! **अहम्** - मी **समतीतानि** - भूतकाळामध्ये असलेल्या **च** - आणि **वर्तमानानि** - वर्तमान काळामध्ये असलेल्या **च** - आणि **भविष्याणि** - भविष्यकाळामध्ये असलेल्या **भूतानि** - प्राणिमात्रांना **वेद** - जाणतो **तु** - परंतु **माम्** - मला **कश्चन** - कोणीही **न वेद** - जाणत नाही.

**विवरण** - पूर्वी अनंत कल्पामध्ये होऊन गेलेली आणि वर्तमानकाळामध्ये असलेली प्रत्यक्ष (विद्यमान) तसेच भविष्यकाळामध्ये होणारी भूते या सर्वांना मी चांगल्या प्रकाराने जाणतो परंतु माझ्या भक्ताशिवाय इतर सर्व प्राणीमात्र मला जाणत नाहीत कारण अविवेकी मूढ या लोकांना माझ्या स्वरूपाचे ज्ञानच नाही म्हणून ते मला कोणत्याही प्रकाराने भजत(जाणत) नाहीत.

**अन्वयः** - तु, येषाम्, पुण्यकर्मणाम्, जनानाम्, पापम्, अन्तगतम्, ते, द्वन्द्वमोहनिर्मुक्ताः, दृढव्रताः, माम्, भजन्ते ।

**अन्वयार्थः** - **तु** - परंतु **येषाम्, पुण्यकर्मणाम्, जनानाम्** - निष्काम भावाने उत्तम कर्मे करणाऱ्या लोकांचे **पापम्** - पातक **अन्तगतम्** - नाश पावलेले असते **ते** - ते पुण्यवान् लोक **द्वन्द्वमोहनिर्मुक्ताः** - राग द्वेष जनित द्वंद्व मोहापासून सर्वथा अतीत आणि **दृढव्रताः** - दृढनिश्चयवाले **माम्** - मला **भजन्ते** - भजतात.

**विवरण** - अविवेकी मूढ लोकांच्या अतिरिक्त जे लोक जन्म जन्मांतरापासून शास्त्र विहित यज्ञ, दान आणि तपादि श्रेष्ठ कर्म तसेच परमात्म्याची निष्काम भक्ति करित आले आहेत त्याचप्रमाणे पूर्व संस्कार आणि उत्तम सत्संगाच्या प्रभावाने या जन्मामध्ये सुद्धा निष्काम भावाने आचरण करणारे असे जे पुण्यवान लोक द्वंद्वमोहापासून सर्वथा मुक्त होऊन तसेच पवित्र अंत:करणयुक्त दृढव्रत होत्साते माझे निरंतर भजन करतात.

**व्याकरणम्** - **तु** - तु उभ.अ. **येषाम्** - यत् सर्व.पु.ष.ब.व. **पुण्यकर्मणाम्** - पुण्य वि. कर्मन् न.ष.ब.व. **जनानाम्** - जन पु.ष.ब.व. **पापम्** - पाप न.प्र.ए.व. **अन्तगतम्** - अन्त वि. गम प्र.ग.प.प.कर्म.भू.धा. वि.न.प्र.ए.व. **ते** - तत् सर्व.पु.प्र.ब.व. **द्वन्द्वमोहनिर्मुक्ताः** - द्वन्द्वमोह पु. निर्+मुच् ष.ग.उ.प.कर्म.भू.धा. वि.पु.प्र.ब.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **दृढव्रताः** - दृढ वि. व्रत पु.प्र.ब.व. **भजन्ते** - भज् प्र.ग.आ.प.वर्त. तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **पुण्यकर्मणाम्** - सत्त्वशुद्धिकारणं पुण्यं कर्म येषां विद्यते ते पुण्यकर्माणस्तेषां पुण्यकर्मणाम् = चित्तशुद्धिचे कारण असे पुण्य कर्म ज्यांचे असते ते पुण्यकर्मे होत त्या पुण्यकर्म्यांचे**(ब.स.)** यद्वा **पुण्यकर्मणाम्** - अत्यन्तश्रद्धया भक्त्या चेश्वरप्रीत्यै नियमेन बहुजन्मभिः कृतं सर्वकामविनिर्मुक्तलक्षणसम्पन्नं यज्ञदानतपोरूपं पुण्यं कर्म वैदिकं येषां ते पुण्यकर्माणस्तेषां पुण्यकर्मणाम्-सत्कर्मैकनिष्ठानाम् = अत्यंत श्रद्धा आणि भक्तिने युक्त होवून ईश्वराच्या प्रीतिकरिता नियमाने अनेक जन्मापासून ज्यांनी संपूर्ण कामनांनी रहित होवून उक्त लक्षणांनी संपन्न यज्ञ, दान आणि तपरूप वैदिक पुण्यकर्मांचे अनुष्ठान केले असे ते पुण्यकर्मवान त्या पुण्यकर्मवानांचे**(ब.स.)** **द्वन्द्वमोहनिर्मुक्ताः** - द्वन्द्वस्य मोहो द्वन्द्वमोहो द्वन्द्वमोहेन निर्मुक्ताः-रहिता द्वन्द्वमोह निर्मुक्ताः = द्वंद्वाच्या मोहाने निर्मुक्त असणारे ते द्वंद्वमोहनिर्मुक्त**(ष.त.ग.तृ.त.स.)** **दृढव्रताः** - 'सर्वमिदमहं च ब्रह्मैव' इति दृढमप्रतिहतं व्रतं-नियमः बुद्धिनिश्चयविशेषलक्षणं येषां ते दृढव्रताः-अचलसंकल्पाः = हे सर्व मीच ब्रह्म आहे असे दृढ-अप्रतिहत व्रत-बुद्धिनिश्चयरूप आहे ज्यांचे ते दृढव्रत**(ब.स.)**

**जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतन्ति ये ।**

**ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम् ॥२९॥**

**अन्वयः** - ये, जरामरणमोक्षाय, माम्, आश्रित्य, यतन्ति, ते, तत्, ब्रह्म, कृत्स्नम्, अध्यात्मम्, च, अ खिलम्, कर्म, विदुः ।

**अन्वयार्थः** - **ये** - जे लोक **जरामरणमोक्षाय** - वार्धक्य आणि मरण यापासून अतीत होण्याकरिता **माम्** - मलाच **आश्रित्य** - आश्रय करून **यतन्ति** - प्रयत्न करतात **ते** - ते पुरुष **तत् ब्रह्म** - त्या ब्रह्माला **कृत्स्नम्** - संपूर्ण **अध्यात्मम्** - अध्यात्माला **च** - आणि **अखिलम्, कर्म** - संपूर्ण कर्माला **विदुः** - जाणतात.

**विवरण** - जो पर्यंत जीव जन्मबंधनापासून मुक्त होत नाही, तो पर्यंत वृद्धावस्था आणि मृत्यूपासून मुक्त होणे

असंभव आहे आणि जन्मबंधनापासून मुक्त त्यावेळी होतो ज्यावेळेला जीव अज्ञानजनित कर्मबंधनापासून सर्वथा मुक्त होऊन परमात्म्याला प्राप्त होतो. अशा प्रकारे एक मात्र माझाच आश्रय करून वृद्धावस्था आणि मरणापासून मुक्त होण्याकरिता जे पुरुष प्रयत्न करतात ते परब्रह्माला, समग्र अध्यात्माला आणि संपूर्ण कर्माला जाणतात.

**व्याकरणम्** - **ये** - यत् सर्व.पु.प्र.ब.व. **जरामरणमोक्षाय** - जरा स्त्री. मरण न. मोक्ष पु.च.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **आश्रित्य** - आ+श्रि प्र.ग.उ.प.ल्यबन्त अ. **यतन्ति** - यत् प्र.ग.उ.प.(प.प.) कर्त.वर्त.तृ.पु.ब.व. **ते** - तत् सर्व.पु.प्र.ब.व. **तत्** - तत् सर्व.न.द्वि.ए.व. **ब्रह्म** - ब्रह्मन् न.द्वि.ए.व. **कृत्स्नम्** - कृत्स्न वि.न.द्वि.ए.व **अध्यात्मम्** - अध्यात्म न.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **अखिलम्** - अखिल वि.न. द्वि.ए.व. **कर्म** - कर्मन् न.द्वि.ए.व. **विदुः** - विद् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **जरामरणमोक्षाय** - जीर्यतेऽनयेति जरा च-वृद्धावस्था च मरणं च-शरीरविमोक्षणं चेति जरामरणे जरमरणाभ्यां मोक्षः-तत्सम्बन्धराहित्यं जरामरणमोक्षस्तस्मै जरामरणमोक्षाय = जीर्ण केल्या जिच्याद्वारा जरा आणि मरण यापासून मुक्त होण्याकरिता**(द्वं.ग.पं.त.स.)** **अध्यात्मम्** - आत्मन्यधीत्यध्यात्मम् = आत्म्यामध्ये**(अव्य. स.)**

**साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः ।**

**प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः ॥३०॥**

**अन्वयः** - ये, साधिभूताधिदैवम्, च, साधियज्ञम्, माम्, विदुः, ते, युक्तचेतसः, प्रयाणकाले, अपि, च, माम्, विदुः ।

**अन्वयार्थः** - **ये** - जे पुरुष **साधिभूताधिदैवम्** - अधिभूत आणि अधिदैवासह **च** - आणि **साधियज्ञम्** - अधियज्ञासह **माम्** - मला **विदुः** - जाणतात **ते युक्तचेतसः** - ते समाहितचित्त पुरुष **प्रयाणकाले अपि च** - अंतकाळाच्यावेळीही **माम्** - मला **विदुः** - जाणतात.

**विवरण** - या अध्यायात ज्याला अपरा आणि पंधराव्या अध्यायात ज्याला क्षर पुरुष म्हटले आहे अशा त्या विनाशशील संपूर्ण जड जगाचे नाव अधिभूत तसेच आठव्या अध्यायात ज्याला ब्रह्म म्हटले आहे त्या सूत्रात्मा हिरण्यगर्भाचे नाव अधिदैव आणि नवव्या अध्यायाच्या चौथ्या पाचव्या तसेच सहाव्या श्लोकात ज्याचे वर्णन केले आहे त्या संपूर्ण प्राण्यांच्या अंतःकरणामध्ये अंतर्यामीरूपाने व्याप्त राहणाऱ्या अशा अव्यक्त स्वरूपाचे नाव अधियज्ञ आहे. अशाप्रकारे जे उपर्युक्त कथन केलेल्या अधिभूत, अधिदैव आणि अधियज्ञासह मला-परमात्म्याला जाणतात असे ते स्थिर अंतःकरणयुक्त पुरुष प्रयाणकाळाच्या वेळी देखील मला चांगल्या प्रकारांनी जाणतात.

**व्याकरणम्** - **ये** - यत् सर्व.पु.प्र.ब.व. **साधिभूताधिदैवम्** - स अ. अधिभूत न. अधिदैव न.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **साधियज्ञम्** - स अ. अधियज्ञ पु.द्वि.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.पु.द्वि.ए.व. **विदुः** - विद् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **ते** - तत् सर्व.पु.प्र.ब.व. **युक्तचेतसः** - युज् प्र.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि. चेतस् न. वि.पु.प्र.ब.व. **प्रयाणकाले** - प्र+या+ल्युट्=प्रयाण न. काल पु.स.ए.व. **अपि** - अपि क्रि.वि.अ. **च** - च उभ.अ. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **विदुः** - विद् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **युक्तचेतस:** - युक्तम्-मदेकनिष्ठं चेतोऽन्त:करणं येषां ते युक्तचेतस: = माझ्यामध्ये युक्त अंत:करण आहे ज्याचे ते युक्तचेतस**(ब.स.)** **साधिभूताधिदैवम्** - अधिभूतं च अधिदैवं च अधिभूताधिदैवम धिभूताधिदैवेन सह वर्तत इति साधिभूताधिदैवस्तं साधिभूताधिदैवम् = अधिभूत व अधिदैव मिळून अधिभूता धिदैव-अधिभूताधिदैवासह साधिभूताधिदैव त्या साधिभूताधिदैवाला**(द्वं.ग.तृ.त.स.)** यद्वा **साधिभूताधिदैवम्** - अधिभूतं च अधिदैवं चेति अधिभूताधिदैवे ताभ्यां सह वर्तत इति साधिभूताधिदैवम् = अधिभूत आणि अ धिदैव यांच्या बरोबर राहणारे ते साधिभूताधिदैव**(द्वं.ग.तृ.त.स.)** **साधियज्ञम्** - अधियज्ञेन सह वर्तत इति सा धियज्ञस्तं साधियज्ञम् = अधियज्ञाच्या बरोबर राहणारे ते साधियज्ञ**(तृ.त.स.)**

**ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे**

**श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानविज्ञानयोगो नाम सप्तमोऽध्याय: ।।७।।**

**-: अध्याय सातवा समाप्त :-**

**ॐ श्रीपरमात्मने नम:**

**अथ अष्टमोऽध्याय:**

भगवान म्हणतात की, आकाराला आलेल्या सर्व नाशिवंत पदार्थात ओतप्रोत भरलेले जे सूक्ष्म अविनाशी तत्त्व आहे त्याला ब्रह्म म्हणतात. सृष्टिचा आकार उत्पन्न झाला तरी त्याबरोबर उत्पन्न होत नाही अथवा सृष्टिचा लय झाला तरी त्याबरोबर नाश होत नाही. अशी जी त्या ब्रह्माची सहजस्थिति आहे तिला अध्यात्म म्हणतात. विशुद्ध व निराकार ब्रह्माच्या ठिकाणी चराचर चित्रविचित्र सृष्टि उत्पन्न होते, असा कर्त्याशिवाय अव्यक्ताच्या ठिकाणी दिसणारा जो व्यापार त्या व्यापाराला कर्म नाव आहे. पंचमहाभूतांचा संयोग झाला की जे नामरूपात्मक शरीर दिसते व वियोग झाला की नाहीसे होते त्याला अधिभूत म्हणतात. जो वास्तविक परमात्माच आहे पण अहंकारामुळे निराळा झाल्यासारखा होऊन शरीरात राहतो त्याला अधिदैव म्हणतात. अधिभूत व अधिदैव मीच आहे. परंतु अविद्येमुळे ते तत्त्व हीनदशेला आले आहे. तो हिनकसपणा गेला की मूळचा अधियज्ञ मीच आहे. याचीच शंका व समाधान यारूपाने स्पष्टीकरण या अध्यायामध्ये होणार आहे.

**अर्जुन उवाच** - अर्जुन म्हणाला

**किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम।**

**अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते॥१॥**

**अन्वय:** - पुरुषोत्तम, तत्, ब्रह्म, किम्, अध्यात्मम्, किम्, कर्म, किम्, च, अधिभूतम्, किम्, प्रोक्तम्, अधिदैवम्, किम्, उच्यते।

**अन्वयार्थ:** - **पुरुषोत्तम** - हे कृष्णा! **तत्, ब्रह्म किम्** - ते ब्रह्म म्हणजे काय **अध्यात्मम्, किम्** - अध्यात्म म्हणजे काय **कर्म किम्** - कर्म म्हणजे काय **च** - आणि **अधिभूतम्, किम् प्रोक्तम्** - अधिभूत कोणत्या वस्तुला म्हटले **अधिदैवम्, किम्, उच्यते** - आणि अधिदैव कोणत्या पदार्थाला बोलतात-म्हणतात.

**विवरण** - ब्रह्म, वेद, ब्रह्मा, निर्गुण परमात्मा, प्रकृती आणि ओंकार आदिकरिता अनेक ठिकाणी ब्रह्माचा प्रयोग केला आहे. म्हणून अर्जुन म्हणतो हे भगवान! ब्रह्म म्हणजे काये? म्हणजे कोणत्या तत्त्वाला अनुसरून या ठिकाणी ब्रह्मतत्त्वाचा प्रयोग केला आहे? त्याचप्रमाणे अध्यात्म काय आहे? कर्म काय आहे? अधिभूत काय आहे? आणि अधिदैव कशाला म्हणतात?

**व्याकरणम्** - **पुरुषोत्तम** - पुरुषोत्तम पु.संबो.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **ब्रह्म** - ब्रह्मन् न.प्र.ए.व. **किम्** - किम् सर्व.न.प्र.ए.व. **अध्यात्मम्** - अध्यात्म न.प्र.ए.व. **किम्** - किम् सर्व.प्र.ए.व. **कर्म** - कर्मन् न.प्र.ए.व. **किम्** - किम् सर्व.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **अधिभूतम्** - अधि+भू प्र.ग.प.प.कर्त.भूत.धा.न.प्र.ए.व. **किम्** - किम् सर्व.न.प्र.ए.व. **प्रोक्तम्** - प्र+वच् द्वि.ग.प.प.कर्म.भूत.धा. वि.न.प्र.ए.व. **अधिदैवम्** - अधिदैव न.प्र.ए.व. **किम्** - किम् सर्व.न.प्र.ए.व. **उच्यते** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अध्यात्मम्** - आत्मनीत्यध्यात्मम् = शरीरामध्ये रहणारे ते अध्यात्म(**अव्य.स.**) यद्वा

**अध्यात्मम्** - आत्मानम्-देहमधितिष्ठतीत्यध्यात्मम् = देहामध्ये स्थित राहते असे ते अध्यात्म**(अव्य.स.)** यद्वा **अध्यात्मम्** - आत्मानं देहमधिकृत्य तस्मिन्नधिष्ठाने तिष्ठतीत्यध्यात्मम् = आपल्या देहास अधिष्ठित करून त्या अधिष्ठानामध्ये स्थित राहते असे ते अध्यात्म**(अव्य.स.)** **अधिभूतम्** - भूत इति अधिभूतम् = भूतामध्ये रहाणारे ते अधिभूत**(अव्य.स.)** यद्वा **अधिभूतम्** - पृथिव्यादिभूतमधिकृत्य यत्किञ्चित्कार्यं तत् अधिभूतम् = पृथ्व्यादि भूतांस(पंच महाभूतांस)अधिष्ठित करून जे कार्य ते अधिभूत**(अव्य.स.)** **अधिदैवम्** - दैव इति अधिदैवम् = देवामध्ये राहाणारे ते अधिदैव**(अव्य.स.)** यद्वा **अधिदैवम्** - सर्वदैवतेष्वादित्यमण्डलादिष्वनुस्यूतं यत् चैतन्यं तदधिदैवम् = आदित्यमण्डलादि सर्व देवतांमध्ये व्यापून असलेले जे चैतन्य ते अधिदैव **(अव्य.स.)** यद्वा **अधिदैवम्** - देवताविषयमनुध्यानं तदधिदैवम् = जे देवताविषयक ध्यान ते अधिदैव **(अव्य.स.)** **पुरुषोत्तम** - पुरुषयो:-क्षराक्षरयोरुत्तम:-श्रेष्ठ इति पुरुषोत्तमस्तत्सम्बुद्धौ हे पुरुषोत्तम = पुरुषामध्ये-क्षर आणि अक्षर यांच्यामध्ये उत्तम-श्रेष्ठ असा पुरुषोत्तम त्याचे संबोधनामध्ये हे पुरुषोत्तम**(स.त.स.)** यद्वा **पुरुषोत्तम** - पुरुषेभ्य उत्तम इति पुरुषोत्तमस्तत्सम्बुद्धौ हे पुरुषोत्तम = सर्व पुरुषांपेक्षा उत्तम असा पुरुषोत्तम त्याचे संबोधनामध्ये हे पुरुषोत्तम**(पं.त.स.)** **प्रोक्तम्** - प्रकर्षेण-प्रकृष्टतयोक्तम्-कथितमिति प्रोक्तम् = प्रकृष्टरूपाने-उत्कृष्टरूपाने सांगितलेला**(वि.)**

**अधियज्ञ: कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन ।**

**प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभि: ॥२॥**

**अन्वय:** - मधुसूदन, अत्र, अधियज्ञ:, क:, अस्मिन्, देहे, कथम्, च, प्रयाणकाले, नियतात्मभि:, कथं, ज्ञेय:, असि ।

**अन्वयार्थ:** - **मधुसूदन** - हे मधुसूदना! **अत्र** - या ठिकाणी **अधियज्ञ:** - अधियज्ञ **क:** - कोणता **अस्मिन्, देहे कथम्** - या शरीरामध्ये कसा आहे **च** - आणि **प्रयाणकाले** - अंत:काळी **नियतात्मभि:** - समाहित पुरुषाकडून **कथम्, ज्ञेय: असि** - तू कोणत्या प्रकारे जाणण्यास समर्थ आहे.

**विवरण** - त्याचप्रमाणे या ठिकाणीसुद्धा अर्जुन म्हणतो कि, अधियज्ञ कशाला म्हणतात, त्याचे स्मरण कसे करावे, तो या देहात कोणत्या प्रकारे स्थित आहे आणि समाहित चित्त पुरुषाकडून अंत:काळाच्या वेळी तू कसा जाणण्यास योग्य होतो.

**व्याकरणम्** - **मधुसूदन** - मधुसूदन पु.संबो.ए.व. **अत्र** - अत्र कालवाचक अ. **अधियज्ञ:** - अधियज्ञ वि.पु.प्र.ए.व. **क:** - किम् सर्व.पु.प्र.ए.व. **अस्मिन्** - इदम् सर्व.पु.स.ए.व. **देहे** - देह पु.स.ए.व. **कथम्** - कथम् क्रि.वि.अ. **च** - च उभ.अ. **प्रयाणकाले** - प्रयाण न.वि. काल पु.स.ए.व. **नियतात्मभि:** - नि+यम् द.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. आत्मन् पु.तृ.ब.व. **कथम्** - कथम् क्रि.वि.अ. **ज्ञेय:** - ज्ञा न.ग.प.प.कर्म.विध्यर्थ धा.वि.पु.प्र.ए.व. **असि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **नियतात्मभि:** - नियत:-नियमित आत्मा चित्तं येषां ते नियतात्मनस्तैर्नियतात्मभि: = नियत म्हणजे नियमित आत्मा अंत:करण आहे ज्यांचे ते नियतात्मा त्यांकडून**(ब.स.)** **अधियज्ञ** - इज्यते क्रियत इति यज्ञ: श्रौतस्मार्तक्रियात्मको विसर्ग: पूर्वोक्तस्तमधिकृत्य तिष्ठतीत्यधियज्ञ: = जो केला जातो तो यज्ञ म्ह. श्रौत, स्मार्त क्रियात्मक पूर्वोक्त विसर्ग, त्याचा आश्रय करून जो स्थित राहातो तो अधियज्ञ

**(अव्ययीभाव स.) प्रयाणकाले** - प्रयाणस्य अन्तस्य काल:-समय इति प्रयाणकालस्तस्मिन् प्रयाणकाले = प्रयाणाचा-अंताचा काल-समय असा प्रयाणकाल त्या प्रयाणकालामध्ये**(ष.त.)**

ब्रह्म अध्यात्म आणि कर्माच्या विषयामध्ये अर्जुनाच्या तीन प्रश्नाचे उत्तर -

**श्रीभगवानुवाच** - श्री भगवान म्हणाले

**अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते ।**

**भूतभावोद्भवकरो विसर्ग: कर्मसञ्ज्ञित: ॥३॥**

**अन्वय:** - परमम्, अक्षरम्, ब्रह्म, स्वभाव:, अध्यात्मम्, उच्यते, भूतभावोद्भवकर:, विसर्ग:, कर्मसञ्ज्ञित: ।

**अन्वयार्थ: - परमम्, अक्षरम्, ब्रह्म** - जे श्रेष्ठ अविनाशी तेच ब्रह्म **स्वभाव: अध्यात्मम्** - त्याचाच प्रत्येक शरीरामध्ये जो चेतन भाव आहे तेच अध्यात्म आहे **उच्यते** - असे म्हटले जाते **भूतभावोद्भवकर:** - अक्षर ब्रह्मापासून भूताच्या भावाला उत्पन्न करणारा **विसर्ग:** - जो व्यापार (त्याग) **कर्मसञ्ज्ञित:** - त्याचे नाव कर्म आहे.

**विवरण** - अक्षर ब्रह्म या बरोबर परम विशेषण देऊन हे सिद्ध केले आहे की, सातव्या अध्यायाच्या एकोण तिसाव्या श्लोकांत कथित ब्रह्म निर्गुण-निराकार परमात्म्याचा वाचक आहे ब्रह्म आणि प्रकृतिचा वाचक नाही कारण जे सर्वापेक्षा श्रेष्ठ आणि सूक्ष्म असते त्यालाच परम म्हटले जाते म्हणून या ठिकाणी त्याला परम अक्षर म्हटले आहे. भगवंताची जीवरूपा चेतन पराप्रकृतिरूप आत्मतत्त्व ज्यावेळी आत्मशब्दवाच्य शरीर, इंद्रिय, मन, बुद्ध्यादिरूप अपरा प्रकृतिचे अधिष्ठान होते त्यावेळी त्याला अध्यात्म म्हटले जाते. अर्थात संपूर्ण चेतन समुदाय अध्यात्माचा वाचक आहे. यज्ञामध्ये देवतेला उद्देशून हवि आदिचा उत्सर्ग केला जातो त्याला म्हणतात विसर्ग म्हणजे भूताच्या सद्भावाला उत्पन्न करणारा जो त्याग आहे तोच कर्माला उद्देशून म्हटला आहे.

**व्याकरणम् - परमम्** - परम वि.न.प्र.ए.व. **अक्षरम्** - अक्षर वि.न.प्र.ए.व. **ब्रह्म** - ब्रह्मन् न.प्र.ए.व. **स्वभाव:** - स्व वि. भाव पु.प्र.ए.व. **अध्यात्मम्** - अध्यात्म न.प्र.ए.व. **उच्यते** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व. **भूतभावोद्भवकर:** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. भाव पु. उद्+भव वि. कर वि.पु.प्र.ए.व. **विसर्ग:** - वि+सृज् ष.ग.प.प./च.ग.आ.प.+घञ्=विसर्ग पु.प्र.ए.व. **कर्मसञ्ज्ञित:** - कर्मन् न. सम्+ज्ञा न.ग.उ.प.इतच् प्रत्ययान्त धा.वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - अक्षरम्** - ज्ञानाज्ञानाभ्यां कालेनाऽन्येन वा न क्षरति न नश्यति तदक्षरम् = ज्ञान आणि अज्ञान काल अथवा अन्य कोणत्याही वस्तूने जे नाश पावत नाही ते अक्षर**(न.त.स.) स्वभाव:** - स्वो भाव: स्वरूपं प्रत्यक्चैतन्यं न तु स्वस्य भाव इति षष्ठीसमास:, लक्षणाप्रसङ्गात् तस्मान्न ब्रह्मण: सम्बन्धि किंतु ब्रह्म स्वरूपमेव = स्व-ब्रह्म स्वयं ही भाव-स्वरूप आहे ज्याचा तो स्वभाव अर्थात् स्वरूप-ब्रह्मरूप प्रत्यक्चैतन्य ते अध्यात्म जे ब्रह्माच्या संबंधि नाही परंतु ब्रह्मस्वरूपच आहे**(कर्म.स.) अध्यात्मम्** - आत्मानं देहं बुद्ध्यन्तं ब्रह्माण्डं रविरिव प्रकाशयितुमधिष्ठाय तिष्ठतीत्यध्यात्मं यत्तत्परस्य ब्रह्मण: स्वभाव स्वरूपमेव स्वभावो नामाऽध्यात्मं प्रत्यक्तत्वं स्वयमेव भवतीति स्वभाव: = आत्म्याला बुद्धीपर्यंत देहाला जसा सूर्य ब्रह्मांडास प्रकाशित करतो तसाच प्रकाशित करण्याकरिता जीव अधिष्ठानरूपाने स्थित असतो ते अध्यात्म. अध्यात्म हा

परब्रह्माचा स्वभाव आहे अर्थात् स्वरूप आहे. स्वभाव-अध्यात्म प्रत्यक्तत्व जो स्वयं होतो त्यास स्वभाव असे म्हणतात(**अव्य.स.**) यद्वा **अध्यात्मम्** - आत्मानं देहमधिकृत्य भोक्तृतया वर्तमानमध्यात्ममुच्यतेऽध्यात्म शब्देनाभिधीयते न करणग्राम इत्यर्थ: = देहामध्ये अधिष्ठित होवून भोक्तारूपाने वर्तमान आहे तोच स्वभाव-अध्यात्म असे म्हटल्या जाते अध्यात्मशब्दाने करणग्राम-इंद्रियसमूह विवक्षित नाही हा अर्थ आहे(**अव्य.स.**) यद्वा **अध्यात्मम्** - आत्मनीत्यध्यात्मं परस्य ब्रह्मण: स्वभाव एवाध्यात्ममित्युच्यते = शरीरामध्ये राहणारा परब्रह्माचा स्वभावच अध्यात्म आहे असे म्हटले जाते(**अव्य.स.**) **भूतभावोद्भवकर:** - भूतानाम्-जरायुजाण्डजस्वेदजोद्भिज्जानां भावो भूतभावो भूतभावस्य उद्भव:-उत्पत्तिर्भूतभावोद्भवस्तंकरोतीति भूतभावोद्भवकर:, यद्वा करोतीति कर: भूतभावोद्भवस्यकर: भूतभावोद्भवकर: = भूतांचा जो भाव (सत्ता) भूतभाव त्या भूतभावाला उत्पन्न करणारा अर्थात् भूतवस्तूला उत्पन्न करणारा असा भूतभावोद्भवकर (**ष.त.स.**) यद्वा **भूतभावोद्भवकर:** - भूतान्येव भावा भूतभावा: स्थावरजंगमरूपपदार्थास्तेषामुद्भव:-उत्प त्तिर्भूतभावोद्भव इति जन्ममरणादेरूपलक्षणं तं करोतीति भूतभावोद्भवकर: = भूतरूपभाव भूतभाव-स्थावरजंगमरूप पदार्थ त्यांचा उद्भव-उत्पत्ति असा भूतभावोद्भव उद्भवशब्द जरामरण आदिचे उपलक्षण आहे त्याला जो करतो तो भूतभावोद्भवकर(**कर्म.ग.ष.ग.उप.स.**) यद्वा **भूतभावोद्भवकर:** - भूतानां भावो भूतभावस्तस्य उद्भवो भूतभावोद्भवस्तं करोतीति भूतभावोद्भवकर: = भूतांचा भाव भूतभाव-वस्तुभाव त्याचा जो उद्भव-उत्पत्ति तो भूतभावोद्भव त्याला करतो तो भूतभावोद्भवकर-भूतवस्तूंची उत्पत्ति करणारा भूतभावोद्भवकर(**ष.ग.कृ.वि.**)यद्वा **भूतभावोद्भवकर:** - भूतानाम्-भवनधर्मकानां सर्वेषां स्थावरजंगमानां भावमुत्पत्तिमुद्भवं वृद्धिं च करोतीति भूतभावोद्भवकर: = भूतांचे-उत्पत्तिधर्मांचे-स्थावरजंगमांचे भाव-उत्पत्ति आणि उद्भव-वृद्धि जो करतो तो भूतभावोद्भवकर(**ष.ग.उप.स.**) **कर्मसञ्ज्ञित:** - कर्मेति संज्ञा-नाम संजाता यस्य स कर्मसञ्ज्ञित: = कर्म अशी संज्ञा-नाम झाली ज्याची तो कर्मसंज्ञित(**इतच् प्रत्ययान्त त.वि.**)

अधिभूत, अधिदैव आणि अधियज्ञाच्या विषयामध्ये अर्जुनाच्या तीन प्रश्नांचे उत्तर -

**अधिभूतं क्षरो भाव: पुरुषश्चाधिदैवतम् ।**

**अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर ॥४॥**

**अन्वय:** - क्षर:, भाव:, अधिभूतम्, च, पुरुष:, अधिदैवतम्, देहभृताम् वर, अत्र, देहे, अहम्, एव, अ धियज्ञ: ।

**अन्वयार्थ:** - **क्षर: भाव:** - उत्पत्ति विनाश धर्मवान सर्वपदार्थ **अधिभूतम्** - अधिभूत आहे **च** - आणि **पुरुष:** - हिरण्यमयपुरुष **अधिदैवतम्** - अधिदैवत आहे **देहभृताम्, वर** - सर्व प्राण्यांमध्ये हे श्रेष्ठ अर्जुना! **अत्र देहे** - या शरीरामध्ये **अधियज्ञ:** - अधियज्ञ **अहम्, एव** - मीच आहे.

**विवरण** - अपरा प्रकृती आणि तिच्या परिणामापासून उत्पन्न जे प्रतिक्षण विनाशशील तत्त्व त्याचे नाव क्षरभाव आहे. त्यालाच तेराव्या अध्यायामध्ये क्षेत्र (शरीर) या नावाने संबोधित केले आहे. हा 'क्षरभाव' शरीर, इंद्रिय, मन, बुद्धी, अहंकार, भूत तसेच विषयांच्या रूपाने प्रत्यक्ष झाल्यानंतर त्याला जीवरूपा चेतन प्रकृतिने धारण केले. त्यालाच अधिभूत असे म्हणतात तसेच पुरुष शब्द या ठिकाणी प्रथम पुरुषाचा वाचक आहे. त्याला सूत्रात्मा, हिरण्यगर्भ, प्रजापति, अथवा ब्रह्म म्हणतात. जडचेतनात्मक संपूर्ण विश्वाचा हा प्राण पुरुष आहे. संपूर्ण देवता याचे अंग आहे म्हणून सर्वांचा अधिष्ठाता, अधिपति आणि उत्पादक आहे. म्हणून

याला अधिदैव म्हणतात. संपूर्ण यज्ञांचा भोक्ता, प्रभू तसेच संपूर्ण फलांचे विधान करणारा असा मी या शरीरामध्ये वासुदेवच अंतर्यामीरूपाने अधियज्ञ आहे.

**व्याकरणम्** - **क्षर:** - क्षर वि.पु.प्र.ए.व. **भाव:** - भाव पु.प्र.ए.व. **अधिभूतम्** - अधि+भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **पुरुष:** - पुरुष पु.प्र.ए.व. **अधिदैवतम्** - अधिदैवत वि.न.प्र.ए.व. **देहभृताम्** - देहभृत् पु.ष.ब.व. **वर** - वर पु.संबो.ए.व. **अत्र** - अत्र सप्तम्यन्त त्रल् प्रत्ययान्त अ. **देहे** - देह पु.स.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **अधियज्ञ:** - अधि+यज्ञ पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अधिभूतम्** - भूतानि-प्राणिमात्राण्यधिकृत्य भवति तदधिभूतम् = भूतांना-प्राणिमात्रांणा अधिकृत्य-आश्रित करून रहाणारा**(अव्य.स.)** यद्वा **अधिभूतम्** - भूतम्-प्राणिजातमधिकृत्य भवतीत्य धिभूतम् = सर्व प्राणिवर्गाला अधिकृत करून-आश्रित करून जे असते ते अधिभूत**(अव्य.स.)** **अधिदैवतम्** - दैवतान्यादित्यादीनधिकृत्य चक्षुरादीनीन्द्रियाणि अनुगृह्णातीति अधिदैवतम् = आदित्यादि देवतांचा अ धिष्ठाता होवून तो व्यष्टि जीवांच्या चक्षु आदि इंद्रियांच्या वर अनुग्रह करतो. म्हणून त्याला अधिदैवत म्हटले जाते**(अव्य.स.)** **देहभृताम्** - देहं बिभ्रतीति देहभृतस्तेषां देहभृताम् = देहाला-शरीराला पालन, पोषण करणाऱ्यांमध्ये श्रेष्ठ**(उप.स.)** **पुरुष:** - पूर्णमनेन सर्वकार्यजातमिति-पुरिशयनाद्वा पुरुष:-हिरण्यगर्भ: समष्टि लिङ्गात्मा = ज्याच्याद्वारा संपूर्ण कार्यसमूह पूर्ण आहे असा तो पुरुष किंवा शरीराख्य पुरात शयन करणारा-राहणारा असल्यामुळे तो पुरुष-समष्टिलिङ्गशरीररूप हिरण्यगर्भ**(वि.)** **क्षर:** - क्षरति प्रतिक्षणं नश्यतीति क्षर: = प्रतिक्षणाला ज्याचा क्षय-नाश होतो त्याला क्षर म्हणतात**(वि.)**

अंतकालामध्ये भगवत् स्मरणाचे फल तसेच अर्जुनाच्या सात प्रश्नांचे उत्तर -

**अन्तकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ।**

**य: प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशय: ॥५॥**

**अन्वय:** - च, अन्तकाले, माम्, एव, स्मरन्, कलेवरम्, मुक्त्वा, य:, प्रयाति, स:, मद्भावम्, याति, अत्र, संशय:, न, अस्ति ।

**अन्वयार्थ:** - **च** - आणि **अन्तकाले** - अंतकाळाच्यावेळी **माम्, एव स्मरन्** - माझेच चिंतन करणारा असा **कलेवरम्, मुक्त्वा** - देहाचा त्याग करून **य:** - जो **प्रयाति** - जातो **स:** - तो पुरुष **मद्भावम्** - माझ्या स्वरूपाला **याति** - प्राप्त होतो **अत्र** - यामध्ये **संशय:** - काहीच संशय **न अस्ति** - नाही.

**विवरण** - जो साधक माता, पिता, भाऊ, स्त्री, पुत्र, धन, ऐश्वर्य, मान, प्रतिष्ठा आदि कोणत्याही वस्तुंचे स्मरण न करता केवळ सदा-सर्वदा माझेच अनन्यभावाने चिंतन करतो तो मलाच प्राप्त होतो. परंतु अंतकाळाच्यावेळी सुद्धा माझेच चिंतन करीत जो देहाला सोडून जातो तो सुद्धा मलाच प्राप्त होतो. यामध्ये काही एकमात्र संशय नाही.

**व्याकरणम्** - **च** - च उभ.अ. **अन्तकाले** - अन्त वि. काल पु.स.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **स्मरन्** - स्मृ प्र.ग.प.प.कर्त.वर्त.शतृ=स्मरत् वि.पु.प्र.ए.व. **कलेवरम्** - कलेवर पु.द्वि.ए.व. **मुक्त्वा** - मुच् ष.ग.उ.प.त्वान्त अ. **य:** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **प्रयाति** - प्र+या द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **मद्भावम्** - अस्मत् सर्व.ष.ए.व. भाव पु.द्वि.ए.व. **याति** - या द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **अत्र** - अत्र सप्तम्यन्त त्रल् प्रत्ययान्त अ. **संशय:** - संशय पु.प्र.ए.व. **न** - न क्रि. वि.अ. **अस्ति** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अन्तकाले** - अन्तस्य-प्रयाणस्य काल:-समयोऽन्तकालस्तस्मिनन्तकाले = अंताचा-प्रयाणाचा जो काळ-समय त्या वेळी**(ष.त.स.) मद्भावम्** - मम-ईश्वरस्य भावम्-वैष्णवं तत्त्वम्-ब्रह्मभावमिति मद्भावम् = माझे-ईश्वराचे भाव-वैष्णवतत्त्व-ब्रह्मभाव अशा त्या मद्भावाला**(ष.त.स.)**

अंतकालाच्या भावानुसार गति होण्याचे कथन -

**यं यं वापि स्मरन्भावं त्यजत्यन्ते कलेवरम् ।**

**तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावित: ॥६॥**

**अन्वय:** - वा, कौन्तेय, यम्, यम्, अपि, भावम्, स्मरन्, अन्ते, कलेवरम्, त्यजति, सदा, तद्भावभावित:, तम्, तम्, एव, एति ।

**अन्वयार्थ:** - **वा कौन्तेय** - अथवा हे कुंतिपुत्र अर्जुना! **यम्, यम्, अपि भावम्** - ज्या ज्या पदार्थाचे-विषयाचे **स्मरन्** - चिंतन करीत **अन्ते** - मरणसमयी **कलेवरम्** - देहाला **त्यजति** - त्यागतो **सदा** - सर्वदा **तद्भावभावित:** - त्या वस्तुच्या वासनेचा अभ्यास केलेला तो पुरुष **तम्, तम्, एव** - त्या त्या वस्तुलाच **एति** - प्राप्त होतो.

**विवरण** - जो पुरुष मरणसमयी ज्या ज्या वस्तुची भावना करतो तो त्या त्या वस्तूला प्राप्त होतो. परमात्म्याचे चिंतन केले तर शरीराचा त्याग केल्यानंतर तो परमात्म्याला प्राप्त होतो. अन्य देवतेचे (अंतकाली) स्मरण केले तर तो अन्यदेवतेला प्राप्त होतो. त्याचप्रमाणे सांसारिक वस्तुचे चिंतन केले तर तो सांसारिक वस्तुला प्राप्त होतो म्हणून भगवान म्हणतात की, जो मरणसमयी ज्या पदार्थाची इच्छा-भावना करतो तो त्या पदार्थाला-भावाला प्राप्त होतो.

**व्याकरणम्** - **वा** - वा अ. **कौन्तेय** - हे कौन्तेय पु.संबो.ए.व. **यं यम्** - यत् सर्व.पु.द्वि.ए.व. **अपि** - अपि अ. **भावम्** - भाव पु.द्वि.ए.व. **स्मरन्** - स्मृ प्र.ग.प.प.कर्त.वर्त.धा.वि.पु.प्र.ए.व. **अन्ते** - अन्त वि.पु.स.ए.व. **कलेवरम्** - कलेवर पु.द्वि.ए.व. **त्यजति** - त्यज् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **सदा** - सदा कालवाचक अ. **तद्भावभावित:** - तत् सर्व.पु.ष.ए.व. भाव पु.अन्तगर्भित तृ.ए.व. भावित-भू प्र.ग.प.प.प्रयोजक कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **तम् तम्** - तत् सर्व.पु.द्वि.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **एति** - इ द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **तद्भावभावित:** - तस्य पदार्थस्य भाव:-भावना इति तद्भाव: तद्भावेन भावित:-स्मारित: इति तद्भावभावित: = त्या पदार्थाचा भाव-भावना असा तद्भाव त्या भावाने भावित-स्मारित असा तो तद्भावभावित**(ष.त.ग.तृ.त.स.)** यद्वा **तद्भावभावित:** - तस्मिनुपास्यदेवताविषये भाव:-भावना तद्भाव: स भावित:-स्मर्यमाणतयाऽभ्यस्तो येन स तद्भावभावित: = देव विषयक म्ह. पदार्थ विषयक भाव तद्भाव तो (तद्भाव) भावित पुन्हा पुन्हा चिंतन करण्याने अभ्यस्त केला गेला आहे ज्याच्याकडून तो तद्भावभावित **(ब.स.)** यद्वा **तद्भावभावित:** - तस्य ब्रह्मणो भावस्तद्भावो ब्रह्मस्वरूपं सदाऽयमेवाहमिति भावित:

स्वात्मनाऽनुभवसहितो (अनुभवविषयीकृत:) येन स तद्भावभावित: = त्या ब्रह्माचा भाव तद्भाव-ब्रह्मस्वरूप सदा हेच ब्रह्म मी आहे अशा प्रकारे भावित-आपल्या आत्मस्वरूपाने अनुभव ज्याने केला तो तद्भावभावित **(ब.स.)** यद्वा **तद्भावभावित:** - तद्भावं-ब्रह्मभावं भावितो-नित्यनिरंतर समाधिनिष्ठासंभावितसम्यग्ज्ञानेन प्रापितो य: स तद्भावभावित: = तद्भावाला-ब्रह्मभावाला जो भावित-नित्यनिरंतर समाधिनिष्ठेने उत्पन्न झालेल्या सम्यग्ज्ञानाने प्राप्त केला गेला जो तो तद्भावभावित**(ब.स.)** **स्मरन्** - स्मरतीति स्मरन्-चिन्तयन् = स्मरण करीत असता**(शतृ प्रत्ययान्त वि.)**

निरंतर भगवच्चिंतन करीत असतांना युद्ध करण्याची आज्ञा आणि त्याचे फळ -

**तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च ।**

**मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशय: ।।७।।**

**अन्वय:** - तस्मात्, सर्वेषु, कालेषु, माम्, अनुस्मर, च, युध्य, मयि, अर्पितमनोबुद्धि:, माम्, एव, एष्यसि, असंशय: ।

**अन्वयार्थ:** - **तस्मात्** - म्हणून **सर्वेषु कालेषु** - सर्वकाळी **माम्, अनुस्मर** - माझे चिंतन कर **च** - आणि **युध्य** - युद्ध कर **मयि अर्पितमनोबुद्धि:** - माझ्या मध्ये ज्या पुरुषाने आपली मन आणि बुद्धी अर्पण केली आहे असा **माम्, एव** - मलाच **एष्यसि** - प्राप्त होशील **असंशय:** - यामध्ये मुळीच संशय नाही.

**विवरण** - ज्या वस्तुचे अत्यधिक चिंतन होते. अंतसमयी त्या वस्तुचेच स्मरण होऊन देह त्याग केल्यानंतर तो पुरुष त्या वस्तुलाच प्राप्त होतो. मला (परमात्म्याला) प्राप्त होत नाही. म्हणून भगवान म्हणतात की हे अर्जुना! तू सदा-सर्वदा (सर्वकाळी) माझे चिंतन कर आणि तुझे जे कर्तव्य कर्म युद्ध ते सुद्धा कर माझ्या ठिकाणी मन आणि बुद्धी अर्पण केली आहे असा तू नि:संदेह मलाच प्राप्त होशील.

**व्याकरणम्** - **तस्मात्** - तत् सर्व.पु.पं.ए.व. **सर्वेषु** - सर्व सर्व.पु.स.ब.व. **कालेषु** - काल पु.स.ब.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **अनुस्मर** - अनु+स्मृ प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **युध्य** - युध् च.ग.आ.प.(प.प.)आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **मयि** - अस्मत् सर्व.स.ए.व. **अर्पितमनोबुद्धि:** - ऋ प्र.ग.प.प.+ णिच्+क्त, पुक् च=अर्पित कर्म.भू. मनस् न. बुद्धि स्त्री.प्र.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **असंशय:** - अ+संशय पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अर्पितमनोबुद्धि:** - इदंवृत्तिर्मनश्च अहंवृत्तिर्बुद्धिश्च मनोबुद्धी मयि-वासुदेवे अर्पिते-समर्पिते मनोबुद्धी यस्य सोऽर्पितमनोबुद्धि: = इदमाकार मन आणि अहमाकार बुद्धी माझ्यामध्ये-वासुदेवाच्या ठिकाणी अर्पित केली ज्याची तो अर्पित मनोबुद्धी**(ब.स.)** यद्वा **अर्पितमनोबुद्धि:** - सर्वेषु च कालेष्वाहार विहारशयनासनादिषु सर्वास्ववस्थासु सर्वात्मके मयि ब्रह्मण्येवाऽर्पिते-समर्पिते मनोबुद्धी येन सोऽर्पितमनोबुद्धि: = सर्वकालामध्ये-आहार, विहार, शयन, आसन, सर्वावस्थेमध्ये मन आणि बुद्धी अर्पित केली आहे ज्याने तो अर्पित मनोबुद्धी**(ब.स.)** यद्वा - **अर्पितमनोबुद्धि:** - नित्यनैमित्तिककर्मानुष्ठानेनाशुद्धिक्षयान्मयि भगवति वासुदेवेऽर्पिते-समर्पिते संकल्पाध्यवसायलक्षणे मनोबुद्धी येन सोऽर्पितमनोबुद्धि: = नित्यनैमित्तिक कर्माच्या अनुष्ठानाने अशुद्धिचा क्षय झाल्यामुळे माझ्यामध्ये-भगवान वासुदेवामध्ये अर्पित केले आहे संकल्पात्मक मन आणि निश्चयात्मिका बुद्धी ज्याने तो अर्पितमनोबुद्धी**(ब.स.)** **असंशय:** - न विद्यते संशय:-सन्देह

इत्यसंशय: = नाही संशय असा तो असंशय(**न.त.स.**) यद्वा **असंशय:** - संशयानामभावोऽसंशय: = संशयाचा अभाव असंशय(**अव्य.स.**)

निरंतर चिंतनाने परम दिव्यपुरुषाची प्राप्ती -

**अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ।**

**परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिन्तयन् ॥८॥**

**अन्वय:** - पार्थ, अभ्यासयोगयुक्तेन, न, अन्यगामिना, चेतसा, अनुचिन्तयन्, परमम्, दिव्यम्, पुरुषम्, याति ।

**अन्वयार्थ:** - **पार्थ** - हे पृथापुत्र अर्जुना! **अभ्यासयोगयुक्तेन** - परमेश्वराच्या ध्यानादी अभ्यासरूप योगाने युक्त असलेल्या **नान्यगामिना** - अन्य कोणत्याही विषयाकडे न जाणाऱ्या अशा **चेतसा** - चित्ताच्या द्वारा **अनु चिन्तयन्** - परमपुरुषाचे सतत चिंतन करणारा **परमम्, द्विव्यम्, पुरुषम्** - परम दिव्य पुरुषाला **याति** - प्राप्त होतो.

**विवरण** - यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा आणि ध्यानाच्या योगाने विषयभोगाच्या ठिकाणी अस्थिर झालेल्या चित्ताला पुन्हा पुन्हा प्रयत्न करून माझ्या ठिकाणी स्थिर करणाऱ्या अशा उपर्युक्त अभ्यासरूप योगाच्या द्वारा स्थिर झालेल्या तसेच दुसऱ्या कोणत्याही विषयाकडे न जाणाऱ्या स्थिर चित्ताच्या द्वारा परमात्म्याचे चिंतन करणारा योगी परम प्रकाशरूप दिव्यपुरुषाला प्राप्त होतो.

**व्याकरणम्** - **पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **अभ्यासयोगयुक्तेन** - अभ्यास पु. योग पु. युज् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.तृ.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अन्यगामिना** - अन्य वि. गामिन् वि.न.तृ.ए.व. **चेतसा** - चित् प्र.ग.प.प.+असुन्=चेतस् न.तृ.ए.व. **अनुचिन्तयन्** - अनु+चिन्त् द.ग.उ.प.प्रयोजक कर्त.वर्त.प्र.ए.व. **परमम्** - परम वि.न.द्वि.ए.व. **दिव्यम्** - दिव्य वि.पु.द्वि.ए.व. **पुरुषम्** - पुरुष पु.द्वि.ए.व. **याति** - या द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अभ्यासयोगयुक्तेन** - तीव्रमोक्षेच्छयाऽप्यतिवैराग्येण च तदेकपरत्वेन चिरकालं नित्य निरन्तरं च क्रियमाणविजातीयप्रत्ययानन्तरिता या सजातीयप्रत्ययावृत्ति: सार्वकालिकी स एष एवाऽभ्यास: समाधिरेतदभ्यासेन प्राप्तो यो निर्विकल्पकसमाधि: स योगस्तेन युक्तं तेन योगयुक्तेन = अभ्यास योगानेयुक्त म्ह. तीव्रमोक्षाच्या इच्छेने आणि अतिवैराग्याने केवल देह वस्तुमध्ये परायण होवून चिरकाल नित्यनिरंतर केली गेली विजातीयप्रत्ययाने रहित जी सजातीयप्रत्ययाची जी आवृत्ति तीच हा अभ्यास-समाधि त्या अभ्यासाने प्राप्त झालेली जी निर्विकल्पकसमाधि तो योग त्या योगाने युक्त अशा अभ्यासयोगयुक्ताने(**क.ग.तृ.त.स.**) यद्वा **अभ्यासयोगयुक्तेन** - चित्तसमर्पणविषयभूते एकस्मिन् मयि तुल्यप्रत्ययावृत्तिलक्षणो विलक्षणप्रत्ययानन्त रित: स च अभ्यासो योगस्तेन युक्तं तेनाभ्यासयोगयुक्तेन = चित्तसमर्पणाचा विषय अशा एका माझ्याच ठिकाणी तुल्य प्रत्ययाची आवृत्ति हेच ज्याचे स्वरूप आहे व विलक्षण प्रत्ययाने जो अंतरित होत नाही तो अभ्यास म्ह. माझे अविच्छिन्न चिंतन हाच अभ्यास आणि तो अशा प्रकारचा अभ्यास हाच योग अभ्यासयोगाने युक्त त्या अभ्यासयोगयुक्ताने(**क.ग.तृ.त.स.**) यद्वा **अभ्यासयोगयुक्तेन** - सजातीयप्रत्ययप्रवाहो मयि विजातीयप्रत्ययानन्तरितोऽभ्यास: स एव योग:-समाधिस्तेन युक्तं तेन

अभ्यासयोगयुक्तेन = विजातीय प्रत्ययाच्या व्यवधानाने रहित सजातीयप्रत्ययाचा प्रवाह अभ्यास तो अभ्यासच योग अर्थात् समाधि अभ्यासयोगानेयुक्त त्या अभ्यासयोगयुक्ताने**(क.ग.तृ.त.स.) नान्यगामिना** - अन्यत्र-विषयान्तरे गन्तुं यस्य शीलं नास्तीति नान्यगामि तेन नान्यगामिना = अन्यत्र-अन्य विषयांमध्ये जाण्याचे ज्याचे शील नाही ते नान्यगामि त्या नान्यगामि चित्ताने**(शीलार्थे न.त.स.)** यद्वा **नान्यगामिना** - अन्यं भाविकर्मकार्यं प्राणेन्द्रियादि विक्षेपं वाऽन्यद्वा गन्तुं मन्तुं च शीलं वासनाशक्तिर्नाऽस्याऽस्तीति नान्यगामि तेन नान्यगामिना = अन्याला म्ह. भावी कर्माने होणारे इंद्रियप्राणादि विक्षेपाला अथवा अन्य वस्तूला प्राप्त होण्याचे अथवा वासनाशक्ति मनन करण्याचे शील ज्याचे नाही ते नान्यगामि त्या नान्यगामि चित्ताने**(शीलार्थे न.त.स.)** यद्वा **नान्यगामिना** - नान्यत्र-विषयान्तरे निरोधप्रयत्नं विनाऽपि गन्तुं शीलमस्येति तेन नान्यगामिना = अन्यगामि नाही अर्थात् निरोध प्रयत्न न केल्याने सुद्धा ज्याचा अन्यत्र-अन्य विषयांमध्ये जाण्याचे ज्याचे शील नाही ते नान्यगामि त्या नान्यगामि चित्ताने**(शीलार्थे न.त.स.)**

परम दिव्य पुरुषाच्या स्वरूपाचे वर्णन आणि त्याच्या चिंतनाचा विधि -

**कविं पुराणमनुशासितारमणोरणीयांसमनुस्मरेद्यः ।**

**सर्वस्य धातारमचिन्त्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात् ॥९॥**

**अन्वयः** - यः, कविम्, पुराणम्, अनुशासितारम्, अणोः, अणीयांसम्, सर्वस्य, धातारम्, अचिन्त्यरूपम्, आदित्यवर्णम्, तमसः, परस्तात्, अनुस्मरेत् ।

**अन्वयार्थः - यः** - जो पुरुष **कविम्** - सर्वज्ञ **पुराणम्** - अनादि **अनुशासितारम्** - सर्वांचा नियामक **अणोः अणीयांसम्** - सूक्ष्माहून अतिसूक्ष्म **सर्वस्य धातारम्** - सर्वांचे धारण पोषण करणारा **अचिन्त्यरूपम्** - अगोचर स्वरूप **आदित्यवर्णम्** - सूर्याच्या प्रकाशाप्रमाणे नित्य तेजस्वी **तमसः परस्तात्** - अज्ञानरूप-अंधकाराहून पलिकडचा असा जो (परम पुरुष) त्याचे जो **अनुस्मरेत्** - ध्यान करतो तो मलाच प्राप्त होतो.

**विवरण** - जगतातील प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष वस्तूला जाणणारा असा सर्वज्ञ अनादि स्वामी, सर्वशक्तिमान अंतर्यामीरूपाने सर्वाचा नियंत्रण कर्ता, सर्वामध्ये व्याप्त असल्यामुळे सूक्ष्मापेक्षाहि अतिसूक्ष्म, संपूर्ण विश्वाचा आधार असल्यामुळे सर्वांचे धारण पोषण करणारा, अतींद्रिय असल्यामुळे मन आणि बुद्धिच्या द्वारा न चिंतन करता येणारा असा अगोचर स्वरूप, तो प्रकाशस्वरूप असल्यामुळे, सूर्याच्या प्रकाशाप्रमाणे सदैव तेजस्वी, अविद्या अथवा अज्ञानरूपी अंधकाराच्या अतीत असणारा असा जो परमपुरुष त्याचे जो ध्यान करतो तो मलाच प्राप्त होतो.

**व्याकरणम्** - **यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **कविम्** - कवि वि.पु.द्वि.ए.व. **पुराणम्** - पुराण वि.पु.द्वि.ए.व. **अनुशासितारम्** - अनु+शास् द्वि.ग.प.प.तृच्=अनुशास्तृ पु.द्वि.ए.व. **अणोः -** अणु पु.पं.ए.व. **अणीयांसम्** अणु+इयस्=अणीयस् पु.द्वि.ए.व. **सर्वस्य** - सर्व वि.पु.ष.ए.व. **धातारम्** - धा+तृच्=धातृ पु.द्वि.ए.व. **अ चिन्त्यरूपम्** - अ+चिन्त् द.ग.उ.प.कर्म.विध्यर्थ धा.वि. रूप वि.न.द्वि.ए.व. **आदित्यवर्णम्** - आदित्य वि. वर्ण पु.द्वि.ए.व. **तमसः** - तम्+असच्=तमस् न.पं.ए.व. **परस्तात्** - ताति प्रत्ययान्त तद्धि.अ. **यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **अनुस्मरेत्** - अनु+स्मृ प्र.ग.प.प.विध्यर्थ तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अचिन्त्यरूपम्** - चिन्तयितुं योग्यं चिन्त्यम्, चिन्त्यं रूपं यस्य स चिन्त्यरूपो चिन्त्यरूपो

न भवतीति अचिन्त्यरूपस्तमचिन्त्यरूपम्-वाङ्मनसागोचरम् = चिंतन करण्याला योग्य चिन्त्य, चिन्त्यरूप आहे ज्याचे तो चिन्त्यरूप, चिन्त्यरूप नाही तो अचिन्त्यरूप त्या अचिन्त्यरूपाला**(न.त.ग.ब.स.)** यद्वा **अचिन्त्यरूपम्** - अस्य रूपं नियतं विद्यमानमपि केनचित् चिन्तयितुं न शक्यत इत्यचिन्त्यरूपस्तमचिन्त्यरूपम् = अचिन्त्यरूप-याचे नियतरूप जरी विद्यमान आहे. तरी कोणालाही त्याचे चिंतन करता येणे शक्य नाही म्ह. अचिन्त्यरूप त्या तसल्या अचिन्त्यरूपाला**(न.त.स.)** यद्वा **अचिन्त्यरूपम्** - न चिन्तयितुं शक्यमपरिमितमहिमत्वेन रूपं यस्य सो चिन्त्यरूपस्तमचिन्त्यरूपम् = अचिन्त्यरूप-अपरिमित महिमाशील असल्यामुळे ज्याच्यारूपाचे चिंतन करणे अशक्य आहे असा तो अचिन्त्यरूप त्या अचिन्त्यरूपाला**(न.त.ग.ब.स.)** **आदित्यवर्णम्** - आदित्यस्येवाऽनपायो नित्यो वर्णश्चैतन्यलक्षण: प्रकाशो यस्य सोऽऽदित्यवर्णस्तमादित्यवर्णम् = सूर्याच्या समान नाशरहित नित्य चैतन्यरूप आहे वर्ण प्रकाश आहे ज्याचा तो आदित्यवर्ण त्या आदित्यवर्णाला**(ब.स.)** यद्वा **आदित्यवर्णम्** - आदित्यस्येव सकलजगदवभासको वर्ण: प्रकाशो यस्य स आदित्यवर्णस्तमादित्यवर्णम् = आदित्य-सूर्याच्यासमान संपूर्ण जगताचा अवभासक-प्रकाशक वर्ण-प्रकाश आहे ज्याचा तो आदित्यवर्ण त्या आदित्यवर्णाला**(ब.स.)** यद्वा **आदित्यवर्णम्** - आदित्यस्य इव नित्य चैतन्यप्रकाशो वर्णो यस्य स आदित्यवर्णस्तमादित्यवर्णम् = आदित्याच्या वर्णाप्रमाणे-प्रकाशाप्रमाणे नित्य चैतन्यप्रकाश हाच ज्याचा वर्ण-प्रकाश आहे तो आदित्यवर्ण त्या आदित्यवर्णाला**(ब.स.)** **अणीयांसम्** - अतिशयेन अणुरिति अणीयान् तमणीयांसम्-अतिसूक्ष्मतरम् = अत्यंत अणु-सूक्ष्मापेक्षाहि सूक्ष्म त्याला**(वि.)** **पुराणम्** - पुरापि नव: पुराणस्तं पुराणम्-चिरंतनम्-पुरा नवं करोतीति = जो पहिला नवीन अर्थात् पुराण त्याला**(वि.)** यद्वा **पुराणम्** - सर्वकारणत्वात्-अनादित्वात्-अप्रमेयत्वादितिपुराणम् = सर्वकारण-अनादि-अप्रमेय असल्यामुळे असा पुराण**(वि.)** **अनुशासितारम्** - सर्वेषां प्राणिनां हृदये-बुद्धिकोशे स्थित्वा तत्तत्प्राणिकर्माण्यनुसृत्य शासितारम्-नियन्तारम् = सर्व प्राण्यांच्या हृदयामध्ये-बुद्धिकोशामध्ये स्थित राहून त्या त्या प्राण्याच्या कर्मानुसार अनुशासिता-नियन्ता**(वि.)** **कविम्** - अतीतानागतवर्तमानसर्वप्राणितद्धर्मतत्कर्माणि चित्रविचित्राणि तत्फलानि च साक्षादव्यवधानेन कोकवीति विजानातीति कवि:-सर्वज्ञस्तं कविम् = अतीत अनागत वर्तमान सर्वप्राण्यांना त्यांच्या धर्मांना त्यांच्या कर्मांना तसेच त्यांच्याचित्रविचित्र फलांना साक्षात् व्यवधानाच्या विना जो जाणतो तो कवि-सर्वज्ञ त्या कविला**(वि.)**

**प्रयाणकाले मनसाचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव ।**

**भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥१०॥**

**अन्वय:** - प्रयाणकाले, भक्त्या, च, योगबलेन, युक्त:, भ्रुवो:, मध्ये, प्राणम्, सम्यक्, आवेश्य, अचलेन, मनसा, (अनुस्मरेत्), स:, तम्, परम्, दिव्यम्, पुरुषम्, उपैति ।

**अन्वयार्थ:** - (**य:** - जो पुरुष) **प्रयाणकाले** - अंतकालाच्या वेळी **भक्त्या** - भक्तिने **च** - आणि **योगबलेन युक्त:** - योगबलाने युक्त होऊन **भ्रुवो: मध्ये** - दोन भुवयांच्या मध्यभागी **प्राणम्** - प्राणाला **सम्यक्** - चांगल्या प्रकारांनी **आवेश्य** - स्थापून **अचलेन मनसा** - स्थिर अंत:करणाने **स:** - तो पुरुष **तम्, परम्, दिव्यम्, पुरुषम्** - त्या परम दिव्यपुरुषाला **उपैति** - प्राप्त होतो.

**विवरण** - जो भक्तियुक्त पुरुष अंतकालाच्यावेळी योगबलाच्या द्वारा इडा आणि पिंगला या नावाच्या उजवीकडील आणि डावीकडील अशा ज्या दोन नाड्या बाहेर निघाल्या आहेत. त्यांचा चांगल्या प्रकारांनी

निरोध करून, दोन भुवयांच्यामध्ये प्राणांला स्थापित करून आणि त्याचप्रमाणे विषयाचे चिंतन सोडून, परमात्म्याच्या विषयी परम प्रेमाने जे युक्त होऊन, निश्चल-स्थिर अंत:करणाने माझे स्मरण करतो. तो पुरुष त्या परम दिव्य तेजस्वी पुरुषाला प्राप्त होतो.

**व्याकरणम्** - **प्रयाणकाले** - प्रयाण न. काल पु.स.ए.व. **भक्त्या** - भज्+क्तिन्=भक्ति स्त्री.तृ.ए.व. **च** - च उभ.अ. **योगबलेन** - योग पु. बल न.तृ.ए.व. **युक्तः** - युज् च.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **भ्रुवोः** - भ्रु स्त्री.स.द्वि.व. **मध्ये** - मध्य वि.पु.स.ए.व. **प्राणम्** - प्राण पु.द्वि.ए.व. **सम्यक्** - सम्यक् वि.पु.प्र.ए.व. **आवेश्य** - आ+विश् ष.ग.प.प.ल्यबन्त अ. **अचलेन** - अ+चल वि.न.तृ.ए.व. **मनसा** - मनस् न.तृ.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **तम्** - तत् सर्व.पु.द्वि.ए.व. **परम्** - पर वि.पु.द्वि.ए.व. **दिव्यम्** - दिव्य वि.पु. द्वि.ए.व. **पुरुषम्** - पुरुष पु.द्वि.ए.व. **उपैति** - उप+इ द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - योगबलेन** - योग एव चित्तवृत्तिनिरोध एव बलम्-सामर्थ्यं तेन योगबलेन = चित्तवृत्ति निरोध योगच बल आहे अशा त्या योगबलाने**(कर्म.स.) प्रयाणकाले** - प्रयाणस्य-मरणस्य कालः-समयस्त स्मिन् प्रयाणकाले = प्रयाणकालाच्या वेळी**(ष.त.स.) प्राणम्** - प्राणयति-चेष्टयतीति प्राणस्तं प्राणम् = प्राणन करणारा-चेष्टा करणारा असा जो प्राण त्या प्राणाला**(वि.)**

परमात्म्याच्या निर्गुण स्वरूपाची प्रशंसा -

**यदक्षरं वेदविदो वदन्ति विशन्ति यद्यतयो वीतरागाः ।**

**यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत्ते पदं सङ्ग्रहेण प्रवक्ष्ये ॥११॥**

**अन्वयः** - वेदविदः, यद्, अक्षरम्, वदन्ति, वीतरागाः, यतयः, यत्, विशन्ति, यत्, इच्छन्तः, ब्रह्मचर्यम्, चर न्ति, तत्, पदम्, ते, सङ्ग्रहेण, प्रवक्ष्ये ।

**अन्वयार्थः** - **वेदविदः** - वेदाला जाणणारे विद्वान लोक-ज्ञाते लोक **यत्** - ज्या परमपदाला **अक्षरम्** - अ विनाशी **वदन्ति** - म्हणतात **वीतरागाः यतयः** - आसक्तिरहित असे विरक्तसंन्याशी **यत्, विशन्ति** - ज्याच्यामध्ये प्रवेश करतात **यत् इच्छन्तः** - जे परम पदाला जाणण्याची इच्छा करणारे **ब्रह्मचर्यम्** - ब्रह्मचारी लोक ब्रह्मचारीव्रताचे **चरन्ति** - आचरण करतात **तत्, पदम्** - ते परमपद **ते** -(तुझ्याकरता) तुला **सङ्ग्रहेण** - संक्षेपाने (थोडक्यात) **प्रवक्ष्ये** - सांगतो.

**विवरण** - ज्या परमपदाचा कोणत्याही अवस्थेमध्ये अथवा कोणत्याही रूपामध्ये क्षय होत नाही वेदाला जाणणारे लोक अशा त्या परमपदाला अविनाशी म्हणतात(अविनाशी रूपाने संबोधित करतात) अशा अ विनाशी पदामध्ये आसक्तिरहित यत्नशील विरक्त संन्याशी प्रवेश करतात आणि त्या पदाची इच्छा करणारे ब्रह्मचारी लोक ब्रह्मचर्यव्रताचे निष्ठेने आचरण करतात. असे जे सदा एकरस, एकरूप, अविनाशी पद आहे ते मी तुला संक्षेपाने सांगेन.

**व्याकरणम्** - **वेदविदः** - वेदविद् पु.प्र.ब.व. **यत्** - यत् सर्व.न.द्वि.ए.व. **अक्षरम्** - अक्षर वि.न.द्वि.ए.व. **वदन्ति** - वद् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **वीतरागाः** - वि+इ द्वि.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. राग पु.प्र.ब.व. **यतयः** - यति पु.प्र.ब.व. **यत्** - यत् सर्व.न.द्वि.ए.व. **विशन्ति** - विश् ष.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **यत्** - यत् सर्व.न.द्वि.ए.व. **इच्छन्तः** - इष् ष.ग.प.प.कर्त.वर्त.धा.वि.पु.प्र.ब.व. **ब्रह्मचर्यम्** - ब्रह्म+चर्

प्र.ग.प.प.+यत्=ब्रह्मचर्य न.द्वि.ए.व. **चरन्ति** - चर् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **तत्** - तत् सर्व.न.द्वि.ए.व. **पदम्** - पद न.द्वि.ए.व. **ते** - युष्मत् सर्व.च.ए.व. **सङ्ग्रहेण** - सङ्ग्रह पु.तृ.ए.व. **प्रवक्ष्ये** - प्र+वच् द्वि.ग.आ.प.द्वि.भवि.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **वेदविदः** - वेदं विदन्तीति वेदविदः = वेदाला जाणणारे वेदविद**(उ.स.)** यद्वा **वेदविदः** - विदन्तीति विदो वेदस्य विद इति वेदविदः = वेदाच्या अर्थाला जाणणारे असे वेदविद**(ष.त.स.)** **वीतरागाः** - विगतो रागः-विषयप्रीतिर्येभ्यस्ते वीतरागाः = ज्यांच्यापासून राग-विषयासक्ति पार निघून गेली आहे ते वीतराग संन्यासी**(ब.स.)** **ब्रह्मचर्यम्** - गुरोः समीपे स्थित्वा ब्रह्मचर्यं चरन्तीति ब्रह्मचर्यम् = गुरुसमीप वास करून ब्रह्मचर्य पालन करतात**(वि.)** यद्वा **ब्रह्मचर्यम्** - ब्रह्मचर्यं गुरुकुलवासादि यावज्जीवं तपश्चरन्तीति ब्रह्मचर्यम् = गुरुकुलवास आदि जीवनपर्यंत तपाचे आचरण करणे हेच ब्रह्मचर्य**(वि.)** यद्वा **ब्रह्मचर्यम्** - ब्रह्मणि चरतीति ब्रह्मचारी तस्य भाव इति ब्रह्मचर्यम् = ब्रह्मामध्ये विचरण करतो असा ब्रह्मचारी त्याचे असणे असे ब्रह्मचर्य**(वि.)** यद्वा **ब्रह्मचर्यम्** - ब्रह्मचर्यं नाम-दृष्टादृष्टसर्वविषयसुखवैमुख्येनाऽऽहारादिनियमेन स्वधर्मेण च श्रद्धया भक्त्या च सद्गुरुसन्निधौ वेदान्तश्रवणमेव तत्कुर्वन्ति ब्रह्मचर्यम् = ब्रह्मचर्य नाम-दृष्ट आणि अदृष्ट सर्व विषयांच्या सुखाने विमुख होवून आहार आदिच्या नियमाने, स्वधर्माने, श्रद्धेने आणि भक्तिने सद्गुरुच्या जवळ राहून वेदांताचे श्रवण हेच ब्रह्मचर्य**(परिभाषा)** **पदम्** - ज्ञानेन पद्यते-प्राप्यत इति पदं परं ब्रह्म = ज्ञानाच्या द्वारा प्राप्त केले जाते ते पद म्ह. परब्रह्म त्या परब्रह्माला**(वि.)**

अंतकालामध्ये योगधारणेच्या विधिने निर्गुण ब्रह्माच्या जपध्यानाचा प्रकार आणि त्याच्या फलाचे वर्णन -

**सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च ।**

**मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् ॥१२॥**

**अन्वयः** - सर्वद्वाराणि, संयम्य, च, मनः, हृदि, निरुध्य, आत्मनः, प्राणम्, मूर्ध्नि, आधाय, योगधारणाम्, आस्थितः ।

**अन्वयार्थः** - **सर्वद्वाराणि** - इंद्रियरूपी घराची सर्वद्वारे **संयम्य** - बंद करून(म्हणजे इंद्रियांचे नियमन करून) **च** - आणि **मनः** - मन **हृदि** - हृदयांमध्ये **निरुध्य** - स्थिर करून **आत्मनः प्राणम्** - आपल्या प्राण वायुला **मूर्ध्नि** - मस्तकामध्ये **आधाय** - स्थापित करून **योगधारणाम्** - योगधारणेचा **आस्थितः** - आश्रय केलेला.

**विवरण** - चक्षुरादि इंद्रियांच्या संपूर्ण द्वाराला बंद करून(म्हणजे त्यांचा निरोध करून), त्याप्रमाणे नाभी आणि कंठ या दोन्हीच्या मध्ये असणारे हृदयकमळ त्यामध्ये मनाला स्थिर करून, सर्वबाजूंनी निरोध केलेला असा जो प्राण त्याला मस्तकामध्ये स्थापित करून, योगधारणेवर स्थित झालेला असा जो योगीपुरुष;

**व्याकरणम्** - **सर्वद्वाराणि** - सर्व वि. द्वार न.द्वि.ब.व. **संयम्य** - सम्+यम् प्र.ग.प.प.ल्यबन्त अ. **च** - च उभ.अ. **मनः** - मनस् न.द्वि.ए.व. **हृदि** - हृद् न.स.ए.व. **निरुध्य** - नि+रुध् स.ग.उ.प.ल्यबन्त अ. **आत्मनः** - आत्मन् पु.ष.ए.व. **प्राणम्** - प्राण पु.द्वि.ए.व. **मूर्ध्नि** - मूर्धन् पु.स.ए.व. **आधाय** - आ+धा तृ.ग.उ.प.ल्यबन्त अ. **योगधारणाम्** - योग पु. धारणा स्त्री.द्वि.ए.व. **आस्थितः** - आ+स्था प्र.ग.प.प.कर्त.भूत.धा.वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - सर्वद्वाराणि** - सर्वाणि च-संपूर्णानि च तानि द्वाराणि चेति सर्वद्वाराणि-शब्दादि प्रवेशमार्गाणि श्रोत्रादीन्द्रियाणि = सर्व अशी ती द्वारे सर्वद्वारे म्हणजे शब्दादि प्रवेश मार्ग श्रोत्र, नेत्र, नासिका आदि इंद्रिये**(कर्म.स.) योगधारणाम्** - योगस्य धारणा योगधारणा तां योगधारणाम् = योगाच्या धारणेला**(ष.त.स.)**

**ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।**

**यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ॥१३॥**

**अन्वयः** - ओम्, इति, एकाक्षरम्, ब्रह्म, व्याहरन्, माम्, अनुस्मरन्, यः, देहम्, त्यजन्, प्रयाति, सः, परमाम्, गतिम्, याति ।

**अन्वयार्थः - ओम्, इति एकाक्षरम्** - ओम् या एकाक्षर **ब्रह्म -** ब्रह्माचे **व्याहरन् -** उच्चारण कराणारा आणि **माम्** - त्याच्या अर्थस्वरूपाला **अनुस्मरन्** - स्मरण करणारा(म्हणजे माझेच चिंतन करणारा) **यः** - जो **देहम्, त्यजन्** - शरीराचा त्याग करून **प्रयाति** - जातो **सः** - तो पुरुष **परमाम्, गतिम्** - परम गतिला **याति** - जातो.(प्राप्त होतो.)

**विवरण** - उपर्युक्त कथन केल्याप्रमाणे ओम् या एकाक्षर ब्रह्माचे उच्चारण करणारा आणि अर्थस्वरूप माझे-निर्गुण ब्रह्माचे चिंतन करणारा जो योगी-पुरुष देहाचा त्याग करून इहलोकाची यात्रा संपवितो तो पुरुष अत्यंत श्रेष्ठ गतिला प्राप्त होतो.

**व्याकरणम् - ओमित्येकाक्षरम्** - ओम् अ. इति अ. एक सर्व. अक्षर वि.न.द्वि.ए.व. **ब्रह्म** - ब्रह्मन् न. द्वि.ए.व. **व्याहरन्** - वि+आ+हृ प्र.ग.प.प.कर्त.शतृ=व्याहरत् वि.पु.प्र.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **अनुस्मरन्** - अनु+स्मृ प्र.ग.प.प.कर्त.शतृ=अनुस्मरन् वि.पु.प्र.ए.व. **यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **देहम्** - देह पु.द्वि.ए.व. **त्यजन्** - त्यज् प्र.ग.प.प.कर्त.शतृ=त्यजत् वि.पु.प्र.ए.व. **प्रयाति** - प्र+या द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **परमाम्** - परमा वि.स्त्री.द्वि.ए.व. **गतिम्** - गति स्त्री. द्वि.ए.व. **याति** - या द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - एकाक्षरम्** - एकश्च तदक्षरश्चैकाक्षरमर्थाद् ब्रह्मणो वाचकत्वाद् ब्रह्मेत्युच्यते = एक आणि अक्षर एकाक्षर म्हणजे ओम् एकाक्षर ब्रह्माचा वाचक असल्यामुळे त्याला ब्रह्म म्हटले जाते अशा त्या एकाक्षराला**(कर्म.स.)**

भगवंताच्या द्वारा आपल्या प्राप्तीचा सोपा उपाय म्ह. अनन्य प्रेमपूर्वक निरंतर चिंतन करणे -

**अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।**

**तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥१४॥**

**अन्वयः** - पार्थ, यः, अनन्यचेताः, सततम्, नित्यशः, माम्, स्मरति, तस्य, नित्ययुक्तस्य, योगिनः, अहम्, सुलभः ।

**अन्वयार्थः - पार्थ** - हे अर्जुना! **यः -** जो **अनन्यचेताः -** माझ्यामध्ये अनन्यचित्त होऊन **सततम्** - निरंतर **नित्यशः** - नित्य **माम्** - मला **स्मरति** - स्मरतो(माझे स्मरण करतो) **तस्य नित्ययुक्तस्य योगिनः** - त्या निरंतर स्थिरचित्त योगी पुरुषाला **अहम्** - मी **सुलभः** - सहज प्राप्त आहे.

**विवरण** - ज्या पुरुषाचे चित्त दुसऱ्या कोणत्याही वस्तुमध्ये न रमता निरंतर अनन्य प्रेमाने केवळ परमप्रेमी परमेश्वराच्या ठिकाणी रममाण होते. जो एक क्षणाचा विसर न पाडता सदा-सर्वदा माझेच स्मरण करतो. अशा अनन्यभावाने परमेश्वराचे चिंतन करणाऱ्या प्रेमी अनन्य भक्ताला मी सदा-सर्वदा प्राप्त होण्याकरिता सुलभ आहे.

**व्याकरणम्** - **पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **अनन्यचेताः** - अनन्य वि. चेतस् न. वि.पु.प्र.ए.व. **सततम्** - सतत वि.पु.द्वि.ए.व. **नित्यशः** - नित्यशस् अ. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **स्मर ति** - स्मृ प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **तस्य** - तत् सर्व.पु.ष.ए.व. **नित्ययुक्तस्य** - नित्य वि. युज् च.ग./ द.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.ष.ए.व. **योगिनः** - योगिन् पु.ष.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **सुलभः** - सुलभ वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **अनन्यचेताः** - न विद्यते अन्यो ब्रह्मातिरिक्तो विषयो यस्य तदनन्यं विषयान्तरास्पृष्टं चेतः-अन्तःकरणं यस्य सोऽनन्यचेताः = ब्रह्माच्या अतिरिक्त अन्य विषय नाही ते अनन्य, अन्यविषयाला स्पर्श न करणारे चित्त आहे ज्याचे तो अनन्यचेता**(ब.स.)** यद्वा **अनन्यचेताः** - नास्ति अन्यस्मिन्-मदन्ये-विषयान्तरे चेतः-अन्तःकरणं यस्य सोऽनन्यचेताः = नाही माझ्याहून अन्य-विषयांतरामध्ये चित्त-अंतःकरण ज्याचे तो अनन्यचेता**(ब.स.)** **नित्ययुक्तस्य** - नित्ये-नित्यस्वरूपे युक्तः-समाहितो नित्ययुक्तस्तस्य नित्ययुक्तस्य = नित्यस्वरूपामध्ये युक्त असणाऱ्या त्या नित्ययुक्ताचा अर्थात् त्या नित्ययुक्ताकरिता**(स.त.)**

भगवत्प्राप्तिने पूर्व जन्माचा अभाव आणि अन्य समस्त लोकांची पुनरावृत्ति दाखविणे -

**मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् ।**

**नाप्नुवन्ति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ॥१५॥**

**अन्वयः** - परमाम्, संसिद्धिम्, गताः, महात्मानः, माम्, उपेत्य, दुःखालयम्, अशाश्वतम्, पुनर्जन्म, न, आप्नुवन्ति ।

**अन्वयार्थः** - **परमाम्, संसिद्धिम्, गताः** - परम(श्रेष्ठ) सिद्धिला प्राप्त झालेले **महात्मानः** - महात्मा लोक **माम्** - मला **उपेत्य** - प्राप्त होऊन **दुःखालयम्** - दुःखाचे घर-आगर आणि **अशाश्वतम्** - नश्वर **पुनर्जन्म** - पुनर्जन्माला **नाप्नुवन्ति** - प्राप्त होत नाहीत.

**विवरण** - परमसिद्धिला प्राप्त झालेले महात्मा पुरुष माझ्या स्वरूपाला प्राप्त होऊन, सर्व दुःखाचे घर आणि शरीरपातानंतर कर्मवश दुःखप्रचुर देवता, मनुष्य, पशु, पक्षि आदि अन्य-अन्य योनीमध्ये प्रवेश करणे अशा या क्षणभंगुर पुनर्जन्माला ते प्राप्त होत नाहीत.

**व्याकरणम्** - **परमाम्** - परमा वि.स्त्री.द्वि.ए.व. **संसिद्धिम्** - सम्+सिद्धि स्त्री.द्वि.ए.व. **गताः** - गम् प्र.ग.प.प.कर्त.भूत.धा.वि.पु.प्र.ब.व. **महात्मानः** - महात्मन् पु.प्र.ब.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **उपेत्य** - उप+इ द्वि.ग.प.प.ल्यबन्त अ. **दुःखालयम्** - दुःख न. आलय पु.द्वि.ए.व. **अशाश्वतम्** - अ+शश् प्र.ग.प.प.+वत्=शश्वत्(अ.)+अण्=शाश्वत वि.न.द्वि.ए.व. **पुनर्जन्म** - पुनर् अ. जन्मन् न.द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **आप्नुवन्ति** - आप् पं.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **महात्मानः** - महान्नित्यनिरन्तरब्रह्मनिष्ठया निःशेषविनष्टरजस्तमोगुणतत्कार्यत्वाद

तिस्वच्छतरत्वेन प्रकृष्ट: केवलशुद्धसत्वभावापन्न आत्मा मनो येषां ते महात्मान: = महान नित्यनिरंतर ब्रह्म निष्ठेद्वारा रजतमोगुणकार्यास नि:शेषतया नष्ट करून अतिस्वच्छतेमुळे केवल शुद्ध सत्त्वभावास प्राप्त झालेला आत्मा-मन आहे ज्यांचे ते महात्मा**(ब.स.) दु:खालयम्** - यस्मिन् दु:खानि आलीयन्त इति दु:खालयम्-जन्मदु:खानाम्-आध्यात्मिकादीनामालयम्-आश्रयमिति दु:खालयम् = ज्यांत दु:खे सर्वत:लीन होवून राहतात ते दु:खालय-जन्म, दु:खाचे-आध्यात्मिकादि दु:खाचे आलय म्ह. आश्रयस्थान असे दु:खालय-पुनर्जन्म **(ष.त.स.) अशाश्वतम्** - न विद्यते शाश्वतो ब्रह्मभावो यस्य सोऽशाश्वतस्तमशाश्वतम् = नाही शाश्वत म्ह. ब्रह्मभाव ज्याचा तो अशाश्वत त्या अशाश्वताला म्ह. नश्वराला**(न.ब.स.)**

**आब्रह्मभुवनाल्लोका: पुनरावर्तिनोऽर्जुन।**

**मामुपेत्य तु कौन्तेय पुनर्जन्म न विद्यते ॥१६॥**

**अन्वय:** - अर्जुन, आब्रह्मभुवनात्, लोका:, पुनरावर्तिन:, तु, कौन्तेय, माम्, उपेत्य, पुनर्जन्म, न, विद्यते।

**अन्वयार्थ: - अर्जुन** - हे अर्जुना! **आब्रह्मभुवनात्, लोका:** - ब्रह्मलोकासहित सर्वलोक **पुनरावर्तिन: -** पुनर्जन्माला प्राप्त होणारे आहेत **तु** - परंतु **कौन्तेय** - हे कुंतिपुत्र अर्जुना! **माम्** - मला **उपेत्य** - प्राप्त होऊन (प्राप्त झाल्यानंतर) **पुनर्जन्म** - त्याला पुनर्जन्म **न विद्यते** - होत नाही.

**विवरण** - ब्रह्मलोकापर्यंतचे ब्रह्मलोकासहित खालचे जेवढे काही लोक भू:, भुव:, स्व: आदि लोक आहेत ते सर्व पुनर्जन्माला प्राप्त होणारे आहेत. परंतु हे अर्जुना! माझे स्वरूप सदा-सर्वदा नित्य, अविनाशी आहे. अशा माझ्या परमेश्वराच्या नित्य स्वरूपाला प्राप्त झालेल्याला पुनर्जन्म प्राप्त होत नाही म्हणजे त्याला पुनर्जन्म घ्यावा लागत नाही.

**व्याकरणम्** - **अर्जुन** - अर्जुन पु.संबो.ए.व. **आब्रह्मभुवनात्** - आ+ब्रह्मभुवन न.पं.ए.व. **लोका: -** लोक पु.प्र.ब.व. **पुनरावर्तिन:** - पुनर् अ. आ+वृत् प्र.ग.आ.प.+इनि=आवर्तिन् वि.पु.प्र.ब.व. **तु** - तु उभ.अ. **कौन्तेय** - कौन्तेय पु.संबो.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **उपेत्य** - उप+इ द्वि.ग.प.प.ल्यबन्त अ. **पुनर्जन्म** - पुनर् अ.जन्मन् न.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **विद्यते** - विद् च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **आब्रह्मभुवनात्** - भवन्ति भूतानीति भुवनम्-लोक:, भूतान्यत्रेति सन्तीति वा भुवनं ब्रह्मणो भुवनं ब्रह्मभुवनम्-सत्यलोक: ब्रह्मभुवनमभिव्याप्य इत्याब्रह्मभुवनं तस्मात् आब्रह्मभुवनात् = ज्यांत भूते उत्पन्न होतात ते भुवन अथवा ज्याठिकाणी भूते वास्तव्य करून राहतात ते भुवन, ब्रह्माचे भुवन ब्रह्मभुवन -सत्यलोक, ब्रह्मभुवनाला व्यापून राहते ते आब्रह्मभुवन त्या ब्रह्मभुवनाहून-त्या ब्रह्मभुवनासहित**(ष.त.स.)** यद्वा **आब्रह्मभुवनात्** - आसमन्ताद् ब्रह्मेत्याब्रह्म तच्च भुवनमित्याब्रह्मभुवनं तस्मादाब्रह्मभुवनात् = ब्रह्मभुवनासहित**(पं.त.स.) पुनरावर्तिन: -** पुण्यवशात् प्राप्तान् पुनरावर्तयन्ति पुनर्भवनमेव पुण्यक्षयान्ते प्रापयन्तीति पुनरावर्तिन: = पुण्यवश प्राप्त झालेल्या लोकांना पुन्हा परत फिरवितात म्ह. पुण्याचा क्षय झाल्यामुळे पुनर्जन्माला प्राप्त करवितात असे ते पुनरावर्ति लोक**(वि.)**

ब्रह्मदेवाच्या दिवस आणि रात्रीचे परिमाण-गणित -

**सहस्रयुगपर्यन्तमहर्यद्ब्रह्मणो विदु:।**

**रात्रिं युगसहस्रान्तां तेऽहोरात्रविदो जना: ॥१७॥**

**अन्वय:** - ते, अहोरात्रविद:, जना:, ब्रह्मण:, यत्, अह:, सहसस्रयुगपर्यन्तम्, (च), रात्रिम्, युगसहस्रान्ताम्, विदु: ।

**अन्वयार्थ: - ते अहोरात्रविद: जना: -** दिवस आणि रात्र यांची गणना करणारे लोक **ब्रह्मण: यत्, अह: -** ब्रह्मदेवाचा जो एक दिवस आहे **सहस्रयुगपर्यन्तम्** - तो एक हजार युगांचा आहे **(च** - आणि त्याचप्रमाणे) **रात्रिम्** - रात्र **युगसहस्रान्ताम्** - एक हजार युगांची आहे असे **विदु:** - जाणतात.

**विवरण** - कलियुग ४,३२,०००, द्वापारयुग ८,६४,०००, त्रेतायुग १२,९६,०००, सत्ययुग १७,२८,००० अशा या युगांच्या ज्या वेळी हजार फेऱ्या होतात त्यावेळी ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो. त्याच प्रमाणे हजार चौकड्या संपल्या म्हणजे ब्रह्मदेवाची एक रात्र होते. असे दिवस आणि रात्र यांची गणना करणारे विद्वान् लोक जाणतात.

**व्याकरणम्** - **ते** - तत् सर्व.पु.प्र.ब.व. **अहोरात्रविद:** - अहन् न. रात्र स्त्री. विद् पु.प्र.ब.व. **जना:** - जन पु.प्र.ब.व. **ब्रह्मण:** - ब्रह्मन् पु.ष.ए.व. **यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **अह:** - अहन् न.प्र.ए.व. **सहस्रयुगपर्यन्तम् -** सहस्र न. युग न. पर्यन्त वि.न.प्र.ए.व. **रात्रिम्** - रात्रि स्त्री.द्वि.ए.व. **युगसहस्रान्ताम् -** युग न. सहस्र न. अन्त न.द्वि.ए.व. **विदु:** - विद् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था: - अहोरात्रविद:** - अहश्च रात्रिश्च अनयो: समाहार: अहोरात्रम्, अहोरात्रं विदन्तीति अहोरात्र विद: = दिवस आणि रात्र दिवसरात्र दिवस रात्रिला जाणणारे**(उप.स.)** यद्वा **अहोरात्रविद:** - विदन्ति-जानन्तीति विदोऽहोरात्रस्य विद इत्यहोरात्रविद: = दिवस आणि रात्रिचे जाणणारे**(ष.त.स.) सहस्रयुगपर्यन्तम् -** सहस्रं युगानि-सहस्रं चतुर्युगानि पर्यन्तोऽवसानं यस्य तत् सहस्रयुगपर्यन्तम् = सहस्रयुग म्ह. सहस्रचतुर्युग पर्यंत अवसान आहे ज्याचा ते**(ब.स.)**

सर्व प्राण्यांची पुन: पुन: उत्पत्ति आणि प्रलय-नाश याचे वर्णन -

**अव्यक्ताद्व्यक्तय: सर्वा: प्रभवन्त्यहरागमे ।**

**रात्र्यागमे प्रलीयन्ते तत्रैवाव्यक्तसञ्ज्ञके ॥१८॥**

**अन्वय: -** अहरागमे, सर्वा:, व्यक्तय:, अव्यक्तात्, प्रभवन्ति, रात्र्यागमे, तत्र, एव, अव्यक्तसञ्ज्ञके, प्रलीयन्ते ।

**अन्वयार्थ: - अहरागमे** - ब्रह्मदेवाचा दिवस प्रारंभ झाला कि **सर्वा: व्यक्तय: -** सर्व चराचर व्यक्त पदार्थ **अव्यक्तात् -** अव्यक्तापासून (सूक्ष्म शरीरापासून) **प्रभवन्ति -** प्रादुर्भूत होतात(उत्पन्न होतात) **रात्र्यागमे -** ब्रह्मदेवाची रात्र प्रारंभ झाली की **तत्र एव अव्यक्तसञ्ज्ञके -** त्याच अव्यक्तनामक ब्रह्मदेवाच्या सूक्ष्म शरीरामध्ये **प्रलीयन्ते -** लय होतात.

**विवरण -** ज्या वेळी ब्रह्मदेव आपल्या सुषुप्ति अवस्थेचा त्याग करून जागृत अवस्थेचा स्वीकार करतो. त्यावेळी त्याच्या दिवसाला प्रारंभ होतो. तदनंतर त्याच्या सूक्ष्म प्रकृतिमध्ये विकार उत्पन्न होऊन ती स्थूलरूपामध्ये परिणत होते. त्या स्थूलरूपामध्ये परिणत प्रकृतिच्या बरोबर स्थावर-जंगम संपूर्ण प्राणी आपापल्या कर्मांनुसार भिन्न भिन्न रूपामध्ये उत्पन्न होतात. म्हणजे अव्यक्त प्रकृति नामक ब्रह्मदेवाच्या सूक्ष्म शरीरापासून व्यक्त प्राणी उत्पन्न होतात. स्थूल रूपामध्ये परिणत प्रकृति ज्यावेळी सूक्ष्मावस्थेला प्राप्त होते.

त्यावेळी संपूर्ण देहधारी प्राणी भिन्न-भिन्न आपल्या स्थूल शरीराने रहित होऊन प्रकृतिच्या सूक्ष्मावस्थेमध्ये स्थित होतात. म्हणजे त्या अव्यक्त नामक ब्रह्मदेवाच्या सूक्ष्म शरीरामध्ये लीन होतात.

**व्याकरण** - **अहरागमे** - अहन् न.ष.ए.व. आगम पु.स.ए.व. **सर्वाः** - सर्व वि.स्त्री.प्र.ब.व. **व्यक्तयः** - व्यक्ति स्त्री.प्र.ब.व. **अव्यक्तात्** - अ+वि+अञ्ज् स.ग.प.प.+कर्म क्त=अव्यक्त न.पं.ए.व **प्रभवन्ति** - प्र+भू प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **रात्र्यागमे** - रात्रि स्त्री.ष.ए.व. आगम पु.स.ए.व. **तत्र एव** - तत्र सप्तम्यन्त त्रल् प्रत्ययान्त अ. **एव** - एव क्रि.वि.अ. **अव्यक्तसञ्ज्ञके** - अव्यक्त न. सञ्ज्ञक वि.पु.स.ए.व. **प्रलीयन्ते** - प्र+ली च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **अहरागमे** - अहः-दिवसस्याऽऽगमः-प्रादुर्भावोऽहरागमस्तस्मिनहरागमे = दिवसाचा प्रादुर्भाव-उत्पत्ति झाल्यानंतर**(ष.त.स.)** **अव्यक्तात्** - न व्यक्तमित्यव्यक्तं तस्मादव्यक्तात् = जे व्यक्त नाही ते अव्यक्त त्या अव्यक्तापासून**(न.त.स.)** **रात्र्यागमे** - रात्रेरागमः-प्राप्तिरिति रात्र्यागमस्तस्मिन् रात्र्यागमे = रात्रीची प्राप्ति झाल्यानंतर**(ष.त.स.)** **अव्यक्तात्** - कार्येण विनाऽन्येन न व्यज्यत इत्यव्यक्तं तस्मादव्यक्तात् = कार्याशिवाय जे दुसऱ्या कोणत्याही द्वारा प्रगट होत नाही ते अव्यक्त त्या अव्यक्तापासून**(वि.)** **व्यक्तयः** - प्रमाणैर्व्यज्यन्ते गृह्यन्त इति व्यक्तयः = प्रमाणांच्या द्वारा व्यक्त होतात म्ह. ग्रहण होतात त्या व्यक्ति-सर्व स्थावरजंगमरूपशरीरे**(वि.)**

**भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते ।**

**रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥१९॥**

**अन्वयः** - पार्थ, सः, एव, अयम्, भूतग्रामः, भूत्वा, भूत्वा, अवशः, रात्र्यागमे, प्रलीयते, अहरागमे, प्रभवति ।

**अन्वयार्थः** - **पार्थ** - हे पृथापुत्र अर्जुना! **सः एव अयम्, भूतग्रामः** - पहिला जो तोच हा भूतसमुदाय **भूत्वा भूत्वा** - पुन्हा पुन्हा अभिव्यक्त होऊन **अवशः** - परतंत्र असणारा(भूतसमुदाय) **रात्र्यागमे** - ब्रह्मदेवाची रात्र प्रारंभ झाली की **प्रलीयते** - लय पावतो **अहरागमे** - ब्रह्मदेवाचा दिवस प्रारंभ झाला की **प्रभवति** - उत्पन्न होतो.

**विवरण** - पूर्व कल्पातील तोच हा स्थावर-जंगमरूप भूतसमूह प्रजापतीच्या दिवसाचा आरंभ होताच पुनः पुनः उत्पन्न होऊन रात्र सुरु होताच पुनः पुनः लीन होतो. रात्र होतांच प्रलयाचा अनुभव घेणाऱ्या व दिवसाचा आरंभ होताच जन्म घेणाऱ्या प्राणिसमूहाला एकसारखेच पारतंत्र्य आहे.

**व्याकरणम्** - **पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **सः** - तद् सर्व.पु.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **अयम्** - इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **भूतग्रामः** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. ग्राम पु.प्र.ए.व. **भूत्वा भूत्वा** - भू प्र.ग.प.प.त्वान्त अ. **अवशः** - अवश वि.पु.प्र.ए.व. **रात्र्यागमे** - रात्रि स्त्री. आगम पु.स.ए.व. **प्रलीयते** - प्र+ली च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व. **अहरागमे** - अहन् न.ष.ए.व. आगम पु.स.ए.व. **प्रभवति** - प्र+भू प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **भूतग्रामः** - भूतानाम्-प्राणिनाम्, ग्रामः-समूह इति भूतग्रामः = भूतांचा समुदाय**(ष.त.)**

एका व्यक्ताच्या पलीकडे दुसऱ्या सनातन अव्यक्ताचे प्रतिपादन -

**परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात्सनातनः ।**

**यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥२०॥**

**अन्वयः** - तु, तस्मात्, अव्यक्तात्, परः, अन्यः, अव्यक्तः, सनातनः, यः, भावः, सः, सर्वेषु, भूतेषु, नश्यत्सु, न, विनश्यति ।

**अन्वयार्थः - तु** - परंतु **तस्मात्, अव्यक्तात्** - या उपर्युक्त सांगितलेल्या अव्यक्ताहून **परः** - अतिशय भिन्न **अन्यः** - असा दुसरा **अव्यक्त** - इंद्रियातीत अव्यक्त आणि **सनातनः** - सनातन **यः भावः** - जो भाव (जे तत्त्व) आहे **सः** - तो भाव (ते तत्त्व) **सर्वेषु भूतेषु नश्यत्सु** - सर्वभूते नष्ट झाली असतांनाहि **न विनश्यति** - तो स्वतः नष्ट होत नाही.

**विवरण** - संपूर्ण प्राणिमात्र ज्याच्यामध्ये लीन होतात अशा अठराव्या श्लोकामध्ये वर्णन केलेल्या जड, नाशवान अव्यक्ताहून दुसरा अगदी विलक्षण इंद्रियातीत सनातन अव्यक्त जो भाव-तत्त्व आहे. तो चेतन, अ विनाशी, ज्ञाता, स्वामी, संचालक आणि अधिष्ठाता आहे. म्हणून त्या अव्यक्तापेक्षा अत्यंत श्रेष्ठ आणि विलक्षण असा अव्यक्त आहे. अशा प्रकारे सर्वभूते नाश पावत असतांनाही हा सनातन अव्यक्त अक्षर संज्ञक पुरुष मात्र नाश पावत नाही.

**व्याकरणम् - तु** - तु उभ.अ. **तस्मात्** - तद् सर्व.पु.पं.ए.व. **अव्यक्तात्** - अव्यक्त वि.पु.पं.ए.व. **परः** - पर वि.पु.प्र.ए.व. **अन्यः** - अन्य सर्व.पु.प्र.ए.व. **सनातनः** - सनातन वि.पु.प्र.ए.व. **अव्यक्तः** - अव्यक्त वि.पु.प्र.ए.व. **भावः** - भाव पु.प्र.ए.व. **सः** - तद् सर्व.पु.प्र.ए.व. **सर्वेषु** - सर्व वि.पु.स.ब.व. **भूतेषु** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.स.ब.व. **नश्यत्सु** - नश् च.ग.प.प.कर्त.वर्त.धा.वि.पु.स.ब.व. **न** - न क्रि. वि.अ. **विनश्यति** - वि+नश् च.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अव्यक्तः** - व्यक्तः-स्पष्टो न भवतीत्यव्यक्तः = व्यक्त-स्पष्ट होत नाही तो अव्यक्त**(न. त.स.)**

सनातन अव्यक्ताला अक्षर परमगति, परमधाम तसेच परमपुरुष या नावाने नामांकित करून अनन्य भक्तीने या परम पुरुषाच्या प्राप्तिचा उपाय दाखविणे -

**अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् ।**

**यं प्राप्य न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥२१॥**

**अन्वयः** - (यः), अव्यक्तः, अक्षरः, इति, उक्तः, तम्, परमाम्, गतिम्, आहुः, यम्, प्राप्य, न, निवर्तन्ते, तत्, मम, परमम्, धाम ।

**अन्वयार्थः - (यः** - जो**) अव्यक्तः** - अव्यक्त आहे **अक्षरः इति युक्तः** - त्यालाच अक्षर या नावाने संबोधित केलेले आहे **तम्** - त्या अक्षरालाच **परमाम्, गतिम्** - श्रेष्ठ गति असे **आहु** - म्हणतात **यम्** - त्या अक्षर ब्रह्माला **प्राप्य** - प्राप्त होऊन **न निवर्तन्ते** - पुन्हा परत येत नाही(पुनर्जन्माला प्राप्त होत नाही) **तत्** - ते **मम** - माझे **परमम्, धाम** - श्रेष्ठ स्थान आहे.

**विवरण** - उपर्युक्त श्लोकामध्ये जो अव्यक्त अक्षर या नावाने म्हटलेला भाव आहे. त्यालाच या ठिकाणी

परमगति या नावाने संबोधित केले आहे. अशा या परमगतिला प्राप्त केल्यानंतर या संसारामध्ये काही एक प्राप्त करण्याचे अवशिष्ट रहात नाही. ज्या परमगतिला प्राप्त झाल्यानंतर संपूर्ण दु:खाचा अभाव होऊन जातो. म्हणजे अशा परम गतिला प्राप्त झालेला संसारी जीव पुनर्जन्माला प्राप्त होत नाही. असे माझे श्रेष्ठ धाम आहे.

**व्याकरणम् - अव्यक्त:** - अव्यक्त वि.पु.प्र.ए.व. **अक्षर:** - अक्षर वि.पु.प्र.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **उक्त:** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.व. **तम्** - तत् सर्व.पु.द्वि.ए.व. **परमाम्** - परमा वि.स्त्री. द्वि.ए.व. **गतिम्** - गति स्त्री.द्वि.ए.व. **आहु:** - ब्रू द्वि.ग.उ.प.(प.प.)वर्त.तृ.पु.ब.व. **यम्** - यत् सर्व.पु. द्वि.ए.व. **प्राप्य** - प्र+आप् पं.ग.प.प.ल्यबन्त अ. **न** - न क्रि.वि.अ. **निवर्तन्ते** - नि+वृत् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **मम** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **परमम्** - परम वि.न.प्र.ए.व. **धाम** - धा तृ.ग.उ.प.+मनिन्=धामन् न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - अक्षर:** - कस्यामप्यवस्थायां न क्षरतीति अक्षर: = कोणत्याही अवस्थेमध्ये नाश पावत नाही तो अक्षर**(न.त.स.)**

**पुरुष: स पर: पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया।**

**यस्यान्त:स्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम्॥२२॥**

**अन्वय:** - पार्थ, यस्य, अन्त:स्थानि, भूतानि, येन, इदम्, सर्वम्, ततम्, तु, स:, पर:, पुरुष:, अनन्यया, भक्त्या, लभ्य:।

**अन्वयार्थ: - पार्थ** - हे पृथापुत्र अर्जुना! **यस्य अन्त:स्थानि भूतानि** - ज्याच्या अंतर्गत-आतमध्ये सर्व प्राणिमात्र स्थित आहेत आणि **येन इदम्, सर्वम्, ततम्** - ज्याच्या द्वारा हे सर्व जगत व्याप्त-परिपूर्ण आहे **तु** - परंतु **स:** - तो **पर: पुरुष:** - श्रेष्ठ पुरुष **अनन्यया भक्त्या** - अनन्य भक्तिच्याद्वारा **लभ्य:** - प्राप्त करणे योग्य आहे.

**विवरण** - ज्या प्रमाणे वायु, तेज, जल आणि पृथ्वी असा चार प्रकारचा भूत समुदाय आकाशाच्या अंतर्गत असतो. म्ह. आकाशसुद्धा त्याचा एकमात्र आधार आहे. त्याचप्रमाणे संपूर्ण स्थावर, जंगम सर्व प्राणी अर्थात् संपूर्ण जगत परमेश्वराच्या आधीन आहे. म्ह. परमेश्वरापासून उत्पन्न होते आणि परमेश्वराच्या आधारावर स्थित असते. असा तो परमेश्वर त्याच्याकडून हे संपूर्ण जगत व्याप्त आहे. तो परम पुरुष अनन्यभक्तीनेच प्राप्त होतो.

**व्याकरणम् - पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **यस्य** - यत् सर्व.पु.ष.ए.व. **अन्त:स्थानि** - अन्त वि. स्थ न.प्र.ब.व. **भूतानि** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.प्र.ब.व. **येन** - यत् सर्व.पु.तृ.ए.व. **इदम्** - इदम् सर्व.न.प्र.ए.व. **सर्वम्** - सर्व वि.न.प्र.ए.व. **ततम्** - तन् अ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **तु** - तु निश्चयात्मक अ. **स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **पर:** - पर वि.पु.प्र.ए.व. **पुरुष:** - पुरुष पु.प्र.ए.व. **अनन्यया** - अनन्या वि.स्त्री.तृ.ए.व. **भक्त्या** - भक्ति स्त्री.तृ.ए.व. **लभ्य:** - लभ् प्र.ग.आ.प.कर्म.विध्यर्थ धा. वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - अनन्यया** - न विद्यते अन्य:-परमात्मातिरिक्तो विषयो यस्यां साऽनन्या तयाऽनन्यया = नाही परमात्मातिरिक्त अन्य विषय जिच्यामध्ये ती अनन्या तिच्याद्वारा**(ब.स.) लभ्य:** - लब्धुं योग्यो लभ्य:- प्राप्तव्य: = प्राप्त करण्याकरिता योग्य तो लभ्य-प्राप्तव्य**(वि.) पुरुष:** - पुरि शयनात् पूर्णत्वाद् वा पुरुष: =

शरीरसंज्ञक पुरात शयन केल्यामुळे किंवा पूर्ण असल्यामुळे तो पुरुष-परमात्मा**(वि.)**

शुक्ल व कृष्णमार्गाचा विषय सांगण्याकरिता भगवंताची प्रतिज्ञा -

**यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः।**

**प्रयाता यान्ति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ॥२३॥**

**अन्वयः** - तु, भरतर्षभ, यत्र, काले, योगिनः, प्रयाताः, अनावृत्तिम्, च, एव, आवृत्तिम्, यान्ति, तम्, कालम्, वक्ष्यामि.

**अन्वयार्थः - तु** - परंतु **भरतर्षभ** - भरतश्रेष्ठ अर्जुना! **यत्र काले** - ज्या कालामध्ये **योगिनः** - योगीजन **प्रयाताः** - शरीराला सोडून गेले असता **अनावृत्तिम्** - परत न येण्याच्या गतिला(मोक्षाला) **च एव** - आणि **आवृत्तिम्** - परत येण्याच्या गतिला(पुनर्जन्माला) **यान्ति** - प्राप्त होतात **तम्, कालम्** - तो काल **वक्ष्यामि** - मी तुला सांगेन.

**विवरण** - भगवान म्हणतात की हे अर्जुना! ज्या कालामध्ये शरीराचा त्याग करून गेलेले योगीपुरुष पुनर्जन्माला प्राप्त न होता मोक्षाला प्राप्त होतात आणि ज्या कालामध्ये देहाला सोडून जाणारे योगीपुरुष मोक्षाला प्राप्त न होता पुनर्जन्माला प्राप्त होतात. तो काल मी तुला चांगल्या प्रकारांनी सांगेन.

**व्याकरणम् - तु** - तु उभ.अ. **भरतर्षभ** - भरत पु. ऋषभ पु.संबो.ए.व. **यत्र** - यत्र सप्तम्यन्त त्रल् प्रत्ययान्त कालवाचक अ. **काले** - काल पु.स.ए.व. **योगिनः** - योगिन् पु.प्र.ब.व. **प्रयाताः** - प्र+या द्वि.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **अनावृत्तिम्** - अन्+वृत् प्र.ग.आ.प.+भावे क्तिन्=अनावृत्ति स्त्री. द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **एव** - एव क्रि.वि.अ. **आवृत्तिम्** - आवृत्ति स्त्री.द्वि.ए.व. **यान्ति** - या द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **तम्** - तत् सर्व.पु.द्वि.ए.व. **कालम्** - काल पु.द्वि.ए.व. **वक्ष्यामि** - वच् द्वि.ग.प.प.द्वि.भवि.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - भरतर्षभ** - भरतेषु-भरतवंशेषु गौरिव ऋषभः-श्रेष्ठस्तत्सम्बुद्धाविति भरतर्षभ = भरतवंशामध्ये गायीप्रमाणे ऋषभ-श्रेष्ठ असा भरतर्षभ**(स.त.स.) अनावृत्तिम्** - नाऽऽवृत्ति रित्यनावृत्तिस्तामनावृत्तिम् = नाही आवृत्ति ती अनावृत्ति तिला**(न.त.स.)**

फलासहित शुक्ल मार्गाचे कथन -

**अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम्।**

**तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥२४॥**

**अन्वयः** - (यत्र), अग्निः, ज्योतिः, अहः, शुक्लः, उत्तरायणम्, षण्मासाः, तत्र, प्रयाताः, ब्रह्मविदः, जनाः, ब्रह्म, गच्छन्ति।

**अन्वयार्थः - (यत्र** - ज्या मार्गामध्ये) **अग्निः** - अग्नि अभिमानी देवता आहे **ज्योतिः**- ज्योति अभिमानी देवता आहे **अहः** - दिवसाची अभिमानी देवता आहे **शुक्लः** - शुक्ल अभिमानी देवता आहे **उत्तरायणम्, षण्मासाः** - उत्तरायणाच्या सहा महिन्याची अभिमानी देवता आहे **तत्र** - त्या मार्गामध्ये **प्रयाताः** - शरीराचा त्याग केलेले **ब्रह्मविदः जनाः** - ब्रह्मज्ञानी लोक **ब्रह्म** - ब्रह्माला **गच्छन्ति** - प्राप्त होतात.

**विवरण -** ज्योतिर्मय अग्नि अभिमानी देवतेचे स्वरूप दिव्यप्रकाशमय असून पृथ्वीच्यावर समुद्रासहित सर्व प्रदेशामध्ये तिचा अधिकार आहे. तसेच उत्तरायण मार्गाने जाणाऱ्या अधिकारी पुरुषाचा दिवसाची अभिमानी देवतेच्या बरोबर संबंध करून देण्याचे कार्य तिचे आहे. तसेच दिवसाच्या अभिमानी देवतेचे स्वरूप अग्नि अ भिमानी देवतेपेक्षा अधिक दिव्य प्रकाशमय असून जेथपर्यंत आकाशामध्ये वायु-मंडळाचा संबंध आहे. तेथपर्यंत या देवतेचा अधिकार आहे. उत्तरायण मार्गाने जाणाऱ्या अधिकारी पुरुषाच्या शुक्ल-अभिमानी देवतेबरोबर संबंध करून देण्याचे कार्य तिचे आहे. त्याचप्रमाणे शुक्ल-अभिमानी देवतेचे स्वरूप दिवसाच्या अभिमानी देवतेच्यापेक्षा अधिक दिव्य प्रकाशमय असून भूलोकसीमेच्या बाहेर अंतरिक्ष लोकांमध्ये पंधरा दिवसाचा दिवस तेवढीच रात्र होते. तेथपर्यंत तिचा अधिकार आहे. उत्तरायण मार्गाने जाणाऱ्या अधिकारी पुरुषाचा उत्तरायण अभिमानी देवतेबरोबर संबंध करून देण्याचे तिचे काम आहे. त्याचप्रमाणे उत्तरायण अ भिमानी देवतेचे स्वरूप शुक्ल अभिमानी देवतेच्यापेक्षा दिव्य प्रकाशमय असून अंतरिक्ष लोकाच्यावर सहा म हिन्याचा दिवस आणि तेवढीच रात्र होते. तेथपर्यंत तिचा अधिकार आहे. अशाप्रकारे या देवता ज्या मार्गामध्ये आहेत. त्या मार्गामध्ये शरीर सोडलेला ब्रह्मवेत्ता पुरुष क्रमाने ब्रह्मालाच प्राप्त होतो.

**व्याकरणम् - अग्निः -** अग्नि पु.प्र.ए.व. **ज्योतिः -** द्युत् प्र.ग.आ.प.+इसुन्,दस्य जादेशः=ज्योतिस् न.प्र.ए.व. **अहः -** अहन् न.प्र.ए.व. **शुक्लः -** शुक्ल पु.प्र.ए.व. **उत्तरायणम् -** उत्तरायण न.प्र.ए.व. **षण्मासाः -** षट् पु. मास पु.प्र.ब.व. **तत्र -** तत्र सप्तम्यन्त त्रल् प्रत्ययान्त कालवाचक अ. **प्रयाताः** - प्र+या द्वि.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **ब्रह्मविदः -** ब्रह्मविद् पु.प्र.ब.व. **जनाः -** जन पु.प्र.ब.व. **ब्रह्म -** ब्रह्मन् न.द्वि.ए.व. **गच्छन्ति -** गम् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - षण्मासाः -** षट् च ते मासास्ते षण्मासाः = सहा महिने**(कर्म.स.) उत्तरायणम् -** उत्तरश्च तदायनमित्युत्तरायणम् = उत्तरायण मार्ग**(कर्म.स.) ब्रह्मविदः -** ब्रह्म विदन्ति जानन्तीति ते ब्रह्मविदः = ब्रह्माला जाणणारे असे ते ब्रह्मविद**(उप.स.)**

फलासहित कृष्णमार्गाचे कथन -

**धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् ।**

**तत्र चान्द्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥२५॥**

**अन्वयः -** (यत्र), धूमः, रात्रिः, कृष्णः, दक्षिणायनम्, षण्मासाः, तत्र, (प्रयाताः), योगी, चान्द्रमसम्, ज्यो तिः, प्राप्य, निवर्तते ।

**अन्वयार्थः - (यत्र -** ज्यामार्गामध्ये**) धूमः -** धूम अभिमानी देवता आहे **रात्रिः -** रात्रि अभिमानी देवता आहे **कृष्णः -** कृष्णपक्ष अभिमानी देवता आहे **दक्षिणायनम्, षण्मासाः -** दक्षिणायनाच्या सहा महिन्याची अ भिमानी देवता आहे **तत्र -** त्या मार्गामध्ये (**प्रयाताः -** शरीर सोडून गेलेला) **योगीपुरुष चान्द्रमसम्, ज्योतिः -** चन्द्राच्या ज्योतीला **प्राप्य -** प्राप्त होऊन **निवर्तते -** परत येतो म्हणजे पुनर्जन्माला प्राप्त होतो.

**विवरणः -** धूम अभिमानी देवता अंधकार अभिमानी देवतेची वाचक आहे. तिचे स्वरूप अंधकार युक्त असून अग्नि-अभिमानी देवतेच्या प्रमाणे संपूर्ण प्रदेशामध्ये या देवतेचा अधिकार असतो. दक्षिणायन मार्गाने जाणाऱ्या पुरुषाला रात्रि अभिमानी देवतेजवळ पाठवून देण्याचे काम या देवतेचे आहे. तसेच रात्रि-अभिमानी

देवतेच्या समान या देवतेचा अधिकार आहे. दक्षिणायन मार्गाने जाणाऱ्या पुरुषाला कृष्णपक्ष अभिमानी देवतेच्या आधीन करून देण्याचे काम या देवतेचे आहे. तसेच कृष्ण अभिमानी देवतेचे स्वरूप अंधकारयुक्त असून ज्याठिकाणी पंधरा दिवसाचा दिवस आणि त्याचप्रमाणे रात्र असते तेथपर्यंत या देवतेचा अधिकार असतो. दक्षिणायन मार्गाने जाणाऱ्या साधकाला दक्षिणायन अभिमानी देवतेच्या आधिन करून देण्याचे काम या देवतेचे आहे. तसेच दक्षिणायन अभिमानी देवतेचे स्वरूप अंधकार युक्त असून अंतरिक्ष लोकाच्यावर ज्या लोकामध्ये सहा महिन्याचा दिवस त्याचप्रमाणे रात्र असते तेथपर्यंत या देवतेचा अधिकार आहे. अशाप्रकारे या देवता ज्या मार्गाने असतात त्या मार्गात शरीर सोडलेला योगी पुरुष चन्द्राच्या ज्योतिला प्राप्त होऊन स्वर्गामध्ये आपल्या शुभकर्माचे फल भोगून परत स्वर्गातून मृत्युलोकामध्ये येतो म्हणजे पुनर्जन्माला प्राप्त होतो.

**व्याकरणम् - धूमः** - धू पं./न./द.ग.उ.प.+मक्=धूम पु.प्र.ए.व. **रात्रिः** - रात्रि स्त्री.प्र.ए.व. **कृष्णः** - कृष्+नक्=कृष्ण पु.प्र.ए.व. **दक्षिणायनम्** - दक्षिणायन न.प्र.ए.व. **षण्मासाः** - षट् पु. मास पु.प्र.ब.व. **तत्र** - तत्र सप्तम्यन्त त्रल् प्रत्ययान्त कालवाचक अ. **योगी** - योगिन् पु.प्र.ए.व. **चान्द्रमसम्** - चान्द्रमस् वि.पु. द्वि.ए.व. **ज्योतिः** - ज्योतिस् न.द्वि.ए.व. **प्राप्य** - प्र+आप् पं.ग.प.प.ल्यबन्त अ. **निवर्तते** - नि+वृत् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासनिग्रहार्थाः - दक्षिणायनम्** - दक्षिणश्च तदायनमिति दक्षिणायनम् = दक्षिण मार्ग**(कर्म.स.) चान्द्रमसम्** - चन्द्रमस इदं चान्द्रमसम् = चन्द्रमस संबंधि चान्द्रमस**(त.वि.)**

शुक्ल-कृष्ण गतीच्या अनादित्वाचे कथन -

**शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते ।**

**एकया यात्यनावृत्तिमन्ययावर्तते पुनः ॥२६॥**

**अन्वयः** - हि, जगतः, एते, शुक्लकृष्णे, गती, शाश्वते, मते, एकया, अनावृत्तिम्, याति, अन्यया, पुनः, आवर्तते ।

**अन्वयार्थः - हि** - कारण **जगतः** - जगताचे **एते** - हे दोन **शुक्लकृष्णे** - शुक्ल आणि कृष्ण(देवयान आणि पितृयान) **गती** - मार्ग (पंथ) **शाश्वते मते** - सनातन मानलेले आहेत **एकया** - या दोहोमधून एका मार्गाने जाणारा योगी **अनावृत्तिम्** - पुनरावृत्तीला(परत न येणाऱ्या गतीला) **याति** - प्राप्त होतो **अन्यया** - व दुसऱ्या मार्गाने जाणारा कर्मयोगी **पुनः आवर्तते** - जन्म मृत्युरूप संसाराला (पुनर्जन्माला) प्राप्त होतो.

**विवरण** - या जगताचे दोन प्रकारचे शुक्ल आणि कृष्ण अर्थात् देवयान आणि पितृयान मार्ग सनातन मानलेले आहेत. परमेश्वराच्या परमधामाला जाण्याचा जो मार्ग आहे. तो दिव्य प्रकाशमय असून त्या मार्गाने गमन करणारा जो साधक त्याच्या अंतःकरणामध्ये सदा-सर्वदा ज्ञानाचा प्रकाश समाहित राहतो. म्हणून त्या मार्गाला शुक्ल पक्ष म्हटले आहे. जो ब्रह्मलोकापर्यंत संपूर्ण देवलोकामध्ये जाण्याचा मार्ग आहे तो शुक्लमार्गाच्यापेक्षा अंधकारयुक्त असून त्या मार्गाने गमन करणारे योगीजन मोहाला प्राप्त होतात. म्हणून त्या मार्गाला कृष्णपक्ष म्हटले आहे. शुक्लमार्गाने जाणारा साधक परत न येता परम गतीला प्राप्त होतो आणि कृष्णमार्गाने जाणारा साधक परत येवून पुनर्जन्माला प्राप्त होतो.

**व्याकरणम् - हि -** हि क्रि.वि.अ. **जगतः -** जगत् न.ष.ए.व. **एते -** एतत् सर्व.स्त्री.प्र.द्वि.व. **शुक्लकृष्णे -** शुक्ला स्त्री. कृष्णा स्त्री.प्र.द्वि.व. **गती -** गति स्त्री.प्र.द्वि.व. **शाश्वते -** शाश्वत वि.स्त्री.प्र.ए.व. **मते -** मन् च.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.द्वि.व. **एकया -** एका संख्यावाचक वि.स्त्री.तृ.ए.व. **अनावृत्तिम् -** अन्+आवृत्ति स्त्री.द्वि.ए.व. **याति -** या द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **अन्यया -** अन्य सर्व.स्त्री.तृ.ए.व. **पुनः -** पुनर् अ. **आवर्तते -** आ+वृत् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - शुक्लकृष्णे -** शुक्ला च कृष्णा चेति शुक्लकृष्णे = शुक्ल आणि कृष्ण**(द्वं.स.)**

दोन गतीला जाणणाऱ्या योग्याची प्रशंसा तसेच अर्जुनाला योगी होण्याकरिता आज्ञा -

**नैते सृती पार्थ जानन्योगी मुह्यति कश्चन।**

**तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन॥२७॥**

**अन्वयः** - पार्थ, एते, सृती, जानन्, कश्चन, योगी, न, मुह्यति, तस्मात्, अर्जुन, सर्वेषु, कालेषु, योगयुक्तः, भव।

**अन्वयार्थः - पार्थ -** हे अर्जुना! **एते सृती -** हे दोन पंथ(मार्ग) **जानन् -** जाणणारा **कश्चन -** कोणताही **योगी -** योगी पुरुष **न मुह्यति -** मोहाला प्राप्त होत नाही **तस्मात् -** यास्तव(म्हणून) **अर्जुन -** हे अर्जुना! **सर्वेषु कालेषु -** सदा सर्वदा **योगयुक्तः -** योगयुक्त( समबुद्धिरूप योगाने युक्त) **भव -** हो.

**विवरण -** प्रतिपादित जे शुक्ल आणि कृष्ण दोन मार्ग आहेत. त्या दोन मार्गाला तत्त्वाने जाणणारा कोणीही योगी पुरुष केव्हाही मोहाला प्राप्त होत नाही. कारण योगसाधनेमध्ये रत झालेला योगी जर तत्त्वाने या मार्गाला जाणत नाही तर तो या लोकातील अथवा परलोकातील भोगामध्ये आसक्त होऊन भ्रष्ट होतो. म्हणजे मोहीत होतो. म्हणून भगवान म्हणतात कि, हे अर्जुना! तू सर्व काली समाहित चित्त हो म्हणजे निरंतर माझ्या प्राप्तिकरिता साधन करणारा हो.

**व्याकरणम्** - **पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **एते** - एतत् सर्व.स्त्री.द्वि.द्वि.व. **सृती** - सृ प्र.ग.प.प.+क्तिन्=सृति स्त्री.द्वि.द्वि.व. **जानन्** - ज्ञा न.ग.उ.प.(प.प.)कर्त.वर्त.धा.वि.पु.प्र.ए.व. **कश्चन** - कश्चन सामान्य सर्व.प्र.ए.व. **योगी** - योगिन् पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **मुह्यति** - मुह् च.ग.प.प.वर्त.तृ.ए.व. **तस्मात्** - तत् सर्व.पु.पं.ए.व. **अर्जुन** - अर्जुन पु.संबो.ए.व. **सर्वेषु** - सर्व वि.स.ब.व. **कालेषु** - काल पु.स.ब.व. **योगयुक्तः** - योग पु. युज् च.ग.आ.प.अधिकरणे भू.वि.पु.प्र.ए.व. **भव** - भू प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - योगयुक्तः -** योगे युक्त इति योगयुक्तः = योगामध्ये युक्त**(स.त.स.)** यद्वा **योगयुक्तः -** योगेन युक्त इति योगयुक्तः = योगाने युक्त**(तृ.त.स.)**

या अध्यायामध्ये वर्णन केलेले तत्त्व त्याला जाणण्याचे फल -

**वेदेषु यज्ञेषु तपःसु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम्।**

**अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगी परं स्थानमुपैति चाद्यम्॥२८॥**

**अन्वयः** - योगी, इदम्, विदित्वा, वेदेषु, यज्ञेषु, तपःसु, च, एव, दानेषु, यत्, पुण्यफलम्, प्रदिष्टम्, तत्, सर्वम्, अत्येति, (च), आद्यम्, परम्, स्थानम्, उपैति।

**अन्वयार्थ: - योगी -** योगीपुरुष **इदम्, विदित्वा -** याप्रमाणे अध्यायातील संपूर्ण उपदेशाला जाणून **वेदेषु -** वेदाध्ययनामध्ये **यज्ञेषु -** यज्ञानुष्ठानामध्ये **तप:सु -** तपश्चर्येमध्ये **च एव -** आणि **दानेषु -** दानामध्ये **यत् पुण्यफलम्, प्रदिष्टम् -** जे पुण्यफल कथन केले आहे **तत्, सर्वम् -** ते संपूर्ण **अत्येति -** अतिक्रमण करून जातो (**च-** आणि) **आद्यम्, परम्, स्थानम् -** आद्य परम स्थानाला(सनातन परम पदाला) **उपैति -** प्राप्त होतो.

**विवरण -** या अध्यायामध्ये जो कथित उपदेश सांगितला आहे. त्याला जाणून श्रद्धाभक्तीपूर्वक सकाम भावाने वेद शास्त्रांच्या स्वाध्यायांत, शास्त्रविहित पूजन, हवन आदि सर्व प्रकारच्या यज्ञानुष्ठानात, व्रत, उपवास, इंद्रियसंयम, स्वधर्म पालन आदि सर्वप्रकारच्या तपश्चर्येत, अन्नदान, विद्यादान, क्षेत्रदान आदि सर्व प्रकारच्या दानामध्ये जो पुण्याचा संचय होतो. म्हणजे त्याच्यामध्ये जे पुण्यफल सांगितले त्या पुण्यफलाचे अ तिक्रमण करून योगीपुरुष परमपदाला (ब्रह्माला) प्राप्त होतो.

**व्याकरणम् - योगी -** योगिन् पु.प्र.ए.व. **इदम् -** इदम् सर्व.न.द्वि.ए.व. **विदित्वा -** विद् द्वि.ग.प.प.त्वान्त अ. **वेदेषु -** विद् द्वि.ग.प.प.+अच्=वेद पु.स.ब.व. **यज्ञेषु -** यज् प्र.ग.उ.प.+नङ्=यज्ञ पु.स.ब.व. **तप:सु -** तपस् न.स.ब.व. **च -** च उभ.अ. **एव -** एव क्रि.वि.अ. **दानेषु -** दा तृ.ग.उ.प.+ल्युट्=दान न.स.ब.व. **यत् -** यत् सर्व.न.प्र.ए.व. **पुण्यफलम् -** पुण्य वि. फल न.प्र.ए.व. **प्रदिष्टम् -** प्र+दिश् ष.ग.प.प.कर्म.भू.धा. वि.न.प्र.ए.व. **तत् -** तत् सर्व.न.द्वि.ए.व. **सर्वम् -** सर्व सर्व.न.द्वि.ए.व. **अत्येति -** अति+इ द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **च -** च उभ.अ. **आद्यम् -** आद्य वि.न.द्वि.ए.व. **परम् -** पर वि.न.द्वि.ए.व. **स्थानम् -** स्थान न.द्वि.ए.व. **उपैति -** उप+इ द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - पुण्यफलम् -** पुण्यस्य-सुकृतस्य फलमिति पुण्यफलम् = पुण्याचे फल**(ष.त.स.) योगी -** योगोऽस्यास्तीति योगी = योग आहे ज्याचा असा तो योगी**(वि.)**

**ॐ तत्सदिति श्रीमद्भवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे**

**श्रीकृष्णार्जुनसंवादे अक्षरब्रह्मयोगो नामाष्टमोऽध्याय: ॥८॥**

**-: अध्याय आठवा समाप्त :-**

**ॐ श्रीपरमात्मने नम:**

**अथ नवमोऽध्याय:**

श्रीकृष्ण म्हणाले की, सातव्या अध्यायात सांगितलेला ज्ञानविज्ञानाचा विषय मी तुला पुन: सांगतो. ही माझी अगदी जीवातली गोष्ट आहे. पण तुझ्यासारखा सुमन शुद्धबुद्धिचा अनिंदक व एकनिष्ठ जिज्ञासु भेटला म्हणूनच हे गूढ मी उघडे करीत आहे. आपल्या स्तनात असलेले दुध आईला आपल्याच ठिकाणी ठेवावे असे वाटत नाही. आपल्या अनन्य लेकराची ते पिऊन तृप्ती व्हावी यातच तिला खरा आनंद असतो. तसा तुझ्यासारखा दृढ श्रद्धेने ऐकणारा व त्याचप्रमाणे आचरण करणारा श्रोता मला आज भेटला यात मला किती संतोष झाला आहे. म्हणून, हे गुह्यातील गुह्य ज्ञान मी तुला सांगेन. ज्याला जाणले असता असार संसार व सार आत्मा यांची वेगळीक होऊन जन्ममरणातून सुटका होते हे ज्ञान सर्व ज्ञानात अत्यंत श्रेष्ठ आहे. उत्तम व पवित्र असून ते प्रत्येकाच्या ह्रदयातच आहे परंतु गुरुमुखातून त्याचे श्रवण केल्यानंतर त्याचा अनुभव येतो तेच विज्ञानासहित ज्ञान भगवंत अर्जुनाला या अध्यायामध्ये आरंभाला सांगत आहेत.

**श्रीभगवानुवाच** - श्री भगवान म्हणाले

**इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे ।**

**ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥१॥**

**अन्वय:** - इदम्, गुह्यतमम्, विज्ञानसहितम्, ज्ञानम्, अनुसूयवे, ते, प्रवक्ष्यामि, तु, यत्, ज्ञात्वा, अशुभात्, मोक्ष्यसे ।

**अन्वयार्थ:** - **इदम्, गुह्यतमम्, विज्ञानसहितम्, ज्ञानम्** - हे अत्यंत गुह्य विज्ञानासहित ज्ञान **अनसूयवे** - माझ्या विषयी दोष दृष्टी नसणाऱ्या अशा **ते** - तुला **प्रवक्ष्यामि** - चांगल्या प्रकारानी सांगेल **तु** - परंतु **यत् ज्ञात्वा** - जे जाणून अर्थात् ज्या ज्ञानाला जाणले असता **अशुभात्** - जन्म मृत्यू दु:खस्वरूप संसारापासून **मोक्ष्यसे** - तू मुक्त पावशील-होशील.

**विवरण** - गुणवानाच्या गुणामध्ये दोष न पाहणारा आणि उपदेश ग्रहण करण्याकरिता योग्य तसेच दोषदृष्टीर हित अशा तुला परम गुह्यातील गुह्य विज्ञानासहित ज्ञानाचा उपदेश करील. अशा त्या ज्ञानाचा अनुभव घेऊन तू जन्ममृत्यु दु:खरूप संसारापासून मुक्त होशील.

**व्याकरणम्** - **इदम्** - इदम् सर्व.न.द्वि.ए.व. **गुह्यतमम्** - गुह् प्र.ग.उ.प.+क्यप्=गुह्य+तम=गुह्यतम न. द्वि.ए.व. **विज्ञानसहितम्** - विज्ञान न. सहित वि.न.द्वि.ए.व. **ज्ञानम्** - ज्ञान न.द्वि.ए.व. **अनसूयवे** - अनसूयु पु.च.ए.व. **ते** - युष्मत् सर्व.च.ए.व. **प्रवक्ष्यामि** - प्र+वच् द्वि.ग.प.प.द्वि.भवि.प्र.पु.ए.व. **तु** - तु निश्चयात्मक अ. **यत्** - यत् सर्व.न.द्वि.ए.व. **ज्ञात्वा** - ज्ञा न.ग.उ.प.ल्यबन्त अ. **अशुभात्** - अशुभ न.पं.ए.व. **मोक्ष्यसे** - मुच् ष.ग.उ.प.(आ.प.)द्वि.भ.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अनसूयवे** - न विद्यतेऽसूया मयि दोषारोपणं यस्य सोऽनसूयुस्तस्मै अनसूयवे = नाही असूया (माझ्यामध्ये दोषारोपण वा उपेक्षा) ज्याची त्याच्या करीता**(ब.स.)** यद्वा **अनसूयवे** - परगुणेषु दोषा विष्करणमसूया सेयं कामक्रोधलोभमोहेर्ष्यादीनामुपलक्षणमसूयादिदुर्गुणा यस्य न सन्ति सोऽनसूयुस्तस्मै

अनसूयवे = दुसऱ्याच्या गुणामध्ये दोषांना प्रगट करणे असूया आहे. ही काम, क्रोध, लोभ, मोह, ईर्षा आदिचे उपलक्षण आहे. असूया आदि दुर्गुण ज्याच्यामध्ये नाहीत तो त्याच्या करिता अर्थात् सदगुण प्राप्त असणाऱ्या शिष्याकरिता**(न.त.स.) विज्ञानसहितम्** - विज्ञानेन सहितमिति विज्ञानसहितम्-अनुभवयुक्तम् = विज्ञानाच्या सहित-अनुभवाने युक्त**(तृ.त.स.) अशुभात्** - न शुभमित्यशुभं तस्मादशुभात् = नाही शुभ ते अशुभ त्याहून**(न.त.स.)**

विज्ञानासहित ज्ञानाची महिमा-महत्त्व -

**राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ।**

**प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥२॥**

**अन्वय:** - राजविद्या, राजगुह्यम्, पवित्रम्, इदम्, उत्तमम्, प्रत्यक्षावगमम्, धर्म्यम्, कर्तुम्, सुसुखम्, अव्ययम् ।

**अन्वयार्थ:** - **राजविद्या** - (हे विज्ञानासहित ज्ञान) संपूर्ण विद्येचा राजा **राजगुह्यम्** - सर्व गुह्यांचा राजा **पवित्रम्** - अतिशय पवित्र **इदम्, उत्तमम्** - हे अतिशय श्रेष्ठ **प्रत्यक्षावगमम्** - प्रत्यक्ष होण्याला योग्य **धर्म्यम्** - धर्माला अनुसरून **सुसुखम्, कर्तुम्** - सुखकारक आचरण करण्याकरिता **अव्ययम्** - आणि अविनाशी आहे.

**विवरण** - संसारामध्ये जेवढ्या काही ज्ञात अज्ञात विद्या आहेत त्यांच्या पेक्षा ही अत्यधिक श्रेष्ठ आहे. या विद्येचा ज्या पुरुषाने अनुभव घेतला आहे त्या पुरुषाकरिता या संसारामध्ये काहीच जाणण्याकरिता अवशिष्ट राहत नाही. म्हणून, भगवंताने या विद्येला सर्व विद्यांचा राजा, सर्व गुह्यांचा राजा अतिशय पावन करणाऱ्या संसारामध्ये जेवढ्या काही श्रेष्ठ वस्तू आहेत त्यापेक्षा ही अत्यंत श्रेष्ठ म्हणजे उत्तम, यज्ञ वा अनुष्ठानाच्या समान ही विद्या अदृष्ट फल न देता दुर्गुण, दुराचार आणि दु:खाचा नाश करून परमशक्ति आणि परमसुखाचा प्रत्यक्ष अनुभव करून देणारी धर्माला अनुसरून संपादन करण्याकरीता अत्यंत सुलभ. जसे सकाम कर्म फल देवून समाप्त होते त्याप्रमाणे ही फलाप्द्वारा समाप्त होत नाही. म्हणून, ती अविनाशी आहे असे म्हटले.

**व्याकरणम्** - **राजविद्या** - राजविद्या स्त्री.प्र.ए.व. **राजगुह्यम्** - राजगुह्य न.प्र.ए.व. **पवित्रम्** - पवित्र वि.न.प्र.ए.व. **इदम्** - इदम् सर्व.न.प्र.ए.व. **उत्तमम्** - उत्तम वि.न.प्र.ए.व. **प्रत्यक्षावगमम्** - प्रत्यक्ष वि. अवगम वि.न.प्र.ए.व. **धर्म्यम्** - धर्म्य वि.न.प्र.ए.व. **सुसुखम्** - सु+सुख न.प्र.ए.व. **कर्तुम्** - कृ अ.ग.उ.प.तुमन्त अ. **अव्ययम्** - अव्यय वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **राजविद्या** - सर्वासां विद्यानां राजा इति राजविद्या = सर्वविद्यांचा राजा**(ष.त.स.) राजगुह्यम्** - सर्वेषां गुह्यानां राजा इति राजगुह्यम् = संपूर्ण गुह्यांचा राजा**(ष.त.स.) प्रत्यक्षावगमम्** - प्रत्यक्षेण-दृष्टफलेन सुखादेरिवावगम:-अवबोधो यस्य तत् प्रत्यक्षावगमम् = प्रत्यक्षद्वारा अवबोध आहे ज्याचा ते ज्ञान प्रत्यक्षावगम**(ब.स.)** यद्वा **प्रत्यक्षावगमम्** - अवगम्यतेऽनुभूयत इत्यवगम:-फलं प्रत्यक्षोऽवगमो यस्य तत् प्रत्यक्षावगमम्-भोजनादिसुखवत् सद्य: प्रत्यक्षं ज्ञानफलं न तु धर्मादिफलवत्परोक्षमित्यर्थ: = अनुभव घेतला जातो/जाणला जातो असा अवगम-फल प्रत्यक्षावगम आहे ज्याचा ते प्रत्यक्षावगम, भोजनाचा जसा प्रत्यक्ष आनंद अनुभवास येतो तसे हे ज्ञान झाल्याबरोबर त्याच्या फलाचा प्रत्यक्ष अनुभव होतो. धर्म फलाप्रमाणे परोक्ष नाही**(ब.स.)सुसुखम्** - सुखेन सहितमिति सुसुखम् = सुखाच्या सहित**(तृ.त.स.) पवित्रम्** - पूयतेऽनेने

ति पवित्रम् = ज्याच्या द्वारा पवित्र केले जाते ते पवित्र**(वि.)**

त्या ज्ञानाविषयी श्रद्धा न ठेवणाऱ्यांना जन्ममरणरूप संसारचक्राची प्राप्ती -

**अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परन्तप ।**

**अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ॥३॥**

**अन्वयः** - परन्तप, अस्य, धर्मस्य, अश्रद्दधानाः, पुरुषाः, माम्, अप्राप्य, मृत्युसंसारवर्त्मनि, निवर्तन्ते ।

**अन्वयार्थः - परन्तप** - हे अर्जुना! **अस्य धर्मस्य अश्रद्दधानाः** - या अध्यात्मज्ञानरूपी धर्मावर श्रद्धा न ठेवणारे **पुरुषाः** - पुरुष **माम्** - मला (परमात्म्याला) **अप्राप्य** - प्राप्त न होता **मृत्युसंसारवर्त्मनि** - मृत्युरूप संसारमार्गामध्ये **निवर्तन्ते** - भ्रमण करतात.(जन्ममृत्युच्या चक्रात पुन्हा येतात.)

**विवरण** - संसार चक्रातून मुक्त होण्याकरिता आणि परमात्म्याची प्राप्ती करण्याकरिता मनुष्यदेह प्राप्त होऊन सुद्धा या अध्यात्मज्ञानरूपी धर्मावर विश्वास न करणारे असे जे पुरुष ते मला म्हणजे परमेश्वराला प्राप्त न होता केवळ मृत्युरूपी संसार चक्रामध्ये भ्रमण करीत राहतात.

**व्याकरणम् - परन्तप** - परन्तप पु.संबो.ए.व. **अस्य** - इदम् सर्व.पु.ष.ए.व. **धर्मस्य** - धर्म पु.ष.ए.व. **अश्रद्दधानाः** - अ+श्रद्दधान पु.प्र.ब.व. **पुरुषाः** - पुरुष पु.प्र.ब.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **अप्राप्य** - अ+प्र+आप् पं.ग.प.प.ल्यबन्त अ. **मृत्युसंसारवर्त्मनि** - मृत्यु पु. संसार पु. वर्त्मन् न.स.ए.व. **निवर्तन्ते** - नि+वृत् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - अश्रद्दधानाः** - श्रद्दधानः-भक्तियुक्तो न भवति तेऽश्रद्दधानाः = श्रद्दधान-आत्मज्ञानरूप धर्माच्या श्रद्धेने युक्त जे नाही ते अश्रद्दधान**(न.त.स.) मृत्युसंसारवर्त्मनि** - मृत्युश्चासौ संसारश्च मृत्युसंसारो मृत्युसंसार एव वर्त्म-मार्गस्तस्मिन् मृत्युसंसारवर्त्मनि = मृत्युयुक्त संसारमार्गामध्ये**(क.ग.क.स.)** यद्वा **मृत्युसंसारवर्त्मनि** -मृत्युश्चासौ संसारश्च मृत्युसंसारो मृत्युसंसारस्य वर्त्म-मार्गस्तस्मिन् मृत्युसंसारवर्त्मनि = मृत्युयुक्त संसाराच्या मार्गामध्ये**(क.ग.ष.त.स.) परन्तप** - परान्-अहंकारादिरूपानादिशत्रून् तापयति दूरीकरोतीति परन्तपस्तत्सम्बुद्धौ हे परन्तप-अर्जुन = पर-अहंकारादिरूप जे अनादि शत्रू त्यांना ताप देणारा अथवा दूर करणारा हे परंतप**(उप.स.) धर्मस्य** - अविद्यया जननमरणप्रवाहे पात्यमानाः पुरुषा ध्रियन्तेऽनेनेति धर्मः-ज्ञानं तस्य धर्मस्य = अविद्येच्या द्वारा जन्म मरणाच्या प्रवाहामध्ये पडणाऱ्या पुरुषाचा जो उद्धार करतो तो धर्म म्ह. ज्ञान त्या धर्माचा**(वि.)**

प्रभावासहित भगवंताच्या सर्वव्यापी स्वरूपाचे कथन -

**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।**

**मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ॥४॥**

**अन्वयः** - मया, अव्यक्तमूर्तिना, इदम्, सर्वम्, जगत्, ततम्, सर्वभूतानि, मत्स्थानि, च, अहम्, तेषु, न, अवस्थितः ।

**अन्वयार्थः - मया अव्यक्तमूर्तिना** - माझ्या निराकार स्वरूपाकडून **इदम्, सर्वम्, जगत्** - हे सर्व जगत **ततम्** - व्याप्त झाले आहे **सर्वभूतानि** - सर्व भूते **मत्स्थानि** - माझ्या ठिकाणी वास करतात परंतु **अहम्** - मी

(परमात्मा) **तेषु** - त्या भूतामध्ये **न अवस्थित:** - वास्तविक स्थित नाही.

**विवरण** - ज्याप्रमाणे सुवर्ण संपूर्ण अलंकारामध्ये, माती संपूर्ण घटामध्ये व्याप्त असते. त्याचप्रमाणे मी परमेश्वर या जगतामध्ये पूर्णपणे व्याप्त आहे. म्हणजे संसारामध्ये जड चेतन जेवढा काही पदार्थ समुदाय आहे तो मी सर्व माझ्याकडून (ईश्वराकडून) व्याप्त आहे आणि संपूर्ण प्राणिमात्र माझ्या स्वरूपामध्ये अवस्थित आहेत. परंतु वास्तविक पाहिले तर मी त्याच्यामध्ये स्थित नाही. कारण जसे स्वप्न पाहणाऱ्या पुरुषाला स्वप्नातले सर्व पदार्थ स्वप्नामध्ये प्रत्यक्ष दिसत असताना सुद्धा त्या पदार्थांच्या क्रियांबरोबर आणि पदार्थांबरोबर काही एक संबंध राहात नाही त्याचप्रमाणे माझ्याकडून हे जगत व्याप्त तसेच सर्व भूते माझ्या मध्ये वास करीत असली तरी पण मी सर्वथा त्या सर्वांच्या अतीत निर्लेप असल्यामुळे त्या भूतांमध्ये वास्त विक मी स्थित नाही.

**व्याकरणम्** - **अव्यक्तमूर्तिना** - अव्यक्त वि. मूर्ति स्त्री.तृ.ए.व. **मया** - अस्मत् सर्व.तृ.ए.व. **इदम्** - इदम् सर्व.न.प्र.ए.व. **सर्वम्** - सर्व सर्व.न.प्र.ए.व. **जगत्** - जगत् न.प्र.ए.व. **ततम्** - 'तनु विस्तारे' तन् अ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **सर्वभूतानि** - सर्व वि. भू प्र.ग.प.प.कर्त.भूत.धा.वि.न.प्र.ब.व. **मत्स्थानि** - मत् अस्मत् सर्व.स.ए.व. स्थ वि.न.प्र.ब.व. **च** - च नित्यार्थक उभ.अ. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **तेषु** - तत् सर्व.पु.स.ब.व. **न** - न क्रि.वि.अ. **अवस्थित** - अव+स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा. वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अव्यक्तमूर्तिना** - न केनाऽपि प्रमाणेन व्यज्यते बोध्यत इत्यव्यक्ताऽप्रमेया-अतीन्द्रिया मू र्ति:-स्वरूपं यस्य सोऽव्यक्तमूर्तिस्तेनाव्यक्तमूर्तिना = कोणत्याही प्रमाणाच्याद्वारा व्यक्त न होणारी म्हणजे बो धित न होणारी अव्यक्त अतींद्रिय आहे मूर्ति (स्वरूप) ज्याचे तो त्या अव्यक्तमूर्तिकडून**(ब.स.)** **मत्स्थानि** - मय्यव्यक्तमूर्तौ तिष्ठन्तीति मत्स्थानि = सर्वभूते चर अचर मी जो अव्यक्तमूर्ति त्यामध्ये स्थित आहेत जो कारणभूत त्याच्यामध्ये राहणारे**(स.त.स.)** **जगत्** - गच्छतीति जगत् = जाते ते जगत**(वि.)**

**न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम्।**

**भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावन: ।।५।।**

**अन्वय:** - भूतानि, मत्स्थानि, न, च, मे, ऐश्वर्यम्, योगम्, पश्य, भूतभृत्, च, भूतभावन:, मम, आत्मा, भूतस्थ:, न, च।

**अन्वयार्थ:** - **भूतानि** - सर्वभूते **मत्स्थानि** - वास्तविक माझ्यामध्ये **न च** - नाहीत **मे** - माझ्या **ऐश्वर्यम्** - ईश्वरीय **योगम्** - योगशक्तिला **पश्य** - पहा **भूतभृत्** - संपूर्ण भूतांचे धारण पोषण करणारा आणि **भूतभावन:** - सर्व भूतांना उत्पन्न करणारा **मम** - माझा **आत्मा** - आत्मा **भूतस्थ: न च** - वस्तुत: भूतांमध्ये स्थित नाही.

**विवरण** - मागच्या श्लोकात माझ्यामध्ये प्राणिमात्र स्थित आहेत असे म्हटले असले तरी परंतु, वास्तविक पा हिले तर संपूर्ण प्राणिमात्र माझ्या मध्ये स्थित नाहीत. कारण की, त्यांची सत्ता माझ्याहून भिन्न नाही म्हणून, ते माझ्यामध्ये स्थित नाहीत. त्याच प्रमाणे सर्व प्राणिमात्रांचे धारण पोषण करणारा आणि सर्व प्राणिमात्रांना उत्पन्न करणारा माझा आत्मा वास्तविक संपूर्ण प्राणिमात्रामध्ये स्थित नाही (वास्तविक पाहिले तर या ठिकाणी परमात्म्याच्या सगुण निराकार स्वरूपाचे वर्णन असल्यामुळे ते माझ्यामध्ये स्थित नाहीत. मी

त्याच्यामध्ये स्थित नाही म्हणजे, त्याच्या ठिकाणी यत्किञ्चित् सुद्धा द्वैताचा लेश नाही. पूर्णतया त्याचे स्वरूप अभेदरूपच आहे.)

**व्याकरणम्** - **भूतानि** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.प्र.ब.व. **मत्स्थानि** - मत् अस्मत् सर्व.स.ए.व.स्थ वि.न.प्र.ब.व. **न** - न क्रि.वि.अ. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **ऐश्वर्यम्** - ईश्वर+अण्=ऐश्वर्य वि.पु.द्वि.ए.व. **योगम्** - योग पु.द्वि.ए.व. **पश्य** - दृश् प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **भूतभृत्** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा. वि.'भृञ् धारणपोषणयो:' भृ तृ.ग.वि.पु.प्र.ए.व. **मम** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **आत्मा** - आत्मन् पु.प्र.ए.व. **भूतस्थ:** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. स्थ वि.पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **च** - च उभ.अ.

**समासविग्रहार्था:** - **मत्स्थानि** - मयि-कारणभूते परमात्मनि तिष्ठन्ति तानि मत्स्थानि = मी जो कारणभूत त्यामध्ये राहणारे त्यांना**(स.त.स.)** **ऐश्वर्यम्** - ईश्वरस्यामैश्वर्यस्तम् = ईश्वर संबधी**(वि.)** **भूतभृत्** - स्व स्मिन्नारोपितानि भूतानि स्वसत्तया स्वमात्राणि बिभर्ति दधातीति भूतभृत् = आपल्यामध्ये आरोपित आपल्या सत्तेने आपल्या स्वरूपभूत जी भूते त्यांना धारण पोषण करतो तो भूतभृत्**(उ.स.)** यद्वा **भूतभृत्** - यतो भूतानि सर्वाणि कार्याण्युपादानतया बिभर्ति-धारयति-पोषयतीति भूतभृत् = कारण की, कार्यरूप सर्व भूते त्यांना उपादानरूपाने आपणच धारण पोषण करतो तो भूतभृत्**(उ.स.)** **भूतभावन:** - भूतानि भावयति-उत्पादयति इ ति भूतभावन: = भूतांना उत्पन्न करणारा**(उ.स.)** यद्वा **भूतभावन:** - भूतान्याकाशादीनि पृथिव्यन्तानि सकार्या णि सर्वाणि भावयति स्वसत्तया स्वप्रकाशेन सत्तावन्ति प्रकाशवन्ति च करोतीति भूतभावन: = आकाशापासून तर पृथ्वीपर्यंत असणाऱ्या कार्यासहित संपूर्ण भूतांची जी भावना करतो म्ह. भूतांना आपल्या सत्तेचे द्वारा सत्तायुक्त आणि आपल्या प्रकाशाच्या द्वारा प्रकाशयुक्त करतो तो भूतभावन**(उप.स.)** **भूतस्थ:** - भूतेषु तिष्ठती ति भूतस्थ: = भूतांमध्ये राहणारा**(स.त.स.)**

आकाशाच्या दृष्टांताने भगवंताच्या सर्वव्यापी स्वरूपाचे कथन -

**यथाकाशस्थितो नित्यं वायु: सर्वत्रगो महान् ।**

**तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥६॥**

**अन्वय:** - यथा, सर्वत्रग:, महान्, वायु:, नित्यम्, आकाशस्थित:, तथा, सर्वाणि, भूतानि, मत्स्थानि, इति, उपधारय ।

**अन्वयार्थ:** - **यथा** - ज्याप्रमाणे **सर्वत्रग:** - सर्व ठिकाणी संचार करणारा **महान्** - मोठा **वायु:** - वायू **नित्यम्** - सदा(सतत) **आकाशस्थित:** - आकाशामध्ये स्थित असतो **तथा** - त्या प्रमाणे **सर्वाणि भूतानि** - सर्वभूते **मत्स्थानि** - माझ्या ठिकाणी स्थित आहेत **इति** - असे **उपधारय** - समज.

**विवरण** - ज्या प्रमाणे सर्व ठिकाणी विचरण (संचार) करणारा मोठा वायू आकाशामध्ये सदा सर्वदा अव स्थित असतो. कारण वायू आकाशापासून उत्पन्न होतो आकाशामध्येच स्थित असतो आणि आकाशामध्येच लीन होतो. त्याचप्रमाणे नाना योनिमध्ये भ्रमण करणारे संपूर्ण प्राणिमात्र माझ्यामध्येच स्थित असतात आणि माझ्यामध्ये लीन होतात. म्हणून भगवान म्हणतात की, निर्विकार आकाशामध्ये जसा वायू स्थित असतो त्याप्रमाणे निराकार असंग अनंत आणि निर्विकार असा मी त्यामध्ये संपूर्ण प्राणिमात्र सर्व प्रकारे स्थित असतात, असे तू समज.

**व्याकरणम्** - **यथा** - यथा अ. **सर्वत्रग:** - सर्वत्र अ. ग वि.पु.प्र.ए.व. **महान्** - महत् वि.पु.प्र.ए.व. **वायु:** - वायु पु.प्र.ए.व. **नित्यम्** - नित्यम् वि.न.प्र.ए.व. **आकाशस्थित:** - आकाशस्थित पु.प्र.ए.व. **तथा** - तथा क्रि.वि.अ. **सर्वाणि** - सर्व सर्व.न.प्र.ब.व. **भूतानि** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.प्र.ब.व. **मत्स्थानि** - अस्मत् सर्व.स.ए.व. स्थ वि.न.प्र.ब.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **उपधारय** - उप+धृ प्र.ग.उ.प.(प.प.) प्रयोजक आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **मत्स्थानि** - मयि स्थितानि मत्स्थानि = माझ्यामध्ये स्थित**(स.त.स.)** यद्वा **मत्स्थानि** - अहमेव स्थानं येषां तानि इति मत्स्थानि = मीच स्थान आहे ज्यांचे ते मत्स्थानि**(ब.स.)** यद्वा **मत्स्थानि** - सर्वाणि भूतानि महदादिस्थूलान्तानि मयि परिपूर्णे निष्क्रिये निराकारे निरन्तरे परे ब्रह्मणि तिष्ठन्तीति मत्स्थानि = महत्तत्वापासून स्थूलापर्यंत सर्वभूते माझ्यामध्ये म्ह. परिपूर्ण, निष्क्रिय, निराकार, निरंतर परब्रह्मामध्ये स्थित आहेत**(स.त.स.)** **आकाशस्थित:** = आकाशे-गगने स्थित:-स्थिरीभूत:, इति आकाशस्थित: = आकाशामध्ये स्थित**(स.त.स.)** **सर्वत्रग:** - सर्वत्र-सर्वस्थलेषु गच्छतीति सर्वत्रग: = संपूर्ण स्थलामध्ये जाण-रा**(स.त.स.)** **वायु:** - वातीति वायु:-पवन: = संचार करतो तो वायु**(वि.)**

सर्व भूतांच्या उत्पत्ति आणि प्रलयाचे कथन -

**सर्वभूतानि कौन्तेय प्रकृतिं यान्ति मामिकाम् ।**

**कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥७॥**

**अन्वय:** - कौन्तेय, कल्पक्षये, सर्वभूतानि, मामिकाम्, प्रकृतिम्, यान्ति, पुन:, कल्पादौ, अहम्, तानि, विसृजामि ।

**अन्वयार्थ:** - **कौन्तेय** - हे कुन्तिपुत्र अर्जुना! **कल्पक्षये** - कल्पाच्या शेवटी (अन्ति) **सर्वभूतानि** - सर्वभूते **मामिकाम्, प्रकृतिम्** - माझ्या प्रकृतिला **यान्ति** - प्राप्त होतात **पुन:** - पुन्हा **कल्पादौ -** कल्पांचा आरंभ झाला असता **अहम्** - मी **तानि** - त्या भूतांना (भूतांची) **विसृजामि** - उत्पन्न करतो.(रचना करतो.)

**विवरण** - कल्पाचा क्षय झाला कि, सर्वभूते माझ्या प्रकृतिला प्राप्त होतात. ब्रह्मदेवाच्या एका दिवसाला कल्प म्हणतात आणि तेवढीच मोठी रात्र असते. या अहोरात्र गणनेच्या द्वारा ब्रह्मदेवाची शंभर वर्षे पूर्ण होऊन ब्रह्माचे आयुष्य समाप्त होते त्या वेळी कल्पाचा क्षय होतो आणि कल्पक्षय झाल्यानंतर जेव्हा ब्रह्माची शंभर वर्षे पूर्ण होऊन कल्पाचा आरंभ होतो तेव्हा जीवाच्या कर्मानुसार फळ भोगण्याकरिता मी त्याच सर्व प्राणिमात्रांना उत्पन्न करतो.

**व्याकरणम्** - **कौन्तेय** - कौन्तेय पु.संबो.ए.व. **कल्पक्षये** - कल्प पु. क्षय पु.स.ए.व. **सर्वभूतानि** - सर्व वि. भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.प्र.ब.व. **मामिकाम्** - अस्मद् सर्व.+अण्,ममकादेश=मामक+टाप्=मामका 'क'च्या पूर्व 'अ'ला 'इ'होतो=मामिका वि.स्त्री.द्वि.ए.व. **प्रकृतिम्** - प्रकृति स्त्री.द्वि.ए.व. **यान्ति** - या द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **पुन:** - पुनर् अ. **कल्पादौ** - कल्प पु. आदि पु.स.ए.व. **तानि** - तत् सर्व.न. द्वि.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.पु.प्र.ए.व. **विसृजामि** - वि+सृज् ष.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **कल्पक्षये** - कल्पस्य-ब्रह्मकल्पस्य क्षय:-नाशस्तस्मिन् कल्पक्षये-प्रलयकाले = ब्रह्म कल्पाच्या क्षयामध्ये**(स.त.स.)** **कल्पादौ** - कल्पस्य-आदि: प्रथमं कल्पादिस्तस्मिन् कल्पादौ = कल्पाच्या

आरंभामध्ये**(ष.त.स.)** **मामिकाम्** - मम इयं मामिका तां मामिकाम् = माझ्या संबंधीला**(त.वि.)**

सर्व भूतांच्या पुन: पुन: उत्पत्तिचे कथन -

**प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुन: पुन: ।**

**भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात् ॥८॥**

**अन्वय:** - स्वाम्, प्रकृतिम्, अवष्टभ्य, प्रकृते:, वशात्, अवशम्, इमम्, कृत्स्नम्, भूतग्रामम्, पुन:, पुन:, विसृजामि ।

**अन्वयार्थ:** - **स्वाम्, प्रकृतिम्** - आपल्या प्रकृतिला **अवष्टभ्य** - आश्रित करून **प्रकृते: वशात्, अवशम्** - स्वभाववशात प्रकृतीच्या अधीन झालेल्या **इमम्, कृत्स्नम्, भूतग्रामम्** - या संपूर्ण भूतसमुदायाला **पुन: पुन:** - पुन्हा पुन्हा **विसृजामि** - मी रचतो.(निर्माण करतो.)

**विवरण** - कल्पाच्या शेवटी संपूर्ण प्राणीमात्र माझ्या प्रकृतिमध्ये वास करतात अशा त्या प्रकृतिच्या आधीन न होता तिला आपल्या स्वाधीन करून, स्वभाववशात अविद्या, अस्मिता, राग, द्वेष, अभिनिवेश इत्यादि दोषांनी परतंत्र झालेल्या भूतसमुदायाला मी पुन्हा पुन्हा (वारंवार) उत्पन्न करतो.

**व्याकरणम्** - **स्वाम्** - स्वा सर्व.स्त्री.द्वि.ए.व. **प्रकृतिम्** - प्रकृति स्त्री.द्वि.ए.व. **अवष्टभ्य** - अव+स्तम्भ् न.ग.प.प.ल्यबन्त अ. **प्रकृते:** - प्रकृति स्त्री.ष.ए.व. **वशात्** - वश वि.पु.पं.ए.व. **अवशम्** - अवश वि.पु. द्वि.ए.व. **इमम्** - इदम् सर्व.पु.द्वि.ए.व. **कृत्स्नम्** - कृत्स्न वि.पु.द्वि.ए.व. **भूतग्रामम्** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. ग्राम पु.द्वि.ए.व. **पुन:पुन:** - पुनर् अ. **विसृजामि** - वि+सृज् ष.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **भूतग्रामम्** - भूतानाम्-प्राणिनाम्, ग्राम:-समुदायस्तं भूतग्रामम् = भूतांचा समुदाय भूतसमुदाय त्याला**(ष.त.स.)** **अवशम्** - न वशमित्यवशम् = नाही वश तो अवश, त्याला**(न.त.स.)**

भगवंताला कर्म बंधन करीत नाही याचे कथन -

**न च मां तानि कर्माणि निबध्नन्ति धनञ्जय ।**

**उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ॥९॥**

**अन्वय:** - च, धनञ्जय, तेषु, कर्मसु, असक्तम्, उदासीनवत्, आसीनम्, माम्, तानि, कर्माणि, न, निबध्नन्ति ।

**अन्वयार्थ:** - **च** - परंतु **धनञ्जय** - हे अर्जुना! **तेषु कर्मसु असक्तम्** - त्या कर्मामध्ये असक्त-कर्मफळाची इच्छा न करणाऱ्या आणि त्यामध्ये **उदासीनवत्, आसीनम्** - तटस्थपणाने असणाऱ्या **माम्** - मला **तानि कर्माणि** - ती कर्मे **न निबध्नन्ति** - बंधनकारक होत नाहीत.

**विवरण** - भगवंतानी हे जगत उत्पन्न केलेले आहे. त्यामध्ये अनेक प्रकारचे प्राणिमात्र आपआपल्या कर्मानुसार ईश्वरप्रेरणेने या संसारामध्ये कर्माचे चांगले वाईट फळ भोगतात. कारण की, कर्तृत्वाभिमानाने आणि फळाभिलाषाने कर्मामध्ये प्रवृत्त होणारे त्या कर्माच्या द्वारा बद्ध होतात आणि जे राग, द्वेष यांनी रहित

होऊन कर्मे करतात ते कर्मबंधनापासून मुक्त होतात अशा त्या कर्मामध्ये आसक्तिरहित तसेच उदासीनाप्रमाणे आचरण करणाऱ्या (असणाऱ्या) मला ती कर्मे बद्ध करीत नाहीत.

**व्याकरणम्** - **च** - च उभ.अ. **धनञ्जय** - धनंजय पु.संबो.ए.व. **तेषु** - तत् सर्व.न.स.ब.व. **कर्मसु** - कर्मन् न.स.ब.व. **असक्तम्** - अ+सज्ज् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.द्वि.ए.व. **उदासीनवत्** - उद्+आस् द्वि.ग.आ.प.+शानच्=उदासीन+वत्=उदासीनवत् अ. **आसीनम्** - आस् द्वि.ग.आ.प.कर्त.वर्त.धा.वि.पु. द्वि.ए.व. **माम्**- अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **तानि** - तत् सर्व.न.प्र.ब.व. **कर्माणि** - कर्म न.प्र.ब.व. **न** - न क्रि. वि.अ. **निबध्नन्ति** - नि+बन्ध् न.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **असक्तम्** - न सक्तमित्यसक्तम् = जो सक्त नाही तो असक्त त्याला**(न.त.स.) धनञ्जय** - युधिष्ठिरराजसूयार्थं सर्वान्राज्ञो जित्वा तत्पार्श्वेस्थितधनञ्जयति-गृह्णातीति धनञ्जयस्तत्सम्बुद्धौ धनञ्जय = युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञाकरिता सर्व राजांना जिंकून त्यांच्या जवळ असणाऱ्या धनाला ग्रहण करणारा तो धनंजय त्याचे संबोधनामध्ये हे धनंजय**(उ.स.) उदासीनवत्** - उदासीनेन तुल्यमुदासीनवत् = उदासीनाच्या समान**(वि.)** यद्वा **उदासीनवत्** - यस्य न कस्मिंश्चित् पदार्थे रागो न द्वेषः स उदासीनः, उदासीन इव इति उदासीनवत् = ज्याचा कोणत्याही पदार्थामध्ये राग आणि द्वेष नाही तो उदासीन त्याच्यासमान**(त.वि.)** **आसीनम् =** आस्ते, इति आसीनः तं आसीनम् = स्थित बसणाऱ्याला**(वि.)**

भगवंताच्या अस्तित्त्वाने प्रकृतिकडून चराचर जगाची उत्पत्ति -

**मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ।**

**हेतुनानेन कौन्तेय जगद्विपरिवर्तते ॥१०॥**

**अन्वयः** - कौन्तेय, मया, अध्यक्षेण, प्रकृतिः, सचराचरम्, सूयते, अनेन, हेतुना, जगत्, विपरिवर्तते ।

**अन्वयार्थः** - **कौन्तेय** - हे कुंतिपुत्र अर्जुना! **मयाध्येक्षण** - माझ्या अधिष्ठानामुळे **प्रकृतिः** - प्रकृति **सचराचरम्** - चराचर जगताला **सूयते** - निर्माण करते (उत्पन्न करते) **अनेन हेतुना** - या कारणामुळे **जगत्** - संसारचक्र **विपरिवर्तते** - भ्रमण करीत आहे.(परिवर्तन करित आहे.)

**विवरण** - मी जगाचा धारण पोषण करणारा तसेच असंग निर्विकार अशा माझ्या (परमात्म्याच्या) अध्यक्षामुळे ही माझी त्रिगुणात्मक प्रकृती संपूर्ण प्राणिमात्रांना उत्पन्न करते. या कारणामुळे संपूर्ण सृष्टी परिवर्तनशील होत आहे (म्हणजे परिवर्तन करीत आहे.)

**व्याकरणम्** - **कौन्तेय** - कौन्तेय पु.संबो.ए.व. **मया** - अस्मत् सर्व.तृ.ए.व. **अध्यक्षेण** - अध्यक्ष पु.तृ.ए.व. **प्रकृतिः** - प्रकृति स्त्री.प्र.ए.व. **सचराचरम्** - स अ. चर न. अचर न.द्वि.ए.व. **सूयते** - सू च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व. **अनेन** - इदम् सर्व.पु.तृ.ए.व. **हेतुना** - हेतु पु.तृ.ए.व. **जगत्** - जगत् न.प्र.ए.व. **विपरिवर्तते** - वि+परि+वृत् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **सचराचरम्** - चराचराभ्याम्-स्थावर जंगमाभ्यां सहितमिति सचराचरम् = स्थावर जंगम या चराचराच्या सहित अशा सचराचराला**(तृ.त.स.)** यद्वा **सचराचरम्** - चरम्-जंगमम्, अचरम्-स्थावरम्, चरं च, अचरं च, चराचरं चराचरेण सह वर्तत इति सचराचरम् = चर म्ह.जंगम अचर म्हणजे स्थावर त्यांच्या बरोबर जो राहतो तो सचराचर त्याला**(द्वं.स.ग.तृ.त.स.)**

भगवंताच्या प्रभावाला न जाणल्यामुळे भगवंताचा तिरस्कार करणाऱ्याची निंदा -

**अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ।**

**परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम् ॥११॥**

**अन्वय:** - भूतमहेश्वरम्, मम, परम्, भावम्, अजानन्त:, मूढा:, मानुषीम्, तनुम्, आश्रितम्, माम्, अवजानन्ति ।

**अन्वयार्थ:** - **भूतमहेश्वरम्, मम परम्, भावम्** - संपूर्ण प्राणिमात्रांचा महान ईश्वर अशा माझ्या स्वरूपाला **अजानन्त:** - न जाणणारे **मूढा:** - अविवेकी लोक **मानुषीम्, तनुम्, आश्रितम्, माम्** - मनुष्य शरीर धारण करणाऱ्या मला (मनुष्य समजून) **अवजानन्ति -** माझी अवज्ञा करतात.

**विवरण** - धर्माचे रक्षण आणि भक्तांचा उद्धार करण्याकरिता आपल्या योगमायेच्या द्वारा मनुष्य रूपामध्ये अवतीर्ण अशा सर्वव्यापी सर्वशक्तिमान सर्व भूतांच्या महेश्वराला न जाणणारे म्हणजे मायेच्या द्वारा ज्यांचे विवेक ज्ञान अपहृत झाले आहे असे अविवेकी मूढ लोक मनुष्य समजून मला तुच्छ मानतात म्हणजे माझा (परमेश्वराचा) अनादर करतात.

**व्याकरणम् - भूतमहेश्वरम्** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. महेश्वर पु.द्वि.ए.व. **मम** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **परम्** - पर वि.पु.द्वि.ए.व. **भावम्** - भाव पु.द्वि.ए.व. **अजानन्त:** - अ+ज्ञा न.ग.उ.प.(प.प.) कर्त.शतृ+अजानत् वि.पु.प्र.ब.व. **मूढा:** - मुह् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **मानुषीम्** - मानुषी स्त्री.द्वि.ए.व. **तनुम्** - तनु स्त्री.द्वि.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **अवजानन्ति** - अव+ज्ञा न.ग.उ.प. (प.प.) वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **भूतमहेश्वरम्** - स्वसन्निधिमात्रेण प्रकृतिं प्राकृतं च सर्वमीष्टे चेष्टयतीतीश्वर: महांश्चासौ ईश्वरश्चेति महेश्वर: भूतानाम्-चेतनां महेश्वर:, भूतमहेश्वरस्तं भूतमहेश्वरम्-कारणम् = आपल्या केवळ सन्निधि मात्राच्या द्वाराच प्रकृती आणि प्राकृत-कार्य यांना स्वव्यवहारांत प्रवृत्त करतो तो ईश्वर, जो महान आणि ईश्वर आहे तो महेश्वर संपूर्ण भूतमात्रांचा महेश्वर भूतमहेश्वर त्याला**(क.स.ग.ष.त.स.) अजानन्त:** - जानन्तीति जानन्त:, न जानन्त इत्यजानन्त: = जाणतात ते जाणणारे, नाही जाणत ते न जाणणारे**(न.त.स.) मानुषीम्** - मनुष्यस्य इयं मानुषी तां मानुषीम् = मनुष्य संबंधीला**(सबन्धार्थे तद्धि.वि.)**

राक्षसी आणि आसुरी प्रकृतिने युक्त असणाऱ्याचे लक्षण -

**मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतस: ।**

**राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिता: ॥१२॥**

**अन्वय:** - मोघाशा:, मोघकर्माण:, मोघज्ञाना:, विचेतस:, राक्षसीम्, च, आसुरीम्, मोहिनीम्, एव, प्रकृतिम्, श्रिता: ।

**अन्वयार्थ:** - **मोघाशा:** - ज्यांच्या (अविवेकी लोकांच्या) सर्व आशा निष्फळ झाल्या आहेत असे **मोघकर्माण:** - ज्यांची सर्व कर्मे निष्फळ झाली आहेत **मोघज्ञाना:** - ज्यांचे सर्व ज्ञानसुद्धा व्यर्थ झाले आहे **विचेतस:** - असे विवेकशून्य लोक **राक्षसीम्** - राक्षसी **च** - आणि **आसुरीम्** - आसुरी अशा **मोहिनीम्** - मो

हित करणाऱ्या **प्रकृतिम्, एव** - प्रकृतीचाच **श्रिता:** - आश्रय करतात म्हणजे प्रकृतीच्या आधीन होतात.

**विवरण** - सर्व भूतांच्या महेश्वराला-मला न जाणणाऱ्या अविवेकी मूढ लोकांद्वारा शास्त्रविधिचा त्यागपूर्वक आणि अश्रद्धापूर्वक जी काही यज्ञ, दान आणि तप आदि संपूर्ण कर्मे केली जातात ती सर्व व्यर्थ होतात. त्यांना त्या कर्माचे फल इहलोकामध्ये तसेच परलोकामध्ये सुद्धा यत्किञ्चित् सुद्धा मिळत नाही. म्हणून, त्यांच्या सर्व आशा त्यांची सर्व कर्मे निष्फळ होतात आणि त्यांचे ज्ञानसुद्धा सर्व प्रकारे व्यर्थ असते. असे जे विवेकशून्य लोक राक्षसी आणि आसुरी अशा मोह पाडणाऱ्या प्रकृतीला धारण केलेले असतात.

**व्याकरणम्** - **मोघाशा:** - मोघ वि. आशा स्त्री.वि.पु.प्र.ब.व. **मोघकर्माण:** - मोघ वि. कर्मन् वि.पु.प्र.ब.व. **मोघज्ञाना:** - मोघ वि. ज्ञान न.वि.पु.प्र.ब.व. **विचेतस:** - वि+चेतस् न.वि.पु.प्र.ब.व. **राक्षसीम्** - राक्षसी स्त्री.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **आसुरीम्** - आसुरी स्त्री.द्वि.ए.व. **मोहिनीम्** - मोह् च.ग.प.प.+णि नि+ङीप्=मोहिनी स्त्री.द्वि.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **प्रकृतिम्** - प्रकृति स्त्री.द्वि.ए.व. **श्रिता:** - श्रि प्र.ग.उ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **मोघाशा:** - मोघा-निष्फला-वितथा, आशा-अभिलाषा-मनोरथो येषां ते मोघाशा: = मोघ निष्फळ आहेत आशा (अभिलाषा म्हणजे मनोरथ) ज्यांच्या ते**(ब.स.) मोघकर्माण:** - मोघानि-निष्फलानि कर्माणि-नित्यनैमित्तिकादीनि येषां ते मोघकर्माण: = मोघ-निष्फळ आहे कर्म नित्यनैमित्तकादि ज्यांचे ते**(ब.स.) मोघज्ञाना:** - मोघम्-निष्फलमनर्थसाधकमसद्गोचरं ज्ञानं सकलवेदशास्त्राध्ययनजन्यं येषां ते मोघज्ञाना: = मोघ-निष्फळ म्ह. अनर्थसाधक आणि असताला विषय करणारे जे ज्ञान आहे ते संपूर्ण वेद-शास्त्र अध्ययनापासून उत्पन्न झाले आहे ज्यांचे ते मोघज्ञाना (ते ज्ञान वृत्तिस्थ आणि अहंकार उत्पन्न करीत असल्यामुळे मोक्षप्रापक नाही म्हणून व्यर्थ)**(ब.स.) राक्षसीम्** - राक्षसानामियं राक्षसी तां राक्षसीम् = राक्षसांच्या संबंधीला**(वि.) आसुरीम्** = आसुराणामियमासुरी तामासुरीम् = आसुरांच्या संबंधीला**(वि.) मोहिनीम् -** मोहं करोतिति मोहिनी तां मोहनीम् = मोह करते ती मोहिनी त्या मोहिनी प्रकृतिला**(वि.)**

भगवंताच्या प्रभावाला जाणणाऱ्या अनन्य भक्तांच्या भजनाचा प्रकार -

**महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिता: ।**

**भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥१३॥**

**अन्वय:** - तु, पार्थ, दैवीम्, प्रकृतिम्, आश्रिता:, महात्मान:, माम्, अव्ययम्, भूतादिम्, ज्ञात्वा, अनन्यमनस:, भजन्ति ।

**अन्वयार्थ:** - **तु** - परंतु **पार्थ** - पृथापुत्र अर्जुना! **दैवीम्, प्रकृतिम्, आश्रिता:** - सत्त्वगुणविशिष्ट दैवी प्रकृतीचा आश्रय केलेले **महात्मान:** - महात्मालोक **माम्** - मला(परमात्म्याला) **अव्ययम्, भूतादिम्** - नाशरहित अक्षरस्वरूप आणि सर्व भूतांचे सनातन कारण **ज्ञात्वा** - समजून **अनन्यमनस:** - अनन्य (एकनिष्ठ) भावाने (मनाने) मला **भजन्ति** - भजतात.

**विवरण** - या अविवेकी मूढलोकांच्या विपरीत जे दैवी प्रकृतीचा आश्रय केलेले तसेच ज्यांचा आत्मा महान आहे असे, महाजन सर्वव्यापी, सर्वशक्तिमान, सर्वभूताचे कारण केवळ मलाच जाणून तसेच माझ्या अति रिक्त संसाराच्या विनाशी भोग भोगण्यामध्ये त्यांना आनंद येत नसून ते जेवढे काही शास्त्रविहित कर्म करतात

ते निष्काम भावाने तसेच माझ्याकरिताच करतात; कारण, त्यांना केवळ मीच अन्यव्यतिरिक्त म्हणजे अनन्य असतो. म्हणून, असे जे महाजन लोक केवळ अनन्य भावाने माझेच भजन करतात.

**व्याकरणम्** - **तु** - तु अ. **पार्थ** = पार्थ पु.संबो.ए.व. **दैवीम्** - दैवी स्त्री.द्वि.ए.व. **प्रकृतिम्** - प्रकृति स्त्री. द्वि.ए.व. **आश्रिताः** - आ+श्रि प्र.ग.उ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **महात्मानः** - महात्मन् वि.पु.प्र.ब.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **अव्ययम्** - अव्यय वि.पु.द्वि.ए.व. **भूतादिम्** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. आदि वि.पु.द्वि.ए.व. **ज्ञात्वा** - ज्ञा न.ग.उ.प.त्वान्त अ. **अनन्यमनसः** - अन्+अन्य अनन्य वि. मनस् न. वि.पु.प्र.ब.व. **भजन्ति** - भज् प्र.ग.उ.प.(प.प.)वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **महात्मानः** - महान्-विशालः आत्मा-अन्तःकरणं येषां ते महात्मानः = मोठा-विशाल आत्मा-अंतःकरण आहे ज्यांचे ते**(ब.स.)** **अनन्यमनसः** - मद् व्यतिरेकेण न अन्यस्मिन् मनो येषां ते अनन्यमनसः = माझ्या अतिरिक्त दुसऱ्यामध्ये मन नाही ज्यांचे ते**(ब.स.)** **दैवीम्** - देवस्य-स्वयं प्रकाशस्य विष्णोरियं दैवी तां दैवीम् = देवसंबंधीला**(वि.)** **भूतादिम्** - भूतानाम्-प्राणिनाम्, आदिः-कारणमिति भूता दिस्तं भूतादिम् = भूतांचा आदि अशा त्याला**(ष.त.स.)**

**सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रताः ॥**

**नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥१४॥**

**अन्वयः** - दृढव्रताः, सततम्, माम्, कीर्तयन्तः, च, यतन्तः, च, माम्, नमस्यन्तः भक्त्या, नित्ययुक्ताः, उपासते।

**अन्वयार्थः** - **दृढव्रताः** - दृढनिश्चय असणारे **सततम्** - निरंतर **माम्, कीर्तयन्तः** - माझे नामसंकीर्तन करणारे **च** - आणि **यतन्तः** - माझ्या प्राप्तीसाठी प्रयत्न करणारे **च** - आणि **माम्** - मला **नमस्यन्तः** - नमस्कार करणारे भक्तजन **भक्त्या** - श्रद्धाभक्तिने **नित्ययुक्ताः** - नित्य माझ्या ध्यानामध्ये समाहित तत्पर होऊन **उपासते** - माझी उपासना करतात.

**विवरण** - अन्यव्यतिरिक्त माझ्यावर श्रद्धा, विश्वास आणि त्यांचे विचार सर्व काही अत्यंत दृढ असणारे तसेच मोठ मोठी आपत्ती आणि प्रबळ विघ्नाचा समुदाय जरी त्यांच्या अंगावर येऊन कोसळला तरी ते आपल्या विचारापासून विचलित न होता केवळ माझ्या प्राप्तीकरिताच इंद्रियांचा निग्रह शमदमादि साधने तसेच ब्रम्हचर्यादि व्रतांचे पालन करणारे मलाच नमस्कार करणारे आणि माझ्यामध्येच समाहित होणारे असे जे दृढव्रती लोक पुनः पुनः अनन्य प्रेमाने माझी उपासना करतात.

**व्याकरणम्** - **दृढव्रताः** - दृढ वि. व्रत पु.प्र.ब.व. **सततम्** - सतत वि.न.द्वि.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व. द्वि.ए.व. **कीर्तयन्तः** - कृत् द.ग.उ.प.(प.प.)+णिच्+कर्त.शतृ=कीर्तयत् वि.पु.प्र.ब.व. **च** - च उभ.अ. **यतन्तः** - यत् प्र.ग.आ.(प.प.)कर्त.वर्त.वा.धा.वि.पु.प्र.ब.व. **च** - च उ.अ. **नमस्यन्तः** - नमस् नाम+क्यच्+शतृ=नमस्यन्त वि.पु.प्र.ब.व. **भक्त्या** - भक्ति स्त्री.तृ.ए.व. **नित्ययुक्ताः** - नित्य वि. युज् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **उपासते** - उप+आस् द्वि.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **दृढव्रताः** - ब्रह्मचर्याहिंसाद्युत्तमधर्मेण बहिरन्तरिन्द्रियनिग्रहेण च दृढं विच्छित्तिरहितं ज्ञानसंपादनपरत्वलक्षणं निश्चयपूर्वकं स्थिरं वा व्रतम्-नियमो येषां ते दृढव्रताः = ब्रह्मचर्य अहिंसादि उत्तम

धर्मद्वारा अंतर्बाह्य इंद्रियांचा निग्रह करून निश्चयपूर्वक अविच्छिन्न ज्ञानसंपादनतत्परतारूप व्रत (नियम) आहे ज्यांचे ते**(ब.स.) नित्ययुक्ता:** - नित्ये-नित्यस्वरूपे परमात्मनि युक्ता:-समाहिता नित्ययुक्ता: = नित्यस्वरूप परमात्म्यामध्ये समाहित असे ते नित्ययुक्त**(च.त.स.)** यद्वा **नित्ययुक्ता:** - नित्यो मोक्षस्तत्सिद्धये युक्ता:-नियता इति नित्ययुक्ता: = नित्य म्हणजे मोक्ष त्याच्या सिद्धिकरिता नियमाने युक्त असणारे ते नित्ययुक्त**(च.त.स.) कीर्तयन्त:** - कीर्तयन्ति ते कीर्तयन्त: = कीर्तन करणारे ते कीर्तयंत**(वि.) यतन्त:** - यतन्ते ते यतन्त: = यत्न करणारे ते यतंत**(वि.) नमस्यन्त:** - नमस्यन्ति ते नमस्यन्त: = नमस्कार करणारे ते नमस्यंत**(वि.)**

एकत्वभावाने ज्ञानयज्ञाच्या द्वारा ब्रह्माची उपासना करणाऱ्या ज्ञानयोगी पुरुषांचे आणि विश्वरूप परमेश्वराची उपासना करणाऱ्यांचे वर्णन -

**ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते ।**

**एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ॥१५॥**

**अन्वय:** - अन्ये, ज्ञानयज्ञेन, एकत्वेन, यजन्त:, च, पृथक्त्वेन, विश्वतोमुखम्, बहुधा, माम्, उपासते ।

**अन्वयार्थ: - अन्ये** - अन्य काही ज्ञानी लोक **ज्ञानयज्ञेन -** निर्गुण निराकार ब्रह्माचे जे ज्ञान तोच यज्ञ अशा ज्ञानयज्ञाच्या द्वारा **एकत्वेन -** अभिन्नभावाने **यजन्त: -** यजन करीत असताना **माम्, उपासते** - माझी उपासना करतात **च -** आणि **पृथक्त्वेन** - कोणी दुसरे लोक चंद्र, सूर्य, अग्नी, इंद्र आणि वरुण इत्यादि विभिन्न देवता माझेच स्वरूप समजून पृथक्‌रूपाने (भेदरूपाने) आणि **विश्वतोमुखम् -** भगवानच विराट स्वरूप आहे(म्हणजे सर्वांमध्ये व्याप्त आहे) असे समजून बहुधा अनेक प्रकारांनी **माम्, उपासते** - माझी उपासना करतात.

**विवरण** - संपूर्ण जगताला मिथ्या मृगतृष्णाजळाच्या समान अथवा स्वप्नातील संसाराच्या समान अनित्य समजून तसेच निर्गुण निराकार परमात्म्यातिरिक्त कोणत्याही वस्तुची सत्ता न मानून केवळ त्याचेच श्रवण, मनन, निधिध्यासन इ. द्वारा ब्रह्मामध्ये नित्य अभिन्न भावाने समाहित राहाण्याचा अभ्यास करणे. अशा या ज्ञानयज्ञाच्या द्वारा दुसरे ज्ञानयोगी माझी उपासना करतात.

**व्याकरणम्** - **अन्ये** - अन्य सर्व.पु.प्र.ब.व. **ज्ञानयज्ञेन -** ज्ञान न. यज्ञ.पु.तृ.ए.व. **एकत्वेन** - एक सर्व.त्वप्रत्यय पु.तृ.ए.व. **पृथक्त्वेन** - पृथक्+त्व=पृथक्त्व पु.तृ.ए.व. **यजन्त:** - यज् प्र.ग.उ.प.(प.प.) कर्त.शतृ=यजत् वि.पु.प्र.ब.व. **च** - च उभ.अ. **विश्वतोमुखम् -** विश्वतस् अ. मुख न.वि.पु.द्वि.ए.व. **बहुधा** - बहुधा अ. **माम् -** अस्मत् सर्व.द्वि.ए.व **उपासते** - उप+आस् द्वि.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था: - ज्ञानयज्ञेन** - इज्यतेऽनेनेति यज्ञ: ज्ञानमेव अथवा भगवद्विषयमेव यज्ञ: ज्ञानयज्ञस्तेन ज्ञानयज्ञेन = ज्याच्या द्वारा यज्ञ केला जातो तो यज्ञ ज्ञानच यज्ञ व भगद्विषयकही यज्ञ अशा त्या यज्ञाच्याद्वारा **(कर्म.स.) यजन्त:** - यजन्ति ते यजन्त: = यजन करणारे ते यजंत**(वि.) एकत्वेन** - एकस्य भाव:-धर्म एकत्वं तेन एकत्वेन = एकरूपाने परब्रह्म परमात्मा एकच आहे अशा परमार्थ ज्ञानाने**(वि.) पृथक्त्वेन -** पृथग् अव्ययस्तस्यभाव: पृथक्त्वं तेन पृथक्त्वेन = पृथक्‌रूपाने इन्द्र सूर्य, चंद्र आदि पृथक्‌पृथक् रूपाने**(त.वि.)**

भगवंतानी आपले गुण प्रभाव आणि विभूतिसहित वर्णन करून कारणरूप जगताला सुद्धा आपले स्वरूप दाखवणे -

**अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमहमौषधम् ।**

**मन्त्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ॥१६॥**

**अन्वयः** - अहम्, क्रतुः, अहम्, यज्ञः, अहम्, स्वधा, अहम्, औषधम्, अहम्, मन्त्रः, अहम्, एव, आज्यम्, अहम्, अग्निः, अहम्, हुतम् ।

**अन्वयार्थः - अहम्, क्रतुः** - मी श्रौत यज्ञ आहे **अहम्, यज्ञः** - मी स्मार्त यज्ञ आहे **अहम्, स्वधा** - मी श्राद्धामध्ये पितरांना तर्पण केलेले अन्न आहे **अहम्, औषधम्** - मी वनस्पतिजन्य अन्न आहे **अहम्, मन्त्रः** - मी मंत्र आहे **अहम्, एव आज्यम्** - मीच तूप आदि हवि आहे **अहम्, अग्निः** - मीच अग्नि आहे **अहम्, हुतम्** - मीच हवनकर्म आहे.

**विवरण** - या जगतामध्ये जेवढ्या काही वस्तू आहेत त्या सर्व माझ्याहून भिन्न नाहीत हे संपूर्ण जगत माझेच स्वरूप आहे वेदोक्त जे श्रौत कर्म आहे ते मीच आहे. पञ्चमहायज्ञादि स्मार्त कर्म मीच आहे ज्या मंत्राच्या द्वारा देवतांना आणि पितरांना हवि दिला जातो अथवा ज्याचा अनेक प्रकारच्या व्यक्तिद्वारा विभिन्न भावाने जप केला जातो तो मंत्र मीच आहे. यज्ञाकरिता ज्या घृतादि सामुग्रीने हवि दिला जातो तो हवि मीच आहे. ज्याच्या मध्ये हवि दिला जातो असा गार्हपत्य आहवनीय आणि दक्षिणाग्नी आदि सर्व प्रकारचा अग्नि मीच आहे. ज्याच्या द्वारा यज्ञकर्म संपन्न होते ती हवन क्रिया मीच आहे. पितरांच्या निमित्त दान केले जाणारे अन्न स्वधा मीच आहे. सर्व प्राण्यांकडून जे भक्षण केले जाते ती औषधी मीच आहे. अशा प्रकारे सर्वत्र मीच ओतप्रोत भरलेला आहे.

**व्याकरणम् - अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **क्रतुः** - क्रतु पु.प्र.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **यज्ञः** - यज्ञ पु.प्र.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **औषधम्** - उष् प्र.ग.प.प.+घञ्+औष+धा+ कि+अण्=औषध न.प्र.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **मन्त्रः** - मन्त्र पु.प्र.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **आज्यम्** - आ+अञ्ज् द.ग.उ.प.+क्यप्,न लोप=आज्य न.प्र.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **अग्निः** - अग्नि पु.प्र.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **हुतम्** - हु तृ.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - स्वधा** - स्वधाशब्देन पितृभ्यो यत्क्रियते पार्वणश्राद्धादि तत्स्वधाशब्दितमहमेव स्वधा = स्वधा शब्दाने पितरांच्या करिता जे पार्वण श्राद्ध केले जाते ते स्वधा मी आहे**(वि.) मन्त्रः** - येन देवताभ्य: पितृभ्यश्च स्वाहास्वधान्तेन हविर्दीयते स मन्त्रोऽहमेव = ज्या स्वाहास्वधा मन्त्राने पितरांना हवि दिला जातो तो मंत्र मी आहे**(वि.) अग्निः -** यस्मिन् हूयते सोऽग्निरहमेव = ज्याच्यामध्ये हवन केले जाते तो अग्नि मी आहे**(वि.)**

**पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः ।**

**वेद्यं पवित्रमोङ्कार ऋक्साम यजुरेव च ॥१७॥**

**अन्वयः** - अहम्, अस्य, जगतः, पिता, माता, धाता, पितामहः, वेद्यम्, पवित्रम्, ओङ्कारः, ऋक्, साम, च, यजुः, एव ।

**अन्वयार्थः - अहम्, अस्य जगतः पिता** - मी या जगाचा उत्पन्न करणारा जनक आहे **माता** - जननी मी आहे

**धाता** - धारण पोषण करणारा मी आहे **पितामहः** - पित्याचा पिता मी आहे **वेद्यम्** - ब्रह्मादि ज्ञेय वस्तु मी आहे **पवित्रम्** - पावन करणारे यज्ञ यागादि पुण्य कर्म मी आहे **ओङ्कारः** - प्रणव मी आहे **ऋक्** - ऋग्वेद मी आहे **साम** - सामवेद मी आहे **चः** - आणि **यजुः एव** - यजुर्वेद मीच आहे.

**विवरण** - या जगाला धारण करणारा जनक आणि जननी मीच आहे. कर्माच्या फळाला देणारा मीच आहे. पित्याचा पिता मीच आहे. पवित्र ओंकार तसेच ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद मीच आहे. या जगामध्ये जेवढे काही पदार्थ आहेत ते सर्व माझेच स्वरूप असल्यामुळे माझ्या शिवाय कोणतीही वस्तू नाही की, त्याच्या मध्ये मी व्याप्त नाही म्हणजे संपूर्ण जगत माझेच स्वरूप आहे.

**व्याकरणम्** - **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **अस्य** - इदम् सर्व.पु.ष.ए.व. **जगतः** - जगत् न.ष.ए.व. **पिता** - पा+तृच्=पितृ पु.प्र.ए.व. **माता** - मान् द.ग.उ.प.+तृच् न लोप=मातृ स्त्री.प्र.ए.व. **धाता** - धा तृ.ग.उ.प.+तृच्=धातृ पु.प्र.ए.व. **पितामहः** - पितामह पु.प्र.ए.व. **वेद्यम्** - विद् द्वि.ग.प.प.कर्म.विध्यर्थ धा.वि.न.प्र.ए.व. **पवित्रम्** - पवित्र वि.न.प्र.ए.व. **ओङ्कारः** - ओङ्कार- पु.प्र.ए.व. **ऋक्** - ऋच् पु.प्र.ए.व. **साम** - सामन् न.पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **यजुः** - यज् प्र.ग.उ.प.+उसि=यजुस् न.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ.

**समासविग्रहार्थाः** - **पिता** - पाति-रक्षत्यपत्यमिति पिता = जो मुलाची रक्षा करतो असा तो पिता**(वि.) माता** - मन्यते पूज्यते या सा माता = मानली जाते पूजिली जाते जी ती माता**(वि.)वेद्यम्** - वेदितुम्-ज्ञातुं योग्यमिति वेद्यम् = जाणण्याकरिता योग्य ते वेद्य**(वि.) पितामहः** - पितुः पिता पितामहः = पित्याचा पितामह तो **(त.वि.) पवित्रम्** - पूयतेऽनेनेति पवित्रम्-शुद्धं पावनं वा = ज्याच्या द्वारा पवित्र केले जाते ते पवित्र म्ह. शुद्ध **(वि.)**

**गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ।**

**प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ॥१८॥**

**अन्वयः** - गतिः, भर्ता, प्रभुः, साक्षी, निवासः, शरणम्, सुहृत्, प्रभवः, प्रलयः, स्थानम्, निधानम्, अव्ययम्, बीजम् ।

**अन्वयार्थः** - **गतिः** - प्रकृती ज्या ठिकाणी विश्राम पावते ते परम धाम मीच आहे **भर्ता** - भरण पोषण करणारा मीच आहे **प्रभुः** - सर्वांचा स्वामी मीच आहे **साक्षी** - शुभाशुभ कर्मांना पाहणारा मीच आहे **निवासः** - सर्व प्राणिमात्रांचे निवासस्थान मीच आहे **शरणम्** - शरण जाण्यास योग्य मीच आहे **सुहृत्** - उलट उपकाराची अपेक्षा न करिता उपकार करणारा मीच आहे **प्रभवः** - जगाच्या उत्पत्तिचे कारण मीच आहे **प्रलयः** - जगाचा प्रलय करणारा मीच आहे **स्थानम्** - जगाच्या स्थितिचा आधार मीच आहे **निधानम्** - जगाचे निधान (राहण्याचे स्थान) मीच आहे आणि **अव्ययम्, बीजम्** - जगाचे अविनाशी बीज (कारण) मीच आहे.

**विवरण** - प्राप्त करण्यास योग्य परमगति मीच आहे. भरण पोषण करणारा तसेच सर्वांचा मालक मीच आहे. प्राणिमात्राकडून केले जाणारे पापपुण्यादि कर्माचे निरीक्षण करणारा द्रष्टा साक्षी मीच आहे. सर्व प्राणिमात्रांचे निवासस्थान तसेच शरण येण्याकरिता योग्य आणि प्रत्युपकाराची इच्छा न करता हित करणारा मीच आहे.

जगाचे उत्पत्तिस्थान, प्रलय करणारा आणि जगाची स्थिती करणारा मीच आहे. प्राणिमात्र राहण्याचे स्थान आणि त्यांचे अविनाशी कारण मीच आहे.

**व्याकरणम्** - **गतिः** - गति स्त्री.प्र.ए.व. **भर्ता** - भृ प्र./तृ.ग.उ.प.+तृच्=भर्तृ पु.प्र.ए.व. **प्रभुः** - प्रभु पु.प्र.ए.व. **साक्षी** - साक्षिन् वि.पु.प्र.ए.व. **निवासः** - नि+वस् प्र.ग.प.प.+घञ्=निवास पु.प्र.ए.व. **शरणम्** - शरण न.प्र.ए.व. **सुहृत्** - सुहृत्-द् पु.प्र.ए.व. **प्रभवः** - प्र+भू+अप्=प्रभव पु.प्र.ए.व. **प्रलयः** - प्र+ली+अच्=प्रलय पु.प्र.ए.व. **स्थानम्** - स्था+ल्युट्=स्थान न.प्र.ए.व. **निधानम्** - नि+धा+ल्युट्=निधान न.प्र.ए.व. **अव्ययम्** - अव्यय वि.न.प्र.ए.व. **बीजम्** - बीज न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **गतिः** - गम्यते-प्राप्यत इति गतिः = प्राप्त केली जाते ती गति**(वि.)** **निवासः** - निवसन्ति प्राणिनो यस्मिन्निति निवासः = ज्याच्या मध्ये प्राणी निवास करतात ते निवास मी आहे**(वि.)** **शरणम्** - शीर्यते-क्षीयते दुःखमस्मिन्निति शरणम् = नष्ट (क्षीण) दुःख होतात ज्याच्यामध्ये ते शरण मी आहे**(वि.)** **स्थानम्** - तिष्ठत्यस्मिन्निति स्थानम्-स्थितिः = ज्याच्या मध्ये राहिले जाते ते स्थान मी आहे**(वि.)** **निधानम्** - निधीयते सर्वमस्मिन्निति निधानम्-कार्यकारणप्रपञ्चाधिष्ठानमहमेव = ज्याच्यामध्ये सर्व स्थापित केले जाते म्ह. कार्यकारण प्रपंचाचे अधिष्ठान ते निधान मीच आहे**(वि.)** **प्रभवः** - प्रकर्षेण भवति सर्वमस्मादिति प्रभवः -सर्वजगत्सृष्टिकारणं यः सोऽहमेव = ज्याच्या द्वारा हे सर्व उत्पन्न होते तो प्रभव अर्थात् संपूर्ण जगताच्या सृष्टिचा जो कारण आहे तो मी आहे**(वि.)** **साक्षी** - साक्षादव्यवहितरूपेण द्योतनस्वरूपबोधेन च ईक्षते-पश्यति सर्वमिति साक्षी अथवा-साक्षाद् द्रष्टा साक्षी = साक्षात अव्यवहितरूपाने अथवा स्वरूपबोधाने जो सर्वांनना पहातो अथवा प्रत्यक्ष पाहणारा तो साक्षी मीच आहे - **प्रलयः** - सर्वस्य प्रकृष्टो लयो यस्मात् स प्रलयः-सर्वजगत्संहर्ताऽपि यः सोऽहमेव = सर्वांचा प्रकृष्टरूपाने लय ज्याच्यापासून होतो तो प्रलय म्ह. सर्व जगताचा संहारकर्ता तो मी आहे.**(वि.)**

**तपाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च ।**

**अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ॥१९॥**

**अन्वयः**- अर्जुन, अहम्, तपामि, अहम्, वर्षम्, निगृह्णामि, च, उत्सृजामि, अमृतम्, च, मृत्युः, एव, च, सत्, च, असत्, अहम् ।

**अन्वयार्थः** - **अर्जुन** - हे अर्जुना! **अहम्, तपामि** - मी सूर्यरूपाने उष्णता देतो **अहम्, वर्षम् निगृह्णामि** - मी पावसाचे आकर्षण करतो **च उत्सृजामि** - आणि मीच वृष्टी करतो **अमृतम्** - अमृत **च** - आणि **मृत्युः एव** - मृत्युही **सत्** - सत् **च** - आणि **असत्** - असत्सुद्धा **अहम्** - मी आहे.

**विवरण** - मी सूर्यरूपाने तापणारा पावसाचे आकर्षण करणारा तसेच वृष्टि करणारा मीच आहे. ज्याचे भक्षण केले असता मनुष्य मृत्युच्या आधीन न होता अमर होतो अशा प्रकारचे अमृत मीच आहे. सर्वांचा नाश (मृत्यु) करणारा काळ मीच आहे. ज्याचा केव्हाही अभाव होत नाही अशा अविनाशी आत्म्याला सत् म्हणतात.(अशा प्रकारचे सत् मीच आहे.) अनित्य नाशवान वस्तुचे नाव असत् आहे.(अशा प्रकारचे असत् मीच आहे.) कारण की, सत् आणि असत् या दोन्हींना पंधराव्या अध्यायामध्ये क्षर आणि अक्षर म्हटले आहे. यांनाच दुसऱ्या ठिकाणी परा आणि अपरा प्रकृती या नावाने संबोधित केले आहे. अशा या दोन्ही

प्रकृती भगवंताच्या अभिन्न असल्यामुळे भगवान म्हणतात की, सत् आणि असत् मीच आहे.

**व्याकरणम्** - **अर्जुन** - अर्जुन पु.संबो.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **तपामि** - तप् प्र.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **वर्षम्** - वर्ष पु.द्वि.ए.व. **निगृह्णामि** - नि+ग्रह् न.ग.उ.प.(प.प.)वर्त.प्र.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **उत्सृजामि** - उद्+सृज् ष.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **अमृतम्** - अमृत न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **सत्** - सत् वि.न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **मृत्युः** - मृत्यु पु.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **च** - च उभ.अ. **असत्** - असत् वि.न.प्र.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **असत्** - न सदित्यसत् = जे सत् नाही ते असत्**(वि.)** **अमृतम्** - न म्रियन्ते येन देवतास्तद मृतमहमेव = ज्याच्या योगाने देवता मरत नाहीत ते अमृत मी आहे**(वि.)** **मृत्युः -** म्रियन्ते प्राणिनो येन स मृत्युरहमेव = ज्याच्या योगाने प्राणी मरतात तो मृत्यु मी आहे**(वि.)**

स्वर्ग भोगाला कारण यज्ञादि कर्म करणाऱ्यांना पुनरागमनाचे वर्णन -

**त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते ।**

**ते पुण्यमासाद्य सुरेन्द्रलोकमश्नन्ति दिव्यान्दिवि देवभोगान् ॥२०॥**

**अन्वयः** - त्रैविद्याः, सोमपाः, पूतपापाः, माम्, यज्ञैः, इष्ट्वा, स्वर्गतिम्, प्रार्थयन्ते, ते, पुण्यम्, सुरेन्द्रलोकम्, आसाद्य, दिवि, दिव्यान्, देवभोगान्, अश्नन्ति ।

**अन्वयार्थः** - **त्रैविद्याः** - तीन वेदाला जाणणारे **सोमपाः** - सोमरसाचे पान करणारे **पूतपापाः** - त्या योगाने पापरहित झालेले **माम** - मला **यज्ञैः** - यज्ञाच्या द्वारा **इष्ट्वा** - पूजून **स्वर्गतिम्** - स्वर्ग प्राप्तिची **प्रार्थयन्ते** - प्रार्थना करतात(इच्छा करतात) **ते** - ते पुरुष **पुण्यम्, सुरेन्द्रलोकम्** - पुण्यांचे फलरूप स्वर्गलोकाला **आसाद्य** - हस्तगत करून(प्राप्त होऊन) **दिवि** - स्वर्ग लोकामध्ये **दिव्यान्, देवभोगान्** - दिव्य असे देवतांचे भोग त्या भोगांचा **अश्नन्ति** - भोग करतात.(त्या भोगाला भोगितात.)

**विवरण** - ते वेदाला जाणत असल्यामुळे तिंही वेदामध्ये वर्णित केलेली अनेक प्रकारची यज्ञाची विधि, त्यापासून प्राप्त होणारे फल, त्या फळाच्या इच्छेने सकाम कर्मे करणारे आणि सोमरसाचे पान करून निष्पाप-पापरहित शुद्ध झालेले शास्त्रविधिच्या अनुसार श्रद्धापूर्वक यज्ञाच्या द्वारा माझी पूजा करून स्वर्गाच्या प्राप्तिची इच्छा करतात. असे जे लोक इंद्रलोकाला प्राप्त होऊन त्या ठिकाणी असणाऱ्या अत्यंत श्रेष्ठ अशा दिव्य भोगांना भोगितात.

**व्याकरणम्** - **त्रैविद्याः** - त्रैविद्या वि.पु.प्र.ब.व. **सोमपाः** - सोमप पु.प्र.ब.व. **पूतपापाः** - पूञ् न.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि. पाप वि.पु.प्र.ब.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **यज्ञैः** - यज्ञ पु.तृ.ब.व. **इष्ट्वा** - यज् प्र.ग.उ.प.त्वान्त अ. **स्वर्गतिम्** - स्वर् अ. गति स्त्री.द्वि.ए.व. **प्रार्थयन्ते** - प्र+अर्थ द.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व. **ते** - तत् सर्व.पु.प्र.ब.व. **पुण्यम्** - पुण्य वि.न.द्वि.ए.व. **सुरेन्द्रलोकम्**- सुर पु. इन्द्र पु. लोक पु.द्वि.ए.व. **आसाद्य** - आ+सद् द.ग.उ.प.ल्यबन्त अ. **दिवि** - दिव् स्त्री.स.ए.व. **दिव्यान्** - दिव्य पु.द्वि.ब.व. **देवभोगान्** - देव पु. भोग पु.द्वि.ब.व. **अश्नन्ति** - अश् न.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **सोमपाः** - सोमयज्ञं संपाद्य तदवशिष्टं सोमरसं पिबन्ति ते सोमपाः = सोमयज्ञाचे संपादन करून सोम रसाचे पान करणारे**(उप.स.)** **पूतपापाः** - तेनैव सोमपानेन पूतम्-शुद्धम्,पापम्-कल्मषं येषां ते

पूतपापा: = सोमपानाच्या द्वारा पूत-शुद्ध झाले आहे पाप ज्यांचे ते पूतपापा**(ब.स.)** यद्वा **पूतपापा:** - सोमपानेन पूतानि निर्गतानि बहुविधानि पापानि येषां ते पूतपापा: = सोमपान केल्याने शुद्ध झाली म्ह. निघून गेली आहेत अनेकविध पापे ज्यांची ते पूतपापा**(ब.स.)** **सुरेन्द्रलोकम्** - सुराणाम्-देवानाम्, इन्द्र:-स्वामीति सुरेन्द्रस्तस्य लोकं सुरेन्द्रलोकम् = देवतांचा मालक जो इंद्र त्याच्या लोकाला**(ष.ग.ष.त.स.)** **देवभोगान्** - देवानां भोगा:, देवभोगास्तान् देवभोगान् = देवतांच्या भोगांना**(ष.त.स.)** **त्रैविद्या:** - ऋग्यजु:सामलक्षणा स्त्रिस्रश्च त्रिविद्यास्ता येऽधीयन्ते विदन्ति-जानन्ति ते त्रैविद्या: = ऋग्यजुसामरूप तीन विद्यानां जाणणारे **(कर्म.स.)**

**ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति ।**

**एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते ॥२१॥**

**अन्वय:** - ते, तम्, विशालम्, स्वर्गलोकम्, भुक्त्वा, पुण्ये, क्षीणे, मर्त्यलोकम्, विशन्ति, एवम्, त्रयीधर्मम्, अनुप्रपन्ना:, कामकामा:, गतागतम्, लभन्ते ।

**अन्वयार्थ: - ते -** ते त्रैविद्य पुरुष **तम्, विशालम्, स्वर्गलोकम्** - त्या विशाल स्वर्गलोकाला **भुक्त्वा** - भोग करून **पुण्यक्षीणे** - पुण्याचा क्षय झाला आसता **मर्त्यलोकम्** - मृत्यू लोकामध्ये **विशन्ति** - प्रवेश करतात **एवम्** - याप्रमाणे **त्रयीधर्मम्** - तीन वेदामध्ये कथित सकाम कर्माचा **अनुप्रपन्ना:** - आश्रय करणारे **कामकामा:** - तसेच विषय भोगांची इच्छा करणारे पुरुष **गतागतम्** - पुन:पुन: येणाऱ्या जाणाऱ्या (अवगमन) अवस्थेला **लभन्ते** - प्राप्त होतात.

**विवरण** - माझ्या तत्त्वाला म्हणजे स्वरूपाला न जाणणारे त्रैविद्य पुरुष केवळ विषय भोगांची कामना करणारे स्वर्गप्राप्तिकरिता शास्त्रविहित सकामकर्म आणि उपासनेचे अनुष्ठान करून मृत्युलोकाच्या पेक्षा स्वर्गामध्ये कामधेनू, चिंतामणि, अप्सरा आणि अमृताची कोठारे आहेत. अशा स्वर्गातल्या अनेक प्रकारच्या दिव्य विशाल भोगांना जो पर्यंत पुण्याचा संचय आहे तो पर्यंत भोगतात आणि पुण्यसंचय समाप्त झाला कि पुन्हा मृत्युलोकामध्ये येतात. या प्रमाणे स्वर्गाचे साधनरूपी तिंही वेदामध्ये सांगितलेल्या सकाम कर्माचे अनुष्ठान करणारे तसेच भोगाची कामना करणारे सकाम पुरुष पुन्हा पुन्हा अवागमनाला प्राप्त होतात.

**व्याकरणम्** - **ते** - तत् सर्व.प्र.ब.व. **तम्** - तत् सर्व.द्वि.ए.व. **भुक्त्वा** - भुज् स.ग.उ.प.(आ.प.)त्वान्त अ. **पुण्ये** - पुण्य न.स.ए.व. **क्षीणे** - क्षि प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.स.ए.व. **मर्त्यलोकम्** - मर्त्य वि.पु. लोक पु.द्वि.ए.व. **विशन्ति** - विश् ष.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **एवम्** - एवम् क्रि.वि.अ. **त्रयीधर्मम्** - त्रयी वि. धर्म पु.द्वि.ए.व. **अनुप्रपन्ना:** - अनु+प्र+पद् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **कामकामा:** - काम वि. काम पु.प्र.ब.व. **गतागतम्** - गम् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. आगत वि.न.द्वि.ए.व. **लभन्ते** - लभ् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था: - स्वर्गलोकम् -** स्वर्गस्य लोकस्तं स्वर्गलोकम् = स्वर्गाचे लोक**(ष.त.स.)** **मर्त्यलोकम्** - मर्त्यानाम्-मनुष्याणां लोकस्तमिति मर्त्यलोकम् = मृत्युलोकाचे लोक**(ष.त.स.)** **गतागतम्** - गतश्चाऽऽगतश्च गतागतम्-गमनागमनं वा यातायातम् = जाणाऱ्या येणाऱ्या अवस्थेला**(द्व.स.)** **कामकामा:** - कामान्-दिव्यभोगान् कामयन्ते-प्रार्थयन्त इति कामकामा:-विषयकामुका: = विषय भोगाला-कामनेला इच्छिणारे

प्रार्थना करणारे**(उप.स.)**यद्वा **कामकामा:** - कामान् कामयन्ते-काम्यन्त इति कामा:, कामानां कामा:-इच्छा इति कामकामा: = इच्छा केली जाते ते काम-विषय त्या भोगांची इच्छा करणारे**(ष.त.स.)**

निष्काम भावाने नित्य निरंतर चिंतन करणाऱ्या भक्तांचा योगक्षेम भगवान स्वत: वाहण्याची प्रतिज्ञा करतात -

**अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जना: पर्युपासते ।**

**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥२२॥**

**अन्वय:** - अनन्या:, चिन्तयन्त:, ये, जना:, माम्, पर्युपासते, तेषाम्, नित्याभियुक्तानाम्, अहम्, योगक्षेमम्, वहामि ।

**अन्वयार्थ:** - **अनन्या: चिन्तयन्त:** - अनन्य भावाने माझे निरंतर चिंतन करणारे **ये** - जे **जना:** - पुरुष **माम्** - मला (परमेश्वराला) **पर्युपासते** - सर्व प्रकारे भजतात **तेषाम्, नित्याभियुक्तानाम्** - त्या सदा सर्वदा ध्यान करणाऱ्या पुरुषांचा **अहम्** - मी **योगक्षेमम्** - योगक्षेम **वहामि** - वहन करतो.

**विवरण** - या सकामी पुरुषाच्या व्यतिरिक्त जे भगवंताचे अनन्य भक्त आहेत त्यांना या जगतीतलामध्ये माझ्याशिवाय दुसरे काहीच दिसत नाही. सर्वत्र मीच परिपूर्ण रूपाने भरलेला आहे असे त्यांच्या दृष्टिसमोर असते. संसारामध्ये जेवढे काही नाना प्रकारचे भोग आहेत त्या भोगांपासून त्यांचे चित्त विभक्त होऊन केवळ भगवंताच्या ठिकाणी स्थिर झालेले असते. त्यांना त्याशिवाय दुसरी उपास्य देवताच दिसत नाही. त्यालाच परम आश्रय, परम गति आणि परम प्रेमास्पद मानतात. असे अनन्य भक्तजन माझी सर्व प्रकारांनी उपासना करतात. त्या सदा सर्वदा ध्यान करणाऱ्या भक्तजनांचा मी योगक्षेम वहन करतो.

**व्याकरणम्** - **अनन्या:** - अनन्य वि.पु.प्र.ब.व. **चिन्तयन्त:** - चिन्त् द.ग.उ.प.(प.प.)+णिच्+कर्त.शतृ वि.पु.प्र.ब.व. **ये** - यत् सर्व.पु.प्र.ब.व. **जना:** - जन पु.प्र.ब.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **पर्युपासते** - परि+उप+आस् द्वि.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व. **तेषाम्** - तत् सर्व.पु.ष.ब.व. **नित्याभियुक्तानाम्** - नित्य वि. अभि+युज् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.ष.ब.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **योगक्षेमम्** - योग पु. क्षेम पु. द्वि.ए.व. **वहामि** - वह् प्र.ग.उ.प.(प.प.)वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अनन्या:** - नास्त्यन्यो मद्व्यतिरिक्तो लौकिकोऽलौकिक-पदार्थ: देवतान्तरो वा येषां ते अनन्या: = नाही माझ्या व्यतिरिक्त लौकिक अलौकिक पदार्थ किंवा देव ज्यांचे ते**(ब.स.)** यद्वा **अनन्या:** - न विद्यते मद्व्यतिरिक्तो विषयस्त्वहमिदंबुद्धेश्च येषां ते अनन्या: = ज्यांचा अहंबुद्धी आणि इदंबुद्धिचा माझ्या शिवाय दुसरा विषय नाही ते अनन्य**(ब.स.)** **नित्याभियुक्तानाम्** - नित्यं-निरंतरमभियुक्ता:-समाहित चित्तास्तेषां नित्याभियुक्तानाम् = नित्य-सर्वदा अभियुक्त-समाहितचित्त असणाऱ्यांचा**(द्वि.त.स.)** **योगक्षेमम्** - योगश्च अप्राप्तस्याऽपेक्षितस्य वस्तुन: प्रापणं योग:-स्थितस्य परिपालनं क्षेम: योगश्च क्षेमश्च अनयो: समाहारो योगक्षेमम् = अपेक्षित अप्राप्त वस्तुचे प्राप्त करणे योग आणि स्थिताचे परिपालन क्षेम असा योगक्षेम**(समाहार द्व.स.)** **चिन्तयन्त:** - चिन्तयन्ति ते चिन्तयन्त:-ध्यायन्त: = चिंतन करणारे**(वि.)**

अन्य देवतांच्या उपासनेचे प्रकारांतराने अविधिपूर्वक आपली उपासना दाखविणे -

**येऽप्यन्यदेवताभक्ता यजन्ते श्रद्धयान्विता: ।**

**तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकम् ॥२३॥**

**अन्वयः** - श्रद्धया, अन्विताः, ये, अन्यदेवताभक्ताः, अपि, यजन्ते, ते, अपि, कौन्तेय, माम्, एव, अविधिपूर्वकम्, यजन्ति ।

**अन्वयार्थः - श्रद्धया अन्विताः** - श्रद्धेने युक्त असलेले **ये अन्यदेवताभक्ताः अपि** - जे सकाम अन्यदेवतेचे भक्त सुद्धा **यजन्ते** - त्या दुसऱ्या देवतांची उपासना करतात **ते अपि** - ते देखील **कौन्तेय** - हे अर्जुना! **माम्, एवम्** - माझेच **अविधिपूर्वकम्** - अज्ञानपूर्वक **यजन्ति** - पूजन करतात.(भजन करतात.)

**विवरण** - यद्यपि शास्त्रोक्त विधिने यज्ञादि कर्म द्वारा जे लोक श्रद्धेने दुसऱ्या देवतेचे पूजन करतात. परंतु, ते सुद्धा माझेच अविनाशी परमात्म्याचे पूजन आहे असे त्यांचे ते पूजन अविधिपूर्वक म्हणजे अज्ञानपूर्वक आहे. कारण, मी परमात्माच त्या देवतेच्या रूपाने प्रगट असतो पण असे न जाणता त्या देवतेला माझ्या परमेश्वराहून भिन्न समजून त्यांची पूजा करतात त्यामुळे त्यांचे ते आराधन अज्ञानपूर्वक आहे.

**व्याकरणम् - श्रद्धया** - श्रद्धा स्त्री.तृ.ए.व. **अन्विताः** - अनु+इ द्वि.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **य** - यत् सर्व.पु.प्र.ब.व. **अन्यदेवताभक्ताः** - अन्य वि. देवता पु. भज् प्र.ग.उ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **अपि** - अपि अ. **यजन्ते** - यज् प्र.ग.उ.प.(आ.प.)वर्त.तृ.पु.ब.व. **ते** - तत् सर्व.पु.प्र.ब.व. **अपि** - अपि अ. **कौन्तेय** - पु.संबो.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **अविधिपूर्वकम्** - अ+विधि पु. पूर्वक वि.न.द्वि.ए.व. **यजन्ति** - यज् प्र.ग.उ.प.(प.प.) लट् वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - अन्येदवताभक्ताः** - अन्याश्च ता देवताश्च अन्यदेवता अन्य-देवतानां भक्ता इति अन्यदेवताभक्ताः = अन्य देवतांचे भक्त**(क.स.ग.ष.त.स.)** यद्वा **अन्येदवताभक्ताः** - अन्यासु देवतासु भक्ता इत्यन्यदेवताभक्ताः = अन्यदेवतांचेठायी भक्ति ठेवणारे असे अन्यदेवताभक्त**(स.त.स.) अविधिपूर्वकम्** - न विधिपूर्वकमित्यविधिपूर्वकम् = जे विधिपूर्वक नाही ते अविधिपूर्वक**(न.त.स.)** यद्वा **अविधिपूर्वकम्** - न विधिरविधिः, अविधिः पूर्वो यत्र इत्यविधिपूर्वकस्तमविधिपूर्वकम् = नाही विधि ती अविधि, अविधि प्रथम आहे ज्या ठिकाणी तो अविधिपूर्वक त्याला**(न.त.स.)** यद्वा **अविधिपूर्वकम्** - न विद्यते विधिर्विध्यर्थज्ञानं च यत्र तदविध्यज्ञानं तत्पूर्वकं यजन्तीत्यविधिपूर्वकम् = ज्याच्यामध्ये विधि आणि विधिचे अर्थाचे ज्ञान नाही ती अविधि म्ह. अज्ञानता पूर्वक**(न.स.)**

भगवंताला तत्त्वाने न जाणणाऱ्यांचे पतन -

**अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च ।**

**न तु मामभिजानन्ति तत्त्वेनातश्च्यवन्ति ते ॥२४॥**

**अन्वयः** - हि, सर्वयज्ञानाम्, अहम्, भोक्ता, च, प्रभुः, एव, च, तु, ते, माम्, तत्त्वेन, न, अभिजानन्ति, अतः, च्यवन्ति ।

**अन्वयार्थः - हि** - कारण **सर्वयज्ञानाम्** - संपूर्ण यज्ञांचा **अहम् -** मीच **भोक्ता** - भोग करणारा **च** - आणि **प्रभुः एव च** - प्रभुच आहे **तु** - परंतु **ते** - दुसऱ्या देवतांची उपासना करणारे ते भक्त **माम्** - मला **तत्त्वेन** - वास्तविक रूपाने **न अभिजानन्ति -** जाणत नाहीत **अतः** - म्हणून **च्यवन्ति -** मोक्ष्यापासून च्यूत होतात. (म्हणजे मोक्षाला प्राप्त न होता पुनर्जन्माला प्राप्त होतात.)

**विवरण** - श्रौत, स्मार्त, जेवढे काही यज्ञ सांगितले आहेत त्या संपूर्ण यज्ञांचा भोक्ता मीच आहे. मीच योगशक्तिच्या द्वारा संपूर्ण जगाची उत्पत्ति स्थिति आणि प्रलय करून सर्वांना यथायोग्य नियमाने चालवितो आणि इंद्र, वरूण, यमराज, प्रजापति आदि जेवढे काही लोकपाल आणि देवतागण आहेत, त्या सर्वांचा मी नियन्ता असल्यामुळे मीच सर्वांचा स्वामी (प्रभु) आहे. परंतु, तत्त्वाने जाणत नसल्यामुळे ते मुख्यफलापासून म्हणजे मोक्षापासून च्यूत होतात अर्थात पुनर्जन्माला प्राप्त होतात.

**व्याकरणम्** - **हि** - हि क्रि.वि.अ. **सर्वयज्ञानाम्** - सर्व वि. यज्ञ पु.ष.ब.व. **अहम्** - अस्मत् सर्व.पु.प्र.ए.व. **भोक्ता** - भुज् स.ग.प.प.+तृच्=भोक्तृ वि.पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **प्रभुः** - प्रभु पु.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **च** - च उभ.अ. **तु** - तु उभ.अ. **ते** - तत् सर्व.पु.प्र.ब.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **तत्त्वेन** - तत्त्व न.तृ.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अभिजानन्ति** - अ+ज्ञा न.ग.उ.प.(प.प.)वर्त.तृ.पु.ब.व. **अतः** - अतस् अ. **च्यवन्ति** - च्यु प्र.ग.आ.प.(प.प.)वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **सर्वयज्ञानाम्** - सर्वे च ते यज्ञाश्च सर्वयज्ञास्तेषां सर्वयज्ञानाम्-श्रौतस्मार्तकर्मणाम् = (सर्व यज्ञांचा) म्ह. श्रौत स्मार्त कर्मांचा भोक्ता**(क.त.स.) भोक्ता -** भुङ्क्ते इति भोक्ता अथवा भुङ्क्ते हविर्भोगानिति भोक्ता = जो खातो तो भोक्ता म्ह. हविर्भोगाला भक्षण करणारा तो भोक्ता**(वि.)**

उपासनेप्रमाणे फल प्राप्तिचे कथन -

**यान्ति देवव्रता देवान्पितॄन्यान्ति पितृव्रताः ।**

**भूतानि यान्ति भूतेज्या यान्ति मद्याजिनोऽपि माम् ॥२५॥**

**अन्वयः** - देवव्रताः, देवान्, यान्ति, पितृव्रताः, पितॄन्, यान्ति, भूतेज्याः, भूतानि, यान्ति, च, मद्याजिनः, अपी, माम्, यान्ति ।

**अन्वयार्थः** - **देवव्रताः** - देवांचे भजन (पूजन) करणारे **देवान्** - देवानांच **यान्ति** - प्राप्त होतात **पितृव्रताः** - पित्रांचे पूजन करणारे **पितॄन्** - पितर लोकाला **यान्ति** - प्राप्त होतात **भूतेज्याः** - भूतांची पूजा करणारे **भूतानि** - विनायक मातृगण इत्यादी भूतगणास **यान्ति** - प्राप्त होतात **च** - आणि **मद्याजिनः** - माझी उपासना करणारे **अपी** - सुद्धा **माम्** - मलाच **यान्ति** - प्राप्त होतात.

**विवरण** - शास्त्रोक्त विधिने देवतेची पूजा करणारे, त्या पूजेकरिता सांगितलेले जे नियम त्या नियमाचे पालन, त्या निमित्त यज्ञाचे अनुष्ठान, त्या निमित्त मंत्राचा जप, त्या निमित्त ब्राह्मण भोजन करून देवतेची पूजा करणारे ते त्याच देवतेला प्राप्त होतात. पितराचे पूजन करणारे पितर लोकाला प्राप्त होतात. भूताची पूजा करणारे भूतयोनिला प्राप्त होतात आणि माझी पूजा करणारे पुनर्जन्माला प्राप्त न होता मलाच प्राप्त होतात.

**व्याकरणम्** - **देवव्रताः** - देव पु. व्रत (न.)पु.प्र.ब.व. **देवान्** - देव पु.द्वि.ब.व. **यान्ति** - या द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **च** - च उभ.अ. **पितृव्रताः** - पितृ पु. व्रत (न.)पु.प्र.ब.व. **पितॄन्** - पितृ पु. द्वि.ब.व. **यान्ति - या** द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **भूतेज्याः** - भू प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. इज्य पु.प्र.ब.व. **भूतानि** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.द्वि.ब.व. **यान्ति** - या द्वि.ग.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **च** - च उभ.अ. **मद्याजिनः** - मत् अस्मत् सर्व.द्वि.ए.व. याजिन् वि.पु.प्र.ब.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **अपि** - अपि अ. **यान्ति** - या द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - देवव्रताः** - देवेषु-इन्द्रादिषु व्रतम्-यज्ञदानादि नियमो येषां ते देवव्रताः = इंद्रादि देवतांच्या ठिकाणी व्रत-यज्ञदानादि नियम आहे ज्यांचे ते**(व्यधि.ब.स.)** यद्वा **देवव्रताः** - शिवविष्ण्वादिषु व्रतं-जपपूजोपवासादिनियमो येषां ते देवव्रताः = शिवविष्ण्वादिकांच्या ठिकाणी व्रत-जप, पूजा, उपवासादि नियम आहेत ज्यांचे ते**(व्यधि.ब.स.) पितृव्रताः -** पितृषु व्रतं-श्राद्धभूरिभोजनादिनियमो येषां ते पितृव्रताः-पितृपूजकाः = पितरांच्या ठिकाणी व्रत-श्राद्ध, अनेक प्रकारचे भोजन करण्याचे नियम आहेत ज्यांचे ते**(व्यधि.ब.स.) भूतेज्याः** - भूतानि-विनायकवेतालक्षेत्रपालादयस्तानि जपहोमबल्यादिभिर्ये यजन्ति ते भूतेज्याः = भूतांना-विनायक वेताल क्षेत्रपाल इत्यादिकांना जप, होम, बलि इत्यादिकांच्या द्वारा जे यजन करतात ते भूतेज्य**(उप.स.) मद्याजिनः** - मां यष्टुं शीलं येषां ते मद्याजिनः = मला पूजन करण्याचे शील आहे ज्यांचे ते मद्याजी **(शीलार्थो ब.स.)**

भक्तिपूर्वक अर्पण केलेले पत्रपुष्पादिकाला खाण्याकरिता भगवंताची प्रतिज्ञा -

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।**

**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥२६॥**

**अन्वयः** - यः, पत्रम्, पुष्पम्, फलम्, तोयम्, मे, भक्त्या, प्रयच्छति, अहम्, प्रयतात्मनः, भक्त्युपहृतम्, तत्, अश्नामि ।

**अन्वयार्थः - यः** - जो **पत्रम्** - पान **पुष्पम्** - फूल **फलम्** - फळ **तोयम्** - पाणी **मे** - मला **भक्त्या** - भक्तिने (प्रेमाने) **प्रयच्छति** - समर्पित करतो **अहम्** - मी **प्रयतात्मनः** - त्या शुद्धभक्तांचे **भक्त्युपहृतम्** - श्रद्धेने अर्पण केलेल्या **तत्** - त्या पत्रपुष्पादिकाला **अश्नामि** - स्वीकार करतो.(ग्रहण करतो.)

**विवरण** - जो भक्त अनन्य भावाने श्रद्धायुक्त होऊन माझी भक्ति करतो तो ब्राह्मण क्षत्रिय, वैश्य, शुद्र, चाण्डाल अथवा कोणत्याही प्रकारचा भक्त असो, तो जर मला श्रद्धा भक्तिने पत्र, पुष्प, फल, पाणी आदि अर्पण करतो त्या शुद्धचित्त पुरुषाचे निष्काम भावाने अर्पण केलेले ते पत्र पुष्पादि मी प्रेमाने ग्रहण करतो. कारण, माझी भक्ति करण्याकरिता बल, रूप, धन, आयुष्य, जाति, गुण आणि विद्या पाहिजे असे काही नाही. यापैकी एकही जरी नसले तरी चालेल. परंतु, त्या भक्ताने केवळ शुद्ध भावाने काही जरी अर्पण केले तरी त्या वस्तुचे मी प्रेमाने ग्रहण करतो.

**व्याकरणम् - यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **पत्रम्** - पत्र न.द्वि.ए.व. **पुष्पम्** - पुष्प् च.ग.प.प.+अच्=पुष्प न. द्वि.ए.व. **फलम्** - फल न.द्वि.ए.व. **तोयम्** - तोय न.द्वि.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.च.ए.व. **भक्त्या** - भक्ति स्त्री.तृ.ए.व. **प्रयच्छति** - प्र+दा(यच्छ्)प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **प्रयतात्मनः** - प्र+यम् द.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. आत्मन् पु.ष.ए.व. **भक्त्युपहृतम्** - भक्ति स्त्री. उप+हृ प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.द्वि.ए.व. **तत्** - तत् सर्व.द्वि.ए.व. **अश्नामि** - अश् न.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः = भक्त्युपहृतम्** - भक्त्या-श्रद्धया उपहृतम्-दत्तम्-अर्पितमिति भक्त्युपहृतम् = भक्तिच्या द्वारा उपहृत (समर्पित) केलेल्याला **(तृ.त.स.) पत्रम्** - पततीति पत्रम् = पडते ते पत्र**(वि.)**

सर्व कर्म भगवदर्पण करण्याची आज्ञा आणि त्याचे फल स्वतःची प्राप्ति दाखविणे -

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।**

**यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥२७॥**

**अन्वयः** - कौन्तेय, यत्, करोषि, यत्, अश्नासि, यत्, जुहोषि, यत्, ददासि, यत्, तपस्यसि, तत्, मदर्पणम्, कुरुष्व।

**अन्वयार्थः - कौन्तेय** - हे कुंतीपुत्र अर्जुना! **यत्, करोषि** - तू जे कर्म करतोस **यत्, अश्नासि** - जे खातोस **यत्, जुहोषि** - जे हवन करतोस **यत्, ददासि** - जे दान देतोस **यत्, तपस्यसि** - जे तप करतोस **तत्** - ते सर्व **मदर्पणम्, कुरुष्व** - मला अर्पण कर.

**विवरण** - साधारण मनुष्याची कर्म करण्यामध्ये आसक्ति, ममता आणि फलाची सकाम भावना असल्यामुळे त्याच्याकडून कोणतेही कर्म भगवंताला अर्पण होत नसल्यामुळे तो केव्हाही बंधनापासून मुक्त होत नाही. म्हणून भगवान म्हणतात की, हे अर्जुना! यज्ञ, दान, तप आणि त्याच्या अतिरिक्त जें काही जीवन निर्वाहाकरिता केले जाणारे वर्ण आश्रम आणि लोक व्यवहाराचे कर्म तसेच भगवंताचे भजन, पूजन, ध्यान आदि जे काही शास्त्रीय कर्म आहेत ते सर्व मला अर्पण कर.

**व्याकरणम्** - **कौन्तेय** - कौन्तेय पु.संबो.ए.व. **यत्** - यत् सर्व.न.द्वि.ए.व. **करोषि** - कृ अ.ग.उ.प.(प.प.) वर्त.द्वि.पु.ए.व. **यत्** - यत् सर्व.न.द्वि.ए.व. **अश्नासि** - अश् न.ग.प.प.वर्त.द्वि.पु.ए.व. **यत्** - यत् सर्व.न. द्वि.ए.व. **जुहोषि** - हु तृ.ग.प.प.वर्त.द्वि.पु.ए.व. **यत्** - यत् सर्व.न.द्वि.ए.व. **तपस्यसि** - तपस् नामधातु लट् प.प.'३/१/१५ इति सूत्रेण क्यङ्' द्वि.पु.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.द्वि.ए.व. **मदर्पणम्** - मत् अस्मत् सर्व.च.अ.स.ए.व. अर्पणम् न.द्वि.ए.व. **कुरूष्व** - कृ अ.ग.उ.प.(प.प.)आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **मदर्पणम्** = मह्यं अथवा मयि अर्पणं मदर्पणम् = माझ्याकरिता अथवा माझ्याठिकाणी अर्पण मदर्पण**(च.अ.स.त.स.)**

**शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबन्धनैः।**

**सन्न्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ॥२८॥**

**अन्वयः** - एवम्, शुभाशुभफलैः, कर्मबन्धनैः, मोक्ष्यसे, संन्यासयोगयुक्तात्मा, विमुक्तः, माम्, उपैष्यसि।

**अन्वयार्थः** - **एवम्** - या प्रमाणे (करू लागला म्हणजे) **शुभाशुभफलैः** - चांगल्या वाईट फलरूप **कर्मबन्धनैः** - कर्मबंधनाकडून **मोक्ष्यसे** - मुक्त होशील आणि **सन्न्यासयोगयुक्तात्मा** - संन्यास आणि योग यांनी ज्याचे चित्त युक्त आहे असा तू **विमुक्तः** - मुक्त झालास म्हणजे **माम्** - मला **उपैष्यसि** - प्राप्त होशील.

**विवरण** - उपर्युक्त श्लोकांत सांगितल्याप्रमाणे जर मला संपूर्ण कर्म अर्पण केले तर तू शुभ-अशुभ (स्वर्ग नरकादि) कर्मबंधनापासून (पुनर्जन्म आणि सुखदुःखाच्या भोगापासून) सर्वथा मुक्त होशील. कारण, जसे अशुभ कर्म बंधनकारक आहे त्याचप्रमाणे शुभ कर्म सुद्धा फलाभिलाषाने युक्त होऊन केले तर ते देखील बंधनाला कारण होते. म्हणून भगवान म्हणतात की, ज्याचे चित्त संन्यास आणि योग या दोन्हीने युक्त आहे असा तू मुक्त झालास म्हणजे शुभाशुभ कर्मापासून मुक्त होऊन मलाच प्राप्त होशील.

**व्याकरणम्** - **एवम्** - एवम् क्रि.वि.अ. **शुभाशुभफलैः** - शुभ वि.न. अशुभ वि.न. फल न.तृ.ब.व. **कर्मबन्धनैः** - कर्मन्+बन्धन न.तृ.ब.व. **मोक्ष्यसे** - मुच् ष.ग.उ.प.(आ.प.)द्वि.भवि.द्वि.पु.ए.व. **विमुक्तः** -

वि+मुच् ष.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **सन्न्यासयोगयुक्तात्मा** - संन्यास पु. योग पु. युज् च.(द.) ग.आ.प.कर्त.भू.धा.वि. आत्मन् पु.प्र.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **उपैष्यसि**- उप+इ द्वि.ग.प.प. द्वि.भवि.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - शुभाशुभफलैः** - शुभानि च-कल्याणरूपाणि च, अशुभानि च-अकल्याणरूपाणिचेति शुभाशुभानि, शुभाशुभानि च तानि फलानीति शुभाशुभफलानि तैः शुभाशुभफलैः = शुभ आणि अशुभ फलांच्या द्वारा**(द्वं.ग.कर्म.त.स.) सन्न्यासयोगयुक्तात्मा** - सन्न्यासश्च-कर्माभिनिवेशफलत्यागश्च, योगश्चेति सन्न्यासयोगौ ताभ्यां युक्तः-समन्वित आत्मा-अन्तःकरणं यस्य स सन्न्यासयोगयुक्तात्मा = संन्यास आणि योग यांच्या द्वारा युक्त आहे आत्मा अंतःकरण ज्याचे तो**(द्वं.ग.तृ.ग.ब.स.) कर्मबन्धनैः** - कर्माणि एव बन्धनानि कर्मबन्धनानि तैः कर्मबन्धनैः। **यद्वा** कर्माणि पुण्यापुण्यमिश्ररूपाणि सञ्चितादीनि तान्येव पुरुषो जन्मा दिभिर्बध्यते यैस्तानि कर्मबन्धनानि तैः कर्मबन्धनैः = कर्मे ही बंधकारक आहेत त्या कर्मबंधनाकडून अथवा कर्मे-पुण्यापुण्य मिश्ररूप सञ्चितादि त्या कर्मांनीच पुरुष जन्मादिच्या द्वारा बांधला जातो तेच कर्मबंधन आहे त्या कर्मबंधनाकडून**(द्वं.ग.तृ.ग.ब.स.)**

**समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः।**

**ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम्॥२९॥**

**अन्वयः** - अहम्, सर्वभूतेषु, समः, मे, द्वेष्यः, न, अस्ति, प्रियः, न, अस्ति, तु, ये, माम्, भक्त्या, भजन्ति, ते, मयि, च, अहम्, अपि, तेषु।

**अन्वयार्थः - अहम्** - मी **सर्वभूतेषु** - सर्वभूतांच्या ठिकाणी **समः** - समान आहे **मे** - माझा **द्वेष्य** - द्वेष करणारा **न अस्ति** - कोणी नाही व **प्रियः न (अस्ति)** - प्रेमपात्र कोणी नाही **तु** - परंतु **ये** - जे **माम्** - मला (ईश्वराला) **भक्त्या** - श्रद्धेने **भजन्ति** - भजतात **ते** - ते **मयि** - माझ्या ठिकाणी आहे **च** - आणि **अहमपि** - मीही **तेषु** - त्यांच्यामध्ये आहे.

**विवरण -** मी अंतर्यामीरूपाने संपूर्ण भूतामध्ये ब्रह्मदेवापासून तर स्तंबापर्यंत सर्व प्राणिमात्रामध्ये समभावाने व्याप्त आहे. त्या मुळे मला कोणत्याहि प्राण्याविषयी राग आणि द्वेष नाही. कारण, ते त्यांच्या त्यांच्या शुभाशुभ कर्मानुसार चांगले वाईट फल भोगतात. (म्हणून) वास्तविक पाहिले तर माझा कोणी प्रिय नाही आ णि त्याच प्रमाणे माझा कोणी अप्रिय नाही. माझ्या दृष्टिने सर्व प्राणिमात्र मला समान आहेत. परंतु, हे अर्जुना! ते मला श्रद्धा भक्तिने भजतात. ते माझ्यामध्ये असतात आणि मी त्यांच्यामध्ये असतो. म्हणजे ते माझे हृदय आणि मी त्यांचे हृदय आहे. ते माझ्याशिवाय कोणाला जाणत नाहीत आणि मी त्यांच्या शिवाय कोणाला जाणत नाही.

**व्याकरणम् - अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **सर्वभूतेषु** - सर्व वि.भू.प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.स.ब.व. **समः** - सम वि.पु.प्र.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **द्वेष्यः** - द्विष् द्वि.ग.उ.प.कर्म.ण्यत्=द्वेष्य वि.पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **प्रियः** - प्रिय वि.पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अस्ति** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **तु** - तु उभ.अ. **ये** - यत् सर्व.पु.प्र.ब.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **भक्त्या** - भक्ति स्त्री.तृ.ए.व. **भजन्ति** - भज् प्र.ग.उ.प.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **ते** - तत् पु.प्र.ब.व. **मयि** - अस्मत्

सर्व.स.ए.व. **अपि** - अपि अ. **तेषु** - तत् सर्व.पु.स.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **सर्वभूतेषु** - सर्वाणि च तानि भूतानि च सर्वभूतानि तेषु सर्वभूतेषु-ब्रह्मादिमशकान्तेषु = ब्रह्मादिपासून तर मशकादि पर्यंत सर्वभूतांमध्ये**(कर्म.स.)** **द्वेष्य:** - द्वेष्टुं योग्य: द्वेष्य:-द्वेषविषय: = द्वेष करण्याकरिता योग्य**(कृ.वि.)**

दुराचारी असून सुद्धा दृढनिश्चय अनन्यभावयुक्त भगवद्भजन करण्याचे महत्व -

**अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।**

**साधुरेव स मन्तव्य: सम्यग्व्यवसितो हि स: ॥३०॥**

**अन्वय:** - चेत्, सुदुराचार:, अपि, अनन्यभाक्, माम्, भजते, स:, साधु:, एव, मन्तव्य:, हि, स:, सम्यक्, व्यवसित: ।

**अन्वयार्थ:** - **चेत्** - जर कदाचित **सुदुराचार: अपि** - अत्यंत दुराचारी मनुष्य देखील **अनन्यभाक्** - अनन्यभावाने **माम्** - मला **भजते** - भजत असला तर **स:** - तो **साधु: एव** - साधूच **मन्तव्य:** - मानला पाहिजे **हि** - कारण **स: -** तो पुरुष **सम्यक्** - उत्तम प्रकारे **व्यवसित:** - त्याचा निश्चय झालेला असतो की भगवंताच्या भजनाशिवाय या जगतामध्ये दुसरे काहीही एक चांगले नाही.

**विवरण** - सदाचारी आणि साधारण पापी मनुष्य माझे भजन करून मुक्त होईलच या मध्ये काही एक मात्र संदेह नाही. परंतु, ज्याचे अंत:करण अत्यंत दुषित आहे, जे करणे योग्य नाही असे महान पाप ज्या पुरुषाने केले आहे असा अत्यंत दुराचारी पुरुष सुद्धा श्रद्धा भक्ति तसेच अनन्यभावाने युक्त होऊन माझे भजन करतो. त्याला सुद्धा सदाचरण संपन्न युक्त आहे असे मानले पाहिजे. कारण, त्या पुरुषाने आपल्या अंत:करणामध्ये चांगल्या प्रकारे निश्चय केला आहे की, भगवंताच्या भजनाशिवाय दुसरे काहीही प्राप्त करणे योग्य-श्रेय नाही.

**व्याकरणम्** - **चेत्** - चेत् अ. **सुदुराचार:** - सु+दुराचार वि.पु.प्र.ए.व. **अपि** - अपि अ. **अनन्यभाक्** - अन्+अन्य अनन्य वि. भाज् वि.पु.प्र.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **भजते** - भज् प्र.ग.उ.प.(आ.प.) तृ.पु.ए.व. **स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **साधु:** - साधु वि.पु.प्र.ए.व. **गन्तव्य:** - मन् च.ग.आ.प.कर्म.विध्यर्थ धा.वि.पु.प्र.ए.व. **हि** - हि क्रि.वि.अ. **स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **सम्यग्व्यवसित:** - सम्यक् वि.पु.प्र.ए.व. वि+अव+सो च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **सुदुराचार:** - सुतराम्-जातितो वर्णत: क्रियातो वा स्वभावतो वाऽत्यन्तदुष्ट आचारो वृत्तं यस्य स सुदुराचार: = चांगल्या प्रकारे जातिने, वर्णाने, क्रियेने अथवा स्वभावाने अत्यंत दुष्ट आचरण आहे ज्याचे तो सुदुराचार**(ब.स.)** यद्वा **सुदुराचार:** - सुष्ठु कुत्सित आचारो यस्य स सुदुराचार: = सुष्ठु-चांगला कुत्सित-वाईट-सर्वा पेक्षा श्रेष्ठ वाईट आचार आहे ज्याचा तो सुदुराचार**(ब.स.)** **सम्यग्व्यवसित:** - सम्यक्-शोभनम्-समीचीनं व्यवसितम्-व्यवसाय:-निश्चय: यस्य स सम्यग्व्यवसित: = चांगला-शोभन-समीचीन व्यवसाय-निश्चय ज्याचा तो सम्यग्व्यवसित**(ब.स.)** **अनन्यभाक् -** दुराचारं विहाय मां विनाऽन्यं न भजतीत्यनन्यभाक् = माझ्याशिवाय अन्याला न भजणारा केवळ मलाच भजणारा**(न.त.स.)** **साधु:** - साध्नोति परं सुकार्यमिति साधु: = परकार्य अथवा सुकार्य पुण्य करणारा (पुण्यात्मा भक्त)**(वि.)**

**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति ।**

**कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥३१॥**

**अन्वयः** - (सः), क्षिप्रम्, धर्मात्मा, भवति, शश्वत्, शान्तिम्, निगच्छति, कौन्तेय, मे, भक्तः, न, प्रणश्यति, प्रतिजानीहि ।

**अन्वयार्थः** - **(सः** - तो पुरुष) **क्षिप्रम्** - शीघ्र **धर्मात्मा** - धर्मात्मा **भवति** - होतो (आणि तो) **शश्वत्** - शाश्वत (नित्य) **शान्तिम्** - परम शांतिला **निगच्छति** - प्राप्त होतो **कौन्तेय** - हे कुंतीपुत्र अर्जुना! **मे** - माझा **भक्तः** - भक्त **न प्रणश्यति** - कधीही नष्ट होत नाही **प्रतिजानीहि** - असे तू निश्चयपूर्वक समज.

**विवरण** - माझा भक्त होण्यापूर्वी तो पुरुष कितीही दुर्गणी, दुराचारी, दुष्ट प्रकृतीचा असला तरी तो या सर्वांचा त्याग करून मला श्रद्धा भक्तिने शरण येतो तो सत्वर धर्मात्मा होतो. यामध्ये तिळमात्रही संदेह नाही. शेवटी तो नित्य शाश्वत शांतिला प्राप्त होतो. म्हणून भगवान म्हणतात की, हे अर्जुना! माझा खरा भक्त केव्हाही नाश पावत नाही अशी तू प्रतिज्ञा कर.(निश्चयपूर्वक जाण.)

**व्याकरणम्** - **क्षिप्रम्** - क्षिप्रम् अ. **धर्मात्मा** - धर्म पु. आत्मन् पु.प्र.ए.व. **भवति** - भू प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **शश्वत्** - शश्वत् अ. **शान्तिम्** - शम् च.ग.प.प.+क्तिन्‘अनुनासिकस्य क्विझलो क्ङिति इति सूत्रेण दीर्घः’=शान्ति स्त्री.द्वि.ए.व. **निगच्छति** - नि+गम् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **कौन्तेय** - कौन्तेय पु.संबो.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **भक्तः** - भज् प्र.ग.उ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **प्रणश्यति** - प्र+नश् च.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **प्रतिजानीहि** - प्रति+ज्ञा न.ग.उ.प.(प.प.) आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **धर्मात्मा** - धर्मे आत्मा-अन्तःकरणं यस्य स इति धर्मात्मा-पुण्यात्मा = धर्मामध्ये आत्मा -अंतःकरण आहे ज्याचे तो धर्मात्मा-पुण्यात्मा**(व्यधि.ब.स.)** यद्वा **धर्मात्मा** - धर्मः-धर्ममय आत्मा-अन्तःकरणं यस्य सो धर्मात्मा = धर्म-धर्ममय आत्मा-अंतःकरण ज्याचे तो धर्मात्मा**(ब.स.)** **भक्तः** - भजति -सेवत इति भक्तः = भजन-सेवा करतो तो भक्त**(वि.)** यद्वा **भक्तः** - ब्रह्मैवाऽहमिति ज्ञानयोगबलेन ब्रह्मभावं भजतीति भक्तः-ब्रह्मवित् = ब्रह्मच मी आहे अशा या ज्ञानयोगबलाने ब्रह्मभावाला भजतो तो भक्त म्ह. ब्रह्म वित्**(वि.)** यद्वा **भक्तः** - विषयान्तरशून्या-अनन्यरूपा मयि भक्तिरस्यास्तीति भक्तः = विषयान्तरशून्य-अनन्यरूप माझ्यामध्ये भक्ति आहे ह्याची तो भक्त**(अस्त्यर्थे त.वि.)**

भगवंताच्या शरणागतिने स्त्री, वैश्य, शूद्र आणि चाण्डालादिकांना सुद्धा परमगतिरूप फलाची प्राप्ति -

**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।**

**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ॥३२॥**

**अन्वयः** - हि, पार्थ, माम्, व्यपाश्रित्य, स्त्रियः, वैश्याः, तथा, शूद्राः, ये, पापयोनयः, अपि, स्युः, ते, अपि, पराम्, गतिम्, यान्ति ।

**अन्वयार्थः** - **हि** - कारण **पार्थ** - हे पृथापुत्र अर्जुना! **माम्** - मला **व्यपाश्रित्य** - आश्रय करून **स्त्रियः** - स्त्रिया **वैश्याः** - वैश्य **तथा शूद्राः** - त्याचप्रमाणे शूद्र अशा प्रकारचे **ये** - जे **पापयोनयः अपि** - चाण्डालादि योनित जन्मलेलेसुद्धा **स्युः** - असोत(असतात) **ते** - ते पुरुष **अपि** - देखील **पराम्, गतिम्** - श्रेष्ठ गतिला **या**

**न्ति** - प्राप्त होतात.

**विवरण -** हे पृथापुत्र अर्जुना! स्त्रिया, वैश्य, शूद्र त्याचप्रमाणे पापयोनीत जन्मलेले चाण्डालादि तेसुद्धा मला शरण आले असता परम गतीलाच प्राप्त होतात.

**व्याकरणम् - हि** - हि क्रि.वि.अ. **पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **व्यपाश्रित्य** - वि+अप+आ+श्रि प्र.ग.उ.प.ल्यबन्त अ. **स्त्रिय: -** स्त्रि स्त्री.प्र.ब.व. **वैश्या:** - विश् ष.ग.प.प.+ष्यञ्=वैश्य पु.प्र.ब.व. **तथा** - तथा क्रि.वि.अ. **शूद्रा:** - शूद्र पु.प्र.ब.व. **ये** - यत् सर्व.पु.प्र.ब.व. **पापयोनय:** - पाप वि.न. योनि पु.प्र.ब.व. **अपि** - अ. **स्यु:** - अस् द्वि.ग.प.प.विध्यर्थ तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **पापयोनय: -** पापमेव-कल्मषमेव योनि: कारणं येषां ते पापयोनय:-अन्त्यजादय: = पापच योनि-कारण आहे ज्यांचे ते पापयोनय**(ब.स.) गतिम्** - ज्ञानेन गम्यते प्राप्यते इति गति: तां गतिम् = ज्ञानाच्या द्वारा प्राप्त केली जाते ती गति त्या गतिला**(वि.)**

पुण्यशील ब्राह्मण आणि राजर्षि भक्तजनांची प्रशंसा त्याचप्रमाणे भगवद्‌भजनाकरिता आज्ञा -

**किं पुनर्ब्राह्मणा: पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।**

**अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥३३॥**

**अन्वय:** - पुन:, पुण्या:, ब्राह्मणा:, तथा, भक्ता:, राजर्षय:, किम्, इमम्, अनित्यम्, असुखम्, लोकम्, प्राप्य, माम्, भजस्व ।

**अन्वयार्थ: - पुन:** - तर मग **पुण्या: ब्राह्मणा: -** जे पुण्यशील ब्राह्मण **तथा** - त्याच प्रमाणे **भक्ता: राजर्षय:** - भक्त राजर्षिजन उत्तम गतिला पोहचतील **किम्** - हे काय आश्चर्य आहे यास्तव **इमम्, अनित्यम्, असुखम्, लोकम्** - या क्षणभंगुर आणि सुखविरहित मानव देहाला प्राप्त होऊन **माम्** - मला **भजस्व** - भज.(माझे भजन कर.)

**विवरण** - उपर्युक्त श्लोकांत सांगितलेले अत्यंत दुराचारी, दुर्गुणी आणि चाण्डाळ आदि नीच जातिचे मनुष्यसुद्धा श्रद्धा भक्तिच्या द्वारा माझे भजन करून परमगतिला प्राप्त होतात तर मग ज्यांचे आचार, विचार, व्यवहार आणि वर्ण अत्यंत श्रेष्ठ आहेत असे पुण्यशील ब्राह्मण तसेच राजर्षि भक्त मला शरण येऊन परमग तिला प्राप्त होतील यात काय आश्चर्य आहे. म्हणून, हे अर्जुना! सुखरहित आणि क्षणभंगुर या अनित्य दु:खस्वरूप मनुष्य शरीराला प्राप्त होऊन तू निरंतर माझेच भजन कर.

**व्याकरणम् - पुन:** - पुनर् अ. **पुण्या:** - पुण्य वि.पु.प्र.ब.व. **ब्राह्मणा:** - ब्राह्मण पु.प्र.ब.व. **तथा:** - तथा क्रि.वि.अ. **भक्ता:** - भज् प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि. पु.प्र.ब.व. **राजर्षय:** - राज+ऋषि पु.प्र.ब.व. **किम्** - किम् सर्व.न.प्र.ए.व. **इमम्** - इदम् सर्व.पु.द्वि.ए.व. **अनित्यम्** - अनित्य वि.पु.द्वि.ए.व. **असुखम्** - असुख वि.पु.(न.)द्वि.ए.व. **लोकम्** - लोक पु.द्वि.ए.व. **भजस्व** - भज् प्र.ग.उ.प.(आ.प.) आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - राजर्षय:** - राजानश्च ते ऋषयश्चेति राजर्षय: = राजे व तेच ऋषी राजर्षि**(क.स.) अनित्यम्** - न नित्यमित्यनित्यम्-क्षणभंगुरम्-अध्रुवम् = नाही जो नित्य तो अनित्य त्याला**(न.त.स.) असुखम्** - ना

स्ति सुखं यत्र यस्य वा सोऽसुखस्तमसुखम्-सुखरहितम् = नाही सुख ज्याचे अथवा ज्याच्यामध्ये तो असुख त्याला**(न.त.स.)**

भगवंताचे अर्जुनाला आपल्याला शरण होण्याकरिता सांगून अंगासह शरणागतिच्या स्वरूपाचे वर्णन -

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**

**मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायण: ।।३४।।**

**अन्वय:** - मन्मना:, (भव), मद्भक्त:, (भव), मद्याजी, भव, माम्, नमस्कुरु, एवम्, युक्त्वा, मत्परायण:, आत्मानम्, माम्, एव, एष्यसि ।

**अन्वयार्थ:** - **मन्मना: (भव)** - माझ्यामध्ये मन समर्पण केलेला हो **मद्भक्त: (भव)** - माझा भक्त हो **मद्याजी भव** - माझे पूजन करणारा हो **माम्, नमस्कुरु** - मलाच प्रणाम कर **एवम्** - अशा रीतिने **युक्त्वा** - समाहित होऊन **मत्परायण:** - मत्परायण असलेला तू **आत्मानम्, माम्, एव** - सर्व ठिकाणी व्यापक असणारा मी जो आत्मा त्या मलाच **एष्यसि** - प्राप्त होशील.

**विवरण** - सर्वज्ञ सर्वशक्तीमान सर्वलोकमहेश्वर सर्वातीत सर्वमय निर्गुण सगुण असा मी त्या माझ्यामध्ये स्थिर चित्त करणारा हो. सर्वांची परम गती भर्ता स्वामी, परम आश्रय आणि परम आत्मीय संरक्षक अशा त्या माझा तू भक्त हो विधिपूर्वक श्रद्धा आणि प्रेमाच्या बरोबर माझेच पूजन करणारा हो. या भुवनत्रयामध्ये कणाकणात मीच व्यापक रूपाने भरलेला आहे. अशी माझ्या विषयी व्यापक दृष्टि ठेवून मलाच प्रणाम कर. या प्रमाणे आत्म्याला माझ्यामध्ये समाहित करून मत्परायण होऊन सर्वांचा जो मी आत्मा त्या मलाच तू प्राप्त होशील.

**व्याकरणम्** - **मन्मना:** - मत् अस्मत् सर्व.स.ए.व. **मनस्** - न.प्र.ए.व. **भव** - भू प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **मद्भक्त:** - मत् अस्मत् सर्व.ष.ए.व. भज् प्र.ग.उ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **मद्याजी** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. याजिन् वि.पु.प्र.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **नमस्कुरु** - नमस् कृ अ.ग.उ.प.(प.प.) आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **एवम्** - एवम् क्रि.वि.अ. **युक्त्वा** - युज् च.ग.आ.प.त्वान्त अ. **मत्परायण:** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. पर+अयन वि.प्र.ए.व. **आत्मानम्** - आत्मन् पु.द्वि.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **एष्यसि** - इ द्वि.ग.प.प.द्वि.भ.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थां:** - **मन्मना:** - मय्येव मन: संकल्पात्मकं यस्य स मन्मना: = माझ्या ठिकाणी संकल्प करणारे मन आहे ज्याचे तो**(व्यधि.ब.स.)** यद्वा **मन्मना:** -'भूतानि विष्णु:' इति न्यायेन सर्वात्मके मयि लग्नं मनो यस्य स मन्मना: = 'भूतानि विष्णु:' या न्यायाने सर्वात्मक जो मी त्यामध्ये संलग्न मन आहे ज्याचे तो **(ब.स.)** यद्वा **मन्मना:** - 'मनो मोक्षे निवेशयेत्' इति स्मरणान्मय्यानन्दात्मनि मोक्षे स्वरूपे संस्थापितं मनो यस्य स मन्मना: = 'मनो मोक्षे निवेशयेत्' या स्मरणाने मी जो आनंदात्मक मोक्षस्वरूप जो परमात्मा त्यामध्ये स्थापित मन आहे ज्याचे तो**(ब.स.)** **मत्परायण:** - अहमेव परम्-श्रेष्ठं अयनम्-गति:-आश्रयो यस्य स मत्परायण: = मीच परम्-श्रेष्ठ अयन (आश्रय) ज्याचा तो मत्परायण**(ब.स.)** यद्वा **मत्परायण:** - मयि परायण: मत्परायण: = माझ्यामध्ये परायण मत्परायण**(स.त.स.)** **मद्भक्त:** - मम भक्त इति मद्भक्त: = माझा भक्त**(ष.त.स.)** यद्वा **मद्भक्त:** - 'ब्रह्मार्पणं ब्रह्महवि:' इति न्यायेनेज्यो यजनं यजमानो यागश्च सर्वं ब्रह्मैवेति

सर्वत्र मद्बुद्ध्या मां भजतीति मद्भक्तः = 'ब्रह्मार्पणं ब्रह्महविः' या न्यायाने यज्ञ, यजन, यजमान, याग सर्व ब्रह्मच आहे अशी सर्वत्र माझ्याठिकाणी बुद्धी ठेवून, त्या बुद्धीने मला भजतो असा तो मद्भक्त**(उप.स.)**
**मद्याजी** - श्रौतैः स्मार्तैश्च कर्मभिर्मामेव परमेश्वरं यष्टुं-पूजयितुं शीलमस्येति मद्याजी = श्रौत आणि स्मार्त कर्माच्या द्वारा (माझी) पूजा करणे हेच शील आहे ज्याचे तो मद्याजी**(उप.स.)**

**ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे**

**श्रीकृष्णार्जुनसंवादे राजविद्याराजगुह्ययोगो नाम नवमोऽध्यायः ॥९॥**

**-: अध्याय नववा समाप्त :-**

**ॐ श्रीपरमात्मने नम:**

**अथ दशमोऽध्याय:**

**श्रीभगवानुवाच -** भगवान म्हणाले.

**भूय एव महाबाहो शृणु मे परमं वच: ।**

**यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥१॥**

**अन्वय :** - महाबाहो, भूय:, एव, मे, परमम्, वच:, शृणु, यत्, अहम्, प्रीयमाणाय, ते, हितकाम्यया, वक्ष्यामि ।

**अन्वयार्थ:** - **महाबाहो** - हे पराक्रमी अर्जुना! **भूय:, एव** - पुनरपि **मे** - माझे **परमम्, वच:** - श्रेष्ठ वाक्य **शृणु** - श्रवण कर **यत्** - जे **अहम्** - मी **प्रीयमाणाय** - श्रवण करून संतोष पावणाऱ्या **ते हितकाम्यया** - तुझ्या हिताच्या कामनेने **वक्ष्यामि** - कथन करणार.(करील.)

**विवरण** - सातव्या अध्यायामध्ये आणि नवव्या अध्यायामध्ये जो विषय सोपाधिक निरूपाधिक रूपाने प्रतिपादन केलेला आहे त्याच विषयाचा या ठिकाणी प्रकारांतर रूपाने विस्तार आहे. म्हणून, हे अर्जुना! माझे पुनरपि अत्यंत रहस्यपूर्वक आणि प्रभावयुक्त श्रेष्ठ वचन तू ऐक. कारण, माझ्या ठिकाणी अतिशय प्रेम करणारा तू त्या तुला मी हिताच्या इच्छेने हे रहस्य सांगणार आहे.

**व्याकरणम्** - **महाबाहो** - महा वि. बाहु पु.संबो.ए.व. **भूय:** - भूयस् अ. **एव** - एव क्रि.वि.अ. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **परमम्** - परम वि.न.द्वि.ए.व. **वच:** - वचस् न.द्वि.ए.व. **शृणु** - श्रु प्र.ग.प.प.आज्ञार्थ श्रु द्वि.पु.ए.व. **यत्** - यत् सर्व.न.द्वि.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **प्रीयमाणाय** - 'प्रीञ् तर्पणे' प्रीन.ग.उ.प.कर्म.शानच्=प्रीयमाण वि.पु.च.ए.व. **ते** - युष्मत् सर्व.च.ए.व. **हितकाम्यया** - हितृ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि. काम्या वि.स्त्री.तृ.ए.व. **वक्ष्यामि** - वच् द्वि.ग.प.प.द्वि.भवि.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **हितकाम्यया** - हितस्य-नित्यनिरतिशयसुखस्य काम्या-इच्छा हितकाम्या तया हितकाम्यया-हितेच्छया = हिताच्या म्हणजे निरतिशय नित्य सुखाच्या कामनेने**(ष.त.स.)** **प्रीयमाणाय** - प्रियत इति प्रियमाणस्तस्मै प्रियमाणाय = प्रिय होणाऱ्याकरिता**(वि.)**

देवता तसेच महर्षि लोक माझ्या प्रभावाला जाणत नाहीत हे दाखविणे -

**न मे विदु: सुरगणा: प्रभवं न महर्षय: ।**

**अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वश: ॥२॥**

**अन्वय:** - मे, प्रभवम्, सुरगणा:, न, विदु:, महर्षय:, न, (विदु:) हि, अहम्, सर्वश:, देवानाम्, च, महर्षीणाम्, आदि: ।

**अन्वयार्थ:** - **मे** - माझ्या **प्रभवम्** - उत्पत्तीला **सुरगणा:** - देवतालोक **न विदु:** - जाणत नाहीत **महर्षय: न (विदु:)** - महर्षिलोक जाणत नाहीत **हि** - कारण **अहम्** - मी (परमात्मा) **सर्वश:** - सर्व प्रकाराने **देवानाम्** - देवांचे **च** - आणि **महर्षीणाम्** - महर्षींचे **आदि:** - आदिकारण आहे.

**विवरण** - दुष्टांचा विनाश, भक्तांचे संरक्षण आणि धर्माचे संस्थापन करण्याकरिता मी श्रीराम, श्रीकृष्ण आणि श्रीमत्स्य इत्यादि अवतारांच्या रूपाने प्रादुर्भूत होतो. परंतु, अशा माझ्या उत्पत्तीला देवतालोक आणि मह र्षिलोक जाणत नाहीत. कारण, देवांचे आणि महर्षींचे आदिकारण मी आहे.

**व्याकरणम्:** - **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **प्रभवम्** - प्रभव पु.द्वि.ए.व. **सुरगणाः** - सुर पु. गण पु.प्र.ब.व. **न** - न क्रि.वि.अ. **विदुः** - विद् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **महर्षयः** - महत् वि. ऋषि पु.प्र.ब.व. **न** - न क्रि. वि.अ. **विदुः** - विद् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **हि** - हि क्रि.वि.अ. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **सर्वशः** - सर्वशस् अ. **देवानाम्** - देव पु.ष.ब.व. **च** - च उभ.अ. **महर्षीणाम् -** महर्षि पु.ष.ब.व. **आदिः** - आदि वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **सुरगणाः** - सुराणाम्-देवानाम्, गणाः-समूहाः सुरगणाः ब्रह्मादयः = देवतांचा समूह **(ष.त.स.) महर्षयः** - महान्तश्च ते ऋषयश्च महर्षयः- भृग्वादयः = महर्षिलोक**(क.स.) महर्षीणाम्** - महान्तश्च ते ऋषयश्च-महर्षयस्तेषां महर्षीणाम् = महर्षि लोकांचे**(क.स.) देवानाम्** - दिव्यन्ति प्रकाशरूपा भवन्ति ते देवास्तेषां देवानाम् = प्रकाशित होणारे असे ते देव त्या देवांचा**(वि.)**

**योो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम् ।**

**असम्मूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ॥३॥**

**अन्वयः** - यः, माम्, अजम्, अनादिम्, च, लोकमहेश्वरम्, वेत्ति, सः, मर्त्येषु, असम्मूढः, सर्वपापैः प्रमुच्यते ।

**अन्वयार्थः** - **यः** - जो **माम्** - मला **अजम्** - जन्मरहित **अनादिम्** - अनादि **च** - आणि **लोकमहेश्वरम्** - सर्व लोकांचा महान ईश्वर असे **वेत्ति** - समजतो **सः** - तो **मर्त्येषु** - मानवांमध्ये **असम्मूढः** - ज्ञानवान् (मोहरहित) पुरुष **सर्वपापैः** - सर्व पापांपासून **प्रमुच्यते** - मुक्त होतो.

**विवरण** - आपल्या योगमायेच्या द्वारा नाना रूपाने प्रकट होत असून सुद्धा मी अजन्मा आहे. म्हणजे अन्य जीवाप्रमाणे माझा जन्म होत नाही. अशा प्रकारे जो पुरुष मला वास्तविक जन्मरहित, अनादि आणि सर्व लोकांचा महान ईश्वर जाणतो तो संपूर्ण मनुष्यांमध्ये ज्ञानवान् (मोहरहित) पुरुष सर्व पापांपासून मुक्त होतो.

**व्याकरणम्** - **यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **अजम्** - अज वि.पु.द्वि.ए.व. **अना दिम्** - अन्+आदि वि.पु.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **लोकमहेश्वम्** - लोक पु. महेश्वर पु.द्वि.ए.व. **वेत्ति** - विद् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **मर्त्येषु** - मर्त्य पु.स.ब.व. **असम्मूढः** - अ+सम्+मुह् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **सर्वपापैः** - सर्व वि. पाप न.तृ.ब.व. **प्रमुच्यते** - प्र+मुच् ष.ग.उ.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व.,

**समासविग्रहार्थाः** - **अजम्** - न जायते इत्यजस्तमजम्-अनादिम् = जो उत्पन्न नाही होत तो अज त्याला **(न.त.)** यद्वा **अजम्** - न विद्यते जन्मादिकारणम्-निमित्तं उपादानश्च यस्य सोऽनादिस्तमनादिम् = नाही होत जन्म आदि कारण-निमित्त आणि उपादान ज्याचे तो त्याला**(ब.स.) अनादिम्** - न यस्य अन्यः, आदि विद्यत इति अनादिस्तमनादिम् = ज्याचा अन्य-दुसरा आदि नाही तो अनादि**(न.त.स.) लोकमहेश्वरम्** - महांश्चासौ ईश्वरश्चेति महेश्वरःलोकानां महेश्वरो लोकमहेश्वरस्तं लोकमहेश्वरम्-सर्वलोकनियंतारम् = सर्व

लोकांचा महान ईश्वर त्याला**(क.ग.ष.त.स.)** **सर्वपापैः** - सर्वाणि च तानि पापानि सर्वपापानि तैः सर्वपापैः- ज्ञाताज्ञातपापैः = सर्व ज्ञात आणि अज्ञात पापाच्या द्वारा**(क.स.)** **असम्मूढः** - न सम्मूढ इत्यसम्मूढः = जो संमूढ नाही तो असंमूढ-ज्ञानी**(न.त.)** **ईश्वरः** - यस्य सन्निधिमात्रेण लोको जगत्सर्वं चेष्टते स ईश्वरः = ज्याच्या सन्निधिमात्राने लोक म्ह. संपूर्ण जगत चेष्टा करते तो ईश्वर**(वि.)**

भगवंतापासून बुद्धी आदि भावांच्या उत्पत्तिचे कथन -

**बुद्धिर्ज्ञानमसम्मोहः क्षमा सत्यं दमः शमः ।**

**सुखं दुःखं भवोऽभावो भयं चाभयमेव च ॥४॥**

**अन्वयः** - बुद्धिः, ज्ञानम्, असम्मोहः, क्षमा, सत्यम्, दमः, शमः, सुखम्, दुःखम्, भवः, अभावः, च, भयम्, च, अभयम्, एव ।

**अन्वयार्थः** - **बुद्धिः** - बुद्धी **ज्ञानम्** - ज्ञान **असम्मोहः** - मोह नसणे **क्षमा** - क्षमा **सत्यम्** - सत्य **दमः**- इंद्रिय निग्रह **शमः** - अंतःकरणाचा निग्रह **सुखम्** - सुख **दुःखम्** - दुःख **भवः** - उत्पत्ति **अभावः** - प्रलय **च** - आणि **भयम्** - भीती **च** - आणि **अभयम् एव** - अभयसुद्धा.

**विवरण** - कर्तव्य, अकर्तव्य, ग्राह्य, अग्राह्य, चांगले, वाईट आदिचा निश्चय करणारी बुद्धी, कोणत्याही पदार्थाला यथार्थ रूपाने जाणणारे जे ज्ञान, संसाराच्या भोगाला अनित्य क्षणिक आणि दुःखमूलक जाणून मोहित न होणे असंमोह, अपमान, निंदा इत्यादि अपराधाच्या द्वारा अंतःकरणामध्ये यत्किंचितही विकार उत्पन्न न होणे क्षमा, विषयापासून इंद्रियांचा निग्रह करणे दम, अंतःकरणाला वश करणे शम, अनुकूल विषयापासून होणारे सुख, प्रतिकूल विषयांच्या संयोपासून होणारे दुःख, सर्व कालामध्ये संपूर्ण जगाचे उत्पन्न होणे भव, प्रलयकाळामध्ये लीन होणे अभाव, कोणत्याही प्रकारच्या भयाचा जो अभाव ते अभय.

**व्याकरणम्** - **बुद्धिः** - बुद्धि स्त्री.प्र.ए.व. **ज्ञानम्** - ज्ञान न.प्र.ए.व. **असम्मोहः** - अ+सम्+मोह पु.प्र.ए.व. **क्षमा** - क्षमा स्त्री.प्र.ए.व. **सत्यम्** - सत्+यत्=सत्य वि.न.प्र.ए.व. **दमः** - दम पु.प्र.ए.व. **भवः** - भव पु.प्र.ए.व. **अभावः** - अ+भाव पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **भयम्** - भि तृ.ग.प.प.+अच्=भय न.प्र.ए.व. **च** - च उभ. अ. **अभयम्** - अभय न.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ.

**समासविग्रहार्थाः** - **असम्मोहः** - न सम्मोह इत्यसम्मोहः-पुनर्विपरीतभावनानुदयः = नाही संमोह तो असंमोह म्ह. विपरीत भावनेचा उदय न होणे तो असंमोह**(न.त.स.)** **अभावः** - न भाव इत्यभावः-विनाशः = नाही भाव तो अभाव म्हणजे विनाश**(न.त.स.)** **अभयम्** - न भयमित्यभयम् = नाही भय ते अभय **(न.त.)** **ज्ञानम्** - ज्ञायतेऽनेनेति ज्ञानम्-ब्रह्मात्मैकत्वविषयं परोक्षमपरोक्षं च ज्ञानम् = ब्रह्माच्या एकत्वाला विषय करणारे परोक्ष आणि अपरोक्ष ते ज्ञान**(वि.)**

**अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः ।**

**भवन्ति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः ॥५॥**

**अन्वयः** - अहिंसा, समता, तुष्टिः, तपः, दानम्, यशः, अयशः, भूतानाम्, पृथग्विधाः, भावाः, मत्तः, एव, भवन्ति ।

**अन्वयार्थः** - **अहिंसा** - अहिंसा **समता** - समता **तुष्टिः** - संतोष **तपः** - तप **दानम्** - दान **यशः** - कीर्ती **अयशः** - अकीर्ती **भूतानाम्** - भूतांचे **पृथग्विधाः भावाः** - अनेक प्रकारचे भाव **मत्तः एव** - माझ्या पासूनच **भवन्ति** - उत्पन्न होतात.

**विवरण** - कोणत्याही प्राण्याला पीडा न देणे अहिंसा, सुख-दुःख, जय-पराजय इत्यादि द्वंदामध्ये सम राहणे समता, जी वस्तू प्राप्त होईल तिच्यापासून संतुष्ट होणे तुष्टी-संतोष, स्वधर्म पालनासाठी कष्ट सहन करणे तप, दुसऱ्याच्या हिताकरिता वितरण करणे दान, जगामध्ये कीर्ती न होण्याची इच्छा करणे यश इत्यादि जेवढे काही भाव सांगितले आहेत ते सर्व माझ्यापासून उत्पन्न झाले आहेत असे तू समज.

**व्याकरणम्** - **अहिंसा** - अहिंसा स्त्री.प्र.ए.व. **समता** - समता स्त्री.प्र.ए.व. **तुष्टिः** - तुष् च.ग.प.प.+ क्तिन्=तुष्टि स्त्री.प्र.ए.व. **तपः** - तप वि.पु.प्र.ए.व. **दानम्** - दान न.प्र.ए.व. **यशः** - यशस् न.प्र.ए.व. **अयशः** - अ+यशस् न.प्र.ए.व. **पृथग्विधाः** - पृथक् अ.विध वि.पु.प्र.ब.व. **भावाः** - भाव पु.प्र.ब.व. **भूतानाम्** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.ष.ब.व. **मत्तः** - मत् अस्मत् सर्व.पं.ए.व.तसिल् प्रत्ययान्त **एव** - एव क्रि.वि.अ. **भवन्ति** - भू प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **पृथग्विधाः** - पृथक्-भिन्नाः, विधाः-प्रकाराः येषां ते पृथग्विधाः- नानाप्रकाराः = पृथक्-नाना प्रकारचे-भेद आहेत ज्यांचे ते**(ब.स.)** **अयशः** - न यश इत्ययशः = नाही यश ते अयश**(न.त.स.)** **भावाः** - भवन्तीति भावाः-बुद्ध्यादयः = होणारे ते भाव म्ह. वर सांगितलेले बुद्धी आदि भाव**(वि.)**

भगवंताच्या संकल्पाने सप्तर्षि आणि सनकादिकांच्या उत्पत्तिचे कथन -

**महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा ।**

**मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥६॥**

**अन्वयः** - पूर्वे, सप्त, महर्षयः, तथा, चत्वारः, मनवः, मद्भावाः, मानसाः, जाताः, इमाः, प्रजाः, लोके, येषाम् ।

**अन्वयार्थः** - **पूर्वे सप्त महर्षयः** - प्राचीन मरीची आदि सात महर्षिजन **तथा** - तसेच **चत्वारः मनवः** - सनकादि चार मनू हे संपूर्ण **मद्भावाः** - माझ्या ठिकाणी श्रद्धा आणि प्रेम ठेवणारे असून **मानसाः** - माझे मानस म्हणजे (माझ्या मनापासून) **जाताः** - उत्पन्न झाले आहेत **इमाः प्रजाः** - ही सर्व प्रजा **लोके** - या लोकांमध्ये **येषाम्** ज्यांची सृष्टी आहे. अर्थात् या लोकातील ही सर्व चराचर सृष्टी मनुंची व महर्षींची संतती आहे.

**विवरण** - दीर्घायू, मंत्रद्रष्टे, ऐश्वर्यवान्, दिव्यदृष्टी युक्त, गुणवान, विद्यावान, वयाने वृद्ध, धर्मांचे प्रत्यक्ष करणारे आणि गोत्राचे संचालन करणारे असे ज्ञान, गुणांनी युक्त असे मरीची, अंगिरा, अत्री, पुलस्त्य, पुलह, क्रतु आणि वसिष्ठ सात महर्षिजन तसेच सनक, सनंदन, सनातन आणि सनत्कुमार हे चार मनू माझ्या मध्येच (भावना) श्रद्धा ठेवणारे असून हे सर्व माझ्या संकल्पापासून उत्पन्न झाले आहेत. ज्यांची संसारामध्ये ही सर्व प्रजा आहे.

**व्याकरणम्** - **पूर्वे** - पूर्व वि.स.ए.व. **सप्त** - सप्तन् वि.पु.प्र.ए.व. **महर्षयः** - महत् वि. ऋषि पु.प्र.ब.व. **चत्वारः** - चतुर् संख्या वि.पु.प्र.ब.व. **मनवः** - मनु पु.प्र.ब.व. **मद्भावाः** - अस्मत् सर्व.ष.ए.व. भाव पु.प्र.ब.व. **मानसाः** - मानस वि.पु.प्र.ब.व. **जाताः** - जन् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **इमाः**-

इदम् सर्व.स्त्री प्र.ब.व. **प्रजा:** - प्रजा स्त्री.प्र.ब.व. **लोके** - लोक पु.स.ए.व. **येषाम्**- यत् सर्व.पु.ष.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **मद्भावा:** - मम परमेश्वरस्य स्वरूपत्वेन भाव्यन्त इति मद्भावा: = माझ्या म्ह. परमेश्वराच्या स्वरूपाने ज्यांची भावना केली जाते असे ते माझे भाव**(वि.)** यद्वा **मद्भावा: -** मयि परमेश्वरे भावो-भावना येषाम् ते मद्भावा: मत्परा: = माझ्या म्ह. परमेश्वराच्या ठिकाणी भाव म्ह. भावना ज्यांची ते मद्भाव म्ह. मत्पर **(वि.) प्रजा:** - प्रकर्षेण जायन्त इति प्रजा: = प्रकृष्ट रूपाने उत्पन्न होणारी ती प्रजा**(वि.) मानसा:** - मनस: जात तां इति मानसा: = मनापासून उत्पन्न होणारे ते मानस**(तद्धि.वि.)**

भगवंताच्या विभूति आणि योगाला तत्त्वत: जाणण्याचे फल -

**एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वत: ।**

**सोऽविकम्पेन योगेन युज्यते नात्र संशय: ॥७॥**

**अन्वय:** - य:, मम, एताम्, विभूतिम्, च, योगम्, तत्त्वत:, वेत्ति, स:, अविकम्पेन, योगेन, युज्यते, अत्र, संशय:, न ।

**अन्वयार्थ:** - **य:** - जो पुरुष **मम** - माझ्या **एताम्, विभूतिम्** - या परमैश्वर्यरूप विभूतीला **च** - आणि **योगम्** - योगाला-ऐश्वर्याला **तत्त्वत:** - पूर्णपणे **वेत्ति -** जाणतो **स:** - तो पुरुष **अविकम्पेन योगेन** - स्थिरतारूप योगाने **युज्यते** - युक्त होतो **अत्र** - यामध्ये **संशय: न** - यात थोडाही संदेह नाही.

**विवरण** - मागील तीन श्लोकामध्ये बुद्धी, ज्ञान, संमोह, क्षमा, सत्य इत्यादि भावाला आणि महर्षि आदि यामध्ये असणारे योग ऐश्वर्यादिक यांना जो पुरुष पूर्णपणे जाणतो तो निश्चल योगाने युक्त होतो. यामध्ये किंचित्मात्रही संदेह नाही.

**व्याकरणम्** - **य:** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **मम** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **एताम्** - एतत् सर्व.स्त्री.द्वि.ए.व. **विभूतिम्** - वि+भू प्र.ग.प.प.+क्तिन्=विभूति स्त्री.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **योगम्** - योग पु.द्वि.ए.व. **तत्त्वत:** - तत्त्वतस् अ.तसिल् प्रत्ययान्त पंचम्यन्त **वेत्ति -** विद् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **अविकम्पेन** - अ+विकम्प वि.पु.तृ.ए.व. **योगेन** - योग पु.तृ.ए.व. **युज्यते** - युज् च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व. **अत्र** - अत्र अ. **संशय:** - संशय पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ.

**समासविग्रहार्था:** - **अविकम्पेन** - न विकम्प इत्यविकम्पस्तेन अविकम्पेन-विकल्परहितेन = स्थिररूप योगाने -विकल्परहित योगाने**(न.त.स.)**

भगवंताच्या बुद्धिमान अनन्यप्रेमी भक्तांच्या भजनाचा प्रकार -

**अहं सर्वस्य प्रभवो मत्त: सर्वं प्रवर्तते ।**

**इति मत्वा भजन्ते मां बुधा भावसमन्विता: ॥८॥**

**अन्वय:** - अहम्, सर्वस्य, प्रभव:, मत्त:, सर्वम्, प्रवर्तते, इति, मत्वा, भावसमन्विता:, बुधा:, माम्, भजन्ते ।

**अन्वयार्थ:** - **अहम्** - मी वासुदेवच **सर्वस्य** - संपूर्ण जगताच्या **प्रभव:** - उत्पत्तीचे कारण आहे **मत्त: -**

माझ्यापासून **सर्वम्** - सर्व जगत **प्रवर्तते** - प्रवृत्त होते **इति** - अशा प्रकारे **मत्वा** - समजून **भावसमन्विता:** - भक्तिने युक्त **बुधा:** - ज्ञानीजन **माम्** - मला **भजन्ते** - भजतात.

**विवरण -** संपूर्ण जगत माझ्यापासून उत्पन्न होते म्हणून मी वासुदेवच संपूर्ण जगताच्या उत्पत्तिचे कारण आहे. माझ्या योगबलानेच हे सृष्टीचक्र तसेच शासनशक्तिच्या द्वारा सूर्य, चंद्र, तारांगण आणि पृथ्वी इत्यादिंची नियमपूर्वक गति चालते आणि संपूर्ण प्राणी आपापल्या कर्मानुसार चांगल्या वाईट योनिमध्ये जन्म घेऊन आपापल्या कर्माचे भोग भोगतात. म्हणजे संपूर्ण जगत परिवर्तनशील होते असे समजून श्रद्धा आणि भक्तीने युक्त बुद्धिमान भक्तजन मला परमात्म्याला निरंतर भजतात.

**व्याकरणम् - अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **सर्वस्य** - सर्व सर्व.पु.ष.ए.व. **प्रभव:** - प्र+भव पु.प्र.ए.व. **मत्त:** - अस्मत् सर्व.पं.ए.व.पंचम्यन्त तसिल् प्रत्ययान्त **सर्वम्** - सर्व सर्व.पु.द्वि.ए.व. **प्रवर्तते** - प्र+वृत् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **मत्वा** - मन् च.ग.आ.प.त्वान्त अ. **भावसमन्विता:** - भाव पु. सम्+अनु+इ द्वि.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **बुधा:** - बुध पु.प्र.ब.व. **माम्** - अस्मत् सर्व. द्वि.ए.व. **भजन्ते** - भज् प्र.ग.उ.प.(आ.प.)वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था: - भावसमन्विता:** - भाव:-भक्तिस्तेन समन्विता: समनुगता इति भावसमन्विता: = भावाने म्ह. भक्तीने समन्वित म्ह. युक्त**(तृ.त.स.)** यद्वा **भावसमन्विता:** - भाव: सर्वं ब्रम्हैवेत्यवंलक्षणस्तेन समन्विता: -सर्वत्र मद्भावनायुक्ता इति भावसमन्विता:-परमार्थतत्त्वाभिनिवेशयुक्ता: = भाव म्हणजे सर्वच ब्रह्म आहे अशा प्रकारच्या भावनेने युक्त म्ह. सर्व ठिकाणी माझ्या भावनेने युक्त म्ह. परमार्थतत्त्वाच्या अभिनिवेशाने युक्त**(तृ.त.स.) प्रभव:** - प्रभवत्यस्मादिति प्रभव:-उपादानम् = ज्याच्या पासून उत्पन्न होतो तो प्रभव-उपादान**(वि.)**

**मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्त: परस्परम् ।**

**कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च ॥९॥**

**अन्वय:** - मच्चित्ता:, मद्गतप्राणा:, परस्परम्, बोधयन्त:, च, माम्, नित्यम्, कथयन्त:, च, तुष्यन्ति, च, रम न्ति ।

**अन्वयार्थ: - मच्चित्ता:** - माझ्या ठिकाणी ज्यांचे चित्त स्थिर झाले आहे **मद्गतप्राणा:** - माझ्या ठिकाणी ज्यांनी प्राण अर्पण केले आहेत **परस्परम्, बोधयन्त:** - एकमेकामध्येच भगवत् तत्त्वाची चर्चा करणारे **च** - आणि **माम्** - मला (माझ्या) **नित्यम्** - निरंतर **कथयन्त:** - ज्ञान, बल, वीर्य इत्यादी गुणांचे वर्णन करणारे **च** - आणि अशा उपर्युक्त कारणामुळे **तुष्यन्ति** - ते संतुष्ट होतात **च** - आणि **रमन्ति** - आनंदामध्ये रममाण होतात.

**विवरण** - मलाच आपला परम प्रेमी, परम सुहृद, परम आत्मीय आणि परम गति असे समजून ज्यांनी आपले चित्त निरंतर माझ्यामध्येच लावले आहे तसेच माझ्या ठिकाणी ज्यांनी आपले चित्त निरंतर माझ्या मध्येच समाहित केलेले आहे आणि प्रेमपूर्वक माझ्या ठिकाणी ज्यांनी आपले पंचप्राण समर्पण केले आहेत असे भक्तजन परस्पर आपापल्यामध्ये माझ्या भक्तीची चर्चा करतात. श्रवण, मनन, कीर्तन व प्रवचन तसेच पठन पाठनादिंच्या द्वारा माझे कथन करून निरंतर संतुष्ट होतात आणि माझ्यामध्येच रममाण होतात.

**व्याकरणम् - मच्चित्ता:** - अस्मत् सर्व.स.ए.व. चित् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **परस्परम्** - परस्पर वि.पु.द्वि.ए.व. **बोधयन्त:** - बुध् प्र.ग.उ.भ.(प.प.)णिच्+शतृ=बोधयत् वि.पु.प्र.ब.व. **च** - च उभ.अ. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **नित्यम्** - नित्य वि.पु.द्वि.ए.व. **कथयन्त:** - कथ् द.ग.उ.प.(प.प.) णिच्+शतृ=कथयत् वि.पु.प्र.ब.व. **च** - च उभ.अ. **रमन्ति** - रम् प्र.ग.उ.प.(प.प.)वर्त.तृ.पु.ब.व. **च** - च उभ.अ. **तुष्यन्ति** - तुष् च.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **मच्चित्ता:** - मयि-सर्वभूतात्मके सविशेषे ब्रम्हणि चित्तं ब्रम्हैवेति वासनापन्नं येषां ते म **च्चित्ता:** = माझ्या मध्ये म्ह. सर्वात्मक सविशेष ब्रम्हामध्ये सर्व ब्रम्ह आहे अशा प्रकारच्या वासनेने युक्त आहे चित्त ज्यांचे ते**(ब.स.)** यद्वा **मच्चित्ता:** - अहमेव चित्ते येषां ते मच्चित्ता: = मी आहे चित्तामध्ये ज्यांच्या ते **(व्यधि.ब.स.) मद्‌गतप्राणा: -** मयि-ब्रम्हणि, गता:-संलग्ना:, प्राणा:-असवो येषां ते मद्‌गतप्राणा: = माझ्याठिकाणी लीन प्राण केले आहेत ज्यांनी ते**(ब.स.)** यद्वा **मद्‌गतप्राणा: -** मद्‌गता मत्तत्त्वप्रतिपादक वाक्योच्चारणे तदर्थश्रवणे तन्निश्चितार्थदर्शने च तत्परा: प्राणा वागादी इन्द्रियाणि येषां ते मद्‌गत प्राणा: = माझ्या तत्त्वाच्या प्रतिपादक वाक्याच्या उच्चारणामध्ये त्याचे अर्थ श्रवण करण्यामध्ये आणि त्यांच्या निश्चित सुविचारित अर्थांच्या दर्शनामध्ये तत्पर आहेत चक्षुरादि प्राण म्ह. वाक् आदि इंद्रिये ज्यांची ते**(ब.स.)** यद्वा **मद्‌गतप्राणा: -** मां गता:-प्राप्ता: चक्षुरादय: प्राणा येषां ते मद्‌गतप्राणा: = प्राण-चक्षुरादिक इंद्रिये मला प्राप्त झाले आहेत ज्यांचे ते**(ब.स.) बोधयन्त:** - बोधयन्ति ते बोधयन्त: = चर्चा करीत असता**(वि.)**

प्रीतीपूर्वक निरंतर भजनाचे फल -

**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।**

**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ॥१०॥**

**अन्वय:** - सततयुक्तानाम्, प्रीतिपूर्वकम्, भजताम्, तेषाम्, तम्, बुद्धियोगम्, ददामि, येन, ते, माम्, उपयान्ति ।

**अन्वयार्थ:** - **सततयुक्तानाम्** - निरंतर माझ्या ठिकाणी समाहित चित्त केलेल्या **प्रीतिपूर्वकम्** - प्रेमपूर्वक **भजताम्** - मला भजणाऱ्या **तेषाम्** - भक्तांना मी **तम्, बुद्धियोगम्** - त्या बुद्धियोगाला **ददामि** - देतो **येन** - की ज्याच्या साह्याने **ते माम्, उपयान्ति -** ते मलाच प्राप्त होतात.

**विवरण** - असे जे मागे सांगीतलेले नाम, गुणादि द्वारा माझेच कथन करणारे भक्तजन की ज्यांनी आपले चित्त निरंतर माझ्यामध्येच समाहित केलेले आहे आणि प्रेमपूर्वक माझे गुणगाण करणारे तसेच भजन करणारे असे जे भक्तजन त्यांना मी बुद्धीयोग देतो. त्या बुद्धियोगामुळे ते भक्तजन मलाच प्राप्त होतात.

**व्याकरणम् - सततयुक्तानाम्** - सतत वि. युज् च.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.पु.ष.ब.व. **प्रीतिपूर्वकम्** - प्रीति स्त्री. पूर्वक वि.पु.द्वि.ए.व. **भजताम्** - भज् प्र.ग.उ.भ.(प.प.)+कर्त.शतृ=भजत् वि.पु.ष.ब. **तेषाम्** - तत् सर्व.पु.ष.ब.व. **तम्** - तत् सर्व.पु.द्वि.ए.व. **बुद्धियोगम्** - बुद्धि स्त्री.वि. योग पु.द्वि.ए.व. **ददामि** - दा तृ.ग.उ.प.(प.प.)वर्त.प्र.पु.ए.व. **येन** - यत् सर्व.पु.तृ.ए.व. **ते** - तत् सर्व.पु.प्र.ब.व. **माम्** - अस्मत् सर्व. द्वि.ए.व. **उपयान्ति** - उप+या द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **बुद्धियोगम्** - बुद्धि:-आत्मब्रह्मविषयकं ज्ञानं तेन योग इति बुद्धियोगस्तं बुद्धियोगम् =

बुद्धी-आत्मविषक ज्ञान त्याने युक्त असणाऱ्या बुद्धियोगाला(**तृ.त.स.**) यद्वा **बुद्धियोगम्** - बुद्धिः-स्वरूपज्ञानं सैव योगो बुद्धियोगस्तं बुद्धियोगम् = बुद्धी-स्वरूप ज्ञानच योग बुद्धियोग त्या बुद्धियोगाला(**क.स.**) यद्वा **बुद्धियोगम्** - बुद्धि-मत्तत्त्वविषयं सम्यग्दर्शनं तेन योगो बुद्धियोगस्तं बुद्धियोगम् = बुद्धी-माझ्या तत्त्वाविषयीचे यथार्थ ज्ञान त्याच्याशी योग म्ह. संबध, तो बुद्धियोग त्या बुद्धियोगाला(**तृ.त.स.**) **सततयुक्तानाम्** - सततम्-निरंतरं स्वरूपसाक्षात्कारसिद्धये वेदान्तश्रवणादिष्वेव युक्ताः-समाहितास्तेषाम् सततयुक्तानाम् = निरंतर स्वरूपसाक्षात्कारसिद्धिकरिता वेदांत श्रवणामध्येच युक्त-समाहीत असणाऱ्यांचा(**स.त.स.**) **प्रीतिपूर्वकम्** - प्रीत्या-स्नेहेन पूर्वकमिति प्रीतिपूर्वकम् = प्रीतिने म्ह. स्नेहाने पूर्वक-स्नेहाने युक्त होऊन(**तृ.त.स.**) **भजताम्** - भजन्ति ते भजन्तस्तेषां भजताम् = भजन करीत असणाऱ्यांचा(**वि.**)

**तेषामेवानुकम्पार्थमहमज्ञानजं तमः ।**

**नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥११॥**

**अन्वयः** - तेषाम्, एव, अनुकम्पार्थम्, आत्मभावस्थः, अहम्, भास्वता, ज्ञानदीपेन, अज्ञानजम्, तमः, नाशयामि ।

**अन्वयार्थः - तेषाम्, एव अनुकम्पार्थम्** - त्यांच्यावर अनुग्रह करण्यासाठी **आत्मभावस्थः** - त्यांच्या हृदयात शिरून (स्थिर होऊन) **अहम्** - मी **भास्वता ज्ञानदीपेन** - तेजस्वी ज्ञानरूप दिव्याने **अज्ञानजम्, तमः** - अज्ञानजनित अंधःकाराला **नाशयामि** - नष्ट करतो.

**विवरण** - अनादिसिद्ध अज्ञानाच्या द्वारा जी आवरण शक्ती त्या आवरण शक्तीच्यामुळे मनुष्य माझ्या स्वरूपाला यथार्थरूपाने जाणू शकत नाही. म्हणून, हे अर्जुना! मी त्यांच्यावर अनुग्रह करण्यासाठी त्यांच्या अंतःकरणामध्ये स्थित राहून स्वतःच त्यांच्या अज्ञानजनित अंधःकाराला प्रकाशमय तत्त्वज्ञानरूप दीपकाच्या द्वारा नाश करतो.

**व्याकरणम् - तेषाम्** - तत् सर्व.पु.ष.ब.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **अनुकम्पार्थम्** -अनुकम्पा स्त्री. अर्थ पु. द्वि.ए.व. **आत्मभावस्थः** - आत्मन् पु. भाव पु. स्थ वि.पु.प्र.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **भास्वता** - भास् प्र.ग.प.प.+क्विप्=भास्+मतुप्, मस्य वः=भास्वत् वि.पु.तृ.ए.व. **ज्ञानदीपेन** - ज्ञान न. दीप पु.तृ.ए.व. **अज्ञानजम्** - अ+ज्ञा+ल्युट्=अज्ञान+ज=अज्ञानज वि.न.द्वि.ए.व. **तमः** - तम्+असुन्=तमस् न. द्वि.ए.व. **नाशयामि** - नश् च.ग.प.प.णिच्=नाशय प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - ज्ञानदीपेन** - दीपयति प्रकाशयतीति दीपः, ज्ञायते वस्तुतत्त्वमनेनेति ज्ञानमात्मस्वरूप्रकाशको बुद्धिवृत्तिविशेषः स एव दीपो ज्ञानदीपस्तेन ज्ञानदीपेन-स्वप्रकाशेन = प्रकाश करतो तो दीप, याच्या द्वारा वस्तुतत्त्व जाणले जाते ते ज्ञान-आत्मस्वरूपप्रकाशक बुद्धिवृत्तिविशेषच दीप ज्ञानदीप त्या ज्ञानदीपाने (**क.स.**) **आत्मभावस्थः** - आत्मा-अन्तःकरणं तस्य भावो वृत्तिस्तत्र प्रत्यग्रूपेण तिष्ठतीत्यात्मभावस्थः = आत्मा म्ह. अंतःकरण त्याचा भाव म्ह. वृत्ति त्यामध्ये प्रत्यक् रूपाने जो स्थित राहणारा तो आत्मभावस्थ(**क.स.**) यद्वा **आत्मभावस्थः** - आत्मनः-स्वस्य भावः-सत्ता अन्तःकरणाशय आत्मभावः, आत्मभावे तिष्ठतीति आत्मभावस्थः = आत्म्याचा-स्वतःचा भाव म्ह. अंतःकरण आशय-त्यातील एक विशेष वृत्ति त्यामध्ये स्थित रहाणारा अथवा आत्मभावामध्ये(**वि.**) **अनुकम्पार्थम्** -

अनुकम्पाया इत्यनुकम्पार्थम् = अनुकंपा करण्यासाठी(**च.त.स.**) **अज्ञानजम्** - अज्ञानात्-अनाद्यविद्या लक्षणाज्जातमित्यज्ञानजम् = अनादि अविद्यारूप अज्ञानापासून उत्पन्न होणारा जो त्याला(**पं.त.स.**)

अर्जुनाद्वारा भगवंताची स्तुती -

**अर्जुन उवाच** - अर्जुन म्हणाला

**परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् ।**

**पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥१२॥**

**आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा ।**

**असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ॥१३॥**

**अन्वयः** - भवान्, परम्, ब्रह्म, परम्, धाम, परमम्, पवित्रम्, सर्वे, ऋषयः, त्वाम्, पुरुषम्, शाश्वतम्, दिव्यम्, आदिदेवम्, अजम्, विभुम्, आहुः, तथा, देवर्षिः, नारदः, असितः, देवलः, व्यासः, च, स्वयम्, एव, मे, ब्रवीषि ।

**अन्वयार्थः** - **भवान्, परम्, ब्रह्म** - आपण परम ब्रम्ह **परम्, धाम** - परम धाम **परमम्, पवित्रम्** - परम पवित्र आहात कारण की **सर्वे ऋषयः** - सर्व ऋषिगण **त्वाम्** - तुला **पुरुषम्** - पुरुष **शाश्वतम्** - सदा राहणारा **दिव्यम्** - तेजस्वी **आदिदेवम्** - देवांचेही देव **अजम्** - जन्मरहित **विभुम्** - व्यापक आहात असे **आहुः** - म्हणतात **तथा** - त्याचप्रमाणे **देवर्षिः नारदः** - देवर्षी नारद **असितः देवलः** - असित, देवल आणि **व्यासः** - व्यास महर्षी देखील तुला उपर्युक्त कथन केल्याप्रमाणे म्हणतात **च** - आणि **स्वयम्, एव** - तू स्वतःच **मे** - मला **ब्रवीषि** - त्याच प्रमाणे सांगत आहेस.

**विवरण** - अर्जुन म्हणतो की, आपण परं ब्रम्ह, परं धाम, परं पवित्र आहात. कारण की, मीच केवळ म्हणत नाही तर आपल्या मान्यतेला मार्कण्डेयादि ऋषि सुद्धा समर्थन देऊन म्हणतात की आपण सनातन, नित्य, एकरस, विनाशरहित, स्वतः प्रकाशमान ज्ञानस्वरूप, सर्वांचे आदिदेव, उत्पत्तीरूप विकारापासून रहित, सर्वव्यापी त्याचप्रमाणे देवर्षी नारद, असित, देवल आणि व्यास तुला तसेच म्हणतात. त्याचप्रमाणे तू स्वयं सुद्धा मला तसेच कथन करतोस.

**व्याकरणम्** - **भवान्** - भवत् सर्व.पु.प्र.ए.व. **परम्** - पर वि.न.प्र.ए.व. **ब्रह्म** - ब्रह्मन् न.प्र.ए.व. **परम्** - पर वि.न.प्र.ए.व. **धाम** - धामन् न.प्र.ए.व. **परमम्** - परम् वि.न.प्र.ए.व. **पवित्रम्** - पवित्र वि.न.प्र.ए.व. **सर्वे** - सर्व सर्व.पु.प्र.ब.व. **ऋषयः** - ऋषि पु.प्र.ब.व. **त्वाम्** - युष्मत् सर्व.द्वि.ए.व. **पुरुषम्** - पुरुष पु.द्वि.ए.व. **शाश्वतम्** - शाश्वत वि.न.द्वि.ए.व. **दिव्यम्** - दिव्य वि.पु.द्वि.ए.व. **आदिदेवम्** - आदि वि. देव पु.द्वि.ए.व. **अजम्** - अज वि.पु.द्वि.ए.व. **विभुम्** - विभु वि.पु.द्वि.ए.व. **आहुः** - ब्रू द्वि.ग.उ.प.(प.प.)वर्त.तृ.पु.ब.व. **तथा** - तथा क्रि.वि.अ. **देवर्षिः** - देव पु. ऋषि पु.प्र.ए.व. **नारदः** - नारद पु.प्र.ए.व. **असितः** - असित पु.प्र.ए.व. **देवलः** - दिव् च.ग.प.प.+अलच्=देवल पु.प्र.ए.व. **व्यासः** - वि+अस् प्र.ग.उ.प.+घञ्=व्यास पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **स्वयम्** - स्वयम् अ. **एव** - एव क्रि.वि.अ. **मे** - अस्मत् सर्व.च.ए.व. **ब्रवीषि** - ब्रू द्वि.ग.उ.प.(प.प.)वर्त.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - देवर्षिः** - देवश्चासौ ऋषिश्चेति देवर्षिः = देव आणि ऋषी देवर्षी(**क.स.**) यद्वा **देवर्षिः** - देवानां वा देवेषु ऋषिरिति देवर्षिः = देवांचे किंवा देवांमध्ये ऋषी असे देवर्षी(**ष./सप्त.त.स.**) **आदिदेवम्** - सर्वकारणत्वादादि आदौ भव इत्यादिः, द्योतनशीलत्वाद् देवः, आदिश्चासौदेवश्चेत्यादिदेवस्तमादिदेवम्-मूलकारणम् = सर्वांचे कारण असल्यामुळे अथवा सर्व देवांच्या उत्पत्तिचे पूर्वी रहाणारा तो आदि आणि द्योतनशील-प्रकाशरूप असल्यामुळे देव असा तो आदिदेव(**क.स.**) **पवित्रम्** - पूयतेऽनेनेति पवित्रम् = ज्याच्या द्वारा पवित्र केले जाते ते पवित्र(**वि.**) **तथा** - तेन प्रकारेण तथा = त्याचप्रमाणे(**तसिल् थाल् प्रत्ययांत वि.**) **नारदः** - नारम्-परमात्मविषयकं ज्ञानं ददाति इति नारदः = नार परमात्म्याविषयी ज्ञान देतो तो नारद(**वि.**) यद्वा **नारदः** - नराणाम्-समूहो नारः, नारं द्यति-खंडयति इति नारदः = नरांचा समूह नार त्यांच्यात अनेक प्रकारे विवाद करून देणारा-करणारा तो नारद(**वि.**) यद्वा **नारदः** - नारम्-अज्ञानं द्यति-खंडयतीति नारदः = नार-अज्ञानाचे खंडण करणारा असा नारद(**वि.**)

अर्जुनाच्याद्वारा भगवंताच्या प्रभावाचे वर्णन -

**सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव ।**

**न हि ते भगवन्व्यक्तिंविदुर्देवा न दानवाः ॥१४॥**

**अन्वयः** - केशव, यत्, माम्, वदसि, एतत्, सर्वम्, ऋतम्, मन्ये, भगवन्, ते, व्यक्तिम्, देवाः, न, विदुः, दानवाः, न, विदुः ।

**अन्वयार्थः - केशव** - हे केशवा! **यत्** - जे **माम्** - मला **वदसि** - कथन करीत आहेस **एतत्, सर्वम्** - हे सर्व **ऋतम्, मन्ये** - सत्य मानतो **भगवन्** - हे भगवान! **ते व्यक्तिम्** - तुझ्या निर्गुण स्वरूपाला **देवाः न विदुः** - देवता लोक जाणत नाहीत **दानवः न विदुः** - दानव लोक जाणत नाहीत.

**विवरण** - आतापर्यंत व्यासदेवलादि ऋषिलोकांनी तुझ्या स्वरूपाच्या केलेल्या कथनाला, त्याचप्रमाणे तू देखील माझ्याजवळ केलेल्या तुझ्या स्वरूपाच्या वर्णनाला मी सत्य मानतो यामध्ये यत्किञ्चितसुद्धा संदेह नाही. असे जे आपले स्वरूप त्या स्वरूपाला देव जाणत नाहीत, तर दानवसुद्धा जाणत नाहीत असे तुझे स्वरूप अतिशय व्यापक आहे. म्हणजे तुझ्या स्वरूपाचा अंत कोणालाच लागत नाही.

**व्याकरणम् - केशव** - केशव पु.संबो.ए.व. **यत्** - यत् सर्व.न.द्वि.ए.व. **माम्** -अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **वदसि** - वद् प्र.ग.प.प.वर्त.द्वि.पु.ए.व. **एतत्** - एतत् सर्व.न.द्वि.ए.व. **सर्वम्** - सर्व सर्व.न.द्वि.ए.व. **ऋतम्** - ऋ प्र.ग.आ.प.भावे.भू.धा.वि.न.द्वि.ए.व. **मन्ये** - मन् च.ग.आ.प.वर्त.प्र.पु.ए.व. **भगवन्** - भगवत् पु.संबो.ए.व. **ते** - युष्मत् सर्व.ष.ए.व. **व्यक्तिम्** - व्यक्ति स्त्री.द्वि.ए.व. **देवाः** - देव पु.प्र.ब.व. **न** - न क्रि.वि.अ. **विदुः** - विद् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **दानवाः** - दानव पु.प्र.ब.व. **न** - न क्रि.वि.अ. **विदुः** - विद् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - देवाः** - दीव्यन्ति ते देवाः-प्रकाशमानाः = प्रकाशित होणारे ते देव(**वि.**) **दानवाः** - दनोरपत्यानि पुमांसस्ते दानवाः = दनुचे अपत्य जे पुत्र ते दानव(**त.अ.वि.**) **व्यक्तिम्** - व्यज्यते सर्वमस्या इति व्यञ्जयतीति वा व्यक्तिस्तां व्यक्तिम् = संपूर्ण जिच्या पासून प्रगट होते अथवा जी सर्वांना प्रगट करते ती व्यक्ति तिला(**वि.**)

**स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम ।**

**भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ॥१५॥**

**अन्वय:** - पुरुषोत्तम, भूतभावन, भूतेश, देवदेव, जगत्पते, त्वम्, स्वयम्, एव, आत्मना, आत्मानम्, वेत्थ ।

**अन्वयार्थ:** - **पुरुषोत्तम** - हे पुरुषोत्तमा! **भूतभावन** - हे प्राणिमात्रांना उत्पन्न करणाऱ्या! **भूतेश** - हे सर्व भूतांच्या ईश्वरा! **देवदेव** - हे सर्व देवांच्या देवा! **जगत्पते** - हे संपूर्ण जगताच्या पालका! **त्वम्** - तू **स्वयम्, एव** - स्वत:च **आत्मना** - आपल्याद्वारा **आत्मानम्** - स्वत:ला **वेत्थ** - जाणतोस.

**विवरण** - अर्जुन म्हणतो की, हे संपूर्ण प्राणिमात्रांना उत्पन्न करणाऱ्या भूतभावना! संपूर्ण प्राणिमात्रांना नियमित चालविणाऱ्या तसेच सर्वांना शासित करणाऱ्या हे भूतेशा! देवांचाही पूजनीय असणाऱ्या हे देवदेवा! संपूर्ण जगाच्या पालन करणाऱ्या हे जगत्पते! क्षर आणि अक्षर या दोन्हीमध्ये उत्तम असणाऱ्या हे पुरुषोत्तमा! तू स्वत:च आपल्याद्वारा आपल्यास जाणतोस. गुण, प्रभाव, लीला, माहात्म्य असे जे तुझे स्वरूप आहे त्याच्या स्वरूपाला दुसरा कोणी पुरुष पूर्णतया जाणू शकत नाही. तूच स्वत: आपल्याद्वारा आपल्या प्रभावाला जाणतोस.

**व्याकरणम्** - **पुरुषोत्तम** - पुरुष पु. उत्तम वि.पु.संबो.ए.व. **भूतभावन** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. भावन वि.पु.संबो.ए.व. **भूतेश** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. ईश वि.पु.संबो.ए.व. **देवदेव** - देवदेव पु.संबो.ए.व. **जगत्पते** - जगत् न. पति पु.संबो.ए.व. **त्वम्** - युष्मत् सर्व.प्र.ए.व. **स्वयम्** - स्वयम् अ. **एव** - एव क्रि.वि.अ. **आत्मना** - आत्मन् पु.तृ.ए.व. **आत्मानम्** - आत्मन् पु.द्वि.ए.व. **वेत्थ** - विद् द्वि.ग.प.प.वर्त.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **भूतेश** - भूतानाम्-प्राणिमात्राणाम्, ईश:-स्वामी भूतेशस्तत्सम्बुद्धौ भूतेश = भूतांचा ईश तो भूतेश त्याचे संबोधनामध्ये हे भूतेश**(ष.त.स.)** **देवदेव** - देवानाम्-सुराणाम् देव: देवदेवस्तत्संबुद्धौ देवदेव = देवांचा देव तो देवदेव**(ष.त.स.)** **जगत्पते** - जगत:-संसारस्य पति:-स्वामी जगत्पतिस्तत्संबुद्धौ जगत्पते = जगाचा पति जगत्पति संबोधनामध्ये हे जगत्पते**(ष.त.स.)** **पुरुषोत्तम्** - पुरुषाणां वा पुरुषेषु अथवा क्षराक्षरयोर्मध्ये उत्तम: पुरुषोत्तमस्तत्संबुद्धौ पुरुषोत्तम = पुरुषामध्ये अथवा क्षर आणि अक्षरामध्ये उत्तम असा पुरुषोत्तम**(ष.स.त.स.)** **भूतभावन** - भूतानि आकाशादीनि स्तम्बान्तानि भावयति-उत्पादयति स्वस्मादेव संभावयतीति भूतभावनस्तत्संबुद्धौ भूतभावन = आकाशापासून स्तंबापर्यंत भूतांना उत्पन्न करणारा तो भूतभावन संबोधनामध्ये हे भूतभावन**(उप.स.)**

भगवंताच्या विभूतिला जाणण्याकरीता अर्जुनाची इच्छा -

**वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतय: ।**

**याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥१६॥**

**अन्वय:** - हि, याभि:, विभूतिभि:, त्वम्, इमान्, लोकान्, व्याप्य, तिष्ठसि, दिव्या:, आत्मविभूतय:, अशेषेण, वक्तुम्, अर्हसि ।

**अन्वयार्थ:** - **हि** - कारण (म्हणून) **याभि: विभूतिभि:** - ज्या विभूतिंच्या द्वारा **त्वम्** - तू **इमान्, लोकान्** -

या सर्व लोकांना **व्याप्य** - व्याप्त करून **तिष्ठसि** - राहतोस **दिव्या: आत्मविभूतय:** - त्या दिव्य आपल्या विभूति **अशेषेण** - पूर्णत्वाने **वक्तुम्, अर्हसि** - कथन करण्याकरिता तूच योग्य आहेस.

**विवरण** - संपूर्ण लोकांमध्ये जे पदार्थ तेज, बल, विद्या, ऐश्वर्य, गुण आणि शक्ति आदिच्या द्वारा संपन्न आहेत; त्या संपूर्ण विभूति आपल्याच आहेत. अशा आपल्या दिव्य विभूतिंना तूं स्वत:च कथन करण्याकरिता समर्थ आहेस. कारण की, ज्या विभूतिच्या द्वारा तूच सर्व लोकांना व्याप्त करून स्थित राहिला आहेस.

**व्याकरणम्** - **हि** - हि क्रि.वि.अ. **याभि:** - यत् सर्व.स्त्री.तृ.ब.व. **विभूतिभि:** - विभूति स्त्री.तृ.ब.व. **त्वम्** - युष्मत् सर्व.प्र.ए.व. **इमान्** - इदम् सर्व.पु.द्वि.ब.व. **लोकान्** - लोक पु.द्वि.ब.व. **व्याप्य** - वि+आप् पं.ग.प.प.ल्यबन्त अ. **तिष्ठसि** - स्था प्र.ग.प.प.वर्त.द्वि.पु.ए.व. **दिव्या:** - दिव्या वि.स्त्री.प्र.ब.व. **आत्म विभूतय:** - आत्मन् पु. विभूति स्त्री.प्र.ब.व. **अशेषेण** - अशेष पु.तृ.ए.व. **वक्तुम्** - वच् द्वि.ग.प.प.तुमन्त अ. **अर्हसि** - अर्ह् प्र.ग.प.प.वर्त.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **आत्मविभूतय:** - दिव्यास्तेजोबलपौरुषशक्तिप्रकाशादिगुणैरप्राकृता आत्मन:-स्वस्य वा परमेश्वरस्य या विभूतय:-ऐश्वर्याणीत्यात्मविभूतय: = दिव्य, तेज, बल, पौरुषशक्ति, प्रकाश आदि गुणांच्या द्वारा अप्राकृत आपल्या म्ह. परमेश्वराच्या ज्या विभूति म्ह. ऐश्वर्य अशा या आत्मविभूति**(ष.त.स.)**

भगवत् चिंतनाच्या विषयामध्ये अर्जुनाचा प्रश्न -

**कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिन्तयन्।**

**केषु केषु च भावेषु चिन्त्योऽसि भगवन्मया ॥१७॥**

**अन्वय:** - योगिन्, (त्वाम्), सदा, परिचिन्तयन्, अहम्, त्वाम्, कथम्, विद्याम्, भगवन्, च, केषु, केषु, भावेषु, मया, चिन्त्य:, असि।

**अन्वयार्थ:** - **योगिन्** - हे योगेश्वरा! **सदा परिचिन्तयन्** - तुझे निरंतर स्मरण करणारा **अहम्** - मी **त्वाम्** - तुला **कथम्** - कोणत्या प्रकाराने **विद्याम्** - जाणावे **भगवन्** - हे भगवन! **च** - आणि **केषु केषु भावेषु** - कोणकोणत्या पदार्थामध्ये **मया** - माझ्याद्वारा **चिन्त्य:** - स्मरण करण्याकरिता योग्य **असि** - आहेस.

**विवरण** - दोन प्रश्न विचारणारा अर्जुन म्हणतो की, हे योगेश्वर! श्रद्धा आणि प्रेमाच्या बरोबर सर्वदा तुझे चिंतन करणारा मी गुण प्रभाव आणि ऐश्वर्य संपन्न युक्त अशा तुला (ईश्वराला) कोणत्या प्रकाराने जाणावे. हे भगवंता! जगतामध्ये जेवढे काही जड चेतन चराचर पदार्थ आहेत. त्यामध्ये कोणत्या पदार्थाला मी आपले स्वरूप समजून त्या पदार्थाचे चिंतन करण्याकरिता तू योग्य आहेस.

**व्याकरणम्** - **योगिन्** - युज् स.ग.प.प.+घुनिन्=योगिन् पु.संबो.ए.व. **सदा** - सदा अ. **परिचिन्तयन्** - परि+चिन्त् द.ग.उ.प.(प.प.)कर्त.वर्त.धा.वि.पु.प्र.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **त्वाम्** - युष्मत् सर्व. द्वि.ए.व. **कथम्** - कथम् अ. **विद्याम्** - विद् द्वि.ग.प.प.विध्यर्थ प्र.पु.ए.व. **भगवन्** - भगम् ऐश्वर्यम्+मतुप्, मस्य व:=भगवत् पु.संबो.ए.व. **च** - च उभ.अ. **केषु केषु** - किम् सर्व.पु.स.ब.व. **भावेषु** - भाव पु.स.ब.व. **मया** - अस्मत् सर्व.तृ.ए.व. **चिन्त्य:** - चिन्त् द.ग.प.प.कर्म.विध्यर्थ धा.वि.पु.प्र.ए.व. **असि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - परिचिन्तयन्** - परिचिन्तयतीति परिचिन्तयन् = चिंतन करीत असतांना**(वि.) चिन्त्यः** - चिन्तितुं योग्यश्चिन्त्यः-चिन्तनीयः = चिंतन करण्याकरिता योग्य**(कृ.वि.) कथम्** - केन प्रकारेण कथम् = कोणत्या प्रकाराने**(वि.)**

योगशक्ति आणि विभूति यांचे स्वरूप विस्ताराने सांगण्याकरिता अर्जुनाची प्रार्थना -

**विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन।**

**भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम् ॥१८॥**

**अन्वयः** - जनार्दन, आत्मनः, योगम्, च, विभूतिम्, विस्तरेण, भूयः, कथय, हि, अमृतम्, शृण्वतः, मे, तृप्तिः, न, अस्ति।

**अन्वयार्थः - जनार्दन** - हे जनार्दना! **आत्मनः** - आपल्या **योगम्** - योगशक्तिला **च** - आणि **विभूतिम्** - विभूतिला **भूयः** - पुन्हा **विस्तरेण** - विस्तारपूर्वक **कथय** - सांग **हि** - कारण **अमृतम्, शृण्वतः** - अमृतासारखे वचन श्रवण करणाऱ्या **मे तृप्तिः** - माझी तृप्ती **न अस्ति** - होत नाही.

**विवरण** - हे जनार्दन! आपल्या जवळ असणाऱ्या इष्ट वस्तुची इच्छा करणाऱ्या प्राणिमात्रांची आपण स्वतः इच्छा पूर्ण करण्याकरिता योग्य आहात. म्हणून मी सुद्धा आपणाला एक प्रार्थना करीत आहे की, आपण मला आपल्या योगशक्तिला आणि विभूतिला पुन्हा एकवेळ विस्तारपूर्वक सांगा. कारण की, आपले अमृत वचन ऐकणाऱ्या माझी केव्हाही तृप्ती होत नाही म्हणजे पुन्हा पुन्हा ऐकण्याची इच्छा अवशिष्ट राहाते.

**व्याकरणम् - जनार्दन** - जनार्दन पु.संबो.ए.व. **आत्मनः** - आत्मन् पु.ष.ए.व. **योगम्** - योग पु.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **विभूतिम्** - विभूति स्त्री.द्वि.ए.व. **विस्तरेण** - विस्तर पु.तृ.ए.व. **भूयः** - भूयस् अ. **कथय** - कथ् द.ग.उ.प.(प.प.)आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **हि** - हि क्रि.वि.अ. **अमृतम्** - अमृत वि.पु.द्वि.ए.व. **शृण्वतः** - श्रु शतृ प्रत्ययान्त प्र.ग.प.प.कर्त.वर्त.धा.वि.पु.ष.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **तृप्तिः** - तृप् च.ग.प.प.+क्तिन्=तृप्ति स्त्री.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अस्ति** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - जनार्दन** - जायत इति जनो दृश्यवर्गस्तमन्तर्बहिश्च सर्वतोऽर्दति व्याप्नोतीति जनार्दनस्तस्य संबुद्धिः जनार्दन-सर्वव्यापिन् = जो उत्पन्न होतो तो जन म्ह. दृश्यवर्ग त्याला आत बाहेर सर्व बाजूंनी जो अर्दन करतो म्ह. व्याप्त करतो तो जनार्दन त्याचे संबोधनामध्ये हे जनार्दन**(वि.)**

विभूतिचे अनन्तत्त्व दाखवून प्रधान प्रधान विभूति सांगण्याकरिता भगवंताची प्रतिज्ञा -

**श्रीभगवानुवाच** - श्री भगवान म्हणाले

**हन्त ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः।**

**प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यन्तो विस्तरस्य मे ॥१९॥**

**अन्वयः** - कुरुश्रेष्ठ, हन्त, ते, दिव्या, आत्मविभूतयः, प्राधान्यतः, कथयिष्यामि, हि, मे, विस्तरस्य, अन्तः, न, अस्ति।

**अन्वयार्थः - कुरुश्रेष्ठ** - हे कुरुश्रेष्ठ! **हन्त** - ठीक आहे मी **ते** - तुला **दिव्या आत्मविभूतयः** - माझ्या दिव्य

विभूति **प्राधान्यतः** - मुख्य मुख्य **कथयिष्यामि** - सांगेन **हि** - कारण **मे विस्तरस्य** - माझ्या (विभूति) विस्ताराचा **अन्तः** - शेवट, **न अस्ति** - नाही.

**विवरण** - कुरुवंशामध्ये उत्पन्न झालेल्या हे सर्व श्रेष्ठ अर्जुना! माझ्या ज्या अनंत विभूति आहेत त्या श्रवण करण्याकरिता तू योग्य अधिकारी आहेस म्हणून मी आपल्यासारख्या योग्य अधिकाऱ्याला माझ्या असणाऱ्या मुख्य मुख्य विभूति कथन करील, त्या सावधानपूर्वक (मन एकाग्र करून) ऐक. कारण की, माझ्या विभूति विस्ताराचा कोठेच अन्त नाही.

**व्याकरणम्** - **कुरुश्रेष्ठ** - कुरु पु. श्रेष्ठ वि.पु.संबो.ए.व. **हन्त** - हन्त खेदवाचक अ. **ते** - तत् सर्व.च.ए.व. **दिव्याः** - दिव्य वि.स्त्री.प्र.ब.व. **आत्मविभूतयः** - आत्मन् पु.ष.ए.व. **विभूति** - वि.स्त्री.प्र.ब.व. **प्राधान्यतः** - प्र+धा+ल्युट्+भावे ष्यञ्+तसिल्=प्राधान्यतः अ. **कथयिष्यामि** - कथ् द.ग.उ.प.(प.प.)द्वि.भ वि.प्र.पु.ए.व. **हि** - हि क्रि.वि.अ. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **विस्तरस्य** - वि+स्तृ न.ग.उ.प./ पं.ग.उ.प.+अप्=विस्तर पु.ष.ए.व. **अन्तः** - अन्त वि.पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अस्ति** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **कुरुश्रेष्ठ** - कुरुषु-कुरुवंशेषु अथवा कुरुवंशानाम् श्रेष्ठः-प्रधानः कुरुश्रेष्ठस्तत्संबुद्धिः कुरुश्रेष्ठ = कुरुवंशामध्ये श्रेष्ठ-प्रधान असा कुरुश्रेष्ठ त्याचे संबोधनामध्ये हे कुरुश्रेष्ठ**(स./ष.त.स.) आत्मविभूतयः** - आत्मनः-स्वस्य या विभूतिस्ता इत्यात्मविभूतयः = आपल्या-स्वतःच्या ज्या विभूति त्या आत्मविभूति **(ष.त.स.)**

सर्वात्मरूपाने भगवंताच्या स्वरूपाचे कथन -

**अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः ।**

**अहमादिश्च मध्यं च भूतानामन्त एव च ॥२०॥**

**अन्वयः** - गुडाकेश, अहम्, सर्वभूताशयस्थितः, आत्मा, च, अहम्, भूतानाम्, आदिः, च, मध्यम्, च, अन्तः, एव ।

**अन्वयार्थः** - **गुडाकेश** - हे अर्जुना! **अहम्** - मी **सर्वभूताशयस्थितः** - सर्वभूतांच्या हृदयामध्ये स्थित असणारा **आत्मा** - आत्मा आहे **च** - आणि **अहम्** - मीच **भूतानाम्** - सर्वभूतांचा **आदिः** - आदि-कारण **च** - आणि **मध्यम्** - मध्य **च अन्तः एव** - अन्तही आहे.

**विवरण** - हे अर्जुना! सर्वशक्तिमान् मी सर्व प्राणिमात्रांच्या हृदयदेशामध्ये आत्मत्त्वाने स्थित आहे म्हणून सर्वांचा आत्माही आहे. तसेच सर्वभूते माझ्यापासून उत्पन्न होतात म्हणून मी आदिकारण आहे. माझ्या मध्येच स्थित असतात म्हणून मध्य आणि माझ्यामध्येच लीन होतात म्हणून मी सर्व प्राणिमात्रांचा अंत आहे. अशा प्रकारे सर्व प्राणिमात्रांचा मूल कारण आणि मूलाधार मीच आहे.

**व्याकरणम्** - **गुडाकेश** - गुडाका स्त्री. ईश वि.पु.संबो.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **सर्वभूताशय स्थितः** - सर्व वि. भूत वि. आशय पु. स्था प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **आत्मा** - आत्मन् पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **भूतानाम्** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा. वि.पु.ष.ब.व. **आदिः** - आदि वि.पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **मध्यम्** - मध्य वि.न.प्र.ए.व. **च** - च

उभ.अ. **अन्तः** - अन्त वि.पु.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ.

**समासविग्रहार्थाः - सर्वभूताशयस्थितः** - सर्वाणिच तानि भूतानि सर्वभूतानि, सर्वभूतानाम्-आशयः-बुद्धिः सर्वभूताशयस्तस्मिन् अन्तर्यामितया तिष्ठतीति सर्वभूताशयस्थितः = सर्वभूतांच्या हृदयदेशामध्ये अंतर्यामिरूपाने स्थित असणारा**(कर्म.ग.ष.त.ग.स.त.स.)** यद्वा **सर्वभूताशयस्थितः** - सर्वेषाम्-ब्रह्मादिस्तम्बान्तानां प्राणिनामाशये आसमन्तात्सर्वतः शेते शयान इव नैश्चल्येनाऽऽत्मा तिष्ठति यत्र स आशयो बुद्धिगुहा तत्र स्वरूपत्वेन सर्वप्रकाशकत्वेन साक्षित्वेन च तिष्ठतीति सर्वभूताशयस्थितः = ब्रह्मापासून तर स्तंबापर्यंत सर्व प्राण्यांच्या आशयामध्ये सर्व बाजूंनी निद्रा घेत असल्याप्रमाणे निश्चलरूपाने ज्याठिकाणी आत्मा स्थित राहातो तो आशय म्ह. बुद्धीगुहा त्या ठिकाणी स्वरूपाने म्ह. सर्वप्रकाशकरूपाने आणि साक्षिरूपाने जो स्थित आहे तो सर्वभूताशयस्थित**(ष.त.ग.स.त.स.) आत्मा** - अतति-सातत्येन सर्वत्र गच्छतीत्यात्मा यद्वा अतन-ोतीत्यात्मा यद्वा व्याप्नोतीत्यात्मा = सर्वत्र जाणारा विस्ताररूपाने राहणारा म्ह. व्यापक असणारा तो आत्मा **(वि.)**

विष्णु आदि विभूतिंचे कथन -

**आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान्।**

**मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ॥२१॥**

**अन्वयः** - अहम्, आदित्यानाम्, विष्णुः, ज्योतिषाम्, अंशुमान्, रविः, मरुताम्, मरीचिः, अस्मि, अहम्, नक्षत्राणाम्, शशी।

**अन्वयार्थः - अहम्** - मी **आदित्यानाम्** - आदितिच्या बारा पुत्रांमध्ये **विष्णुः** -विष्णु आहे **ज्योतिषाम् अंशुमान्, रविः** - तेजस्वी पदार्थांमध्ये किरणशाली सूर्य मी आहे **मरुताम्, मरीचिः** - एकोणपन्नास मरुद् गणांमध्ये मरीचि **अस्मि** - मी आहे **अहम्** - मी **नक्षत्राणाम्, शशी** - नक्षत्रामध्ये मी चंद्रमा आहे.

**विवरण** - अदितिचे धाता, मित्र, अर्यमा, शक्र, वरूण, अंश, भग, विवस्वान, पूषा, सविता, त्वष्टा आणि विष्णु या द्वादश (बारा) पुत्रामध्ये जो विष्णु आहे तो मीच आहे. सूर्य, चन्द्रमा, तारांगण, विद्युत् आणि अग्नि आदि प्रकाशमान् सर्व पदार्थांमध्ये सूर्यरूपाने मीच आहे. तसेच एकोणपन्नास मरुत् ते असे सत्त्वज्योती, आदित्य, सत्यज्योती, तिर्यग्ज्योती, सज्योती, ज्योतिष्मान्, हरित, ऋतजित्, सत्यजित्, सुषेण, सेनजित्, सत्यमित्र, अभिमित्र, हरिमित्र, कृत, ध्रुर्व, धर्ता, विधर्ता, विधारय, ध्वान्त, धुनि, उग्र, भीम, अभियु, साक्षिप, ईदृक्, अन्यादृक्, यादृक्, प्रतिकृत्, ऋक्, समिति, संरम्भ, ईदृक्ष, पुरुष, अन्यादृक्ष, चेतस, समिता, समिदृक्ष, प्रतिदृक्ष, मरुती, सरत, देव, दिश, यजुः, अनुदृक्, साम, मानुष, आणि विश् एकोणपन्नास मरुतामध्ये मरीचि (तेज) मी आहे. अश्विनी, भरणी, कृत्तिका आदि सत्तावीस नक्षत्रांमध्ये सर्वांचा स्वामी (राजा) चन्द्रमा मीच आहे.

**व्याकरणम् - अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **आदित्यानाम्** - आदित्य वि.पु.ष.ब.व. **विष्णुः** - विष् तृ.ग.उ.प.+नुक्=विष्णु पु.प्र.ए.व. **ज्योतिषाम्** - ज्योतिस् न.ष.ब.व. **अंशुमान्** - अंश् पं.ग.आ.प.+कु=अंशु+मतुप्=अंशुमत् पु.प्र.ए.व. **रविः** - रवि पु.प्र.ए.व. **मरुताम्** - मरुत् पु.ष.ब.व. **मरीचिः** - मरीचि पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **नक्षत्राणाम्**

- नक्षत्र न.ष.ब.व. **शशी** - शशिन् पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - आदित्यानाम्** - अदितेरपत्यानि पुंमास आदित्यास्तेषां आदित्यानाम् = अदितिची अपत्ये (पुत्र) आदित्ये त्या आदित्यांचा**(तद्धि.अस्त्यर्थे वि.) अंशुमान्** - अंशव:-किरणानि विद्यन्ते यस्य स: अंशुमान् = किरणे आहेत ज्याची तो अंशुमान्**(अस्त्यर्थे तद्धि.वि.)**

सामवेदादि विभूतिंचे कथन -

**वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः।**

**इन्द्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना॥२२॥**

**अन्वय:** - वेदानाम्, सामवेद:, अस्मि, देवानाम्, वासव:, अस्मि, च, इन्द्रियाणाम्, मन:, अस्मि, भूतानाम्, चेतना, अस्मि।

**अन्वयार्थ: - वेदानाम्** - वेदांमध्ये **सामवेद:** - सामवेद **अस्मि** - मी आहे **देवानाम् -** देवांमध्ये **वासव: -** इंद्र **अस्मि -** मी आहे **च** - आणि **इन्द्रियाणाम्** - इंद्रियांमध्ये **मन: अस्मि** - मन मी आहे **भूतानाम्** - प्राणीमात्रांमध्ये **चेतना** - चैतन्य **अस्मि** - मी आहे.

**विवरण** - ऋक्, यजु, साम आणि अथर्व या चार वेदांमध्ये अत्यंत मधुर आणि संगीतमय तसेच परमेश्वराच्या अत्यंत रमणीय स्तुतिंच्या द्वारा युक्त असा जो सामवेद आहे तो मीच आहे. सूर्य, चंद्र, अग्नि, वायु आदि जेवढ्या काही देवता आहेत त्या सर्वांचा राजा जो इंद्र तो मीच आहे म्हणजे तो माझे स्वरूप आहे. नेत्र, कान, त्वचा, रसना, घ्राण, वाणी, हात, पाय, मलत्यागेंद्रिय, मूत्रत्यागेंद्रिय तसेच सर्व इंद्रियांचा राजा, प्रेरक, सर्वांपेक्षा सूक्ष्म आणि श्रेष्ठ असे जे प्रधानभूत मन ते मीच आहे. संपूर्ण प्राणिमात्रांच्या ठिकाणी जी ज्ञानशक्ति आहे की, जिच्या द्वारा ज्यांना सुखदु:खाचा आणि संपूर्ण पदार्थाचा अनुभव होतो, अशी जी चेतना शक्ति ती मीच आहे.

**व्याकरणम् - वेदानाम्** - वेद पु.ष.ब.व. **सामवेद:** - सामवेद पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **देवानाम्** - देव पु.ष.ब.व. **वासव:** - वस् द.ग.उ.प.+उ=वसु+अण्=वासव पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **इन्द्रियाणाम्** - इन्द्रिय न.ष.ब.व. **मन:** - मनस् न.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग. प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **भूतानाम्** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा. वि.न.ष.ब.व. **चेतना** - चेतना वि.स्त्री.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - वासव:** - वसोरपत्यमिति वासव:-इन्द्र: = वसूचा अपत्य (संतान) वासव-इंद्र**(अस्त्यर्थे वि.) भूतानाम्** - भवन्तीति भूतानि-शरीराणि जीवाधिष्ठितानि तेषां भूतानाम् = जे होतात ते भूत म्हणजे जीवाच्याद्वारा अधिष्ठित शरीर त्यांचे**(वि.) चेतना** - बुद्ध्यादिस्थूलान्तं सर्व चेतयतीति चेतना-साभासा बुद्धिवृत्ति: = बुद्धी पासून तर स्थूलापर्यंत सर्व पदार्थांना चेतन करते ती चेतना म्ह. बुद्धिची साभासवृति**(वि.)**

शंकरादि विभूतिंचे वर्णन -

**रुद्राणां शङ्करश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम्।**

**वसूनां पावकश्चास्मि मेरु: शिखरिणामहम्॥२३॥**

**अन्वय:** - रुद्राणाम्, शंकर:, अस्मि, च, यक्षरक्षसाम्, वित्तेश:, वसूनाम्, पावक:, अस्मि, च, अहम्, शिखरिणाम्, मेरु: ।

**अन्वयार्थ:** - **रुद्राणाम्** - अकरा रूद्रांमध्ये **शंकर:** - शंकर **अस्मि** - मी आहे **च** - आणि **यक्षरक्षसाम्** - यक्ष, राक्षसांमध्ये **वित्तेश:** - कुबेर मी आहे **वसूनाम्** - आठ वसूंमध्ये **पावक:** - अग्नि **अस्मि** - मी आहे **च** - आणि **अहम्** - मी **शिखरिणाम्** - शिखरयुक्त पर्वतांमध्ये **मेरु:** - मेरु पर्वत आहे.

**विवरण** - हर, बहुरूप, त्र्यंबक, अपराजित, वृषाकपि, शंभु, कपर्दी, रेवत, मृगव्याध, शर्व आणि कपाली या अकरा रूद्रांमध्ये असणारा सर्वांचा राजा, कल्याणप्रदाता आणि कल्याणस्वरूप शंकर मीच आहे म्हणजे तो माझे स्वरूप आहे. यक्ष आणि राक्षसांमध्ये असणारा कुबेर मीच आहे. धर, ध्रुव, सोम, अह:, अनिल, अनळ, प्रत्यूष आणि प्रभास या आठ वसूंमध्ये असणारा सर्वांचा स्वामी जो अनळ तो मीच आहे. शिखरयुक्त पर्वतांमध्ये प्रधानभूत असणारा जो मेरूपर्वत तो मीच आहे.

**व्याकरणम्** - **रुद्राणाम्** - रुद्र पु.ष.ब.व. **शंकर:** - शंकर पु.प्र.ए.व. **अस्मि** -अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **यक्षरक्षसाम्** - यक्ष पु. रक्षस् न.ष.ब.व. **वित्तेश:** - विद् स.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि. ईश वि.पु.प्र.ए.व. **वसूनाम्** - वसु पु.ष.ब.व. **पावक:** - पू न.ग.उ.प.+ण्वुल्=पौ+अक=पावक पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **शिखरिणाम्** - शिखरिन् पु.ष.ब.व. **मेरु:** - मेरु पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **यक्षरक्षसाम्** - यक्षाश्च रक्षांसि च यक्षरक्षांसि तेषां यक्षरक्षसाम् = यक्ष आणि राक्षसांचा **(इतरेतर द्वं.स.)** **वित्तेश:** - वित्तानाम्-द्रव्याणाम्, ईश:-स्वामी, वित्तेश:-कुबेर: = द्रव्याचा मालक तो वित्तेश-कुबेर**(ष.त.स.)** **शिखरिणाम्** - शिखराणि येषां सन्ति ते शिखरिण:-पर्वतास्तेषां शिखरिणाम्-पर्वतानाम् = शिखरे आहेत ज्यांची अथवा ज्यांच्यामध्ये ते शिखरिण त्यांच्यामध्ये**(अस्त्यर्थे त.वि.)** **पावक:** - पुनातीति पावक: = पवित्र करणारा तो पावक**(वि.)**

बृहस्पति आदि विभूतिंचे कथन -

**पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम् ।**

**सेनानीनामहं स्कन्द: सरसामस्मि सागर: ॥२४॥**

**अन्वय:** - पार्थ, पुरोधसाम्, मुख्यम्, बृहस्पतिम् माम्, विद्धि, अहम्, सेनानीनाम्, स्कन्द:, सरसाम्, सागर:, अस्मि ।

**अन्वयार्थ:** - **पार्थ** - हे पृथापुत्र अर्जुना! **पुरोधसाम्** - पुरोहितांमध्ये **मुख्यम्** - जो मुख्य **बृहस्पतिम्** - बृहस्पती आहे **माम्** - तो मी **विद्धि** - जाण **अहम्** - मी **सेनानीनाम्** - सेनापतिंमध्ये **स्कन्द:** - कार्तिकस्वामी आहे **सरसाम्** - जलाशयांमध्ये **सागर:** - समुद्र **अस्मि** - मी आहे.

**विवरण** - पुरोहितांमध्ये श्रेष्ठ (प्रधान) जो देवराज इंद्राचा गुरु बृहस्पति तो मी आहे म्हणजे बृहस्पती मलाच जाण. सहा मुखे व बारा हात असलेला महादेवाचा पुत्र आणि संपूर्ण सेनापतिंमध्ये श्रेष्ठ (प्रधान) असा जो स्कंद-कार्तिकस्वामी तो मीच आहे. पृथ्वीमध्ये निहित संपूर्ण सरोवरांमध्ये मोठा असणारा सर्वांचा राजा असा तो समुद्र तो मीच आहे.

**व्याकरणम्** - **पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **पुरोधसाम्** - पुरोधस् पु.ष.ब.व. **मुख्यम्** - मुख्य वि.पु.द्वि.ए.व. **बृहस्पतिम्** - बृहस्पति पु.द्वि.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **विद्धि** - विद् द्वि.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **सेनानीनाम्** - सेनानी पु.ष.ब.व. **स्कन्दः** - स्कन्द पु.प्र.ए.व. **सरसाम्** - सृ प्र.ग.प.प.+असुन्=सरस् न.ष.ब.व. **सागरः** - सगर+अण्=सागर पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **सागरः** - सगरस्य अयमिति सागरः-समुद्रः = सगर संबंधी जो तो सागर म्ह. समुद्र**(तद्धि. वि.)** यद्वा **सागरः** - गरेण-विषेण सहित इति सगरः सगर एव सागरः = विषाच्या बरोबर राहणारा तो सगर सगरच सागर आहे**(वि.)** **सेनानीनाम्** - सेनां नयन्तीति सेनान्यस्तेषां सेनानीनाम् = सेनांना नेणारे ते सेनानी त्यांच्यामध्ये**(वि.)** **बृहस्पतिम्** - बृहतां वाचां पतिरिति बृहस्पतिस्तं बृहस्पतिम् = वाणीचा पती त्याला **(ष.त.स.)** **पुरोधसाम्** - पुरोदधतीति पुरोधसस्तेषां पुरोधसाम् = सर्वांच्या प्रथम धारण करणाऱ्यांमध्ये म्ह. पुरोहितांमध्ये**(वि.)**

भृगु आदि विभूतिंचे वर्णन -

**महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम्।**

**यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः ॥२५॥**

**अन्वयः** - अहम्, महर्षीणाम्, भृगुः, गिराम्, एकम्, अक्षरम्, अस्मि, यज्ञानाम्, जपयज्ञः, अस्मि, स्थावर-राणाम्, हिमालयः, (अस्मि)।

**अन्वयार्थः** - **अहम्** - मी **महर्षीणाम्** - महर्षींमध्ये **भृगुः** - भृगु आहे **गिराम्** -वाणींमध्ये **एकम्, अक्षरम्** - एकाक्षर (ओंकार) **अस्मि** - मी आहे **यज्ञानाम्** - यज्ञांमध्ये **जपयज्ञः** - जपयज्ञ **अस्मि** - मी आहे **स्थावर-राणाम्** - स्थावरांमध्ये **हिमालयः** - हिमालय **अस्मि** - मी आहे.

**विवरण** - महर्षींमध्ये ज्ञानी आणि मोठा तेजस्वी असा जो प्रधान भृगु ऋषी तो मीच आहे म्हणजे भृगु माझे स्वरूप आहे. संपूर्ण अर्थबोधक शब्दांमध्ये असा जो प्रधान ओंकार तो मीच आहे. संपूर्ण यज्ञांमध्ये असा जो प्रधान जपयज्ञ तो मीच आहे. स्थावर म्हणजे स्थिर रहणाऱ्या पर्वतांमध्ये असा जो प्रधान हिमालय तो मीच आहे.

**व्याकरणम्** - **अहम्** - अस्मत् सर्व.पु.प्र.ए.व. **महर्षीणाम्** - महत् वि. ऋषि पु.ष.ब.व. **भृगुः** - भृगु पु.प्र.ए.व. **गिराम्** - गिरा स्त्री.ष.ब.व. **एकम्** - एक संख्या वा.विशेषण न.प्र.ए.व. **अक्षरम्** - अक्षर न.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **यज्ञानाम्** - यज्ञ पु.ष.ब.व. **जपयज्ञः** - जप पु. यज्ञ पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **स्थावराणाम्** - स्था प्र.ग.प.प.+वरच्=स्थावर वि.पु.ष.ब.व. **हिमालयः** - हिम वि. आलय पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **महर्षीणाम्** - महान्तश्च ते ऋषयश्च महर्षयस्तेषां महर्षीणाम्-प्रजापतीनाम् = महान ऋषिंच्या म्हणजे प्रजापतींच्या मध्ये**(कर्म.स.)** **जपयज्ञः** - जपश्चासौ यज्ञश्च जपयज्ञः = जपयज्ञ**(कर्म.स.)** **हिमालयः** - हिमस्य आलयम्-गृहमिति हिमालयः-पार्वतीजनकः = हिमाचे बर्फाचे आलय-घर हिमालय **(ष.त.)** **स्थावराणाम्** - तिष्ठन्ति ते स्थावरास्तेषां स्थावराणाम् = एका ठिकाणी स्थित असणाऱ्या हालचाल

न करणाऱ्या स्थावरांचा**(वि.)**

अश्वत्थ आदि विभूतिंचे कथन -

**अश्वत्थ: सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारद: ।**

**गन्धर्वाणां चित्ररथ: सिद्धानां कपिलो मुनि: ॥२६॥**

**अन्वय:** - सर्व वृक्षाणाम्, अश्वत्थ:, च, देवर्षीणाम्, नारद:, गन्धर्वाणाम्, चित्ररथ:, सिद्धानाम्, कपिल:, मुनि:, अहम्, अस्मि ।

**अन्वयार्थ:** - **सर्ववृक्षाणाम्** - सर्ववृक्षांमध्ये **अश्वत्थ:** - पिंपळवृक्ष मी आहे **च** -आणि **देवर्षीणाम्** - देवर्षिंमध्ये **नारद:** - नारद मी आहे **गन्धर्वाणाम्** - गंधर्वांमध्ये **चित्ररथ:** - चित्ररथ गंधर्व मी आहे **सिद्धानाम्** - सिद्धपुरुषांमध्ये **कपिल: मुनि:** - कपिल मुनि मी आहे.

**विवरण** - संपूर्ण वृक्षांचा राजा तसेच पूजनीय असा जो पिंपळवृक्ष तो मीच आहे म्हणजे पिंपळवृक्ष माझे स्वरूप आहे. देवर्षींमध्ये श्रेष्ठ असा जो नारद तो मीच आहे. हाहा, हूहू विश्वावसु, तुम्बरू आणि चित्ररथ आदि प्रधान गंधर्वांमध्ये असा जो श्रेष्ठ चित्ररथ तो मीच आहे. स्थूल, सूक्ष्म, सिद्धि प्राप्त तसेच धर्म, ज्ञान, ऐश्वर्य वैराग्य आदि श्रेष्ठ गुणांने पूर्णतया संपन्न असणाऱ्या सिद्धांमध्ये प्रधानरूपाने असणारा भगवान कपिल मी आहे.

**व्याकरणम्** - **सर्ववृक्षाणाम्** - सर्व वि. वृक्ष पु.ष.ब.व. **अश्वत्थ:** - अश्वत्थ पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **देवर्षीणाम्** - देव पु. ऋषि पु.ष.ब.व. **नारद:** - नारद पु.प्र.ए.व. **गन्धर्वाणाम्** - गन्धर्व पु.ष.ब.व. **चित्ररथ:** - चित्ररथ पु.प्र.ए.व. **सिद्धानाम्** - सिद्ध पु.ष.ब.व. **कपिल:** - कपिल पु.प्र.ए.व. **मुनि:** - मुनि पु.प्र.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **सर्ववृक्षाणाम्** - सर्वे च ते वृक्षाश्च सर्ववृक्षास्तेषां सर्ववृक्षाणाम्-सर्ववनस्पतीनाम् = सर्ववृक्षांच्या मध्ये**(कर्म.स.)** **देवर्षीणाम्** - देवाश्च ते ऋषयश्च देवर्षयस्तेषां देवर्षीणाम् = देवऋर्षिच्या मध्ये **(कर्म.स.)** **मुनि:** - मननशील इति मुनि: = मनन करण्याचे शील ज्याचे तो मुनि**(त.वि.)** **अश्वत्थ:** - न श्व:, तिष्ठतीति अश्वत्थ: = दुसऱ्या दिवसापर्यंत जो स्थिर रहात नाही तो अश्वत्थ**(न.त.स.)** **चित्ररथ:** - चित्रविचित्रं रथो यस्य स: चित्ररथ: = चित्रविचित्ररथ आहे ज्याचा तो**(ब.स.)**

उच्चै:श्रवा आदि विभूतिंचे कथन -

**उच्चै:श्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम् ।**

**ऐरावतं गजेन्द्राणां नराणां च नराधिपम् ॥२७॥**

**अन्वय:** - अश्वानाम्, अमृतोद्भवम्, उच्चै:श्रवसम्, माम्, विद्धि, गजेन्द्राणाम्, ऐरावतम्, च, नराणाम्, नराधिपम्, माम्, विद्धि ।

**अन्वयार्थ:** - **अश्वानाम्** - अश्वांमध्ये **अमृतोद्भवम्** - समुद्रमंथनाच्यावेळी अमृता बरोबर उत्पन्न झालेला **उच्चै:श्रवसम्** - उच्चै: श्रवस नावाचा अश्व **माम्** - मला **विद्धि** - समज **गजेन्द्राणाम्** - गजेन्द्रांमध्ये **ऐरावतम्** - ऐरावत नावाचा हत्ती मी आहे **च** - आणि **नराणाम्** - मनुष्यांमध्ये **नराधिपम्** - राजा (मी आहे)असे **माम्** -

मला **विद्धि** - जाण.

**विवरण** - समुद्राचे मंथन करण्याच्यावेळी अमृताच्या बरोबर उत्पन्न तसेच चौदा रत्नांमध्ये ज्याची गणना केली जाते असा जो संपूर्ण घोड्यांचा राजा उच्चैःश्रवा नामक अश्व तो मी आहे म्हणजे तो माझे स्वरूप आहे. संपूर्ण हत्तींमध्ये जो श्रेष्ठ गजेंद्र त्या संपूर्ण गजेंद्रांमध्ये इंद्राचे वाहन श्रेष्ठ आणि सर्व हत्तींचा राजा असा जो ऐरावत तो मीच आहे. शास्त्रोक्त लक्षणाने युक्त, धर्मपरायण, आपल्या प्रजेला पापापासून निवृत्त तसेच धर्मामध्ये प्रवृत्त करून आणि सर्वांचे रक्षण करणारा असा जो मनुष्यांमध्ये श्रेष्ठ राजा तो मीच आहे म्हणजे राजा माझे स्वरूप आहे.

**व्याकरणम् - अश्वानाम्** - अश्व पु.ष.ब.व. **अमृतोद्भवम्** - अमृत न. उद्+भव पु.द्वि.ए.व. **उच्चैःश्रवसम्** - उच्चैःश्रवस् पु.द्वि.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **विद्धि** - विद् द्वि.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **गजेन्द्राणाम्** - गज+इन्द्र पु.ष.ब.व. **ऐरावतम्** - इरा+मतुप्, मस्य वः+अण्=ऐरावत पु.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **नराणाम्** - नर पु.ष.ब.व. **नराधिपम्** - नर पु. अधिप पु.द्वि.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **विद्धि** - विद् द्वि.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अमृतोद्भवम्** - अमृतात्-अमृतनिमित्तात्-अमृतमन्थनात् उद्भवतीति उद्भवः-उत्पत्ति रित्यमृतोद्भवस्तममृतोद्भवम् = अमृतापासून उत्पन्न झालेला**(पं.त.स.) गजेन्द्राणाम्** - गजानाम्-हस्तिनाम्, इन्द्राः-राजानः, गजेन्द्रास्तेषां गजेन्द्राणाम् = गजेन्द्रांचा-हत्तिंचा इंद्र-स्वामी गजेन्द्र त्या गजेन्द्रांचा अथवा गजेन्द्रांमध्ये**(ष.त.स.) नराधिपम्** - नराणाम्-मनुष्याणाम् अधिपः-राजा इति नराधिपस्तं नराधिपम् = मुनष्यांचा राजा त्याला**(ष.त.स.) ऐरावतम्** - इरावतस्य अपत्यं पुमानैरावतस्तमैरावतम् = इरावताचे अपत्य (संतान) ऐरावत त्या ऐरावताला**(अपत्यर्थे त.वि.)**

वज्रादि विभूतिंचे कथन -

**आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक् ॥**

**प्रजनश्चास्मि कन्दर्पः सर्पाणामस्मि वासुकिः ॥२८॥**

**अन्वयः** - आयुधानाम्, अहम्, वज्रम्, धेनूनाम्, कामधुक्, च, प्रजनः, कन्दर्पः, अस्मि, सर्पाणाम्, वासुकिः, (अहम्) अस्मि ।

**अन्वयार्थः - आयुधानाम्** - शस्त्रांमध्ये **अहम्** - मी **वज्रम्** - वज्र आहे **धेनूनाम्** - धेनूंमध्ये **कामधुक्** - कामधेनू मी आहे **च** - आणि **प्रजनः** - संतानोत्पत्तिला कारण जो **कन्दर्पः** - काम **अस्मि** - मी आहे **सर्पाणाम्** - सर्पांमध्ये **वासुकिः** - वासुकि नावाचा सर्प (**अहम्** - मी) **अस्मि** - आहे.

**विवरण** - संपूर्ण शस्त्रांमध्ये दधीचि ऋषिच्या तपाचे आणि भगवंताचे तेज विराजमान ज्याच्यामध्ये आहे असे जे अमोघ तसेच अत्यंत श्रेष्ठ वज्र ते माझे स्वरूप आहे. सर्व गायींमध्ये देवता तसेच मनुष्यांची समस्त कामना पूर्ण करणारी तसेच समुद्रमंथनापासून उद्भवणारी अशी जी श्रेष्ठ कामधेनू माझे स्वरूप आहे. शास्त्रविधिच्या अनुसार संतान उत्पत्तिसाठी इंद्रियविजयी पुरुषाकडून प्रवृत्त झालेला धर्मानुकूल श्रेष्ठ असा जो काम तो माझे स्वरूप आहे. भगवंताचा भक्त आणि संपूर्ण सर्पांचा राजा असा जो श्रेष्ठ वासुकि तो माझे स्वरूप आहे.

**व्याकरणम् - आयुधानाम्** - आ+युध् च.ग.आ.प.+घञ्=आयुध न.ष.ब.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व.

**वज्रः** - वज्र पु.प्र.ए.व. **धेनूनाम्** - धेनु स्त्री.ष.ब.व. **कामधुक्** - काम पु. दुह् धुक् वि.पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **प्रजनः** - प्रजन वि.पु.प्र.ए.व. **कन्दर्पः** - कन्दर्प पु.प्र.ए.व. **सर्पाणाम्** - सर्प पु.ष.ब.व. **वासुकिः** - वासुकि पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **कामधुक्** - कामान्-मनोरथान् दोग्धीति कामधुक्-कामप्रसवाः = कामांना दोहन करणारी म्हणजे मनोरथांची इच्छाची पूर्ति करणारी कामधुक्(**उप.स.**)

अनंत आदि विभूतिंचे कथन -

**अनन्तश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम् ।**

**पितॄणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम् ॥२९॥**

**अन्वयः** - च, नागानाम्, अनन्तः, अस्मि, यादसाम्, अहम्, वरुणः, च, पितॄणाम्, अर्यमा, अस्मि, संयमताम्, अहम्, यमः, अस्मि ।

**अन्वयार्थः** - **च** - आणि **नागानाम्** - नागांमध्ये **अनन्तः** - शेषनाग **अस्मि** - मी आहे **यादसाम्** - जलदेवतांमध्ये **अहम्** - मी **वरुणः** - वरूण आहे **च** - आणि **पितॄणाम्** - पितरांमध्ये **अर्यमा** - अर्यमानामक पितर **अस्मि** - मी आहे **संयमताम्** - शासन करणाऱ्यांमध्ये **अहम्** - मी **यमः** - यम आहे.

**विवरण** - सर्व नागांमध्ये हजार फण्यांनी युक्त भगवंताचे आसन होऊन सदा सर्वदा त्यांच्या सेवेमध्ये रहणारा आणि त्यांना सुख देण्याचे काम करणारा असा श्रेष्ठ अनन्य भक्त अनंत माझे स्वरूप आहे. सर्व जलचरांचे आणि जलदेवतांचा अधिपति तसेच भगवंताचा भक्त असा सर्वांमध्ये श्रेष्ठ वरूण माझे स्वरूप आहे. कव्यवाह, अनल, सोम, यम, अर्यमा, अग्निष्वात्त आणि बर्हिर्षद या सात पितृगणांमध्ये श्रेष्ठ असा जो अर्यमा तो माझे स्वरूप आहे. मर्त्य आणि देवलोकाचे शासन करणाऱ्यांमध्ये ज्याचे दंड आणि न्याय धर्माने युक्त हितपूर्ण आणि पापनाशक असून भगवंताचा ज्ञानी भक्त आणि लोकपाल असा जो यमराज तो माझे स्वरूप आहे.

**व्याकरणम्** - **च** - च उभ.अ. **नागानाम्** - नग्+अण्=नाग पु.ष.ब.व. **अनन्तः** - अन्+अन्त वि.पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **यादसाम्** - यादस् न.ष.ब.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **वरुणः** - वरुण पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **पितॄणाम्** - पितृ पु.ष.ब.व. **अर्यमा** - अर्यमन् पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **संयमताम्** - सम्+यम् द.ग.प.प.+शतृ=संयमत् वि.पु.ष.ब.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **यमः** - यम पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **नागानाम्** - नागे पर्वते भवा इति नागास्तेषां नागानाम्= पर्वतावर राहतात ते नाग त्यांच्यामध्ये(**वि.**)**अनन्तः** - न विद्यते अन्तो यस्य स अनन्तः = नाही होत अन्त ज्याचा तो अनंत(**ब.स.**)

प्रल्हादादि विभूतिंचे कथन -

**प्रह्लादश्चास्मि दैत्यानां कालः कलयतामहम् ।**

**मृगाणां च मृगेन्द्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम् ॥३०॥**

**अन्वय:** - दैत्यानाम्, प्रह्लाद:, अस्मि, च, कलयताम्, अहम्, काल:, च, मृगाणाम्, अहम्, मृगेन्द्र:, च, प क्षिणाम्, वैनतेय:, (अस्मि)।

**अन्वयार्थ:** - **दैत्यानाम्** - दैत्यांमध्ये **प्रह्लाद:** - प्रल्हाद **अस्मि** - मी आहे **च** - आणि **कलयताम्** - गणना करणाऱ्यांमध्ये **अहम्** - मी **काल:** - काल आहे **च** - आणि **मृगाणाम्** - पशुंमध्ये **अहम्** - मी **मृगेन्द्र:** - सिंह आहे **च** - आणि **पक्षिणाम्** - पक्षांमध्ये **वैनतेय:** - गरूड (**अस्मि** - मी आहे.)

**विवरण** - दितीचा वंश दैत्यांमध्ये उत्तम, सर्वसद्गुणसंपन्न, परमधर्मात्मा तसेच भगवंताचा परमश्रद्धाळु, निष्काम, अनन्य, प्रेमी भक्त आणि दैत्यांचा राजा असा जो प्रल्हाद तो माझी विभूती आहे. गणितविद्या लोकांमध्ये शब्द, क्षण, घडी, दिन, पक्ष, मास आदिनामांनी युक्त समयवाचक गणनांचा आधारभूत जो काल तो माझे स्वरूप आहे. संपूर्ण पशुंमध्ये सर्वांपेक्षा बलवान, तेजस्वी शूरवीर आणि साहसयुक्त असा जो सिंह तो माझी विभूति आहे. सर्व पक्ष्यांमध्ये भगवंताचे वाहन, परमभक्त, पराक्रमी विनतेचा पुत्र असा जो गरूड तो माझी विभूती आहे.

**व्याकरणम्** - **दैत्यानाम्** - दैत्य पु.ष.ब.व. **प्रह्लाद:** - प्रह्लाद पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **कलयताम्** - कल् द.ग.उ.प.(प.प.)+णिच्+कर्त. शतृ=कलयत् वि.पु.ष.ब.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **मृगाणाम्** - मृग पु.ष.ब.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **मृगेन्द्र:** - मृग पु. इन्द्र पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **पक्षिणाम्** - पक्षिन् पु.ष.ब.व. **वैनतेय:** - वैनतेय पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **मृगेन्द्र: -** मृगाणाम्-पशूनाम् इन्द्र:-स्वामी मृगेन्द्र: = पशुंचा स्वामी मृगेंद्र**(ष.त.स.) कलयताम् -** कलयन्ति ते कलयन्तस्तेषां कलयताम् = गणना करीत असणाऱ्यांच्यामध्ये**(त.वि.) दैत्यानाम्** - दितेरपत्यानि पुंमास: दैत्यास्तेषां दैत्यानाम्-दितिपुत्राणाम् = दितिचे अपत्य (संतान) त्यांच्यामध्ये **(अपत्यर्थ त.वि.) वैनतैय:** - विनताया अपत्यं वैनतेय:-गरूड: = विनतेचे अपत्य(संतान) वैनतेय-गरुड **(अपत्यर्थे त.वि.)**

पवन (वायु) आदि विभूतिंचे कथन -

**पवन: पवतामस्मि राम: शस्त्रभृतामहम् ।**

**झषाणां मकरश्चास्मि स्रोतसामस्मि जाह्नवी ॥३१॥**

**अन्वय:** - पवताम्, पवन:, अस्मि, शस्त्रभृताम्, अहम्, राम:, झषाणाम्, मकर:, अस्मि, च, स्रोतसाम्, जाह्नवी, अस्मि।

**अन्वयार्था:** - **पवताम्** - वेगवान तसेच पावन करणाऱ्यांमध्ये **पवन:** - वायु **अस्मि** - मी आहे **शस्त्रभृताम्** - शस्त्र धारण करणाऱ्यांमध्ये **अहम्** - मी **राम:** - राम **(अस्मि)** - आहे **झषाणाम्** - मत्स्यांमध्ये (जलचरांमध्ये) **मकर:** - मगर **अस्मि** - मी आहे **च** - आणि **स्रोतसाम्** - नद्यांमध्ये **जाह्नवी** - गंगानदी **अ स्मि** - मी आहे.

**विवरण** - पवित्र करणाऱ्या संपूर्ण पदार्थांमध्ये श्रेष्ठ असा वायु तो माझी विभूति आहे. शस्त्र धारण करणाऱ्यांमध्ये श्रीराम मी आहे. मासे, कासव, जलचर आदि प्राण्यांमध्ये श्रेष्ठ असा जो मगर तो माझी विभू

ति आहे. सर्व नद्यांमध्ये भगवंताच्या चरणोदकापासून उत्पन्न आणि पावन करणारी परम श्रेष्ठ अशी जी जाह्नवी(गंगा) ती माझी विभूति आहे.

**व्याकरणम् - पवताम्** - पू न.ग.आ.प.+शतृ=पवत् वि.पु.ष.ब.व. **पवन:** - पवन पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **शस्त्रभृताम्** - शस्त्र न. भृ प्र.ग./तृ.ग.उ.प.+शतृ=भृत् वि.पु.ष.ब.व. **राम:** - राम पु.प्र.ए.व. **झषाणाम्** - झष पु.ष.ब.व. **मकर:** - मकर पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **स्रोतसाम्** - स्रु प्र.ग.प.प.+तसिल्=स्रोतस् न.ष.ब.व. **जाह्नवी** - हा तृ.ग.आ.प.+नु,द्वित्व,'अ'लोप:=जह्नु+अपत्ये अण्+ङिप्=जाह्नवी स्त्री.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - शस्त्रभृताम्** - शस्त्राणि बिभ्रति ते शस्त्रभृतस्तेषां शस्त्रभृताम् = शस्त्र धारण करणाऱ्यांमध्ये **(उप.स.) पवताम्** - पवन्ति-पावनं कुर्वन्ति ते पवन्तस्तेषां पवताम् = पवित्र करणाऱ्या वस्तुंमध्ये**(वि.) राम:** - रमन्ति योगिनो यस्मिन्निति राम:-दाशरथीराम: वा परशुराम: = योगियांच्या हृदयामध्ये विहार करणारा अथवा ज्याच्यामध्ये योगी लोक रमण करतात असा जो राम**(वि.) जाह्नवी** - जह्नोरपत्यं स्त्री जाह्नवी-जह्नुकन्या = जह्नुची अपत्य (स्त्री) जाह्नवी म्हणजे जह्नुची कन्या**(अपत्यर्थे त.वि.)**

भगवंताच्या योगशक्तिचे आणि अध्यात्मविद्या आदि विभूतिंचे कथन -

**सर्गाणामादिरन्तश्च मध्यं चैवाहमर्जुन ।**

**अध्यात्मविद्या विद्यानां वाद: प्रवदतामहम् ॥३२॥**

**अन्वय:** - अर्जुन, सर्गाणाम्, अहम्, आदि:, च, अन्त:, च, मध्यम्, एव, विद्यानाम् (अहम्) अध्यात्म विद्या, प्रवदताम्, अहम्, वाद: ।

**अन्वयार्थ: - अर्जुन** - हे अर्जुना! **सर्गाणाम्** - सर्व सृष्टीचा **अहम्** - मी **आदि:** - आदि **च** - आणि **अन्त:** - अंत **च** - आणि **मध्यम्, एव** - मध्यसुद्धा आहे **विद्यानाम्** - सर्वविद्यांमध्ये **(अहम्)** - मी **अध्यात्मविद्या** - ब्रह्मविद्या आहे **प्रवदताम्** - तत्त्व निर्णयाकरिता वाद विवाद करणाऱ्यांचा **अहम्** - मी **वाद:** - वाद आहे.

**विवरण** - हे अर्जुना! मी या सृष्टीचा आदि, मध्य-स्थिति आणि अंत सुद्धा आहे. जी विद्या आत्मसंबंधी असते त्या विद्येला अध्यात्मविद्या अथवा ब्रह्मविद्या म्हणतात. जिच्या द्वारा आत्मतत्त्वाचा प्रकाश तसेच अनायास ब्रह्मसाक्षात्कार होतो आणि संसारामध्ये जेवढ्या काही ज्ञात अज्ञात विद्या आहेत. त्या सर्व या ब्रह्म विद्येपेक्षा निकृष्ट आहेत. कारण त्यांच्याकडून अज्ञानाचे बंधन निवृत्त होत नाही परंतु या विद्येच्याद्वारा अज्ञानाचे बंधन सदासर्वदा निवृत्त होते. अशी जी सर्व विद्यांमध्ये श्रेष्ठ अध्यात्मविद्या ती माझी विभूति आहे. शास्त्रार्थांचे जल्प, वितण्ड आणि वाद असे तीन स्वरूप होतात. उचित अनुचित विचार सोडून आपल्या पक्षाचे मण्डन आणि दुसऱ्या पक्षाचे खण्डन करण्यासाठी जो विवाद केला जातो तो जल्प, केवळ दुसऱ्या पक्षाचे खण्डनाकरिता केलेल्या विवादाला वितण्ड म्हणतात आणि तत्त्वनिर्णयाच्या दृष्टीने केला जातो त्याला वाद म्हणतात. जल्प आणि वितण्डांमध्ये श्रेष्ठ असा जो उपर्युक्त वाद तो माझी विभूति आहे.

**व्याकरणम् - अर्जुन** - अर्जुन पु.संबो.ए.व. **सर्गाणाम्** - सर्ग पु.ष.ब.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **आदि:** - आदि पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **अन्त:** - अन्त वि.पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **मध्यम्** - मध्य

न.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **विद्यानाम्** - विद् द्वि.ग.प.प.+क्यप्+टाप्=विद्या स्त्री.ष.ब.व. **अध्यात्म विद्या** - अध्यात्म वि. विद्या स्त्री.प्र.ए.व. **प्रवदताम्** - प्र+वद् प्र.ग.प.प.कर्त.वर्त.धा.वि.पु.ष.ब.व. **अहम्** - अस्मत् सर्व.पु.प्र.ए.व. **वाद:** - वाद पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **विद्यानाम्** - विदन्ति अनया सा विद्या तासां विद्यानाम् = जिच्या द्वारे जाणल्या जाते ती विद्या त्या विद्यांमध्ये**(वि.) अध्यात्मविद्या** - आत्मनीत्यध्यात्मं तच्च सा चासौ विद्या च अध्यात्मविद्या = आत्मविषयाची विद्या**(अ.ग.क.स.) सर्गाणाम्** - सृज्यन्त इति सर्गास्तेषां सर्गाणाम् = उत्पन्न केले जातात ते सर्ग त्या सर्गांचा**(वि.) वाद:** - वदतीति वाद: = बोलला जातो तो वाद**(वि.)**

अकारादि विभूतिंचे कथन -

**अक्षराणामकारोऽस्मि द्वन्द्व: सामासिकस्य च ।**

**अहमेवाक्षय: कालो धाताहं विश्वतोमुख: ॥३३॥**

**अन्वय:**- अक्षराणाम्, अकार:, अस्मि, च, सामासिकस्य, अहम्, द्वन्द्व:, अक्षय:, काल:, अहम्, एव, विश्वतोमुख:, धाता, अहम् ।

**अन्वयार्थ:** - **अक्षराणाम्** - अक्षरांमध्ये **अकार:** - अक्षर **अहम्** - मी **च** - आणि **सामासिकस्य** - समासाच्या समूहामध्ये **अहम्, द्वन्द्व:** - मी द्वंद्व समास आहे **अक्षय: काल:** - अविनाशी काल **अहम्, एव** - मीच आहे **विश्वतोमुख:** - चोहोबाजुंनी मुख असणारा **धाता** - ब्रह्मदेव **अहम्** - मी आहे.

**विवरण** - स्वर आणि व्यंजन आदि अक्षरांमध्ये श्रुतिद्वारा कथित 'अकारो वै सर्वा वाक्' सर्व वर्णांमध्ये व्याप्त तसेच श्रेष्ठ असा जो अकार तो माझी विभूति आहे. दोन पदाच्या अर्थाची प्रधानता तसेच सर्व समासांच्या पेक्षा श्रेष्ठ असा जो द्वंद्व समास तो माझी विभूति आहे. समयवाचक कालाच्यातिरिक्त सनातन, शाश्वत, अना दि, अनंत आणि नित्य परब्रह्म परमात्म्याचे साक्षात स्वरूप असा जो अक्षय काळ तो माझी विभूति आहे. सर्वांना धारण पोषण करणारा, सर्वव्यापी विश्वरूप परमेश्वर आणि सर्व जगाच्या कर्मांचे फळ देणारा असा जो सर्वतोमुख धाता तो मीच आहे.

**व्याकरणम्** - **अक्षराणाम्** - अक्षर न.ष.ब.व. **अकार:** - अकार पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **सामासिकस्य** - सम्+अस् प्र.ग.उ.प.+घञ्=समास+ठक्=सामा सिक न.ष.ए.व. **द्वन्द्व:** - द्वन्द्व पु.प्र.ए.व. **अक्षय:** - अक्षय वि.पु.प्र.ए.व. **काल:** - काल पु.प्र.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **विश्वतोमुख:** - विश्व+तसिल्=विश्वतस् अ.+मुख=विश्वतोमुख न.वि.पु.प्र.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **धाता** - धातृ पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **सामासिकस्य** - समासानां समूह: सामासिकं तस्य सामासिकस्य = समासांचा समूह सामासिक त्या सामासिकामध्ये**(त.वि.)** यद्वा **सामासिकस्य** - समासेन व्यवहरतीति सामासिकं तस्य सामा सिकस्य = समासाच्या द्वारा जो व्यवहार होतो तो सामासिक त्यामध्ये**(त.वि.) विश्वतोमुख:** - विश्वत:- सर्वतो मुखं यस्य स विश्वतोमुख: = सर्व ठिकाणी मुख आहे ज्याचे तो**(ब.स.) अक्षय:** - न विद्यते क्षयो यस्य सोऽक्षय: = नाही होत नाश ज्याचा तो अक्षय**(ब.स.)**

मृत्यु आदि विभूतिंचे कथन -

**मृत्यु: सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम् ।**

**कीर्ति: श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृति: क्षमा ॥३४॥**

**अन्वय:**- अहम्, सर्वहर:, मृत्यु:, (अस्मि) च, भविष्यताम्, उद्भव:, (अस्मि) च, नारीणाम्, कीर्ति:, श्री:, वाक्, स्मृति:, मेधा, धृति:, क्षमा (अस्मि) ।

**अन्वयार्थ :- अहम् -** मी **सर्वहर: -** सर्वांचा विनाश करणारा **मृत्यु: -** मृत्यू (**अस्मि**-आहे) **च -** आणि **भविष्यताम् -** पुढे उत्पन्न होणाऱ्या प्राण्यांचा **उद्भव: -** उत्पत्तीहेतु मी आहे **च -** आणि **नारीणाम् -** स्त्रियांमध्ये **कीर्ति: -** कीर्ति **श्री: -** श्री **वाक् -** वाणी **स्मृति: -** स्मृति **मेधा -** धारणाशक्ती **धृति: -** धैर्य **क्षमा -** क्षमा **(अस्मि) -** मीच आहे.

**विवरण -** संपूर्ण प्राणिमात्रांचा संहार करणारा असा जो मृत्यू तो मीच आहे. मृत्यूनंतर दुसऱ्या शरीराबरोबर संबंध करून त्यांना उत्पन्न करणारा असा जो उत्पत्तीहेतु तो मीच आहे. संपूर्ण स्त्रियांमध्ये अशा ज्या कीर्ति, श्री, वाक्, स्मृति, मेधा, धृति, क्षमा त्या सर्व मीच आहे म्हणजे सर्व माझ्या विभूति आहेत.

**व्याकरणम् - अहम् -** अस्मत् सर्व.प्र.ए.व. **सर्वहर: -** सर्व+हर वि.पु.प्र.ए.व. **मृत्यु: -** मृत्यु पु.प्र.ए.व. (**अस्मि -** अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.) **च -** च उभ.अ. **भविष्यताम् -** भू प्र.ग.प.प.कर्त.शतृ+स्य=भविष्यत् वि.पु.ष.ब.व. **उद्भव: -** उद्भव पु.प्र.ए.व. (**अस्मि -** अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.) **च -** च उभ.अ. **नारीणाम् -** नृ न.ग./प्र.ग.प.प.+अञ्+ङीन्=नारी स्त्री.ष.ब.व. **कीर्ति: -** कीर्ति स्त्री.प्र.ए.व. **श्री: -** श्री स्त्री.प्र.ए.व. **वाक् -** वाच् स्त्री.प्र.ए.व. **स्मृति: -** स्मृति स्त्री.प्र.ए.व. **मेधा -** मेधा स्त्री.प्र.ए.व. **धृति: -** धृ प्र.ग.उ.प.+क्तिन्=धृति स्त्री.प्र.ए.व. **क्षमा -** क्षमा स्त्री.प्र.ए.व. (**अस्मि -** अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.)

**समासविग्रहार्था: - सर्वहर: -** सर्वान् हरति य: स सर्वहर: = जो सर्वांना हरण करतो तो सर्वहर**(ब.स.) भविष्यताम् -** भविष्यन्ति ते भविष्यन्तस्तेषां भविष्यताम् = पुढे होत असणाऱ्यांचा**(वि.)**

बृहत्साम आदि विभूतिं चे कथन -

**बृहत्साम तथा साम्नां गायत्री छन्दसामहम् ।**

**मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकर: ॥३५॥**

**अन्वय: -** तथा, साम्नाम्, बृहत्साम, (अस्मि), छन्दसाम्, अहम्, गायत्री, मासानाम्, मार्गशीर्ष:, ऋतूनाम्, अहम्, कुसुमाकर: ।

**अन्वयार्थ: - तथा -** त्याचप्रमाणे **साम्नाम् -** सामामध्ये **बृहत्साम -** बृहत्साम (**अस्मि -** मी आहे) **छन्दसाम् -** छंदामध्ये **अहम् -** मी **गायत्री -** गायत्री छंद आहे **मासानाम् -** बारा महिन्यांमध्ये **मार्गशीर्ष: -** मार्गशीर्ष महिना (**अस्मि -** मी आहे) **ऋतूनाम् -** सहा ऋतूंमध्ये **अहम् -** मी **कुसुमाकर: -** वसंतऋतू आहे.

**विवरण -** सामवेदाच्या ''रथान्तर'' आदि सामामध्ये असा जो प्रधान सर्वात श्रेष्ठ बृहत्साम तो मीच आहे (म्हणजे बृहत्साम माझे स्वरूप आहे) वेदाच्या छंदोबद्ध ऋचांमध्ये श्रुति, स्मृति, इतिहास आणि पुराण आदि ठीकठिकाणी जिचा महिमा वर्णन केला आहे, अशी जी श्रेष्ठ गायत्री ती माझी विभूति आहे. ''नास्ति

गंगासमं तीर्थं न देव: केशवात्पर: । गायत्र्यास्तु परं जप्यं न भूतं न भविष्यति ।'' अर्थ :- गंगेच्या समान कोणते तीर्थ नाही, विष्णुच्या समान कोणती श्रेष्ठ देवता नाही तसेच वेदमाता गायत्री जपापेक्षा दुसरा श्रेष्ठ जप वर्तमान काळात नाही व भूतकाळात झाला नाही आणि भविष्यकाळात होणार नाही. महिन्याच्या गणनांचा महाभारत कथित आरंभक म्हणून सर्व महिन्यामध्ये प्रथम व्रत, उपवास यापासून होणाऱ्या शास्त्र कथित मोठ्या फलांनी युक्त नवीन अन्नाच्याद्वारा जो यज्ञ केला जातो त्याचे विधान करणारा वाल्मीक रामायण कथित संवत्सराचे भूषण असा जो अनेक विशेषता कथित वर्णित मार्गशीर्ष मास माझी विभूति आहे. वनस्पती वृक्षांना नवीन पत्र आणि पुष्प प्राप्त करून देणारा, जास्त उष्णताही नाही जास्त शीतही-थंडही नाही असा तसेच सर्व प्राणिमात्रांना आनंदित करणारा असा जो सर्वांचा राजा तसेच श्रेष्ठ वसंत ऋतू माझी विभूति आहे.

**व्याकरणम् - तथा** - तथा क्रि.वि.अ. **साम्नाम्** - सामन् न.ष.ब.व. **बृहत्साम -** बृहत् वि. सामन् न.प्र.ए.व. **छन्दसाम् -** छन्द् द.ग.प.प.+असुन्=छन्दस् न.ष.ब.व. **अहम् -** अस्मत् सर्व.प्र.ए.व. **गायत्री -** गायत्री स्त्री.प्र.ए.व. **मासानाम् -** मस् च.ग.प.प.+घञ्=मास पु.ष.ब.व. **मार्गशीर्ष:** - मार्गशीर्ष पु.प्र.ए.व. **ऋतूनाम् -** ऋतु पु.ष.ब.व. **अहम् -** अस्मत् सर्व.प्र.ए.व. **कुसुमाकर: -** कुसुम+आकर पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - कुसुमाकर: -** कुसुमानाम्-पुष्पाणाम्, आकर इति कुसुमाकर:-वसन्त: = फुलांची खाण असणारा वसंत**(ष.त.स.) गायत्री -** गायन्तं त्रायत इति गायत्री = जी गायन करणाऱ्यांचे रक्षण करते ति गायत्री**(वि.)**

द्यूत आदि विभूतिंचे कथन-

**द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ।**

**जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्त्वं सत्त्ववतामहम् ॥३६॥**

**अन्वय: -** छलयताम्, द्यूतम्, अस्मि, तेजस्विनाम्, अहम्, तेज:, जय:, अस्मि, व्यवसाय:, अस्मि, सत्त्ववताम्, सत्त्वम्, अहम् ।

**अन्वयार्थ: - छलयताम् -** छळ करणाऱ्या वस्तुंमध्ये **द्युतम् -** द्यूत **अस्मि -** मी आहे **तेजस्विनाम् -** तेजस्वि पुरुषांचे **अहम् -** मी **तेज: -** तेज आहे **जय: -** विजयी पुरुषांचा जय **अस्मि -** मी आहे **व्यवसाय: -** निश्चय करणाऱ्या पुरुषांचा निश्चय **अस्मि -** मी आहे **सत्त्ववताम् -** सात्त्विक पदार्थांमध्ये असणारे **सत्त्वम्, अहम् -** सत्त्व मी आहे.

**विवरण -** छळ करणाऱ्या वस्तुंत जो द्यूत तो मीच आहे म्हणजे ते माझे स्वरूप आहे. तेजस्वी पदार्थांमध्ये जे तेज अथवा प्रभाव ते माझे स्वरूप आहे. त्याचप्रमाणे विजय प्राप्त करणाऱ्यांचा विजय, निश्चय करणाऱ्यांचा निश्चय आणि सात्त्विक लोकांचे सत्त्व या सर्व माझ्या विभूति आहेत.

**व्याकरणम् - छलयताम् -** छो च.ग.प.प.+कलच्=छल+णिच्+कर्त.शतृ=छलयत वि.पु.ष.ब.व. **द्यूतम् -** द्यूत दिव् च.ग.प.प.कर्म.भूत.धा.वि.न.प्र.ए.व. **अस्मि -** अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **तेजस्विनाम् -** तेजस्+विनि=तेजस्विन् पु.ष.ब.व. **अहम् -** अस्मत् सर्व.प्र.ए.व. **तेज: -** तेजस् न.प्र.ए.व. **जय: -** जय पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **व्यवसाय: -** वि+अव+सो च.ग.प.प.+घञ्=व्यवसाय

पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **सत्त्ववताम्** - सत्त्व+मतुप्, मस्य वः=सत्त्ववत् वि.पु.ष.ब.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **सत्त्वम्** - सत्त्व न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - छलयताम्** - छयलयन्तीति छलयन्तस्तेषां छलयताम् = छळ करीत असणाऱ्यांच्यामध्ये **(वि.) तेजस्विनाम्** - प्रशस्तं तेजो येषां ते तेजस्विनस्तेषां तेजस्विनाम् = प्रशस्त तेज आहे ज्यांचे ते तेजस्वी त्यांच्यामध्ये**(अस्त्यर्थे त.वि.) सत्त्ववताम्** - सत्त्वमस्ति येषां ते सत्त्ववन्तस्तेषां सत्त्ववताम्-सात्त्विकानाम् = सत्त्व आहे ज्यांचे ते सत्त्ववान त्या सत्त्ववानांच्या म्हणजे सात्त्विक पुरुषांच्यामध्ये**(अस्त्यर्थे त.वि.)**

वासुदेव आदि विभूतिंचे कथन-

**वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पाण्डवानां धनंजयः।**

**मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः॥३७॥**

**अन्वयः** - वृष्णीनाम्, वासुदेवः (अस्मि), पाण्डवानाम्, धनञ्जयः, अस्मि, मुनीनाम्, अपि, अहम्, व्यासः, कवीनाम्, उशना, कविः, अस्मि।

**अन्वयार्थः - वृष्णीनाम्** - वृष्णिवंशामध्ये **वासुदेवः** - वासुदेव (**अस्मि**) - मी आहे **पाण्डवानाम्** - पाण्डवांमध्ये **धनञ्जयः** - धनंजय **अस्मि** - मी आहे **मुनीनाम्, अपि** - मुनिंमध्ये सुद्धा **अहम्** - मी **व्यासः** - व्यास भगवान् आहे **कवीनाम्** - कविंमध्ये **उशना कविः** - शुक्राचार्य कवि **अस्मि** - मी आहे.

**विवरण** - अजन्मा, अविनाशी, सर्वभूतांचा महेश्वर, सर्वशक्तिमान, पूर्णब्रह्म पुरुषोत्तम असा जो वृष्णीकुलामध्ये उत्पन्न वासुदेव तो मीच आहे. नरनारायण अवतारामध्ये नररूपाने भगवंताबरोबर राहणारा तसेच भगवंताचा परम प्रिय सखा आणि अनन्य प्रेमी भक्त असा जो पांच पाण्डवांमध्ये श्रेष्ठ अर्जुन तो माझे स्वरूप आहे. संपूर्ण वेदाचे मंथन करून महाभारत पुराण आदि अनेक शास्त्रांची रचना करणारा असा जो मु निमण्डलामध्ये श्रेष्ठ व्यास तो माझे स्वरूप आहे. भार्गवाचा अधिपति, सर्व विद्यांमध्ये विशारद, संजीवनी विद्या जाणणारा आणि कविंमध्ये प्रधान असा जो शुक्राचार्य तो माझे स्वरूप आहे.

**व्याकरणम् - वृष्णीनाम्** - वृष्णि पु.ष.ब.व. **वासुदेवः** - वासुदेव पु.प्र.ए.व. (**अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.) **पाण्डवानाम्** - पाण्डव पु.ष.ब.व. **धनञ्जयः** - धनञ्जय पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **मुनीनाम्** - मुनि पु.ष.ब.व. **अपि** - अपि क्रि.वि.अ. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **व्यासः** - व्यास पु.प्र.ए.व. **कवीनाम्** - कवि वि.पु.ष.ब.व. **उशना** - उशनस् पु.प्र.ए.व. **कविः** - कवि पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - वासुदेवः** - वसुदेवस्य अपत्यं पुमान् वासुदेवः-वसुदेवात्मजः श्रीकृष्णः = वसुदेवाचा अपत्य (मुलगा) वासुदेव**(अपत्यर्थे त.वि.) धनञ्जयः** - विजयादिधनं जयतीति धनञ्जयः = विजयादि धनाला जिंकणारा धनंजय**(वि.) मुनीनाम्** - मननशीला मुनयस्तेषां मुनीनाम्-मननशीलानाम् = मनन करणे हेच ज्यांचे शील त्या मुनींमध्ये**(वि.) पाण्डवानाम्** - पण्डोरपत्यानि पुमांस इति पाण्डवास्तेषां पाण्डवानाम् = पंडुचे अपत्य संतान पांडव त्या पांडवामध्ये**(अपत्यर्थे त.वि.)**

दंड आदि विभूतिंचे कथन-

**दण्डो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम्।**

**मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम् ॥३८॥**

**अन्वय:** - दमयताम्, दण्ड:, अस्मि, जिगीषताम्, नीति:, अस्मि, च, गुह्यानाम्, मौनं, एव, अस्मि, ज्ञानवताम्, अहम्, ज्ञानम्।

**अन्वयार्थ:** - **दमयताम्** - दमन करविणाऱ्या लोकांचा **दण्ड:** - दण्ड **अस्मि** - मी आहे **जिगीषताम्** - विजयाची इच्छा करणाऱ्यांमध्ये **नीति** - नीति **अस्मि** - मी आहे **च** - आणि **गुह्यानाम्** - गुह्यांमध्ये **मौनम् एव** - मौनहि **अस्मि** - मी आहे **ज्ञानवताम्** - ज्ञानवानांचे **अहम्** - मी **ज्ञानम्** - ज्ञान आहे.

**विवरण** - धर्माचा त्याग आणि अधर्मामध्ये प्रवृत्त अशा उच्छृङ्खल मनुष्यांना पापापासून मुक्त करून सत्कर्मामध्ये प्रवृत्त करणारा, मन आणि इंद्रिय आदिंना वश करवून भगवंताच्या प्राप्तीमध्ये सहायक होणारा, संपूर्ण प्राणिमात्रांचे आप-आपल्या अधिकारानुसार पालन करविणारा असा जो दमन करविणाऱ्या लोकांचा दंड तो माझे स्वरूप आहे. विजय प्राप्त करण्याची इच्छा करणाऱ्यामध्ये अशी जी प्रधान नीति ती माझे स्वरूप आहे. संपूर्ण गुह्यभावाचे रक्षण करणारे असे जे मौन ते माझे स्वरूप आहे. ज्ञानवानामध्ये जे परब्रह्म परमात्म्याच्या स्वरूपाचे साक्षात्कार करणारे यथार्थ ज्ञान आहे ते माझे स्वरूप आहे.

**व्याकरणम्** - **दमयताम्** - दम् च.ग.प.प.+णिच्+कर्त.शतृ वर्त.वि.पु.ष.ब.व. **दण्ड:** - दण्ड पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **जिगीषताम्** - जि प्र.ग.प.प.+सन्+कर्त.शतृ=जिगीषत् वि.पु.ष.ब.व. **नीति:** - नि प्र.ग.उ.प.+भावे क्तिन्=नीति स्त्री.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **गुह्यानाम्** - गुह् प्र.ग.उ.प.+क्यप्=गुह्य न.ष.ब.व. **मौनम्** - मुनि+भावे अण्=मौन न.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए. **ज्ञानवताम्** - ज्ञा न.ग.प.प.+ल्युट्=ज्ञान+मतुप्,मस्य व:=ज्ञानवत् पु.ष.ब.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **ज्ञानम्** - ज्ञान न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **दमयताम्** - दमयन्तीति दमयन्तस्तेषां दमयताम्-दण्डधारिणाम् = दमन करीत असणाऱ्या लोकांमध्ये**(वि.)** **जिगीषताम्** - जेतुमिच्छन्तीति जिगीषन्तस्तेषां जिगीषताम्-जयकांक्षिणाम् = विजयाची इच्छा करणाऱ्यांमध्ये**(वि.)** **ज्ञानवताम्** - ज्ञानं विद्यते येषां ते ज्ञानवन्तस्तेषा ज्ञानवताम्-अध्यात्मज्ञाननिष्ठानाम् = ज्ञान आहे ज्यांचे त्या ज्ञानवानांमध्ये**(अस्त्यर्थे त.वि.)**

**मुख्य विभूतिंची सूची** - श्लोक क्र.२१-४,२२-४,२३-४,२४-३,२५-४,२६-४,२७-३,२८-४,२९-४,३०-४,३१-४,३२-३,३३-४,३४-९,३५-४,३६-५,३७-४,३८-४ = श्लोक-१८ विभूत्या-७५

सर्वरूपाने प्रभवासहित भगवंताच्या स्वरूपाचे कथन-

**यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन।**

**न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम् ॥३९॥**

**अन्वय:** - अर्जुन, अपि, च, यत्, सर्वभूतानाम्, बीजम्, तत्, अहम्, यत्, चराचरम्, भूतम्, तत्, मया, विना, स्यात्, न, अस्ति।

**अन्वयार्थ: - अर्जुन** - हे अर्जुना! **अपि च** - यांच्या व्यतिरिक्त **यत्, सर्वभूतानाम्** - सर्वभूतांच्या उत्पत्तिचे **बीजम्** - कारण **तत्** - ते **अहम्** - मी आहे (कारण की) **यत्, चराचरम्, भूतम्** - जे चराचरभूत प्राणी आहेत **तत्** - ते सर्व **मया विना स्यात्** - माझ्या वाचून असतील **न अस्ति** - असे नाही.(म्हणजे माझ्यातिरिक्त त्यांचे अस्तित्वच नाही.)

**विवरण** - संपूर्ण चराचर प्राणिमात्रांचा परम आधार तसेच सर्व भूतांच्या उत्पत्तिचे महान कारण मीच आहे. कारण की, जेवढे काही चराचर प्राणिमात्र आहेत त्यांच्यामध्ये मी सर्वरूपाने व्याप्त आहे म्हणजे कोणताही प्राणी माझ्याहून अतिरिक्त-वेगळा नाही.

**व्याकरणम् - अर्जुन** - अर्जुन पु.संबो.ए.व. **अपि च** - अपि च अतिरिक्तार्थक अ. **यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **सर्वभूतानाम्** - सर्व वि. भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.ष.ब.व. **बीजम्** - बीज न.प्र.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **चराचरम्** - चराचर वि.न.प्र.ए.व. **भूतम्** - भूत भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **मया** - अस्मत् सर्व.तृ.ए.व. **विना** - विना अ. **स्यात्** - अस् द्वि.ग.प.प.विध्यर्थ तृ.पु.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अस्ति** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - चराचरम्** - चरश्चाचरश्चेति चराचरम् = चर आणि अचर**(द्व.स.)**

भगवद् विभूतिंच्या अनंतत्वाचे कथन -

**नान्तोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परन्तप ।**

**एष तूद्देशत: प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ॥४०॥**

**अन्वय:** - परन्तप, मम, दिव्यानाम्, विभूतीनाम्, अन्त:, न, अस्ति, तु, एष:, विभूते: विस्तर:, मया, उद्देशत:, प्रोक्त: ।

**अन्वयार्थ: - परन्तप** - हे शत्रूंना ताप देणाऱ्या अर्जुना! **मम** - माझ्या **दिव्यानाम्, विभूतीनाम्** - दिव्य विभूतिंचा **अन्त:** - शेवट **न अस्ति** - नाही **तु** - परंतु **एष:** - हा **विभूते: विस्तर:** - विभूतिंचा विस्तार **मया** - माझ्याकडून **उद्देशत:** - संक्षेपाने **प्रोक्त:** - सांगितलेला आहे.

**विवरण** - माझ्या साधारण विभूतिविषयी बोलणेच काय, पण याशिवाय माझ्या ज्या दिव्य विभूति आहेत; त्यांचा तर अंतच नाही ज्याप्रमाणे जल आणि पृथिवीच्या परमाणुची गणना केली जात नाही; त्याचप्रमाणे माझ्या विभूतिंची गणना सुद्धा कोणाकडून केली जाणार नाही आणि त्यांना कोणी जाणू शकणार नाही. कोणी त्यांचे वर्णन करू शकणार नाही अशा अनंत ब्रह्मांडामध्ये माझ्या अनंत विभूति आहेत. त्या दिव्य विभूतिंचा विस्तार माझ्याकडून संक्षेपाने सांगितलेला आहे.

**व्याकरणम् - परन्तप** - परन्तप पु.संबो.ए.व. **मम** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **दिव्यानाम्** - दिव्या स्त्री.ष.ब.व. **विभूतिनाम्** - विभूति स्त्री.ष.ब.व. **अन्त:** - अन्त पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अस्ति** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **तु** - तु उभ.अ. **एष:** - एतत् सर्व.पु.प्र.ए.व. **विभूते:** - विभूति स्त्री.ष.ए.व. **विस्तर:** - विस्तर पु.प्र.ए.व. **मया** - अस्मत् सर्व.तृ.ए.व. **उद्देशत:** - उद्देश पु.तसिल् प्रत्ययान्त पञ्चम्यन्त अ. **प्रोक्त:** - प्र+वच् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - परन्तप -** परान्-शत्रून् तापयति-सन्तापं करोतीति परन्तपस्तत्संबुद्धौ परन्तप = शत्रुंना दु:ख देतो पीडा देतो असा परंतप त्याचे संबोधनामध्ये हे परंतप**(उ.स.)**

भगवंताच्या तेजाच्या अंशाने संपूर्ण वस्तुंच्या उत्पत्तीविषयी कथन -

**यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा ।**

**तत्त्वदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसम्भवम् ॥४१॥**

**अन्वयः** - यत्, यत्, विभूतिमत्, श्रीमत्, वा, उर्जितम्, सत्त्वम्, तत्, तत्, एव, त्वम्, मम, तेजोंऽशसम्भवम्, अवगच्छ ।

**अन्वयार्थः - यत् यत्** - जे जे पदार्थ **विभूतिमत्** - ऐश्वर्याने युक्त **श्रीमत्** - संपत्तीने युक्त-शोभेन युक्त **वा** - किंवा **ऊर्जितम्** - शक्तिने युक्त **सत्त्वम्** - प्राणी आहेत **तत्, तत्, एव** - ते तेच पदार्थ किंवा प्राणी **त्वम् -** तू **मम तेजोंऽशसम्भवम्** - माझ्या तेजाच्या अंशापासून झालेले **अवगच्छ** - समज.

**विवरण -** जे जे ऐश्वर्य संपन्न, कांति संपन्न आणि शक्ति संपन्न पदार्थ-प्राणी आहेत त्या त्या पदार्थांना (प्राण्यांना) ते माझ्या तेजांच्या अंशापासून झाले आहेत असे तू समज. म्हणजे प्रत्येक प्राण्यामध्ये जे काही ऐश्वर्य, बल, शोभा आणि तेज आदि आहे ते सर्व माझ्या तेजाचा अंश आहे असे तू समज.

**व्याकरणम् - यत् यत्** - यत् सर्व न.प्र.ए.व. **विभूतिमत्** - विभूति+मतुप्=विभूतिमत् वि.न.प्र.ए.व. **वा** - वा उभ.अ. **उर्जितम्** - उर्ज् द.ग.प.प.+णिच्+कर्म.क्त=उर्जित वि.न.प्र.ए.व. **सत्त्वम्** - सत्त्व न.प्र.ए.व. **तत् तत्** - तत् सर्व न.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **त्वम्** - युष्मत् सर्व.प्र.ए.व. **मम** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **तेजः** - तेजस् न.प्र.ए.व. **अंशसम्भवम्** - अंश पु. सम्+भव पु.द्वि.ए.व. **अवगच्छ -** अव+गम् प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **विभूतिमत्** - विभूतिर्विद्यत अस्य तद् विभूतिमत्-ऐश्वर्ययुक्तम् = विभूति आहे ज्याची ते विभूतिमत्**(अ.त.वि.) श्रीमत्** - श्रीर्विद्यत अस्य तत् श्रीमत्-संपत्तियुक्तम् = श्री-ऐश्वर्य आहे ज्याची ते श्रीमत् **(अ.त.वि.) तेजोंऽशसम्भवम् -** तेजसः-प्रभावस्यांश इति तेजोंऽशः-एकदेशस्तस्मात् सम्भवः-जन्म यस्य तत् तेजोंऽशसंभवम् = तेजाचा अंश म्हणजे एकच देश त्यापासून उत्पत्ती ज्याची ते**(ष.त.ग.ब.स.)** यद्वा **तेजोंऽशसम्भवम् -** सद्गुणैर्मे प्रभावं तेजयति प्रकाशयतीति तेजो मम शक्तिस्तस्या अंशः-कला स एव सम्भव उत्पत्तिकारणं यस्य तन्मम तेजोंऽशसम्भवम् = सद्गुणांच्याद्वारा माझ्या प्रभावाला जे प्रकाशित करते ते तेज म्ह. माझी शक्ति तिचा अंश म्ह. कला हाच संभव म्ह. उत्पत्तिचे कारण ज्याचे आहे ते**(ष.त.ग.क.ग.ब.स.)**

भगवंताच्या योगशक्तिच्या एका अंशाने संपूर्ण जगताच्या स्थितिचे कथन -

**अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन ।**

**विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ॥४२॥**

**अन्वयः** - अथवा, अर्जुन, एतेन, बहुना, ज्ञातेन, तव, किम्, अहम्, इदम्, कृत्स्नम्, जगत्, एकांशेन विष्टभ्य, स्थितः ।

**अन्वयार्थः - अथवा** - अथवा **अर्जुन** - हे अर्जुना! **एतेन बहुना ज्ञातेन** - असे पुष्कळ जरी वेग-वेगळ्या

प्रकाराने जाणले तरी **तव किम् -** तुला काय उपयोग होणार? कारण **अहम्** - मी **इदम्, कृत्स्नम्, जगत्** - हे संपूर्ण जगत् **एकांशेन** - माझ्या एका अंशानी **विष्टभ्य** - धारण करून **स्थित:** - स्थित आहे.(म्हणजे मी सर्वांना एकांशाने व्यापून राहिलो आहे.)

**विवरण** - हे अर्जुना! या माझ्या विभूति तू कितिही ऐकल्या तरी तुला काही लाभ होणार नाही. म्हणजे माझ्या पूर्णतेचे तुला ज्ञान होणार नाही. म्हणून मी तुला थोडक्यात सांगण्याचा प्रयत्न करीत आहे की, मी संपूर्ण जगताला माझी जी योगशक्ति आहे तिच्या एका अंशमात्राच्या द्वारा धारण करून स्थित आहे.

**व्याकरणम्** - **अथवा -** अथवा अ. **अर्जुन** - अर्जुन पु.संबो.ए.व. **एतेन** - एतत् सर्व.पु.तृ.ए.व. **बहुना -** बहु वि.न.तृ.ए.व. **ज्ञातेन -** ज्ञा न.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.तृ.ए.व. **तव -** युष्मत् सर्व.ष.ए.व. **किम्** - किम् सर्व.प्र.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व प्र.ए.व. **इदम् -** इदम् सर्व.न.प्र.ए.व. **कृत्स्नम्** - कृत्स्न वि.न.प्र.ए.व. **जगत् -** जगत् न.प्र.ए.व. **एकांशेन -** एक संख्यावाचक वि. अंश पु.तृ.ए.व. **विष्टभ्य -** वि+स्तम्भ् न.ग.प.प.ल्यबन्त अ. **स्थित: -** स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - एकांशेन -** एकश्चासौ अंशश्च एकांशस्तेन एकांशेन-एकावयवेन-एकपादेन अथवा सर्वभूतस्वरूपेण = एकाशांच्या म्हणजे सर्व भूतांचा आत्मरूप जो माझा एक अवयव त्या एका अवयवाच्या द्वारा**(कर्म.स.) जगत्** - गच्छतीति जगत् = जाणारे ते जगत**(वि.)**

**ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे**

**श्रीकृष्णार्जुनसंवादे विभूतियोगो नाम दशमोऽध्याय: ॥१०॥**

**-: अध्याय दहावा समाप्त :-**

**ॐ श्रीपरमात्मने नम:**

**अथैकादशोऽध्याय:**

भगवान आणि त्याच्या उपदेशाची प्रशंसा करून विश्वरूपाच्या दर्शनाकरिता अर्जुनाची प्रार्थना -

**अर्जुन उवाच** - अर्जुन म्हणाला.

**मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसञ्ज्ञितम् ।**

**यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥१॥**

**अन्वय:** - मदनुग्रहाय, परमम्, गुह्यम्, अध्यात्मसञ्ज्ञितम्, यत्, वच:, त्वया, उक्तम्, तेन, मम, अयम्, मोह:, विगत: ।

**अन्वयार्थ: - मदनुग्रहाय** - माझ्यावर कृपा करण्यासाठी **परमम्, गुह्यम्, अध्यात्मसञ्ज्ञितम्** - अत्यधिक गुह्य अध्यात्मविषयक **यत् वच:** - जे वचन **त्वया** - तुझ्याकडून **उक्तम्** - सांगितले गेले **तेन** - त्यामुळे **मम** - माझा **अयम्** - हा **मोह:** - मोह **विगत:** - नष्ट झाला आहे.

**विवरण** - अर्जुन म्हणतो की, हे भगवन्ता! माझ्यावर अनुग्रह करण्यासाठी ठिकठिकाणी आपण अध्यात्म ज्ञानाचा उपदेश केला. त्यापासून होणाऱ्या श्रवण, मनन, निदिध्यासनाने माझ्या अंत:करणातील अनादि कालापासून असणारा मोह (अविवेक) नष्ट झाला.

**व्याकरणम् - मदनुग्रहाय** - मत् अस्मत् सर्व.ष.ए.व. अनुग्रह पु.च.ए.व. **परमम्** - परम वि.न.प्र.ए.व. **गुह्यम्** - गुह्य न.प्र.ए.व. **अध्यात्मसञ्ज्ञितम्** - अध्यात्म-सम्+ज्ञा न.ग.प.प.+इतच्=अध्यात्मसञ्ज्ञित वि.न.प्र.ए.व. **यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **वच:** - वचस् न.प्र.ए.व. **त्वया** - युष्मत् सर्व.तृ.ए.व. **उक्तम्** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **तेन** - तत् सर्व.पु.तृ.ए.व. **मम** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **अयम्** - इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **मोह:** - मोह पु.प्र.ए.व. **विगत:** - वि+गम् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - अध्यात्मसञ्ज्ञितम्** - आत्मानम् आत्मनीत्यध्यात्मम्-परमात्मानमधिकृत्य स्थितमध्यात्मम्, अध्यात्ममिति संज्ञा-नाम संजाता अस्य तद् अध्यात्मसंज्ञितम् = अध्यात्म संज्ञा (नाव) झाली आहे ज्याची ते**(अ.भाव ग.कर्मधारयान्तरं तद्धित इतच् प्रत्यय:) मदनुग्रहाय** - मम अनुग्रहो मदनुग्रहस्तस्मै मदनुग्रहाय = माझ्या अनुग्रहाकरिता**(ष.त.स.)**

**भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया ।**

**त्वत्त: कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम् ॥२॥**

**अन्वय:** - कमलपत्राक्ष, हि, भूतानाम्, भवाप्ययौ, त्वत्त:, मया, विस्तरश:, श्रुतौ, च, अव्ययम्, माहात्म्यम्, अपि, (श्रुतम्) ।

**अन्वयार्थ : - कमलपत्राक्ष** - हे कमलनयना! **हि** - कारण **भूतानाम्** - सर्वभूतांचे **भवाप्ययौ** - उत्पत्ती आणि प्रलय **त्वत्त:** - तुझ्यापासून होतात असे **मया** - माझ्याकडून **विस्तरश:** - विस्तारपूर्वक **श्रुतौ** - श्रवण केले आहे **च** - आणि **अव्ययम्** - अविनाशी **माहात्म्यम्, अपि** - माहात्म्य सुद्धा (**श्रुतम्** - श्रवण केले आहे.)

**विवरण -** हे कमलनयना! तुझ्याकडून संपूर्ण चराचर जगताची उत्पत्ती, पालन आणि प्रलय होतात, हा सर्व उपदेश आपल्या मुखातून (सातव्या अध्यायापासून तर दहाव्या अध्यायापर्यंत) विस्तारपूर्वक मी पुन:पुन: श्रवण केला आहे. उपर्युक्त उत्पत्ती, स्थिती आदिचेच श्रवण केले असे नाही तर संपूर्ण विश्वाचे सृजन, पालन आणि संहार आदि करूनही तू वास्तविक अकर्ता, सर्वांचे नियमन करूनही उदासीन, सर्वव्यापी असून, त्या त्या वस्तूंच्या गुणदोषांपासूनही सर्वथा निर्लिप्त, शुभाशुभ कर्माचे सुखदु:खरूपी फल देत असूनही निर्दयता आणि विषमता रूपी दोषांपासून सर्वथा रहित अशा प्रकारांनी युक्त मी आपले दिव्य अविनाशी महात्म्यही श्रवण केले आहे.

**व्याकरणम् - कमलपत्राक्ष -** कमल न.पत्र.न.अक्ष.पु.संबो.ए.व. **हि -** हि क्रि.वि.अ. **मया -** अस्मत् सर्व.तृ.ए.व. **भूतानाम् -** भू प्र.ग.प.प.कर्त.भूत.धा.वि.न.ष.ब.व. **भवाप्ययौ -** भव पु. अप्यय पु.प्र.द्वि.व. **त्वत्तः -** त्वत् युष्मत् सर्व.पं.ए.व.तसील् प्रत्ययान्त **विस्तरशः -** विस्तरशस् तद्धि.प्रत्ययान्त अ. **श्रुतौ -** श्रु प्र.ग.प.प.कर्म.भूत.धा.सा.वि.पु.प्र.द्वि.व. **च -** च उभ.अ. **अव्ययम् -** अव्यय न.प्र.ए.व. **माहात्म्यम् -** मह+अत् प्र.ग.प.प.+मनिन्=महात्मन्+भावे ष्यञ्=माहात्म्य न.प्र.ए.व. **अपि -** क्रि.वि.अ. (**श्रुतम् -** श्रु प्र.ग.प.प.कर्म.भूत.धा.वि.न.प्र.ए.व.)

**समासविग्रहार्थाः - कमलपत्राक्ष -** कमलस्य-पद्मस्य पत्रे इव सुप्रसन्ने विशाले-विस्तीर्णे अक्षिणी-नेत्रे यस्य स कमलपत्राक्षस्तत्सम्बुद्धौ कमलपत्राक्ष = कमलपत्राच्या समान विशाल-विस्तीर्ण नेत्र आहेत ज्याचे तो कमलपत्राक्ष त्याचे संबोधनामध्ये हे कमलपत्राक्ष**(ब.स.) भवाप्ययौ -** भवश्च-उत्पत्तिश्च, अप्ययश्च-प्रलयश्चेति भवाप्ययौ-उत्पत्तिप्रलयौ = उत्पत्ती आणि प्रलय**(इतरेतर द्व.स.)**

**एवमेतद्यथात्थ त्वमात्मानं परमेश्वर ।**

**द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम ॥३॥**

**अन्वयः -** परमेश्वर!, त्वम्, आत्मानम्, यथा, आत्थ, एवम्, एतत्, पुरुषोत्तम, ते, ऐश्वरम्, रूपम्, द्रष्टुम्, इच्छामि ।

**अन्वयार्थः - परमेश्वर -** हे परमेश्वरा! **त्वम् -** तूं **आत्मानम् -** स्वत:ला **यथा -** जसे **आत्थ -** कथन करतोस **एवम्, एतत् -** त्याप्रमाणे ते तसेच आहे **पुरुषोत्तम -** हे पुरुषोत्तमा **ते ऐश्वरम्, रूपम् -** तुझे ते विश्वरूप **द्रष्टुम् -** पाहण्याकरिता **इच्छामि -** इच्छा करतो.

**विवरण -** हे परमेश्वरा! तूं स्वत:चे गुण, प्रभाव, तत्त्व आणि ऐश्वर्य वर्णन करीत असून तूं आपल्या विषयी जे काही कथन केले आहे ते सर्व यथार्थ आहे. यामध्ये मला यत्किंचित् मात्र शंका नाही कारण की, संपूर्ण ईश्वरीय गुण आपल्यामध्ये मला प्रत्यक्ष दिसत आहेत तसेच संपूर्ण विश्व आपल्या एकांशामध्ये ओतप्रोत भरले आहे अशा प्रकारचे अद्भूत रूप मी केव्हाही पाहिले नाही म्हणून हे पुरुषोत्तमा! मी आपले अशा प्रकारचे ईश्वरीय रूप पाहाण्याकरिता इच्छा करीत आहे.

**व्याकरणम् - परमेश्वर -** परमेश्वर पु.संबो.ए.व. **त्वम् -** युष्मत् सर्व.प्र.ए.व. **आत्मानम् -** अत्+म निन्=आत्मन् पु.द्वि.ए.व. **यथा -** यथा क्रि.वि.अ. **आत्थ -** ब्रू द्वि.ग.उ.प.(प.प.)वर्त.द्वि.पु.ए.व. **एवम् -** एव क्रि.वि.अ. **एतत् -** एतत् न.प्र.ए.व. **पुरुषोत्तम -** पुरुषोत्तम पु.संबो.ए.व. **ते -** युष्मत् सर्व.ष.ए.व.

**ऐश्वरम् -** ऐश्वर वि.न.द्वि.ए.व. **रूपम् -** रूप न.द्वि.ए.व. **द्रष्टुम् -** दृश् प्र.ग.प.प.तुमन्त.अ. **इच्छामि -** इष् ष.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.,

**समासविग्रहार्था: - परमेश्वर -** परमश्चासौ ईश्वरश्च परमेश्वरस्तत्सम्बुद्धौ परमेश्वर = हे सर्वेश्वर**(कर्म.स.) पुरुषोत्तम -** पुरुषेषु वा पुरुषाणामुत्तम इति पुरुषोत्तम:-उत्कृष्टतमस्तत्सम्बुद्धौ पुरुषोत्तम-पुरुषश्रेष्ठ = पुरुषामध्ये उत्तम-श्रेष्ठ पुरुषोत्तम**(ष./स.त.स.) आत्मानम् -** अतति-सर्वं व्याप्नोतीत्यात्मा तमात्मानम् = सर्वांना व्यापून राहणाऱ्या आत्म्याला**(त.वि.) ऐश्वरम् -** ईश्वरस्य भाव इदं वा ऐश्वरम् = ईश्वराचा भाव ऐश्वर**(त.वि.) रूपम् -** रूप्यते बोध्यत इति रूपम् = बोधन केले जाते ते रूप**(त.वि.)**

**मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो ।**

**योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ॥४॥**

**अन्वय:** - प्रभो, यदि, मया, तत्, द्रष्टुम्, शक्यम्, इति, मन्यसे, तत:, योगेश्वर, त्वम्, मे, आत्मानम्, अव्ययम्, दर्शय ।

**अन्वयार्थ:** - **प्रभो** - हे प्रभो! **यदि** - जर **मया तत्** - माझ्याकडून ते रूप **द्रष्टुम्, शक्यम्** - पाहणे शक्य आहे **इति मन्यसे** - असे तुला योग्य वाटत असेल **तत: -** तर **योगेश्वर** - हे योगेश्वरा! **त्वम्** - तू **मे** - मला **आत्मानम्** - स्वत:चे **अव्ययम् -** अविनाशी रूप **दर्शय** - दाखव.

**विवरण** - हे प्रभो! मी आपल्या ऐश्वर्यरूपाचे दर्शन करण्यास योग्य अधिकारी नाही. परंतु आपल्या कृपा प्रसादाने (सामर्थ्याने) मला सुयोग्य अधिकारी बनवून आपले ते रूप आपण इच्छा केली तर मला दाखवू शकता. म्हणून हे योगेश्वरा! मी आपले रूप पाहण्यास योग्य असेल असे आपण जाणत असाल तर मला ते आपले अविनाशी रूप दाखवण्याचा प्रयत्न करा.

**व्याकरणम्** - **प्रभो** - प्रभु पु.संबो.ए.व. **यदि -** यदि क्रि.वि.अ. **मया** - अस्मत् सर्व.तृ.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **द्रष्टुम्** - दृश् प्र.ग.प.प.तुमन्त अ. **शक्यम्** - शक्य वि.न.प्र.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **मन्यसे** - मन् च.ग.आ.प.वर्त.द्वि.पु.ए.व. **तत:** - ततस् तसिल् प्रत्ययान्त अ. **योगेश्वर** - योगेश्वर पु.संबो.ए.व. **त्वम्** - युष्मत् सर्व.प्र.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.च.ए.व. **आत्मानम्** - आत्मन् पु.द्वि.ए.व. **अव्ययम्** - अव्यय वि.द्वि.ए.व. **दर्शय** - दृश् प्र.ग.प.प.प्रयोजक आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **योगेश्वर** - योगस्तस्य ईश्वर:-स्वामीति योगेश्वरस्तत्सम्बुद्धौ योगेश्वर = योगाचा ईश्वर योगेश्वर त्याचे संबोधनामध्ये हे योगेश्वर**(ष.त.स.)शक्यम् -** शक्तुं योग्यमिति शक्यम् = समर्थ होण्याकरिता योग्य**(योग्यार्थे त.वि.)**

भगवंताचे आपल्या स्वरूपात देवता, पशू, पक्षी, आदि समस्त चराचर प्राणी त्याचप्रमाणे अनेक आश्चर्ययुक्त दृश्यासहित संपूर्ण जगत पाहण्याची आज्ञा देणे त्याचप्रमाणे दिव्यदृष्टी प्रदान करण्याचे वचन देणे -

**श्री भगवानुवाच -** श्री भगवान म्हणाले

**पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रश: ।**

**नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ॥५॥**

**अन्वयः** - पार्थ, मे, नानाविधानि, दिव्यानि, च, नानावर्णाकृतीनि, शतशः, अथ, सहस्रशः, रूपाणि, पश्य।

**अन्वयार्थः** - **पार्थ** - हे अर्जुना! **मे** - माझी **नानाविधानि दिव्यानि** - नाना प्रकारची दिव्य **च** - आणि **नानावर्णाकृतीनि** - नाना वर्णांची व नाना आकृतींची **शतशः अथ सहस्रशः** - शेकडो अथवा हजारो **रूपाणि** - रूपे **पश्य** - पहा.

**विवरण** - हे अर्जुना! या माझ्या विश्वरूपामध्ये एकाच ठिकाणी लाल, पिवळे, काळे आदि विभिन्न प्रकारचे असंख्य रूप देव, मनुष्य आणि तिर्यक् आदि संपूर्ण चराचर जीवांचे नाना प्रकारचे भेद-नाना प्रकारचे वर्ण आणि अनेक प्रकारच्या आकृती अशा प्रकारांनी युक्त माझे अलौकीक दिव्य रूप पहा.

**व्याकरणम् - पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **नानाविधानि** - नाना अ. विध न. द्वि.ब.व. **दिव्यानि** - दिव्य वि.न.द्वि.ब.व. **नानावर्णाकृतीनि** - नाना अ. वर्ण पु. आकृति स्त्री.वि.न. द्वि.ब.व. **शतशः** - शत न.शस् प्रत्ययान्त तद्धि.अ. **अथ** - अथ अ. **सहस्रशः** - सहस्र न.तद्धि.शस् प्रत्ययान्त अ. **रूपाणि** - रूप न.द्वि.ब.व. **पश्य** - दृश् प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - नानाविधानि** - नाना-अनेका विधाः-प्रकारा येषां तानि नानाविधानि-नानाप्रकाराणि = नाना म्हणजे अनेक, विधा म्हणजे प्रकार ज्यांचे आहेत ती रूपे**(ब.स.) नानावर्णाकृतीनि** - वर्णाश्च-श्वेतरक्तपितादयश्च, आकृतयश्च ऱ्हस्वदीर्घकृशस्थूलादयश्चेति वर्णाकृतयो नाना-अनेकप्रकारा वर्णाकृतयो येषां तानि नानावर्णाकृतीनि = वर्ण म्हणजे श्वेत, रक्त, पित आदि आकृती म्हणजे दीर्घ, ऱ्हस्व, स्थूल आदि अनेक प्रकारचे वर्ण आणि आकृति आहेत ज्यांच्या ती रूपे नानावर्णाकृति**(द्वं.ग.ब.स.)** यद्वा **नानावर्णाकृतीनि** - नाना विलक्षणा नीलपीतादिप्रकारा वर्णास्तथाऽऽकृतयः-अवयवसंस्थानविशेषा येषां तानि नानावर्णाकृतीनि = नाना वर्ण व आकार यांनी युक्त असलेली नाना म्ह. विलक्षण-नील, पीत इत्यादि प्रकारचे वर्ण, तशाच नाना म्ह. विलक्षण आकृति-विशेष प्रकारच्या अवयव रचना-ज्या रूपांच्या आहेत ती रूपे नानावर्णाकृति **(द्वं.ग.ब.स.) दिव्यानि** - दिवो मायाया जातानि दिव्यानि = दिव म्हणजे मायेच्या द्वारा उत्पन्न झालेले ते दिव्य**(त.वि.)** यद्वा **दिव्यानि** - दिवि भवानि दिव्यानि-अप्राकृतानि-अलौकिकानि = देवलोकामध्ये होणारे ते दिव्य म्हणजे अलौकीक**(त.वि.)**

**पश्यादित्यान्वसून्रुद्रानश्विनौ मरुतस्तथा।**

**बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ॥६॥**

**अन्वयः** - आदित्यान्, वसून्, रुद्रान्, अश्विनौ, तथा, मरुतः, पश्य, भारत, बहूनि, अदृष्टपूर्वाणि, आश्चर्याणि, पश्य।

**अन्वयार्थः - आदित्यान्** - बारा सूर्यांना **वसून्** - आठ वसूंना **रुद्रान्** - अकरा रुद्रांना **अश्विनौ** - दोन अश्विनी कुमारांना **तथा** - तसेच **मरुतः** - एकोणपन्नास मरुद्गणांना **पश्य** - पहा **भारत** - हे अर्जुना! **बहूनि** - असंख्य **अदृष्टपूर्वाणि** - पूर्वी कधी न पाहिलेली **आश्चर्याणि** - आश्चर्ये **पश्य** - पहा.

**विवरणः** - अदितीच्या बारा पुत्रांना (सूर्यांना), आठ वसूंना, अकरा रुद्रांना, दोन अश्विनीकुमारांना, त्याचप्रमाणे एकोणपन्नास मरुद्‌गणांना पहा. ज्या पदार्थांना तू किंवा अन्य कोणीही आतापर्यंत पाहिले नाही असे आश्चर्य जनक पदार्थ माझ्या विराट विश्वरूपामध्ये चांगल्या प्रकारांनी पहा.

**व्याकरणम् - आदित्यान् -** आदित्य पु.द्वि.ब.व. **वसून् -** वसु पु.द्वि.ब.व. **रूद्रान्-** रूद्र पु.द्वि.ब.व. **अश्विनौ -** अश्विन पु.द्वि.द्वि.व. **तथा -** तथा क्रि.वि.अ. **मरुतः -** मरुत् पु.द्वि.ब.व. **पश्य -** दृश् प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **भारत -** भारत पु.संबो.ए.व. **बहूनि -** बहु वि.न.द्वि.ब.व. **अदृष्टपूर्वाणि -** अदृष्ट वि. पूर्व वि.न. द्वि.ब.व. **आश्चर्याणि -** आ+चर् प्र.ग.प.प.+ण्यत्,सुट्=आश्चर्य वि.न.द्वि.ब.व. **पश्य -** दृश् प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अदृष्टपूर्वाणि -** पूर्वं येन केनचिदपि न दृष्टानि इत्यदृष्टपूर्वाणि = पूर्वी कोणीही कधीही पाहिली नाही त्यांना**(न.त.स.)**

**इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् ।**

**मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि ॥७॥**

**अन्वयः -** गुडाकेश, अद्य, इह, मम, देहे, एकस्थम्, सचराचरम्, कृत्स्नम्, जगत्, पश्य, च, अन्यत्, यत्, द्रष्टुम्, इच्छसि ।

**अन्वयार्थः - गुडाकेश -** हे अर्जुना! **अद्य -** आज **इह मम देहे -** या माझ्या शरीरामध्ये **एकस्थम् -** एकाच अंशात स्थित असलेले **सचराचरम् -** चराचरासहित **कृत्स्नम्, जगत् -** संपूर्ण जगत **पश्य -** पहा **च -** आणि **अन्यत् -** आणखी **यत् -** जे काही **द्रष्टुम्, इच्छसि -** पहाण्याची इच्छा करीत असशील ते सुद्धा तू पाहू शकतोस.

**विवरणः -** हे अर्जुना! यावेळी माझ्या शरीरामध्ये पशु, पक्षी, कीटक, पतंग आणि याच्या अतिरिक्त आणिकही माझे गुण प्रभाव आणिक काही द्योतक दृश्य, आपले आणि दुसऱ्याचे जय पराजयाचे दृश्य अथवा जे काही आणिक भूत, भविष्य, वर्तमानाची घटना तुला पाहण्याची इच्छा असेल तर त्या सर्वांना माझ्या शरीराच्या एका अंशामध्ये तू पाहू शकतोस.

**व्याकरणम् - गुडाकेश -** गुडाका स्त्री. ईश पु. गुडाकेश पु.संबो.ए.व. **अद्य -** अद्य अ. **इह -** इह क्रि. वि.अ. **मम -** अस्मत् सर्व.ष.ए.व. **देहे -** देह पु.स.ए.व. **एकस्थम् -** एक संख्या.वि. स्थ वि.पु.द्वि.ए.व. **सचराचरम् -** स अ. चराचर वि.न.द्वि.ए.व. **कृत्स्नम् -** कृत्स्न वि.न.द्वि.ए.व. **जगत् -** जगत् न.द्वि.ए.व. **पश्य -** दृश् प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **च -** च उभ.अ. **अन्यत् -** अन्यत् अ. **यत् -** यत् सर्व.न. द्वि.ए.व. **द्रष्टुम् -** दृश् प्र.ग.प.प.तुमन्त अ. **इच्छसि -** इष् ष.ग.प.प.वर्त.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - एकस्थम् -** एकस्मिन्-सर्वव्यापके परमेश्वरे-मयि तिष्ठति तत् एकस्थम् = माझ्यामध्ये-सर्वव्यापक परमेश्वरामध्ये राहणारे ते**(स.त.स.) सचराचरम् -** चरन्ति ते चराः-जंगमादयः, न चरन्ति तेऽचराः -स्थावरादयः, चराश्चाचराश्चेति चराचराः, चराचरैः सहितं सचराचरम् = चालणारे चर, न चालणारे अचर, चराचराच्या बरोबर सचराचर**(द्वं.ग.तृ.त.स.) गुडाकेश -** गुडा वर्तुलत्वप्रधाना आसमन्तात् केशा यस्य स गुडाकेशस्तत्सम्बुद्धौ गुडाकेश = गुडा म्ह. वर्तुलाकार सर्व बाजूंनी ज्याचे केश आहेत असा तो गुडाकेश **(ब.स.)**

**न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा ।**

**दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ॥८॥**

**अन्वयः -** तु, माम्, अनेन, एव, स्वचक्षुषा, द्रष्टुम्, न, शक्यसे, ते दिव्यम्, चक्षुः, ददामि, मे, ऐश्वरम्, योगम्, पश्य।

**अन्वयार्थः - तु -** परंतु **माम् -** मला **अनेन एव चक्षुषा -** आपल्या प्राकृत नेत्रांनी **द्रष्टुम्, न शक्यसे -** पहाण्या करिता समर्थ(योग्य) नाहीस **ते -** तुला **दिव्यम्, चक्षुः -** दिव्य अलौकीक दृष्टिचक्षु **ददामि -** देतो **मे -** माझ्या **ऐश्वरम्, योगम् -** ईश्वरीय योग शक्तीला **पश्य -** पहा.

**विवरणः -** तू माझ्या अद्भूत योग शक्तीने युक्त अशा दिव्य स्वरूपाचे दर्शन करण्याची इच्छा करत असतील तर मी तुला माझे रूप दाखविण्याकरिता तयार आहे. परंतु या चर्मचक्षुंनी माझे अलौकीक रूप तूं पाहू शकणार नाहीस कारण की या विश्वरूपाला पाहण्याकरिता ज्या शक्तीची आवश्यकता आहे ती योग शक्ती तुझ्याजवळ नाही म्हणून तुझ्या इच्छेनुसार मी तुला दिव्य दृष्टी देतो त्या दिव्य दृष्टीच्या द्वारा तूं माझ्या ईश्वरीय योग शक्तीला पहा.

**व्याकरणम् - तु -** तु उभ.अ. **माम् -** अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **अनेन -** इदम् सर्व. पु.तृ.ए.व. **एव -** एव क्रि. वि.अ. **स्वचक्षुषा -** स्व वि. चक्षुष् न.तृ.ए.व. **द्रष्टुम् -** दृश् प्र.ग.प.प.तुमन्त अ. **न -** न क्रि.वि.अ. **शक्यसे -** शक् च.ग.उ.प(आ.प.)वर्त.द्वि.पु.ए.व. **ते -** युष्मत् सर्व.च.ए.व. **दिव्यम् -** दिव्य वि.न.द्वि.ए.व. **चक्षुः -** चक्षुष् न.द्वि.ए.व. **ददामि -** दा तृ.ग.उ.प(प.प.)वर्त.प्र.पु.ए.व. **मे -** अस्मत् सर्व.ष.ए.व. **ऐश्वरम् -** ऐश्वर वि.पु.द्वि.ए.व. **योगम् -** योग पु.द्वि.ए.व. **पश्य -** दृश् प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः -** **स्वचक्षुषा -** स्वस्य-आत्मनः, चक्षुः-नेत्रं तेन चक्षुषा = स्वतःच्या चक्षुद्वारा**(ष.त.स.)**
**ऐश्वरम् -** ईश्वरस्य भाव इदं वा ऐश्वरस्तम् ऐश्वरम् = ईश्वराचा भाव ते ऐश्वर त्याला**( त.वि.)**

अर्जुनाला भगवन्तद्वारा आपले विश्वरूप दाखविले जाणे -

**संजय उवाच -** संजय म्हणाला.

**एवमुक्त्वा ततो राजन्महायोगेश्वरो हरिः।**

**दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम्॥९॥**

**अन्वयः -** राजन्, एवम्, उक्त्वा, ततः, महायोगेश्वरः, हरिः, पार्थाय, परमम्, ऐश्वरम्, रूपम्, दर्शयामास।

**अन्वयार्थः - राजन् -** हे धृतराष्ट्र! **एवम् -** अशाप्रकारे **उक्त्वा -** कथन करून **ततः -** नंतर **महायोगेश्वरः -** महायोगाचे ईश्वर **हरिः -** हरि **पार्थाय -** अर्जुनाला **परमम्, ऐश्वरम्, रूपम् -** श्रेष्ठ ईश्वरसंबंधी रूप **दर्शयामास -** दाखविता झाला.

**विवरणः -** संजय म्हणतो की, हे धृतराष्ट्रा! माझ्या ईश्वरसंबंधी योगशक्तीला पहा. अशा प्रकारचे कथन झाल्या नंतर संपूर्ण पाप तथा दुःखाचा नाश करणारे मोठ्या योगाचे साक्षात् महायोगेश्वर भगवान अर्जुनाला स्वतःच्या ईश्वरीय योगशक्तीला प्रत्यक्ष दाखविता झाला.

**व्याकरणम् - राजन् -** पु.संबो.ए.व. **एवम् -** एवम् क्रि.वि.अ. **उक्त्वा -** वच् द्वि.ग.प.प. त्वान्त अ. **ततः -** ततस् तसिल् प्रत्ययान्त पञ्चम्यन्त अ. **महायोगेश्वरः -** महा वि. योग पु. ईश्वर पु.प्र.ए.व. **हरिः -** हृ प्र.ग.उ.प.+इन्=हरि पु.प्र.ए.व. **पार्थाय -** पार्थ पु.च.ए.व. **परमम् -** परम न.द्वि.ए.व. **ऐश्वरम् -** ऐश्वर वि.न.

द्वि.ए.व. **रूपम्** - रूप न.द्वि.ए.व. **दर्शयामास** - दृश् प्र.ग.प.प.प्रयोजक आम्+आस् द्वि.ग.प.प.परोक्ष भू.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - महायोगेश्वरः** - योगस्य ईश्वरो योगेश्वरो महांश्चासौ योगेश्वरश्च महायोगेश्वरः-अचिन्त्य घटनापटुः = मोठ्या योगाचा ईश्वर**(ष.त.ग.क.स.) पार्थाय** - पृथाया अपत्यं पुमान् पार्थस्तस्मै पार्थाय-पृथापुत्राऽर्जुनाय = पृथेचा अपत्य संतान पार्थ त्या पार्थाकरिता**(अपत्यार्थे त.वि.) हरिः** - संसारदुःखं हरतीति हरिः-परमात्मा = संसार दुःखाचा हरण करणारा हरि म्हणजे परमात्मा**(उप.स.)** यद्वा **हरिः** - स्वसाक्षात्कारवतामविद्यां सकार्यां हरतीति हरिः-परमात्मा = आपला साक्षात्कार करण्याऱ्या पुरुषाची कार्यास हित अविद्या तिचे जो हरण करतो तो हरि**(उप.स.)**

संजय द्वारा विश्वरूपाचे वर्णन -

**अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम् ।**

**अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम् ॥१०॥**

**दिव्यमाल्याम्बरधरं दिव्यगन्धानुलेपनम् ।**

**सर्वाश्चर्यमयं देवमनन्तं विश्वतोमुखम् ॥११॥**

**अन्वयः** - अनेकवक्त्रनयनम्, अनेकाद्भुतदर्शनम्, अनेकदिव्याभरणम्, दिव्यानेकोद्यतायुधम्, दिव्यमाल्याम्बरधरम्, दिव्यगन्धानुलेपनम्, सर्वाश्चर्यमयम्, देवम्, अनन्तम्, विश्वतोमुखम् ।

**अन्वयार्थः** - **अनेकवक्त्रनयनम्** - अनेक मुखे व अनेक नेत्रांनी युक्त **अनेकाद्भुतदर्शनम्** - अनेक विस्मयकारक दर्शनांनी युक्त **अनेकदिव्याभरणम्** - अनेक दिव्य भूषणांनी युक्त **दिव्यानेकोद्यतायुधम्** - अनेक दिव्यशस्त्र हातामध्ये धारण केलेले **दिव्यमाल्याम्बरधरम्** - अनेक दिव्यमाला आणि वस्त्र धारण केलेले **दिव्यगन्धानुलेपनम्** - दिव्यगंध आणि अनुलेपन केलेले **सर्वाश्चर्यमयम्** - सर्व आश्चर्यांनी युक्त **देवम्** - कांतियुक्त **अनन्तम्** - सीमारहित **विश्वतोमुखम्** - सर्व बाजुंनी मुखे असणारे असे विश्वरूप अर्जुनाने पाहिले.

**विवरण** - जे विश्वरूप असंख्य मुख आणि नेत्रांनी तसेच नाना प्रकारच्या आश्चर्यजनक दर्शनाने युक्त, जे विश्वरूप नाना प्रकारच्या असंख्य तेजोमय दिव्य आभूषणाने सुसज्जित, ज्यामध्ये चक्र, गदा आणि धनुष आणि असंख्य प्रकारचे दिव्यशस्त्र आपल्या हातामध्ये घेतलेले विश्वरूप, भगवंताने आपल्या गळ्यामध्ये पुष्कळशी सुंदर सुंदर तेजोमय अलौकीक माळा धारण केलेली तसेच ते अनेक प्रकारच्या उत्तम तेजोमय अलौकीक वस्तुंनी सुसंगीत, ज्याच्या संपूर्ण अंगाला अत्यंत मनोहर दिव्य गंधांचे अनुलेपन केलेले. उपर्युक्त अनेक प्रकारचे मुख, नेत्र, आभूषण, शस्त्र, माळा, वस्त्र आणि गंध आदि संपूर्ण आश्चर्यजनक दिसणारे प्रकाशमय आणि ज्याचा कोठेच अंत नसणारे तसेच असंख्य मुख संपूर्ण विश्वामध्ये सर्व ठिकाणी व्याप्त असणारे असे जे विश्वरूप त्या विश्वरूपाला अर्जुनाने प्रत्यक्ष पाहिले.

**व्याकरणम्** - **अनेकवक्त्रनयनम्** - अनेक वि. वक्त्र न. नयन वि.न.द्वि.ए.व. **अनेकाद्भुतदर्शनम्** - अनेक वि. अद्भुत वि. दर्शन न.द्वि.ए.व. **अनेकदिव्याभरणम्** - अनेक वि. द्विव्य वि. आभरण न.वि.द्वि.ए.व. **दिव्यानेकोद्यतायुधम्** - दिव्य वि. अनेक वि. उद्यत उद्+यम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. आयुध वि.न. द्वि.ए.व. **दिव्यमाल्याम्बरधरम्** - दिव्य वि. माल्य न. अम्बर न. धर वि.पु.द्वि.ए.व. **दिव्यगन्धानुलेपनम्** -

दिव्य वि. गन्ध पु. अनु+लेपन वि.न.द्वि.ए.व. **सर्वाश्चर्यमयम्** - सर्व वि. आश्चर्यमय वि.पु.द्वि.ए.व. **देवम्** - देव पु.द्वि.ए.व. **अनन्तम्** - अन्+अन्त वि.पु.द्वि.ए.व. **विश्वतोमुखम्** - विश्वतस् अ. मुख वि.न.द्वि.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **अनेकवक्त्रनयनम्** - वक्त्राणि च-मुखानि च नयनानि च-नेत्राणि चेति वक्त्रनयनानि अनेकानि-अपरिमितानि वक्त्रनयनानि यस्मिन् तदनेकवक्त्रनयनम् = अनेकमुख आणि अनेक डोळे ज्याच्यामध्ये आहेत ते**(द्वं.ग.ब.स.)** **अनेकाद्भुतदर्शनम्** - अद्भुतानि च तानि दर्शनानि चेति अद्भुतदर्शनानि अनेकानि-नानाविधानि अद्भुतदर्शनानि यस्मिन् तदनेकाद्भुतदर्शनम् = अनेक अद्भूतदर्शने आहेत ज्याच्यामध्ये ते**(कर्म.ग.ब.स.)** **अनेकदिव्याभरणम्** - दिविभवानि दिव्यानि च तानि आभरणानि च दिव्याभरणानि अनेकानि दिव्याभरणानि यस्मिन् तदनेकदिव्याभरणम् = अनेक दिव्य आभरणे-भूषणे आहेत ज्याच्यामध्ये ते **(कर्म.ग.ब.स.)** **दिव्यानेकोद्यतायुधम्** - उद्यतानि च तानि आयुधानि-शस्त्राणि च उद्यतायुधानि-अनेकानि च तानि उद्यतायुद्यानि च अनेकोद्यतायुधानि दिव्यानि अनेकोद्यतायुधानि यस्मिन् तद् दिव्यानेकोद्यतायुधम् = अनेक दिव्यशस्त्र हातामध्ये आहेत ज्याच्या ते**(कर्म.ग.ब.स.)** **दिव्यमाल्याम्बरधरम्** - माल्यानि-पुष्पाणि च अम्बराणि-वस्त्राणि च माल्याम्बराणि दिव्यानि च तानि माल्याम्बराणि च दिव्यमाल्याम्बराणि धारयति वा धरतीति वा ध्रियन्ते येन ईश्वरेण इति धरः-दिव्यमाल्याम्बराणां धरस्तम् दिव्यमाल्याम्बरधरम् = दिव्यमाला आणि अंबर-वस्त्र धारण केले गेले आहे ज्याने त्याला**(द्वं.ग.कर्म.ग.उप./ष.त.स.)** **दिव्यगन्धानुलेपनम्** - गन्धाश्च अनुलेपनानि च, गन्धानुलेपनानि दिव्यानि च तानि गन्धानुलेपनानि दिव्यगन्धानुलेपनम् = दिव्यगंधलेपन आहे ज्याच्या मध्ये ते**(द्वं.ग.कर्म.ग.ब.स.)** **सर्वाश्चर्यमयम्** - सर्वाणि च तानि आश्चर्याणि च सर्वाश्चर्याणि सर्वाश्चर्याणां प्राचुर्य इति सर्वाश्चर्यमयस्तम् सर्वाश्चर्यमयम् = सर्व अत्यंत आश्चर्यरूप**(कर्म.ग.तद्धि.वि.)** **अनन्तम्** - नास्ति अन्तोऽस्य सोऽनन्तस्तमनन्तम्-अपरिच्छिन्नम् = नाही अंत ज्याचा तो अनंत-अपरिच्छिन्न**(ब.स.)** **विश्वतोमुखम्** - विश्वतः-सर्वतः, मुखानि-आननानि यस्मिन् तद् विश्वतोमुखम् = सर्व बाजुंनी मुखे आहेत ज्यामध्ये ते**(ब.स.)**

विश्वरूपाच्या प्रकाशाची महिमा महत्त्व -

**दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता ।**

**यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ॥१२॥**

**अन्वयः** - यदि, दिवि, सूर्यसहस्रस्य, भाः, युगपत्, उत्थिता, भवेत्, सा, तस्य, महात्मनः, भासः, सदृशी, स्यात् ।

**अन्वयार्थः** - **यदि** - जर **दिवि** - आकाशामध्ये **सूर्यसहस्रस्य भाः** - एक हजार आदित्यांची प्रभा **युगपत्** - एकदम (एकाचवेळी) **उत्थिता भवेत्** - प्रगट होईल तर **सा** - ती प्रभा **तस्य महात्मनः** - त्या विश्वरूप महात्म्याच्या **भासः सदृशी** - प्रकाशा सारखी कदाचित **स्यात्** - होईल.

**विवरण** - ज्या प्रमाणे हजार तारांगणे एकदम उदित होऊनही सूर्याची समानता करूं शकत नाहीत त्याचप्रमाणे हजार सूर्यही एकाचवेळी अकाशामध्ये उदित झाले तरी त्यांचा प्रकाश त्या कांतियुक्त विराट स्वरूप भगवंताच्या प्रकाशाची समानता करू शकणार नाही. परंतु कदाचित् त्या विश्वरूप महात्म्याच्या प्रभेसारखी होऊ शकेल.

**व्याकरणम् - यदि** - यदि उभ.अ. **दिवि** - दिव् स्त्री.स.ए.व. **सूर्यसहस्रस्य** - सूर्य पु. सहस्र संख्यावाचक वि.न.ष.ए.व. **भा: -** भास् प्र.ए.व. **युगपत्** - युगपत् अ. **उत्थिता** - उद्+स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.सा. वि.स्त्री.प्र.ए.व. **भवेत्** - भू प्र.ग.प.प.विध्यर्थ तृ.पु.ए.व. **सा** - तत् सर्व.स्त्री.प्र.ए.व. **तस्य** - तत् सर्व.पु.ष.ए.व. **महात्मन:** - महा वि.आत्मन् पु.ष.ए.व. **भास: -** भास् स्त्री.ष.ए.व. **सदृशी** - सदृशी वि.स्त्री.प्र.ए.व. **स्यात्** - अस् द्वि.ग.प.प.विध्यर्थ तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - सूर्यसहस्रस्य** - सूर्याणां सहस्रं सूर्यसहस्रं तस्य सूर्यसहस्रस्य = सूर्यसहस्राची-हजार सूर्यांची **(ष.त.स.) महात्मन:** - महान् आत्मा-स्वरूपं यस्य स महात्मा तस्य महात्मन:-विश्वरूपस्य = मोठा आत्मा म्हणजे मोठे स्वरूप आहे ज्याचे तो त्याचा**(ब.स.) भास: -** भा:-प्रभा विद्यते सा भास्तस्य भास:-विश्वरूप प्रकाशस्य = भा-प्रभा आहे ज्याची**(वि.)**

अर्जुनाचे विश्वरूपामध्ये संपूर्ण जगताला एका ठिकाणी स्थित पहाणे -

**तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ।**

**अपश्यद्देवदेवस्य शरीरे पाण्डवस्तदा ॥१३॥**

**अन्वय:** - तदा, पाण्डव:, तत्र, देवदेवस्य, शरीरे, एकस्थम्, अनेकधा, प्रविभक्तम्, कृत्स्नम्, जगत्, अपश्यत् ।

**अन्वयार्थ: - तदा** - त्यावेळी **पाण्डव:** - अर्जुन **तत्र देवदेवस्य शरीरे -** त्या देवदेवाच्या शरीरामध्ये **एकस्थम्** - एकाच ठिकाणी स्थित **अनेकधा** - अनेक प्रकारांनी **प्रविभक्तम्** - पृथक् पृथक् असलेले **कृत्स्नम्, जगत्** - संपूर्ण जगत **अपश्यत् -** पाहता झाला.

**विवरण** - देव, मनुष्य, पशु, पक्षी, कीटक, पतंग, वृक्षादि, पृथिवी, अंतरिक्ष, स्वर्ग, पाताळ आणि भोक्तृवर्ग तसेच योग्य स्थान, तसेच त्यांचे भोगणे योग्य असंख्य सामुग्रीच्या भेदाने विभक्त अशा या संपूर्ण ब्रह्मांडाला अर्जुनाने सर्वश्रेष्ठ देवांचेही देव म्हणजे ब्रह्मादिदेवांचे ही पूज्य अशा भगवंताच्या शरीराच्या एकदेशामध्ये पा हिले.

**व्याकरणम् - तदा** - तदा कालवाचक तद्धि.अ. **पाण्डव:** - पाण्डव पु.प्र.ए.व. **तत्र -** तत्र स्थानवाचक त द्धि.अ. **देवदेवस्य -** देवदेव पु.ष.ए.व. **शरीरे** - शरीर न.स.ए.व. **एकस्थम्** - एक संख्यावाचक वि. स्थ वि.न.द्वि.ए.व. **अनेकधा** - अनेकधा अ. **प्रविभक्तम्** - प्र+वि+भज् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.द्वि.ए.व. **कृत्स्नम् -** कृत्स्न वि.न.द्वि.ए.व. **जगत्** - जगत् न.द्वि.ए.व. **अपश्यत् -** दृश् प्र.ग.प.प.प्र.भू.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - देवदेवस्य** - देवानां द्योतनस्वभावानां देव इति देवदेवस्तस्य देवदेवस्य-श्रीकृष्णस्य = देवांचा देव श्रीकृष्ण त्याच्या**(ष.त.) एकस्थम्** - एकस्मिन् ब्रह्मणि तिष्ठति तत् एकस्थम् = एक ब्रह्मामध्ये राहणारे ते**(स.त.स.)अनेकधा** - अनेका-नाना, धा-विधा:-प्रकारा इति अनेकधा = अनेक म्हणजे नाना धा म्ह. प्रकार असे अनेकधा**(प्रकारार्थक तद्धि.वि.) तदा -** तस्मिन् काले इति तदा-तर्हि = त्या काळामध्ये **(काल वाचकार्थे तद्धि.वि.)**

त्या विश्वरूपाला पाहून अर्जुन विस्मित आणि आनंदीत होऊन श्रद्धेने युक्त भगवंताला नमस्कार करण्याचे कथन -

**ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनञ्जयः।**

**प्रणम्य शिरसा देवं कृताञ्जलिरभाषत ॥१४॥**

**अन्वयः** - ततः, विस्मयाविष्टः, हृष्टरोमा, सः, धनञ्जयः, देवम्, शिरसा, प्रणम्य, कृताञ्जलिः, अभाषत।

**अन्वयार्थः - ततः** = त्यानंतर **विस्मयाविष्टः** - आश्चर्याने युक्त आणि **हृष्टरोमा** - ज्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले आहेत असा **सः धनञ्जयः** - तो अर्जुन **देवम्** - विश्वरूप परमात्म्याला **शिरसा** - मस्तकाने **प्रणम्य** - नमस्कार करून **कृताञ्जलिः** - ज्याने आपले हात जोडले आहेत असा होऊन **अभाषत** - बोलला.

**विवरण** - अशा प्रकारचे विश्वरूप पाहून आश्चर्यचकित झालेल्या त्याचवेळी संपूर्ण शरीरावर रोमांच उभे रा हिलेल्या यापूर्वी केंव्हाही असे ऐश्वर्यपूर्ण स्वरूप न पाहिलेल्या, तसेच दिव्य आणि अलौकीक स्वरूप पाहून, भगवंताच्या महिमेच्या पुढे आपणाला तुच्छ समजणाऱ्या अशा अर्जुनाच्या हृदयामध्ये अत्यंत पूज्य भाव जागृत झाला आणि मस्तकाने देवाला प्रणाम करून, आपले दोन्ही हात जोडून, भगवान श्रीकृष्णाला म्हणाला (बोलला).

**व्याकरणम्** - **ततः** - ततस् तसिल् प्रत्ययान्त पञ्चम्यन्त अ. **विस्मयाविष्टः** - विस्मय पु.आ+विश् ष.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **हृष्टरोमा** - हृष् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. रोमन् न.वि.पु.प्र.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **धनञ्जयः** - धनञ्जय पु.प्र.ए.व. **देवम्** - देव पु.द्वि.ए.व. **शिरसा** - शिरस् श्रि प्र.ग.प.प.+असुन्,कित्+धातोः शिरसादेशः=शिरस् न.तृ.ए.व. **प्रणम्य** - प्र+नम् प्र.ग.प.प.ल्यबन्त अ. **कृताञ्जलिः** - कृ अ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि. अञ्जलि स्त्री.वि.प्र.ए.व. **अभाषत** - भाष् प्र.ग.आ.प.प्र.भू.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **कृताञ्जलिः** - कृता-विहिता अञ्जलिः-नमस्कारार्थं संपुटीकृतहस्तौ येन स कृताञ्जलिः = ज्याच्या द्वारा हात जोडले गेले आहेत असा तो**(ब.स.)** **विस्मयाविष्टः** - विस्मयेन-आश्चर्येण, आविष्टः-व्याप्तो विस्मयाविष्टः = आश्चर्याने युक्त**(तृ.त.स.)** **हृष्टरोमा** - हृष्टानि-पुलकितानि, रोमाणि-तनूरूहा यस्य स हृष्टरोमा = पुलकित झाले आहेत केस ज्याच्या अंगावर असा तो**(ब.स.)** **धनञ्जयः** - राजसूयमिषेण दि ग्विजये सर्वेभ्यो राजभ्यो धनं जयतीति धनञ्जयः-अर्जुनः = राजसूय यज्ञाच्या निमित्ताने दिग्विजयामध्ये सर्व राजांपासून धनाला प्राप्त करणारा असा धनंजय**(उप.स.)** **देवम्** - अन्तर्बहिः सर्वं द्योतयति-प्रकाशयतीति देवस्तं देवम्-श्रीकृष्णम् = आत आणि बाहेर प्रकाश करणाऱ्या देवाला**(वि.)**

अर्जुनाचे विश्वरूपामध्ये देवता, ऋषी आदिचे पाहणे -

**अर्जुन उवाच** - अर्जुन म्हणाला.

**पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूतविशेषसङ्घान्।**

**ब्रह्माणमीशं कमलासनस्थमृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ॥१५॥**

**अन्वयः** - देव, तव, देहे, सर्वान्, देवान्, तथा, भूतविशेषसङ्घान्, ईशम्, कमलासनस्थम्, ब्रह्माणम्, च, सर्वान्, ऋषीन्, च, दिव्यान्, उरगान्, पश्यामि।

**अन्वयार्थः - देव** - हे श्रीकृष्णा! **तव देहे** - मी तुझ्या शरीरामध्ये **सर्वान्, देवान्**- संपूर्ण देवांना **तथा** -

त्याचप्रमाणे **भूतविशेषसङ्घान्** - अनेक प्रकारच्या भूत समुदायाला **ईशम्, कमलासनस्थम्, ब्रह्माणम्** - सृष्टीचे नियमन करणाऱ्या तसेच कमलाच्या आसनावर स्थित असलेल्या ब्रह्मदेवाला **च** - आणि **सर्वान्, ऋषीन्** - संपूर्ण ऋषीजनांला **च** - आणि **दिव्यान्, उरगान्** - दिव्य सर्पांना **पश्यामि** - पाहत आहे.

**विवरण** - हे विराट स्वरूप भगवंता! मी तुझ्या शरीरामध्ये इंद्र, चंद्र, सूर्य आदि देवांना, अनेक चराचरादि प्राणिमात्रांच्या समुदायाला, भगवान विष्णुच्या नाभीपासून उत्पन्न आणि कमळाच्या आसनावर स्थित ब्रह्मदेवाला त्याचप्रमाणे संपूर्ण ऋषींना आणि वासुकी आदि दिव्य सर्पांना पाहत आहे.

**व्याकरणम्** - **देव** - देव पु.संबो.ए.व. **तव** - युष्मत् सर्व.ष.ए.व. **देहे** - देह पु.स.ए.व. **सर्वान्** - सर्व सर्व.पु.द्वि.ब.व. **देवान्** - देव पु.द्वि.ब.व. **तथा** - तथा क्रि.वि.अ. **भूतविशेषसङ्घान्** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. विशेष वि. सङ्घ पु.द्वि.ब.व. **ईशम्** - ईश वि.पु.द्वि.ए.व. **कमलासनस्थम्** - कमल न. आसन न. स्थ वि.पु.द्वि.ए.व. **ब्रह्माणम्** - ब्रह्मन् पु.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **सर्वान्** - सर्व पु.द्वि.ब.व. **ऋषीन्** - ऋषि पु.द्वि.ब.व. **च** - च उभ.अ. **दिव्यान्** - दिव्य वि.पु.द्वि.ब.व. **उरगान्** - उरग पु.द्वि.ब.व. **पश्यामि** - दृश् प्र.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **भूतविशेषसङ्घान्** - भूतानां विशेषाः-चराचरभेदा भूतविशेषा भूतविशेषाणां सङ्घाः-समुदायास्तान् भूतविशेषसङ्घान् = भूतांचा विशेष-चराचरभेद असा भूतविशेष त्या भूतविशेषांच्या संघांना **(ष.ग.ष.त.स.)** **कमलासनस्थम्** - कमलस्याऽऽसनं कमलासनं कमलासने तिष्ठतीति कमलासनस्थस्तं कमलासनस्थम् = कमलाच्या आसनावर स्थित असणाऱ्याला**(ष.ग.स.त.स.)** **उरगान्** - उरसा वक्षस्थलेन गच्छन्ति ते उरगास्तान् उरगान्-वासुकीप्रमुखान् = वक्षस्थलाने चालणाऱ्या वासुकी प्रमुख सर्पांना**(त.वि.)** **देव** - नानारूपेण दीव्यति क्रीडतीति देवस्तत्सम्बुद्धौ हे देव = नाना रूपाने प्रकाश अथवा क्रीडा करणारा असा तो देव**(त.वि.)**

विश्वरूपाला अनेक हात आणि अनेक उदरे आदि आहेत असे पाहणे -

**अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनन्तरूपम् ।**

**नान्तं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूप ॥१६॥**

**अन्वयः** - विश्वेश्वर, विश्वरूप, त्वाम्, अनेकबाहूदरवक्त्रनेत्रम्, सर्वतः, अनन्तरूपम्, पश्यामि, पुनः, तव, आदिम्, न, मध्यम्, न, अन्तम्, न, पश्यामि ।

**अन्वयार्थः** - **विश्वेश्वर विश्वरूप** - हे विश्वेश्वर विश्वरूप श्रीकृष्णा! **त्वाम्** - मी तुला **अनेकबाहूदरवक्त्रनेत्रम्** - अनेक हात, अनेक उदरे, अनेक तोंडे, अनेक नेत्रे यांनी युक्त असलेला **सर्वतः अनन्तरूपम्** - सर्व ठिकाणी अनन्त रूपांनी युक्त असणारा असा **पश्यामि** - पाहत आहे **पुनः** - पुन्हा **तव** - मी तुझा **आदिम्, न** - आदि नाही **मध्यम्, न** - मध्य नाही **अन्तम्, न** - आणि अंत नाही **पश्यामि** - असा पाहत आहे.

**विवरण** - हे विराटस्वरूपा भगवंता! माझ्याकडून पाहिल्या जाणाऱ्या विश्वरूपाला अनेक तोंडे, उदरे, हात आणि नेत्र आहेत की ज्यांची कोणीही आणि कोणत्याही प्रकारांनी गणना करू शकणार नाही. अशा एकाच शरीरामध्ये सर्व बाजूंनी पुष्कळ भिन्न-भिन्न अनंत स्वरूपांनी युक्त असणाऱ्या हे विश्वरूपा! मी तुझ्या अंताला मध्याला आणि आदिला पहात नाही. म्हणजे या विश्वरूपाचा अंत कोणत्या ठिकाणी होतो. मध्य कोणत्या

ठिकाणी आहे आणि आरंभ कोणत्या ठिकाणापासून होतो याला मी यत्किंचित् मात्र जाणत नाही.

**व्याकरणम्** - **विश्वेश्वर** - विश्व न.वि. ईश्वर पु.संबो.ए.व. **विश्वरूप** - विश्व न.वि.रूप न.वि.संबो.ए.व. **त्वाम्** - युष्मत् सर्व.द्वि.ए.व. **अनेकबाहूदरवक्त्रनेत्रम्** - अनेक वि. बाहु पु. उदर न. वक्त्र न. नेत्र न.वि.पु.द्वि.ए.व. **सर्वत:** - सर्वतस् तसिल् प्रत्ययान्त अ. **अनन्तरूपम्** - अन्+अन्त अनन्त वि.रूप न.वि.पु.द्वि.ए.व. **पश्यामि** - दृश् प्र.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **पुन:** - पुनर् अ. **तव** - युष्मत् सर्व.ष.ए.व. **आदिम्** - आदि वि.पु. द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **मध्यम्** - मध्य वि.पु.द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अन्तम्** - अन्त वि.पु. द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **पश्यामि** - दृश् प्र.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अनेकबाहूदरवक्त्रनेत्रम्** - बाहवश्च-हस्ताश्च उदराणिच वक्त्राणि च-मुखानि च, नेत्राणि च -अक्षीणि चेति बाहूदरवक्त्रनेत्राणि अनेकानि-अपरिमितानि बाहूदरवक्त्रनेत्राणि यस्य सोऽनेकबाहूदरवक्त्रनेत्रस्तमनेकबाहूदरवक्त्रनेत्रम् = अनेक हात, उदर, मुख, नेत्र आहेत ज्याचे त्याला **(द्वं.ग.ब.स.)** **अनन्तरूपम्** - अनन्तानि-असंख्यानि, रूपाणि-स्वरूपाणि, यस्य सोऽनन्तरूपस्तमनन्तरूपम् = अनंतरूपे आहेत ज्याची त्याला**(ब.स.)** **विश्वेश्वर** - विश्वस्येश्वरो विश्वेश्वरस्तत्सम्बुद्धौ हे विश्वेश्वर = विश्वाचा ईश्वर विश्वेश्वर त्याचे संबोधनामध्ये हे विश्वेश्वर**(ष.त.स.)** **विश्वरूप** - विश्वं रूपं यस्य स विश्वरूपस्तत्सम्बुद्धौ हे विश्वरूप = विश्वरूप आहे ज्याचे तो त्याचे संबोधनामध्ये हे विश्वरूप**(ब.स.)**

अर्जुनाचे विश्वरूपाला किरीट, गदा आणि चक्र इत्यादिकाने युक्त पाहणे -

**किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतो दीप्तिमन्तम् ।**

**पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समन्ताद्दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ॥१७॥**

**अन्वय:** - किरीटिनम्, गदिनम्, च, चक्रिणम्, तेजोराशिम्, सर्वतो, दीप्तिमन्तम्, समन्तात्, दुर्निरीक्ष्यम्, दीप्तानलार्कद्युतिम्, अप्रमेयम्, (अहम्), त्वाम्, पश्यामि ।

**अन्वयार्थ:** - **किरीटिनम्** - मस्तकावर किरीट **गदिनम्** - हातात गदा **च** - आणि **चक्रिणम्** - चक्र धारण करणारा असा **तेजोराशिम्** - तेजाचा पुंज **सर्वतो दीप्तिमन्तम्** - सर्व बाजूंनी प्रकाशमान असल्यामुळे **समन्तात्, दुर्निरीक्ष्यम्** - त्याला सर्व बाजूंनी पाहणे अशक्य आहे असा **दीप्तानलार्कद्युतिम्** - प्रज्वलित अग्नी आणि सूर्य यांच्या प्रभे सारखी ज्याची प्रभा आहे असा **अप्रमेयम्** - कोणत्याही प्रमाणाचा विषय न होणारा असा त्या (**अहम्** - मी) **त्वाम्** - तुला **पश्यामि** - पहातो.

**विवरण** - मस्तकावर अत्यंत शोभायमान आणि तेजयुक्त किरीट विराजीत, हातात गदा आणि चक्र आतबाहेर खालीवर तसेच संपूर्ण दिशामध्ये दिव्यप्रकाशाने परिपूर्ण ज्याप्रमाणे प्रज्वलीत अग्नी आणि सूर्य प्रकाशमान तेजयुक्त राशी आहे. त्याचप्रमाणे आपले हे विराट स्वरूप त्यांच्यापेक्षाही असंख्य पटीने प्रकाशमान तेज:पुंज आहे आणि आपल्या गुण, प्रभाव, शक्ती आणि स्वरूपाला कोणीही प्राणी कोणत्याही साधनाने न जाणणारे अप्रमेयरूप म्हणजे कोणत्याही प्रमाणाचा विषय न होणारे असे आपले न जाणणेयोग्य रूप मी पहात आहे.

**व्याकरणम्** - **किरीटिनम् -** किरीट्+इनि=किरीटिन् पु.द्वि.ए.व. **गदिनम्** - गद् द.ग.उ.प.+इनि=गदिन् पु. द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **चक्रिणम्** - चक्र+इनि=चक्रिन् वि.पु.द्वि.ए.व. **तेजोराशिम्** - तेजस् न. राशि पु.

वि.द्वि.ए.व. **सर्वतो दीप्तिमन्तम्** - सर्व+तसिल्=सर्वतस् अ. दीप् च.ग.आ.प.+क्तिन्+मतुप्=दीप्तिमत् वि.पु.द्वि.ए.व. **समन्तात्** - समन्तात् अ. **दुर्निरीक्ष्यम्** - दुर्+निर्+ईक्ष् प्र.ग.आ.प.कर्म.ण्यत् वि.पु.द्वि.ए.व. **दीप्तानलार्कद्युतिम्** - 'दीपी दीप्तौ' दीप् च.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि. अनल पु. अर्क पु. द्युति स्त्री.वि.पु. द्वि.ए.व. **अप्रमेयम्** - अ+प्रमेय न.वि.पु.द्वि.ए.व. **त्वाम् -** युष्मत् सर्व.द्वि.ए.व. **पश्यामि** - दृश् प्र.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **किरीटिनम्** - किरीटमस्याऽस्तीति किरीटी तं किरीटिनम् = किरीट आहे ज्याचे त्याला **(अस्त्यर्थे त.वि.) गदिनम्** - गदाऽस्यास्तीति गदी तं गदिनम् = गदा आहे ज्याच्या हातात त्याला**(अस्त्यर्थे त.वि.) चक्रिणम् -** चक्रमस्यास्तीति चक्री तं चक्रिणम् = चक्र आहे ज्याच्या हातात त्याला**(अस्त्यर्थे त. वि.) दीप्तिमन्तम्** - दीप्तिर्विद्यते अस्येति दीप्तिमान् तं दीप्तिमन्तम् = प्रकाश आहे ज्याचा अशा त्याला **(अस्त्यर्थे त.वि.) अप्रमेयम्** - प्रमातुमयोग्योऽप्रमेयस्तमप्रमेयम् = जाणण्याकरिता अयोग्य त्याला**(कृ.वि.) दुर्निरीक्ष्यम्** - दुःखेन निरीक्षितुं-अवलोकितुं शक्यः-योग्य इति दुर्निरीक्ष्यस्तं दुर्निरीक्ष्यम् = दुःखाने पाहणे शक्य त्याला**(वि.) तेजोराशिम्** - तेजसां राशिः-पुञ्जस्तं तेजोराशिम् = तेजाच्या राशीला**(ष.त.स.) दीप्तानलार्कद्युतिम्** - अनलश्च-अग्निश्च, अर्कश्च-सूर्यश्च अनलार्कौ दीप्तौ च तौ अनलार्कौ च दीप्तानलार्कौ, दीप्तानलार्कयोर्द्युतिरिव द्युतिर्यस्य स तं दीप्तानलार्कद्युतिम् = प्रज्वलित अग्नि आणि सूर्याच्या दीप्तिसारखी दीप्ति आहे ज्याची त्याला**(द्वं.ग.कर्म.स.ग.ब.स.)**

अर्जुनद्वारा विश्वरूपाची स्तुती -

**त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानम्।**

**त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ॥१८॥**

**अन्वयः** - त्वम्, वेदितव्यम्, परमम्, अक्षरम्, त्वम्, अस्य, विश्वस्य, परम्, निधानम्, त्वम्, अव्ययः, शाश्वतधर्मगोप्ता, त्वम्, सनातनः, पुरुषः, मे, मतः।

**अन्वयार्थः** - **त्वम्** - तूं **वेदितव्यम्** - जाणण्यास योग्य **परमम्, अक्षरम्** - परब्रह्म परमात्मा आहेस. **त्वम्** - तूं **अस्य विश्वस्य** - या जगाचे **परम् निधानम्** - परम आश्रय **त्वम्** - तूं **अव्ययः** - अविनाशी आहेस. शाश्वत **धर्मगोप्ता** - सनातनधर्माचा रक्षक आहेस. **त्वम्** - तूं **सनातनः पुरुषः** - सनातन पुरुष आहेस, असे **मे** - माझे **मतः** - मत आहे.

**विवरण** - आपले विराट स्वरूप पाहून असा दृढ निश्चय झाला आहे की, आपणच परब्रह्म परमात्मा तसेच या जगाचे आश्रयस्थान आहात. म्हणजे कार्यकारणासहीत ते हे संपूर्ण जगत आपल्यामध्ये ओतप्रोत भरलेले आहे. आपणच याला धारण करून राहिले आहात. आपणच अविनाशी सनातन पुरुष आणि धर्माचे रक्षक आहात. असे माझे निश्चयपूर्वक दृढ मत आहे.

**व्याकरणम् - त्वम्** - युष्मत् सर्व.पु.प्र.ए.व. **वेदितव्यम्** - विद् द्वि.ग.प.प.कर्म.तव्यत्=वेदितव्य वि.न.प्र.ए.व. **परमम्** - परम वि.न.प्र.ए.व. **अक्षरम्** - अक्षर वि.न.प्र.ए.व. **त्वम्** - युष्मत् सर्व.पु.प्र.ए.व. **अस्य** - इदम् सर्व.ष.ए.व. **विश्वस्य** - विश्व न.ष.ए.व. **परम्** - पर वि.न.प्र.ए.व. **निधानम्** - नि+धा तृ.ग.उ.प.+अधिकरणे ल्युट्=निधान न.प्र.ए.व. **त्वम्** - युष्मत् सर्व.न.प्र.ए.व. **अव्ययः** - अव्यय

वि.पु.प्र.ए.व. **शाश्वतधर्मगोप्ता** - शाश्वत वि.धर्म पु. गोप्ता-गुप् द.ग.उ.प.+तृच्=गोप्तृ पु.प्र.ए.व. **त्वम्** - युष्मत् सर्व.पु.प्र.ए.व. **सनातनः** - सनातन वि.पु.प्र.ए.व. **पुरुषः** - पुरुष पु.प्र.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **मतः** - मन् च.ग.आ.प.कर्म.भूत.धा.वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **शाश्वतधर्मगोप्ता** - शश्वति अथवा शश्वत् भवः शाश्वतः शाश्वतश्चासौ धर्मश्च शाश्वतधर्मः शाश्वतधर्मस्य गोप्ता-रक्षक इति शाश्वतधर्मगोप्ता = शाश्वत म्हणजे सदा राहणाऱ्या धर्माचा रक्षक**(कर्म.ग.ष.त.स.)** यद्वा **शाश्वतधर्मगोप्ता** - शश्वद्भवतीति शाश्वतो वेदस्तेनोक्ता ये धर्मा ज्ञानकर्मादयस्तेषां गोप्ता-वर्णाश्रमधर्मरक्षक इति शाश्वतधर्मगोप्ता = जो सदा राहतो तो शाश्वत म्हणजे वेद त्याच्या द्वारा सां गितलेला धर्म म्हणजे ज्ञान, कर्म आदि त्यांचा गोप्ता म्हणजे वर्णाश्रमधर्मरक्षक असा शाश्वतधर्मगोप्ता **(तृ.त.ग.ष.त.स.)** **अव्ययः** - न विद्यते व्ययो ज्ञानाज्ञानाभ्यामन्यैर्वा विनाशो यस्य सोऽव्ययः = नाही नाश-ज्ञान अज्ञान अथवा अन्याच्या द्वारा विनाश ज्याचा तो अव्यय**(ब.स.)** **निधानम्** - अस्य महदादिपर्यन्तस्य विश्वस्य सर्व विकारजातस्य यन्निधानम्-निधीयते सर्वमस्मिन्निति निधानम्-जगद्बीजमव्याकृताख्यम् = या महतत्त्वापासून तर स्थूलापर्यंत संपूर्ण विकारांच्या समुदायभूत विश्वाचा निधान म्ह. ज्याच्या मध्ये स्थापित केले जाते ते निधान म्हणजे अव्याकृत नामक जगताचे बीज**(त.वि.)**

अर्जुनाला अनंत सामर्थ्य आणि प्रभाव युक्त विश्वरूपाचे दर्शन -

**अनादिमध्यान्तमनन्तवीर्यमनन्तबाहुं शशिसूर्यनेत्रम् ।**

**पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपन्तम् ॥१९॥**

**अव्ययः** - अनादिमध्यान्तम्, अनन्तवीर्यम्, अनन्तबाहुम्, शशिसूर्यनेत्रम्, दीप्तहुताशवक्त्रम्, स्वतेजसा, इदम्, विश्वम्, तपन्तम्, त्वाम्, पश्यामि ।

**अन्वयार्थः** - **अनादिमध्यान्तम्** - आदि मध्य आणि अंतरहित **अनन्तवीर्यम्** - ज्याच्या वीर्याला-बलाला अंत नाही म्हणजे अनंत आहे **अनन्तबाहुम्** - ज्याचे बाहु अनंत आहेत **शशिसूर्यनेत्रम्** - चंद्र आणि सूर्य हे ज्याचे डोळे आहेत **दीप्तहुताशवक्त्रम्** - प्रज्वलित अग्निप्रमाणे ज्याचे मुख आहे **स्वतेजसा इदम्, विश्वम्** - आपल्या तेजाने या जगताला **तपन्तम्** - ताप देणारा अशा **त्वाम्** - तुला **पश्यामि** - मी पहात आहे.

**विवरण** - आपले हे विश्वरूप सीमारहित म्हणजे आपल्या विश्वरूपाची काही एक सीमा निर्धारित नाही ते उत्पत्ति आदि सहा विकारांपासून रहित आणि नित्य म्हणजे आदि, मध्य, अंतरहित आहे. आपले वीर्य, बल, सामर्थ्य आणि तेज अनंत आहे. प्रज्वलित अग्निप्रमाणे मुख तसेच चंद्र आणि सूर्य आपले डोळे आ-हेत. आपल्या संतप्त प्रकाशाने विश्वाला ताप देणाऱ्या अशा तुला (परमात्म्याला) मी पहात आहे.

**व्याकरणम्** - **अनादिमध्यान्तम्** - अनादि वि. मध्य वि. अन्त वि.पु.द्वि.ए.व. **अनन्तवीर्यम्** - अनन्त वि. वीर्य न.वि.पु.द्वि.ए.व. **अनन्तबाहुम्** - अनन्त वि. बाहु पु.द्वि.ए.व. **शशिसूर्यनेत्रम्** - शशिन् पु. सूर्य पु. नेत्र न.वि.पु.द्वि.ए.व. **दीप्तहुताशवक्त्रम्** - 'दीपी दीप्तौ' दीप् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि. हुताश हु तृ.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. वक्त्र न.वि.पु.द्वि.ए.व. **स्वतेजसा** - स्व वि. तेजस् न.तृ.ए.व. **इदम्** - इदम् सर्व.न.द्वि.ए.व. **विश्वम्** - विश्व न.द्वि.ए.व. **तपन्तम्** - तप् प्र.ग.प.प.कर्त शतृ=तपत् वि.पु.द्वि.ए.व. **त्वाम्** - युष्मत् सर्व.द्वि.ए.व. **पश्यामि** - दृश् प्र.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अनादिमध्यान्तम्** - आदिश्च मध्यं च अन्तश्च आदिमध्यान्ता न विद्यन्त आदिमध्यान्ता यस्य सोऽनादिमध्यान्तस्तमनादिमध्यान्तम् = आदि मध्य अंत नाहीत ज्याचे त्याला**(ब.स.)** **अनन्तवीर्यम्** - अनन्तानि अपरिमितानि, वीर्याणि-पराक्रमा यस्य सोऽनन्तवीर्यस्तमनन्तवीर्यम् = अनंत म्हणजे अपरिमित वीर्य म्हणजे पराक्रम आहे ज्याचा त्याला**(ब.स.)** **अनन्तबाहुम्** - अनन्ता:-अपरिमिता: बाहवो यस्य सोऽनन्तबाहुस्तमनन्तबाहुम् = अनंत हात आहेत ज्याचे त्याला**(ब.स.)** **शशिसूर्यनेत्रम्** - शशी च-इन्दुश्च, सूर्यश्च भानुश्चेति शशिसूर्यौ तौ नेत्रे यस्य स शशिसूर्यनेत्रस्तं शशिसूर्यनेत्रम् = सूर्य आणि चंद्रमा हे दोन्ही डोळे आहेत ज्याचे त्याला**(ब.स.)** **दीप्तहुताशवक्त्रम्** - दीप्तश्चासौ-प्रदीप्तश्चासौ हुताशश्च-अग्निश्च दीप्तहुताश इव वक्त्राणि-मुखानि यस्य स तं दीप्तहुताशवक्त्रम् = प्रदीप्त अग्नीप्रमाणे मुख आहे ज्याचे त्याला**(ब.स.)** **स्वतेजसा** - स्वस्य तेज: स्वतेजस्तेन स्वतेजसा = स्वत:च्या तेजाने**(ष.त.स.)** **तपन्तम्** - तपति-तापयतीति वा तपन् तं तपन्तम् = ताप देत असणाऱ्याला**(वि.)**

संपूर्ण जगाला व्यापलेल्या अद्भुत विश्वरूपाला अर्जुनाचे पाहणे -

**द्यावापृथिव्योरिदमन्तरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वा: ।**

**दृष्ट्वाद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् ॥२०॥**

**अन्वय:** - हि, द्यावापृथिव्यो:, इदम्, अन्तरम्, त्वया, एकेन, व्याप्तम्, च, सर्वा:, दिश:, (व्याप्ता:), महात्मन्, तव, इदम्, अद्भुतम्, उग्रम्, रूपम्, दृष्ट्वा, लोकत्रयम्, प्रव्यथितम् ।

**अन्वयार्थ:** - **हि** - कारण **द्यावापृथिव्यो: इदम्, अन्तरम्** - पृथ्वी आणि आकाशा मधील सर्व प्रदेश (म्हणजे अंतरिक्ष) **त्वया एकेन** - तुझ्या एकट्याकडून **व्याप्तम्** - व्याप्त केला आहे **च** - आणि **सर्वा: दिश:** - संपूर्ण दिशा देखील (**व्याप्ता:** - व्याप्त केल्या आहेत) **महात्मन्** - हे विश्वरूप! **तव इदम्, अद्भुतम्, उग्रम्, रूपम्** - हे तुझे अलौकिक आणि भयंकर रूप **दृष्ट्वा** - पाहून **लोकत्रयम्** - त्रैलोक्य **प्रव्यथितम्** - पीडित झाले आहे.

**विवरण** - हे परब्रह्म परमात्मन्! आपले विराट स्वरूप येवढे विस्तारपूर्वक पसरले आहे की, त्याने स्वर्ग आणि पृथ्वी यामध्ये असणारे संपूर्ण आकाश आणि संपूर्ण दिशा व्याप्त केल्या आहेत अशा प्रकारचे एकही स्थान नाही की ज्याठिकाणी आपले स्वरूप व्याप्त नाही; त्याच बरोबर आपले अद्भुत आणि अत्यंत उग्र स्वरूप येवढे भयानक दिसत आहे की स्वर्ग मृत्यु आणि पाताळ या तिन्ही लोकांतील जीव आपल्या विश्वरूपाला पाहून अत्यंत भयानक झाले आहेत. म्हणजे त्यांची जीवदशा अत्यंत केविलवाणी किंवा व्यथित झाली आहे.

**व्याकरणम्** - **हि** - हि क्रि.वि.अ. **द्यावापृथिव्यो:** - द्यावा स्त्री. पृथिवी स्त्री.ष.द्वि.व. **इदम्** - इदम् सर्व.न.प्र.ए.व. **अन्तरम्** - अन्तर वि.न.प्र.ए.व. **त्वया** - युष्मत् सर्व.तृ.ए.व. **एकेन** - एक संख्यावाचक क्रि.वि.तृ.ए.व. **व्याप्तम्** - वि+आप् पं.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **सर्वा:** - सर्व सर्व.स्त्री.प्र.ब.व. **दिश:** - दिश् स्त्री.प्र.ब.व. (**व्याप्ता:** - वि+आप् पं.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.स्त्री.प्र.ब.व.) **महात्मन्** - महात्मन् पु.संबो.ए.व. **तव** - युष्मत् सर्व.ष.ए.व. **इदम्** - इदम् सर्व.न.द्वि.ए.व. **अद्भुतम्** - अद्भुत वि.न.द्वि.ए.व. **उग्रम्** - उग्र वि.न.द्वि.ए.व. **रूपम्** - रूप न.द्वि.ए.व. **दृष्ट्वा** - दृश् प्र.ग.प.प.त्वान्त अ. **लोकत्रयम्** - लोक पु. त्रय वि.न.प्र.ए.व. **प्रव्यथितम्** - प्र+व्यथ् प्र.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - दिशः** - दिशन्ति अवकाशं ददतीति दिशः = अवकाश देतात त्या दिशा**(वि.) अद्भुतम् -** न कदाचिद्भुतमिति अद्भुतम् = जे केव्हाही होत नाही ते अद्भुत त्याला**(न.त.स.) लोकत्रयम्** - लोकानां त्रय मिति लोकत्रयम् = त्रैलोक्य (तीन लोक)**(ष.त.स.) द्यावापृथिव्योः** - द्यौश्च पृथिवी चेति द्यावापृथिव्यौ तयोर्द्यावापृथिव्योः = आकाश आणि पृथ्वीच्या**(द्व.स.) प्रव्यथितम्** - प्रकृष्टा व्यथा संजाता अस्य तत् प्रव्य थितम् = प्रकर्षरूपाने व्यथा पीडा आहे ज्याची ते**(इतच् प्रत्ययान्त तद्धि.वि.) महात्मन्** - महान्-महत्तरो विश्वमय आत्मा-देहो यस्य स महात्मा तस्य सम्बुद्धौ महात्मन् = महान् म्हणजे महत्तर विश्वमय आत्मा म्हणजे देह आहे ज्याचा तो महात्मा महात्मन् त्याचे संबोधनाचे रूप हे महात्मन्**(ब.स.)**

विश्वरूपामध्ये प्रवेश करणारे देवादिकांचे, स्तुती करणारे महर्षी आदिंचे दर्शन -

**अमी हि त्वां सुरसङ्घा विशन्ति केचिद्भीताः प्राञ्जलयो गृणन्ति ।**

**स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसङ्घाः स्तुवन्ति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः ॥२१॥**

**अन्वयः** - हि, अमी, सुरसङ्घाः, त्वाम्, विशन्ति, केचित्, भीताः, प्राञ्जलयः, गृणन्ति, महर्षिसिद्धसङ्घाः, स्वस्ति, इति, उक्त्वा, पुष्कलाभिः, स्तुतिभिः, त्वाम्, स्तुवन्ति ।

**अन्वयार्थः - हि** - आणि त्याचप्रमाणे **अमी सुरसङ्घाः** - हे देवांचे समूह **त्वाम्** - तुझ्या शरीरामध्ये **विशन्ति** - प्रवेश करीत आहेत **केचित्, भीताः** - त्यामधील काही भयभीत होत्साते-होत असणारे **प्राञ्जलयः** - हात जोडून **गृणन्ति** - तुझी प्रार्थना करीत आहेत **महर्षिसिद्धसङ्घाः** - महर्षी आणि सिद्धांचे समुदाय **स्वस्ति, इति उक्त्वा** - स्वस्ति स्वस्ति असे म्हणून **पुष्कलाभिः स्तुतिभिः** - अनेक स्तुतीच्या द्वारा **त्वाम् -** तुला (तुझी) **स्तुवन्ति** - स्तुती करीत आहेत.

**विवरण** - आपल्या या भयानक विश्वरूपामध्ये पुष्कळ देवता लोक प्रवेश करीत आहेत. भयानक आणि उग्ररूप पाहून काही लोक आपल्या नाम आणि गुणांचे संकीर्तन केले पाहिजे. संकीर्तनाने आपले भयानक रूप शांत होईल अशी मनात इच्छा धरून आणि हात जोडून आपली प्रार्थना करीत आहेत. मरीचि, अंगीरा, भृगु आदि महर्षी आणि ज्ञात व अज्ञात अनेक सिद्धाचे समुदाय भगवंताचे यथार्थ रूप जाणत असल्यामुळे ते भयभीत न होता ''कल्याण होवो, कल्याण होवो'' असे म्हणून, चांगल्या चांगल्या स्तोत्रांच्याद्वारा आपली स्तुती करीत आहेत.

**व्याकरणम् - हि** - हि क्रि.वि.अ. **अमी** - अदस् पु.प्र.ब.व. **सुरसङ्घाः** - सुर पु. सङ्घ पु.प्र.ब.व. **त्वाम्** - युष्मत् सर्व.द्वि.ए.व. **विशन्ति** - विश् ष.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **केचित्** - के किम् सर्व.पु.प्र.ब.व. चित् प्रत्ययान्त **भीताः** - भी तृ.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **प्राञ्जलयः** - प्र+अञ्जलि पु.प्र.ब.व. **गृणन्ति** - गृ न.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **महर्षिसिद्धसङ्घाः** - महत् वि. ऋषि पु. सिद्ध पु. सङ्घ पु.प्र.ब.व. **स्वस्ति, इति** - स्वस्ति अ. इति क्रि.वि.अ. **उक्त्वा** - वच् द्वि.ग.प.प.त्वान्त अ. **पुष्कलाभिः** - पुष्+कालच् प्रत्ययान्त वि.स्त्री.तृ.ब.व. **स्तुतिभिः** - स्तु द्वि.ग.उ.प.+क्तिन्=स्तुति स्त्री.तृ.ब.व. **त्वाम्** - युष्मत् सर्व.द्वि.ए.व. **स्तुव न्ति** - स्तु द्वि.ग.उ.प.(प.प.)वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - सुरसङ्घाः** - सुराणाम्-देवानां सङ्घाः-समूहाः सुरसङ्घाः = सुरांचा समूह**(ष.त.स.) महर्षि सिद्धसङ्घाः** - महान्तश्च ऋषयश्चेति महर्षयो महर्षयश्च-मंत्रद्रष्टारश्च, सिद्धाश्च-ज्ञानिनश्चेति महर्षिसिद्धा महर्षि

**लोकस्य** - लोक पु.ष.ए.व. **पिता** - पितृ पु.प्र.ए.व. **असि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.द्वि.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **पूज्यः** - पूज् द.ग.प.प.कर्म.ण्यत् वि.पु.प्र.ए.व. **गरीयान्** - गरीयस् वि.पु.प्र.ए.व. **गुरुः** - गुरु पु.प्र.ए.व. (**असि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.द्वि.पु.ए.व.) **अप्रतिमप्रभाव** - अप्रतिम वि. प्रभाव पु.संबो.ए.व. **लोकत्रये** - लोक पु. त्रय वि.पु.स.ए.व. **अपि** - अपि अ. **त्वत्समः** - युष्मत् सर्व.ष.ए.व. सम वि.पु.प्र.ए.व. **अन्यः** - अन्य सर्व.पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अस्ति** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **अभ्यधिकः** - अभि+अधिक वि.पु.प्र.ए.व. **कुतः** - कुतस् अ.

**समासविग्रहार्थाः** - **अप्रतिमप्रभाव** - प्रतिमीयतेऽनयेति सा प्रतिमा-सादृश्यं न विद्यते यस्याऽसावप्रतिमः, अप्रतिमः प्रभावः-सामर्थ्यम् यस्य सोऽप्रतिमप्रभावस्तत्सम्बुद्धौ अप्रतिमप्रभाव = जिच्याद्वारा दुसऱ्या वस्तूची समानता केली जाते ती प्रतिमा म्हणजे सादृश्य, नाही प्रतिमा ज्याची तो अप्रतिम, अप्रतिम प्रभाव-सामर्थ्य आहे ज्याचे तो**(ब.स.)** **लोकत्रये** - लोकानां त्रयं लोकत्रयं तस्मिन् लोकत्रये = लोकत्रयामध्ये**(ष.त.स.)** **त्वत्समः** - तव समस्त्वत्समः = तुमच्या समान**(ष.त.स.)** **चराचरस्य** - चरश्चाचरश्च चराचरौ तयोः समाहार इति चराचरं तस्य चराचरस्य = चर आणि अचर यांचा समाहार चराचर त्या चराचराचा**(समा.द्वं.स.)** **पूज्यः** - पूजयितुं योग्यः पूज्यः = पूजा करण्याकरिता योग्य पूज्य**(कृ.वि.)** **गुरुः** - गृणाति-हितमुपदिशतीति गुरुः = हिताचा अथवा ज्ञानाचा उपदेश देणारा**(वि.)** **गरीयान्** - अतिशयेन गुर्विति गरीयान् = अत्यंत श्रेष्ठ**(वि.)**

भगवंत प्रसन्न होण्याकरिता आणि अपराध सहन करण्याकरिता अर्जुनाची प्रार्थना -

**तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम् ।**

**पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् ॥४४॥**

**अन्वयः** - तस्मात्, अहम्, कायम्, प्रणिधाय, प्रणम्य, ईशम्, ईड्यम्, त्वाम्, प्रसादये, देव, पुत्रस्य, पिता, इव, सख्युः, सखा, इव, प्रियायाः, प्रियः, इव, (त्वम्), सोढुम्, अर्हसि ।

**अन्वयार्थः** - **तस्मात्** - म्हणून **अहम्** - मी **कायम्, प्रणिधाय** - साष्टांग दंडवत घालून **प्रणम्य** - नमस्कार करून **ईशम्, ईड्यम्, त्वाम्** - सर्व जगाचा अधिपती आणि स्तुती करण्यास योग्य अशा तुला **प्रसादये** - प्रसन्न होण्याकरिता विनंती करतो **देव** - हे देवा! **पुत्रस्य पिता, इव** - पुत्राचा अपराध जसा पिता **सख्युः सखा इव** - मित्राचा अपराध जसा मित्र **प्रियायाः प्रियः, इव** - प्रिय जनांचे अपराध जसे प्रियजन पोटात घालतात (सहन करतात) त्याचप्रमाणे **त्वम्** - तू माझा अपराध **सोढुम्** - सहन करण्याकरिता **अर्हसि** - समर्थ आहेस.

**विवरण** - हे प्रभो! माझ्या शरीराला दण्डाप्रमाणे आपल्या चरणावर निवेदन करून, तसेच नमस्कार करून, आपण जसे स्तुती करण्यास योग्य अशा आपणाला (ईश्वराला) प्रसन्न होण्याकरिता मी प्रार्थना करीत आहे. कारण इंद्र, आदित्य, वरुण, कुबेर आणि यमराज आदि लोकनियंत्या देवतांचे ही नियमन करणारे आपण सर्वांचे एकमात्र महेश्वर आहात. म्हणून, आपणच वास्तविक स्तुती करण्यास योग्य आहात. माझ्यामध्ये एवढे ज्ञान नाही आहे आणि वाणीमध्ये एवढे बल नाही आहे की, ज्यामुळे मी आपले स्तवन करून आपणाला प्रसन्न करू. परंतु, जसे अज्ञानामुळे प्रमादवश होऊन केलेल्या पुत्राच्या अपराधाला पिता क्षमा करतो, थट्टेमध्ये केलेल्या मित्राच्या अपराधाला मित्र सहन करतो, प्रेमवश होऊन केलेल्या पत्नीच्या अपराधाला पती क्षमा करतो त्याचप्रमाणे प्रमादवश होऊन केलेल्या माझ्या अपराधाला आपण क्षमा करा.

कारण, अपराध सहन करण्याकरिता आपणच समर्थ आहात.

**व्याकरणम् - तस्मात्** - तत् सर्व.पं.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **कायम्** - काय न./पु.द्वि.ए.व. **प्र णिधाय** - प्र+नि+धा तृ.ग.उ.प.ल्यबन्त अ. **प्रणम्य** - प्र+नम् प्र.ग.प.प.ल्यबन्त अ. **ईशम्** - ईश वि.पु. द्वि.ए.व. **ईड्यम्** - ईड् द्वि.ग.आ.प.कर्म.ण्यत् वि.पु.द्वि.ए.व. **त्वम्** - युष्मत् सर्व.द्वि.ए.व. **प्रसादये** - प्र+सद् ष.ग.उ.प.(आ.प.)प्रयोजक वर्त.प्र.पु.ए.व. **देव** - देव पु.संबो.ए.व. **पुत्रस्य** - पुत्र पु.ष.ए.व. **पिता** - पितृ पु.प्र.ए.व. **इव** - इव अ. **सख्युः** - सखि पु.ष.ए.व. **सखा** - सखि पु.प्र.ए.व. **इव** - इव अ. **प्रियायाः** - प्रिया स्त्री.ष.ए.व. **प्रियः** - प्रिय पु.प्र.ए.व. **इव** - इव अ. **त्वम्** - युष्मत् सर्व.प्र.ए.व. **सोढुम्** - सह् प्र.ग.उ.प.तुमन्त अ. **अर्हसि -** अर्ह् प्र.ग.प.प.वर्त.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - ईड्यम् -** ईडितुम्-स्तोतुं योग्य ईड्यस्तमीड्यम्-स्तुत्यम् = स्तुति करण्याकरिता योग्य ते ईड्य त्याला**(त.वि.) ईशम् -** इष्ट इति ईशस्तमीशम् = चेष्टा करतो तो ईश त्याला**(वि.)** यद्वा **ईशम् -** ईशितुं शासितुं शीलं स्वभावो यस्य स ईशस्तमीशम् = शासन करण्याचा शील-स्वभाव आहे ज्याचा तो ईश त्याला **(त.वि.)**

चतुर्भुज रूप दाखविण्याकरिता अर्जुनाची प्रार्थना -

**अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे ।**

**तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्निवास ॥४५॥**

**अन्वयः** - देव, अदृष्टपूर्वम्, रूपम्, दृष्ट्वा, हृषितः, अस्मि, च, भयेन, मे, मनः, प्रव्यथितम्, देवेश, जग न्निवास, प्रसीद, तत्, एव, रूपम्, मे, दर्शय ।

**अन्वयार्थः - देव** - हे देवा! **अदृष्टपूर्वम्** - पूर्वी कधी न पाहिलेले **रूपम्** - रूप **दृष्ट्वा** - हे विश्वरूप पाहून **हृ षितः, अस्मि** - मी आनंदीत झालो आहे **च** - आणि **भयेन** - भीतीने **मे मनः** - माझे मन **प्रव्यथितम्** - अ तिशय पीडित झाले आहे **देवेश** - हे देवांच्या देवा! **जगन्निवास** - हे सर्वव्यापी श्रीकृष्ण! **प्रसीद** - प्रसन्न हो **तत् एव** - तेच पूर्वीचे चतुर्भुज **रूपम्** - रूप **मे** - मला **दर्शय** - दाखव.

**विवरण** - कधीही न पाहिलेले अलौकिक तसेच आश्चर्यमय हे आपले रूप पाहून, मी आनंदीत झालो आहे आणि त्याचबरोबर अशा या आपल्या विक्राळ विराट स्वरूपाला पाहून, माझे मन कंपित होऊन अत्यंत व्याकूळ झाले आहे. आपण संपूर्ण देवांचे स्वामी साक्षात् सर्वाधार सर्वव्यापी परमेश्वर आहात. आपण आपल्या वैकुण्ठधामामध्ये निवास करणाऱ्या देवरूपाला अथवा विष्णुरूपाला अथवा चतुर्भुज रूपाला दाखवू शकता. म्हणून, आपण आपल्या या विक्राळ विराट स्वरूपाला आवरून (समाप्त करून) मला आपले चतुर्भुज रूप दाखविण्याची कृपा करा.

**व्याकरणम् - देव** - देव पु.संबो.ए.व. **अदृष्टपूर्वम्** - अ+दृश् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. पूर्व वि.न.द्वि.ए.व. **दृष्ट्वा** - दृश् प्र.ग.प.प. त्वान्त अ. **हृषितः** - हृष् च.ग.प.प.+णिच्+कर्त.क्त=हृषित वि.पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **भयेन** - भय तृ.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **मनः** - मनस् न.प्र.ए.व. **प्रव्यथितम्** - प्र+व्यथ् प्र.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **देवेश** - देव पु. ईश पु.संबो.ए.व. **जगन्निवास** - जगत् न. निवास पु.संबो.ए.व. **प्रसीद** - प्र+सद् प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**तत्** - तत् सर्व.न.द्वि.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **रूपम्** - रूप न.द्वि.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.च.ए.व. **दर्शय** - दृश् प्र.ग.प.प.प्रयोजक आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अदृष्टपूर्वम्** - पूर्वं दृष्टमिति दृष्टपूर्वं न दृष्टपूर्वमित्यदृष्टपूर्वम् = कधीही न पाहिलेले असे अदृष्टपूर्व**(केवल स.)** **प्रव्यथितम्** - प्रकर्षेण व्यथा संजाता अस्य तत् प्रव्यथितम्-दु:खितम् = प्रकृष्ट रूपाने व्यथा-पीडा उत्पन्न झाली आहे ज्याला ते**(त.वि.)** **देवेश** - देवानाम्-सुराणामीश: स्वामीति दे-वेशस्तत्सम्बुद्धौ देवेश = देवांचा अधिपती तो देवेश**(ष.त.स.)** **जगन्निवास** - जगतो निवासो जग न्निवासस्तत्सम्बुद्धौ जगन्निवास = जगताचे निवासस्थान जो तो जगन्निवास**(ष.त.स.)**

**किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।**

**तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥४६॥**

**अन्वय:** - अहम्, किरीटिनम्, गदिनम्, चक्रहस्तम्, त्वाम्, तथा, एव, द्रष्टुम्, इच्छामि, सहस्रबाहो, विश्वमूर्ते, तेन, एव, चतुर्भुजेन, रूपेण, भव ।

**अन्वयार्थ:** - **अहम्** - मी **किरीटिनम्** - मुगुट धारण केलेल्या **गदिनम्** - गदा धारण केलेल्या **चक्रहस्तम्** - हातात चक्र धारण केलेल्या **त्वाम्** - अशा तुला **तथा, एव** - त्यापूर्वीच्या रूपामध्येच **द्रष्टुम्** - पाहण्याची **इच्छामि** - इच्छा करतो **सहस्रबाहो विश्वमूर्ते** - सहस्रबाहो विश्वरूपा **तेन, एव** - त्याच पहिल्या **चतुर्भुजेन रूपेण** - चतुर्भुज रूपाने **भव** - माझ्या समोर प्रगट हो.

**विवरण** - पूर्वीच्या मुगुट धारण केलेल्या, गदा आणि चक्र हातात घेतलेल्या, चतुर्भुज रूपाला पाहण्याची मी इच्छा करीत आहे. म्हणून, हे सहस्रबाहो! हे विश्वरूपा! आपले जे विक्राळ विराट स्वरूप आहे त्या स्वरूपाला आवरून आपण चतुर्भुज रूपाने प्रगट व्हा.

**व्याकरणम्** - **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **किरीटिनम्** - किरीटिन् वि.पु.द्वि.ए.व. **गदिनम्** - गदिन् वि.पु. द्वि.ए.व. **चक्रहस्तम्** - चक्र न. हस्त पु.द्वि.ए.व. **त्वाम्** - युष्मत् सर्व.द्वि.ए.व. **तथा** - तथा क्रि.वि.अ. **द्रष्टुम्** - दृश् प्र.ग.प.प.तुमन्त अ. **इच्छामि** - इष् ष.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **सहस्रबाहो** - सहस्त्र संख्यावाचक वि.न. बाहु पु.संबो.ए.व. **विश्वमूर्ते** - विश्व न.वि. मूर्ति स्त्री.वि.पु.संबो.ए.व. **तेन** - तत् सर्व.पु.तृ.ए.व. **एव** - क्रि.वि.अ. **चतुर्भुजेन** - चतुर् वि. भुज न.तृ.ए.व. **रूपेण** - रूप न.तृ.ए.व. **भव** - भू प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था** :- **चक्रहस्तम्** - चक्रम्-सुदर्शनं हस्ते यस्य स चक्रहस्तस्तम् चक्रहस्तम् = चक्र आहे हातामध्ये ज्याच्या त्याला**(व्यधिकरण ब.स.)** **चतुर्भुजेन** - चत्वारो भुजा:-हस्ता यस्मिन् तच्चतुर्भुजं तेन चतुर्भुजेन = चार हात आहे ज्यामध्ये ते त्या चतुर्भुज रूपाने**(ब.स.)** **सहस्रबाहो** - सहस्रबाहव:-हस्ता यस्य स सहस्रबाहुस्तत्सम्बुद्धौ सहस्रबाहो = सहस्रबाहू म्हणजे सहस्र हात आहेत ज्याचे तो सहस्रबाहु**(ब.स.)** **विश्वमूर्ते** - विश्वमेव मूर्ति:-आकारो यस्य स विश्वमूर्तिस्तत्सम्बुद्धौ विश्वमूर्ते = विश्वच ज्याची मूर्ति-आकार आहे तो विश्वमूर्ति**(ब.स.)** **किरीटिनम्** - किरीटमस्यास्तीति किरीटी तं किरीटिनम् = मुगुट आहे ज्याचा त्याला**(अस्त्यर्थे त.वि.)** **गदिनम्** - गदास्यास्तीति गदी तं गदिनम्-गदावन्तम् = गदा आहे ज्याची त्याला **(अस्त्यर्थे त.व.)**

भगवंतद्वारा आपल्या विश्वरूपाची प्रशंसा -

**श्री भगवानुवाच** - श्री भगवान म्हणाले.

**मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात् ।**

**तेजोमयं विश्वमनन्तमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ॥४७॥**

**अन्वय:** - अर्जुन, प्रसन्नेन, मया, आत्मयोगात्, तव, इदम्, मे, परम्, तेजोमयम्, विश्वम्, अनन्तम्, आद्यम्, रूपम्, दर्शितम्, यत्, त्वदन्येन, न, दृष्टपूर्वम् ।

**अन्वयार्थ:- अर्जुन** - हे अर्जुना! **प्रसन्नेन मया** - प्रसन्न झालेल्या अशा माझ्याकडून **आत्मयोगात्** - माझ्या योगशक्तिच्या सामर्थ्यामुळे **तव** - तुला **इदम्** - हे **मे** - माझे **परम्, तेजोमयम्** - परम तेजस्वी **विश्वम्** - विराट **अनन्तम्** - अनंत **आद्यम्** - सर्वांचे आदि **रूपम्** - विश्वरूप **दर्शितम्** - दाखविले गेले **यत्** - जे माझे रूप **त्वदन्येन** - तुझ्या अतिरिक्त **न दृष्टपूर्वम्** - पूर्वी कोणीही पाहिलेले नाही.

**विवरण** - माझ्या विराट स्वरूपाचे दर्शन सर्व वेळेला आणि सर्वांना होऊ शकत नाही. परंतु, हे अर्जुना! तुझ्या अनन्य भक्तिने आणि प्रार्थनेने प्रसन्न झालेल्या माझ्याकडून हे अलौकिक परम तेजस्वी सर्वाचे आदि अनंत असे विराट विश्वरूप प्रार्थना करणाऱ्या तुला दाखविले गेले. असे हे माझे विराट स्वरूप माझी माता देवकी, माझे पिता वसुदेव आणि माझी सेवा करणारी लक्ष्मी यांच्याकडून अनेक प्रार्थना केली असतांना सुद्धा मी माझे विश्वरूप त्यांना दाखविले नाही. म्हणजे, तुझ्यातिरिक्त असे जे माझे विश्वरूप पूर्वी कोणीही पा हिलेले नाही.

**व्याकरणम् - अर्जुन** - अर्जुन पु.संबो.ए.व. **प्रसन्नेन** - प्र+सद् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.तृ.ए.व. **मया** - अस्मत् सर्व.तृ.ए.व. **आत्मयोगात्** - आत्मन् पु. योग पु.पं.ए.व. **तव** - युष्मत् सर्व.ष.ए.व. **इदम्** - इदम् सर्व.न.प्र.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **परम्** - पर वि.न.प्र.ए.व. **तेजोमयम्** - तेजस् न.मयट् प्रत्ययान्त न.प्र.ए.व. **विश्वम्** - विश्व न.प्र.ए.व. **आद्यम्** - आद्य वि.न.प्र.ए.व. **रूपम्** - रूप न.प्र.ए.व. **दर्शितम्** - दृश् प्र.ग.प.प.+णिच्+कर्म.क्त=दर्शित वि.न.प्र.ए.व. **यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **त्वदन्येन** - त्वत् युष्मत् सर्व. अन्य सर्व.पु.तृ.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **दृष्टपूर्वम्** - दृश् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. पूर्व वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - अनन्तम्** - न विद्यतेऽन्तो यस्य तदनन्तम्-अपरिच्छिन्नम् = नाही होत अंत ज्याचा ते **(ब.स.) त्वदन्येन** - त्वत्तोऽन्यस्त्वदन्यस्तेन त्वदन्येन = तुझ्याहून जो अन्य त्याच्याकडून**(पं.त.स.) दृष्टपूर्वम्** - पूर्वं दृष्टमिति दृष्टपूर्वम् = पूर्वी पाहिलेले**(वि.)**

**न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रै: ।**

**एवंरूप: शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ॥४८॥**

**अन्वय: -** कुरुप्रवीर, नृलोके, एवम्, रूप:, न, वेदयज्ञाध्ययनै:, न, दानै:, न, क्रियाभि:, च, न, उग्रै:, तपो भि:, त्वदन्येन, अहम्, द्रष्टुम्, न, शक्य: ।

**अन्वयार्थ: - कुरुप्रवीर -** हे कुरूश्रेष्ठा! **नृलोके -** या मनुष्यलोकामध्ये **एवंरूप: -** अशाप्रकारचे विश्वरूप **न वेदयज्ञाध्ययनै: -** नाही वेद आणि यज्ञ यांच्या अध्ययनाने **दानै: -** नाही दानांच्याद्वारा **न क्रियाभि: -** नाही

क्रियांच्याद्वारा **च** - आणि **न उग्रै: तपोभि:** - नाही उग्र तपाच्याद्वारा **त्वदन्येन** - तुझ्याशिवाय **अहम्** - मी कोणाकडून सुद्धा **द्रष्टुम्** - पाहण्याकरिता **न शक्य:** - शक्य नाही.

**विवरण** - या मनुष्य लोकामध्ये विराट स्वरूपाने तुझ्या पुढे प्रगट होणारा मी त्या माझ्या रूपाला न वेदाध्ययनाच्याद्वारा, न यज्ञानुष्ठानाच्याद्वारा, न दानाच्या द्वारा, न कृच्छ्र चान्द्रायणादि तथा मन आणि इंद्रियांचा विवेक आणि बलपूर्वक दमनादि कठोर तपाच्या द्वारा आणि न क्रियाच्याद्वारा तुझ्यातिरिक्त कोणीही पाहू शकले नाही.

**व्याकरणम् - कुरुप्रवीर** - कुरु वि. प्र+वीर वि.पु.संबो.ए.व. **नृलोके** - नृ पु. लोक पु.स.ए.व. **एवंरूप:** - एवम् क्रि.वि.अ. रूप न.वि.पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **वेदयज्ञाध्ययनै:** - वेद पु. यज्ञ पु. अध्ययन न.तृ.ब.व. **न** - न क्रि.वि.अ. **दानै:** - दान न.तृ.ब.व. **न** - न क्रि.वि.अ. **क्रियाभि:** - क्रिया स्त्री.तृ.ब.व. **च** - च उभ.अ. **न** - न क्रि.वि.अ. **उग्रै:** - उग्र वि.न.तृ.ब.व. **तपोभि:** - तपस् न.तृ.ब.व. **त्वदन्येन** - युष्मत् सर्व. अन्य सर्व.पु.तृ.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **द्रष्टुम्** - दृश् प्र.ग.प.प. तुमन्त अ. **न** - न क्रि.वि.अ. **शक्य:** - शक् पं.ग.प.प.+यत्=शक्य वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - नृलोके** - नृणाम्-मनुष्याणां लोको नृलोकस्तस्मिन् नृलोके-मनुष्यलोके = मनुष्य लोकामध्ये**(ष.त.स.) एवंरूप:** - एवं रूपं अर्थाद् यथा दर्शितं विश्वरूपं यस्य स एवंरूप: = त्या प्रकारचे रूप म्हणजे यथा दर्शित रूप आहे ज्याचे तो**(ब.स.) वेदयज्ञाध्ययनै:** - वेदाश्च यज्ञाश्च वेदयज्ञा वेदयज्ञानामध्ययनानि-अनुष्ठानानि वेदयज्ञाध्ययनानि तैर्वेदयज्ञाध्ययनै:-वेदयज्ञानुष्ठानै: = वेद आणि यज्ञ वेदयज्ञ यांच्या अध्ययनाच्याद्वारा**(द्वं.ग.ष.त.स.) त्वदन्येन** - त्वत्तोऽन्यस्त्वदन्यस्तेन त्वदन्येन = तुझ्याहून अन्य त्वदन्य त्याकडून**(पं.त.स.) कुरुप्रवीर** - कुरौ-कुरुवंशे प्रवीर:-श्रेष्ठ इति कुरुप्रवीरस्तत्सम्बुद्धौ कुरुप्रवीर = कुरुवंशामध्ये श्रेष्ठ**(स.त.स.)**

भगवंताचे अर्जुनाला धैर्य (अभय) देऊन आपले चतुर्भुज रूप दाखविणे -

**मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम् ।**

**व्यपेतभी: प्रीतमना: पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य ॥४९॥**

**अन्वय:** - मम, इदम्, ईदृक्, घोरम्, रूपम्, दृष्ट्वा, ते, व्यथा, मा, (भूत्) च, विमूढभाव:, मा, त्वम्, पुन:, व्यपेतभी:, प्रीतमना:, तत्, एव, इदम्, मे, रूपम्, प्रपश्य ।

**अन्वयार्थ: - मम** - माझे **इदम्, ईदृक्, घोरम्, रूपम्** - हे अशाप्रकारचे भयंकर रूप **दृष्ट्वा** - पाहून **ते** - तूला **व्यथा** - व्यथा (पीडा) **मा (भूत)** - न होवो **च** - आणि **विमूढभाव: मा** - (मूढ भावयुक्त होऊ नकोस) मूढभाव न होवो. **त्वम्** - तू **पुन:** - पुन्हा **व्यपेतभी:** - भीतिरहित **प्रीतमना:** - प्रसन्नचित्तयुक्त होऊन **तत्, एव** - तेच पूर्वीचे **इदम्** - हे **मे रूपम्** - माझे रूप **प्रपश्य** - पहा.

**विवरण** - मी तुझ्यावर प्रसन्न होऊन कोणाला न दाखविलेले, तुझ्या व्यतिरिक्त कोणी न पाहिलेले असे जे माझे विश्वरूप तुला दाखविले. त्या विश्वरूपाला पाहून तुझ्या ठिकाणी भीती निर्माण व्हावयास नाही पाहिजे आणि मूढभावयुक्त नाही व्हावयास पाहिजे परंतु, हे अर्जुना! भयरहित आणि प्रीतियुक्त मनाने होऊन या माझ्या शंख, चक्र, गदा, पद्मयुक्त चतुर्भुज रूपाला पुन्हा पहा.

**व्याकरणम् - मम -** अस्मत् सर्व.ष.ए.व. **इदम् -** इदम् सर्व.न.द्वि.ए.व. **ईदृक् -** ईदृश् वि.न.द्वि.ए.व. **घोरम्** - घोर वि.न.द्वि.ए.व. **रूपम् -** रूप न.द्वि.ए.व. **दृष्ट्वा -** दृश् प्र.ग.प.प.त्वान्त अ. **ते -** युष्मत् सर्व.ष.ए.व. **व्यथा -** व्यथा स्त्री.प्र.ए.व. **मा -** मा अ. **च -** च उभ.अ. **विमूढभाव: -** वि+मुह् च.ग.प.प.कर्त.भूत.धा. वि. भाव पु.प्र.ए.व. **मा -** मा अ. **त्वम् -** युष्मत् सर्व.प्र.ए.व. **पुन: -** पुनर् अ. **व्यपेतभी: -** वि+अप्+इ द्वि.ग.प.प.कर्त.भूत.धा.वि. भी स्त्री.प्र.ए.व. **प्रीतमना: -** प्री न.ग.उ.प.कर्म.भूत.धा.वि. **मनस् -** न. वि.पु.प्र.ए.व. **तत् -** तत् सर्व.न.द्वि.ए.व. **एव -** एव क्रि.वि.अ. **इदम् -** इदम् सर्व.न.द्वि.ए.व. **मे -** अस्मत् सर्व.ष.ए.व. **रूपम् -** रूप न.द्वि.ए.व. **प्रपश्य -** प्र+दृश् प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - व्यपेतभी: -** व्यपेता-विगता भी:-भयं यस्य स व्यपेतभी:- निर्भय: = समाप्त झाली आहे भीति ज्याची तो**(ब.स.) प्रीतमना: -** प्रीतम्-तुष्टं मन:-अन्त:करणं यस्य स प्रीतमना:-प्रसन्नचित्त: = प्रसन्न चित्त आहे ज्याचे तो **(ब.स.) विमूढभाव: -** विमूढो भावो यस्य स विमूढभाव: = विमूढभाव आहे ज्याचा तो**(ब.स.)**

चतुर्भुज रूपाचे दर्शन करून पुन: मनुष्यरूप होण्याचे संजयद्वारा वर्णन -

**सञ्जय उवाच -** संजय म्हणाला.

**इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूय: ।**

**आश्वासयामास च भीतमेनं भूत्वा पुन: सौम्यवपुर्महात्मा ॥५०॥**

**अन्वय: -** वासुदेव:, अर्जुनम्, तथा, उक्त्वा, इति, भूय:, स्वकम्, रूपम्, दर्शयामास, च, महात्मा, पुन:, सौम्यवपु:, भूत्वा, भीतम्, एनम्, आश्वासयामास।

**अन्वयार्थ: - वासुदेव: -** वासुदेव (वासुदेवाने) **अर्जुनम् -** अर्जुनाला **तथा, उक्त्वा -** असे बोलून **इति -** या प्रमाणे **भूय: -** पुन्हा **स्वकम्, रूपम् -** आपले पूर्वी चतुर्भुज रूप **दर्शयामास -** दाखविता झाला(दाखविले) **च** - आणि **महात्मा -** महात्मा **पुन: -** पुन्हा **सौम्यवपु: -** सौम्यशरीराने युक्त **भूत्वा -** होऊन **भीतम्, एनम् -** या भयभीत अर्जुनाला **अश्वासयामास -** धैर्य (धीर) देता झाला.

**विवरण -** शंख, चक्र, गदा आणि पद्मयुक्त भगवंताने अर्जुनाला (माझे चतुर्भुज रूप पहा) असे बोलून पुन्हा आपले सौम्यरूप धारण करून भयभीत अर्जुनाला संतुष्ट केले.

**व्याकरणम् - वासुदेव: -** वासुदेव पु.प्र.ए.व. **अर्जुनम् -** अर्जुन पु.द्वि.ए.व. **तथा -** तथा क्रि.वि.अ. **उक्त्वा** - वच् द्वि.ग.प.प.त्वान्त अ. **इति -** इति क्रि.वि.अ. **भूय: -** भूयस् अ. **स्वकम् -** स्वक वि.न.द्वि.ए.व. **रूपम् -** रूप न.द्वि.ए.व. **दर्शयामास -** दृश् प्र.ग.प.प.प्रयोजक आम् प्रत्ययान्त अ. अस् द्वि.ग.प.प.परोक्ष भूत. तृ.पु.ए.व. **च -** च उभ.अ. **महात्मा -** महा वि. आत्मन् पु.प्र.ए.व. **पुन: -** पुनर् अ. **सौम्यवपु: -** सौम्य वि. वपुस् न.वि.पु.प्र.ए.व. **भूत्वा -** भू प्र.ग.प.प.त्वान्त अ. **भीतम् -** भी तृ.ग.प.प.कर्त.भूत.धा. वि.पु.द्वि.ए.व. **एनम् -** एतत् सर्व.पु.द्वि.ए.व. **आश्वासयामास -** आ+श्वस् द्वि.ग.प.प.प्रयोजक आम् प्रत्ययान्त अस् द्वि.ग.प.प.परोक्षभूत तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - सौम्यवपु: -** सौम्यम्-शान्तं वपु:-शरीरं यस्य स सौम्यवपु: = सौम्य-शांत शरीर आहे ज्याचे तो**(ब.स.) महात्मा -** महान्-अप्रमेय आत्मा-स्वभावो यस्य स महात्मा = महान म्हणजे अप्रमेय

आत्मा म्हणजे स्वभाव आहे ज्याचा तो**(ब.स.)**

भागवंताचे सौम्य मानवरूप पाहून अर्जुनाचे प्रसन्नचित्त आणि स्वभाव स्थितीला प्राप्त होणे -

**अर्जुन उवाच** - अर्जुन म्हणाला.

**दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन ।**

**इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ॥५१॥**

**अन्वयः** - जनार्दन, तव, इदम्, सौम्यम्, मानुषम्, रूपम्, दृष्ट्वा, इदानीम्, सचेताः प्रकृतिम्, गतः, संवृत्तः अस्मि ।

**अन्वयार्थः - जनार्दन** - हे जनार्दना! **तव** - तुझे **इदम्, सौम्यम्, मानुषम्, रूपम्** - हे सौम्य मानवरूप **दृष्ट्वा** - पाहून **इदानीम्** - यावेळी **सचेताः** - स्थिरचित्त होत्साता **प्रकृतिम्, गतः** - पूर्वीच्या स्वाभाविक स्थितीला **संवृत्तः** - प्राप्त झालो **अस्मि** - आहे.

**विवरण** - हे जनार्दना! तुझे हे शामसुंदर आणि मधुर मानुषरूप पाहून स्थिर होणाऱ्या माझा मोहभ्रम आणि भय समाप्त होऊन मी आपल्या पहिल्या वास्तविक स्थितीला प्राप्त झालो आहे. म्हणजे भय आणि व्याकुळता एवं कम्पनादि जे अनेक प्रकारचे विकार माझ्या मन, इंद्रिय आणि शरीरामध्ये उत्पन्न झाले होते. ते सर्व समाप्त होऊन मी पूर्ववत् स्वस्थ म्हणजे शांत झालो आहे.

**व्याकरणम् - जनार्दन** - जनार्दन पु.संबो.ए.व. **तव** - युष्मत् सर्व.ष.ए.व. **इदम्** - इदम् सर्व.न.द्वि.ए.व. **सौम्यम्** - सौम्य न.द्वि.ए.व. **मानुषम्** - मानुष वि.न.द्वि.ए.व. **रूपम्** - रूप न.द्वि.ए.व. **दृष्ट्वा** - दृश् प्र.ग.प.प.त्वान्त अ. **इदानीम्** - इदानीम् अ. **सचेताः** - सचतेस् वि.पु.प्र.ए.व. **प्रकृतिम्** - प्रकृति स्त्री. द्वि.ए.व. **गतः** - गम् प्र.ग.प.प.कर्त.वर्त.धा.वि.पु.प्र.ए.व. **संवृत्तः** - सम्+वृत् प्र.ग.आ.प.कर्त.भू.धा. वि.पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - सचेताः** - चेतसा सहितः सचेताः = स्थिरचित्ताने युक्त म्हणजे प्रसन्न चित्त**(तृ.त.स.)** **मानुषम्** - मनुष्यस्य इदं रूपं मानुषम् = मनुष्यासंबंधी मानुष**(सम्बन्धार्थे त.वि.)** **जनार्दन** - जनान्-दुष्टजनानर्दयति वा पीडयतीति जनार्दनस्तत्सम्बुद्धौ हे जनार्दन = दुष्ट जनांना दंड देणारा तो जनार्दन**(उपपद स.)**

चतुर्भुज रूपाच्या दर्शनाची दुर्लभता आणि प्रभावाचे कथन -

**श्री भगवानुवाच** - श्री भगवान म्हणाले.

**सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम ।**

**देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकाङ्क्षिणः ॥५२॥**

**अन्वयः** - मम, यत्, रूपम्, दृष्टवान्, असि, इदम्, रूपम्, सुदुर्दर्शम्, देवाः, अपि, अस्य, रूपस्य, नित्यम्, दर्शनकाङ्क्षिणः ।

**अन्वयार्थः - मम** - माझे **यत्, रूपम्** - जे चतुर्भुज रूप **दृष्टवान्, असि** - तू पाहिलेस **इदम्, रूपम्, सुदुर्दर्शम्**

**-** ते रूप पाहण्यास अत्यंत दुर्लभ आहे कारण **देवा:, अपि** - देवदेखील **अस्य रूपस्य -** या रूपाचे **नित्यम् -** सतत **दर्शनकाङ्क्षिण:** - दर्शन घेण्यासाठी उत्साहित (इच्छुक) आहेत.

**विवरण -** माझ्या या मायातीत, दिव्यगुणांनी युक्त तसेच नित्य चतुर्भुज रूपाचे दर्शन करणाऱ्या हे अर्जुना! त्या रूपाचे दर्शन करणे फार कठीण आहे. त्या रूपाचे दर्शन त्यालाच होऊ शकते की, जो माझा अनन्य भक्त आहे. त्या भक्तावरच माझ्या कृपेचा प्रसाद होतो. कारण की, हे माझे रूप पाहण्याकरिता देवता लोक सुद्धा फार इच्छा करितात. परंतु त्यांना सुद्धा माझे रूप पाहण्याकरिता मिळत नाही. तर मग साधारण मनुष्याविषयी बोलायचेच काय?

**व्याकरणम् - मम -** अस्मत् सर्व.ष.ए.व. **यत् -** यत् सर्व.न.द्वि.ए.व. **रूपम् -** रूप न.द्वि.ए.व. **दृष्टवान् -** दृश् प्र.ग.प.प.+कर्त.क्तवतु=दृष्टवत् भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **असि -** अस् द्वि.ग.प.प.वर्त.द्वि.पु.ए.व. **इदम् -** इदम् सर्व.न.द्वि.ए.व. **रूपम् -** रूप न.द्वि.ए.व. **सुदुर्दर्शम् -** सु+दुर्+दर्श वि.न.द्वि.ए.व. **देवा: -** देव पु.प्र.ब.व. **अपि -** अपि अ. **अस्य -** इदम् सर्व.न.ष.ए.व. **रूपस्य -** रूप वि.न.ष.ए.व. **नित्यम् -** नित्य अ. **दर्शनकाङ्क्षिण:** - दर्शन न. काङ्क्षिन् पु.प्र.ब.व.

**समासविग्रहार्था: - सुदुर्दर्शम् -** दुखेन-कष्टेन दर्शनं यस्य तत् सुदुर्दर्शम् = दुःखाने दर्शन आहे ज्याचे ते **(ब.स.) दर्शनकाङ्क्षिण: -** दर्शनं काङ्क्षन्ते तच्छीला इति दर्शनकाङ्क्षिण: = दर्शन करण्याची इच्छा करणारे**(उपपद स.)** यद्वा **दर्शनकाङ्क्षिण: -** सर्वदैवरूपं द्रष्टुमपेक्षन्ते ते दर्शनकाङ्क्षिण:-दर्शनेप्सव: = नेहमीच रूपाला पाहण्याकरिता इच्छा करणारे ते दर्शनकाङ्क्षीण म्हणजे दर्शनेप्सु**(उपपद स.)**

**नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया ।**

**शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ।।५३।।**

**अन्वय: -** यथा, माम्, दृष्टवान्, असि, एवंविध:, अहम्, वेदै:, न, द्रष्टुम्, शक्य:, तपसा, न, (द्रष्टुम् शक्य:) दानेन, न, (द्रष्टुम् शक्य:), च, इज्यया, न, (द्रष्टुम् शक्य:) ।

**अन्वयार्थ: - यथा -** ज्याप्रमाणे तू **माम् -** मला **दृष्टवान्, असि -** पाहिले आहेस **एवम्, विध:** - अशाप्रकारे **अहम्** - मी **वेदै:** - वेदांच्याद्वारा **न द्रष्टुम्, शक्य:** - दिसणे शक्य नाही **तपसा न (द्रष्टुम्, शक्य:) -** तपाच्याद्वारा दिसणे शक्य नाही **दानेन न द्रष्टुम्, शक्य: -** दानाच्या द्वारा दिसणे शक्य नाही **च इज्यया न (द्रष्टुम्, शक्य:) -** आणि यज्ञाच्या द्वारासुद्धा दिसणे शक्य नाही.

**विवरण -** वेदाध्ययन, तप, दान आणि यज्ञ इत्यादि सर्व साधने माझ्या प्राप्तीसाठी केली जातात; परंतु, हे अर्जुना! तूं अशा माझ्या चतुर्भुज रूपाला पाहिले आहे, ते चतुर्भुज रूप वेदाच्या द्वारा, तपाच्या द्वारा, दानाच्या द्वारा किंवा यज्ञाच्या द्वारा पाहिले जाणे शक्य नाही. म्हणजे या विश्वरूपाचे दर्शन कोणत्याही साधानाने होणे शक्य नाही.

**व्याकरणम् - यथा -** यथा क्रि.वि.अ. **माम् -** अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **दृष्टवान् -** दृश् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा. वि.प्र.ए.व. **असि -** अस् द्वि.ग.प.प.वर्त.द्वि.पु.ए.व. **एवंविध: -** एवम् क्रि.वि.अ. विध पु.प्र.ए.व. **अहम् -** अस्मत् सर्व.प्र.ए.व. **वेदै:** - वेद पु.तृ.ब.व. **न -** न क्रि.वि.अ. **द्रष्टुम् -** दृश् प्र.ग.प.प.तुमन्त अ. **शक्य: -** शक् पं.ग.प.प.कर्म ण्यत् वि.पु.प्र.ए.व. **तपसा -** तपस् न.तृ.ए.व. **न -** न क्रि.वि.अ. **च -** च उभ.अ.

**इज्यया -** यज् प्र.ग.प.प.+क्यप्+टाप्=इज्या स्त्री.तृ.ए.व. **न -** न क्रि.वि.अ.

**समासविग्रहार्था: - एवंविध: -** एवंविधा प्रकारो यस्य सो एवंविध: = याप्रमाणे विधा म्हणजे प्रकार ज्याचा तो(**ब.स.**) **शक्य: -** शक्तुमर्ह इति शक्य: = योग्य आहे असा तो(**वि.**)

अनन्य भक्तीने चतुर्भुजरूपाचे दर्शन आणि ज्ञान प्राप्त होण्याचे कथन -

**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।**

**ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परन्तप ॥५४॥**

**अन्वय: -** तु, परन्तप, अर्जुन, एवंविध:, अहम्, अनन्यया, भक्त्या, तत्त्वेन, ज्ञातुम्, द्रष्टुम्, च, प्रवेष्टुम्, शक्य: ।

**अन्वयार्थ: - तु -** परंतु **परन्तप, अर्जुन -** हे शत्रूला ताप देणाऱ्या वीर अर्जुना! **एवंविध: -** अशाप्रकारच्या स्वरूपाला **अहम् -** मी **अनन्यया भक्त्या -** अनन्य भक्तीच्याद्वारा **तत्त्वेन -** यथार्थपणे **ज्ञातुम् -** जाणण्याकरिता **द्रष्टुम् -** पाहण्याकरिता **च -** आणि **प्रवेष्टुम् -** प्रवेश करण्याकरिता **शक्य: -** शक्य आहे.

**विवरण -** हे अर्जुना! भक्तीच्याद्वारा कोणीही पुरुष चतुर्भुज रूपाने युक्त असणाऱ्या माझे दर्शन करू शकतो, तोच तत्त्वत: जाणू शकतो आणि माझ्यामध्ये प्रवेशही करू शकतो.

**व्याकरणम् - तु -** तु उभ.अ. **अर्जुन -** अर्जुन पु.संबो.ए.व. **परन्तप -** परन्तप पु.संबो.ए.व. **एवंविध: -** एवम् क्रि.वि.अ. विध पु.प्र.ए.व. **अहम् -** अस्मत् सर्व.प्र.ए.व. **अनन्यया -** अन्+अन्य वि.स्त्री.तृ.ए.व. **भक्त्या -** भक्ति स्त्री.तृ.ए.व. **तत्त्वेन -** तत्त्व न.तृ.ए.व. **ज्ञातुम् -** ज्ञा न.ग.उ.प.तुमन्त अ. **च -** च उभ.अ. **द्रष्टुम् -** दृश् प्र.ग.प.प.तुमन्त अ. **च -** च उभ.अ. **प्रवेष्टुम् -** प्र+विश् ष.ग.प.प.तुमन्त अ. **शक्य: -** शक् पं.ग.प.प.कर्म ण्यत् वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - अनन्यया -** न विद्यते अन्यो-मद्व्यतिरिक्तद्वितीयो यस्यां सा अनन्या तया अनन्यया-अव्य भिचारिणी = नाही अन्य-माझ्या अतिरिक्त दुसरा जिच्यामध्ये तिच्या द्वारा(**नञ् ब.स.**) यद्वा **अनन्यया -** सवैरपि करणैर्वासुदेवादन्यद् न उपलभ्यते यया सा अनन्या तया अनन्यया = संपूर्ण इंद्रियांच्याद्वारा एक वासुदेव परमात्म्याच्या व्यतिरिक्त अन्य कोणत्याही प्रकारच्या विषयाची उपलब्धी होत नाही ती अनन्यभक्ति तिच्याद्वारा(**ब.स**) **परन्तप -** शत्रून् तापयतीति परन्तपस्तत्सम्बुद्धौ परन्तप = शत्रुंना ताप देणारा तो(**उपपद स.**)

अनन्य भक्तीचे स्वरूप आणि तिच्या फलाचे कथन -

**मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्त: सङ्गवर्जित: ।**

**निर्वैर: सर्वभूतेषु य: स मामेति पाण्डव ॥५५॥**

**अन्वय: -** पाण्डव, य:, मत्कर्मकृत्, मत्परम:, मद्भक्त:, सङ्गवर्जित:, सर्वभूतेषु, निर्वैर:, स:, माम्, एति ।

**अन्वयार्थ: - पाण्डव -** हे अर्जुना! **य: -** जो **मत्कर्मकृत् -** मत्प्रीत्यर्थ कर्म करणारा **मत्परम: -** मीच ज्याला श्रेष्ठ आहे **मद्भक्त: -** असा माझा भक्त **सङ्गवर्जित: -** आसक्ति रहित **सर्वभूतेषु -** सर्व प्राणिमात्रामध्ये **निर्वैर: -**

वैररहित असतो **सः** - तो **माम्** - मला **एति** - प्राप्त होतो.

**विवरण** - स्वार्थ, ममता आणि आसक्ती सोडून यज्ञ, दान, तप आणि व्यवहारादि जेवढे काही शास्त्र विहित कर्तव्य कर्म आहे ते केवळ भगवत्प्रीत्यर्थ म्हणजे भगवंतासाठीच करणारा, भगवान परमाश्रय, परमगती, एकमात्र शरण जाणे योग्य, सर्वशक्तिमान, परमात्मा आहे असे समजणारा. नित्य निरंतर भगवंताचे श्रवण, मनन आणि कीर्तन करणारा. लोक आणि परलोकातील जेवढे काही भोग्य पदार्थ आहेत त्याविषयी आसक्ती रहित राहणारा. संपूर्ण प्राणिमात्रांना भगवंताचे स्वरूप समजून अथवा सर्वांमध्ये भगवान व्यापकरूपाने भरलेला आहे असे समजून कोणत्याही प्राण्याविषयी द्वेष आणि वैरभाव न करणारा असा उपर्युक्त लक्षण प्राप्त अनन्यभक्तियुक्त पुरुष मलाच प्राप्त होतो.

**व्याकरणम् - पाण्डव** - पाण्डव पु.संबो.ए.व. **यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **मत्कर्मकृत्** - अस्मत् सर्व.च.ए.व. कर्मन् न. कृत् वि.पु.प्र.ए.व. **मत्परमः** - अस्मत् सर्व. परम वि.पु.प्र.ए.व. **मद्भक्तः** - अस्मत् सर्व. भक्त पु.प्र.ए.व. **सङ्गवर्जितः** - सङ्ग पु. वृज् द.ग.उ.प./द्वि.ग.आ.प./स.ग.प.प.कर्म.भूत.धा.वि.पु.प्र.ए.व. **सर्वभूतेषु** - सर्व वि. भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.स.ब.व. **निर्वैरः** - निर्+वैर न.वि.पु.प्र.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **एति** - इ द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - मत्कर्मकृत्** - मदर्थमेव-मत्प्रीतये एव वैदिकं लौकीकं च चेष्टामात्रं सर्वमपि कर्म करोतीति न तु स्वार्थमीषदपि यः स मत्कर्मकृत् = माझ्याकरिता वैदिक आणि लौकीक क्रियामात्र सर्वही कर्म करतो परंतु स्वार्थाकरिता करीत नाही असा जो तो मत्कर्मकृत्**(च.गर्भि उपपद ग.ब.स.)** यद्वा **मत्कर्मकृत्** - करोतीति कृत् कर्मणः कृदिति मत्कर्मकृत् = करतो असा कृत् कर्माचे करणारा असा मत्कर्मकृत्**(ष.त.स.)** **मत्परमः** - स एव रक्षकः स एवाऽऽश्रयणीयः स एव प्रार्थनीयः स एव प्राप्तव्यः स एवाऽऽधारः स एव गतिश्चाऽस्माकमिति निरतिशयप्रीत्याऽहमेव परमो रक्षकत्वादिधर्मैरूत्कृष्टतमो यस्य स मत्परमः = तोच रक्षक, तोच आश्रणीय, तोच प्रार्थनीय, तोच प्राप्त करणे योग्य, तोच आधार आणि तोच आमची गति याप्रमाणे निरतिशय प्रेमाने मीच परम-रक्षकत्वादिधर्मांच्याद्वारा उत्कृष्टतम ज्याचा तो**(ब.स.)** यद्वा **मत्परमः** - अहं परमः-परा गतिर्यस्य सोऽयं मत्परमः = मी परम-परा गति ज्याची आहे तो हा मत्परम**(ब.स.)** यद्वा **मत्परमः** - मीयते पदार्थोऽनयेति मा, मा नामेन्द्रियाणां वृत्तिर्मत्परा-सर्वत्र मत्स्वरूपग्रहणपरा मा इन्द्रियवृत्तिर्यस्य स मत्परमः = ज्याच्या द्वारा पदार्थ जाणल्या जाते ती मा-इंद्रियांची वृत्ति, मत्परा-माझ्या स्वरूपाच्या ग्रहणामध्ये तत्पर आहे मा-इंद्रियांची वृत्ति ज्याची तो मत्पर**(ब.स.)** **मद्भक्तः** - मम भक्त इति मद्भक्तः = माझा भक्त**(ष.त.स.)** यद्वा **मद्भक्तः** - मां एव सर्वप्रकारैः सर्वात्मना सर्वोत्साहेन भजत इति मद्भक्तः = मलाच सर्वप्रकारांनी, सर्वभावाने, सर्व उत्साहाने भजतो असा मद्भक्त**(तृ.त.स.)** यद्वा **मद्भक्तः** - सर्वात्मानं मां सर्वत्र सदा भजति-चक्षुरादीनां विषयभूतं वस्तु सर्वं ब्रह्मैवेत्यनुसंदधातीति मद्भक्तः = माझा भक्त मला सर्वत्र सदा भजतो-चक्षु आदिंची विषयभूत वस्तू सर्व ब्रह्मच आहे असा जो जाणतो-अनुसंधान करतो असा तो माझा भक्त**(उपपद स.)** **सङ्गवर्जितः** - सङ्गेन-जायादि पुत्रादिसङ्गेन वर्जितः-रहितः सङ्गवर्जितः = जायापुत्रादि संगाने रहित**(तृ.त.स.)** यद्वा **सङ्गवर्जितः** - धनपुत्र मित्र कलत्रबन्धुवर्गेषु सङ्गवर्जितः-सङ्गः प्रीतिः-स्नेहेन वर्जितः सङ्गवर्जितः = धन, पुत्र, मित्र, पत्नी, इतर आप्तवर्ग यांविषयी ज्याच्या मनांत संग नाही तो संगवर्जित संग म्ह. प्रीति, स्नेह, त्याने रहित**(स.ग.तृ.त.स.)** **निर्वैरः** - निर्गतं वैरं यस्मात् स निर्वैरः = वैर ज्याच्यापासून निघून गेले आहे तो**(ब.स.)** यद्वा **निर्वैरः** - निर्गतो वैरी निर्वैरः-आत्मनोऽत्यन्तापकारप्रवृत्तेष्वपि सर्वभूतेषु-शत्रुभावरहितो यः स निर्वैरः = निर्वैर म्ह. ज्याचे वैर-

द्वेषपूर्वक अनिष्ट आचरण करणे ही वृत्ति नाहीशी झाली आहे, आपल्याला अतिशय अपकार करण्यास प्रवृत्त झालेल्याही सर्वभूतांमध्ये शत्रुभाव रहित-अशा प्रतिकूल भूतांमध्येहि शत्रुत्वाची भावना न करणारा असा जो तो**(ब.स.)** यद्वा **निर्वैरः** - वैरं-शत्रुत्वबुद्धिः सर्वत्रब्रह्मभावनया सा निर्गता यस्य सो निर्वैरः = वैर-शत्रुत्व बुद्धी, सर्व ठिकाणी ब्रह्मभावनेने निघून गेली आहे ज्याची तो निर्वैर**(ब.स.)**

**ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे**

**श्रीकृष्णार्जुनसंवादे विश्वरूपदर्शनयोगो नामैकादशोऽध्यायः ॥११॥**

**-: अध्याय अकरावा समाप्त :-**

**ॐ श्रीपरमात्मने नम:**

**अथ द्वादशोऽध्याय:**

साकार व निराकार उपासकामध्ये कोण श्रेष्ठ आहे हे जाणण्याकरिता अर्जुनाचा प्रश्न -

**अर्जुन उवाच -** अर्जुन म्हणाला.

**एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ।**

**ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमा: ॥१॥**

**अन्वय:** - एवम्, सततयुक्ता:, ये, भक्ता:, त्वाम्, पर्युपासते, च, ये, अपि, अव्यक्तम्, अक्षरम्, पर्युपासते, तेषाम्, के, योगवित्तमा: ।

**अन्वयार्थ: - एवम्** - वर सांगितल्याप्रमाणे **सततयुक्ता:** - निरंतर तुझ्या भजन पूजनामध्ये समाहित असलेले **ये भक्ता:** - जे भक्तजन **त्वाम्** - तुला **पर्युपासते**- भजतात **च** - आणि **ये, अपि** - दुसरे **ये** - जे दुसरेही भक्त **अव्यक्तम्** - अव्यक्त **अक्षरम्** - अक्षरब्रह्माची **पर्युपासते** - उपासना करतात **तेषाम्** - त्या दोन प्रकारच्या भक्तांमध्ये **के** - कोणते **योगवित्तमा:**- अत्यंत श्रेष्ठ योगी आहेत.

**विवरण** - जे अनन्य भावाने तसेच श्रद्धा-भक्तिने सगुण परमात्म्याला शरण जाणारे म्हणजे सगुण परमात्म्याची भक्ती करणारे आणि त्याचेच निरंतर चिंतन करणारे असे जे सगुण भक्त आहेत. तसेच दुसरे जे अविनाशी, निराकार परमात्म्यालाच श्रेष्ठ मानून त्याची उपासना करणारे म्हणजे त्यालाच सर्व ठिकाणी कणाकणामध्ये व्यापक मानून त्याचे ध्यान करणारे निर्गुण भक्त आहेत. अशा या दोन सगुणोपासक आणि निर्गुणोपासक भक्तांमध्ये श्रेष्ठ भक्त कोण आहे.

**व्याकरणम् - एवम्** - एवम् क्रि.वि.अ. **सततयुक्ता:** - सम्+तन् अ.ग.उ.प.+क्त, सम: अन्त्यलोप:=सतत वि. युज् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **ये** - यत् सर्व.पु.प्र.ब.व. **भक्ता:** - भज् प्र.ग.उ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **त्वाम्** - युष्मत् सर्व.द्वि.ए.व. **पर्युपासते** - परि+उप+आस् द्वि.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व. **च** - च उभ.अ. **ये** - यत् सर्व.पु.प्र.ब.व. **अपि** - अपि अ. **अव्यक्तम्** - अ+ वि+अञ्ज् स.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.न.द्वि.ए.व. **अक्षरम्** - अक्षर वि.पु.न.द्वि.ए.व. **पर्युपासते** - प रि+उप+आस् द्वि.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व. **तेषाम्** - तत् सर्व.पु.ष.ब.व. **के** - किम् सर्व.पु.प्र.ब.व. **योग वित्तमा:** - योग पु. विद्+तमप् प्रत्ययान्त पु.प्र.ब.व.

**समासविगृहार्था:** - **योगवित्तमा:** - योग: समाधिस्तं विदन्ति प्राप्नुवन्तीति ते योगविद:, अतिशयेन योगविद इ ति योगवित्तमा:-श्रेष्ठा: = योग म्हणजे समाधि अशा त्या योगाला अतिशयाने जाणणरे ते योगवित्तम-अत्यंत श्रेष्ठ**(अतिशयार्थे.तद्धि.वि.)** यद्वा **योगवित्तमा:** - विदन्तीति विदो योगस्य विद इति योगविद:, अतिशयेन योगविद इति योगवित्तमा:-श्रेष्ठा: = जाणतात ते विद योगाला जाणणारे असे योगविद, अतिशयाने योगाला जाणणारे असे योगवित्तम**(अतिशयार्थे.तद्धि.वि.)** **सततयुक्ता:** - सततम्-सदा-सर्वदाऽभिन्नतया युक्ता इति सततयुक्ता: = निरंतर-सदा-सर्वदा अभिन्नरूपाने युक्त असणारे असे ते सततयुक्त**(द्वि.त.स.)** **अव्यक्तम्** - शब्दादिविशेषाभावान्नव्यज्यत इत्यव्यक्तम्-सर्वेन्द्रियागोचरम् = शब्दादिविशेषाच्या अभावापासून जो प्रगट

होत नाही तो अव्यक्त त्याला(**नञ् त.स.**) **भक्ता:** - भक्तिरस्ति येषां ते भक्ता: = भक्ती आहे ज्यांची ते भक्त(**अस्त्यर्थे तद्धि.वि.**)

भगवंताच्या सगुण स्वरूपाची उपासना करणाऱ्यांच्या श्रेष्ठतेचे कथन -

**श्रीभगवानुवाच** - श्री भगवान म्हणाले.

**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।**

**श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मता: ॥२॥**

**अन्वय:** - ये, मयि, मन:, आवेश्य, नित्ययुक्ता:, परया, श्रद्धया, उपेता:, माम्, उपासते, ते, मे, युक्ततमा:, मता: ।

**अन्वयार्थ:** - **ये** - जे भक्त **मयि** - माझ्या ठिकाणी **मन:** - चित्त **आवेश्य** - एकाग्र करून **नित्ययुक्ता:** - निरंतर युक्त होऊन **परया श्रद्धया उपेता:** - अतिशय श्रद्धा भक्तिने युक्त होवून **माम्** - माझी **पर्युपासते** - उपासना करतात **ते** - भक्तजन **मे** - मला **युक्ततमा:** - अत्यंत श्रेष्ठ आहेत **मता:** - असे माझे मत आहे अथवा असे मी मानतो.

**विवरण** - जे भक्त संसारामधल्या विनाशी क्षणभंगुर विषयामध्ये जाणाऱ्या अथवा विषयाचे चिंतन करणाऱ्या आपल्या मनाला आवरून मी जो सर्व शक्तिमान, सर्वाधार, सर्वांचा योगक्षेम वहन वाहणारा असा जो परमात्मा त्या अशा माझ्यामध्ये समाहित करणारे आणि अहोरात्र अनन्य भावाने श्रद्धाभक्तिने माझेच चिंतन करणारे असे ते सगुणोपासक भक्तजन ते योग्यामध्ये अत्यंत श्रेष्ठ योगी आहेत असे पूर्णतया माझे मत आहे.

**व्याकरणम्** - **ये** - यत् सर्व.पु.प्र.ब.व. **मयि** - अस्मत् सर्व.स.ए.व. **मन:** - मनस् न.प्र.ए.व. **आवेश्य** - आ+विश् ष.ग.प.प.ल्यबन्त अ. **नित्ययुक्ता:** - नित्य वि. युज् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **परया** - परा वि.स्त्री.तृ.ए.व. **श्रद्धया** - श्रद्धा स्त्री.तृ.ए.व. **उपेता:** - उप+इ द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **उपासते** - उप+आस् द्वि.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व. **ते** - तत् सर्व.पु.प्र.ब.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **युक्ततमा:** - युज् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि. तमप् प्रत्ययान्त पु.प्र.ब.व. **मता:** - मन् च.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **नित्ययुक्ता:** - मत्कर्मकृत्त्वादिधर्मेषु नित्यम्-अजस्त्रं युक्ता:-नियता इति नित्ययुक्ता: = माझ्यासाठीच कर्म करणे आदि धर्मामध्ये निरंतर युक्त असणारे असे ते नित्ययुक्त(**द्वि.त.स.**) **युक्ततमा:** - अतिशयेन युक्ता इति युक्ततमा:-श्रेष्ठतमा: = अत्यंत श्रेष्ठ असणारे(**तद्धि.वि.**)

निराकार ब्रह्माच्या स्वरूपाचे वर्णन आणि त्याच्या उपासनेने भगवत्प्राप्ति -

**ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ।**

**सर्वत्रगमचिन्त्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥३॥**

**सन्नियम्येन्द्रियग्रामं सर्वत्र समबुद्धय: ।**

**ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रता: ॥४॥**

**अन्वयः** - तु, ये, इन्द्रियग्रामम्, सन्नियम्य, सर्वत्र समबुद्धयः, सर्वभूतहिते, रताः, अनिर्देश्यम्, अव्यक्तम्, सर्वत्रगम्, अचिन्त्यम्, कूटस्थम्, अचलम्, ध्रुवम्, अक्षरम्, पर्युपासते, ते, माम्, एव, प्राप्नुवन्ति ।

**अन्वयार्थः - तु** - परंतु **ये** - जे **इन्द्रियग्रामम्, सन्नियम्य** - इंद्रिय समुदायाचे संयमन करून **सर्वत्र समबुद्धयः** - सर्व ठिकाणी समानबुद्धी ठेवणारे आणि **सर्वभूतहिते रताः**- सर्वभूतांच्या हितामध्ये संलग्न असणारे भक्तजन **अनिर्देश्यम्** - निर्देशरहित-अकथनीय स्वरूप असणाऱ्या **अव्यक्तम्** - अव्यक्त **सर्वत्रगम्** - सर्वव्यापी **अ चिन्त्यम्** - चिन्त्यरहित **कूटस्थम्** - निर्विकार **अचलम्** - अचल **ध्रुवम्** - नित्य अशा **अक्षरम्** - अक्षर परब्रह्माला **पर्युपासते** - भजतात (म्ह. त्याची उपसना करतात) **ते** - अव्यक्त परब्रह्माची उपासना करणारे **भक्त** - जन **माम्, एव** - मलाच **प्राप्नुवन्ति** - प्राप्त होतात.

**विवरण** - कोणत्याही प्रकारे निर्देश न केला जाणाऱ्या, आकाशाप्रमाणे सर्वव्यापी असणाऱ्या, कोणत्याही यु क्ति किंवा उपमाच्याद्वारा ज्याचे स्वरूप व्यक्त न केलेल्या, कोणत्याही प्रकारे परिवर्तन न होणाऱ्या, सदा एकरस कूटस्थ आणि सदा नित्य रूपाने राहणाऱ्या, कोणत्याही अवस्थेमध्ये अभाव न होणाऱ्या, हालणाऱ्या व चालणाऱ्या क्रियाच्याद्वारा सर्वथा रहित तसेच अचल असणाऱ्या आकृतिरहित तसेच कोणत्याही इंद्रियांचा विषय न होणाऱ्या, अशा उपर्युक्त विशेषणाने युक्त निर्गुण-निराकार अक्षर परब्रह्म परमात्म्याचे इंद्रिय संयमनद्वारा निरंतर ध्यान करून भजन करणारे आणि सर्व भूतांच्या हितामध्ये रत असणारे, तसेच सर्वामध्ये समान भाव ठेवणारे योगी लोक मलाच (म्ह. परमात्म्यालाच) प्राप्त होतात.

**व्याकरणम् - तु** - तु उभ.अ. **ये** - यत् सर्व.पु.प्र.ब.व. **इन्द्रियग्रामम्** - इन्द्रिय न. ग्राम पु.द्वि.ए.व. **सन्नियम्य** - सम्+नि+यम् प्र.ग.प.प.ल्यबन्त अ. **सर्वत्र समबुद्धयः** - सर्वत्र अ. सम वि. बुद्धि स्त्री.प्र.ब.व. **सर्वभूत हिते रताः** - सर्व वि. भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. धा तृ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.स.ए.व. रम् प्र.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **अनिर्देश्यम्** - अ+निर्+दिश् ष.ग.उ.प.कर्म.ण्यत् वि.न.द्वि.ए.व. **अव्यक्तम्** - अ+वि+अञ्ज् स.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.द्वि.ए.व. **सर्वत्रगम्** - सर्वत्र अ. ग वि.न.द्वि.ए.व. **अचिन्त्यम्** - अ+चिन्त् द.ग.उ.प.+यत्=अचिन्त्य वि.न.द्वि.ए.व. **कूटस्थम्** - कूट वि. स्थ वि.न.द्वि.ए.व. **अक्षरम्** - अक्षर न.द्वि.ए.व. **ते** - तत् सर्व.पु.प्र.ब.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **प्राप्नुवन्ति** - प्र+आप् पं.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - कूटस्थम्** - कूटे-मायाप्रपञ्चे अधिष्ठानत्वेन तिष्ठति तत् कूटस्थम्-अविचलम् = मायाप्रपञ्चामध्ये अधिष्ठानाने राहणारे ते-त्याला**(स.त.स.)** यद्वा **कूटस्थम्** - कूटवदकम्प्यतया तिष्ठतीति कूटस्थम् = कूटाच्या समान अकम्प्य होवून जे स्थित राहते ते कूटस्थ**(वि.)** यद्वा **कूटस्थम्** - कूटवन्नि र्विकारेण तिष्ठतीति कूटस्थस्तं कूटस्थम् = कूटाप्रमाणे निर्विकार असा कूटस्थ त्या कूटस्थाला**(वि.) अचलम्** - न चलमित्यलम् = जे चल नाही ते त्याला**(नञ् त.स.) अव्यक्तम्** - केनापि प्रमाणेन न व्यज्यत इत्यव्यक्तम् = कोणत्याही प्रमाणाने जे व्यक्त केले जात नाही तो अव्यक्त त्याला**(न.त.स.) सर्वत्रगम्** - सर्वत्र गच्छति-व्याप्नोति तत् सर्वत्रगम् = सर्वाला व्यापून राहणारे त्याला**(वि.) अनिर्देश्यम्** - निर्देष्टुं-निर्वक्तुं योग्यं न भवति तदनिर्देश्यम् = कथन करण्याकरिता योग्य नाही ते त्याला**(कृ.वि.) अचिन्त्यम्** - चिन्तितुमयोग्य मित्यचिन्त्यम् = चिंतन करण्याकरिता अयोग्य ते त्याला**(कृ.वि.)**

निराकाराच्या उपासनेत कठीणतेचे कथन -

**क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।**

**अव्यक्ता हि गतिर्दु:खं देहवद्भिरवाप्यते ॥५॥**

**अन्वय:** - अव्यक्तासक्तचेतसाम्, तेषाम्, क्लेश:, अधिकतर:, हि, देहवद्भि:, अव्यक्ता, गति:, दु:खम्, अवाप्यते ।

**अन्वयार्थ:** - **अव्यक्तासक्तचेतसाम्** - अव्यक्त परब्रह्मामध्ये ज्यांचे चित्त आसक्त झाले अशा **तेषाम्** - त्या निर्गुण उपासकांचे **क्लेश: अधिकतर:** - क्लेश अधिक होतात **हि** - कारण **देहवद्भि:** - देह अभिमानी लोकांच्याद्वारा **अव्यक्ता गति:** - अव्यक्त परब्रह्मरूप गति **दु:खम्** - अत्यंत कष्टाने **अवाप्यते** - साध्य (प्राप्य) होते.

**विवरण** - निर्गुण निराकार परमात्म्याचे चिंतन करणारे म्हणजे त्यामध्येच ज्यांचे चित्त आसक्त झाले आहे असे जे देहाभिमानाने युक्त असणारे निर्गुण भक्तजन अव्यक्तविषयक गति प्राप्त होण्याकरिता त्यांना अत्यंत कष्ट सहन करावे लागतात.

**व्याकरणम्** - **अव्यक्तासक्तचेतसाम्** - अव्यक्त अ+वि+अञ्ज् स.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. सञ्ज् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. चेतस् न.वि.पु.ष.ब.व. **तेषाम्** - तत् सर्व.पु.ष.ब.व. **क्लेश:** - क्लेश पु.प्र.ए.व. **अधिकतर:** - अधिक वि. तरप् प्रत्ययान्त पु.प्र.ए.व. **हि** - हि क्रि.वि.अ. **देहवद्भि:** - देह् द्वि.ग.उ.प.+घञ्=देह+मतुप्+वत्=देहवत् पु.तृ.ब.व. **अव्यक्ता** - अ+वि+अञ्ज् स.ग.प.प.कर्म.भू.धा. वि.स्त्री.प्र.ए.व. **गति:** - गति स्त्री.प्र.ए.व. **दु:खम्** - दुख न.प्र.ए.व. **अवाप्यते** - अव+आप् पं.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अव्यक्तासक्तचेतसाम्** - अव्यक्ते प्रत्यग् ब्रह्मणि आसक्तम्-अभिनिविष्टं चेत:-अन्त:करणं येषां ते अव्यक्तासक्तचेतसस्तेषां अव्यक्तासक्तचेतसाम् = अव्यक्त परब्रह्मामध्ये ज्यांचे चित्त आसक्त झाले आहे ते त्यांचे**(व्यधिकरण ब.स.)** यद्वा **अव्यक्तासक्तचेतसाम्** - अव्यक्ते-सर्वेन्द्रियागोचरे अदृश्यादि गुणकेऽतर्क्येऽचिन्त्येऽप्रमेये परे ब्रह्मण्यासक्तं तद्भावापत्त्यै यतमानं चेतो येषां ते अव्यक्तासक्तचेतसस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् = अव्यक्तामध्ये म्ह. संपूर्ण इंद्रियांचे अविषय अदृश्य आदि गुणवाले, अतर्क्य, अचिन्त्य तसेच अप्रमेय परब्रह्मामध्ये आसक्त म्ह. त्याच्या स्वरूपाच्या प्राप्तिकरिता यत्नशील चित्त आहे ज्यांचे ते त्यांचे**(ब.स.)** **अव्यक्ता** - न व्यक्ता इत्यव्यक्ता = जे व्यक्त नाही ते अव्यक्त**(नञ् त.स.)** **देहवद्भि:** - देहा विद्यन्ते येषां ते देहवन्तस्तैर्देहवद्भिर्देहाभिमानवद्भि: = देह आहेत ज्यांचे ते त्यांच्या द्वारा**(अस्त्यर्थे तद्धि.वि.)** **अधिकतर:** - अतिशयेन अधिक इति अधिकतर: = अत्यंत अधिक**(तरप् प्रत्ययान्त तद्धि.वि.)**

भगवंताच्या सगुणरूपाच्या उपासनेचे कथन -

**ये तु सर्वाणि कर्माणि मयि सन्न्यस्य मत्परा: ।**

**अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ॥६॥**

**अन्वय:** - तु, ये, सर्वाणि, कर्माणि, मयि, सन्न्यस्य, मत्परा:, अनन्येन, एव, योगेन, माम्, ध्यायन्त:, उपासते ।

**अन्वयार्थ: - तु -** परंतु **ये -** जे भक्तगण **सर्वाणि कर्माणि -** सर्वकर्मे **मयि -** माझ्या ठिकाणी **सन्न्यस्य -** अर्पण करून **मत्परा: -** मत्पर होवून **अनन्येन, एव योगेन -** अनन्य भक्तियोगानेच **माम् -** माझे **ध्यायन्त: -** ध्यान करणारे भक्तजन **उपासते -** माझी उपासना करतात.

**विवरण -** माझ्या ठिकाणी ज्यांनी आपले चित्त समाहित केलेले आहे, तसेच भगवंतच सर्वाधार, परमगति आणि सर्व प्रकारांनी शरण जाण्यास योग्य आहे असे मानणारे आणि कर्म करण्यामध्ये आपणाला पराधीन समजून, भगवंताच्या आज्ञेनुसार कर्म करीत असतांना त्यामध्ये निहित असणाऱ्या ममता, आसक्ति आणि फलाभिलाषांचा त्याग करून, शास्त्रानुकूल प्रत्येक क्रियेमध्ये निमित्तमात्र समजून कर्म करण्याविषयी माझ्यामध्ये यत्किञ्चिन्मात्रही शक्ति नाही, भगवानच आपल्या इच्छेनुसार माझ्याकडून कर्मे करून घेत आहेत अशा प्रकारची भावना ठेवून आणि संपूर्ण कर्मे माझ्या ठिकाणी अर्पण करून, सगुण परमात्म्याचेच अनन्यभावाने निरंतर चिंतन ध्यान करणारे भक्तजन माझी उपासना करतात.

**व्याकरणम् - तु -** तु व्यावर्त्यार्थक उभ.अ. **ये -** यत् सर्व.पु.प्र.ब.व. **सर्वाणि -** सर्व सर्व.न.द्वि.ए.व. **सन्न्यस्य -** सम्+नि+अस् च.ग.प.प.ल्यबन्त अ. **मत्परा: -** अस्मत् सर्व.प्र.ए.व. पर वि.पु.प्र.ब.व. **अनन्येन -** अन्+अन्य वि.पु.तृ.ए.व. **एव -** एव क्रि.वि.अ. **योगेन -** योग पु.तृ.ए.व. **माम् -** अस्मत् सर्व. द्वि.ए.व. **ध्यायन्त: -** ध्यै प्र.ग.प.प.+कर्त.शतृ=ध्यायत् वि.पु.प्र.ब.व. **उपासते -** उप+आस् द्वि.ग.आ.प.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था: - मत्परा: -** अहम्-सगुणत्वे वर्तमाने विश्वरूप: पर:-पुरुषार्थो येषां ते मत्परा: = मी-सगुणरूपाने वर्तमान असणारा विश्वरूप श्रेष्ठ पुरुषार्थ आहे ज्यांचा ते**(ब.स.)** यद्वा **मत्परा: -** अहमेव विश्वरूप: परमात्मा पर: स्वस्मादन्य: श्रोतव्यो द्रष्टव्य: स्प्रष्टव्यो मन्तव्यो ज्ञातव्यश्च पदार्थो येषां ते मत्परा:- स्वव्यतिरिक्ते वस्तुनि सर्वत्र मद्बुद्धय: = केवळ माझ्या ठिकाणी परायण होऊन अथवा विश्वरूप परमात्म्याचा ठिकाणीच पर म्ह. आपल्या अन्य श्रवण करणे योग्य, स्पर्श करणे योग्य, मनन करणे योग्य आणि जाणणे योग्य पदार्थ ज्यांचे आहे ते म्ह. आपल्याहून भिन्न सर्व वस्तूंमध्ये परमात्म बुद्धी ठेवणारे**(ब.स.)** यद्वा **मत्परा: -** अहम्-भगवान्वासुदेव एव पर: प्रकृष्ट: प्रीतिविषयो येषां ते मत्परा: = मी-भगवान वासुदेवच पर-प्रकृष्ट प्रीतिचा विषय आहे ज्यांचा ते**(ब.स.) अनन्येन -** न विद्यतेऽन्यद् मद्व्यतिरिक्तम् बुद्धेरालम्बनं यत्र सोऽनन्यस्तेन अनन्येन = माझ्याहून अन्यबुद्धिचे आलंबन नाही त्याच्या ठिकाणी तो अनन्य त्या अनन्याने**(व्यधि.ब.स.)** यद्वा **अनन्येन -** यस्य विश्वरूपं देवं आत्मानमुक्त्वा अन्यद् आलम्बनमविद्यमानं (अस्ति ) सोऽनन्यस्तेनाऽनन्येन-केवलेन = ज्याचे विश्वरूप आत्मदेवाला सोडून दुसरे काहीच आलंबन-ध्यानाचा विषय विद्यमान नाही तो अनन्य त्या अनन्याने**(ब.स.) ध्यायन्त: -** ध्यायन्ति ते ध्यायन्त: = ध्यान करीत असतांना**(वि.)**

आपल्या भक्तांचा शीघ्र उद्धार करण्याकरिता भगवंताची प्रतिज्ञा -

**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।**

**भवामि नचिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥७॥**

**अन्वय: -** पार्थ, मयि, आवेशितचेतसाम्, तेषाम्, अहम्, नचिरात्, मृत्युसंसारसागरात्, समुद्धर्ता, भवामि ।

**अन्वयार्थ: - पार्थ -** हे अर्जुना! **मयि -** माझ्या ठिकाणी **आवेशितचेतसाम् -** ज्यांनी आपले चित्त एकाग्र केले आहे **तेषाम् -** त्या भक्तांचा **अहम् -** मी **नचिरात् -** विलंब न करिता शीघ्र **मृत्युसंसारसागरात् -** मृत्युरूपी संसारसागरातून **समुद्धर्ता -** उद्धार करणारा **भवामि -** होतो.

**विवरण -** वर कथन केल्याप्रमाणे माझी निरंतर उपासना करून माझ्यामध्ये आपल्या चित्ताला स्थिर करणारे भक्तगण त्यांना लवकरच मृत्युरूपी संसारसागरातून मी मुक्त करतो. नावाडी जसा आपल्या लोकांना नावेमध्ये बसवून नदीच्या पलीकडे नेवून सोडतो त्याचप्रमाणे मी सुद्धा आपल्या प्रेमी भक्ताला भक्तिरूपी नावेवर बसून दु:खरूपी संसारसागराच्या पलीकडे नेवून सोडतो. म्हणजे संसारापासून सदा-सर्वदाकरिता मुक्त करतो.

**व्याकरणम् - पार्थ -** पार्थ पु.संबो.ए.व. **मयि -** अस्मत् सर्व.स.ए.व. **आवेशितचेतसाम्-** आ+विश् ष.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. चेतस् न.वि.पु.ष.ब.व. **तेषाम् -** तत् सर्व.पु.ष.ब.व. **अहम् -** अस्मत् सर्व.प्र.ए.व. **नचिरात् -** न क्रि.वि.अ. चिरात् अ. **मृत्युसंसारसागरात् -** मृत्यु पु. संसार पु. सागर पु.पं.ए.व. **समुद्धर्ता -** सम्+उद्+धृ तृच् प्रत्ययान्त पु.प्र.ए.व. **भवामि -** भू प्र.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - मृत्युसंसारसागरात् -** संसार एव सागर: संसारसागरो मृत्युयुक्तश्चासौ संसारसागरश्च मृत्युसंसारसागरस्तस्माद् मृत्युसंसारसागरात् = संसारच सागर संसारसागर मृत्युने युक्त असणारा संसारसागर मृत्युसंसारसागर त्यापासून**(कर्म.ग.कर्म.स.)** यद्वा **मृत्युसंसारसागरात् -** म्रियन्ते पुन: पुन: प्राणिनो यस्मात्स मृत्युरज्ञानं सर्वानर्थकारणं तेन युक्तस्तत्कार्यभूतोऽहंममेत्यादिप्रवृत्तिलक्षण: संसार: सोऽयं निरवधिकत्वात् दुस्तरत्वात्तापत्रयवडवानलमयत्वाच्च सागरवद्भवतीति मृत्युसंसारसागरस्तस्माद् मृत्युसंसारसागरात् = पुन्हा पुन्हा प्राणी ज्याच्या द्वारा मरतात तो मृत्यु ते संपूर्ण अनर्थांचे कारण अज्ञान, त्याच्या द्वारा युक्त म्ह. त्याचे कार्यरूप मी-माझा इत्यादिप्रवृत्तिरूप हा संसार अवधिरहित असल्यामुळे दुस्तर असल्यामुळे तसेच तापत्रयरूप वडवाग्निमय असल्यामुळे सागराच्या समान आहे अशा या मृत्युरूप संसारसागरापासून **(तृ.त.ग.उपमाउपमेय स.)** यद्वा **मृत्युसंसारसागरात् -** मृत्युयुक्त: संसारो मृत्युसंसार: स एव सागर इव सागरो दुस्तरत्वाद् मृत्युसंसारसागरो तस्माद् मृत्युसंसारसागरात् = मृत्युयुक्त संसार तो मृत्युसंसार तोच जणुकाय सागर दुस्तर असल्यामुळे मृत्युसंसारसागर त्यापासून**(कर्म.ग.उपमाउपमेय स.) आवेशितचेतसाम् -** मयि-विश्वरूपे, आवेशितम्-समाहितम्-प्रवेशितं चेत:-अन्त:करणं येषां ते आवेशितचेतसस्तेषामावेशितचेतसाम् = माझ्यामध्ये-विश्वरूपामध्ये समाहित चित्त आहे ज्यांचे ते त्यांचा**(ब.स.) समुद्धर्ता -** सम्यक्-उत्तमप्रकारेण (उद्धारयतीति) उद्धर्ता-समुद्धरणकर्ता = चांगल्या प्रकारांनी उद्धार करणारा**(वि.)**

ध्यानयोगाने भगवत्प्राप्ति -

**मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय।**

**निवसिष्यसि मय्येव अत उर्ध्वं न संशय: ॥८॥**

**अन्वय:** - मयि, एव, मन:, आधत्स्व, मयि, बुद्धिम्, निवेशय, अत:, उर्ध्वम्, मयि, एव, निवसिष्यसि, न, संशय:।

**अन्वयार्थ:** - **मयि एव** - माझ्यामध्येच **मन:** - चित्त **आधत्स्व** - स्थापित कर **मयि** - माझ्याठिकाणी **बुद्धिम्** - बुद्धिला **निवेशय** - निविष्ट कर (म्हणजे माझ्याठिकाणी स्थिर कर) **अत: उर्ध्वम्** - त्यानंतर **मयि एव** -

माझ्याठिकाणीच **निवसिष्यसि** - (तू)निवास करशील **न संशयः** - यामध्ये यत्किञ्चिन्मात्रही संशय नाही.

**विवरण** - संपूर्ण चराचर संसाराला व्याप्त करून सर्वांच्या हृदयामध्ये स्थित असणारा असा जो सर्वशक्तिमान मी परमात्मा त्या माझ्याठिकाणी अन्य विषयामध्ये जाणाऱ्या संकल्पात्मक मन आणि निश्चयात्मक बुद्धिला थांबवून स्थिर कर. त्यानंतर तू माझ्याठिकाणीच प्रवेश करशील यामध्ये काही एक संशय नाही.

**व्याकरणम्** - **मयि** - अस्मत् सर्व.स.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **मनः** - मनस् न.प्र.ए.व. **आधत्स्व** - आ+धा तृ.ग.उ.प.(प.प.)आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **मयि** - अस्मत् सर्व.स.ए.व. **बुद्धिम्** - बुद्धि स्त्री.द्वि.ए.व. **निवेशय** - नि+विश् ष.ग.प.प.प्रयोजक आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **अतः** - अतस् अ. **उर्ध्वम्** - उर्ध्वम् अ. **मयि** - अस्मत् सर्व.स.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **निवसिष्यसि**- नि+वस् द.ग.प.प./प्र.ग.प.प.द्वि.भवि. द्वि.पु.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **संशयः** - संशय पु.प्र.ए.व.

अभ्यासयोगाने भगवत्प्राप्ति -

**अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम् ।**

**अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनञ्जय ॥९॥**

**अन्वयः** - अथ, मयि, चित्तम्, स्थिरम्, समाधातुम्, न, शक्नोषि, ततः, धनंजय, माम्, अभ्यासयोगेन, आप्तुम्, इच्छ ।

**अन्वयार्थः** - **अथ** - अथवा **मयि** - माझ्याठिकाणी **चित्तम्** - चित्त **स्थिरम्** - स्थिर **समाधातुम्** - करण्याकरिता **न शक्नोषि** - तू समर्थ नसशील **ततः** - तर **धनञ्जय** - हे अर्जुना! **माम्** - मला **अभ्यासयोगेन** - मनाचा पुनः पुनः निग्रह करून अचल करण्याचा प्रयत्न करणे अशा या अभ्यास योगाने **आप्तुम्** - प्राप्त होण्याची **इच्छ** - इच्छा कर.

**विवरण** - भिन्न भिन्न प्रकृतियुक्त अथवा भिन्न भिन्न साधनाची आवश्यकता असणाऱ्या हे अर्जुना! तू आपले मन उपर्युक्त साधनाच्या द्वारा माझ्यामध्ये स्थिर करण्याकरिता समर्थ नसशील तर मग अभ्यास योगाच्याद्वारा मनाला पुन्हा पुन्हा निरुद्ध करून माझ्याठिकाणी स्थिर करणाऱ्या मला प्राप्त करण्याची इच्छा कर.

**व्याकरणम्** - **अथ** - अ. **मयि** - अस्मत् सर्व.स.ए.व. **चित्तम्** - चित् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.द्वि.ए.व. **स्थिरम्** - स्थिर न.द्वि.ए.व. **समाधातुम्** - सम्+आ+धा तृ.ग.उ.प.तुमन्त अ. **न** - न क्रि.वि.अ. **शक्नोषि** - शक् पं.ग.प.प.वर्त.द्वि.पु.ए.व. **ततः** - ततस् तसिल् प्रत्ययान्त पञ्चम्यन्त तद्धित अ. **धनञ्जय** - धनञ्जय पु.संबो.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **अभ्यासयोगेन** - अभ्यास पु. योग पु.तृ.ए.व. **आप्तुम्** - आप् पं.ग.प.प.तुमन्त अ. **इच्छ** - इष् ष.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **अभ्यासयोगेन** - चित्तस्य एकस्मिनालम्बने सर्वतः समाहृत्य पुनः पुनः स्थापनमभ्यासः स एव समाधानलक्षण योग इति अभ्यासयोगस्तेनाऽभ्यासयोगेन = चित्ताचा सर्व ठिकाणाहून निरोध करून पुन्हा -पुन्हा एकाग्र करण्याचा प्रयत्न करणे हाच अभ्यास आहे आणि अभ्यासच समाधानरूप योग आहे त्या अभ्यासयोगाच्याद्वारा**(कर्म.स.)** यद्वा **अभ्यासयोगेन** - एवं सर्वस्य भौतिकमात्रत्वप्रत्ययाभ्यासः सगुणब्रह्मोपास्तिसिद्धेरूपायत्वाद्योगः स चाऽसौ योगश्चेति अभ्यासयोगस्तेनाऽभ्यासयोगेन = याप्रमाणे सर्व केवल भौतिकच आहे अशा प्रत्ययाचा अभ्यास, सगुणब्रह्माच्या उपासनेच्या सिद्धीचा उपाय असल्यामुळे अभ्यासच योग,

अभ्यास योग त्या अभ्यास योगाने**(कर्म.स.)**

भगवंताकरिता कर्म केल्याने भगवत्प्राप्ति -

**अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।**

**मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि ॥१०॥**

**अन्वय:** - अभ्यासे, अपि, असमर्थ:, असि, मत्कर्मपरम:, भव, मदर्थम्, अपि, कर्माणि, कुर्वन्, अपि, सिद्धिम्, अवाप्यसि ।

**अन्वयार्थ:** - **अभ्यासेऽपि** - जरी तू अभ्यासयोगाचेही अनुष्ठान करण्याकरिता **असमर्थ:** - असमर्थ **असि** - असशील तर **मत्कर्मपरम: भव** - अन्यातिरिक्त जो मी त्या माझ्याकरिताच केवळ कर्मे करणारा हो **मदर्थम्, अपि** - माझ्याकरिता देखील **कर्माणि कुर्वन्** - कर्मे आचरण करणारा तू **सिद्धिम्** - माझ्या प्राप्तिरूप सिद्धिला **अवाप्स्यसि** - प्राप्त होशील.

**विवरण** - वर कथन केलेल्या साधनापासून जर तू उपरत होत असशील तर मी तुला तिसरे साधन सांगतो. ते असे आहे की, मन, वाणी आणि शरीराच्या द्वारा सेवा, पूजा आदि तसेच यज्ञ, दान आणि तप आदि जेवढी काही शास्त्र विहित कर्मे आहेत, ती सर्व श्रद्धाभक्तिने माझ्याकरिताच करणारा हो. असा तू माझ्यासाठीच संपूर्ण कर्मे करणारा निश्चितरूपाने माझ्या प्राप्तिरूप मोक्ष सिद्धिला प्राप्त होशील.

**व्याकरणम्** - **अभ्यासे** - अभ्यास पु.स.ए.व. **अपि** - अपि अ. **असमर्थ:** - अ+समर्थ वि.पु.प्र.ए.व. **असि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.द्वि.पु.ए.व. **मत्कर्मपरम:** - अस्मत् सर्व.च.ए.व. कर्मन् न. परम वि.पु.प्र.ए.व. **भव** - भू प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **मदर्थम्** - अस्मत् सर्व.ष.ए.व. अर्थम् अ. **कर्माणि** - कर्मन् न.द्वि.ब.व. **कुर्वन्** - कृ अ.ग.उ.प.(प.प.)कर्त.शतृ=कुर्वत् वि.पु.प्र.ए.व. **अपि** - अपि अ. **सिद्धिम्** - सिद्धि स्त्री. द्वि.ए.व. **अवाप्स्यसि** - अव+आप् पं.ग.प.प.द्वि.भवि.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **मत्कर्मपरम:** - मदर्थमेव-मत्प्रीत्यर्थमेव कर्म-वैदिकलौकिकञ्च कर्म मत्कर्म मत्कर्म एव परमं पुरुषार्थसाधनं यस्य स मत्कर्मपरम: = माझ्याकरिताच वैदिक आणि लौकिक कर्मच परमपुरुषार्थ साधन आहे ज्याचे तो**(च.ग.कर्म.ग.ब.स.)** यद्वा **मत्कर्मपरम:** - मत्कर्म वैदिकं लौकिकञ्च सर्वं कर्म मदर्थमेव न तु स्वार्थमीषदपि तत्परमं प्रधानं तात्पर्येण कर्तव्यं न तु ध्यानादिकं यस्य स मत्कर्मपरम: = ज्याचे वैदिक व लौकिक संपूर्ण कर्म माझ्याकरिताच, न कि थोडे सुद्धा आपल्याकरिता परम म्हणजे प्रधान रूपाने कर्तव्य आहे ध्यानादि ज्याचे तो**(ब.स.)** **मदर्थम्** - मम अर्थमिति मदर्थम् = माझ्याकरिताच**(ष.त.स.)** यद्वा **मदर्थम्** - अहमर्थ: प्रयोजनो यस्य तद् मदर्थम् = मीच अर्थ म्हणजे प्रयोजन आहे ज्याचे ते**(ब.स.)** **असमर्थ:** - न समर्थ इत्यसमर्थ: = नाही समर्थ तो असमर्थ**(न.त.स.)**

सर्वकर्मांच्या फलत्यागाने भगवत्प्राप्ति -

**अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रित: ।**

**सर्वकर्मफलत्यागं तत: कुरु यतात्मवान् ॥११॥**

**अन्वय:** - अथ, मद्योगम्, आश्रित:, एतत्, अपि, कर्तुम्, अशक्त:, असि, तत:, यतात्मवान्,

सर्वकर्मफलत्यागम्, कुरु ।

**अन्वयार्थः** - **अथ** - अथवा **मद्योगम्, आश्रितः** - माझ्याप्राप्तिरूप योगाचा आश्रय करून **एतत्, अपि** - वर सांगितल्याप्रमाणे देखील **कर्तुम्** - करण्याकरिता तूं **अशक्तः** - असमर्थ **असि** - असशील **ततः** - तर **यतात्मवान्** - संयतचित्त होत्साता **सर्वकर्मफलत्यागम्** - सर्वकर्माच्या फलाचा संन्यास **कुरु** - कर.

**विवरण** - उपर्युक्त साधनाचे अनुष्ठान करण्यास तू असमर्थ होत असशील तर मी तुझ्याकरिता दुसरे साधन सांगतो. ते असे की, चित्त संयत करून म्हणजे मनाला आपल्या वश ठेवून वर्णाश्रमानुसार तसेच शरीर निर्वाहाकरिता जेवढे काही शास्त्र संमत कर्म सांगितले आहे त्या संपूर्ण कर्माच्या फलरूपभोगाविषयीच्या कामनेचा आणि आसक्तिचा त्याग करून श्रद्धा भक्तिने युक्त होवून कर्म कर. कारण ममता, आसक्ति आणि कामनेचा त्याग करणेच सर्वकर्माच्या फलाचा त्याग आहे.

**व्याकरणम्** - **अथ** - अथ अ. **मद्योगम्** - अस्मत् सर्व.पु.ष.ए.व. योग पु.द्वि.ए.व. **आश्रितः** - आ+श्रि प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **एतत्** - एतत् सर्व.न.प्र.ए.व. **अपि** - अपि अ. **कर्तुम्** - कृ अ.ग.उ.प.तुमन्त अ. **अशक्तः** - अ+शक् पं.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **असि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.द्वि.पु.ए.व. **ततः** - ततस् तसिल् प्रत्ययान्त पञ्चम्यन्त अ. **यतात्मवान्** - यम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. आत्मवत् वि.पु.प्र.ए.व. **सर्वकर्मफलत्यागम्** - सर्व वि. कर्म न. फल न. त्याग पु. द्वि.ए.व. **कुरु** - कृ अ.ग.उ.प.(प.प.)आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **मद्योगम्** - मम योगो मद्योगस्तं मद्योगम् = माझा योग त्या योगाला**(ष.त.स.)** **यतात्मवान्** - यतः-स्वार्थफलाभिलाषां विहाय संयतः कामसङ्कल्पविमुखीकृतो वा आत्मा मनो यस्य सो यतात्मा, यतात्माऽस्यास्तीति यतात्मवान्-संयतचित्तः = स्वार्थफलाभिलाषेस टाकून संयत म्हणजे काम आणि संकल्पाच्या द्वारा विमुख केले गेले आहे आत्मा म्हणजे मन ज्याचे तो**(ब.स.ग.अस्त्यर्थे तद्धि.वि.)**

सर्वकर्मफलत्यागाची प्रशंसा -

**श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ।**

**ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छान्तिरनन्तरम् ॥१२॥**

**अन्वयः** - अभ्यासात्, ज्ञानम्, श्रेयः, ज्ञानात्, ध्यानम्, विशिष्यते, ध्यानात्, कर्मफलत्यागः, (विशिष्यते) हि, त्यागात्, अनन्तरम्, शान्तिः ।

**अन्वयार्थः - अभ्यासात् -** उपर्युक्त कथन केलेल्या अभ्यासापेक्षा **ज्ञानम् -** ज्ञान **श्रेयः -** श्रेष्ठ आहे **ज्ञानात् -** ज्ञानाहून **ध्यानम् -** ध्यान **विशिष्यते** - विशेष चांगले आहे **ध्यानात् -** ध्यानापेक्षा **कर्मफलत्यागः -** कर्माच्या फलांचा त्याग (**विशिष्यते**- विशेष चांगला आहे.) **हि -** कारण **त्यागात् -** कर्मफलाच्या त्यागापासून **अनन्तरम् -** लवकरच (शीघ्रातिशीघ्र) **शान्तिः** - शान्ति (**आप्नोति** - प्राप्त होते.)

**विवरण** - उपर्युक्त-वरसांगितलेल्या अभ्यासापेक्षा ज्ञान श्रेष्ठ आहे. कारण, विवेकहीन अभ्यास भगवत्प्राप्तिस जेवढा पाहिजे तेवढा सहायक होऊ शकत नाही. तेवढेच मात्र अभ्यासहीन विवेकज्ञान सहायक होऊ शकते. म्हणूनच अभ्यासापेक्षा ज्ञान श्रेष्ठ आहे. त्याचप्रमाणे ज्ञानापेक्षा ध्यान श्रेष्ठ आहे. कारण, ध्यानाने चित्त स्थिर होऊन चित्ताची जी मलिनता आणि चंचलता आहे तिचा नाश होऊन भगवत्प्राप्ति होते म्हणून ज्ञानापेक्षा

ध्यान श्रेष्ठ आहे. त्याचप्रमाणे ध्यानापेक्षा कर्माच्या फलाचा त्याग श्रेष्ठ आहे. कारण, जेवढे फलासक्तिचा त्यागरहित ध्यान परमात्मप्राप्तिमध्ये लाभप्रद होऊ शकत नाही तेवढा ध्यानरहित कर्मफलाचा त्याग सहायक होऊ शकतो म्हणून ध्यानापेक्षा कर्मफलाचा त्याग श्रेष्ठ आहे. अशा या कर्मफलाच्या त्यागाने शीघ्रातिशीघ्र परमशांति प्राप्त होते.

**व्याकरणम् - अभ्यासात् -** अभि+अस्+घञ्=अभ्यास पु.पं.ए.व. **ज्ञानम् -** ज्ञान न.प्र.ए.व. **श्रेय: -** श्रेयस् न.प्र.ए.व. **ज्ञानात् -** ज्ञान न.पं.ए.व. **ध्यानम् -** ध्यै प्र.ग.प.प.+ल्युट्=ध्यान न.प्र.ए.व. **विशिष्यते -** वि+ शिष् स.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व. **ध्यानात् -** ध्यान न.पं.ए.व. **कर्मफलत्याग: -** कर्म न. फल न. त्याग पु.प्र.ए.व. **हि -** हि प्रसिद्ध्यर्थक क्रि.वि.अ. **त्यागात् -** त्यज् प्र.ग.प.प.+घञ्=त्याग पु.पं.ए.व. **अनन्तरम् -** अन्+अन्तर न.प्र.ए.व. **शान्ति: -** शान्ति स्त्री.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - अनन्तरम् -** नाऽन्तरं-न व्यवधानमित्यनन्तरम् = नाही अंतर-नाही व्यवधान ते अनंतर **(नञ् त.स.) कर्मफलत्याग: -** कर्मणां फलानि कर्मफलानि कर्मफलानां त्याग इति कर्मफलत्याग: = कर्माच्या फलाचा त्याग**(ष.ग.त.स.)**

भक्तांची द्वेषरहितादि ३६ लक्षणे -

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्र: करुण एव च ।**

**निर्ममो निरहङ्कार: समदु:खसुख: क्षमी ॥१३॥**

**अन्वय: -** सर्वभूतानाम्, अद्वेष्टा, मैत्र:, च, करुण:, एव, निर्मम:, निरहङ्कार:, समदु:खसुख:, क्षमी ।

**अन्वयार्थ: - सर्वभूतानाम्, अद्वेष्टा -** सर्व प्रणिमात्रांविषयी द्वेष न करणारा **मैत्र: -** सर्वांशी मैत्रीने वागणारा **च -** आणि **करुण: एव -** प्राणिमात्रावरही दया करणारा **निर्मम: -** कोणत्याही पदार्थाविषयी ममता रहित **निरहङ्कार: -** अहंकाररहित **समदु:खसुख: -** सुखाला आणि दु:खाला समान मानणारा **क्षमी -** अपराध करणाऱ्याला सुद्धा क्षमा करणारा.

**विवरण -** सर्वत्र समभाव असल्यामुळे कोणत्याही प्राण्याविषयी द्वेष न करणारा, कोणत्याही पदार्थामध्ये ममता रहित तसेच अहंकाररहित असणारा, सर्व भूतांच्यांठिकाणी मैत्रीने व्यवहार करणारा, कोणत्याही अवस्थेमध्ये सु:खदु:खाला सम मानणारा तसेच अपकार करणाऱ्याला देखील क्षमा करणारा.

**व्याकरणम् - सर्वभूतानाम् -** सर्व वि. भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.ष.ब.व. **अद्वेष्टा -** अ+द्वेष् द्वि.ग.उ.प.+तृच्=द्वेष्टृ वि.पु.प्र.ए.व. **मैत्र: -** मैत्र वि.पु.प्र.ए.व. **च -** च उभ.अ. **करुण: -** कृ अ.ग.उ.प.+उनन्=करुण वि.पु.प्र.ए.व. **एव -** एव क्रि.वि.अ. **निर्मम: -** निर्मम वि.पु.प्र.ए.व. **निरहङ्कार: -** निर्+अहङ्कार पु.प्र.ए.व. **समदु:खसुख: -** सम वि. दु:ख न.वि. सुख न.वि.पु.प्र.ए.व. **क्षमी -** क्षमिन् वि.पु.प्र.ए.व.

**समाविग्रहार्था: - अद्वेष्टा -** द्वेष्टीति द्वेष्टा न द्वेष्टाऽद्वेष्टा = जो द्वेष-वैर करीत नाही तो अद्वेष्टा**(नञ् त.स.) निरहङ्कार: -** ब्रह्मैवाऽहमिति परे ब्रह्मण्येवाऽऽत्मभावापत्त्या देहान्नि:शेषेण निर्गताऽहंबुद्धिर्यस्य स निरहङ्कार:- अहङ्कारशून्य: = ब्रह्मच मी आहे अशा प्रकारे ब्रह्माचे ठिकाणी आत्मभाव प्राप्त झाल्यामुळे देहामधून अहंबुद्धि निघून गेली आहे ज्याची तो**(ब.स.) समदु:खसुख: -** दु:खश्च सुखश्च दु:खसुखे समे-तुल्ये दु:खसुखे द्वे-

षरागयोर्जनके यस्य स समदु:खसुख: = समान म्ह. रागद्वेषाला उत्पन्न करणारे दु:ख आणि सुख ज्याचे तो **(द्वं.ग.ब.स.) निर्मम: -** परदेहवत्स्वदेहान्निर्गतो ममभावो यस्य स निर्मम: = (दुसऱ्याच्या देहावर ममता नसते) दुसऱ्याच्या देहाप्रमाणे आपल्या देहापासून ममता निघून गेली आहे ज्याची तो**(ब.स.) क्षमी** - क्षमा अस्यास्तीति क्षमी = क्षमा आहे ज्याची तो**(अस्त्यर्थे तद्धि. प्रत्यय:)**

**सन्तुष्ट: सततं योगी यतात्मा दृढनिश्चय: ।**

**मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्त: स मे प्रिय: ॥१४॥**

**अन्वय: -** सततम्, सन्तुष्ट:, योगी, यतात्मा, दृढनिश्चय:, मयि, अर्पितमनोबुद्धि:, य:, मद्भक्त:, स:, मे, प्रिय: ।

**अन्वयार्थ: - सततम्, सन्तुष्ट: -** निरंतर आनंदित राहणारा **योगी -** सदा शांतचित्त असणारा चित्तावर नियंत्रण करणारा **दृढनिश्चय: -** माझ्या ठिकाणी दृढनिश्चय असणारा असा **मयि अर्पितमनोबुद्धि: -** माझ्याठिकाणीच ज्याने मन आणि बुद्धिला अर्पण केलेला **य:** - जो **मद्भक्त: -** माझा भक्त आहे **स: -** तो **मे प्रिय: -** मला अत्यंत प्रिय आहे.

**विवरण -** परमानंदाचे अक्षय आणि अनंत भांडार जो परमात्मा त्याला प्रत्यक्ष करून सदैव संतुष्ट राहणारा सर्व अवस्थांमध्ये सदोदित संतुष्ट-आनंदित राहणारा, विषयामध्ये जाणाऱ्या चंचल चित्ताला सर्वप्रकारांनी नियमन करून दृढनिश्चयी असणारा, मन आणि बुद्धिला माझ्या ठिकाणी अर्पण करणारा असा जो माझा भक्त आहे तो मला अतिशय प्रिय आहे.

**व्याकरणम् - सततम् -** सतत वि.न.प्र.ए.व. **सन्तुष्ट: -** सम्+तुष् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **योगी -** योगिन् पु.प्र.ए.व. **यतात्मा -** यत-यम् प्र.ग.प.प.भावे.भू.धा.वि. आत्मन् पु.प्र.ए.व. **दृढनिश्चय: -** दृढ वि. निश्चय पु.प्र.ए.व. **मयि -** अस्मत् सर्व.पु.स.ए.व. **अर्पितमनोबुद्धि: -** ऋ (पुकागम) प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. मनस् न. बुद्धि स्त्री.प्र.ए.व. **मद्भक्त: -** अस्मत् सर्व.पु.ष.ए.व. भज् प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **स: -** तत् सर्व.पु.प्र.ए.व. **ते -** अस्मत् सर्व.पु.ष.ए.व. **प्रिय: -** प्रिय वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - यतात्मा -** यत:-नियन्त्रित आत्मा-स्वभाव:-वासना यस्य स यतात्मा = नियंत्रित आहे आत्मा-स्वभाव-वासना ज्याची तो**(ब.स.)** यद्वा **यतात्मा -** यत:-संयत: 'समं कायशिरोग्रीवम्' इत्युक्तलक्षणेन स्थापित आत्मा-देहो यस्य स यतात्मा = यत-संयत 'समं कायशिरोग्रीवम्' इत्यादि लक्षणाने स्थापित आहे आत्मा-देह ज्याचा तो**(ब.स.) दृढनिश्चय: -** दृढ:-निश्चलो निश्चय:-निर्णय आत्मतत्त्वविषये यस्य स दृढनिश्चय: = आत्मतत्त्वाविषयी दृढनिश्चय आहे ज्याचा तो**(ब.स.)** यद्वा **दृढनिश्चय: -** निरन्तरसमाधि सञ्जातसम्यग्ज्ञानस्य विषयभूते परे ब्रह्मण्येवाऽऽत्मत्वानुभूत्या समुत्पन्नो ब्रह्मैवाऽहं न तु संसारीत्येवंलक्षणो दृढ: प्रमाणान्तर प्रत्ययान्तरैरच्छेद्य: स्वभावनिश्चयो यस्य स दृढनिश्चय: = निरंतर समाधिपासून उत्पन्न झालेल्या ज्ञानाच्या विषयभूत ब्रह्माच्या ठिकाणी आत्मत्वाच्या अनुभवाने उत्पन्न झालेला मी ब्रह्मच आहे संसारी नाही अशा प्रकारचा दृढ म्ह. प्रमाणांतराने आणि प्रत्ययांतराने अच्छेद्य स्वभाव-निश्चय आहे ज्याचा तो(**ब.स.**) **अर्पितमनोबुद्धि: -** संकल्पात्मकं मनश्च, अध्यवसायलक्षणा बुद्धिश्च मनोबुद्धी अर्पिते-समर्पिते

मनोबुद्धी येन सोऽर्पितमनोबुद्धि: = सकल्प विकल्पात्मक मन निश्चयात्मिका बुद्धी अर्पित केली आहे ज्याच्या द्वारा तो(**ब.स.**) **मद्भक्त:** - मम भक्त इति मद्भक्त: = माझा भक्त(**ष.त.स.**)

हर्षादि विकारांनी रहित आणि सर्वांना अभय देणाऱ्या प्रिय भक्तांचे लक्षण -

**यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च य: ।**

**हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो य: स च मे प्रिय: ॥१५॥**

**अन्वय:** - यस्मात्, लोक:, न, उद्विजते, च, य:, लोकात्, न, उद्विजते, च, य:, हर्षामर्षभयोद्वेगै:, मुक्त:, स:, मे, प्रिय: ।

**अन्वयार्थ: - यस्मात् -** ज्या प्रियभक्तापासून **लोक: -** कोणताही जीव **न उद्विजते -** उद्वेगाला प्राप्त होत नाही **च -** आणि **य: -** जो भक्त **लोकात् -** कोणत्याही जीवापासून **न उद्विजते-** उद्विग्न उद्वेगाला प्राप्त होत नाही-दुखि:त होत नाही **च -** आणि (**य: -** जो) **हर्षामर्षभयोद्वेगै: -** हर्ष, अमर्ष, भय, उद्वेग यांच्याकडून **मुक्त: -** मुक्त असतो **स: -** तो भक्त **मे प्रिय: -** मला प्रिय आहे.

**विवरण -** सर्व ठिकाणी समबुद्धी असल्यामुळे कोणत्याही प्राण्याला त्याच्यापासून दु:ख, संताप आणि भय होत नाही आणि जो भक्त कोणत्याही प्राण्यापासून उद्विग्न होत नाही. कारण, त्याच्या अंत:करणामध्ये राग, द्वेष यांचा सर्वथा अभाव झाला असल्यामुळे हर्ष, क्रोध, भय आणि उद्वेग यांच्यापासून सर्वथा मुक्त असतो. अशा उपर्युक्त लक्षणांनी युक्त भक्त मला अत्यंत प्रिय आहे.

**व्याकरणम् - यस्मात् -** यत् सर्व.पु.पं.ए.व. **लोक: -** लोक पु.प्र.ए.व. **न -** न क्रि.वि.अ. **उद्विजते -** उद्+विज् ष.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व. **च -** च उभ.अ. **य: -** यत् सर्व.पु.प्र.ए.व. **लोकात् -** लोक पु.पं.ए.व. **न -** न क्रि.वि.अ. **उद्विजते -** उद्+विज् ष.ग.(उ.प.)आ.प.वर्त.तृ.पु.ए.व. **च -** च उभ.अ. **य: -** यत् सर्व.पु.प्र.ए.व. **हर्षामर्षभयोद्वेगै: -** हर्ष पु. अमर्ष वि. भय-उद्वेग पु.तृ.ब.व. **मुक्त:-** मुच् ष.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. (**य: -** यत् सर्व.पु.प्र.ए.व.) **स: -** तत् सर्व.पु.प्र.ए.व. **मे -** अस्मत् सर्व.पु.ष.ए.व. **प्रिय: -** प्रिय वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - हर्षामर्षभयोद्वेगै: -** हर्षश्च-स्वाभीष्टप्राप्तिजन्यसन्तोषश्च, अमर्षश्च-स्वाभीष्टप्राप्तिनाशे क्रोधावेशश्च, भयश्च भीतिश्च उद्वेगश्च-भयादिनिमित्तक्षोभश्चेति हर्षामर्षभयोद्वेगास्तै: हर्षामर्षभयोद्वेगै: = हर्ष, क्रोध, भय, उद्वेग यांच्याद्वारा(**इ.द्वं.स.**) यद्वा **हर्षामर्षभयोद्वेगै: -** हर्षश्च अमर्षश्च भयश्च उद्वेगश्च हर्षामर्ष भयोद्वेगास्तै: हर्षामर्षभयोद्वेगै: = हर्ष, क्रोध, भय, उद्वेग यांच्याद्वारा(**इ.द्वं.स.**) यद्वा **हर्षामर्षभयोद्वेगै: -** हर्षश्च-प्रियलाभे अंत:करणस्य उत्कर्षो रोमाञ्चाश्रुपातादिलिङ्गश्च, अमर्षश्च-असहिष्णुता च भयश्च-त्रासश्च, उद्वेगश्च-उद्विग्नता चेति हर्षामर्षभयोद्वेगास्तै: हर्षामर्षभयोद्वेगै: = हर्ष-प्रियवस्तूचा लाभ झाला असता अंत:करणाचा उत्कर्ष-शरीरावर रोमांच उठणे, नेत्रातून अश्रु येणे इ. ज्याची चिन्हे आहेत तो हर्ष, अमर्ष-दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न होणे हा अमर्ष, भय-चोर, सर्प इत्यादिकांना पाहिल्यामुळे होणारा त्रास, उद्वेग-उद्विग्नता यांच्या द्वारा (**इ.द्वं.स.**)

**अनपेक्ष: शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथ: ।**

**सर्वारम्भपरित्यागी यो मद्भक्त: स मे प्रिय: ॥१६॥**

**अन्वय:** - अनपेक्ष:, शुचि:, दक्ष:, उदासीन:, गतव्यथ:, सर्वारम्भपरित्यागी, य:, मद्भक्त:, स:, मे, प्रिय: ।

**अन्वयार्थ:** - **अनपेक्ष:** - कोणत्याही वस्तुविषयी आकांक्षा न करणारा **शुचि:** - अंतर्बाह्य शुद्धिने युक्त **दक्ष:** - प्रसंगानुसार कार्य करणारा **उदासीन:** - पक्षपातरहित **गतव्यथ:** - पीडारहित **सर्वारम्भपरित्यागी** - सर्वारंभाचा त्याग करणारा **य:** - जो **मद्भक्त:** - माझा भक्त **स:** - तो **मे** - मला **प्रिय:** - अत्यंत प्रिय आहे.

**विवरण** - भगवत्प्राप्त पुरुष इच्छा, स्पृहा अथवा वासनारहित तसेच पूर्ण काम असल्यामुळे कोणत्याही पदार्थाची आकांक्षा-इच्छा न करणारा, मन, बुद्धी, इंद्रिये आचरणाने तसेच शरीराने पवित्र असणारा असा अंतर्बाह्यशुद्धियुक्त संपूर्ण कार्याच्या ठिकाणी दक्ष असणारा, जगतामध्ये कोणाचाही पक्षपात न करता उदासीन राहणारा, संपूर्ण दु:खापासून निर्भय असणारा, तसेच सर्वारंभाचा त्याग करणारा असा उपर्युक्त लक्षणाने युक्त भक्त मला अतिशय प्रिय आहे.

**व्याकरणम्** - **अनपेक्ष:** - अनपेक्ष वि.पु.प्र.ए.व. **शुचि:** - शुचि वि.पु.प्र.ए.व. **दक्ष:** - दक्ष वि.पु.प्र.ए.व. **उदासीन:** - उदासीन वि.पु.प्र.ए.व. **गतव्यथ:** - गम् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. व्यथ वि.पु.प्र.ए.व. **सर्वारम्भपरित्यागी** - सर्व वि. आरम्भ वि. परि+त्यागिन् पु.प्र.ए.व. **य:** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **मद्भक्त:** - अस्मत् सर्व.भज् प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.पु.ष.ए.व. **प्रिय:** - प्रिय वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अनपेक्ष:** - न विद्यते कल्पितस्य पदार्थस्य अथवा मुक्तत्वान्मोक्षस्याऽप्यपेक्षा-स्पृहा यस्य सोऽनपेक्ष:-निस्पृह: = कल्पित पदार्थाची अथवा मुक्त असल्यामुळे मोक्षाची सुद्धा अपेक्षा-स्पृहा नाही ज्याची तो**(नञ् ब.स.)** **गतव्यथ:** - गता-नष्टा, व्यथा-दुखं यस्य स गतव्यथ:-त्रिविधतापशून्य: = नाश झाले दु:ख ज्याचे तो**(ब.स.)** यद्वा **गतव्यथ:** - गता-चित्तान्निर्गता, व्यथा-कृत्याकृत्याननुष्ठानानुष्ठानकृत: सन्तापो यस्य स गतव्यथ: = गत-चित्तातून निघून गेली व्यथा-कृत्य आणि अकृत्याच्या क्रमाने अननुष्ठान आणि अनुष्ठानाने उत्पन्न संताप ज्याचा तो गतव्यथ**(ब.स.)** **सर्वारम्भपरित्यागी** - सर्वे च आरम्भाश्च सर्वारम्भा: सर्वारम्भान्-लौकिकवैदिकारम्भान्परित्यक्तुम्-सन्यसितुं शीलम्-स्वभावो यस्य स सर्वारम्भपरित्यागी = वैदिक लौकिक सर्वारंभाला परित्याग करण्याचे शील आहे ज्याचे तो**(ब.स.)** यद्वा **सर्वारम्भपरित्यागी** - आरम्भ्यन्त इत्यारम्भा: सर्वेच ते आरम्भाश्च सर्वारम्भा: कर्माणि लौकिकानि वैदिकानि च सर्वाणि कर्माण्य विद्याकामसंकल्पाहंकारादिदोषप्रवर्धकत्वेन ज्ञानतत्फलप्रतिबंधकत्वात् तानि परित्यक्तुं शीलमस्याऽस्तीति सर्वारम्भपरित्यागी = ज्यांचा आरंभ केला जातो ते आरंभ, संपूर्ण आरंभ ते सर्वारंभ म्ह. लौकिक वैदिक सर्वकर्म अविद्या, काम, सकल्प, अहंकार आदि दोषांना वाढविणारे असल्यामुळे ज्ञान आणि त्यांच्या फलाचे प्रतिबंधक आहे. त्यांचा त्याग करण्याचा स्वभाव आहे ज्याचा तो सर्व संकल्पसंन्यासी**(ब.स.)**

**यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति ।**

**शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्य: स मे प्रिय: ॥१७॥**

**अन्वय:** - य:, न, हृष्यति, न, द्वेष्टि, न, शोचति, न, काङ्क्षति, शुभाशुभपरित्यागी, य:, भक्तिमान्, स:, मे, प्रिय: ।

**अन्वयार्थ:** - **य:** - जो **न हृष्यति** - केव्हाही हर्षित होत नाही **न द्वेष्टि** - अनिष्टवस्तू प्राप्त झाली तरी तिचा द्वेष

करीत नाही **न शोचति** - विनष्ट पदार्थाविषयी केव्हाही शोक करत नाही **न काङ्क्षति** - कोणत्याही वस्तुची इच्छा न करणारा **शुभाशुभपरित्यागी** - शुभ आणि अशुभ कर्माचा संन्यास करणारा **यः भक्तिमान्** - जो भक्तिमान पुरुष **सः** - तो **मे** - मला **प्रियः** - अतिशय प्रिय आहे.

**विवरण** - भगवत्प्रिय पुरुष वस्तुच्या संयोगापासून हर्षित होत नाही आणि वियोगापासून द्वेष करीत नाही. कोणत्याही वस्तुविषयी शोक न करणारा, निःस्पृह असल्यामुळे कोणत्याही वस्तुविषयी इच्छा न करणारा आणि शुभ व अशुभ संपूर्ण कर्माचा त्याग करणारा असल्यामुळे तो भक्त मला अत्यंत प्रिय आहे.

**व्याकरणम् - यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **हृष्यति** - हृष् च.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **द्वेष्टि** - द्विष् द्वि.ग.उ.प.(प.प.)वर्त.तृ.पु.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **शोचति** - शुच् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **काङ्क्षति** - काङ्क्ष् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **शुभाशुभपरित्यागी** - शुभ न. अशुभ न. परि+त्यागिन् पु.प्र.ए.व. **यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **भक्तिमान्** - भक्ति+मतुप्=भक्तिमत् स्त्री.वि.पु.प्र.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.पु.च.ए.व. **प्रियः** - प्रिय वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - शुभाशुभपरित्यागी** - शुभश्च अशुभश्च शुभाशुभे-पुण्यपापे ते परित्यक्तुं-सन्न्यसितुं शीलम् -स्वभावो यस्य स शुभाशुभपरित्यागी = शुभ आणि अशुभ यांचा त्याग करण्याचे शील आहे ज्याचे तो **(ब.स.)** यद्वा **शुभाशुभपरित्यागी** - शुभानि-पुण्यानि अशुभानि-पापान्यज्ञानसहभावीनि इच्छयाऽनिच्छया वा चिदाभासेन क्रियमाणानि कर्माण्यकर्मत्वज्ञानेन 'नाऽहं कर्ताऽस्मि'इति परित्यक्तुं स्वस्माद्विश्लेषयितुं शीलमस्याऽस्तीति शुभाशुभपरित्यागी = शुभ म्ह. पुण्य, अशुभ म्ह. पाप म्ह. अज्ञानाच्या बरोबर होणारी इच्छा अथवा अनिच्छापासून चिदाभासाच्या द्वारा केल्या जाणाऱ्या त्या कर्मांचा अकर्मत्व ज्ञानाने 'मी कर्ता नाही' या ज्ञानाने त्याग करण्याकरिता-आपल्यापासून दूर करण्याकरिता ज्याचे शील आहे तो**(शीलार्थे ब.स.) भक्तिमान्** - भक्तिरस्यास्तीति भक्तिमान् = भक्ति आहे ज्याची अथवा ज्याच्यामध्ये तो**(अस्त्यर्थे त. वि.) भक्तिः** - भज्यत इति भक्तिः = भजल्या जाते ती भक्ति**(वि.)**

**समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।**

**शीतोष्णसुखदुःखेषु समः सङ्गविवर्जितः ॥१८॥**

**अन्वयः** - शत्रौ, च, मित्रे, समः, तथा, मानापमानयोः, समः, शीतोष्णसुखदुःखेषु, समः, सङ्गविवर्जितः ।

**अन्वयार्थः - शत्रौ** - शत्रुच्या विषयी **च** - आणि **मित्रे** - मित्राच्या विषयी **समः** - समान असणारा **तथा** - त्याचप्रमाणे **मानापमानपयोः** - मान आणि अपमान यांच्या विषयी **समः** - समानभाव ठेवणारा **शीतोष्णसुखदुःखेषु** - शीत उष्ण आणि सुख दुःख यांच्यामध्ये **समः** - सम असणारा **सङ्गविवर्जितः** - आणि आसक्ति रहित.

**विवरण** - सर्वत्र समानभाव असल्यामुळे त्याला या जगतामध्ये कोणी शत्रू नाही व कोणी मित्र नाहीत म्हणजे दोन्हीच्या ठिकाणी समान भाव ठेवणारा, त्याचप्रमाणे मान केला तरी हर्षित न होणारा आणि अपमान केला तर क्रोधित न होणारा असा दोन्हीच्या ठिकाणी समान असणारा, त्याचप्रमाणे शीतउष्ण आणि सुःखदुःख यांच्या ठिकाणी सुद्धा सम असणारा आणि आसक्तिरहित असणारा.

**व्याकरणम् - शत्रौ -** शत्रु पु.स.ए.व. **च -** च उभ.अ. **मित्रे -** मित्र पु.स.ए.व. **समः -** सम वि.पु.प्र.ए.व. **तथा -** तथा क्रि.वि.अ. **मानापमानयोः -** मान पु. अपमान पु.स.द्वि.व. **समः -** सम वि.पु.प्र.ए.व. **शीतोष्णसुखदुःखेषु -** शीत न. उष्ण न. सुख न. दुख न.स.ब.व. **समः -** सम वि.पु.प्र.ए.व. **सङ्गविवर्जितः -** सङ्ग पु. विवर्जित वि+वर्जित-वृज् प्र.ग.आ.प./द.ग.उ.प./स.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.प्र.ए.व.

**समाविग्रहार्थाः - मानापमानयोः -** मानश्च-पूजाच, अपमानश्च-तिरस्कारश्चेति मानापमानौ तयोर्मानापमानयोः = मान आणि अपमानाविषयी**(इ.द्वं.स.) शीतोष्णसुखदुःखेषु -** शीतश्च उष्णश्च सुखश्च दुःखश्च शीतोष्णसुखदुःखानि तेषु शीतोष्णसुखदुःखेषु = शीत, उष्ण, सुख, दुःख यांच्याठिकाणी**(इ.द्वं.स.) सङ्गविवर्जितः -** सङ्गेन-दुस्सङ्गेन वर्जितः-रहित इति सङ्गविवर्जितः = संगाने वर्जित असणारा**(तृ.त.स.) सङ्गविवर्जितः -** मानापमानशीतोष्णादीनामनुभविता साभासोऽहंकारस्तत्तादात्म्याध्यास एव सङ्गस्तेन विवर्जित इति सङ्गविवर्जितः = मान आणि अपमान तसेच शीत उष्ण आदिचा अनुभव करणारा साभास अहंकार त्याचा तादात्म्यरूप अध्यासच सङ्ग त्याच्याद्वारा वर्जित**(तृ.त.स.)**

**तुल्यनिन्दास्तुतिर्मौनी सन्तुष्टो येन केनचित् ।**

**अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥१९॥**

**अन्वयः -** तुल्यनिन्दास्तुतिः, मौनी, येन, केनचित्, सन्तुष्टः, अनिकेतः, स्थिरमतिः, भक्तिमान्, नरः, मे, प्रियः ।

**अन्वयार्थः - तुल्यनिन्दास्तुतिः -** निंदा आणि स्तुतिला एकसारखा समजणारा **मौनी -** मौन धारण करणारा **येन केनचित्, सन्तुष्टः -** जी वस्तू प्राप्त होईल त्याने संतुष्ट राहणारा **अनिकेतः -** घररहित **स्थिरमतिः -** स्थिर बुद्धी असणारा **भक्तिमान्, नरः -** असा जो भक्तिमान् पुरुष **मे -** मला **प्रियः -** अतिशय प्रिय आहे.

**विवरण -** मन आणि वाणीचे नियमन करून मौन धारण करणारा, स्तुतिच्याद्वारा हर्षित न होणारा आणि निंदेच्याद्वारा दुःखित न होणारा म्हणजे निंदा आणि स्तुतिच्या ठिकाणी समान राहणारा आणि शरीरनिर्वाह करण्याकरिता जे मिळेल त्याने संतुष्ट राहणारा, ज्या ठिकाणी निवास करतो त्या ठिकाणी त्यांची अहंता आणि ममता नसल्यामुळे असा तो घररहित असणारा, अन्यातिरिक्त परमात्म्याच्या ठिकाणी स्थिरबुद्धिवाला असा जो पुरुष तो मला अतिशय प्रिय आहे.

**व्याकरणम् - तुल्यनिन्दास्तुतिः -** तुल्य वि. निन्दा स्त्री. स्तुति स्त्री.वि.पु.प्र.ए.व. **मौनी -** मौनिन् पु.प्र.ए.व. **येन -** यत् सर्व.पु.तृ.ए.व. **केन -** किम् सर्व.पु.तृ.ए.व. **चित् -** चित् अ. **सन्तुष्टः -** सम्+तुष् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **अनिकेतः -** अनिकेत् न.वि.पु.प्र.ए.व. **स्थिरमतिः -** स्थिर वि. मति स्त्री.प्र.ए.व. **भक्तिमान् -** भक्ति स्त्री.+मतुप्=भक्तिमत् वि.पु.प्र.ए.व. **नरः -** नर पु.प्र.ए.व. **मे -** अस्मत् सर्व.च.ए.व. **प्रियः -** प्रिय वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - तुल्यनिन्दास्तुतिः -** निन्दाच-दूषणोक्तिश्च, स्तुतिश्च-स्तवनोक्तिश्चेति निन्दास्तुती तुल्ये-समे निन्दास्तुती यस्य स तुल्यनिन्दास्तुतिः = समान आहे दूषणोक्ति-निंदा आणि स्तवनोक्ति-स्तुति ज्याची तो **(ब.स.)** यद्वा **तुल्यनिन्दास्तुतिः -** निन्दा-विद्यमानानामविद्यमानानां वा दोषाणां प्रत्यक्षेण वर्णनम्, स्तुतिस्तु तथाविधगुणानां प्रत्यक्षेण कीर्तनम्, निन्दाच स्तुतिश्चेति निन्दास्तुती अनात्मगोचरे तुल्ये-समे यस्य स तुल्य

निन्दास्तुति: = निंदा-विद्यमान आणि अविद्यमान दोषांचे प्रत्यक्ष वर्णन, स्तुति-विद्यमान आणि अविद्यमान गुणांचे प्रत्यक्षरूपाने कीर्तन, निंदा आणि स्तुति निंदास्तुती अनात्मगोचर निंदा आणि स्तुति दोन्ही ज्याचे तुल्य-सम आहे तो तुल्यनिंदास्तुति**(ब.स.) अनिकेत: -** न विद्यते निकेत:-निवासो नियतो यस्य सोऽनिकेत: = नाही निकेत-निवास नियत ज्याचा तो**(नञ् ब.स.) स्थिरमति: -** स्थिरा ब्रह्मनिष्ठा यद्वा परमार्थवस्तुविषया मति:-बुद्धिर्यस्य स स्थिरमति: = स्थिर म्हणजे ब्रह्मनिष्ठ अथवा परमार्थ वस्तूविषयक मति-बुद्धी आहे ज्याची तो**(ब.स.)** यद्वा **स्थिरमति: -** विपरीतभावनाजनकेषु मानापमानशीतोष्णादिषु सुखदु:खादिषु प्राप्तेष्वपि सर्व मिदमहं च ब्रह्मैवेति सर्वदा सर्वत्र ब्रह्माकारापन्नैकवृत्त्या स्थिरा-निश्चला मति:-मननशीला चित्तवृत्तिर्यस्य स स्थिरमति: = विपरीत भावनेला उत्पन्न करणारा मान आणि अपमानशीतोष्णादि सुखदु:खादि प्राप्त झाल्यावर सुद्धा हे सर्व आणि मी ब्रह्मच आहे अशी सर्वदा सर्वत्र केवल ब्रह्माकारप्राप्त वृत्तिने स्थिर-निश्चल आहे मति-मननस्वभावाचित्तवृत्ति ज्याची तो**(ब.स.) मौनी -** आत्मव्यतिरेकेण किमपि वाक् न वदतीति मौनम् मौनमस्यास्तीति मौनी = अनात्मवचनशून्य मौन आहे ज्याचे तो किंवा आत्म्याच्या अतिरिक्त काहीच वाणीने न बोलणारा मौनी**(अस्त्यर्थे त.वि.)** यद्वा **मौनी -** मौनी-वाचं यम: वाच्याभावात्, न हि सर्वं ब्रह्मैव पश्यतो विदुषो वाच्यमस्ति, तदभावादेव विद्वान्मौनी **=** मौनी-वक्तव्याचा अभाव असल्यामुळे वाणीचा संयम करणारा. सर्व ब्रह्मच आहे अशा पाहणाऱ्या विद्वानाकरिता वक्तव्याचा अभावही आहे वक्तव्य नसल्यामुळे विद्वान् मौनी आहे**(परिभाषा) भक्तिमान् -** भक्तिरस्यास्तीति भक्तिमान् = भक्ति आहे ज्याची किंवा ज्याच्यामध्ये तो**(अस्त्यर्थे तद्धि.वि.)**

वर सांगितलेल्या गुणांचे सेवन करणाऱ्या भक्तांचे महत्व -

**ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।**

**श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रिया: ॥२०॥**

**अन्वय: -** तु, ये, श्रद्दधाना:, मत्परमा:, भक्ता:, इदम्, यथा, उक्तम्, धर्म्यामृतम्, पर्युपासते, ते, मे, अतीव, प्रिया: ।

**अन्वयार्थ: - तु -** परंतु **ये -** जे **श्रद्दधाना: -** श्रद्धायुक्त **मत्परमा: -** मत्परायण झालेले **भक्ता: -** भक्त **इदम् -** हे यथोक्त कथन केलेले **धर्म्यामृतम् -** धर्मरूप अमृताला **पर्युपासते -** भक्तिने सेवन करतात **ते -** ते भक्त **मे -** मला (परमात्म्याला) **अतीव -** अत्यन्त **प्रिया: -** प्रिय आहेत.

**विवरण -** वर सांगितलेल्या लक्षणाने युक्त असा जो श्रद्धायुक्त पुरुष माझ्या ठिकाणी परायण होऊन (म्ह. मत्पर होऊन) निष्काम श्रद्धा भक्तिने उपर्युक्त सांगितलेल्या धर्ममय अमृताला सदा सर्वदा सेवन करतो तो माझा अत्यंत प्रिय भक्त आहे.

**व्याकरणम् - तु -** तु उभ.अ. **ये -** यत् सर्व.पु.प्र.ब.व. **श्रद्दधाना: -** श्रत् धा तृ.ग.उ.प.+शानच्=श्रद्दधान वि.पु.प्र.ब.व. **मत्परमा: -** अस्मत् सर्व. परम वि.पु.प्र.ब.व. **भक्ता: -** भज् प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा. वि.पु.प्र.ब.व. **इदम् -** इदम् सर्व.न.प्र.ए.व. **यथा -** यथा क्रि.वि.अ. **उक्तम् -** वच् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा. वि.प्र.ए.व. **धर्म्यामृतम् -** धर्म्यामृत न.द्वि.ए.व. **ते -** तत् सर्व.पु.प्र.ब.व. **मे -** अस्मत् सर्व.पु.च.ए.व. **अतीव -** अतीव अ. **प्रिया: -** प्रिय वि.पु.प्र.ब.व.

**समासविग्रहार्थाः - मत्परमाः -** अहमेव परमः पुरुषार्थो येषां ते मत्परमाः = मीच श्रेष्ठ पुरुषार्थ ज्याचा ते **(ब.स.) मत्परमाः -** अहम्-निर्विशेषं परं ब्रह्मैव परमं निरतिशयस्थानं प्राप्तव्यमिति येषां ते मत्परमा मय्येव परमार्थत्वबुद्धयः = मी जो निर्विशेष परब्रह्मच ज्याचे परम म्ह. प्राप्तव्य निरतिशयस्थान आहे ज्यांचे ते**(ब.स.)** यद्वा **मत्परमाः -** अहमेव परमो निरतिशयैश्वर्यसम्पन्नो विश्वाधिकोऽनुल्लङ्घ्याज्ञ ईश्वर इति धीर्येषां ते मत्परमाः = मीच परम-निरतिशय ऐश्वर्यसंपन्न विश्वाहून अधिक, ज्याच्या आज्ञांचे उल्लघंन केल्या जात नाही असा ईश्वर मी आहे अशी ज्याची बुद्धी ते मत्परम**(ब.स.) धर्म्यामृतम् -** धर्म्यादनपेतं धर्म्यम्, धर्म्यं च तदमृतं च धर्म्यामृतम् = जे धर्मापासून अनपेत-दूर न झालेले-धर्माला सोडून नसलेले तेच अमृत-अमृतत्त्वाचे निमित्त असल्यामुळे अमृत-धर्म्यामृत**(अनपेतार्थे त.ग.कर्म.स.) श्रद्दधानाः -** श्रत् दधते श्रद्दधानाः = श्रद्धेला धारण करणारे ते श्रद्दधान**(उपपद स.)**

**ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे**

**श्रीकृष्णार्जुनसंवादे भक्तियोगो नाम द्वादशोऽध्यायः ॥१२॥**

**-: अध्याय बारावा समाप्त :-**

**ॐ श्रीपरमात्मने नम:**

**अथ त्रयोदशोऽध्याय:**

**श्रीभगवानुवाच** - श्री भगवान म्हणाले

**इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते ।**

**एतद्यो वेत्ति तं प्राहु: क्षेत्रज्ञ इति तद्विद: ॥१॥**

**अन्वय:** - कौन्तेय, इदम्, शरीरम्, क्षेत्रम्, इति, अभिधीयते, य:, एतत्, वेत्ति, तम्, क्षेत्रज्ञ:, इति, तद्विद:, प्राहु: ।

**अन्वयार्थ:** - **कौन्तेय** - हे कुंतिपुत्र अर्जुना! **इदम्, शरीरम्** - हे शरीर **क्षेत्रम्, इति, अभिधीयते** - क्षेत्र या नावाने संबोधित केले जाते **य:** - जो पुरुष **एतत्** - या क्षेत्राला **वेत्ति** - जाणतो **तम्** - त्याला **क्षेत्रज्ञ: इति** - क्षेत्रज्ञ असे **तद्विद:** - तत्त्ववेत्ते पुरुष **प्राहु:** - म्हणतात.

**विवरण** - हे शरीर आत्मरूप दृष्टिपासून सर्वथा भिन्न तसेच नाशवान् (क्षणिक) आहे, परंतु ज्याप्रमाणे शेतामध्ये बीज पेरले म्हणजे ते जसे समयावर आपले फळ देते त्याचप्रमाणे या शरीरामध्ये सुद्धा कर्मसंस्काररूपी बीजांचे फळ वेळेवर मिळते म्हणून या शरीराला याठिकाणी क्षेत्र या नावाने सम्बोधित केले आहे याला जो जाणतो त्याला क्षेत्रज्ञ असे तत्त्ववेत्ते पुरुष म्हणतात.

**व्याकरणम्** - **कौन्तेय** - कौन्तेय पु.संबो.ए.व. **इदम्** - इदम् सर्व.न.प्र.ए.व. **शरीरम्**- शरीर न.प्र.ए.व. **क्षेत्रम्** - क्षि प्र.ग.प.प.+त्रन्=क्षेत्र न.प्र.ए.व. **इति** - क्रि.वि.अ. **अभिधीयते** - अभि+धा तृ.ग.उ.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व. **य:** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **एतत्** - एतत् सर्व.न.द्वि.ए.व. **वेत्ति** - विद् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **तम्** - तत् सर्व.पु.द्वि.ए.व. **क्षेत्रज्ञ:** - क्षेत्रज्ञ वि.पु.प्र.ए.व. **इति** - इति क्रि. वि.अ. **तद्विद:** - तत् सर्व.न.विद् वि.पु.प्र.ब.व. **प्राहु:** - प्र+ब्रू द्वि.ग.उ.प.(प.प.)वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **तद्विद:** - तौ-क्षेत्रक्षेत्रज्ञौ ये विदन्ति ते तद्विद: = क्षेत्रज्ञाला जाणणारे(**उपपद स.**) यद्वा **तद्विद:** - विदन्तीति विदस्तयोर्विद इति तद्विद: = क्षेत्र-क्षेत्रज्ञांना जाणणारे(**ष.त.स.**) यद्वा **तद्विद:** - तयो: क्षेत्रक्षेत्रज्ञयो: स्वरूपं ज्ञेयत्वज्ञातृत्वप्रकाश्यत्वप्रकाशकत्वविकारित्वाविकारित्वादिलक्षणै: परस्परविलक्षणं ये विजानन्ति ते तद्विद: = क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ दोन्हीच्या स्वरूपाला ज्ञेयरूप, ज्ञातारूप, प्रकाश्यरूप, प्रकाशकरूप तसेच विकारिरूप, अविकारिरूप लक्षणांच्या द्वारा परस्पर विलक्षण जे जाणतात ते तद्विद(**उपपद स.**) **क्षेत्रज्ञ:** - क्षेत्रम्-शरीरं वेत्ति-जानातीति क्षेत्रज्ञ: = क्षेत्राला म्हणजे शरीराला जाणणारा(**उपपद स.**) यद्वा **क्षेत्रज्ञ:** - जानातीति ज्ञ: क्षेत्रस्य-शरीरस्य ज्ञ इति क्षेत्रज्ञ: = क्षेत्राचा जाणणारा(**ष.त.स.**)यद्वा **क्षेत्रज्ञम्** - शब्दादि विषयरूपेणाऽपि जागराद्याकारेणापि च बहुधा परिणमते तदेवेदं कार्यकारणसङ्घातलक्षणं प्रत्यक्षेणाऽनुभूयमानं शरीरम्-क्षेत्रम् रागद्वेषादिविशिष्ट: पुमान् क्षीयतेऽनेनेति क्षेत्रम् = शब्दादि विषयरूपाने तसेच जागर आदि आकाराच्याही अनेक प्रकाराच्या परिणामाला प्राप्त होते. त्याचा परिणाम भूत कार्यकारणसङ्घात प्रत्यक्षाने अनुभवामध्ये येणारे ते शरीर-क्षेत्र राग द्वेष आदिने युक्त पुरुष याच्यापासून क्षीण होतो म्हणून ते क्षेत्र(**वि.**) यद्वा **क्षेत्रम्** - क्षिते: क्षयात्संसारात्मकादनर्थाच्छमादियुक्तपुरुषं त्रायते इति क्षेत्रम् = संसारात्मक क्षयरूप अनर्थापासून शम, दम आदिने युक्त पुरुषाचे रक्षण करते म्हणून ते क्षेत्र(**वि.**) **क्षेत्रम्** - सर्वदा दीपशिखावत्

स्वयं क्षिणोतीति क्षेत्रम् = दीपकाच्या शिखाच्या समान स्वयं क्षीण होते म्हणून ते क्षेत्र आहे**(वि.) क्षेत्रम् -** सुखदु:खादि फलोत्पादने क्षेत्रवदाचरतीति क्षेत्रम् = सुख आणि दुखादि फलाचे उत्पादन करण्यामध्ये क्षेत्राप्रमाणे आचरण करते म्हणून ते क्षेत्र**(वि.)**

परमात्म्याच्या बरोबर आत्म्याची एकता प्रतिपादन करून क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या ज्ञानालाच ज्ञान दाख विणे -

**क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत।**

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥२॥**

**अन्वय:** - भारत, सर्वक्षेत्रेषु, क्षेत्रज्ञम्, माम्, च, अपि, विद्धि, क्षेज्ञक्षेत्रज्ञयो:, यत्, ज्ञानम्, तत्, ज्ञानम्, मम, मतम्।

**अन्वयार्थ:** - **भारत** - हे भरतकुलोत्पन्ना! **सर्वक्षेत्रेषु** - सर्व क्षेत्रामध्ये **क्षेत्रज्ञम्** - क्षेत्रज्ञ-जीवात्मा **माम्, च, अ पि** - मलाच **विद्धि** - समज **क्षेत्रक्षेत्रज्ञयो: यत्, ज्ञानम् -** क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाचे जे ज्ञान आहे **तत्** - तेच **ज्ञानम्** - ज्ञान वास्तविक आहे असे **मम** - माझे **मतम्** - मत आहे अथवा मला मान्य आहे.

**विवरण** - सर्व क्षेत्रामध्ये जो चेतन अंश क्षेत्रज्ञ आहे तो मीच आहे वास्तविक पाहिले तर तो अंश माझ्याहून भिन्न नाही कारण मीच जीवात्म्याच्या रूपामध्ये विभिन्न प्रकारांनी प्रतीत होतो अशा प्रकारचा जीवात्मा मलाच जाण-समज. कारण क्षेत्र-उत्पत्ति, विनाशधर्मयुक्त, जड, अनित्य, आणि क्षणिक आहे. त्याचप्रमाणे या क्षेत्राच्या विपरीत उपर्युक्त कथित क्षेत्रज्ञ (आत्मा)-नित्यचेतन, ज्ञाता, निर्विकार, शुद्ध आणि सदा-सर्वदा एकरस राहणारा आहे. अशा प्रकारे दोन्ही परस्पर भिन्न आहेत. परंतु अज्ञानाच्याद्वारा एक आहेत असे प्रतीत होतात वास्तविक पाहिले तर एक नाहीत असे जे यथार्थ ज्ञान आहे तेच मला सम्मत (मान्य) आहे.

**व्याकरणम्** - **भारत** - पु.संबो.ए.व. **सर्वक्षेत्रेषु** - सर्व वि.क्षेत्र न.स.ब.व. **क्षेत्रज्ञम्** - क्षेत्रज्ञ वि.पु.द्वि.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **अपि** - अपि अ. **विद्धि** - विद् द्वि.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **क्षेत्रक्षेत्रज्ञयो:** - क्षेत्र न.क्षेत्रज्ञ वि.पु.ष.द्वि.व. **यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **ज्ञानम्** - ज्ञान न.प्र.ए.व. **तत्** - सर्व.न.प्र.ए.व. **ज्ञानम्** - ज्ञान न.प्र.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **मम** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **मतम्** - मन् च.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **सर्वक्षेत्रेषु** - सर्वाणि च तानि क्षेत्राणि च सर्वक्षेत्राणि तेषु सर्वक्षेत्रेषु-सर्वशरीरेषु = संपूर्ण क्षेत्रामध्ये**(कर्म.स.) क्षेत्रज्ञम्** - जानातीति ज्ञ: क्षेत्राणां ज्ञस्तं क्षेत्रज्ञम्-परमात्मानम् = क्षेत्रांचा जाणणारा जो त्याला**(ष.त.स.) क्षेत्रक्षेत्रज्ञयो:** - क्षेत्रश्च-जडविकारि च क्षेत्रज्ञश्च-सत्यज्ञानानन्तरूप परमात्माचेति क्षेत्रक्षेत्रज्ञौ तयोर्क्षेत्रक्षेत्रज्ञयो: = क्षेत्र-जडविकारी आणि क्षेत्रज्ञ-सत्यज्ञानानंतरूप परमात्मा असे क्षेत्रक्षेत्रज्ञ त्या क्षेत्रक्षेत्रज्ञाचा**(द्वं.स.) भारत** - भायामखण्डवृत्तावेव सदा रमत इति भारतस्तत्सम्बुद्धौ हे भारत = भा म्ह.अखंडवृत्तिमध्येच जो सर्वदा रममाण होतो तो भारत**(वि.)**

विकारसहित क्षेत्राचे स्वरूप आणि स्वभाव आदिचे तसेच प्रभावासहित क्षेत्रज्ञाच्या स्वरूपाचे वर्णन करण्याची प्रतिज्ञा -

**तत्क्षेत्रं यच्च यादृक्च यद्विकारि यतश्च यत्।**

**स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे श्रृणु ॥३॥**

**अन्वयः** - तत्, क्षेत्रम्, यत्, च, यादृक्, च, यद्विकारि, च, यतः, यत्, च, यः, सः, च, यत्प्रभावः, तत्, मे, समासेन, श्रृणु ।

**अन्वयार्थः - तत्** - ते **क्षेत्रम्** - क्षेत्र **यत्** - कोणते **च** - आणि **यादृक्** - कोणत्या प्रकारचे **च** - आणि **यद्विकारि** - कोणत्या विकाराच्याद्वारा युक्त **च** - आणि **यतः यत्** - कोणत्या कारणापासून जे उत्पन्न होते **च** - आणि **यः** - जो क्षेत्रज्ञ **सः** - तो कोण **च** - आणि **यत्प्रभावः** - तो कोणत्या प्रभावाने युक्त आहे **तत्** - ते **मे** - माझ्याकडून **समासेन** - संक्षेपरूपाने **श्रृणु** - श्रवण कर.

**विवरण** - उपर्युक्त कथित (प्रतिपादित) क्षेत्र कसे आहे. व कोणत्या प्रकारचे आहे. कोणत्या प्रकारच्या विकारांनी युक्त आहे. आणि कोणत्या कारणापासून उत्पन्न झाले आहे म्हणजे त्याचे कारण कोणते आहे त्याचप्रमाणे क्षेत्रज्ञ ज्या प्रभावाने युक्त आहे असा क्षेत्रज्ञ कोण आहे याचा सुद्धा विचार-परामर्श माझ्याकडून संक्षेपरूपाने श्रवण कर.

**व्याकरणम् - तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **क्षेत्रम्** - क्षेत्र न.प्र.ए.व. **यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **च** - उभ.अ. **यादृक्** - यादृक् न.प्र.ए.व. **च** - उभ.अ. **यद्विकारि** - यत् सर्व. वि+कृ ष.ग.प.प.+णिनि=विकारिन् वि.न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **यत्** - यतस् तसिल् प्रत्ययान्त पञ्चम्यन्त तद्धित अ. **यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **यत्** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **प्रभावः** - प्र+भाव पु.प्र.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.द्वि.ए.व. **समासेन** - सम्+आस् समास पु.तृ.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **श्रृणु** - श्रु प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - यद्विकारि** - यो विकारोऽस्य तद् यद्विकारि = जो विकार ज्याचा आहे ते यद्विकारि **(ब.स.) यत्प्रभावः** - ये प्रभावा उपाधिकृताः शक्तयो यस्य स यत्प्रभावः = प्रभाव म्ह. चक्षुरादि उपाधिकृत शक्ति आहेत ज्याच्या तो यत्प्रभाव**(ब.स.)**

क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या विषयामध्ये ऋषि, वेद आणि ब्रह्मसूत्राचे प्रमाण -

**ऋषिभिर्बहुधा गीतं छन्दोभिर्विविधैः पृथक् ।**

**ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥४॥**

**अन्वयः** - ऋषिभिः, विविधैः, छन्दोभिः, बहुधा, पृथक्, गीतम्, च, हेतुमद्भिः, विनिश्चितैः, ब्रह्मसूत्रपदैः, एव, (बहुधा, गीतम्) ।

**अन्वयार्थः - ऋषिभिः** - (या क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाचे ज्ञान) ऋषींनी **विविधैः छन्दोभिः** - अनेक प्रकारच्या वेदमन्त्रांनी **बहुधा** - अनेक प्रकाराने **पृथक्** - वेगवेगळे **गीतम्** - वर्णन केले आहे **च** - आणि **हेतुमद्भिः** - युक्तियुक्त **विनिश्चितैः** - निश्चयपूर्वक **ब्रह्मसूत्रपदैः एव** - ब्रह्मसूत्रपदाच्या द्वाराही **बहुधा गीतम्** - नाना प्रकाराने कथन केले आहे.

**विवरण** - मंत्र, द्रष्टा, वेद, शास्त्र आणि स्मृतिचे स्वयंप्रज्ञ ऋषि लोकांनी क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांच्या स्वरूपाचे आणि त्यांच्या संबंधी आणखी विविध प्रकारचे वर्णन आप-आपल्या ग्रंथामध्ये आणि इतिहास पुराणामध्ये

अनेक प्रकारांनी विस्तारपूर्वक केले आहे. तसेच नाना प्रकारच्या वेदमंत्रांद्वारा सुध्दा विभागपूर्वक ठीकठिकाणी विस्तारासह वर्णन केले आहे आणि श्रुति-स्मृति आदिमध्ये प्रतिपादित जे क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचे तत्त्व ब्रह्मसूत्राच्या पदांनी अनेक प्रकारांनी गायिले गेले आहे.

**व्याकरणम्** - **ऋषिभिः** - ऋषि पु.तृ.ब.व. **विविधैः** - विविध वि.न.तृ.ब.व. **छन्दोभिः** - छन्द् द.ग.प.प.+असुन्=छन्दस् न.तृ.ब.व. **बहुधा** - बहुधा अ. **पृथक्** - पृथक् अ. **गीतम्** - गै प्र.ग.प.प.भावे.भूत.धा.वि.न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **विनिश्चितैः** - वि+निस्+चि पं.ग.उ.प.कर्म.भूत.धा. वि.न.तृ.ब.व. **हेतुमद्भिः** - हेतुमद् पु.वि.न.तृ.ब.व. **ब्रह्मसूत्रपदैः** - ब्रह्मसूत्र न.पद न.तृ.ब.व. **एव** - एव निश्चयार्थक अ. **बहुधा** - बहुधा अ. **गीतम्** - गै प्र.ग.प.प.कर्म.भूत.धा.वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **ब्रह्मसूत्रपदैः** - ब्रह्म सूत्र्यते-सूच्यते एभिरिति सूत्राणि च तानि तटस्थलक्षणपराणि उप निषद्वाक्यानि ब्रह्म पद्यते ज्ञायते साक्षात्क्रियते एभिरिति पदानि 'सत्यं ज्ञानं अनन्तम्' इत्यादीनि वाक्यानि सूत्रपदानि ब्रह्मणः सूत्रपदानि ब्रह्मसूत्रपदानि तैर्ब्रह्मसूत्रपदैः = ज्याच्या द्वारा ब्रह्म सूचित केले जाते ते सूत्र आ णि ज्यांच्या द्वारा ब्रह्म जाणले जाते अथवा साक्षात्कार केला जातो ते पद अशा ब्रह्मसूत्रपदाच्या द्वारा **(कर्म.ग.ष.त.स.)** **ब्रह्मसूत्रपदैः** - ब्रह्मणः सूचकानि वाक्यानि ब्रह्मसूत्राणि तान्येव पदानि पद्यते वस्तुतत्वं ज्ञायते एभिरिति पदानि ब्रह्मसूत्रपदानि तैर्ब्रह्मसूत्रपदैः-वेदान्तसूत्रैः = ब्रह्म सूचक वाक्य ब्रह्मसूत्र ज्याच्या द्वारा वस्तुतत्व प्राप्त केले जाते अथवा जाणले जाते ते पद त्या ब्रह्मसूत्रपदांच्या द्वारा म्ह. वेदांत सूत्रांच्या द्वारा **(कर्म.ग.ष.त.स.)** **बहुधा** - बहुप्रकारेण बहुधा = बहु प्रकाराने**(वि.)** **गीतम्** - गीयत इति गीतम्-प्रतिपा दितम् = गाईले जाते अथवा प्रतिपादित केले जाते**(वि.)** **हेतुमद्भिः** - हेतवोऽर्थसाधकयुक्तयः सन्ति येषां ते हेतुमन्तस्तैर्हेतुमद्भिः = हेतु म्ह.अर्थसाधक युक्त्या आहेत ज्यांच्या ते त्यांच्याद्वारा**(अस्त्यर्थे त.वि.)**

**महाभूतान्यहङ्कारो बुद्धिरव्यक्तमेव च ।**

**इन्द्रियाणि दशैकं च पञ्च चेन्द्रियगोचराः ॥५॥**

**अन्वयः** - महाभूतानि, अहंकारः, बुद्धिः, च, अव्यक्तम्, एव, दश, च, एकम्, इन्द्रियाणि, च, पञ्च, इ न्द्रियगोचराः ।

**अन्वयार्थः** - **महाभूतानि** - पृथ्व्यादि पञ्चमहाभूते **अहङ्कारः** - अहंकार **बुद्धिः** - बुद्धी **च** - आणि **अव्यक्तम् एव** - अव्यक्त (मूल प्रकृति) **दश च, एकम्, इन्द्रियाणि** - दहा इंद्रिये आणि एक मन अशी अकरा इंद्रिये **च** - आणि **पञ्च, इन्द्रियगोचराः** - पाच इंद्रियांचे विषय शब्दस्पर्शादि.

**विवरण** - उपर्युक्त अनेक प्रकाराने वर्णन केल्या जाणाऱ्या क्षेत्राचे स्वरूप याठिकाणी अशा प्रकारे दाखविले गेले आहे ते असे पाच महाभूते पृथ्वी, जल, तेज, वायु, आकाश, महत्तत्त्वाचे कार्य अहंकार, बुद्धी आणि मूल प्रकृति, त्याचप्रमाणे दहा इंद्रिये श्रोत्र, चक्षु, त्वचा, रसना आणि घ्राण हे पाच ज्ञानेंद्रिय; वाणी, हात, पाय, उपस्थ आणि गुद हे पाच कर्मेंद्रिय; एक मन आणि पाच इंद्रियांचे विषय शब्द, स्पर्श, रूप, रस, आणि गंध इत्यादि.

**व्याकरणम्** - **महाभूतानि** - महा वि. भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.प्र.ब.व. **अहङ्कारः** - अहंकार पु.प्र.ए.व. **बुद्धिः** - बुद्धि स्त्री.प्र.ए.व. **च** - उभ.अ. **अव्यक्तम्** - अ+वि+अञ्ज् स.ग.प.प.कर्म.भूत.धा.

वि.न.प्र.ए.व. **एव** - अवधारणार्थक अ. **दश** - दशन् वि.न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **एकम्** - एक संख्या वा.वि.न.प्र.ए.व. **इन्द्रियाणि** - इन्द्रिय न.प्र.ब.व. **च** - च समुच्चयार्थक उभ.अ. **इन्द्रियगोचरा:** - इन्द्रिय न. गोचर वि.पु.प्र.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **महाभूतानि** - महान्ति च तानि भूतानि च महाभूतानि-भूम्यादीनि पञ्चभूतानि = मोठी भूते म्ह. भूमी आदि पाच महाभूते**(कर्म.स.)** **इन्द्रियगोचरा:** - इन्द्रियाणां गोचरा:-विषया इतीन्द्रियगोचरा: = इंद्रियांचे विषय**(ष.त.स.)** **अव्यक्तम्** - न व्यक्तमित्यव्यक्तमव्याकृतम् = जे व्यक्त-स्पष्ट नाही ते अव्यक्त-अव्याकृत**(नञ् त.स.)** **अव्यक्तम्** - महत: कारणमव्यक्तं मूलप्रकृतिर्महदादिवन्न व्यज्यत इत्यव्यक्तम्-अव्याकृतम्-जगद्‌बीजं त्रिगुणात्मकं परमेश्वरशक्तिरपरा = महताचे कारण अव्यक्त म्हणजे मूळप्रकृति महदादिच्या समान व्यक्त होत नाही ते अव्यक्त म्ह. अव्याकृत जगताचे बीज त्रिगुणात्मक परमेश्वराची अपरा शक्ति**(न.त.स.)**

क्षेत्राच्या विकारांचे कथन -

**इच्छा द्वेष: सुखं दु:खं सङ्घातश्चेतना धृति: ।**

**एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥६॥**

**अन्वय:** - इच्छा, द्वेष:, सुखम्, दुखम्, सङ्घात:, चेतना, च, धृति:, सविकारम्, एतत्, क्षेत्रम्, समासेन, उदाहृतम् ।

**अन्वयार्थ:** - **इच्छा** - इच्छा **द्वेष:** - द्वेष **सुखम्** - सुख **दु:खम्** - दु:ख **सङ्घात:** - शरीर आणि इंद्रिये यांचा समूह **चेतना** - चेतना **च** - आणि **धृति:** - धैर्य **सविकारम्** - विकारासह **एतत्** - हे **क्षेत्रम्** - क्षेत्र **समासेन** - संक्षेपाने **उदाहृतम्** - सांगितले आहे.

**विवरण** - सुखाचे हेतु आणि दु:खाचे नाशक असणाऱ्या वस्तुला प्राप्त करण्यासाठी जी कामना असते अशी ती इच्छा त्याचप्रमाणे दु:खाचे हेतु आणि सुखाचे बाधक असणाऱ्या पदार्थाला प्राप्त करण्याकरिता जी द्वेष बुद्धी असते असा तो द्वेष, अनुकूल विषयाची प्राप्ति आणि प्रतिकूल विषयाची निवृत्तिविषयी जी आनंदाची वृत्ति असते असे ते सुख, प्रतिकूल विषयाची प्राप्ति आणि अनुकूल विषयाचा वियोग ज्यावेळी होतो त्या वेळी होणारी जी व्यथित वृत्ति असते असे जे दुख, पंचमहाभूतांच्या द्वारा रचित शरीर आणि इंद्रिये यांचा समुदाय, सुख दु:ख आणि सर्व पदार्थांचा अनुभव करणारी जी ज्ञानशक्ति म्हणजे चेतना, धृति आणि विकारासहित असे जे असणारे क्षेत्र-शरीर जे संक्षेपत: सांगितले आहे.

**व्याकरणम्** - **इच्छा** - इच्छा स्त्री.प्र.ए.व. **द्वेष** - द्वेष पु.प्र.ए.व. **सुखम्** - सुख न.प्र.ए.व. **दु:खम्** - दु:ख न.प्र.ए.व. **सङ्घात:** - सङ्घात पु.प्र.ए.व. **चेतना** - चेतना स्त्री.प्र.ए.व. **धृति:** - धृति स्त्री.प्र.ए.व. **सविकारम्** - सह अ. विकार पु.वि.न.प्र.ए.व. **एतत्** - एतत् सर्व.न.प्र.ए.व. **क्षेत्रम्** - क्षेत्र न.प्र.ए.व. **समासेन** - समास पु.वि.न.तृ.ए.व. **उदाहृतम्** - उद्+आ+हृ प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **सविकारम्** - विकारेण सहितमिति सविकारम् = विकारासहित**(तृ.त.स.)** यद्वा **सविकारम्** - विकारैर्महदादिभि: शब्दादिभिश्च सह वर्तत इति सविकारम् = महदादि आणि शब्दादि विकारांच्या बरोबर जे रहाते ते सविकार**(तृ.त.स.)** **धृति:** - अवसादप्राप्तानि देहेन्द्रियाणि यया ध्रियन्ते सा धृति: = व्याकुळ

झालेले शरीर आणि इंद्रियादि जिच्या द्वारा धारण केले जाते ती धृति**(वि.)** **इच्छा** - भोग्यानीच्छत्यनयेतीच्छा = जिच्याद्वारा भोगांना इच्छिले जाते ती इच्छा**(वि.)** यद्वा **इच्छा** - पूर्वं यज्जातीयं सखहेतुं अर्थं उपलब्धवान् तज्जातीयं उपलभमान: सुखहेतु: इति तं आदातुमिच्छति सा इयं इच्छा-अन्त:करणधर्म: = पूर्वी ज्या जातीच्या सुखाला कारण होणाऱ्या विषयाचा अनुभव आला होता त्याच जातीचा विषय पुन: दिसला असता हा सुखाचा हेतु आहे, यापासून सुख होतो, असे मानून मनुष्य त्याचे ग्रहण करण्याची इच्छा करितो ती ही इच्छा-अंत:करणाचा धर्म आहे**(परिभाषा)**

ज्ञानाच्या साधनामध्ये अमानित्वादि नऊ गुणांचे कथन -

**अमानित्वमदम्भित्वमहिंसा क्षान्तिरार्जवम् ।**

**आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रह: ॥७॥**

**अन्वय:** - अमानित्वम्, अदम्भित्वम् अहिंसा, क्षान्ति:, आर्जवम्, आचार्योपासनम्, शौचम्, स्थैर्यम्, आत्म विनिग्रह: ।

**अन्वयार्थ: - अमानित्वम्** - अभिमानरहित **अदम्भित्वम्** - दंभरहित **अहिंसा** - कोणत्याही जीवांना दु:ख न देणे **क्षान्ति:** - सर्वसहनशीलता **आर्जवम्** - मन आणि वाणीचा सरळपणा **आचार्योपासनम्** - श्रद्धा भक्ति सहित गुरुची सेवा **शौचम्** -अंतर्बाह्यशुद्धि **स्थैर्यम्** - अंत:करणाची स्थिरता **आत्मविनिग्रह:** - मन इंद्रियासहित शरीराचा निग्रह.

**विवरण** - मोठा ज्ञानी, श्रेष्ठ आणि संमानित अशा समजणाऱ्या मानीपणाच्या विपरीत अमानित्व. वास्तविक धर्मात्मा नसतांनाही धर्मात्मा, दानशील, भगवद्भक्त ज्ञानी आणि महात्मा समजून लोकामध्ये प्रचार करणाऱ्या म्हणजे ढोंग दाखविणाऱ्या दांभिकाच्या विपरीत अदंभित्व. शरीराने, वाणीने आणि मनाने कोणत्याही प्राण्याची हिंसा न करणे (अशी जी) अहिंसा. दुसऱ्याने कितीही त्रास दिला तरी मनामध्ये त्याविषयी बदल्याची भावना न ठेवणे (अशी जी) क्षमा म्हणजे अपराध करणाऱ्यावर क्षमा करणे. अंत:करणामध्ये सर्व प्राण्याविषयी सरळपणा असणे आर्जव, विद्या आणि सदुपदेश देणारा गुरू म्हणजे आचार्य त्यांच्या सान्निध्यात (जवळ) राहून श्रद्धा-भक्तिने मन, वाणी आणि शरीराने सर्व प्रकारची सेवा करणे आचार्योपासन, अंतर, आणि बाहेरची शुद्धि शौच, मोठ-मोठी दु:खे जरी अंगावर येवून पडली तरी त्यापासून यत्किचिंतही विचलित न होणे धैर्य; अथवा काम, क्रोध, भय आणि लोभ यांच्या द्वारा आपल्या धर्मापासून च्यूत न होणे धैर्य, शरीर आणि इंद्रियांना चांगल्या प्रकारांनी आपल्या अधीन ठेवणे आत्मविनिग्रह.

**व्याकरणम्** - **अमानित्वम्** - अमानित्व न.प्र.ए.व. **अदम्भित्वम्** - अदम्भित्व न.प्र.ए.व. **अहिंसा** - अ+ हिंसा स्त्री.प्र.ए.व. **क्षान्ति:** - क्षम् प्र.ग.आ.प.+क्तिन्=क्षान्ति स्त्री.प्र.ए.व. **आर्जवम्** - ऋजु+अण्=आर्जव न.प्र.ए.व. **आचार्योपासनम्** - आचार्य पु. उपासन न.प्र.ए.व. **शौचम्** - शौच न.प्र.ए.व. **स्थैर्यम्** - स्थिर्+ष्यञ्=स्थैर्य न.प्र.ए.व. **आत्मविनिग्रह:** - आत्मन् पु.वि+निग्रह पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अमानित्वम्** - मानोऽविवेकद्वारेण अहंभावो यस्यास्तीति मानी मानिनोभावो मानित्वं न मानित्वममानित्वम्-देहाद्यभिमानादिराहित्यम् = मान अविवेकाच्याद्वारा होणारा अहंभाव ज्याचा तो मानी. मानीचा भाव मानित्व नाही मानित्व ते अमानित्व**(नञ् त.स.)** यद्वा **अमानित्वम्** - स्वस्मिन्नुत्कृष्टत्वबुद्धिर्मान:

प्रतिष्ठार्थमात्मन्युत्कर्षारोपणहेतु: सोऽस्यास्तीति मानी तस्य भावो मानित्वं तदभावस्त्वमानित्वम् = आपल्या ठिकाणी चांगली बुद्धी करणे मान-प्रतिष्ठेकरिता आपल्या ठिकाणी उत्कर्षाच्या आरोपणाचा हेतु आहे ज्याचा तो मानी. मानिचा भाव मानित्व त्याचा अभाव अमानित्व**(नञ् त.स.) अदम्भित्वम्** - दम्भो वेषभाषा क्रियाचातुर्यादिभि: स्वमहत्वप्रकटनं देहोद्देश्येन धर्मातिशयप्रदर्शको वा यस्यास्तीति दम्भी दम्भिनो भावो द म्भित्वं न दम्भित्वमदम्भित्वम् = स्वत: महत्व प्रकट करणे, रूप अथवा देहाच्या उद्देशाने धर्मातिशयाला प्रदर्शन करणे रूप दंभ आहे ज्याचा तो दंभिचा भाव दंभित्व नाही दंभित्व तो अदम्भित्व**(नञ् त.स.) अहिंसा** - न हिंसेत्यहिंसा मनोवाक्कायकर्मभि: प्राणिपीडानाचरणम् = जी हिंसा नाही ती अहिंसा म्ह. मन, वाणी आ णि शरीराच्याद्वारा पीडा न देणे ही अहिंसा**(नञ् त.स.) आचार्योपासनम्** - आचार्यस्य-अन्तर्यामिनो गुर-ोरुपासनम्-सेवा आचार्योपासनम्। यद्वा ज्ञानोपदेष्टुराचार्यस्य श्रद्धाभक्तिभ्यां शुश्रुषादि क्रिययाऽऽराधनमुपासनम् = आचार्य म्हणजे अन्तर्यामि गुरुची उपासना म्ह. सेवाच आचार्योपासना. ज्ञानाचा उपदेश करणाऱ्या आचार्याची श्रद्धा-भक्तिने शुश्रूषा आदि क्रियाच्या द्वारा आराधना-उपासना अशी आचार्योपासना**(ष.त.स.) आत्मविनिग्रह:** - आत्मन:-मनसो विनिग्रह:-विविधसङ्कल्पपरित्यागेन अत्यन्तग्रहणमात्मविनिग्रह:-मनो निरोध: = आत्म्याचा विनिग्रह म्हणजे अनेक प्रकारच्या संकल्पाने रहित असणे हाच मनाचा निग्रह **(ष.त.स.)** यद्वा **आत्मविनिग्रह:** - आत्मनोऽन्त:करणस्य विषयभोगवासनाग्रस्तस्य विषयध्यानश्रवणदर्शनादौ सुतरां प्रवृत्तिनिरोध आत्मविनिग्रह: = आत्म्याचा म्ह. विषयभोगाने ग्रस्त असणाऱ्या अंत:करणाचा विषयांचे ध्यान, श्रवण, दर्शन आदिच्या ठिकाणी प्रवृत्तिचा आत्यंतिक निरोध म्हणजे आत्मविनिग्रह**(ष.त.स.)** यद्वा **आत्मविनिग्रह:** - आत्मनो देहेइन्द्रियसङ्घातस्य स्वाभावप्राप्तां मोक्षप्रतिकूले प्रवृत्तिं निरुध्य मोक्षसाधन एव व्यवस्थापनमात्मविनिग्रह: = आत्म्याची-देह आणि इंद्रियांच्या सङ्घाताचा स्वाभावाने प्राप्त मोक्षाच्या प्र तिकूल विषयांमध्ये प्रवृत्तिचा निरोध करून त्याचा मोक्षाच्या साधनामध्येच स्थिर करणे असा आत्मविनिग्रह **(ष.त.स.)** यद्वा **आत्मविनिग्रह:** - आत्मन:-अपकारकस्य आत्मशब्दवाच्यस्य-कार्यकरणसङ्घातस्य वि निग्रह:-स्वाभावेन सर्वत: प्रवृत्तस्य सन्मार्ग एव निरोध आत्मविनिग्रह: = आत्म्याचा-जीवाला अपकार करणारा व आत्मा या शब्दाने बोलला जाणारा जो शरीरेंद्रियसमूह त्याचा विनिग्रह-स्वभावत:च सर्व कर्मामध्ये प्रवृत्त झालेल्या त्याचा सन्मार्गातच निरोध करणे हा आत्मविनिग्रह**(ष.त.स.) स्थैर्यम्** - स्थिरस्य भाव: स्थैर्यं निगृहितस्य मनसो नैश्चल्येन मोक्षेच्छया श्रवणादावेव स्थापनं स्थैर्यम् = स्थिरतेचा भावच स्थैर्य निगृहीत मनाला निश्चलतेने मोक्षाच्या इच्छेद्वारा श्रवण दर्शन आदिच्या ठिकाणीच स्थापन करणे स्थैर्य **(भावार्थक तद्धि.वि.) आर्जवम्** - ऋजोर्भाव इत्यार्जवम् = ऋजुचा भावच आर्जव म्ह. सरलता आहे **(भावार्थक तद्धि.वि.) शौचम्** - शुचेर्भाव: शौचं द्विविधम्-बाह्यमाभ्यन्तरञ्च, बाह्यम्-मृज्जलाभ्यामस्पृश्याभक्ष्याग्राह्यत्यागेन चाऽभ्यन्तरम्, रागद्वेषलोभमोहगर्वकाठिन्यादिमलानां तत्प्रतिकूल गुणा-वष्टम्भेन क्षालनमन्त:शौचम् = शुचिचा भावच शौच म्ह. शुद्धता दोन प्रकारची आहे अंतर आणि बाह्य बाहेरची शुद्धता माती जलाने आणि तसेच अस्पृश्य, अभक्ष्य आणि अग्राह्याच्या त्यागाने होते. अंतर शुद्धता राग, द्वेष, लोभ, मोह, गर्व आणि काठिन्यादि मलांचा त्यांच्या प्रतिकूल गुणांच्या अवलंबनाने क्षालन होते ते अंतर्शौच**(भावार्थक तद्धि.वि.)**

ज्ञानाच्या साधनामध्ये अहंकाराच्या अभावाचे आणि वैराग्याचे कथन -

**इन्द्रियार्थेषु वैराग्यमनहङ्कार एव च।**

**जन्ममृत्युजराव्याधिदु:खदोषानुदर्शनम् ॥८॥**

**अन्वय:** - इन्द्रियार्थेषु, वैराग्यम्, च, अनहङ्कार:, एव, जन्ममृत्युजराव्याधिदु:खदोषा, अनुदर्शनम् ।

**अन्वयार्थ:** - **इन्द्रियार्थेषु** - लौकिक आणि पारलौकिक भोगाच्याठिकाणी **वैराग्यम्** - वैराग्य **च** - आणि **अनहङ्कार, एव** - कोणत्याच वस्तुविषयी अहंबुद्धी नसणे (म्ह. अहंकाररहित) **जन्ममृत्युजराव्याधिदु:खदोषानुदर्शनम्** - जन्म, मृत्यु म्ह. मरण, जरा म्हणजे म्हातारपण, रोग यांच्या ठिकाणी असणाऱ्या दु:ख आणि दोषाचा विचार करणे.

**विवरण** - लौकिक जेवढे काही भोग त्याचप्रमाणे अलौकिक स्वर्गादि जेवढे काही भोग आहेत ते सर्व नाशवंत तसेच दु:खाला कारणीभूत आहेत असे समजून त्याविषयी वैराग्य आणि कोणत्याही पदार्थाविषयी अहंबुद्धी न ठेवणे अशा प्रकारच्या अनहंकार, जन्म, मृत्यु, जरा आणि रोग यांच्यामध्ये दु:ख आणि दोषाचे पुन: पुन: चिंतन करणे.

**व्याकरणम्** - **इन्द्रियार्थेषु** - इन्द्रिय न.अर्थ.पु.स.ब.व. **वैराग्यम्** - वैराग्य न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **अनहङ्कार:** - अन्+अहङ्कार पु.प्र.ए.व. **एव** - एव निश्चयार्थक अ. **जन्ममृत्युजराव्याधिदु:खदोषानुदर्शनम्** - जन्मन् न. मृत्यु पु. जरा स्त्री. व्याधि पु. दु:ख.न. दोष.पु. अनुदर्शन न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **इन्द्रियार्थेषु** - इन्द्रियाणामर्था:-शब्दादिविषया इन्द्रियार्थास्तेषु इन्द्रियार्थेषु = इंद्रियाच्या अर्थामध्ये**(ष.त.स.)** **अनहङ्कार:** - अहङ्कार:-कर्ता भोक्ता विकारित्वं न भवतीति अनहङ्कार: = जो कर्ता, भोक्ता, विकाररूप अहंकार नाही असा अनहंकार**(न.त.स.)** **जन्ममृत्युजराव्याधिदु:खदोषानुदर्शनम्** - जन्म च मृत्युश्च जरा च व्याधयश्च जन्ममृत्युजराव्याधयस्तै: दु:खानीति जन्ममृत्युजराव्याधिदु:खानि तान्येव दोषो जन्ममृत्युजराव्याधिदु:खदोषस्तस्याऽनुदर्शनम्-स्मरणमिति जन्ममृत्युजराव्याधिदु:खदोषानुदर्शनम् = जन्म, मृत्यु, जरा, व्याधि, यांच्याद्वारा होणारे दु:ख ते दु:खच दोष आहे त्या दोषाचा विचार करणे असे जन्ममृत्युजराव्याधिदु:खदोषानुदर्शन**(ष.त.स.)** **वैराग्यम्** - विरागस्य भावो वैराग्यम् = विरागाचा भाव वैराग्य **(भावार्थे.तद्धि.वि.)**

ज्ञानाच्या साधनामध्ये आसक्तिचा अभाव आणि चित्ताच्या समतेचे कथन -

**असक्तिरनभिष्वङ्ग: पुत्रदारगृहादिषु ।**

**नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥९॥**

**अन्वय:** - पुत्रदारगृहादिषु, असक्ति:, अनभिष्वङ्ग:, च, इष्टानिष्टोपपत्तिषु, नित्यम्, समचित्तत्वम् ।

**अन्वयार्थ:** - **पुत्रदारगृहादिषु** - पुत्र, स्त्री, गृह इत्यादिकांच्या ठिकाणी **असक्ति:** - अनासक्ति असणे तसेच **अनभिष्वङ्ग:** - लंपटपणा नसणे **च** - आणि **इष्टानिष्टोपपत्तिषु** - इष्ट आणि अनिष्टाचा प्रसंग आला असता सुद्धा **नित्यम्** - सर्वदा-केव्हाही चित्ताचे **समचित्तत्वम्** - समत्व विचलित होऊ न देणे.

**विवरण** - स्त्री, पुत्र, घर, शरीर आणि धन याविषयी मनुष्याचा-साधकाचा वास्तविक विशेष संबंध असतो अशा असणाऱ्या विशेष आसक्तिचा सर्वथा त्याग करणे. स्त्री पुत्रादिकांच्या ठिकाणी ममत्व ठेवून त्या दु:खाने दु:खित होणाऱ्या ममतेला दूर करणे. त्याचप्रमाणे प्रिय आणि अप्रिय वस्तुमध्ये सदा सर्वदा समता

ठेवणे म्ह. त्यांच्याविषयी सम राहाणे.

**व्याकरणम्** - **पुत्रदारगृहादिषु** - पुत्र पु. दार पु. गृह न. आदि पु.स.ब.व. **असक्ति:** - (षञ्ज्) अ+सञ्ज् प्र.ग.प.प.+क्तिन्=सक्ति वि.स्त्री.प्र.ए.व. **अनभिष्वङ्ग:** - अनभिष्वङ्ग पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **इष्टा निष्टोपपत्तिषु** - इष्ट+अन्+इष्ट-अनिष्ट इष् ष.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. उप+क्तिन्=उपपत्ति स्त्री.स.ब.व. **नित्यम्** - नित्य वि.न.प्र.ए.व. **समचित्तत्वम्** - सम वि. चित् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. त्व प्रत्ययान्त न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **पुत्रदारगृहादिषु** - पुत्राश्च दारा च-स्त्री च गृहश्चाऽऽदयो येषां ते पुत्रदारगृहादयस्तेषु पुत्रद-ारगृहादिषु = पुत्र, स्त्री, गृह, आदिमध्ये**(द्वं.ग.ब.स.)** **असक्ति:** - न सक्ति:-सङ्ग:, असक्ति:-प्रीतित्याग: = नाही सक्ति-सङ्ग, असक्ति-प्रीतित्याग**(न.त.स.)** **अनभिष्वङ्ग:** - अभिष्वङ्गो नाम तेषां पुत्रादिनां सुखे जाते स ति, अहमेव सुखीत्यध्यासो न भवति यस्मिन् सोऽनभिष्वङ्ग: = पुत्रादि सुखी असले तर मीच सुखी आहे अशा प्रकारचा अध्यास ज्याच्या ठिकाणी नाही तो अनभिष्वङ्ग**(ब.स.)** यद्वा **अनभिष्वङ्ग:** - नाऽभिष्वङ्गोऽन भिष्वङ्ग: समीचीनत्वबुद्ध्या ममतया चाऽजस्त्रमिष्टं विषयमालिङ्ग्य चित्तस्याऽवस्थानमभिष्वङ्गस्तदभावोऽन भिष्वङ्ग: = जो अभिष्वङ्ग नाही तो अनभिष्वङ्ग म्हणजे चित्ताचा समीचीनत्व बुद्धिने आणि ममतेने निरंतर इष्ट विषयाचे आलिङ्गन करून स्थित राहाणे अभिष्वङ्ग त्याचे न होणे अनभिष्वङ्ग**(न.त.स.)** **इष्टानिष्टोपपत्तिषु** - इष्टम्-अनुकूलश्च न इष्टमित्यनिष्टम्-प्रतिकुलश्चेति इष्टानिष्टे इष्टानिष्टयोरुपपत्तय:-प्राप्तय इष्टानिष्टोपपत्तयस्तासु इष्टानिष्टोपपत्तिषु = इष्ट आणि अनिष्ट असे इष्टानिष्ट त्या इष्टानिष्टाच्या प्राप्तिमध्ये**(द्वं.ग.न.त.स./ग.ष.त.स.)** यद्वा **इष्टानिष्टोपपत्तिषु** - इष्टम्-सुखं तत्तत्साधनश्च, अनिष्टम्-दुखं तत्तत्साधनश्च तेषामुपपत्तिषु-संप्राप्तिषु नित्यम् -सर्वदा समचित्तत्वं समं हर्षविषादमुखविकासवैवर्ण्यादिबाह्याभ्यन्तरविकारनिर्मुक्तं चित्तं यस्य स सम चित्तत्वस्तस्य भाव: समचित्तत्वं = इष्ट-सुख त्याचे साधन. अनिष्ट-दुख आणि त्याचे साधन त्याच्या उप प त्तिमध्ये-प्राप्तिमध्ये नित्य-सर्वदा समचित्त. सम-हर्ष,विषाद, मुखविकास, वैवर्ण्यादि, बाहेर आणि आतल्या विकाराने रहीत चित्त ज्याचे तो समचित्त त्याचा भाव समचित्तत्व**(ब.स.)** **समचित्तत्वम्** - समम्-तुल्यं चित्तम् -अन्तकरणं यस्य स समचित्त: समचित्तस्य भाव: समचित्तत्वम् = समान चित्त-अंत:करण ज्याचे तो त्याचा भाव समचित्तत्व**(ब.स.ग.भावार्थे त्वल् प्रत्ययान्त वि.)**

ज्ञानाच्या साधनामध्ये अव्यभिचारिणी भक्ति आणि एकांत देशाच्या सेवनाचे कथन -

**मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ।**

**विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥१०॥**

**अन्वय:** - च, मयि, अनन्ययोगेन, अव्यभिचारिणी, भक्ति:, विविक्तदेशसेवित्वम्, जनसंसदि, अरति: ।

**अन्वयार्थ:** - **च** - आणि **मयि** - मी जो वासुदेव भगवान त्या माझ्या ठिकाणी **अनन्ययोगेन** - अनन्ययोगाने **अव्यभिचारिणी भक्ति:** - अव्यभिचारिणी भक्ति **विविक्तदेशसेवित्वम्** - एकांत आणि पवित्र स्थानामध्ये निवास करण्याचा स्वभाव असणे **जनसंसदि अरति:** - प्राकृत विषयासक्त लोकांच्या समुदायामध्ये राहण्याची इच्छा न ठेवणे.

**विवरण** - मलाच सर्वाधार, सर्वश्रेष्ठ, माता, पिता आणि आत्मीय मानून माझ्याशी अनन्य होणे अशा

प्रकारची अव्यभिचारिणी भक्ति आणि ज्याठिकाणी कोणत्याही प्रकारे भजन, तप, ध्यानामध्ये यत्किञ्चित व्यवधान नसले पाहिजे अशा प्रकारच्या एकांतामध्ये आणि ज्या ठिकाणी सुंदर दृश्य, जल, वायु, निर्मल आ णि पवित्रता आहे अशा ठिकाणी राहाण्याचा स्वभाव ठेवणे. ज्या ठिकाणी विषयासक्त सांसारिक मनुष्याचा समुदाय आहे त्याठिकाणी यत्किञ्चित सुद्धा राहण्याची इच्छा न ठेवणे. कारण, सांसारिक मनुष्याचा संग साधनामध्ये बाधक होत असतो म्हणून त्या ठिकाणी राहण्याची आवड उत्पन्न न करणे.

**व्याकरणम्** - **च** - च उभ.अ. **मयि** - अस्मत् सर्व.स.ए.व. **अनन्ययोगेन** - अनन्य वि. योग पु.तृ.ए.व. **अव्यभिचारिणी** - अव्यभिचारिणी वि.स्त्री.प्र.ए.व. **भक्तिः** - भक्ति स्त्री.प्र.ए.व. **विविक्तदेशसेवित्वम्** - वि+विच् स.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि. देश पु. सेवित्व न.प्र.ए.व. **जनसंसदि** - जन पु. सम्+सद् स्त्री.स.ए.व. **अरतिः** - अ+रम् प्र.ग.आ.प.+क्तिन्=रति स्त्री.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **अनन्ययोगेन** - न विद्यते भगवतो वासुदेवादन्यः सोऽनन्योऽनन्यश्चासौ योगश्च अनन्ययोगस्तेन अनन्ययोगेन-सर्वात्मभावेन = नाही भगवान् वासुदेवाहून अन्य तो अनन्य, अनन्यरूप योग अनन्ययोग, त्या अनन्ययोगाने-सर्वात्मभावाने**(न.त.ग.कर्म.स.)** **अव्यभिचारिणी** - व्यभिचारिणी न भवति साऽव्यभिचारिणी = जी व्यभिचारिणी नाही ती अव्यभिचारिणी**(न.त.स.)** **विविक्तदेशसेवित्वम्** - विविक्तश्च-एकान्तश्चासौ देशश्च विविक्तदेशो विविक्तदेशं सेवितुं शीलं यस्य स विविक्तदेशसेवी विविक्तदेशसेविनो भावो विविक्तदेशसेवित्वम् = एकांत देश सेवन करण्याचे शील आहे ज्याचे तो**(कर्म.ग.ब.स.ग.भावार्थे त्वल् प्र त्ययान्त वि.)** यद्वा **विविक्तदेशसेवित्वम्** - विविक्तः-स्वभावतः संस्कारेण वाऽशुच्यादिभिश्च सर्पव्याघ्रादिभी र हितोऽरण्यनदीपुलिनदेवगृहादिभिर्विविक्तदेशस्तं सेवितुं शीलमस्येति विविक्तदेशसेवी तद्भावो विविक्तदेशसे वित्वम् = जो देश स्वभावाने पवित्र आदि संस्काराच्या द्वारा शुद्ध केला गेला तसेच सर्प, व्याघ्र आदि प्राण्यांच्या द्वारा रहित अशा वन, नदीतीर अथवा देवालय आदि देश असा विविक्तदेश, विविक्त देश सेवन करण्याचा स्वभाव ज्याचा आहे तो विविक्तदेशसेवी त्याचा भाव विविक्तदेशसेवित्व**(शिलार्थे ब.स.)** यद्वा **वि विक्तदेशसेवित्वम्** - विविक्तान्-जन सम्मर्दरहितान् नदीपुलिनगिरिकुहरारामारण्याद्येकान्तप्रदेशान् निदिध्यास सिद्ध्यर्थं सेवितुं शीलमस्याऽस्तीति विविक्तदेशसेवी तस्य भावो विविक्तदेशसेवित्वम् = विविक्त जनसंपर्कर हित, नदीतीर, गिरिकुहर, आराम, अरण्य आदि प्रदेशामध्ये निदिध्यासनसिद्धिकरिता सेवन करण्याचे ज्याचे शील आहे त्याचा भाव विविक्तदेशसेवित्व**(ब.स.)** **जनसंसदि** - जनानाम्-प्राकृतजनानां संसद्-सभा जनसंसत्तस्यां जनसंसदि-प्राकृतजनसभायाम् = प्राकृत म्हणजे संसारी लोकांच्या समुदायामध्ये**(ष.त.स.)**

ज्ञानाच्या साधनामध्ये नित्यत्वाचे कथन आणि ज्ञानाच्या साधनाहून विपरीत गुणाला अज्ञान दाख विणे -

**अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् ।**

**एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥११॥**

**अन्वयः** - अध्यात्मज्ञाननित्यत्वम्, तत्त्वज्ञानार्थदर्शनम्, एतत्, ज्ञानम्, इति, प्रोक्तम्, यत्, अतः, अन्यथा, अज्ञानम् ।

**अन्वयार्थः** - **अध्यात्मज्ञाननित्यत्वम्** - अध्यात्म ज्ञानामध्येच निरंतर स्थित राहणे आणि **तत्त्वज्ञानार्थदर्शनम्** -

तत्त्वज्ञानाचा अर्थ जे परब्रह्म त्याचे दर्शन करणे **एतत्, ज्ञानम्** - हे सर्व ज्ञानच आहे **इति प्रोक्तम्** - असे कथन केले आहे आणि **यत्** - जे **अत:** - या (ज्ञानाहून) **अन्यथा** - अतिरिक्त ते सर्व **अज्ञानम्** - अज्ञानच आहे.

**विवरण** - विनाशी, जड, विकारी, परिवर्तनशील असणाऱ्या अनात्मवस्तुशी नित्य, चेतन, निर्विकार आणि अविनाशी आत्म्याचा यत्किंचित मात्र सुद्धा संबंध राहात नाही अशा प्रकारे आत्म्याला तो शास्त्र आणि आचार्यांच्या उपदेशाने जाणतो. तेच अध्यात्मज्ञान आहे आणि तत्त्वज्ञानाचा जो अर्थरूप मोक्ष अथवा परमात्म्याचे दर्शन करणे हे सर्व ज्ञानच आहे असे प्रतिपादन केले आहे. याच्या विपरीत सर्व अहंता, ममता, मान, दंभ, हिंसा, काम, क्रोध, द्वेष, कुटिलता, अपवित्रता, अस्थिरता, लोलुपता, अश्रद्धा इत्यादि जे कुसंग आदि दोष आहेत ते सर्व जन्म-मरणाला कारणीभूत असल्यामुळे हे सर्व अज्ञानच आहे.

**व्याकरणम् - अध्यात्मज्ञाननित्यत्वम्** - अध्यात्म वि. ज्ञान न. नित्यत्व त्वल् तद्धित प्रत्ययान्त न.प्र.ए.व. **तत्त्वज्ञानार्थदर्शनम्** - तत्त्व न. ज्ञान न. अर्थ पु. दर्शन न.प्र.ए.व. **एतत्** - एतत् सर्व.न.प्र.ए.व. **ज्ञानम्** - ज्ञान न.प्र.ए.व. **यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **प्रोक्तम्** - प्र+वच् द्वि.ग.प.प.कर्म.भूत.धा. वि.न.प्र.ए.व. **अज्ञानम्** - अ+ज्ञान=अज्ञान न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - अध्यात्मज्ञाननित्यत्वम्** - आत्मानं अधिकृत्य वर्तत इति अध्यात्मम्, अध्यात्मञ्च तज्ज्ञानमध्यात्मज्ञानम् नित्यस्य भावो नित्यत्वम्, अध्यात्मज्ञाने नित्यत्वमित्यध्यात्मज्ञाननित्यत्वम् = अध्यात्मज्ञानामध्येच स्थित रहाणे **(अव्ययीभाव ग.कर्म.ग.स.त.स.) तत्त्वज्ञानार्थदर्शनम्** - तत्त्वानां ज्ञानं तत्त्वज्ञानं तत्त्वज्ञानस्य अर्थ:-प्रयोजनं (फलरूपमोक्षो वा) वाच्यार्थपरित्यागेन अखण्डैकरसत्वेन ब्रत्मात्मनाऽवस्थानमिति तत्त्वज्ञानार्थं तत्त्वज्ञानार्थस्य दर्शनम्-अनुभवापादानमिति तत्त्वज्ञानार्थदर्शनम् = तत्त्वज्ञानाचा जो अर्थ म्ह. फलरूपमोक्ष म्ह. परमात्म्याचे दर्शन करणे**(ष.त.ग.ष.त.स.)**

परब्रह्माच्या निर्गुण स्वरूपाचे वर्णन -

**ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वामृतमश्नुते ।**

**अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥१२॥**

**अन्वय:** - यत्, ज्ञेयम्, यत्, ज्ञात्वा, अमृतम्, अश्नुते, तत्, प्रवक्ष्यामि, अनादिमत्, परम्, ब्रह्म, तत्, सत्, न, च, असत्, न, उच्यते ।

**अन्वयार्थ: - यत्, ज्ञेयम्** - जे जाणणे योग्य ज्ञेय आहे **यत्, ज्ञात्वा** - ज्या ज्ञेयाला जाणून पुरुष **अमृतम्, अश्नुते** - अमृताला प्राप्त होतो **तत् प्रवक्ष्यामि** - ते ज्ञेय मी सांगतो **अनादिमत्** - ते आदि रहित **परम् ब्रह्म** - परब्रह्म ज्ञेय आहे **तत्** - ते **सत्, न** - सत् नाही **च** - आणि **असत्, न** - असत् नाही **उच्यते** - असे म्हटले जाते.

**विवरण** - परब्रह्म परमात्मा जे ज्ञेय आहे ते जाणणे योग्य आहे त्याला जाणून साधक सदा-सर्वदा जन्ममरणरूपी बंधनापासून मुक्त होवून अमृतरूपी मोक्षाला प्राप्त होतो. असे जे ज्ञेय आहे त्याचे चांगल्याप्रकारे मी कथन करीत आहे. ते अनादिमत् म्ह. आदिरहित परब्रह्म आहे. ते सत् नाही कारण प्रमाणाच्या द्वारा ज्या वस्तुची सिद्धि केली जाते तिला सत् म्हणतात. स्वत: प्रमाण नित्य अविनाशी परमात्मा कोणत्याही प्रमाणाच्या द्वारा सिद्ध केला जात नाही. कारण, परमात्म्यापासून सर्वांची सिद्धि होते.

परमात्म्यापर्यंत कोणतेच प्रमाण पोहचू शकत नाही म्हणून परमात्मा सत् नाही. त्याचप्रमाणे परमात्मा असत् नाही. कारण, ज्या वस्तुचे वास्तविक अस्तित्त्व राहात नाही त्या वस्तुला असत् म्हणतात. परंतु परब्रह्म परमात्म्याचे अस्तित्त्वच नाही असे म्हणता येत नाही. कारण, वेदशास्त्र आणि पुराण याच्या अस्तित्त्वाचे चांगल्या प्रकारे वर्णन करतात म्हणून परब्रह्म परमात्मा असत् नाही असे म्हटले जाते.

**व्याकरणम् - यत् -** यत् सर्व.न.प्र.ए.व. **ज्ञेयम् -** ज्ञा न.ग.उ.प.कर्म.ण्यत् वि.न.प्र.ए.व. **यत् -** यत् सर्व.न. द्वि.ए.व. **ज्ञात्वा -** ज्ञा न.ग.उ.प.त्वान्त अ. **अमृतम् -** अमृत न.द्वि.ए.व. **अश्नुते -** अश् पं.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व. **तत् -** तत् सर्व.न.द्वि.ए.व. **प्रवक्ष्यामि -** प्र+वच् द्वि.ग.प.प.द्वि.भवि.प्र.पु.ए.व. **अनादिमत् -** अनादि+मतुप्=अनादिमत् वि.न.प्र.ए.व. **परम् -** पर वि.न.प्र.ए.व. **ब्रह्म -** बृह् प्र.ग.प.प.+म निन्=ब्रह्मन् न.प्र.ए.व. **न -** न क्रि.वि.अ. **सत् -** अस्+शतृ अकारलोप:=सत्  द्वि.ग.प.प.कर्त.वर्त.धा. वि.न.प्र.ए.व. **न -** न क्रि.वि.अ. **असत् -** अ+सत् अस्+शतृ द्वि.ग.प.प.कर्त.वर्त.धा.वि.न.प्र.ए.व. **उच्यते -** वच् द्वि.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - अनादिमत् -** आदिरस्यास्त्यादिमद् नाऽऽदिमदित्यनादिमत् = आदि आहे ज्याचे ते आ दिमत् जे आदिमत् नाही ते अनादिमत्**(अस्त्यर्थे तद्धि.ग.न.त.स.) अनादिमत् -** आदि: कारणं जन्म वा यस्याऽस्ति तदादिमत्कार्यं महदादिस्थूलान्तं स्वयं ततो विलक्षणत्वाद् ब्रह्मानादिमत् सर्वस्माद्विकारजातादन्यत् = आदि म्ह. कारण जन्म ज्याचा आहे तो आदिमत म्ह. महतापासून स्थूलापर्यंत वस्तू स्वयं त्याच्यापासून विलक्षण असल्यामुळे ब्रह्म अनादिमत म्ह. संपूर्ण विकारांपासून भिन्न आहे**(न.त.स.) ज्ञेयम् -** ज्ञातुं योग्यमि ति ज्ञेयम् = जाणण्याकरिता योग्य ते ज्ञेय**(वि.)**

परमात्म्याच्या स्वरूपाचे कथन -

**सर्वत:पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ।**

**सर्वत: श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥१३॥**

**अन्वय: -** तत्, सर्वत:, पाणिपादम्, सर्वत:, अक्षिशिरोमुखम्, सर्वत:, श्रुतिमत्, लोके, सर्वम्, आवृत्य, तिष्ठति ।

**अन्वयार्थ: - तत् -** ते ज्ञेय परब्रह्म **सर्वत:पाणिपादम् -** सर्वबाजूंनी हात आणि पाय असणारे असे आहे **सर्वत:, अक्षिशिरोमुखम् -** सर्व बाजूंनी डोळे मस्तके आणि मुख यांनी युक्त आहे **सर्वत: श्रुतिमत् -** त्याप्रमाणे ज्याला सर्व बाजूंनी कान आहेत असे ते **लोके -** लोकामध्ये **सर्वम् -** सर्व प्राणिमात्रांना **आवृत्य -** व्यापून **तिष्ठति -** स्थित आहे.

**विवरण -** उपर्युक्त कथित परब्रह्म ज्ञेय तत्त्वाला सर्व बाजूंनी हात आहेत. कारण, त्याला कोणतीही वस्तू कोठूनही समर्पण केली तरी ते तेथूनच त्या वस्तुचे ग्रहण करते त्याला सर्व बाजूंनी पाय, नेत्र, मस्तक आणि मुख आहेत. त्याप्रमाणे त्याला सर्व बाजूंनी कान आहेत कारण ते सर्व वस्तूंना व्याप्त करून स्थित आहे.

**व्याकरणम् - तत् -** तत् सर्व.न.प्र.ए.व. **सर्वत:पाणिपादम् -** सर्वतस् तसिल् प्रत्ययान्त सप्तम्यन्त तद्धि.अ. पा णि पु. पाद पु.वि.न.प्र.ए.व. **सर्वत: -** सर्वतस् तसिल् प्रत्ययान्त सप्तम्यन्त तध्दि.अ. **अक्षिशिरोमुखम् -** अ क्षि न. शिरस् न. मुख न.प्र.ए.व. **सर्वत: -** सर्वतस् तसिल् प्रत्ययान्त सप्तम्यन्त तद्धि.अ. **श्रुतिमत् -** श्रु

ति+मतुप्=श्रुतिमत् न.प्र.ए.व. **लोके -** लोक पु.स.ए.व. **आवृत्य -** आ+वृ पं.ग.उ.प.ल्यबन्त अ. **तिष्ठति -** स्था प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - सर्वत:पाणिपादम् -** सर्वत: पाणय: पादाश्च सर्वप्राणिसम्बन्धिनो यस्य चेतनस्य तत् सर्वत: पाणिपादम् = सर्वत्र संपूर्ण प्राणिमात्रांचे हात व पाय, ज्याचे हात व पाय आहेत ते सर्वत:पाणिपाद**(ब.स.)** यद्वा **सर्वत:पाणिपादम् -** सर्वत: सर्वेषु देहेषु पाणय: पादाश्चाचेतना: स्वस्वव्यापारेषु प्रवर्तनीया यस्य चेतनस्य क्षेत्रज्ञस्य तत्सर्वत:पाणिपादम् ज्ञेयं ब्रह्म = सर्वत:-सर्वदेहामध्ये अचेतन हात आणि पायाला जो चेतन क्षेत्रज्ञ आपआपल्या व्यापारामध्ये प्रवृत्त करतो ते सर्वत:पाणिपाद ज्ञेयब्रह्म आहे**(ब.स.) सर्वत: अक्षिशिरोमुखम् -** सर्वतोऽक्षीणि शिरांसि-मस्तकानि, मुखानि-आननानि यस्य तत् सर्वतोऽक्षिशिरोमुखम् = सर्व ठिकाणी नेत्र, शिर, मुख आहेत ज्याचे ते ज्ञेयब्रह्म**(ब.स.) सर्वत: श्रुतिमत् -** सर्वत: श्रुतय:-श्रवणेंद्रियाणि यस्य प्रवर्तनीयत्वेन सन्ति तत् सर्वत: श्रुतिमत् = सर्व ठिकाणी श्रवणेंद्रियांना जे प्रवृत्त करते ते ज्ञेयब्रह्म**(ब.स.) लोके -** लोक्यत इति लोक:-प्राणिवर्गस्तस्मिन् लोके = जो पाहिला जातो तो लोक म्ह. प्राणिवर्ग त्याच्यामध्ये**(त.वि.)**

परमेश्वराच्या सगुण आणि निर्गुण स्वरूपाचे कथन -

**सर्वेन्द्रियगुणाभासं सर्वेन्द्रियविवर्जितम् ।**

**असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥१४॥**

**अन्वय: -** सर्वेन्द्रियगुणाभासम्, सर्वेन्द्रियविवर्जितम्, च, एव, असक्तम्, सर्वभृत्, च, निर्गुणम्, गुणभोक्तृ ।

**अन्वयार्थ: - सर्वेन्द्रियगुणाभासम् -** ते सर्व इंद्रियांच्या गुणांचे म्हणजे विषयाचे प्रकाशक आहे-अवभासक आहे परंतु वास्तविक पाहिले तर **सर्वेन्द्रियविवर्जितम्**- ते सर्व इंद्रियांनी रहित आहे **च -** आणि **असक्तम्, एव -** ते कोणत्या ठिकाणी आसक्तही नाही परंतु **सर्वभृत् -** सर्वांचे धारण पोषण करणारे आहे **च -** आणि **निर्गुणम् -** ते गुणरहित आहे परंतु **गुणभोक्तृ -** गुणांचा भोग करणारेही आहे.

**विवरण -** जे संपूर्ण इंद्रियांच्या गुणाला म्ह. विषयाला जाणणारे आहे. परंतु, इंद्रियरहित आहे आणि कोणत्याच ठिकाणी आसक्त नाही म्हणजे ते आसक्ति रहित होवून सर्वांचे धारण पोषण करणारे आहे आणि जे निर्गुण असूनही प्रकृतिच्या संबंधाने संपूर्ण सत्त्वादि गुणांचा भोग करणारे आहे.

**व्याकरणम् - सर्वेन्द्रियगुणाभासम् -** सर्व वि. इन्द्रिय न. गुण वि. आभास पु.वि.न.प्र.ए.व. **सर्वेन्द्रियविव र्जितम् -** सर्व वि. इन्द्रिय न. वि+वृज् द्वि.ग.आ.प.कर्म.भूत.धा.वि.प्र.ए.व. **च -** च उभ.अ. **असक्तम् -** अ+सञ्ज् प्र.ग.प.प.कर्म.भूत.धा.वि.न.प्र.ए.व. **एव -** एव निश्चयार्थक अ. **सर्वभृत् -** सर्व वि. भृत् वि.न.प्र.ए.व. **च -** च उभ.अ. **गुणभोक्तृ -** गुण वि. भोक्तृ वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - सर्वेन्द्रियगुणाभासम् -** सर्वाणि च तानीन्द्रियाणि सर्वेन्द्रियाणि सर्वेन्द्रियाणां गुणा:-शब्दादय: सर्वेन्द्रियगुणा: सर्वेन्द्रियगुणानामाभास:-प्रकाशको यस्य तत् यद्वा गुणान् भासयति तत् सर्वे न्द्रियगुणाभासम् = सर्वेंद्रियांच्या विषयांचे आभास आहे ज्यांचे ते अथवा सर्वेंद्रियांच्या गुणांना प्रकाशन करणारे ते**(कर्म.ग.ष.त.ग.ब.स.)** यद्वा **सर्वेन्द्रियगुणाभासम् -** स्वस्वविषयान् शब्दादीन् इन्दयन्ति बोधयन्तीतीन्द्रियाणि सर्वाणि च तानि श्रोत्रादीनि वागादीनि च सर्वेन्द्रियाणि सर्वेन्द्रियाणां गुणा:

स्पष्टत्वास्पष्टत्वाद्दुष्टत्वादुष्टत्वादय: श्रवणस्पर्शनवचनादानसंकल्पाध्यवसादयोऽवाभास्यन्ते येन तत्सर्वे न्द्रियगुणाभासम् = जे आपापल्या शब्दादि विषयाला इंदन करते किंवा बोधन करते ती इंद्रिये म्ह. श्रोत्रादि आणि वागादि रूप इंद्रियांचे म्ह. स्पष्टत्व, अस्पष्टत्व, दुष्टत्व, अदुष्टत्व आदि तसेच श्रवण, स्पर्शन, वचन, आदान, संकल्प, अध्यवसायादि गुणांचा ज्याच्याद्वारा अवभास केला जातो ते सर्वेंद्रियगुणाभास**(कर्म.ग र्भि.ष.त.ग.ब.स.) सर्वेन्द्रियविवर्जितम्** - सर्वाणि च तानि इन्द्रियाणि सर्वेन्द्रियाणि सर्वेन्द्रियैर्विवर्जितम्-रहितं सर्वेन्द्रियविवर्जितम् = सर्वेंद्रियांनी रहित**(कर्म.ग.तृ.त.स.) असक्तम् -** सक्तं न भवति तदसक्तम्-संगशून्यम् = जे सक्त नाही होत ते असक्त म्ह. आसक्ति रहित**(न.त.स.) सर्वभृत् -** सर्वं भूतभौतिकं बिभर्ति तत् सर्वभृत् = सर्वांचे भरण पोषण करणारे**(उप.स.)** यद्वा **सर्वभृत् -** बिभर्तीति भृत् सर्वस्य भृत् सर्वभृत् = सर्वांचे भरण पोषण करणारे**(वि.) गुणभोक्तृ-** गुणानाम्-सत्त्वादीनां भोक्तृ गुणभोक्तृ = सर्व गुणांचा भोग करणारे**(ष.त.स.) निर्गुणम् -** निर्गता:-वर्जिता: सत्त्वरजस्तमांसि गुणा: यस्मात्तत् निर्गुणम् = निघून गेले अथवा वर्जित झाले आहे सत्त्वरजतम गुण ज्याच्या पासून ते निर्गुण-ज्ञेय परब्रह्म**(ब.स.)**

सर्वात्मकरूपाने परमात्म्याच्या व्यापकतेचे कथन -

**बहिरन्तश्च भूतानामचरं चरमेव च।**

**सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चान्तिके च तत्॥१५॥**

**अन्वय: -** भूतानाम्, बहि:, च, अन्त:, अचरम्, च, चरम्, एव, तत्, सूक्ष्मत्वात्, अविज्ञेयम्, तत्, दूरस्थम्, च, अन्तिके।

**अन्वयार्थ: - भूतानाम् -** ते सर्व प्राणिमात्रांच्या **बहि: -** बाहेर **च -** आणि **अन्त: -** आत आहे **अचरम् -** ते अचर **च -** आणि **चरम्, एव -** चरच आहे **तत् -** ते ज्ञेय परब्रह्म **सूक्ष्मत्वात् -** सूक्ष्म असल्यामुळे **अविज्ञेयम् -** जाणले जात नाही **तत् -** ते **दूरस्थम् -** अज्ञानी पुरुषांच्या दृष्टिने दूर आहे **च -** आणि **अन्तिके -** तत्त्वज्ञानी पुरुषांच्या दृष्टिने समीपच(जवळपण आहे.)

**विवरण -** बर्फाच्या गोळ्यामध्ये ज्याप्रमाणे आत आणि बाहेर पाणीच पाणी असते त्याचप्रमाणे चराचर प्राण्यांमध्ये परब्रह्म परमात्मा ज्ञेय आत आणि बाहेर संपूर्णतया व्याप्त आहे आणि चराचर भूतेही तोच आहे. ते सूक्ष्म असल्यामुळे अविज्ञेय म्ह. जाणणे योग्य नाही अर्थात प्रत्यक्ष दिसणाऱ्या वस्तुप्रमाणे त्याचे ज्ञान होत नाही. ते दूरही आहे आणि जवळही आहे म्हणजे अज्ञानी पुरुषाच्या दृष्टिने दूर आहे आणि ज्ञानी पुरुषाच्या दृष्टिने ते जवळ (हृदयात) आहे.

**व्याकरणम् - भूतानाम् -** भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.ष.ब.व. **बहि: -** बहिस् अ. **च -** च उभ.अ. **अन्त: -** अन्तर् अ. **अचरम् -** अचर वि.न.प्र.ए.व. **च -** च उभ.अ. **चरम् -** चर वि.न.प्र.ए.व. **एव -** एव निश्चयार्थक अ. **तत् -** तद् न.प्र.ए.व. **सूक्ष्मत्वात् -** सूक्ष्मत्व वि.न.पं.ए.व. **अविज्ञेयम् -** अ+वि+ज्ञा न.ग.उ.प.कर्म.यत्=विज्ञेयम् वि.न.प्र.ए.व. **तत् -** तत् सर्व.न.प्र.ए.व. **दूरस्थम् -** दूर+स्थ वि.न.प्र.ए.व. **च -** च उभ.अ. **अन्तिके -** अन्तिक वि.न.स.ए.व.

**समासविग्रहार्था: - अचरम् -** न चरमित्यचरम्-स्थावरम् = जे चर नाही ते अचर म्ह. स्थावर**(नञ् त.स.) अ विज्ञेयम् -** विज्ञातुं योग्यं विज्ञेयं विशेषरूपेण ज्ञेयं न भवति तदविज्ञेयम् = विशेषरूपाने जाणणे योग्य नाही ते

**(नञ् त.स.) दूरस्थम् -** दूरे तिष्ठति तद् दूरस्थं योजनलक्षान्तरितमिव स्थितमर्थात् विवेकवैराग्यशमदमादि नियतसाधनशून्यानां कृतश्रवणामपि मलिनान्तरात्मनां स्वरूपमपि तद् ब्रह्म दूरस्थम् = दूर रहाणारे ते म्ह. विवेकवैराग्यशमदमादि नियतसाधनरहित अज्ञानी लोकांकरिता ते ब्रह्म दूर आहे**(स.त.स.) चरम् -** चरति तत् चरम्-जंगमजातम् = चालणारे ते चर**(त.वि.) सूक्ष्मत्वात् -** सूक्ष्मस्य भाव: सूक्ष्मत्वं तस्मात् सूक्ष्मत्वात्-सर्वान्तरत्वात्-कारणत्वात्-व्यापकत्वात् = सूक्ष्माचा भाव सूक्ष्मत्व त्यामुळे**(भावार्थे.त.वि.)**

उत्पत्ति, पालन आणि संहार करणाऱ्या परमात्म्याच्या सर्वव्यापी स्वरूपाचे कथन -

**अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् ।**

**भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥१६॥**

**अन्वय: -** च, भूतेषु, अविभक्तम्, च, विभक्तम्, इव, स्थितम्, च, तत्, ज्ञेयम्, भूतभर्तृ, ग्रसिष्णु, च, प्रभ विष्णु ।

**अन्वयार्थ: - च -** आणि ते परब्रह्म ज्ञेय **भूतेषु -** सर्वभूतांमध्ये **अविभक्तम् -** विभाग रहित आहे **च -** परंतु **विभक्तम्, इव स्थितम् -** प्राण्यांच्या शरीरामध्ये पृथक्-पृथक् रूपाने असल्यासारखे दिसते **च -** आणि **तत् -** ते **ज्ञेयम् -** ज्ञेय **भूतभर्तृ -** सर्व भूतांचे भरण-पोषण करणारे तसेच **ग्रसिष्णु -** प्रलयकाली प्राणिमात्रांचा संहार करणारे आहे **च -** आणि **प्रभविष्णु -** सृष्टिच्या आरंभी सर्वभूतांना उत्पन्न करणारे आहे.

**विवरण -** ज्या प्रमाणे महाकाश वास्तविक विभागरहित असून घट, मठ इत्यादि उपाधिच्याद्वारा भिन्न-भिन्न रूपाने प्रतीत होते त्याचप्रमाणे परमात्मा परब्रह्म ज्ञेय वास्तविक विभागरहित असून संपूर्ण चराचर प्रा णिमात्राच्या ठिकाणी क्षेत्रज्ञरूपाने पृथक्-पृथक् रूपाने प्रतीत होते; भिन्नता केवळ प्रतीति मात्र आहे. वास्त विक परमात्मा ज्ञेय एक आणि सर्वत्र परिपूर्ण आहे तेच ज्ञेय परब्रह्म विष्णुरूपाने प्राणि मात्रांचे धारण पोषण करणारे आणि रूद्ररूपाने संहार करणारे, तसेच ब्रह्मारूपाने सर्वांना उत्पन्न करणारे आहे म्हणजे ते परब्रह्म ज्ञेयच असून ब्रह्मा, विष्णु आणि शिव आहे.

**व्याकरणम् - च -** च उभ.अ. **भूतेषु -** भूत भू प्र.ग.प.प.कर्त.भूत.धा.न.स.ब.व. **अविभक्तम् -** अ+वि+भज् प्र.ग.उ.प.कर्म.भूत.धा.वि.न.प्र.ए.व. **च -** च उभ.अ. **विभक्तम् -** वि+भज् प्र.ग.उ.प.कर्म.भूत.धा.वि.न.प्र.ए.व. **इव -** इव अ. **तत् -** तत् सर्व.न.प्र.ए.व. **ज्ञेयम् -** ज्ञेय न.प्र.ए.व. **भूतभर्तृ -** भूत भू प्र.ग.प.प.कर्त.भूत.धा.वि. भर्तृ पु.प्र.ए.व. **ग्रसिष्णु -** ग्रस् प्र.ग.आ.प.+इष्णुच्=ग्रसिष्णु वि.न.प्र.ए.व. **प्रभविष्णु -** प्रभविष्णु वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - भूतभर्तृ -** भूतानि बिभर्ति तत् भूतभर्तृ-भूतपालकम् = भूतांना पालन करणारा**(उप.स.)** यद्वा **भूतभर्तृ -** भूतानां भर्तृ इति भूतभर्तृ = भूतांचा पोषण करणारा**(ष.त.स.) ग्रसिष्णु -** प्रबोधदशायाम धिष्ठानयाथात्म्यसन्दर्शनकाले त्वारोपितं सर्वं स्वत्मना ग्रसितुं स्वास्मिन्नेव तिरोभावयितुं शीलमस्याऽस्तीति ग्रसिष्णु = प्रबोधदशेमध्ये-अधिष्ठानाच्या याथात्म्याच्या सन्दर्शन कालामध्ये संपूर्ण आरोपितांना आपल्या स्वरूपाच्याद्वारा ग्रसन-आपल्यामध्येच तिरोभाव करण्याचे शील आहे ज्याचे ते ग्रसिष्णु**(त.वि.) प्रभविष्णु -** अज्ञानदशायां तदेव ज्ञेयं ब्रह्माऽध्यात्मादिरूपेण प्रभवितुं रज्जुरिवाऽऽरोपिताकारेण प्रत्येतुं शीलमस्याऽस्तीति प्रभविष्णु = ते अध्यात्मादिरूपाने ज्ञेयब्रह्म अज्ञानदशेमध्ये रज्जुच्या समान आरोपित आकाराने प्रतीत होते

म्हणून ते प्रभविष्णु**(त.वि.)**

ज्ञानाद्वारा प्राप्त होण्यास योग्य परमात्म्याच्या परम प्रकाशमय स्वरूपाचे कथन -

**ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ।**

**ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य विष्ठितम् ॥१७॥**

**अन्वयः** - तत्, ज्योतिषाम्, अपि, ज्योतिः, तमसः, परम्, उच्यते, ज्ञानम्, ज्ञेयम्, ज्ञानगम्यम्, सर्वस्य, हृदि, विष्ठितम् ।

**अन्वयार्थः - तत् -** ते परब्रह्म ज्ञेय **ज्योतिषामपि -** तेजाचेही **ज्योतिः -** तेज आहे **तमसः परम्, उच्यते -** ते अज्ञानाच्या पलिकडे आहे असे म्हटले जाते **ज्ञानम् -** ज्ञान **ज्ञेयम् -** ज्ञेयस्वरूप आणि **ज्ञानगम्यम् -** तत्त्वज्ञानाच्या द्वारा प्राप्त करणे योग्य तेच **सर्वस्य -** सर्वभूतांच्या **हृदि -** हृदयामध्ये **विष्ठितम् -** स्थित आहे.

**विवरण -** सूर्य, चंद्रमा, विद्युत, तारांगण आणि अग्नि आदि जेवढ्याकाही बाह्य ज्योति तसेच मन, बुद्धी आणि इंद्रिये आदि जेवढ्याकाही आध्यात्मिक ज्योति आहेत त्या सर्वांचे प्रकाशन करणारा परब्रह्म परमात्मा ज्ञेयच आहे. म्हणून, परमात्मा ज्ञेय ज्योतिचीही ज्योति आहे. ते ज्योतिरूप आणि ज्ञानरूप असल्यामुळे अंधकार आणि अज्ञानाच्या पलिकडे आहे असे म्हटले जाते. तसेच जाणणे योग्य आणि तत्त्वज्ञानाच्याद्वारा प्राप्त करणे योग्य आणि सर्वांच्या हृदयदेशामध्ये स्थित आहे. ज्याप्रमाणे सूर्याचा प्रकाश सर्वठिकाणी समान रूपाने विस्तारपूर्वक असून सुद्धा दर्पण आदि पदार्थामध्ये त्याची विशेष अभिव्यक्ति होते (प्रत्यक्ष होते) त्याचप्रमाणे हृदय परमात्मा परब्रह्म ज्ञेयाचे उपलब्धि स्थान असल्यामुळे परमात्मा ज्ञेय सर्व ठिकाणी परिपूर्ण असूनही हृदयदेशामध्ये त्याची विशेष अभिव्यक्ति (प्रत्यक्ष) होते.

**व्याकरणम् - तत् -** तत् सर्व.न.प्र.ए.व. **ज्योतिषाम् -** ज्योतिस् न.ष.ब.व. **अपि-** अपि अ. **ज्योतिः -** ज्योतिस् न.प्र.ए.व. **तमसः -** तमस् न.ष.ए.व. **परम् -** पर वि.न.प्र.ए.व. **उच्यते -** वच् द्वि.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व. **ज्ञानम् -** ज्ञान न.प्र.ए.व. **ज्ञेयम् -** ज्ञा न.ग.उ.प.कर्म.यत् वि.न.प्र.ए.व. **ज्ञानगम्यम् -** ज्ञान न. गम् प्र.ग.प.प.कर्म.यत् वि.न.प्र.ए.व. **सर्वस्य -** सर्व सर्व.पु.ष.ए.व. **हृदि -** हृद् न.स.ए.व. **विष्ठितम् -** वि+स्था प्र.ग.प.प.कर्त.भूत.धा.वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थः - ज्ञानगम्यम् -** गन्तुं योग्यं गम्यं ज्ञानेन गम्यमिति ज्ञानगम्यम् = ज्ञानाच्या द्वारा प्राप्त करणे योग्य**(तृ.त.स.)** यद्वा **ज्ञानगम्यम् -** सदसद्विवेकवैराग्यशमदमसंन्यासामानित्वाद्यन्तरङ्गसाधनसम्पत्त्या ब्रह्मविद्गुरुसन्निधौ नित्यनिरन्तरसमनुष्ठितश्रवणमनननिदिध्यासाद्यनुष्ठानेन समुत्पन्नमनाद्यविद्यावासनाजातं सङ्क्षिप्य,सर्वविकल्पनिर्मुक्तं यज्ज्ञानं तेनैवैकेन श्रुत्याचार्येश्वरात्मप्रसादसञ्जातेन गम्यम्-अवगम्यम्-ज्ञानेनाऽधिगम्यं न तु सांख्येन न योगेन न कर्मणा नाऽप्युपास्त्या चाऽधिगम्यमिति ज्ञानगम्यम् = सत आणि असतचा विवेक, वैराग्य, शम, दम, संन्यास, अमानित्व आदि अंतरंग साधनाच्या संपत्तिने ब्रह्मविद् गुरुच्या सन्निधिमध्ये नित्य-निरंतर चांगल्या प्रकारे विहित श्रवण, मनन आणि निदिध्यासन आदिच्या अनुष्ठानाने अनादि अविद्येच्याद्वारा उत्पन्न वासनांचा चांगल्या प्रकारे निरास करून संपूर्ण विकल्पाने रहित चांगले उत्पन्न जे ज्ञान त्या ज्ञानाने-श्रुति, आचार्य, ईश्वर आणि आत्मप्रसादाने उत्पन्न जे ज्ञान त्या ज्ञानाने, ब्रह्म गम्य-अवगम्य आणि अधिगम्य आहे सांख्याने, योगाने, कर्माने आणि उपासनेने अधिगम्य-प्राप्य नाही ते ज्ञानगम्य**(तृ.त.स.)**

**ज्ञेयम्** - तदेव परमपुरुषार्थत्वाद् मुमुक्षुभिर्ज्ञातुं योग्यं ज्ञेयम् = ते परम पुरुषार्थ असल्यामुळे मुमुक्षुच्याद्वारा जाणण्याकरिता योग्य आहे**(कृ.वि.) ज्ञानम् -** ज्ञायते अनेनेति ज्ञानम् = ज्याच्या द्वारा जाणले जाते**(कृ.वि.)**

क्षेत्र, ज्ञान आणि ज्ञेयाचे तत्त्व जाणल्याने भगवत्प्राप्तिचे कथन -

**इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः ।**

**मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥१८॥**

**अन्वयः -** इति, क्षेत्रम्, तथा, ज्ञानम्, च, ज्ञेयम्, समासतः, उक्तम्, मद्भक्तः, एतत्, विज्ञाय, मद्भावाय, उपपद्यते ।

**अन्वयार्थः - इति -** याप्रमाणे **क्षेत्रम् -** क्षेत्र **तथा -** त्याचप्रमाणे **ज्ञानम् -** ज्ञान **च -** आणि **ज्ञेयम् -** ज्ञानयोग्य परब्रह्म ज्ञेय **समासतः -** संक्षेपाने **उक्तम् -** सांगितले **मद्भक्तः -** माझा भक्त **एतत्, विज्ञाय -** हे सर्व जाणून **मद्भावाय -** माझ्या स्वरूपाला **उपपद्यते -** प्राप्त होतो.

**विवरण -** याप्रमाणे आतापर्यंत मी तुला क्षेत्र काय? ज्ञान काय? आणि जाणण्यास योग्य परमात्म्याचे स्वरूप काय आहे? हे सर्व संक्षेपाने सांगितले आहे. अशा या उपर्युक्त संपूर्ण तत्त्वांना जाणून माझा भक्त माझ्या स्वरूपाला प्राप्त होतो.

**व्याकरणम् - इति -** इति क्रि.वि.अ. **क्षेत्रम् -** क्षेत्र न.प्र.ए.व. **तथा -** तथा क्रि.वि.अ. **ज्ञानम् -** ज्ञान न.प्र.ए.व. **च -** च उभ.अ. **ज्ञेयम् -** ज्ञेय न.प्र.ए.व. **समासतः -** समासतस् अ. **उक्तम् -** वच् द्वि.ग.प.प.कर्म.भूत.धा.वि.न.प्र.ए.व. **मद्भक्त -** अस्मत् सर्व.भज् प्र.ग.उ.प.कर्त.भूत.धा.वि.पु.प्र.ए.व. **एतत् -** एतत् सर्व.न.द्वि.ए.व. **विज्ञाय -** वि+ज्ञा न.ग.उ.प.ल्यबन्त अ. **मद्भावाय -** अस्मत् सर्व. भाव पु.च.ए.व. **उपपद्यते -** उप+पद् च.ग.आ.प.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - मद्भक्तः -** मम-परमात्मनो भक्त इति मद्भक्तः = माझाभक्त**(ष.त.स.) मद्भावाय -** मम-परमात्मनो भावः-स्वरूपकैवल्यं वा तस्मै मद्भावाय = माझे स्वरूप-कैवल्य त्याला**(ष.त.स.)**

प्रकृति पुरुषाची अनादिता तसेच प्रकृतिपासून विकार आणि गुणांची उत्पत्ति -

**प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ।**

**विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसम्भवान् ॥१९॥**

**अन्वयः -** प्रकृतिम्, च, एव, पुरुषम्, उभौ, अपि, अनादी, विद्धि, च, विकारान्, च, गुणान्, एव, प्रकृतिसम्भवान्, विद्धि ।

**अन्वयार्थः - प्रकृतिम् -** प्रकृतिला **च, एव -** आणि **पुरुषम् -** पुरुषाला **उभौ अपि -** या दोन्हींना (तू) **अनादी -** अनादी **विद्धि -** समज **च -** आणि **विकारान् -** बुद्धी, इंद्रिये, अंतःकरण इत्यादि विकारांना **च -** आणि **गुणान्, एव -** सत्त्व, रज, तम इत्यादि त्रिगुणात्मक पदार्थांनाही **प्रकृतिसम्भवान् -** प्रकृतिपासून उत्पन्न झालेले **विद्धि -** समज.

**विवरण -** सातव्या अध्यायामध्ये तसेच चौदाव्या अध्यायामध्ये जिचे वर्णन केले अशी जी अपरा नावाची

प्रकृति आणि जीवभूत जी क्षेत्रज्ञसंज्ञक पराप्रकृति म्हणजे पुरुष या दोन्हींना तू अनादि समज. तसेच शरीर, इंद्रिये, इच्छा, द्वेष, सुख, दुःख इत्यादि विकारांना तसेच जेवढे काही त्रिगुणात्मक पदार्थ आहेत (सत्त्व, रज, तम) या सर्वगुणांना तू प्रकृतिपासून उत्पन्न झालेले आहेत असे समज.

**व्याकरणम् - प्रकृतिम्** - प्रकृति स्त्री.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **एव** - एव अ. **पुरुषम्** - पुरुष पु.द्वि.ए.व. **उभौ** - उभ पु.द्वि.द्वि.व. **अपि** - अपि अ. **अनादी** - अनादि वि.पु.द्वि.द्वि.व. **विद्धि** - विद् द्वि.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **विकारान्** - वि+कृ+घञ्=विकार पु.द्वि.ब.व. **च** - च उभ.अ. **गुणान्** - गुण वि.पु.द्वि.ब.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **प्रकृतिसम्भवान्** - प्रकृति स्त्री. सम्+भव पु. द्वि.ब.व. **विद्धि** - विद् द्वि.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अनादि** - न विद्यते आदिः कारणं ययोस्तावनादी-उत्पत्तिरहितौ = नाही आदि-कारण ज्यांचे ते दोन्ही अनादि**(नञ् त.स.) प्रकृतिसम्भवान्** - प्रकृतेः सम्भवः-उत्पत्तिर्येषां ते प्रकृतिसम्भवास्तान् प्रकृतिसम्भवान् = प्रकृतिपासून उत्पत्ति आहे ज्यांची ते त्यांना**(ब.स.)**

कार्यकरणाच्या उत्पत्तिमध्ये प्रकृतिची आणि सुखदुःखाच्या भोगामध्ये पुरुषाच्या कारणतेचे कथन -

**कार्यकरणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।**

**पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥२०॥**

**अन्वयः** - कार्यकरणकर्तृत्वे, प्रकृतिः, हेतुः, उच्यते, सुखदुःखानाम्, भोक्तृत्वे, पुरुषः, हेतुः, उच्यते ।

**अन्वयार्थः - कार्यकरणकर्तृत्वे** - देह आणि इंद्रिये यांच्या कर्तृत्वाविषयी **प्रकृतिः** - प्रकृती **हेतुः** - कारण आहे **उच्यते** - असे म्हटले जाते आणि **सुखदुःखानाम्** - सुखादुःखांचा **भोक्तृत्वे** - उपभोग घेण्याविषयी **पुरुषः** - पुरुष **हेतुः** - कारण आहे **उच्यते** - असे म्हटले जाते.

**विवरण** - आकाश, वायु, अग्नि, जल आणि पृथ्वी हे पाच भूते; शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे पाच विषय हे सर्व दहा मिळून कार्य या नावांने संबोधित केले जाते. त्याचप्रमाणे बुद्धि, अहंकार आणि मन तसेच श्रोत्र, त्वचा, नेत्र, रसना आणि घ्राण हे पाच इंद्रिये तसेच वाणी, पाय, हात, उपस्थ, गुद हे पांच कर्मेंद्रिये हे सर्व तेरा मिळून करण या नावाने संबोधित केले जाते. अशा या उपर्युक्त कार्य आणि करणांना उत्पन्न करण्याकरिता प्रकृती ही निमित्त सांगितली आहे आणि सुख व दुःखाचा भोग घेण्याकरिता पुरुषच कारण आहे असे म्हटले जाते.

**व्याकरणम् - कार्यकरणकर्तृत्वे** - कार्य न. करण न. कृ अ.ग.उ.प.तृच्+त्व-कर्तृत्व न.स.ए.व. **प्रकृतिः** - प्रकृति स्त्री.प्र.ए.व. **हेतुः** - हेतु पु.प्र.ए.व. **उच्यते** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व. **सुखदुःखानाम्** - सुख न. दुःख न.ष.ब.व. **भोक्तृत्वे** - भुज् स.ग.उ.प.तृच्+त्व-भोक्तृत्व वि.न.स.ए.व. **पुरुषः** - पुरुष पु.प्र.ए.व. **हेतुः** - हेतु पु.प्र.ए.व. **उच्यते** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - सुखदुःखानाम्** - सुखानि च दुःखानि च सुखदुःखानि तेषां सुखदुःखानाम् = सुख आणि दुःखांचा**(इतरे द्वं.स.) कार्यकरणकर्तृत्वे** - कार्याणि च-शरीराणि च, करणानि च-इन्द्रियाणि चेति कार्यकारणानि कर्तुर्भावः कर्तृत्वं तेषां-कार्यकरणानां कर्तृत्वमिति कार्यकरणकर्तृत्वं तस्मिन्, कार्यकरणकर्तृत्वे = कार्य-शरीर आणि करण-इंद्रिय यांच्या कर्तृत्वामध्ये**(द्वं.ग.ष.त.स.) पुरुषः** - पुरि शेते इति पुरुषः =

शरीरामध्ये राहातो(**वि.**) यद्वा **पुरुषः** - पुरा सहैकरूपेणाऽऽस्त इति पुरुषः = शरीराबरोबर एकरूप असतो-शरीरतादात्म्यापन्न असतो तो पुरुष(**वि.**) यद्वा **पुरुषः** - स्वाज्ञानात्पुरमुषतीति पुरुषः - जो आपल्या अज्ञानामुळे शरीरामध्ये राहातो तो पुरुष(**वि.**)

प्रकृतिच्या संगतीने पुरुषाला भोग आणि अनेक योनिंची प्राप्ति -

**पुरुषः प्रकृतिस्थो हि भुङ्क्ते प्रकृतिजान्गुणान् ।**

**कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥२१॥**

**अन्वयः** - हि, प्रकृतिस्थः, पुरुषः, प्रकृतिजान्, गुणान्, भुङ्क्ते, अस्य, गुणसङ्गः, सदसद्योनिजन्मसु, कारणम् ।

**अन्वयार्थः** - **हि** - कारण **प्रकृतिस्थः** - प्रकृतिच्या अधीन झालेला **पुरुषः** - पुरुष **प्रकृतिजान्, गुणान्** - प्रकृतिपासून उत्पन्न झालेल्या गुणांना **भुङ्क्ते** - भोगतो अथवा गुणांचा भोग करतो **अस्य** - त्याच्या (भोक्त्याच्या) **गुणसङ्गः** - गुणाचा संग हाच (आसक्ति हीच) **सदसद्योनिजन्मसु** - त्या जीवात्म्याच्या चांगल्या वाईट योनिमध्ये जन्म धारण करण्याकरिता **कारणम्** - कारण (आहे) होतो.

**विवरण** - प्रकृतिच्या तीन गुणापासून उत्पन्न झालेले जेवढे काही सांसारिक पदार्थ आहेत त्या सांसारिक पदार्थांचा भोग प्रकृतिच्या अधीन झालेला पुरुष करतो. वास्तविक पाहिले तर पुरुष असंग तसेच निर्विकार आहे म्हणजे त्याच्या ठिकाणी कोणत्याही गुणांचा लेप नाही. परंतु, प्रकृतिच्या संगाने तो सांसारिक पदार्थांचा भोक्ता होतो त्या संगामुळे तो चांगल्या वाईट योनिला प्राप्त होतो. ज्या मनुष्याची ज्या गुणामध्ये अथवा ज्या गुणाच्या कार्यरूप पदार्थामध्ये आसक्ति असते अथवा वासना असते त्याप्रमाणे त्याला पुनर्जन्म प्राप्त होतो. म्हणून, त्याठिकाणी चांगल्या वाईट योनिच्या प्राप्तिमध्ये गुणांचा संग कारण सांगितलेला आहे.

**व्याकरणम्** - **हि** - हि क्रि.वि.अ. **प्रकृतिस्थः** - प्रकृति स्त्री. स्थ वि.पु.प्र.ए.व. **पुरुषः** - पुरुष पु.प्र.ए.व. **प्रकृतिजान्** - प्रकृति+ज वि.पु.द्वि.ब.व. **गुणान्** - गुण पु.द्वि.ब.व. **भुङ्क्ते** - भुज् स.ग.(आ.प.) वर्त.तृ.पु.ए.व. **अस्य** - इदम् सर्व.पु.ष.ए.व. **गुणसङ्गः** - गुण वि. सङ्ग पु.प्र.ए.व. **सदसद्योनिजन्मसु** - सत् वि. असत् वि. योनि पु. जन्मन् न.स.ब.व. **कारणम्** - कारण न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **प्रकृतिस्थः** - प्रकृतिः कार्यकरणसंघातः स्वाविवेकेनाऽयमेवाऽहमिति तदात्मना तिष्ठतीति प्रकृतिस्थः = प्रकृति-कार्यकरणसंघात आपल्या अविवेकाने हे मी आहे अशा प्रकारे कार्यकरणसंघात स्वरूपाने स्थित राहतो तो प्रकृतिस्थ(**स.त.स.**) **गुणसङ्गः** - गुणेषु-शुभाशुभकर्मसु सङ्ग-आसक्तिर्गुणसङ्गः = गुणामध्ये असणारा सङ्ग(**स.त.स.**) यद्वा **गुणसङ्गः** - दृष्टादृष्टेषु भोग्येषु सज्यते पुमान् सक्तो भवत्यनेनेति अथवा सज्ज्यते बध्यतेऽनेनेति सङ्गो गुणेषु सङ्ग इति गुणसङ्गः = दृष्ट अदृष्ट भोग्य विषयामध्ये ज्या योगाने आसक्त केला जातो अथवा बध्द केला जातो तो संग गुणामध्ये गुणसंग(**स.त.स.**) यद्वा **गुणसङ्गः** - गुणेषु-शब्दादिषु सुखदुःखमोहात्मकेषु सङ्गः-अभिलाषः-काम इति गुणसङ्गः = गुणामध्ये-सुखदुःखमोहात्मक शब्दादि विषयामध्ये जो संग-अभिलाष-काम असा गुणसंग(**स.त.स.**) **प्रकृतिजान्** - प्रकृतितो जाताः-जायन्त इति प्रकृतिजाः-तान् प्रकृतिजान्-सुखदुःखमोहाकाराभिव्यक्तान् गुणान् = प्रकृतिपासून उत्पन्न झालेल्या-सुख, दुःख व मोह यांच्या आकाराने अभिव्यक्त झालेल्या गुणांना(**पं.त.स.**)

परमात्मा आणि आत्म्याच्या एकतेचे प्रतिपादन -

**उपद्रष्टानुमन्ता च भर्ता भोक्ता महेश्वरः।**

**परमात्मेति चाप्युक्तो देहेस्मिन्पुरुषः परः ॥२२॥**

**अन्वयः** - उपद्रष्टा, अनुमन्ता, च, भर्ता, भोक्ता, महेश्वरः, अस्मिन्, देहे, परमात्मा, इति, च, अपि, परः, पुरुषः, उक्तः।

**अन्वयार्थः** - **उपद्रष्टा** - साक्षी असल्यामुळे उपद्रष्टा **अनुमन्ता** - यथार्थ संमति देणारा **च** - आणि **भर्ता** - भरण-पोषण करणारा **भोक्ता** - उपभोग घेणारा **महेश्वरः** - देवांचाही देव महेश्वर **अस्मिन्, देहे** - या देहामध्ये **परमात्मा, इति च अपि** - आत्माच वास्तविक परमात्मा आहे **परः पुरुषः** - ज्याला श्रेष्ठ पुरुष असे **उक्तः** - म्हटले आहे.

**विवरण** - प्रकृतिजनित शरीराच्या उपाधीने युक्त चेतन आत्मा अज्ञानामुळे जीवभावाला प्राप्त झाल्यासारखा दिसतो परंतु वास्तविक पाहिले तर तो क्षेत्रज्ञ या प्रकृतिपासून सर्वथा अतीत परमात्माच आहे; कारण की, त्या परब्रह्म परमात्म्यामध्ये आणि क्षेत्रज्ञामध्ये वास्तविक यत्किंचितही भेद नाही केवल शरीर उपाधीमुळे भेदाची प्रतीति होते. असा असणारा तोच परमात्मा अंतर्यामी रूपाने सर्वांच्या शुभाशुभ कर्माचा निरीक्षण करणारा असल्यामुळे उपद्रष्टा, यथार्थ संमति देणारा असल्यामुळे अनुमंता, सर्व जगाचे धारणपोषण करीत असल्यामुळे भर्ता, जीवरूपाने भोग करणारा असल्यामुळे भोक्ता आणि ब्रह्मदेवादि देवांचा स्वामी असल्यामुळे महेश्वर आहे. त्याचप्रमाणे सर्वथा त्रिगुणातीत असल्यामुळे (आत्माच परमात्मा आहे) तो या वर्तमान देहामध्ये परमपुरुष रूपाने स्थित आहे असे म्हटले आहे.

**व्याकरणम्** - **उपद्रष्टा** - उप+दृश् प्र.ग.प.प.+तृच्=उपद्रष्टृ पु.प्र.ए.व. **अनुमन्ता** - अनु+मन् अ.ग.आ.प.+तृच्=अनुमन्तृ वि.पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **भर्ता** - भृ प्र.ग.प.प./तृ.ग.उ.प.+तृच्=भर्तृ पु.प्र.ए.व. **भोक्ता** - भुज् स.ग.उ.प.+तृच्=भोक्तृ पु.प्र.ए.व. **महेश्वरः** - महा वि. ईश्वर पु.प्र.ए.व. **अस्मिन्** - इदम् सर्व.पु.स.ए.व. **देहे** - देह पु.स.ए.व. **परमात्मा** - परम वि. आत्मन् पु.प्र.ए.व. **इति** - क्रि.वि.अ. **च** - च उभ.अ. **अपि** - अपि अ. **परः** - पर वि.पु.प्र.ए.व. **पुरुषः** - पुरुष पु.प्र.ए.व. **उक्तः** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **परमात्मा** - परमश्चासौ आत्माचेति परमात्मा = श्रेष्ठ आत्मा परमात्मा**(कर्म.स.) महेश्वरः** - महांश्चासौ ईश्वरश्चेति महेश्वरः = मोठा ईश्वर**(कर्म.स.) भोक्ता** - भुङ्क्ते भुनक्ति वा भोक्ता = भोग करणारा तो **(कृ.वि.) भर्ता** - बिभर्ति-पुष्णाति-धारयतीति भर्ता = भरण-पोषण करणारा तो**(कृ.वि.) ईश्वरः** - ईशितुं शीलमस्येति ईश्वरः = शासन करण्याचे शील आहे ज्याचे तो**(कृ.वि.)**

गुणासहित प्रकृति आणि पुरुषाला तत्त्वाने जाणण्याचे फल -

**य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह।**

**सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥२३॥**

**अन्वयः** - एवम्, यः, पुरुषम्, च, गुणैः, सह, प्रकृतिम्, वेत्ति, सः, सर्वथा, वर्तमानः, अपि, भूयः, न, अ

भिजायते ।

**अन्वयार्थः - एवम्** - या प्रमाणे **यः -** जो मनुष्य **पुरुषम्** - पुरुषाला **च** - आणि **गुणैः सह प्रकृतिम्** - गुणासह प्रकृतिला **वेत्ति** - जाणतो **सः** - तो पुरुष **सर्वथा वर्तमानः, अपि** - शास्त्रविहित कर्मे करीत असला तरी तो **भूयः** - पुन्हा **न अभिजायते** - उत्पन्न होत नाही म्ह. पुन्हा जन्म घेत नाही.

**विवरण** - जेवढी काही क्षेत्रांची भिन्न-भिन्न प्रतीति होते ती सर्व प्रकृतिच्या संगाने प्रतीत होते. वास्तविक पाहिले तर ती भिन्न-भिन्न प्रतीति परब्रह्म परमात्म्याचेच अभिन्न स्वरूप आहे. अशा प्रकारच्या कथित अभिन्न स्वरूप पुरुषाला तसेच सत्त्व, रज आणि तम हे तिन्ही गुण प्रकृतिपासून उत्पन्न झालेले आहेत, संपूर्ण जगत् प्रकृतिचे कार्य आहे आणि जगतामध्ये असणारे संपूर्ण पदार्थ क्षणभंगुर आणि नाशवान आहेत. अशा प्रकारच्या कथित प्रकृतिला जो पुरुष वस्तुतः जाणतो तो या जगतामध्ये शास्त्रविहित कर्म करीत असला अथवा शास्त्र निषिद्ध कर्म करीत असला तरी तो पुन्हा जन्माला प्राप्त होत नाही.

**व्याकरणम्** - **एवम्** - एवम् क्रि.वि.अ. **यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **पुरुषम्** - पुरुष पु.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **गुणैः** - गुण वि.पु.तृ.ब.व. **सह** - सह अ. **प्रकृतिम्** - प्र+कृ अ.ग.उ.प.+क्तिन्=प्रकृति स्त्री. द्वि.ए.व. **वेत्ति** - विद् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **सर्वथा** - सर्व+थाल्=सर्वथा अ. **वर्तमानः** - वृत् प्र.ग.आ.प.+कर्त.शानच्=वर्तमान वि.पु.प्र.ए.व. **अपि** - अपि अ. **भूयः** - भूयस् अ. **न** - न क्रि.वि.अ. **अभिजायते** - अभि+जन् च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **सर्वथा** - सर्वप्रकारेण सर्वथा = सर्व प्रकाराने सर्वथा**(त.वि.) वर्तमानः** - वर्तत इति वर्तमानः = वर्ततो तो वर्तमान**(वि.)**

ध्यानयोग, ज्ञानयोग आणि कर्मयोगाने भगवत्प्राप्तिचे कथन -

**ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना ।**

**अन्ये साङ्ख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ॥२४॥**

**अन्वयः** - केचित्, आत्मानम्, आत्मनि, आत्मना, ध्यानेन, पश्यन्ति, अन्ये, साङ्ख्येन, योगेन, च, अपरे, कर्मयोगेन, पश्यन्ति ।

**अन्वयार्थः** - **केचित्** - कोणी **आत्मानम्** - आत्म्याला **आत्मनि** - आपल्या ठिकाणी **आत्मना** - शुद्ध झालेल्या सूक्ष्मबुद्धिने **ध्यानेन** - ध्यानाच्या द्वारा **पश्यन्ति** - पाहातात **अन्ये** - दुसरे कोणी **साङ्ख्येन योगेन** - सांख्य योगाने **च** - आणि **अपरे -** अन्य कोणी **कर्मयोगेन** - कर्म योगाने **पश्यन्ति** - पाहातात.

**विवरण** - एकांत स्थानामध्ये शुद्धासनावर बसून, इंद्रियांना विषयापासून सर्वथा मुक्त करून, तसेच मनाला आपल्या अधीन ठेवून केवळ एक परमात्म्याच्या अतिरिक्त जेवढे काही दृश्यमात्र पदार्थ आहेत त्यांना विसरून (त्यांचे चिंतन न करून), निरंतर परमात्म्याचे चिंतन करणाऱ्या अशा प्रकारच्या ध्यानाच्याद्वारा शुद्ध झालेल्या सूक्ष्मबुद्धिने काही योगी लोक परमात्म्याला आपल्या हृदयामध्ये पाहतात. जेवढे काही जगातील पदार्थ आहेत ते सर्व मृगतृष्णेच्या जलाप्रमाणे अथवा स्वप्नातल्या सृष्टिप्रमाणे मायामय म्हणजे मिथ्या आहेत असे समजून, कर्तेपणाचा अहंकार टाकून, एक परमात्म्याशिवाय या जगामध्ये दुसरे काहीच सत्य नाही अशा प्रकारे परमात्म्याच्या ठिकाणी निश्चलभावाने स्थिर राहून आणि प्रकृतिजनितगुणापासून मी अगदी पृथक् आहे

त्यांचा आणि माझा यत्किंचिन्मात्र संबंध नाही. मी शुद्ध निर्गुण निराकार परब्रह्म परमात्माच आहे अशा प्रकारचे चिंतन करणाऱ्या सांख्य (ज्ञान) योगाच्याद्वारा मला दुसरे काही योगी लोक पाहातात. त्याचप्रमाणे काही योगी लोक आसक्ति आणि कर्मफलाचा सर्वथा त्याग करून, सिद्धि आणि असिद्धिमध्ये सम राहून आणि शास्त्रानुसार संपूर्ण विहित कर्मांचे अनुष्ठान करून मला-परमात्म्याला अशा या निष्काम कर्मयोगाच्याद्वारा पाहातात.

**व्याकरणम् - केचित्** - किम् सर्व.चित् प्रत्ययान्त पु.प्र.ब.व. **आत्मानम्** - अत् प्र.ग.प.प.+मनिन्=आत्मन् पु.द्वि.ए.व. **आत्मनि** - आत्मन् पु.स.ए.व. **आत्मना** - आत्मन् पु.तृ.ए.व. **ध्यानेन** - ध्यान न.तृ.ए.व. **पश्यन्ति** - दृश् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **अन्ये** - अन्य वि.सर्व.प्र.ब.व. **साङ्ख्येन** - सांख्य वि.पु.न.तृ.ए.व.**योगेन** - योग पु.तृ.ए.व. **च** - च उभ.अ. **अपरे** - अपर सर्व.पु.प्र.ब.व. **कर्मयोगेन** - कर्मन् वि.न. योग पु.तृ.ए.व.

**समासविग्रहार्था: - कर्मयोगेन** - मोक्षोपायत्वात्कर्मैव योग: कर्मयोगस्तेन कर्मयोगेन = मोक्षाचे साधन असल्यामुळे कर्मच योग आहे अशा त्या कर्मयोगाच्याद्वारा**(कर्म.स.)**

महान पुरुषांच्या कथनानुसार उपासना केल्याने भगवत्प्राप्तिचे कथन -

**अन्ये त्वेवमजानन्त: श्रुत्वान्येभ्य उपासते ।**

**तेऽपि चातितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणा: ॥२५॥**

**अन्वय: -** तु, अन्ये, एवम्, अजानन्त:, अन्येभ्य:, श्रुत्वा, उपासते, ते, श्रुतिपरायणा:, अपि, मृत्युम्, अतितरन्ति, एव, च ।

**अन्वयार्थ: - तु -** परंतु **अन्ये -** दुसरे कोणी **एवम् -** उपर्युक्त प्रतिपादन केलेल्या साधनापैकी एकाही साधनाने **अजानन्त: -** आत्मतत्त्वाला न जाणणारे **अन्येभ्य: -** दुसऱ्या तत्त्वज्ञानी पुरुषांकडून **श्रुत्वा -** श्रवण करून **उपासते -** श्रद्धा-भक्तिनुसार उपासना करतात **ते श्रुतिपरायणा: अपि -** ते श्रवण परायण (मग्न) पुरुष सुद्धा **मृत्युम् -** मृत्युरूप संसाराला **अतितरन्ति, एव च -** तरूनच जातात.(म्हणजे मुक्तच होतात.)

**विवरण -** उपर्युक्त प्रतिपादन केलेल्या अधिकारी पुरुषांच्या अतिरिक्त जे मंदबुद्धी आहेत ते ध्यानयोग, सांख्ययोग, कर्मयोग यामधून कोणत्याही एका साधनाला चांगल्या प्रकारांनी न जाणणारे असे जे श्रद्धा युक्त साधक तत्त्वज्ञानी पुरुषाच्या उपदेशाचे श्रवण करून यथावत् उपासना तसेच आचरण करतात. ते श्रुतिधर पुरुष सुद्धा मृत्युरूपी संसार सागराला तरूण जातात म्ह. मृत्युरूपी संसार सागरापासून मुक्तच होतात.

**व्याकरणम् - तु -** तु उभ.अ. **अन्ये -** अन्य सर्व.पु.प्र.ब.व. **एवम् -** एवम् क्रि.वि.अ. **अजानन्त: -** अ+ज्ञा न.ग.उ.प.(प.प.)+शानच्=अजानत् वि.पु.प्र.ब.व. **अन्येभ्य: -** अन्य सर्व.पु.पं.ब.व. **श्रुत्वा -** श्रु पं.ग.प.प.त्वान्त अ. **उपासते -** उप+आस् द्वि.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व. **ते -** तत् सर्व.पु.प्र.ब.व. **श्रुतिपरायणा: -** श्रुति स्त्री. पर वि. अयन वि.पु.प्र.ब.व. **अपि -** अपि अ. **मृत्युम् -** मृत्यु पु.द्वि.ए.व. **अतितरन्ति -** अति अ. तृ-तर् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **एव च -** एव च निश्चयार्थक अ.

**समासविग्रहार्था: - श्रुतिपरायणा: -** श्रुति:-श्रवणं परमयनम्-गमनं येषां मोक्षमार्गप्रवृत्तौ परं साधनं येषां ते श्रुतिपरायणा: = श्रुति-श्रवण तेच श्रेष्ठ अयन-गमन ज्यांच्या मोक्षमार्ग प्रवृत्तीतील श्रेष्ठ साधन आहे ज्यांचे ते श्रु

तिपरायण(**ब.स.**)

क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या संयोगाने चराचर प्राण्यांच्या उत्पत्तिचे कथन -

**यावत्सञ्जायते किञ्चित्सत्त्वं स्थावरजङ्गमम्।**

**क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥२६॥**

**अन्वय: -** भरतर्षभ, यावत्, किञ्चित्, स्थावरजङ्गमम्, सत्त्वम्, जायते, तत्, क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्, विद्धि।

**अन्वयार्थ: - भरतर्षभ -** हे भरतकुलोत्पन्न अर्जुना! **यावत्, किञ्चित् -** जेवढेकाही **स्थावरजङ्गमम् -** स्थावर जंगम **सत्त्वम् -** प्राणी **सञ्जायते -** उत्पन्न होतात **तत् -** ते सर्व **क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात् -** क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांच्या संयोगापासून होतात असे तू **विद्धि -** समज.

**विवरण -** हे अर्जुना! जेवढे काही चराचर देव, मनुष्य, पशु, पक्षी आदि चालणारे फिरणारे चर प्राणी तसेच वृक्ष, वेली, पर्वत आदि स्थिर राहणारे अचर जड पदार्थ उत्पन्न होतात. त्यांना तूं क्षेत्र आणि क्षेत्रज्ञांच्या संयोगापासून उत्पन्न झालेले आहेत असे समज. वास्तविक पाहिले तर क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाचा काही एक संबंध नाही. कारण, क्षेत्र जड आहे आणि क्षेत्रज्ञ असंग आहे परंतु क्षेत्राचा क्षेत्रज्ञाच्या ठिकाणी आरोप होतो. अशा या आध्यासिक संसर्गामुळे जगत उत्पन्न झालेले दिसते वास्तविक ते नाहीच म्हणून भगवान म्हणतात की, हे संपूर्ण जगत क्षेत्र आणि क्षेत्रज्ञांच्या संयोगापासून उत्पन्न झालेले आहे असे तू समज.

**व्याकरणम् - भरतर्षभ -** भरत पु. ऋषभ पु.संबो.ए.व. **यावत् -** यावत् क्रि.वि.अ. **किञ्चित् -** किम् सर्व. चित् प्रत्ययान्त न.प्र.ए.व. **स्थावरजङ्गमम् -** स्थावर वि. जङ्गम वि.न.प्र.ए.व. **सत्त्वम् -** सत्त्व न.प्र.ए.व. **तत् -** तत् सर्व.न.द्वि.ए.व. **क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात् -** क्षेत्र न. क्षेत्रज्ञ पु. संयोग पु.पं.ए.व. **विद्धि -** विद् द्वि.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात् -** क्षेत्रश्च-प्रकृतिश्च, क्षेत्रज्ञश्च-पुरुषश्चेति क्षेत्रक्षेत्रज्ञौ क्षेत्रक्षेत्रज्ञयो: संयोग: क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगस्तस्मात् क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात् = क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या संयोगापासून(**द्वं.ग.ष.त.स.**) **क्षेत्रज्ञ: -** क्षेत्रं जानातीति क्षेत्रज्ञ: = क्षेत्राला जाणणारा तो(**उप.स.**)

अविनाशी परमात्म्याला सर्वत्र समभावाने स्थित पहाणाऱ्याची प्रशंसा -

**समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम्।**

**विनश्यत्स्वविनश्यन्तं य: पश्यति स पश्यति ॥२७॥**

**अन्वय :** - य:, विनश्यत्सु, सर्वेषु, भूतेषु, समम्, तिष्ठन्तम्, अविनश्यन्तम्, परमेश्वरम्, पश्यति, स:, पश्यति ।

**अन्वयार्थ:** - **य:** - जो पुरुष **विनश्यत्सु सर्वेषु भूतेषु** - नाश पावणाऱ्या चराचर प्राणिमात्रामध्ये **समम्, तिष्ठन्तम्** - समानरूपाने असलेल्या **अविनश्यन्तम्** - अविनाशी **परमेश्वरम्** - परमेश्वराला **पश्यति** - पाहतो **स:** - तो पुरुष **पश्यति** - वास्तविक खरोखरच परमात्म्याला पहातो.(ओळखतो.)

**विवरण** - पुन्हा-पुन्हा जन्म घेणारे म्हणजे जन्माला येणारे आणि पुन्हा-पुन्हा मरणारे जेवढे काही प्राणिमात्र

आहेत अर्थात भिन्न-भिन्न स्थूल आणि सूक्ष्म शरीराच्या संयोग आणि वियोगापासून ज्यांचे जन्माला येणे आणि जाणे (मरणे) मानले आहे अशा क्षणभंगूर आणि विनाशी प्राणिमात्रामध्ये नाश न पावणाऱ्या अविनाशी, प्रकृतिपासून सर्वथा अतीत असणाऱ्या, निर्विकार आणि असंगरूपाने सर्वत्र समानरूपाने स्थित असणाऱ्या परमतत्त्वाला जो पुरुष पाहातो तोच यथार्थ पाहातो या विपरीत जो या शरीराच्या संबंधाने जन्म-मरणशील आणि सुखी-दु:खी स्वत:ला समजतो त्याचे पाहणे यथार्थ नाही म्हणजे तो वास्तविक पाहात नाही.

**व्याकरणम्** - **य:** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **विनश्यत्सु** - वि+नश् च.ग.प.प.कर्त.शतृ=विनश्यत् वि.पु.स.ब.व. **सर्वेषु** - सर्व सर्व.पु.स.ब.व. **भूतेषु** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.स.ब.व. **समम्** - सम वि.पु.द्वि.ए.व. **तिष्ठन्तम्** - स्था प्र.ग.प.प.कर्त.शतृ=तिष्ठत् वि.पु.द्वि.ए.व. **अविनश्यन्तम्** - अ+वि+नश् च.ग.प.प.कर्त.शतृ=अविनश्यत् वि.पु.द्वि.ए.व. **परमेश्वरम्** - परम वि. ईश्वर पु.द्वि.ए.व. **पश्यति** - दृश् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **पश्यति** - दृश् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **परमेश्वरम्** - परमश्चासौ ईश्वरश्चेति परमेश्वर: = मोठा ईश्वर**(कर्म.स.)** **अविनश्यन्तम्** - न विनश्यतीति अविनश्यन् तमविनश्यन्तम् = जो विनाशी नाही तो अविनाशी त्याला**(न.त.स.)** **तिष्ठन्तम्** - तिष्ठतीति तिष्ठन् तं तिष्ठन्तम् = राहतो असा राहणारा त्या राहणाऱ्याला**(वि.)**

परमेश्वराला सर्वत्र समभावाने स्थित पहाण्याचे फल -

**समं पश्यन्हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ।**

**न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ॥२८॥**

**अन्वय:** - हि, सर्वत्र, समवस्थितम्, ईश्वरम्, समम्, पश्यन्, आत्मना, आत्मानम्, न, हिनस्ति, तत:, पराम्, गतिम्, याति ।

**अन्वयार्थ:** - **हि** - कारण **सर्वत्र** - सर्व प्राणिमात्रामध्ये **समवस्थितम्** - चांगल्याप्रकारे (समान रूपाने) अवस्थित असलेल्या **ईश्वरम्** - परमात्म्याला **समम्** - समानरूपाने **पश्यन्** - पाहणारा (पहात असताना) **आत्मना** - आपल्या द्वारा **आत्मानम्** - आपलीच **न हिनस्ति** - हिंसा करत नाही (म्हणजे आपला घात करीत नाही) **तत:** - (त्यानंतर) म्हणून अशा प्रकारांनी पहाणारा तो पुरुष **पराम्, गतिम्** - श्रेष्ठ गतिला **याति** - प्राप्त होतो.

**विवरण** - वास्तविक पाहिले तर परमात्मतत्त्व सर्व प्राणिमात्रामध्ये समानरूपाने अवस्थित आहे; परंतु, आज्ञानामुळे आम्हाला भिन्न-भिन्न रूपाने प्रतीत होते; परंतु जो पुरुष समान भावाने सर्वामध्ये स्थित असलेल्या परमतत्त्वाला पाहातो तो पुरुष स्वत: नष्ट होत नाही आणि तो सदा-सर्वदा मृत्युरूपी संसार सागरापासून मुक्त होऊन परम (श्रेष्ठ) गतिला प्राप्त होतो.

**व्याकरणम्** - **हि** - हि क्रि.वि.अ. **सर्वत्र** - सर्व+त्रल्=सर्वत्र अ. **समवस्थितम्** - सम्+अव+स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.द्वि.ए.व. **ईश्वरम्** - ईश् द्वि.ग.आ.प.+वरच्=ईश्वर पु.द्वि.ए.व. **समम्** - सम वि.पु.द्वि.ए.व. **पश्यन्** - दृश् प्र.ग.प.प.कर्त.शतृ=पश्यत् वि.पु.प्र.ए.व. **आत्मना** - आत्मन् पु.तृ.ए.व. **आत्मानम्** - आत्मन् पु.द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **हिनस्ति** - हिंस् स.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **तत:** - तद् +तसिल्=ततस् अ. **पराम्** - परा वि.स्त्री.द्वि.ए.व. **गतिम्** - गति स्त्री.द्वि.ए.व. **याति** - या द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थः - समवस्थितम्** - सम्यगवस्थितः समवस्थितस्तं समवस्थितम् = चांगल्या प्रकारांनी स्थित असलेल्याला**(गति.स.) गतिम्** - गम्यते-प्राप्यत इति गतिस्तां गतिम्-आत्मप्राप्तिम् = प्राप्त केली जाते ती ग ति तिला**(वि.) पश्यन्** - पश्यतीति पश्यन्-अवलोकयन् = पहात असता**(वि.)**

आत्म्याला अकर्ता पहाणाऱ्याची प्रशंसा -

**प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः।**

**यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति ॥२९॥**

**अन्वयः** - च, यः, कर्माणि, सर्वशः, प्रकृत्या, एव, च, क्रियमाणानि, पश्यति, तथा, आत्मानम्, अकर्तारम्, सः, पश्यति।

**अन्वयार्थः - च** - आणि **यः** - जो पुरुष **कर्माणि** - सर्वकर्मे **सर्वशः -** सर्वप्रकारे **प्रकृत्या एव च** - प्रकृतिकडूनच **क्रियमाणानि** - केली जातात असे **पश्यति** - पहातो **तथा** - त्याचप्रमाणे **आत्मानम्** - आत्म्याला **अकर्तारम्** - अकर्ता **पश्यति** - पहातो **सः** - तो **पश्यति** - यथार्थपणे पहातो.

**विवरण** - जो पुरुष सर्वकर्मे प्रकृतिकडून झालेली आहेत असे पहातो त्याचप्रमाणे आत्मा नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त आणि सर्वप्रकारच्या विकारापासून रहित प्रकृतिच्याबरोबर त्याचा यत्किंचिन्मात्र संबंध नाही आणि कोणत्याही कर्माचा कर्ता तसेच कर्मफलाचा भोक्ता नाही अशा प्रकारच्या आत्म्याला जो जाणतो तोच वास्त विक यथार्थ जाणतो.

**व्याकरणम् - च** - च उभ.अ. **यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **कर्माणि** - कर्मन् न.द्वि.ब.व. **सर्वशः** - सर्वशस् अ. **प्रकृत्या** - प्रकृति स्त्री.तृ.ए.व. **एव च** - निश्चयार्थक अ. **क्रियमाणानि** - कृ.अ.ग.उ.प.+णिच्+शानच्= क्रियमाण वि.न.द्वि.ब.व. **पश्यति** - दृश् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **अकर्तारम्** - अ+कृ अ.ग.उ.प.+तृच्=अकर्तृ पु.द्वि.ए.व. **पश्यति -** दृश् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **पश्यति** - दृश् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थः - अकर्तारम्** - करोतीति कर्ता न कर्तेत्यकर्ता तमकर्तारम्-क्रियारहितम् = जो कर्ता नाही तो अकर्ता त्याला**(न.त.स.) क्रियमाणानि** - क्रियन्त इति क्रियमाणानि = केल्या जातात ती.**(वि.)**

संसाराला परमात्म्यामध्ये स्थित आणि परमात्म्यापासून उत्पन्न होणारा असे पहाण्याचे फल -

**यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति।**

**तत एव च विस्तारं ब्रह्म सम्पद्यते तदा ॥३०॥**

**अन्वयः** - यदा, भूतपृथग्भावम्, एकस्थम्, च, ततः, एव, विस्तारः, अनुपश्यति, तदा, ब्रह्म, सम्पद्यते।

**अन्वयार्थः - यदा** - ज्यावेळी **भूतपृथग्भावम्** - भूतांच्या वेगवेगळ्या भावांना **एकस्थम्** - एक आत्म्याच्या ठिकाणी अवस्थित आहे असे **च** - आणि **ततः एव**- त्या परमात्म्यापासूनच सर्व प्राण्यांचा **विस्तारम्** - विस्तार **अनुपश्यति** - पहातो **तदा** - त्यावेळी **ब्रह्म सम्पद्यते** - तो पुरुष ब्रह्माला प्राप्त होतो.

**विवरण** - जो पुरुष शास्त्र आणि आचार्य यांच्या उपदेशाचे श्रवण करून त्यापासून प्राप्त झालेल्या शुद्ध

ज्ञानाने जगतितलावर दिसणाऱ्या भिन्न-भिन्न प्राणिमात्रांना ज्यावेळी एक परमात्म्यामध्येच स्थित तसेच त्यांचा विस्तार सुद्धा परमात्म्यापासूनच झाला आहे असे पहातो त्यावेळी तो साधक परमतत्त्वाला प्राप्त होतो.

**व्याकरणम्** - **यदा** - यदा कालवाचक तद्धि.अ. **भूतपृथग्भावम्** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. पृथक् अ. भाव पु.द्वि.ए.व. **एकस्थम्** - एक संख्या वा.वि.स्थ वि.पु.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **ततः** - तद्+त सिल्=ततस् अ. **एव** - एव निश्चयार्थक अ. **विस्तारम्** - विस्तार पु.द्वि.ए.व. **अनुपश्यति**- अनु+दृश् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **तदा** - तदा कालवाचक अ. **ब्रह्म** - ब्रह्मन् न.द्वि.ए.व. **सम्पद्यते** - सम्+पद् च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **भूतपृथग्भावम्** - भूतानां चराचराणाम् पृथग्भाव:-देवमनुष्यतिर्यगादिवैचित्र्यं भूतपृथग्भावस्तं भूतपृथग्भावम् = भूतांच्या पृथक्-पृथक् भावाला**(ष.त.स.)** **एकस्थम्** - एकस्मिन् ईश्वरे तिष्ठतीति एकस्थस्तमेकस्थम् = एक आत्म्याच्या ठिकाणी स्थित असणाऱ्याला**(स.त.स.)** **तदा** - तस्मिन्निति तदा = त्यावेळी**(त.वि.)**

अविनाशी परमात्मा गुणातीत असल्यामुळे तो कर्ता नाही आणि लिप्त होणारा नाही या विषयाचे कथन -

**अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्ययः ।**

**शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते ॥३१॥**

**अन्वयः** - कौन्तेय, अनादित्वात्, निर्गुणत्वात्, अयम्, परमात्मा, अव्ययः, शरीरस्थः, अपि, न, करोति, न, लिप्यते ।

**अन्वयार्थः - कौन्तेय** - हे कुंतिपुत्र अर्जुना! **अनादित्वात्** - अनादि **च** - आणि **निर्गुणत्वात्** - निर्गुण असल्यामुळे **अयम्, परमात्मा अव्ययः** - हा परमात्मा अविनाशी आहे **शरीरस्थः अपि** - शरीरामध्ये स्थित असला तरी देखील **न करोति** - वास्तविक स्वतः काही करीत नाही आणि **न लिप्यते** - सर्वकर्मापासून अ लिप्त असल्यामुळे तो कर्मफलापासून लिप्त होत नाही.

**विवरण** - परमात्म्याचा कोणी आदि-कारण नाही. कारण ज्याची उत्पत्ति होते ते उत्पत्तिशील पदार्थ कोणत्या तरी कारणाचे कार्य असतात म्हणजे त्यांचे कोणी तरी कारण असते. परंतु, परमात्मा उत्पत्ति रहित आहे म्हणून तो कोणत्याही कारणाचे कार्य नाही म्हणजे त्याचे कोणी कारण होवू शकत नाही, त्याचप्रमाणे प्रकृति आणि प्रकृतिच्या गुणापासून तो सर्वथा अतीत असल्यामुळे गुणांचे जे कार्य आहे. त्याच्याशी त्याचा कोणत्याही कालामध्ये आणि कोणत्याही अवस्थेमध्ये संबंध राहात नाही म्हणून तो निर्गुण आहे. अशा या उपर्युक्त गुणांनी युक्त अविनाशी परमात्मा शरीरांमध्ये स्थित असून सुद्धा वास्तविक स्वतः काही करीत नाही आणि कोणत्याही कर्मफलाने लिप्त होत नाही.

**व्याकरणम् - कौन्तेय -** कौन्तेय पु.संबो.ए.व. **अनादित्वात्** - अनादित्व वि.पु.पं.ए.व. **निर्गुणत्वात्** - निर्गुणत्व वि.पु.पं.ए.व. **अयम्** - इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **परमात्मा** - परम वि. आत्मन् पु.प्र.ए.व. **अव्ययः** - अव्यय वि.पु.प्र.ए.व. **शरीरस्थः** - शरीर न.स्थ वि.पु.प्र.ए.व. **अपि** - अपि अ. **न** - न क्रि.वि.अ. **करोति** - कृ अ.ग.उ.प.(प.प.)वर्त.तृ.पु.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **लिप्यते** - लिप् ष.ग.उ.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - शरीरस्थः** - अन्तर्यामितया शरीरे तिष्ठतीति शरीरस्थः-अयं प्रसिद्धः परमात्मा परमेश्वरः = शरीरामध्ये राहणारा**(स.त.स.) निर्गुणत्वात्** - निर्गतानि-सत्त्वरजस्तमांसि यस्मात् स निर्गुणस्तस्य भावो निर्गुणत्वं तस्मान्निर्गुणत्वात् = निघून गेले आहेत सत्त्व, रज आणि तम ज्याच्यापासून तो त्याचा भाव निर्गुणत्व त्यामुळे**(ब.स.)** यद्वा **निर्गुणत्वात्** - गुणाः-शब्दादयो वाऽपीच्छादयस्तेभ्यो निर्गतो यः स निर्गुणो निर्गुणस्य भावो निर्गुणत्वं तस्मात् निर्गुणत्वात् = गुण-शब्दादि अथवा इच्छादि त्यांहून रहित जो तो निर्गुण निर्गुणाचा भाव निर्गुणत्व असल्यामुळे**(पं.ग.ब.स.भावार्थे तद्धि.त्वल् प्रत्ययान्त वि.)** यद्वा **निर्गुणत्वात्** - गुणाः-गुणकार्यभूताः प्राणादयः षोडशकलाः शब्दवाच्यास्तेभ्यो निर्गतत्वान्निर्गुणः-निरवयवो निर्गुणस्य भावो निर्गुणत्वं तस्मात् निर्गुणत्वात् = गुण म्ह. गुणांचे कार्यभूत षोडशकला शब्दाच्याद्वारा वाच्य प्राण आदि त्यांच्या पासून रहित निर्गुण म्ह. निरवयव निर्गुणाचा भाव निर्गुणत्व असल्यामुळे**(पं.ग.भावार्थे तद्धि.त्वल् प्रत्ययान्त वि.) अनादित्वात्** - न विद्यते आदिः-उत्पत्तिकारणं निमित्तमुपादानं वाऽस्येत्यनादिरनादेर्भावोऽनादित्वं तस्मादनादित्वात् = नाही आदि-उत्पत्तिकारण निमित्त अथवा उपादानकारण ज्याला तो अनादि त्याचा भाव अनादित्व त्यामुळे**(नञ् त.ग.भावार्थे तद्धि.त्वल् प्रत्ययान्त वि.)** यद्वा **अनादित्वात्** - न विद्यते आदिः-आदिमविकारो जनिलक्षणो भावधर्मो यस्य सोऽनादिरनादेर्भावोऽनादित्वं तस्मादनादित्वात् = नाही आदि-प्रथम विकार उत्पत्तिलक्षण भावधर्म ज्याचा तो अनादि त्याचा भाव अनादित्व त्यामुळे**(नञ् त.ग.ष.ब.स.ग.भावार्थे तद्धि.त्वल् प्रत्ययान्त वि.) परमात्मा** - परमश्चाऽसावात्मेति परमात्मा = परमरूप आत्मा परमात्मा**(कर्म.स.) अव्ययः** - न विद्यते व्ययः-नाशोऽस्येत्यव्ययः = नाही होत ज्याचा व्यय-नाश तो अव्यय**(ब.स.) कौन्तेय** - कुन्त्या अपत्यं पुमान् कौन्तेयस्तत्सम्बुद्धौ कौन्तेय = कुंतीचा अपत्य (पुत्र) कौंतेय-अर्जुन त्याचे संबोधनामध्ये हे कौंतेय-हे अर्जुन**(अपत्यर्थे तद्धि.वि.)**

आकाशाच्या दृष्टांताने प्रकाशस्वरूप आत्म्याच्या अकर्तेपणाचे कथन -

**यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ।**

**सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ॥३२॥**

**अन्वयः -** यथा, सर्वगतम्, आकाशम्, सौक्ष्म्यात्, न, उपलिप्यते, तथा, देहे, सर्वत्र, अवस्थितः, आत्मा, न, उपलिप्यते ।

**अन्वयार्थः - यथा** - ज्याप्रमाणे **सर्वगतम्** - सर्वठिकाणी व्याप्त असलेले **आकाशम्** - आकाश **सौक्ष्म्यात्** - सूक्ष्म असल्यामुळे **न उपलिप्यते** - कोणत्याही वस्तुमुळे लिप्त होत नाही **तथा** - त्याप्रमाणे **देहे सर्वत्र** - देहामध्ये सर्वठिकाणी **अवस्थितः आत्मा** - अवस्थित असलेला आत्मा **न उपलिप्यते -** देहधर्माच्या संबंधाने लिप्त होत नाही.

**विवरण** - ज्याप्रमाणे आकाश व्यापक तसेच सूक्ष्म असल्यामुळे कोणत्याही वस्तुच्या द्वारा लिप्त होत नाही. त्याचप्रमाणे परमात्मासुद्धा सर्वप्राणिमात्रांच्या शरीरामध्ये अवस्थित असून सुद्धा देहधर्माच्याद्वारा लिप्त होत नाही.

**व्याकरणम् - यथा** - यथा क्रि.वि.अ. **सर्वगतम्** - सर्व वि. गम् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **आकाशम्** - आकाश न.प्र.ए.व. **सौक्ष्म्यात्** - सुक्ष्म्+ष्यञ्=सौक्ष्म्य न.पं.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **उप**

**लिप्यते** - उप+लिप् ष.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व. **देहे** - देह पु.स.ए.व. **सर्वत्र** - सर्व+त्रल्=सर्वत्र अ. **अव स्थित:** - अव+स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **आत्मा** - आत्मन् पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **उपलिप्यते** - उप+लिप् ष.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **सर्वगतम्** - सर्वेषु-घटमठादिषु दृष्टेष्वदृष्टेषु गतम्-प्राप्तं सर्वगतम् = सर्वामध्ये म्हणजे घटमठामध्ये अथवा दृष्ट अदृष्टामध्ये व्याप्त असलेले**(स.त.स.)** **सौक्ष्म्यात्** - सूक्ष्माणां भाव: सौक्ष्म्यं तस्मात् सौक्ष्म्यात् = सूक्ष्माचा भावच सौक्ष्म्य आहे त्यामुळे**(भावार्थे.तद्धि.वि.)** **आकाशम्** - आसमन्तात् काशते प्रकाशत इति आकाशम् = सर्वबाजूंनी प्रकाश करणारे-व्याप्त असणारे ते आकाश**(त.वि.)**

सूर्याच्या दृष्टांताने प्रकाशस्वरूप आत्मा क्षेत्रक्षेत्रज्ञाला प्रकाशित करतो असे कथन -

**यथा प्रकाशयत्येक: कृत्स्नं लोकमिमं रवि: ।**

**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥३३॥**

**अन्वय:** - भारत, यथा, एक:, रवि:, इमम्, कृत्स्नम्, लोकम्, प्रकाशयति, तथा, क्षेत्री, कृत्स्नम्, क्षेत्रम्, प्रकाशयति ।

**अन्वयार्थ:** - **भारत** - भरतवंशात उत्पन्न झालेल्या अर्जुना! **यथा** - ज्याप्रमाणे **एक: रवि:** - एक सूर्य **इमम्, कृत्स्नम्, लोकम्** - या संपूर्ण लोकाला **प्रकाशयति** - प्रकाशित करतो **तथा** - त्याप्रमाणे **क्षेत्री** - क्षेत्रज्ञ **कृत्स्नम्, क्षेत्रम्** - सर्व क्षेत्राला (शरीराला) **प्रकाशयति** - प्रकाशित करतो.

**विवरण** - ज्याप्रमाणे एकच सूर्य ब्रह्माण्डामध्ये असून सर्व लोकांना प्रकाशित करतो त्याप्रमाणे एकच अ विनाशी परमात्मा क्षेत्रज्ञ सर्व क्षेत्राला (शरीराला) प्रकाशित करतो.

**व्याकरणम्** - **भारत** - भारत पु.संबो.ए.व. **यथा** - यथा क्रि.वि.अ. **एक:** - एक संख्या वा.वि.पु.प्र.ए.व. **र वि:** - रवि पु.प्र.ए.व. **इमम्** - इदम् सर्व.पु.द्वि.ए.व. **कृत्स्नम्** - कृत्स्न वि.पु.द्वि.ए.व. **लोकम्** - लोक पु. द्वि.ए.व. **प्रकाशयति** - प्र+काश् च.ग./प्र.ग.आ.प./द.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **तथा** - तथा क्रि.वि.अ. **क्षेत्री** - क्षेत्र्+इनि=क्षेत्रिन् पु.प्र.ए.व. **कृत्स्नम्** - कृत्स्न वि.न.द्वि.ए.व. **क्षेत्रम्** - क्षेत्र न.द्वि.ए.व. **प्रकाशयति** - प्र+काश् द.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **क्षेत्री** - क्षेत्राणि विद्यन्तेऽस्येति क्षेत्री = संपूर्ण क्षेत्र आहेत ज्याचे जो**(अस्त्यर्थे त.वि.)** **लोकम्** - लोक्यत इति लोकस्तं लोकम्-भूर्भूव: स्वरादि लोकम् = पाहिल्या जाते तो लोक त्याला-भूर्भूवर् स्वरादि लोकाला**(त.वि.)**

क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या भेदाला जाणण्याचे फल भगवत्प्राप्ति दाखविणे -

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा ।**

**भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम् ॥३४॥**

**अन्वय:** - ये, एवम्, क्षेत्रक्षत्रज्ञयो:, अन्तरम्, च, भूतप्रकृतिमोक्षम्, ज्ञानचक्षुषा, विदु:, ते, परम्, यान्ति ।

**अन्वयार्थ:** - **ये** - जे पुरुष **एवम्** - याप्रमाणे **क्षेत्रक्षेत्रज्ञयो:** - क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ या दोन्हीचे **अन्तरम्** - अन्तर

(भेद) **च** - आणि **भूतप्रकृतिमोक्षम्** - भूतांच्या प्रकृतिची मुक्तता म्हणजे तीचे विनाशित्व अथवा-भूतांच्या प्रकृतीचा ज्ञानाने होणारा अभाव **ज्ञानचक्षुषा** - ज्ञान दृष्टिने **विदुः** - जाणतात **ते** - पुरुष **परम्** - परमतत्त्वाला **यान्ति** - प्राप्त होतात.

**विवरण** - या प्रमाणे क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या भेदाला म्हणजे क्षेत्र जड आहे, क्षेत्रज्ञ चेतन आहे तसेच क्षेत्र विनाशी, क्षेत्रज्ञ अविनाशी आहे अशा प्रकारच्या भेदाला तसेच कार्यासहित प्रकृतिपासून मुक्त होण्याकरिता जे पुरुष तत्त्वत: जाणतात ते ज्ञानीजन परब्रह्माला प्राप्त होतात.

**व्याकरणम्** - **ये** - यत् सर्व.पु.प्र.ब.व. **एवम्** - एवम् क्रि.वि.अ. **क्षेत्रक्षेत्रज्ञयो:** - क्षेत्र न. क्षेत्रज्ञ वि.पु.ष. द्वि.व. **अन्तरम्** - अन्तर वि.न.द्वि.ए.व. **च** - उभ.अ. **भूतप्रकृतिमोक्षम्** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. प्रकृति स्त्री. मोक्ष पु.द्वि.ए.व. **ज्ञानचक्षुषा** - ज्ञान न. चक्षुस् न.तृ.ए.व. **विदुः** - विद् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **ते**- तत् सर्व.पु.प्र.ब.व. **परम्** - पर वि.पु.द्वि.ए.व. **यान्ति** - या द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **क्षेत्रक्षेत्रज्ञयो:** - क्षेत्रञ्च-शरीरञ्च, क्षेत्रज्ञ:-अन्तर्यामी चेति क्षेत्रक्षेत्रज्ञौ तयो: क्षेत्रक्षेत्रज्ञयो:- प्रकृतिपुरुषयो: = क्षेत्र आणि क्षेत्रज्ञांचे**(द्वं.स.) ज्ञानचक्षुषा** - निरुक्तामानित्वादिसाधनसंपत्त्या तीव्रमोक्षेच्छया च सम्यकूकृत श्रवणादिना समुत्पन्नं यत् ज्ञानं क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्याथार्थ्यग्रहणक्षममतिसूक्ष्मं तदेव चक्षुस्तेन ज्ञानचक्षुषा = ज्ञानचक्षुने निरुक्त अमानित्व आदि साधन संपत्तिने आणि तीव्र मोक्षाच्या इच्छेने चांगल्या प्रकारे अनुष्ठित श्रवणादिच्या द्वारा उत्पन्न जे क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या यथार्थ स्वरूपाला ग्रहण करण्यामध्ये समर्थ अतिसूक्ष्म जे ज्ञानच चक्षु आहे त्याच्या द्वारा म्ह. विवेकनेत्राने**(कर्म.स.) भूतप्रकृतिमोक्षम्** - भूतानिच प्रकृतिश्चेति, भूतप्रकृती ताभ्यां मोक्षमिति भूतप्रकृतिमोक्षम् = भूत आणि प्रकृतिपासून मोक्ष**(द्वं.स.ग.पं.त.स.)** यद्वा **भूतप्रकृतिमोक्षम्** - भूतानां प्रकृति:-अविद्यालक्षणा-अव्यक्ताख्या भूतप्रकृतिस्तस्या: भूतप्रकृते: मोक्षणं-अभावगमनं चेति भूतप्रकृतिमोक्षम् = भूतांची प्रकृति-अविद्यारूप-अव्यक्तसंज्ञक भूतप्रकृति त्या भूतप्रकृतीचे मोक्षण-अभावगमन-प्रकृतीचा अभाव होणे हे भूतप्रकृतिमोक्ष आहे**(ष.त.ग.ष.त.स.)**

**ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे**

**श्रीकृष्णार्जुनसंवादे क्षेत्रक्षेत्रज्ञविभागयोगो नाम त्रयोदशोऽध्याय: ॥१३॥**

**-: अध्याय तेरावा समाप्त :-**

**ॐ श्रीपरमात्मने नम:**

**अथ चतुर्दशोऽध्याय:**

**अध्याय १४ वा**

भगवान म्हणतात की, ज्ञान हे बाहेरून येत नाही तर ते ज्याचे त्याच्या जवळच असते. येवढेच नव्हे तर ते त्याचे स्वरूपच आहे. परंतु, जीवाला भवस्वर्गातील नाशिवंत विषयाची चटक लागली त्यामुळे या जवळच्या ज्ञानाला विसरला; परंतु, जर जीवाने विषयात गुंतलेले मन पुन्हा अंतर्मुख करून या सर्वोत्कृष्ट ज्ञानाकडे लावले, तर त्याच्या मागची जन्ममरण दु:खाची परंपरा कायमची सुटून तो माझ्या स्वरूपाला प्राप्त होईल व मी जेवढा अनंत व आनंद स्वरूप आहे तेवढा तो होईल. म्हणून भगवान म्हणतात की, असे हे परम ज्ञान मी पुन्हा तुला सांगतो.

**श्रीभगवानुवाच** - भगवान म्हणाले.

**परं भूय: प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् ।**

**यज्ज्ञात्वा मुनय: सर्वे परां सिद्धिमितो गता: ॥१॥**

**अन्वय:** - ज्ञानानाम्, उत्तमम्, परम्, ज्ञानम्, भूय:, प्रवक्ष्यामि, यत्, ज्ञात्वा, सर्वे, मुनय:, इत:, पराम्, सिद्धिम्, गता: ।

**अन्वयार्थ:** - **ज्ञानानाम्, उत्तमम्, परम्, ज्ञानम्** - सर्व ज्ञानामध्ये उत्तम आणि श्रेष्ठ असणारे ज्ञान अशा त्या ज्ञानाला **भूय:** - पुन्हा **प्रवक्ष्यामि** - मी तुला सांगेन **यत्** - ज्या ज्ञानाला **ज्ञात्वा** - जाणून **सर्वे मुनय:** - सर्व मुनिजन **इत:** - या संसारापासून मुक्त होऊन **पराम्, सिद्धिम्** - श्रेष्ठ अशा सिद्धिला **गता:** - प्राप्त झाले आहेत.

**विवरण** - परमात्म्याच्या स्वस्वरूपाला प्रत्यक्ष करणाऱ्या आणि जीवात्म्याला मायेच्या बंधनापासून सदासर्वदाकरिता सर्वथा मुक्त करणाऱ्या अशा या सर्व ज्ञानामध्ये अत्यंत उत्तम आणि श्रेष्ठ असणाऱ्या ज्ञानाला पुन्हा मी तुला सांगेन. ज्या ज्ञानाला चांगल्या प्रकारांनी जाणून मुनीनि लोक या विनाशी तसेच क्षणभंगुर संसारापासून मुक्त होऊन परम-श्रेष्ठ या नावाने प्रसिद्ध असणाऱ्या अशा या सिद्धिला प्राप्त झाले आहेत.

**व्याकरणम्** - **ज्ञानानाम्** - ज्ञान न.ष.ब.व. **उत्तमम्** - उत्तम वि.न.द्वि.ए.व. **परम्** - पर वि.न.द्वि.ए.व. **ज्ञानम्** - ज्ञान न.द्वि.ए.व. **भूय:** - भूयस् अ. **प्रवक्ष्यामि** - प्र+वच् द्वि.ग.प.प.द्वि.भवि.प्र.पु.ए.व. **यत्** - यत् सर्व.न.द्वि.ए.व. **ज्ञात्वा** - ज्ञा न.ग.उ.प.त्वान्त अ. **सर्वे** - सर्व सर्व.पु.प्र.ब.व. **मुनय:** - मुनि पु.प्र.ब.व. **इत:** - इदम्+तसिल्=इतस् अ. **पराम्** - परा वि.स्त्री.द्वि.ए.व. **सिद्धिम्** - सिद्धि स्त्री.द्वि.ए.व. **गता:** - गम् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **उत्तमम्** - उद्गतं तमस्तमोगुणो यस्मात् तदुत्तमम्-उत्कृष्टम् = गेला आहे तमोगुण ज्याच्यापासून ते**(ब.स.) मुनय:** - यथाश्रुतं मननशीला मुनय:-संन्यासिन: यद्वा वेदशास्त्रार्थतत्त्वावगन्तार इति मुनय: = जसे श्रवण केले त्याप्रमाणे मनन करणारे अथवा वेद तसेच शास्त्राच्या अर्थाला अथवा तत्त्वाला यथार्थ जाणणारे ते म्ह. ब्रह्मविद् शुक आदि यति**(त.वि.)**

**इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागता: ।**

**सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च ॥२॥**

**अन्वय:** - इदम्, ज्ञानम्, उपाश्रित्य, मम, साधर्म्यम्, आगता:, सर्गे, अपि, न, उपजायन्ते, च, प्रलये, (अ पि), न, व्यथन्ति ।

**अन्वयार्थ: - इदम्, ज्ञानम्** - या ज्ञानाला **उपाश्रित्य** - आश्रित करून **मम** - माझ्या **साधर्म्यम्** - स्वरूपाला **आगता:** - प्राप्त झालेले ज्ञानी लोक **सर्गे अपि** - सृष्टिच्या आरंभाला सुद्धा **न उपजायन्ते** - उत्पन्न होत नाहीत **च** - आणि **प्रलये (अपि)** - प्रलयकाळाच्या वेळी (सुद्धा) **न व्यथन्ति** - पीडित (दु:खित) होत नाहीत.

**विवरण** - अशा या परम आणि उत्कृष्ट ज्ञानाचा आश्रय करून माझ्या स्वरूपामध्ये समाहित स्थिर असलेले मुनि लोक सृष्टिच्या आरंभी पुन्हा उत्पन्न होत नाहीत आणि प्रलयकाळाच्या वेळी सुद्धा पीडीत होत नाहीत. वास्तविक पाहिले तर त्याचा सृष्टिच्या आरंभी आणि प्रलयाबरोबर यत्किंचिन्मात्रही संबंध राहात नाही. कारण की, चांगल्या आणि वाईट योनिमध्ये जन्म होण्याचे मुख्य कारण गुणांचा संग परंतु मुनिलोक त्यांच्यापासून सर्वथा मुक्त झालेले असतात म्हणून त्यांचे केव्हाच पुनरागमन होत नाही.

**व्याकरणम् - इदम्** - इदम् सर्व.न.द्वि.ए.व. **ज्ञानम्** - ज्ञान न.द्वि.ए.व. **उपाश्रित्य** - उप+आ+श्रि प्र.ग.उभ.प.ल्यबन्त अ. **मम** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **साधर्म्यम्** - साधर्म्य वि.न.द्वि.ए.व. **आगता:** - आ+गम् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **सर्गे** - सर्ग पु.स.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **उपजायन्ते** - उप+जन् च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व. **च** - च उभ.अ. **प्रलये** - प्रलय पु.स.ए.व. **अपि** - अपि अ. **न** - न क्रि.वि.अ. **व्यथन्ति** - व्यथ् प्र.ग.उ.प.(प.प.)वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था: - साधर्म्यम्** - समानधर्मस्य भाव: साधर्म्यम् = समान धर्माचा भाव आहे साधर्म्य त्या साधर्म्याला**(भावार्थे तद्धि.वि.)**

प्रकृती पुरुषाच्या संयोगाने सर्वभूतांच्या उत्पत्तिचे कथन -

**मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम् ।**

**सम्भव: सर्वभूतानां ततो भवति भारत ॥३॥**

**अन्वय:** - भारत, मम, महद्ब्रह्म, योनि:, तस्मिन्, अहम्, गर्भम्, दधामि, तत:, सर्वभूतानाम्, सम्भव:, भव ति ।

**अन्वयार्थ: - भारत** - हे भरतकुलोत्पन्न अर्जुना! **मम** - माझी **महद्ब्रह्म** - त्रिगुणात्मिका प्रकृती **योनि:** - सर्वभूतांना धारण करणारी योनि (कारण) आहे **तस्मिन्** - त्या योनिमध्ये **अहम्** - मी (ईश्वर) **गर्भम्** - सर्व प्रा णिमात्रांच्या उत्पत्तिचे बीज **दधामि** - स्थापित करतो **तत:** - त्यापासून **सर्वभूतानाम्** - सर्वप्राणिमात्रांची **सम्भव:** - उत्पत्ति **भवति** - होते.

**विवरण** - हे अर्जुना! माझी जी सर्व जगाला मूल कारण असणारी त्रिगुणात्मिका महद्ब्रह्मा प्रकृती सर्वभूतांना धारण करण्याकरिता कारण असून मी तिच्यामध्ये चेतन समुदायरूपी गर्भ (बीज) स्थापन करतो. ती सर्वकार्यापेक्षा मोठी असल्यामुळे तीला महती म्हटले आणि सर्वांचे भरण पोषण करते म्हणून तिला ब्रह्म

म्हटले अशा या उपर्युक्त मूल प्रकृतिपासून संपूर्ण चराचर प्राणिमात्रांची उत्पत्ति होते.

**व्याकरणम् - भारत** - भारत पु.संबो.ए.व. **मम** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **महद्ब्रह्म** - महत् वि. ब्रह्मन् न.प्र.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **गर्भम्** - गर्भ पु.द्वि.ए.व. **दधामि** - धा तृ.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **ततः** - तद्+तसिल्=ततस् अ. **सर्वभूतानाम्** - सर्व सर्व.वि. भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.ष.ब.व. **सम्भवः** - सम्+भू प्र.ग.प.प.+अप्=सम्भव पु.प्र.ए.व. **भवति** - भू प्र.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - महद्ब्रह्म** - सर्वकार्यापेक्षयाऽधिकत्वात्कारणं महत्, सर्वकार्याणां वृद्धिहेतुत्वरूपाद् बृंहणत्वाद् ब्रह्म अव्याकृतं प्रकृतिस्त्रिगुणात्मिका माया महद्ब्रह्म = संपूर्ण कार्यापेक्षा अधिक असल्यामुळे महत्, सर्वकार्यापेक्षा मोठी असल्यामुळे ब्रह्म, अव्याकृत प्रकृती त्रिगुणात्मिका माया महद्ब्रह्म**(परिभाषा)** **सम्भवः** - सम्यक्-उत्तमप्रकारेण भवः-उत्पत्तिरिति सम्भवः = चांगल्या प्रकाराने उत्पत्ति**(वि.)**

**सर्वयोनिषु कोन्तैय मूर्तयः सम्भवन्ति याः ।**

**तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥४॥**

**अन्वयः** - कौन्तेय, सर्वयोनिषु, याः, मूर्तयः, सम्भवन्ति, तासाम्, महद्, ब्रह्म, योनिः, अहम्, बीजप्रदः, पिता ।

**अन्वयार्थः - कौन्तेय** - हे कुंतिपुत्र अर्जुना! **सर्वयोनिषु** - सर्व प्रकारच्या योनिमध्ये **याः मूर्तयः** - ज्या व्यक्ति **सम्भवन्ति** - उत्पन्न होतात **तासाम्** - त्या सर्व व्यक्तिंचे **महद्, ब्रह्म** - माझी प्रकृति **योनिः** - गर्भ धारण करण्याचे स्थान आहे **अहम्** - मी **बीजप्रदः** - बीजप्रदान करणारा **पिता** - जनक आहे.

**विवरण** - देव, मनुष्य, राक्षस, पशु आणि पक्षी आदि सर्व योनिमध्ये नाना प्रकारचे भिन्न-भिन्न वर्णयुक्त आणि आकृतियुक्त जड तसेच चेतन संयोगापासून (शरीरधारी सर्व प्राण्यांची उत्पत्ति) होत असल्यामुळे प्रकृति सर्वांचे गर्भ धारण करणारी माता आणि मी प्रकृतिमध्ये बीजाला धारण करविणारा पिता आहे.

**व्याकरणम् - कौन्तेय** - कौन्तेय पु.संबो.ए.व. **सर्वयोनिषु** - सर्व वि. योनि स्त्री.स.ब.व. **याः** - या यद् सर्व.स्त्री.प्र.ब.व. **मूर्तयः** - मूर्ति स्त्री.प्र.ब.व. **सम्भवन्ति** - सम्+भू प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **तासाम्** - तत् सर्व.स्त्री.ष.ब.व. **महद् ब्रह्म** - महत् वि. ब्रह्मन् न.प्र.ए.व. **योनिः** - योनि स्त्री.प्र.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **बीजप्रदः** - बीज न. प्र+दा तृ.ग.उ.प.+क=प्रद वि.पु.प्र.ए.व. **पिता** - पितृ पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - सर्वयोनिषु** - सर्वाश्च ता योनयश्च सर्वयोनयस्तासु सर्वयोनिषु = देव-पितृ-मनुष्य-पशु मृगादि सर्व योनिषु-चराचरादि सर्व योनिमध्ये**(कर्म.स.)** **बीजप्रदः** - बीजम्-गर्भधानं प्रददातीति बीजप्रदः-गर्भधानादि कर्ता = बीजप्रदान करणारा**(उप.स.)** **महद्ब्रह्म** - महच्च तद् ब्रह्मेति महद्ब्रह्म = मोठे ब्रह्म **(कर्म.स.)**

प्रकृतिपासून उत्पन्न झालेले जे तीन गुण त्यातील गुणाच्या द्वारा जीवात्म्याला बांधले जाण्याचे कथन -

**सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसम्भवाः ।**

**निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥५॥**

**अन्वयः -** महाबाहो, सत्त्वम्, रजः, तमः, इति, प्रकृतिसम्भवाः, गुणाः, देहे, अव्ययम्, देहिनम्, निबध्नन्ति ।

**अन्वयार्थः - महाबाहो -** हे पराक्रमी अर्जुना! **सत्त्वम् -** सत्त्व **रजः -** रज आणि **तमः -** तम **इति -** असे हे **प्रकृतिसम्भवाः गुणाः -** प्रकृतिपासून उत्पन्न झालेले तिन्ही गुण **देहे -** या शरीरात असणाऱ्या **अव्ययम्, देहिनम् -** अविनाशी जीवात्म्याला **निबध्नन्ति -** बांधतात म्हणजे बंधनामध्ये टाकतात.

**विवरण -** सत्त्व, रज आणि तम हे तिन्ही गुण एकाच प्रकृतिपासून उत्पन्न झालेले असून आपल्या या भिन्न-भिन्न सामर्थ्यांच्या द्वारा हे तिन्ही गुण शरीरामध्ये असणाऱ्या अविनाशी जीवात्म्याला बांधतात. वास्तविक पाहिले तर जीवात्म्याचा आणि गुणांचा यत्किंचिन्मात्रही संबंध नाही. परंतु, शरीराच्या अभिमानामुळे ते गुण या जीवात्म्याला बंधनामध्ये टाकतात.

**व्याकरणम् - महाबाहो -** महाबाहु पु.संबो.ए.व. **सत्त्वम् -** सत्त्व न.प्र.ए.व. **रजः -** रञ्ज् प्र.ग./च.ग.उ.प.+असुन्=रजस् न.प्र.ए.व. **तमः -** तमस् न.प्र.ए.व. **इति -** इति क्रि.वि.अ. **प्रकृतिसम्भवाः -** प्रकृति स्त्री.प्र.ए.व. सम्+भव पु.प्र.ब.व. **गुणाः -** गुण पु.प्र.ब.व. **देहे -** देह पु.स.ए.व. **अव्ययम् -** अव्यय वि.पु.द्वि.ए.व. **देहिनम् -** देहिन् पु.द्वि.ए.व. **निबध्नन्ति -** नि+बन्ध् न.ग.प.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - महाबाहो -** महान्तौ-दानकरणसमर्थौ बाहू यस्य स महाबाहुस्तत्सम्बुद्धौ महाबाहो = मोठे हात आहेत ज्याचे तो महाबाहु त्याचे संबोधनामध्ये हे महाबाहो**(ब.स.)** यद्वा **महाबाहो -** महान्तौ समर्थतरौ आजानुप्रलम्बौ बाहू यस्य स महाबाहुस्तत्सम्बुद्धौ महाबाहो = मोठे म्ह. अतिशय समर्थ जानूपर्यंत-गुडघ्यापर्यंत लोंबणारे ज्याचे बाहू आहेत तो महाबाहु संबोधनामध्ये हे महाबाहो**(ब.स.) प्रकृतिसम्भवाः -** प्रकृतेः-मायायाः सकाशात् सम्भवः-उत्पत्तिः येषां ते प्रकृतिसम्भवाः = प्रकृतिपासून उत्पत्ति आहे ज्यांची ते **(ब.स.)** यद्वा **प्रकृतिसम्भवाः -** संभवत्यस्मादिति सम्भवः-उपादानम्, प्रकृतिरेव संभवो येषां ते प्रकृतिसम्भवाः = ज्याच्याद्वारा उत्पन्न होतो तो संभव म्ह. उपादान प्रकृती ही ज्यांचा संभव आहे ते प्रकृतिसंभव**(ब.स.)** यद्वा **प्रकृतिसम्भवाः -** त्रयाणां गुणानां साम्यावस्था प्रकृतिर्माया भगवतस्तस्याः सकाशात्परस्पराङ्गाङ्गिभावेन वैषम्येण परिणताः प्रकृतिसम्भवाः = तीन गुणांची साम्य अवस्था प्रकृती आहे ती भगवतांची माया आहे तिच्या पासून परस्पर अंगांगिभावाने विषमरूपाने परिणत झाले आहेत जे गुणप्रकृतिसंभव**(परिभाषा) देहिनम् -** आध्यात्मिकसंबंधेन देहोऽस्यास्तीति देही तं देहिनम् = आध्यात्मिक संबंधाने देह आहे ज्याचा तो त्याला**(अस्त्यार्थे त.वि.)**

सत्त्वगुणाच्याद्वारा जीवात्म्याला बांधल्या जाण्याचा प्रकार -

**तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम् ।**

**सुखसङ्गेन बध्नाति ज्ञानसङ्गेन चानघ ॥६॥**

**अन्वयः -** अनघ, तत्र, सत्त्वम्, निर्मलत्वात्, प्रकाशकम्, अनामयम्, सुखसङ्गेन, च, ज्ञानसङ्गेन, बध्नाति ।

**अन्वयार्थः - अनघ -** हे पापरहित अर्जुना! **तत्र -** त्या तीन गुणामध्ये **सत्त्वम् -** सत्त्वगुण **निर्मलत्वात् -** निर्मल असल्या मुळे **प्रकाशकम् -** प्रकाश करणारा आणि **अनामयम् -** विकार रहित (उपद्रवरहित) आहे असा तो (सत्त्वगुण) **सुखसङ्गेन -** सुखाच्या संगाने (संबंधाने) **च -** आणि **ज्ञानसङ्गेन -** ज्ञानाच्या संगाने (संबंधाने) **बध्नाति -** जीवात्म्याला बांधतो.

**विवरण -** प्रकृतिपासून उत्पन्न झालेल्या तिन्ही गुणामध्ये अत्यंत निर्मल, प्रकाशक तसेच चंचलरहित असणाऱ्या सत्त्वगुणाच्या वृद्धिने दुःख, विक्षेप, दुर्गुण आणि दुराचाराचा नाश होऊन शांति प्राप्त होते. अशा प्रकारचा जो प्रकाशयुक्त आणि अनामय युक्त असणारा सत्त्वगुण तो सुखाच्या संगाने आणि ज्ञानाच्या संगाने जीवात्म्याला बांधतो म्हणजे मी सुखी आहे, मी ज्ञानी आहे अशा प्रकारच्या अभिमानाने बांधतो.

**व्याकरणम् - अनघ -** अन्+अघ वि.पु.संबो.ए.व. **तत्र -** तद्+त्रल्=तत्र अ. **सत्त्वम् -** सत्त्व न.प्र.ए.व. **निर्मलत्वात् -** निर्मलत्व वि.न.पं.ए.व. **अनामयम् -** अनामय वि.न.प्र.ए.व. **सुखसङ्गेन -** सुख न. सङ्ग पु.तृ.ए.व. **ज्ञानसङ्गेन -** ज्ञान न. सङ्ग पु.तृ.ए.व. **बध्नाति -** बन्ध् न.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अनघ -** न विद्यतेऽघम्-पातकं यस्य सोऽनघस्तत्सम्बुद्धौ हे अनघ-निष्पाप = नाही आहे अघ म्हणजे पाप ज्याचे तो**(नञ् ब.स.) अनामयम् -** न विद्यत आमयः-उपद्रवो यस्य तदनामयम्-निरुपद्रवम् = नाही आमय म्हणजे उपद्रव ज्याचा ते**(नञ् ब.स.) निर्मलत्वात् -** निर्गतानि मलानि यस्मात् तन्निर्मलं तस्य भावो निर्मलत्वं तस्मान्निर्मलत्वात् = निघून गेले आहेत मल ज्यापासून अथवा ज्यामधून ते त्याचा भाव निर्मलत्व त्यामुळे**(ब.स.ग.भावार्थे त्वल् प्रत्ययः) सुखसङ्गेन -** शब्दादीष्टविषयेन्द्रियसंपर्कजन्यं यत्सुखं तत्र सङ्गः सक्तिस्तेन सुखसङ्गेन = शब्दादि इष्ट विषय आणि इंद्रियांच्या संबंधापासून उत्पन्न जे सुख त्या सुखाच्या बरोबर असणारा संग-आसक्ति त्या सुखसंगाने**(ग.तृ.स.) ज्ञानसङ्गेन -** ज्ञानम् नानाशास्त्रार्थविचारजन्यं तत्र सङ्गः सज्जतेऽनेनेति सङ्गः-कामस्तेन ज्ञानसङ्गेन = नाना शास्त्राच्या विचाराने जनित ज्ञान त्यामध्ये जो संग तो ज्ञानसंग त्या ज्ञानसंगाने**(स.त.स.ग.तृ.स.)**

रजोगुणाच्याद्वारा जीवात्म्याला बांधल्या जाण्याचे कथन -

**रजो रागात्मकं विद्धि तृष्णासङ्गसमुद्भवम् ।**

**तन्निबध्नाति कौन्तेय कर्मसङ्गेन देहिनम् ॥७॥**

**अन्वयः** - कौन्तेय, रागात्मकम्, रजः, तृष्णासङ्गसमुद्भवम्, विद्धि, तत्, देहिनम्, कर्मसङ्गेन, निबध्नाति ।

**अन्वयार्थः** - **कौन्तेय** - हे कुंतिपुत्र अर्जुना! **रागात्मकम्, रजः** - अभिलाषारूप रजोगुण **तृष्णासङ्गसमुद्भवम्** - तृष्णा कामना आसक्ति यांच्यापासून उत्पन्न झालेला आहे असा तो **विद्धि** - समज **तत्** - तो रजोगुण **कर्मसङ्गेन** - कर्मफलाच्या आसक्तिने **देहिनम्** - जीवात्म्याला **निबध्नाति** - बांधतो.

**विवरण** - हे अर्जुना! हा रागरूप रजोगुण कामना आणि आसक्ति यांच्यापासून उत्पन्न झालेला आहे असे तू समज. अशा प्रकारचा तो रजोगुण कर्म आणि कर्मफलाच्या संगाने जीवात्म्याला बांधतो म्हणजे हे सर्वकर्म मी करतो म्हणजे मी या कर्माचा कर्ता असल्यामुळे मला या कर्माचे काहीतरी फल मिळेल अशा या कर्मफलाच्या आसक्तिने जीवात्मा बांधला जातो.

**व्याकरणम्** - **कौन्तेय** - कौन्तेय पु.संबो.ए.व. **रागात्मकम्** - राग पु. आत्मक वि.न.द्वि.ए.व. **रजः** - रजस् न.द्वि.ए.व. **तृष्णासङ्गसमुद्भवम्** - तृष्णा स्त्री. संग पु. सम्+उद्भव पु.वि.न.द्वि.ए.व. **विद्धि** - विद् द्वि.ग.प.प.कर्त.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **देहिनम्** - देहिन् पु.द्वि.ए.व. **कर्मसङ्गेन** - कर्मसङ्ग पु.तृ.ए.व. **निबध्नाति** - नि+बन्ध् न.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **तृष्णासङ्गसमुद्भवम्** - तृष्णा च-कामना च सङ्गश्च-आसक्तिश्च तृष्णासङ्गौ ताभ्यां समुद्भवः-

उत्पत्तिर्यस्य तत् तृष्णासङ्गसमुद्भवम् = तृष्णा आणि आसक्तिपासून उत्पत्ति आहे ज्याची ते**(द्वं.ग.ब.स.)** **कर्मसङ्गेन** - कर्मसु-दृष्टादृष्टार्थेषु सङ्ग:-आसक्तिस्तेन कर्मसङ्गेन = कर्मामध्ये-दृष्ट अदृष्ट अर्थामध्ये संग-आसक्ति तो कर्मसंग त्या कर्मसंगाने**(स.त.स.)** यद्वा **कर्मसङ्गेन** - कर्माण्यैहिकामुष्मिकार्थैकप्रयोजनानि लौकिकानि वैदिकानि च तेषु सङ्ग:-सक्तत्वं तत्परत्वं तेन कर्मसङ्गेन = लोक आणि परलोकरूप प्रयोजन संपादन करणाऱ्या लौकिक आणि वैदिक कर्मामध्ये तत्परता कर्मसंग त्या कर्मसंगाने**(स.त.स.)** **तृष्णासङ्गसमुद्भवम्** - अप्राप्तेष्वाशाच-तृष्णा च प्राप्तेषु ग्रहणेच्छा च-सङ्गश्चेति तृष्णासङ्गौ तयो: समुद्भव:-उत्पत्तिर्यस्मात् तत् तृष्णासङ्गसमुद्भवम् = अप्राप्ताची आशा-तृष्णा आणि प्राप्ताच्या ग्रहणाची इच्छा-संग या दोन्हीची उत्पत्ति आहे ज्यांच्यापासून तो**(द्वं.ग.ब.स.)** यद्वा **तृष्णासङ्गसमुद्भवम्** - रागात्मकम्-रागादि विषयेषु रज्यते पुमाननेनेति राग:-आसक्ति: स एवाऽत्मा स्वरूपं यस्य तद्रागात्मकम् = रागात्मक माला आदि विषयांमध्ये जो पुरुषाला रंजवितो तो राग म्हणजे आसक्तिच आत्मा म्हणजे स्वरूप आहे ज्याचे तो**(कर्म.ग.ब.स.)** **रागात्मकम्** - राग:-आसक्तिरात्मा-स्वरूपं यस्य तद्रागात्मकम् = आसक्ति आहे स्वरूप ज्याचे ते**(ब.स.)** यद्वा **रागात्मकम्** - राग एव आत्मा यस्य तद्रागात्मकम् = रागच आत्म स्वरूप आहे ज्याचे ते रागात्मक**(ब.स.)**

तमोगुणाच्या द्वारा जीवात्म्याला बांधल्या जाण्याचे कथन -

**तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम् ।**

**प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥८॥**

**अन्वय:** - तु, सर्वदेहिनाम्, मोहनम्, तम:, अज्ञानजम्, विद्धि, भारत, तत्, (देहिनम् ), प्रमादालस्यनिद्राभि:, निबध्नाति ।

**अन्वयार्थ:** - **तु** - परंतु **सर्वदेहिनाम्, मोहनम्** - सर्वदेहाभिमानी लोकांना मोहित करणारा **तम: -** तमोगुण **अज्ञानजम्** - अज्ञानापासून उत्पन्न झालेला आहे असे **विद्धि** - तू समज **भारत** - हे भरतकुलोत्पन्न अर्जुना! **तत्** - असा तो तमोगुण **प्रमादालस्यनिद्राभि:** - प्रमाद, आलस आणि निद्रा यांच्या द्वारा **देहिनम् -** जीवात्म्याला **निबध्नाति** - बांधतो.

**विवरण** - शरीरामध्ये अहंता आणि ममता असणाऱ्या अशा देहाभिमानी पुरुषाला मोहित करणारा तमोगुण अज्ञानापासून उत्पन्न झालेला आहे असे तूं समज. शास्त्र विहित कर्तव्य पालन कर्मामध्ये असणारी अवहेलना म्हणजे प्रमाद, कर्तव्यकर्मामध्ये असणारी अप्रवृत्ति म्हणजे आलस्य, स्वप्न आणि सुषुप्ति या नावाने प्रसिद्ध असणारी निद्रा, अशा प्रमाद, आलस्य आणि निद्रा यांच्या द्वारा अविनाशी असणाऱ्या जीवात्म्याला तमोगुण बांधतो म्हणजे बंधनामध्ये टाकतो.

**व्याकरणम्** - **तु** - तु उभ.अ. **सर्वदेहिनाम्** - सर्व सर्व.वि. देहिन् पु.ष.ब.व. **मोहनम्** - मोह् च.ग.प.प.+ल्युट्=मोहन वि.न.द्वि.ए.व. **तम:** - तमस् न.द्वि.ए.व. **अज्ञानजम्** - अज्ञान न. ज वि.न. द्वि.ए.व. **विद्धि** - विद् द्वि.ग.प.प.कर्त.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **प्रमादालस्यनिद्राभि:** - प्रमाद पु. आलस्य न. निद्रा स्त्री तृ.ब.व. **देहिनम्** - देहिन् पु.द्वि.ए.व. **निबध्नाति**- नि+बन्ध् न.ग.प.प.लट् वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **सर्वदेहिनाम्** - सर्वे च ते देहिनश्च सर्वदेहिनस्तेषां सर्वदेहिनाम् = सर्व देहीचा**(कर्म.स.)** **प्रमादालस्यनिद्राभि:** - प्रमादश्च-कार्याकार्यानवधानश्च, आलस्यश्च-जाड्यश्च, निद्रा च-स्वापश्चेति प्रमादालस्य

निद्रास्ताभि: प्रमादालस्यनिद्राभि: = प्रमाद, आलस्य आणि निद्रा यांच्या द्वारा**(इतरेतर द्वं.स.) अज्ञानजम्** - अज्ञानात् जातं अज्ञानजम्-अज्ञानकार्यम् = अज्ञानापासून होणारे म्हणजे अज्ञानाचे कार्य तमोगुण**(पं.त.स.) आलस्यम्** - अलसस्य भावमालस्यम् = आळसाचा भाव आलस्य**(वि.)**

उपर्युक्त कथित केलेल्या गुणातील कोणत्या कार्यात कोणत्या गुणांचा उत्कर्ष होतो तो कथन करतात -

**सत्त्वं सुखे सञ्जयति रज: कर्मणि भारत ।**

**ज्ञानमावृत्य तु तम: प्रमादे सञ्जयत्युत ॥९॥**

**अन्वय:** - भारत, सत्त्वम्, सुखे, सञ्जयति, रज:, कर्मणि, तु, तम:, उत, ज्ञानम्, आवृत्य, प्रमादे, सञ्जयति ।

**अन्वयार्थ:** - **भारत** - हे भरतकुलोत्पन्न अर्जुना! **सत्त्वम्** - सत्त्वगुण **सुखे** - सुखामध्ये **सञ्जयति** - आसक्ति उत्पन्न करितो **रज:** - रजोगुण **कर्मणि** - कर्मामध्ये आसक्ति उत्पन्न करतो **तु** - आणि **तम:** - तमोगुण **उत** - तर **ज्ञानम्, आवृत्य** - ज्ञानाला आवृत्त करून **प्रमादे** - प्रमादाच्या ठिकाणी **सञ्जयति** - आसक्ति उत्पन्न करतो.

**विवरण** - सत्त्वगुण माणसाला सांसारिक भोग, प्रमाद आलस्य आणि निद्रा यापासून पृथक् करून सात्त्विक सुखामध्ये आसक्त करतो. मनुष्याच्या कर्तव्य आणि अकर्तव्याचा निर्णय करणारी जी विवेक शक्ति तिला नष्ट करणारा तमोगुण; लोक आणि परलोकाच्या भोगाविषयी कामना उत्पन्न करून त्यांच्या प्राप्तिचे जे साधन कर्म त्यामध्ये पुरुषाला आसक्त करतो आणि तमोगुण ज्ञानाला अज्ञानाच्या द्वारा आच्छादित करून प्रमादामध्ये आसक्त करतो.

**व्याकरणम्** - **भारत** - भारत पु.संबो.ए.व. **सत्त्वम्** - सत्त्व न.प्र.ए.व. **सुखे** - सुख न.स.ए.व. **सञ्जयति** - सञ्ज् प्र.ग.प.प.प्रयोजक वर्त.तृ.पु.ए.व. **रज:** - रजस् न.प्र.ए.व. **कर्मणि** - कृ+मनिन्=कर्मन् न.स.ए.व. **तु** - तु उभ.अ. **तम:** - तमस् न.प्र.ए.व. **उत** - उत अ. **ज्ञानम्** - ज्ञान न.द्वि.ए.व. **आवृत्य** - आ+वृत् प्र.ग.आ.प.ल्यबन्त अ. **प्रमादे** - प्र+मद् प्र.ग.आ.प.+घञ्=प्रमाद पु.स.ए.व. **सञ्जयति** - सञ्ज् प्र.ग.प.प.प्रयोजक वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **प्रमादे** - प्रकर्षेण माद:-गर्व इति प्रमादस्तस्मिन् प्रमादे = प्रकृष्ट माद-गर्वच प्रमाद त्यामध्ये म्हणजे प्राप्त कर्म न करता अप्राप्त कर्म करणे**(वि.)**

दुसऱ्या गुणांना (दाबून) अभिभूत करून कोणत्या एका गुणाच्या वृद्धिचा प्रकार -

**रजस्तमश्चाभिभूय सत्त्वं भवति भारत ।**

**रज: सत्त्वं तमश्चैव तम: सत्त्वं रजस्तथा ॥१०॥**

**अन्वय:** - भारत, सत्त्वम्, रज:, च, तम:, अभिभूय, भवति, रज:, सत्त्वम्, च, तम: (अभिभूय भवति), तथा, तम:, सत्त्वम्, च, रज: (अभिभूय भवति) ।

**अन्वयार्थ:** - **भारत** - हे भरतकुलोत्पन्न अर्जुना! **सत्त्वम्** - सत्त्वगुण **रज:** - रजोगुण **च** - आणि **तम:** -

तमोगुण या दोघांना **अभिभूय -** (दाबून) पराजित करून **भवति -** प्रगट होतो **रज: -** रजोगुण **सत्त्वम्, च तम: -** सत्त्वगुण आणि तमोगण या दोघांना **(अभिभूय भवति)** - पराजित करून प्रगट होतो. **तथा -** त्याप्रमाणे **तम: -** तमोगुण **सत्त्वम्, च रज: -** सत्त्वगुण आणि रजोगुण या दोघांना **(अभिभूय भवति)** - अभिभूत करून प्रगट होतो.

**विवरण -** ज्यावेळी सत्त्वगुण आपले कार्य आरंभ करतो त्यावेळी रजोगुण आणि तमोगुण यांना पराभूत करून ज्ञान, प्रकाश आणि सुखाला उत्पन्न करतो, रजोगुण ज्यावेळी आपले कार्य आरंभ करतो तो त्यावेळी सत्त्वगुण आणि तमोगुण यांना पराजित करून चंचलता, अशांति, लोभ, भोगवासना आणि नानाप्रकारच्या कर्मामध्ये प्रवृत्ति या सर्वांना उत्पन्न करतो, त्याचप्रमाणे तमोगुण ज्यावेळी आपले कार्य आरंभ करतो त्यावेळी सत्त्वगुण आणि रजोगुण यांना अभिभूत करून निद्रा, प्रमाद, आलस्य यांना उत्पन्न करतो.

**व्याकरणम् - भारत -** भारत पु.संबो.ए.व. **सत्त्वम् -** सत्त्व न.प्र.ए.व. **रज: -** रजस् न.द्वि.ए.व. **च -** च उभ.अ. **तम: -** तमस् न.द्वि.ए.व. **अभिभूय -** अभि+भू प्र.ग.प.प.ल्यबन्त अ. **भवति -** भू प्र.ग.प.प.कर्त.तृ.पु.ए.व. **रज: -** रजस् न.प्र.ए.व. **सत्त्वम् -** सत्त्व न.द्वि.ए.व. **च -** च उभ.अ. **तम: -** तमस् न.द्वि.ए.व. **तथा -** तथा कालवाचक तद्धित अ. **तम: -** तमस् न.प्र.ए.व. **सत्त्वम् -** सत्त्व न.द्वि.ए.व. **रज: -** रजस् न.द्वि.ए.व.

**समासविग्रहार्था: - भारत -** भरतवंशे जात:-उत्पन्न इति भारतस्तत्सम्बुद्धौ भारत = भरतवंशामध्ये उत्पन्न झालेला**(जातार्थे तद्धि.वि.)**

सत्त्वगुणाच्या वृद्धिचे लक्षण -

**सर्वद्वारेषु देहेऽस्मिन्प्रकाश उपजायते ।**

**ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत ॥११॥**

**अन्वय: -** यदा, अस्मिन्, देहे, सर्वद्वारेषु, प्रकाश:, ज्ञानम्, उपजायते, तदा, सत्त्वम्, उत, विवृद्धम्, इति, विद्यात् ।

**अन्वयार्थ: - यदा -** ज्यावेळी **अस्मिन् देहे -** या देहामध्ये **सर्वद्वारेषु -** सर्व इंद्रियांच्या ठिकाणी **प्रकाश: -** प्रकाश चेतना आणि **ज्ञानम् -** विवेक शक्ति **उपजायते -** उत्पन्न होते **तदा -** त्यावेळी **सत्त्वम् उत -** सत्त्वगुणच **विवृद्धम् -** वृद्धिला प्राप्त झाला आहे **इति -** असे **विद्यात् -** जाणावे.

**विवरण -** ज्यावेळी या देहांत श्रोत्रादि इंद्रियांच्या ठिकाणी प्रकाश, अंत:करणामध्ये निर्मलता तसेच सत्य-असत्य तसेच कर्तव्य-अकर्तव्य यांचा निर्णय करणारी विवेक शक्ति उत्पन्न होते आणि राग, द्वेष, सुख, दु:ख, शोक, चिंता, भय, चंचलता, निद्रा, आलस्य आणि प्रमाद यांचा अभाव होतो त्यावेळी सत्त्वगुण वृद्धिला पावला आहे असे जाणावे.

**व्याकरणम् - यदा -** यदा कालवाचक तद्धि.अ. **अस्मिन् -** इदम् सर्व.पु.स.ए.व. **देहे -** देह पु.स.ए.व. **सर्वद्वारेषु -** सर्व वि. द्वार न.स.ब.व. **प्रकाश: -** प्रकाश पु.प्र.ए.व. **ज्ञानम् -** ज्ञान न.प्र.ए.व. **उपजायते -** उप+जन् च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व. **तदा -** तदा कालवाचक तद्धि.अ. **सत्त्वम् -** सत्त्व न.प्र.ए.व. **उत -** उत अ. **विवृद्धम् -** वि+वृध् प्र.ग.आ.प.कर्त भू.धा.वि.न.प्र.ए.व. **विद्यात् -** विद् द्वि.ग.प.प.विध्यर्थ

तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - सर्वद्वारेषु -** सर्वाणि च-समस्तानि च तानि द्वाराणि-देहछिद्राणीति सर्वद्वाराणि तेषु सर्वद्वारेषु-श्रोत्रादींद्रियेषु = सर्व द्वाराच्या म्हणजे इंद्रियांच्या ठिकाणी**(कर्म.स.) विवृद्धम् -** विशेषेण वृद्धं विवृद्धम्-वृद्धिगतं = विशेषरूपाने वृद्धिला प्राप्त झालेला**(तृ.त.स.) यदा** - यस्मिन्काले यदा = या कालाम ध्ये यदा**(त.वि.) तदा** - तस्मिन् काले तदा = त्या कालामध्ये तदा**(त.वि.)**

रजोगुणाच्या वृद्धिचे कारण -

**लोभः प्रवृत्तिरारम्भः कर्मणामशमः स्पृहा।**

**रजस्येतानि जायन्ते विवृद्धे भरतर्षभ ॥१२॥**

**अन्वयः -** भरतर्षभ, रजसि, विवृद्धे, लोभः, प्रवृत्तिः, कर्मणाम्, आरम्भः, अशमः, स्पृहा, एतानि, जायन्ते।

**अन्वयार्थः - भरतर्षभ -** हे भरतवंशीय श्रेष्ठ अर्जुना! **रजसि विवृद्धे -** रजोगुण अतिशय वाढला असता **लोभः -** लोभ **प्रवृत्तिः -** प्रवृत्ति **कर्मणाम्, आरम्भः -** कर्माचा प्रारंभ **अशमः -** अशांति **स्पृहा -** इच्छा **एतानि -** हे सर्व **जायन्ते -** उत्पन्न होतात.

**विवरण -** ज्यावेळी रजोगुणाची वृद्धि होते त्यावेळी सत्त्वगुणाचे कार्य प्रकाश, ज्ञान आणि शक्ति यांचा लोप होऊन अंतःकरणामध्ये धनसंग्रह करण्याची इच्छा, नाना प्रकारचे नवीन नवीन कर्म करण्याकरिता प्रारंभ, अशांति, तृष्णा आणि लोभ असे अनेक प्रकारचे भाव उत्पन्न होतात.

**व्याकरणम् - भरतर्षभ -** भरतर्षभ पु.संबो.ए.व. **रजसि -** रजस् न.स.ए.व. **विवृद्धे** - वि+वृध् प्र.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.स.ए.व. **लोभः -** लोभ पु.प्र.ए.व. **प्रवृत्तिः -** प्रवृत्ति स्त्री.प्र.ए.व. **कर्मणाम् -** कर्मन् न.ष.ब.व. **आरम्भः -** आरम्भ पु.प्र.ए.व. **अशमः -** अ+शम पु.प्र.ए.व. **स्पृहा -** स्पृहा स्त्री.प्र.ए.व. **एतानि** - एतत् सर्व.न.प्र.ब.व. **जायन्ते -** जन् च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - अशमः -** न शम इति अशमः = जो शम नाही तो अशम**(नञ् त.स.) आरम्भः -** लौकिकानां वैदिकानां च कर्मणां देहेन्द्रियादिभिरेवाऽऽरभ्यते क्रियते इति आरम्भः उपक्रमः = देह, इंद्रिय आदिच्याद्वाराच ज्याचा आरंभ (अनुष्ठान) केला जातो तो आरंभ**(वि.)**

तमोगुणाच्या वृद्धिचे लक्षण -

**अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च।**

**तमस्येतानि जायन्ते विवृद्धे कुरुनन्दन ॥१३॥**

**अन्वयः** - कुरुनन्दन, तमसि, विवृद्धे, अप्रकाशः, अप्रवृत्तिः, च, प्रमादः, च, मोहः, एतानि, एव, जायन्ते।

**अन्वयार्थः** - **कुरुनन्दन** - हे कुरुवंशराज अर्जुना! **तमसि विवृद्धे** - तमोगुण अतिशय वाढला असता **अप्रकाशः** - अविवेक **अप्रवृत्तिः** - आळस **च** - आणि **प्रमादः** - कर्तव्य कर्माविषयी असावधानी **मोहः** - मोह **एतानि, एव** - हे सर्वच **जायन्ते** - उत्पन्न होतात.

**विवरण** - हे अर्जुना! ज्यावेळी तमोगुण अतिशय वृद्धिला पावतो म्हणजे प्राप्त होतो. त्यावेळी अविवेक,

कर्तव्य कर्माविषयी अप्रवृत्ति, प्रमाद आणि मोह इत्यादि विकार अंत:करणामध्ये उत्पन्न होतात.

**व्याकरणम्** - **कुरुनन्दन** - कुरु+नन्दन पु.संबो.ए.व. **तमसि** - तमस् न.स.ए.व. **विवृद्धे** - वि+वृध्-प्र.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.स.ए.व. **अप्रकाश:**- अ+प्रकाश पु.प्र.ए.व. **अप्रवृत्ति:** - अ+प्रवृत्ति स्त्री.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **प्रमाद:** - प्रमाद पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **मोह:** - मोह पु.प्र.ए.व. **एतानि** - एतत् सर्व.न.प्र.ब.व. **एव** - निश्चयार्थक अ. **जायन्ते** - जन् च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **कुरुनन्दन** - कुरो:-कुरुवंशस्य नन्दन इति कुरुनन्दनस्तत्सम्बुद्धौ कुरुनन्दन = कुरुवंशाचा नंदन हे कुरुनंदन**(ष.त.स.)** **अप्रकाश:** - न प्रकाश इत्यप्रकाश: = जो प्रकाश नाही तो अप्रकाश **(नञ्.त.स.)** **अप्रवृत्ति:** - न प्रवृत्तिरित्यप्रवृत्ति: = नाही जी प्रवृत्ति तो अप्रवृत्ति**(नञ् त.स.)** **नन्दन:** - नन्दयतीति नन्दन: = आनंद देणारा तो नंदन**(वि.)**

सत्त्वगुणाच्या वृद्धिच्या कालामध्ये मरणाऱ्याच्या गतिचे निरूपण -

**यदा सत्त्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत्।**

**तदोत्तमविदां लोकानमलान्प्रतिपद्यते ॥१४॥**

**अन्वय:** - तु, यदा, सत्त्वे, प्रवृद्धे, देहभृत्, प्रलयम्, याति, तदा, उत्तमविदाम्, अमलान्, लोकान्, प्रतिपद्यते ।

**अन्वयार्थ:** - **तु** - पण **यदा** - ज्यावेळी **सत्त्वे प्रवृद्धे** - सत्त्वगुणाची वाढ झाली असता **देहभृत्** - देहधारण करणारा जीवात्मा **प्रलयम्, याति** - मृत्युला प्राप्त होतो. **तदा** - त्यावेळी **उत्तमविदाम्** - उत्तम कर्म करणाऱ्या **अमलान्, लोकान्** - दिव्य स्वर्गादि लोकाला **प्रतिपद्यते** - प्राप्त होतो.

**विवरण** - अंत:करणामध्ये अत्यधिक सात्त्विक भाव उत्पन्न होणारा देहधारी पुरुष ज्यावेळी तो मृत्युला प्राप्त होतो त्यावेळी तो पुरुष उत्तम-उत्तम कर्म करणाऱ्या निर्मल दिव्य स्वर्गादि लोकाला प्राप्त होतो.

**व्याकरणम्** - **तु** - तु उभ.अ. **यदा** - यदा कालवाचक तद्धि.अ. **सत्त्वे** - सत्त्व न.स.ए.व. **प्रवृद्धे** - प्र+वृध् प्र.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.स.ए.व. **देहभृत्** - देहभृत् पु.प्र.ए.व. **प्रलयम्** - प्रलय पु.द्वि.ए.व. **याति** - या द्वि.ग.प.प.तृ.पु.ए.व. **तदा** - तदा कालवाचक तद्धि.अ. **उत्तमविदाम्** - उत्तम वि. विद् च.ग.आ.प.+ क्विप्=विद्+आम्=विदाम् वि.पु.ष.ब.व. **अमलान्** - अमल वि.पु.द्वि.ब.व. **लोकान्** - लोक पु.द्वि.ब.व. **प्रतिपद्यते** - प्रति+पद् च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अमलान्** - न विद्यते मलानि येषु तेऽमलास्तान्, अमलान्-मलरहितान् लोकान्-रजस्तम: प्रतिबन्ध राहित्येन सत्त्वाधिक्यात् प्रकाशमानान् = नाही आहेत मल ज्यामध्ये ते त्यांना-मलरहित लोकांस म्हणजे रजतमरूप प्रतिबंधाने रहित तसेच सत्त्वाधिक्य असल्यामुळे प्रकाशमान अशा त्यांना**(नञ् त.स.)** यद्वा **अमलान्** - मलानि-जन्मजरादिदु:खानि येषु न सन्ति ते अमलास्तान्, अमलान् = मल-जन्मजरादि दु:खे ज्याच्या मध्ये नाहीत त्यांना**(नञ् त.स.)** **उत्तमविदाम्** - उत्तमम् अश्वमेधादिना प्राप्यं कार्य ब्रह्म विदन्ति, जानन्ति ते उत्तमविदस्तेषां उत्तमविदाम् = उत्तम-अश्वमेधादिच्या द्वारा प्राप्य कार्य ब्रह्म त्याला जे जाणतात ते उत्तम विद त्यांचा**(उप.स.)** यद्वा **उत्तमविदाम्** - हिरण्यगर्भादय उत्तमास्तान् विदन्ति-उपासते इत्युत्तमविदस्तेषामुत्तम विदाम् = हिरण्यगर्भादि-उत्तम त्यांना जाणणारे ते उत्तमविद त्यांचा**(उप.स.)** यद्वा **उत्तमविदाम्** - विदन्तीति

विद उत्तमस्य विद इत्युत्तमविदस्तेषां उत्तमविदाम् = चांगल्या कर्म करणाऱ्या लोकाला जाणणारे ते उत्तमविद त्यांचा**(ष.त.स.)** **प्रलयम्** - प्रकर्षेण लय:-मृत्यु: प्रलयस्तं प्रलयम् = प्रकृष्टरूपाने लय-मरण प्रलय**(वि.)**

रजोगुण आणि तमोगुणाच्या वृद्धिकालांत मरणाऱ्यांच्या गतिचे निरूपण -

**रजसि प्रलयं गत्वा कर्मसङ्गिषु जायते ।**

**तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ॥१५॥**

**अन्वय:** - रजसि, प्रलयम्, गत्वा, कर्मसङ्गिषु, जायते, तथा, तमसि, प्रलीन:, मूढयोनिषु, जायते ।

**अन्वयार्थ:** - **रजसि** - रजोगुणाची वाढ झाली असता जीवात्मा **प्रलयम्, गत्वा** - मृत्युला प्राप्त होऊन नंतर **कर्मसङ्गिषु जायते** - कर्मामध्ये आसक्ति ठेवणाऱ्या मनुष्यामध्ये त्याचा जन्म होतो **तथा** - त्याचप्रमाणे **तमसि प्रलीन:** - तमोगुण वृद्धिला प्राप्त झालेला मनुष्य मरण पावला असता तो पश्चात **मुढयोनिषु** - पशु आदि यो निमध्ये **जायते** - उत्पन्न होतो.

**विवरण** - रजोगुण अतिशय वृद्धिला प्राप्त म्हणजे अंत:करणामध्ये अशांति, लोभ प्रवृत्ति, तृष्णा इत्यादि भाव उत्पन्न होऊन ज्यावेळी मृत्युला प्राप्त होतो त्यावेळी तो पुरुष कर्म करणे हेच ज्याचे ध्येय आहे अशा लोकामध्ये त्याचा जन्म होतो. त्याप्रमाणे तमोगुण वृद्धिला प्राप्त झाला असता ज्यावेळी पंचत्वाला प्राप्त होतो त्यावेळी तो पुरुष पश्वादि योनिमध्ये उत्पन्न होतो.

**व्याकरणम्** - **रजसि** - रजस् न.स.ए.व. **प्रलयम्** - प्रलय पु.द्वि.ए.व. **गत्वा** - गम् प्र.ग.प.प.त्वान्त अ. **कर्मसङ्गिषु** - कर्मन् न.वि. सङ्गिन् पु.स.ब.व. **जायते** - जन् च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व. **तथा** - तथा क्रि. वि.अ. **तमसि** - तमस् न.स.ए.व. **प्रलीन:** - प्र+ली न.ग.प.प.+कर्म.क्त=प्रलीन पु.प्र.ए.व. **मूढयोनिषु** - मुह् च.ग.कर्त.भू.धा.वि. योनि स्त्री.स.ब.व. **जायते** - जन् च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **मूढयोनिषु** - मूढा:-पश्वादयो योनय इति मूढयोनयस्तासु मूढयोनिषु-पश्वादिषु = मूढयो निमध्ये-पश्वादियोनिमध्ये**(कर्म.स.)** **कर्मसङ्गिषु** - कर्मण: सङ्ग इति कर्मसङ्ग: कर्मसङ्गोऽस्ति येषां ते कर्मस ङ्गिनस्तेषु कर्मसङ्गिषु = कर्मामध्ये आसक्ति ठेवणारा**(ष.त.स.गर्भि.अस्त्यर्थे ब.स.)** **देहभृत्** - देहं बिभर्तीति देहभृत्-जीव: = देहाला धारण पोषण करणारा**(उप.स.)** **प्रलीन:** - प्रकर्षेण लीन: प्रलीन:-मृत: = प्रकृष्टरूपाने लीन म्हणजे मृत**(वि.)**

सात्त्विक, राजस आणि तामस कर्मांचे फल -

**कर्मण: सुकृतस्याहु: सात्त्विकं निर्मल फलम् ।**

**रजसस्तु फलं दु:खमज्ञानं तमस: फलम् ॥१६॥**

**अन्वय:** - सुकृतस्य, कर्मण:, सात्त्विकम्, निर्मलम्, फलम्, आहु:, तु, रजस:, फलम्, दु:खम्, तमस:, फलम्, अज्ञानम् ।

**अन्वयार्थ:** - **सुकृतस्य कर्मण:** - चांगल्या पुण्यकर्माचे **सात्त्विकम्, निर्मलम्, फलम्** - सात्त्विक निर्मल फल प्राप्त होते असे **आहु:** - ज्ञानी लोक म्हणतात **तु** - परंतु **रजस:** - रजोगुणाचे **फलम्** - फल **दु:खम्** - दु:ख **तमस:** - तमोगुणाचे **फलम्** - फल **अज्ञानम्** - अज्ञान आहे.

**विवरण** - शास्त्रविहित सात्त्विक पुण्यकर्माचे सुख, ज्ञान, वैराग्यादि सात्त्विक फल प्राप्त होते. केवळ भोग प्राप्तिकरिता अहंकार पूर्वक तसेच पुष्कळ परिश्रमासहित केल्या जाणाऱ्या कर्मापासून दु:खरूपी फल प्राप्त होते. विचार न करता मुर्खतावश केल्या जाणाऱ्या तसेच अनेक प्रकारच्या हिंसादि दोषांनी लिप्त असणाऱ्या अशा तामस कर्मापासून अज्ञानरूपी फल प्राप्त होते.

**व्याकरणम्** - **सुकृतस्य** - सु अ. कृ अ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.ष.ए.व. **कर्मण:** - कर्मन् न.ष.ए.व. **सात्त्विकम्** - सात्त्विक वि.न.द्वि.ए.व. **निर्मलम्** - निर्मल वि.न.द्वि.ए.व. **फलम्** - फल न.द्वि.ए.व. **आहु:** - ब्रू द्वि.ग.उभ.प.(प.प.)वर्त.तृ.पु.ए.व. **रजस:** - रजस् न.ष.ए.व. **फलम्** - फल न.द्वि.ए.व. **दु:खम्** - दु:ख न.द्वि.ए.व. **तमस:** - तमस् न.ष.ए.व. **फलम्** - फल न.द्वि.ए.व. **अज्ञानम्** - अज्ञान न.द्वि.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **निर्मलम्** - निर्गतं मलम्-दु:खं गुणवैषम्यकृतं वा यस्मात् स निर्मलस्तं निर्मलम् = निघून गेला आहे मल म्हणजे गुणांच्या विषमतेपासून उत्पन्न दु:ख ज्याच्या पासून ते**(पञ्चम्यर्थे ब.स.)** **सात्त्विकम्** - सत्त्वगुणेन जातमिति सात्त्विकम् = सत्त्वगुणाच्याद्वारा उत्पन्न ते सात्त्विक**(जातार्थे त.वि.)**

सत्त्वगुणापासून ज्ञान, रजोगुणापासून लोभ आणि तमोगुणापासून प्रमाद, मोह आणि अज्ञानाची उत्पत्ति -

**सत्त्वात्सञ्जायते ज्ञानं रजसो लोभ एव च ।**

**प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ॥१७॥**

**अन्वय:** - सत्त्वात्, ज्ञानम्, सञ्जायते, च, रजस:, लोभ:, एव, च, तमस:, प्रमादमोहौ, भवत:, च, अज्ञानम्, एव ।

**अन्वयार्थ:** - **सत्त्वात्** - सत्त्वगुणापासून **ज्ञानम्** - ज्ञान **सञ्जायाते** - उत्पन्न होते **च** - आणि **रजस:** - रजोगुणापासून **लोभ:, एव** - लोभच उत्पन्न होतो **तमस:** - तमोगुणापासून **प्रमादमोहौ** - प्रमाद आणि मोह **भवत:** - होतात **च** - आणि **अज्ञानम्, एव** - अज्ञानच उत्पन्न होते.

**विवरण** - सत्त्वगुणापासून ज्ञान, प्रकाश, सुख, शांति आदि सात्त्विक भावाची उत्पत्ति होते. रजोगुणापासून लोभ, प्रवृत्ति, आसक्ति-कामना, स्वार्थपूर्वक अनेक कर्माचा आरंभ इत्यादि भावाची (प्राप्ति होते) तसेच तमोगुणापासून प्रमाद, मोह आणि अज्ञान इत्यादि भावाची उत्पत्ति होते.

**व्याकरणम्** - **सत्त्वात्** - सत्त्व न.पं.ए.व. **ज्ञानम्** - ज्ञान न.प्र.ए.व. **सञ्जायते** - सम्+जन् च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **रजस:** - रजस् न.पं.ए.व. **लोभ** - लोभ पु.प्र.ए.व. **एव** - एव निश्चयात्मक अ. **च** - च उभ.अ. **तमस:** - तमस् न.पं.ए.व. **प्रमादमोहौ** - प्रमाद पु. मोह पु.प्र.द्वि.व. **भवत:** - भू प्र.ग.प.प.कर्त.वर्त.तृ.पु.द्वि.व. **च** - च उभ.अ. **अज्ञानम्** - अज्ञान न.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ.

**समासविग्रहार्था:** - **प्रमादमोहौ** - प्रमादश्च मोहश्चेति प्रमादमोहौ = प्रमाद आणि मोह**(द्वं.स.)**

सात्त्विक राजस आणि तामस पुरुषाच्या गतिचे वर्णन -

**उर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसा: ।**

**जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छन्ति तामसा: ॥१८॥**

**अन्वय:** - सत्त्वस्था:, उर्ध्वम्, गच्छन्ति, राजसा:, मध्ये, तिष्ठन्ति, जघन्यगुणवृत्तिस्था:, तामसा:, अध:, गच्छन्ति ।

**अन्वयार्थ:** - **सत्त्वस्था:** - सत्त्वगुणामध्ये स्थित असलेले पुरुष **ऊर्ध्वम्** - (स्वर्गादी) लोकामध्ये **गच्छन्ति** - जातात **राजसा:** - रजोगुणी लोक **मध्ये** - मृत्युलोकामध्ये **तिष्ठन्ति** - निवास करतात **जघन्यगुणवृत्तिस्था:** - तमोगुणामध्ये स्थित असलेले **तामसा:** - तमोगुणी लोक **अध:** - पशु आदिच्या जन्माला **गच्छन्ति** - प्राप्त होतात.

**विवरण** - सत्त्वगुणात असलेले पुरुष स्वर्गादी उच्च लोकांना जातात. रजोगुणात असलेले पुरुष मध्यलोकात म्हणजे मनुष्यलोकातच राहतात आणि तमोगुणाचे कार्य असलेल्या निद्रा, प्रमाद आणि आळस इत्यादीत रत असलेले तामसी पुरुष अधोगतीला अर्थात् कीटक, पशू इत्यादी नीच जातीत तसेच नरकात जातात.

**व्याकरणम्** - **सत्त्वस्था:** - सत्त्व+स्थ वि.पु.प्र.ब.व. **ऊर्ध्वम्** - ऊर्ध्व अ. **गच्छन्ति** - गम् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **राजसा:** - राजस् वि.पु.प्र.ब.व. **मध्ये** - मध्य वि.पु.स.ए.व. **तिष्ठन्ति** - स्था प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **जघन्यगुणवृत्तिस्था:** - जघन्य वि. गुण वि. वृत्ति स्त्री. स्थ वि.पु.प्र.ब.व. **तामसा:** - तामस् वि.पु.प्र.ब.व. **अध:** - अधस् अ. **गच्छन्ति** - गम् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **सत्त्वस्था:** - मोक्षेच्छया सत्त्वगुणोत्पन्ने सदसद्विज्ञाने ज्ञानकार्ये च परमेश्वरोपास्त्यादौ ये तिष्ठन्ति ते सत्त्वस्था:-सत्त्ववृत्तिस्था: = मोक्षाच्या इच्छेने सत्त्वगुणापासून उत्पन्न झालेला सत् आणि असत्च्या विवेकज्ञानामध्ये आणि ज्ञानाचे कार्यभूत परमेश्वराच्या उपासना आदिमध्ये स्थित राहणारे**(स.त.स.)** **जघन्यगुणवृत्तिस्था:** - जघन्यश्चासौ गुणश्चेति जघन्यगुण:-तमस्तस्य वृत्तं निद्राऽऽलस्यादिस्तस्मिन् स्थिता जघन्यगुणवृत्तिस्था मूढा: = जघन्यगुण म्हणजे निंदनीय गुण म्हणजे तमोगुण त्याचे कार्य म्ह. निद्रा, आलस आदि त्याच्या मध्ये राहणारे असे ते जघन्यगुणवृत्तिस्थ मूढलोक**(कर्म.गर्भि.ष.त.स.)** यद्वा **जघन्यगुणवृत्तिस्था:** - जघन्यो निकृष्टो यस्तमोगुणस्तद्वृत्तौ तम:प्रधानज्ञाने सदसद्विवेकवर्जिते कर्मणि ये तिष्ठन्ति ते जघन्यगुणवृत्तिस्थास्तामसा: पुरुषा: = जघन्य-निकृष्ट जो तमोगुण त्याच्या वृत्तिमध्ये म्ह. तमप्रधान ज्ञानामध्ये अथवा सत् आणि असत्च्या विवेकाने रहित असणाऱ्या कर्मांमध्ये स्थित राहणारे असे ते जघन्यगुणवृत्तिस्थ तामसलोक**(ष.गर्भि.स.स.)** **राजसा:** - रजोगुणनिष्पन्ने ज्ञाने कामसङ्कल्पादिगुणयुक्ते ज्ञानकार्ये च श्रौतादौ कर्मणि भोगेच्छया ये तिष्ठन्ति ते राजसा: पुरुषा: = रजोगुणापासून उत्पन्न झालेल्या काम, संकल्प, आदि गुणांनी युक्त ज्ञानामध्ये आणि ज्ञानाचे कार्य श्रौत आदि कर्मांमध्ये भोगाच्या इच्छेने स्थित राहणारे ते राजस पुरुष**(वि.)**

आत्म्याला अकर्ता आणि गुणातीत जाणल्याने भगवत्प्राप्ति -

**न्यान्यं गुणेभ्य: कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति ।**

**गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ॥१९॥**

**अन्वय:** - यदा, द्रष्टा, गुणेभ्य:, अन्यम्, कर्तारम्, न, अनुपश्यति, च, गुणेभ्य:, परम्, वेत्ति, स:, मद्भावम्, अधिगच्छति ।

**अन्वयार्थ:** - **यदा** - ज्यावेळी **द्रष्टा** - ज्ञानीपुरुष **गुणेभ्य:** - गुणांहून **अन्यम्** - दुसरा **कर्तारम्** - कर्ता **न,**

**अनुपश्यति** - पाहात नाही **च** - आणि **गुणेभ्यः** - गुणाहून **परम्** - अत्यंत पर असलेल्या परमात्म्याला **वेत्ति** - जाणतो **सः** - तो **मद्भावम्** - माझ्या स्वरूपाला **अधिगच्छति** - प्राप्त होतो.

**विवरण** - ज्यावेळी इंद्रिय, अंत:करण आणि प्राण आदिंच्या द्वारा श्रवण, दर्शन, खाणे, पिणे, चिंतन, मनन, शयन, आसन आणि व्यवहार आदि सर्व स्वाभाविक चेष्टा होत असताना सुद्धा तो द्रष्टा (ज्ञानी पुरुष) आपणाला सदा सर्वदा निर्गुण, निराकार, परब्रह्मामध्ये अभिन्न भावाने स्थित समजून गुणाहून दुसरा कोणी कर्ता पहात नाही कारण गुणच गुणांमध्ये वर्तन करतात माझा त्याच्याशी यत्किञ्चिन्मात्र संबंध नाही आणि गुणाहून अत्यंत विलक्षण (भिन्न) असणाऱ्या परमात्म्याला तत्त्वत: जाणतो असा जो द्रष्टा तो माझ्याच स्वरूपाला प्राप्त होतो.

**व्यारकणम्** - **यदा** - यदा कालवाचक तद्धि.अ. **द्रष्टा** - दृश् प्र.ग.प.प.+तृच्=द्रष्टृ पु.प्र.ए.व. **गुणेभ्यः** - गुण पु.पं.ब.व. **अन्यम्** - अन्य सर्व.पु.द्वि.ए.व. **कर्तारम्** - कर्तृ पु.द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अनुपश्यति** - अनु+दृश् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **गुणेभ्यः** - गुण पु.पं.ब.व. **परम्** - पर वि.पु.द्वि.ए.व. **वेत्ति** - विद् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **मद्भावम्** - अस्मत् सर्व.ष.ए.व. भाव पु. द्वि.ए.व. **अधिगच्छति** - अधि+गम् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **मद्भावम्** - मम-निर्विशेषस्य परस्य ब्रह्मणो भावो मद्भावस्तं मद्भावम् = माझा-निर्विशेष परब्रह्माचा भाव-स्वरूप त्याला**(ष.त.स.)** **कर्तारम्** - करोतीति कर्ता तं कर्तारम् = करतो तो कर्ता त्याला **(वि.)** **द्रष्टा** - पश्यतीति द्रष्टा = पाहतो तो द्रष्टा**(वि.)**

**गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान्।**

**जन्ममृत्युजरादु:खैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥२०॥**

**अन्वयः** - देही, देहसमुद्भवान्, एतान्, त्रीन्, गुणान्, अतीत्य, जन्ममृत्युजरादु:खैः, विमुक्तः, अमृतम्, अश्नुते ।

**अन्वयार्थः** - **देही** - देहात निवास करणारा जीवात्मा **देहसमुद्भवान्** - शरीराच्या उत्पत्तिला कारण असणाऱ्या **एतान्, त्रीन्, गुणान्** - या तीन गुणांना **अतीत्य** - उल्लंघन करून म्हणजे त्याच्या पलीकडे जाऊन **जन्ममृत्युजरादु:खैः** - जन्म, मृत्यु, जरा आणि दु:ख यांच्या द्वारा **विमुक्तः** - मुक्त असलेला असा जीवात्मा **अमृतम्** - अमृत तत्त्वाला (मोक्षाला) **अश्नुते** - प्राप्त होतो.

**विवरण** - बुद्धि, अहंकार आणि मन तसेच यांचे पाच ज्ञानेंद्रिय, पाच कर्मेंद्रिय, पाचमहाभूते आणि पाच इंद्रियांचे विषय मिळून ते वीस तत्त्वांच्या द्वारा झालेले हे पिण्डरूप स्थूल शरीर प्रकृतिजन्य गुणाचेच कार्य आहे. अशा या शरीराबरोबर संबंध ठेवणे म्हणजेच गुणांत लिप्त होणे आहे. परंतु, देहवान् आत्मा उपर्युक्त कथित अशा या शरीराच्या उत्पत्तिचे कारण असणाऱ्या या तीन गुणांना उल्लंघून जन्म, मृत्यु, वृद्धावस्था आणि सर्व प्रकारच्या दु:खापासून मुक्त असलेला अमृत तत्त्वाला म्हणजे परमात्म भावाला (मोक्षाला) प्राप्त होतो.

**व्याकरणम्** - **देही** - देहिन् पु.प्र.ए.व. **देहसमुद्भवान्** - देह पु. सम्+उद्+भव वि.पु.द्वि.ब.व. **एतान्** - एतत् सर्व.पु.द्वि.ब.व. **त्रीन्** - त्रि पु.द्वि.ब.व. **गुणान्** - गुण पु.द्वि.ब.व. **अतीत्य** - अति+इ द्वि.ग.प.प.ल्यबन्त

अ. **जन्ममृत्युजरादु:खै:** - जन्मन् न. मृत्यु पु. जरा स्त्री. दु:ख न.तृ.ब.व. **विमुक्त:** - वि+मुच् ष.ग.उ.प. कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **अमृतम्** - अमृत वि.न.द्वि.ए.व. **अश्नुते** - अश् पं.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **जन्ममृत्युजरादु:खै:** - जन्म च मृत्युश्च जरा च दु:खानि चेति जन्ममृत्युजरादु:खानि तैर्जन्ममृत्युजरादु:खै: = जन्ममरण वृद्धावस्था आणि दु:ख त्यांच्या द्वारा**(द्वं.स.)** यद्वा **जन्ममृत्युजरादु:खै:** - जन्म च मृत्युश्च जरा चेति जन्म-मृत्युजरास्तान्येव दु:खानि तैर्जन्ममृत्युजरादु:खै: = जन्म मृत्यु जरा हे दु:ख आहे त्याच्या द्वारा**(द्वं.स.ग.कर्म.स.)** **देहसमुद्भवान्** - गुणमयकार्यत्वाद् देहस्य समुद्भव:-उत्पत्तिर्येभ्यस्ते देहसमुद्भवास्तान् देहसमुद्भवान्-देहोत्पत्तिबीजभूतान् गुणान् = देहाची उत्पत्ति आहे ज्या गुणाच्या द्वारा त्या बीजभूत गुणांना**(ष.ग.ब. स.)**

गुणातीत पुरुषाविषयी अर्जुनाचे तीन प्रश्न -

**अर्जुन उवाच** - अर्जुन म्हणाला

**कैर्लिङ्गैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो ।**

**किमाचार: कथं चैतांस्त्रीन्गुणानतिवर्तते ॥२१॥**

**अन्वय:** - प्रभो, एतान्, त्रीन्, गुणान्, अतीत:, कै:, लिङ्गै:, भवति, किम्, आचार:, च, एतान्, त्रीन्, गुणान्, कथम्, अतिवर्तते ।

**अन्वयार्थ: - प्रभो** - हे श्रीकृष्णा! **एतान्, त्रीन्, गुणान्** - या तीन गुणांना **अतीत:** - उल्लंघन करून गेलेला पुरुष **कै: लिङ्गै:** - कोणत्या लक्षणांनी युक्त **भवति** - असतो **किम्, आचार:** - त्याचे आचरण कसे असते **च** - आणि **एतान्, त्रीन्, गुणान्** - या तीन गुणांना **कथम्** - कसा **अतिवर्तते** - उल्लंघन करून जातो.

**विवरण** - अर्जुन म्हणतो की, हे श्रीकृष्णा! उपर्युक्त तीन गुणांना उल्लंघन करून गेलेला साधक कोणत्या लक्षणांनी युक्त असतो आणि कोणत्या प्रकारांनी त्याचे आचरण असते आणि कोणत्या प्रकारांनी साधक या तीन गुणांपासून मुक्ति पावतो म्हणजे मुक्त होतो.

**व्याकरणम्** - **प्रभो** - प्रभु पु.संबो.ए.व. **एतान्** - एतत् सर्व.पु.द्वि.ब.व. **त्रीन्** - त्रि संख्या वा.वि.पु.द्वि.ब.व. **गुणान्** - गुण पु.द्वि.ब.व. **अतीत:** - अति+इ द्वि.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **कै:** - किम् सर्व.न.तृ.ब.व. **लिङ्गै:** - लिङ्ग न.तृ.ब.व. **भवति** - भू प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **किमाचार:** - किम् सर्व. आचार पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **एतान्** - एतत् सर्व.पु.द्वि.ब.व. **त्रीन्** - त्रि संख्या वा.वि.पु.द्वि.ब.व. **गुणान्** - गुण पु.द्वि.ब.व. **कथम्** - कथम् अ. **अतिवर्तते** - अति+वृत् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **किमाचार:** - क आचारो यस्य स किमाचार: = कोणता आचार आहे ज्याचा तो**(ब.स.)** **अतीत:** - अतिक्रम्य वर्तत इत्यतीत: = अतिक्रमण करून वर्तन करतो तो अतीत**(प्रादि त.स.)**

गुणातीत पुरुषाच्या आचरणाचे वर्णन -

**श्री भगवानुवाच** - श्री भगवान म्हणाले

**प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पाण्डव ।**

**न द्वेष्टि सम्प्रवृत्तानि न निवृत्तानि काङ्क्षति ॥२२॥**

**अन्वयः** - पाण्डव, प्रकाशम्, च, प्रवृत्तिम्, च, मोहम्, एव, सम्प्रवृत्तानि, न, द्वेष्टि, निवृत्तानि, न, काङ्क्षति ।

**अन्वयार्थः** - **पाण्डव** - हे अर्जुना! **प्रकाशम् -** सत्त्वगुणाचे कार्य प्रकाश **च** - आणि **प्रवृत्तिम्** - रजोगुणाचे कार्य प्रवृत्ति **च** - आणि **मोहम्, एव** - तमोगुणांचे कार्य मोहादि इत्यादि विकार **सम्प्रवृत्तानि** - प्रवृत्त झाले असता त्यांचा **न द्वेष्टि** - द्वेष करीत नाही आणि **निवृत्तानि** - नाहीसे झाले असता **न काङ्क्षति** - त्यांची इच्छा करीत नाही.

**विवरण** - शरीर, इंद्रिये आणि अंत:करणाच्या ठिकाणी असणाऱ्या आलस्य आणि जडतेचा अभाव होऊन त्या ठिकाणी उत्पन्न होणारी निर्मलता म्हणजे प्रकाश आणि नाना प्रकारचे कर्म करण्याकरिता उत्पन्न होणारी स्फुरणा म्हणजे प्रवृत्ति, अंत:करणामध्ये सत्त्वगुणाच्या कार्यरूपाने स्थित असलेल्या प्रकाशाचा अभाव होऊन त्या ठिकाणी उत्पन्न होणारी तंद्रा म्हणजे मोह अशाप्रकारे सत्त्वगुणाचे कार्य प्रकाश, रजोगुणाचे कार्य प्रवृत्ति, तमोगुणाचे कार्य मोह इत्यादि विकार त्याच्या पुढे प्रगट झाले असता सुद्धा त्याचा तो द्वेष करीत नाही आणि निवृत्त झाले असता तो त्यांची आकाङ्क्षा करीत नाही.

**व्याकरणम्** - **पाण्डव** - पाण्डव पु.संबो.ए.व. **प्रकाशम् -** प्रकाश पु.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **प्रवृत्तिम्** - प्रवृत्ति स्त्री.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **मोहम्** - मोह पु.द्वि.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **सम्प्रवृत्तानि** - सम्+प्र+वृत् प्र.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.न.द्वि.ब.व. **न** - न क्रि.वि.अ. **द्वेष्टि** - द्विष् द्वि.ग.उ.प.(प.प.) वर्त.तृ.पु.ए.व. **निवृत्तानि** - नि+वृत् प्र.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.न.द्वि.ब.व. **न** - न क्रि.वि.अ. **काङ्क्षति** - काङ्क्ष् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **निवृत्तानि** - निर्गतानि-नष्टानि वृत्तानि इति निवृत्तानि = नाहीसे झालेल्यांना**(गति.स.)** **सम्प्रवृत्तानि** - सम्यक् प्रवृत्तानि अग्रे-पुरत आगतानीति सम्प्रवृत्तानि = चांगल्या प्रकारांनी प्रवृत्त झालेल्यांना (वि.)

**उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ।**

**गुणा वर्तन्त इत्येव योऽवतिष्ठति नेङ्गते ॥२३॥**

**अन्वयः** - उदासीनवत्, आसीनः, यः, गुणैः, न, विचाल्यते, यः, गुणाः, वर्तन्ते, इति, एव, अवतिष्ठति, न, इङ्गते ।

**अन्वयार्थः** - **उदासीनवत्** - उदासीनाप्रमाणे **आसीनः** - स्थित असणारा **यः** - जो पुरुष **गुणैः** - गुणांच्या द्वारा **न विचाल्यते** - आत्मतत्त्वापासून विचलित केला जात नाही **यः** - जो पुरुष **गुणाः** - गुणच **वर्तन्ते** - आप आपल्यामध्ये वर्तन करतात **इति, एव** - असे जाणूनच **अवतिष्ठति** - आपल्या स्वरूपामध्ये स्थिर असतो **न, इङ्गते** - आत्मतत्त्वापासून विचलित होत नाही.

**विवरण** - जो उदासीनाप्रमाणे राहणारा असा तो या तिन्ही गुणांच्या द्वारा विचलित केला जात नाही कारण इंद्रिय, मन, बुद्धि, प्राण आदि सर्व करण आणि शब्दादि विषय हे सर्व गुणांचा विस्तार असल्यामुळे गुणच गुणामध्ये वर्तन करतात आत्म्याचा त्यांच्याशी काहीच संबंध नाही कारण निर्गुण-निराकार, नित्य, चेतन,

तसेच सर्वथा असंग असणाऱ्या आत्म्यामध्ये सदा-सर्वदाकरिता स्थित असणारा पुरुष आपल्या स्थितिपासून केव्हाही विचलित होत नाही म्हणजे गुणातीत पुरुषाला केव्हाच गुण विचलित करू शकत नाहीत म्हणजे गुणातीत पुरुष त्या स्थितीमध्ये अभिन्न भावाने स्थित असतो म्हणून तो आपल्या स्थितीपासून केव्हाच विच लित होत नाही. कारण, त्याची सत्ता परमात्म्याहून भिन्न नसल्यामुळे त्याला कोण विचलित करू शकेल आ णि तो कोणापासून विचलित होईल.

**व्याकरणम्** - **उदासीनवत्** - उदासीन वत् प्रत्ययान्त अ. **आसीनः** - आस् द्वि.ग.आ.प.कर्त.वर्त.धा. वि.पु.प्र.ए.व. **यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **गुणैः** - गुण पु.तृ.ब.व. **न** - न क्रि.अ. **विचाल्यते** - वि+चल्+ णिच् प्र.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व. **यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **गुणाः** - गुण पु.प्र.ब.व. **इति** - इति क्रि. वि.अ. **एव** - एव निश्चयात्मक अ. **वर्तन्ते** - वृत् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व. **न** - न क्रि.वि.अ. **अवतिष्ठति** - अव+स्था प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **इङ्गते** - इङ्ग् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **उदासीनवत्** - उदासीन इव उदासीनवत् = उदासीनाप्रमाणे **(कर्म.स.)**

**समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकाञ्चनः ।**

**तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिन्दात्मसंस्तुतिः ॥२४॥**

**अन्वयः** - समदुःखसुखः, स्वस्थः, समलोष्टाश्मकाञ्चनः, तुल्यप्रियाप्रियः, धीरः, तुल्यनिन्दात्मसंस्तुतिः ।

**अन्वयार्थः** - **समदुःखसुखः** - ज्या ठिकाणी दुःख आणि सुख समान आहेत **स्वस्थः** - जो आपल्या आत्मस्वरूपामध्ये स्थित आहे **समलोष्टश्मकाञ्चनः** - मातीचे ढेकूळ दगड आणि काञ्चन (सुवर्ण) ज्याला सम आहेत तथा **तुल्यप्रियाप्रियः** - ज्याला प्रिय आणि अप्रिय समान आहेत **धीरः** - असा जो बुद्धिमान पुरुष त्याच्या ठिकाणी **तुल्यनिन्दात्मसंस्तुतिः** - निंदा आणि आत्मस्तुतिसुद्धा समान आहेत.

**विवरण** - गुणातीत पुरुषाला सांसारिक वस्तुपासून सुख जरी प्राप्त झाले तरी तो त्यापासून आनंदित होत नाही आणि दुःख जरी प्राप्त झाले तरी तो त्याविषयी द्वेष करीत नाही. म्हणजे तो सुखदुःखामध्ये समान असतो. वास्तविक स्वरूपामध्ये स्थित राहणाऱ्या पुरुषाच्या ठिकाणी मातीचे ढेकूळ, दगड, आणि सोने समानच असतात. त्याचप्रमाणे त्याची निंदा केली तरी तो क्रोधित होत नाही आणि स्तुति केली तरी हर्षित होत नाही. प्रिय वस्तुचा संयोग झाला तरी आनंदित होत नाही आणि अप्रिय वस्तुचा संयोग झाला तरी द्वेष करीत नाही कारण की, तो परब्रह्म परमात्म्यामध्ये निरंतर समाहित झालेला असतो म्हणून त्याची सर्व ठिकाणी समान बुद्धी झालेली असते.

**व्याकरणम्** - **समदुःखसुखः** - सम वि. दुःख न. सुख न.वि.पु.प्र.ए.व. **स्वस्थः** - स्व वि. स्थ वि.पु.प्र.ए.व. **समलोष्टाश्मकाञ्चनः** - सम वि. लोष्ट पु. अश्म पु. काञ्चन वि.पु.प्र.ए.व. **तुल्यप्रियाप्रियः** - तुल्य वि. प्रिय वि. अप्रिय वि.पु.प्र.ए.व. **धीरः** - धीर वि.पु.प्र.ए.व. **तुल्यनिन्दात्मसंस्तुतिः** - तुल्य वि. निन्दा स्त्री. आत्मन् पु. सम्+स्तुति स्त्री.वि.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **स्वस्थः** - स्वे-स्वस्मिन् स्वरूपे-आत्मनि तिष्ठतीति स्वस्थः = आपल्या स्वरूपामध्ये स्थित राहणारा**(स.त.स.)** **समदुःखसुखः** - दुःखम्-प्रतिकूलञ्च सुखम्-अनुकूलञ्चेति दुःखसुखे समे-मिथ्यात्वेन तुल्ये दुःखसुखे यस्य स समदुःखसुखः = मिथ्यात्वरूपाने दुःखसुख समान आहे ज्याचे तो**(ब.स.)**

यद्वा **समदु:खसुख:** - दु:खञ्च सुखञ्च दु:खसुखे समे दु:खसुखे द्वेषरागशून्यतयाऽनात्मधर्मतयाऽनृततया च यस्य स समदु:खसुख: = राग आणि द्वेषाने शून्य असल्यामुळे, अनात्मधर्म असल्यामुळे, अनृत असल्यामुळे सुखदु:ख समान आहेत ज्याचे तो**(ब.स.)** **समलोष्टाश्मकाञ्चन:** - लोष्टश्च-पांसुपिण्डश्च, अश्मा च-पाषाणश्च काञ्चनश्च-सुवर्णश्चेति लोष्टाश्मकाञ्चनानि समानि-तुल्यानि लोष्टाश्मकाञ्चनानि यस्य स समलोष्टाश्मकाञ्चन: = मातीचे ढेकूळ, पाषाण आणि सुवर्ण समान आहेत ज्याचे तो समलोष्टाश्मकाञ्चन**(ब.स.)** यद्वा **समलोष्टाश्मकाञ्चन:** - समानि प्रीत्यप्रीत्योरविषयाणि लोष्टाश्मकाञ्चनानि यस्य स समलोष्टाश्मकाञ्चन: = सम-प्रीति आणि अप्रीतिचे अविषय आहे लोष्ट, पाषाण आणि कांचन ज्याचे तो**(ब.स.)** यद्वा **समलोष्टाश्मकाञ्चन:** - समानि प्रत्यग्दृष्ट्या समभावं गतानि ब्रह्मात्मना दृष्टानि लोष्टाश्मकाञ्चनानि येन स समलोष्टाश्मकाञ्चन: = सम-प्रत्यग्दृष्टिने समभावाला प्राप्त-आत्मदृष्टिने पाहिले गेले लोष्ट, अश्म आणि कांचन ज्याने तो समलोष्टाश्मकांचन**(ब.स.)** **तुल्यप्रियाप्रिय:** - प्रियश्च-प्रीतिविषयश्च, अप्रियश्च-दु:खविषयश्च प्रिया प्रिये, तुल्ये-आत्मत्वेन समे प्रियाप्रिये यस्य स तुल्यप्रियाप्रिय: = प्रिय आणि अप्रिय समान आहे ज्याचे तो **(ब.स.)** **तुल्यनिन्दात्मस्तुति:** - आत्मन: संस्तुतिरित्यात्मसंस्तुति:, निन्दा च आत्मसंस्तुतिश्च निन्दात्मसंस्तुती तुल्ये निन्दात्मसंस्तुती यस्य स तुल्यनिन्दात्मसंस्तुति: = निंदा आणि स्तुति समान आहे ज्याची तो**(ब.स.)** यद्वा **तुल्यनिन्दात्मसंस्तुति:** - निन्दा-दूषणम्, आत्मनो देहादेर्गुणकीर्तनं स्तुतिरात्मसंस्तुति: निन्दा च आत्मसंस्तुतिश्च निन्दात्मसंस्तुती तुल्ये निन्दात्मसंस्तुती यस्य स तुल्यनिन्दात्मसंस्तुति: = निंदा-दूषण, आपल्या देहादिकांचे गुणकीर्तन-स्तुति आत्मस्तुति, निंदा आणि स्तुति समान आहे ज्याची तो**(ब.स.)**

**मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयो: ।**

**सर्वारम्भपरित्यागी गुणातीत: स उच्यते ॥२५॥**

**अन्वय:** - मानापमानयो:, तुल्य:, मित्रारिपक्षयो:, तुल्य:, सर्वारम्भपरित्यागी, स:, गुणातीत:, उच्यते ।

**अन्वयार्थ: - मानापमानयो: -** मान आणि अपमानाच्या ठिकाणी **तुल्य:** - समान असणारा **मित्रारिपक्षयो:** - मित्रपक्ष आणि शत्रुपक्षाच्या ठिकाणी **तुल्य:** - समान असणारा त्याचप्रमाणे **सर्वारम्भपरित्यागी** - सर्व आरंभाचा त्याग करणारा **स:** - असा तो पुरुष **गुणातीत:** - गुणातीत **उच्यते** - म्हटला जातो.

**विवरण** - जो पुरुष मान आणि अपमानाच्या ठिकाणी समान असतो म्हणजे मान करणाऱ्या पुरुषाबरोबर प्रेम करीत नाही आणि अपमान करणाऱ्या पुरुषाबरोबर द्वेष करीत नाही. मित्रभावाने आला तर त्याचा आदर करीत नाही आणि शत्रूभावाने आला तर त्याचा तिरस्कार करीत नाही म्हणजे त्याची संपूर्ण प्राणिमात्रांविषयी समान बुद्धी झालेली असते आणि लोकांनी वाईट मार्गापासून मुक्त होऊन चांगल्या मार्गांचे अनुसरण करावे या भावनेने जरी प्रारब्धानुसार त्याच्याकडून लोकसंग्रहाकरिता शास्त्रानुकूल काही कर्म घडत असले तरी तो त्या कर्माच्या ठिकाणी असणाऱ्या कर्तेपणाचा अभिमान करीत नाही अशा पुरुषाला गुणातीत पुरुष असे म्हटले जाते.

**व्याकरणम् - मानापमानयो: -** मान पु. अपमान पु.स.द्वि.व. **तुल्य: -** तुल्य वि.पु.प्र.ए.व. **मित्रारिपक्षयो: -** मित्र न. अरि पु. पक्ष पु.स.द्वि.व. **तुल्य: -** तुल्य वि.पु.प्र.ए.व. **सर्वारम्भपरित्यागी -** सर्व वि. आरम्भ पु. प रि+त्यागिन् पु.प्र.ए.व. **स: -** तत् सर्व.पु.प्र.ए.व. **गुणातीत: -** गुण पु. अति+इ द्वि.ग.प.प.कर्त.भू.धा. वि.पु.प्र.ए.व. **उच्यते -** वच् द्वि.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - मानापमानयोः -** मानश्च-पूजाच, अपमानश्च-तिरस्कारश्चेति मानापमानौ तयोः मानापमानयोः = मान आणि अपमानाच्या विषयी**(द्वं.स.) सर्वारम्भपरित्यागी** - दृष्टादृष्टार्थानि कर्माणि आरभ्यन्त इति आरम्भः, सर्वे च ते आरम्भाः सर्वारम्भास्तान् परित्यक्तुं शीलं यस्य स सर्वारम्भपरित्यागी = दृष्ट फल देणारी व अदृष्टार्थ-अदृष्ट फल देणारी कर्मे आरंभिली जातात म्हणून आरंभ सर्व आणि आरंभ सर्वारंभ त्या सर्वारंभाचा परित्याग करण्याचे शील आहे ज्याचे तो**(कर्म.ग.ब.स.) मित्रारिपक्षयोः -** यस्तु ब्रह्म विच्चर्यां दृष्ट्वाऽनुमोदते स मित्रपक्षश्च यस्तु नाऽनुमोदते सोऽरिपक्षश्चेति मित्रारिपक्षौ तयोर्मित्रारिपक्षयोः = जो ब्रह्मवेत्त्याच्या आचाराला पाहून प्रसन्न होतो तो त्याचा मित्रपक्ष आणि जो प्रसन्न होत नाही तो शत्रुपक्ष अशा त्या मित्र आणि शत्रू पक्षाचा**(द्वं.स.)**

**मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।**

**स गुणान्समतीत्यैतान्ब्रह्मभूयाय कल्पते ॥२६॥**

**अन्वयः -** च, यः, माम्, अव्यभिचारेण, भक्तीयोगेन, सेवते, सः, एतान्, गुणान्, समतीत्य, ब्रह्मभूयाय, कल्पते ।

**अन्वयार्थः - च -** आणि **यः -** जो पुरुष **माम् -** मला (परमेश्वराची) **अव्यभिचारेण भक्तियोगेन -** अव्य भिचारी भक्तिच्या योगाने **सेवते -** निरंतर भजतो अथवा उपासना करतो **सः -** तो **एतान्, गुणान् -** या तीन गुणांना **समतीत्य -** अतिक्रमण करून **ब्रह्मभूयाय -** ब्रह्मस्वरूपाला (करिता) **कल्पते -** योग्य होतो.

**विवरण -** या क्षणभंगूर आणि विनाशी संसारामध्ये केवळ एकमात्र परमेश्वरच सर्वश्रेष्ठ आहे असे जाणून जो अनन्य प्रेमाच्या तसेच अव्यभिचारी भक्तीच्या द्वारा मला निरंतर भजतो (माझी निरंतर उपासना करतो) तो सुद्धा या तीन गुणांना उल्लंघन करून ब्रह्मस्वरूपाच्या प्राप्तीकरिता योग्य होतो.

**व्याकरणम् - च -** च उभ.अ. **यः -** यत् सर्व.पु.प्र.ए.व. **माम् -** अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **अव्यभिचारेण -** अ+व्यभिचार पु.तृ.ए.व. **भक्तियोगेन -** भक्ति स्त्री. योग पु.तृ.ए.व. **सेवते -** सेव् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व. **सः -** तत् सर्व.पु.प्र.ए.व. **समतीत्य -** सम्+अति+इ द्वि.ग.प.प.ल्यबन्त अ. **ब्रह्मभूयाय -** ब्रह्मन् न. भूय न.च.ए.व. **कल्पते -** क्लृप् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अव्यभिचारेण -** न विद्यते व्यभिचारी-भेदो यस्य सोऽव्यभिचारस्तेनाऽव्यभिचारेण = नाही व्यभिचार म्हणजे भेद ज्याचा तो(त्याच्या द्वारा)**(ब.स.) भक्तियोगेन -** ध्येयाकारेणाऽखण्डात्मना चित्तस्य विषयानुल्लेखिनः परिणामो भक्तिरखण्डाकारवृत्तिः सैव योगः-कैवल्यसिद्धौ परमोपाय इति भक्तियोगस्तेन भ क्तियोगेन = ध्येयाकार अखण्डरूपाने विषयांचा उल्लेख करणाऱ्या चित्ताचा जो परिणाम हीच भक्ति-अखण्डाकारवृत्ति तोच योग-कैवल्यसिद्धिकरिता परम उपाय असा भक्तियोग त्या भक्तियोगाच्या द्वारा **(कर्म.स.) भक्तियोगेन -** भजनं भक्तिः सा एव योगस्तेन भक्तियोगेन = भजन म्हणजे भक्ति, तीच योग असा भक्तियोग त्या भक्तियोगाच्याद्वारा**(कर्म.स.) ब्रह्मभूयाय -** ब्रह्मणो-भावो ब्रह्मभूयं तस्मै ब्रह्मभूयाय = ब्रह्माचा भाव ब्रह्मभूय त्याकरिता म्हणजे ब्रह्म भावाकरिता**(भावार्थे त.वि.)**

भगवत् स्वरूपाचा महिमा -

**ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्य च ।**

**शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकान्तिकस्य च ॥२७॥**

**अन्वयः** - हि, अहम्, अमृतस्य, च, अव्ययस्य, च, शाश्वतस्य, धर्मस्य, च, ऐकान्तिकस्य, सुखस्य, ब्रह्मणः, प्रतिष्ठा, (अस्मि)।

**अन्वयार्थः - हि -** कारण **अहम् -** मी (परमात्मा) **अमृतस्य च, अव्ययस्य -** अमृतस्वरूप आणि अविनाशी **च -** आणि **शाश्वतस्य धर्मस्य -** शाश्वत धर्मरूप **च -** आणि **ऐकान्तिकस्य सुखस्य -** अखंडसुखरूप अशा **ब्रह्मणः -** परब्रह्माची प्रतिष्ठा (आश्रय) (**अस्मि** - आहे.)

**विवरण -** भगवान म्हणतात कि, हे अर्जुना! उपर्युक्त प्रतिपादित जे निर्गुण निराकार ब्रह्म ते माझ्यापासून भिन्न नाही आणि मी त्याहून भिन्न नाही. वास्तविक विचार केला तर मी आणि ब्रह्म दोन वस्तूच नाहीत केवळ एकमात्र तत्त्व आहे. परंतु, अधिकारी भेदाने उपासनेकरिता एकाच परमात्म्याची भिन्न-भिन्न रूपे प्रतिपादन केलेली आहेत. जो सगुणभक्त आहे त्याकरिता सगुण परमात्म्याची उपासना (सांगितली) आणि निर्गुण भक्तांकरिता निर्गुण परमात्म्याची उपासना सांगितली अशाप्रकारे अमृत स्वरूप अविनाशी आणि शाश्वत धर्मरूप नित्यसुखस्वरूप परब्रह्माची (स्थिती) मीच आहे.

**व्याकरणम् - हि -** हि क्रि.वि.अ. **अहम् -** अस्मत् सर्व.प्र.ए.व. **अमृतस्य -** अमृत वि.न.ष.ए.व. **च -** च उभ.अ. **अव्ययस्य -** अव्यय वि.न.ष.ए.व. **च -** च उभ.अ. **शाश्वतस्य -** शाश्वत वि.न.ष.ए.व. **धर्मस्य -** धर्म पु.वि.ष.ए.व. **च -** च उभ.अ. **ऐकान्तिकस्य -** ऐकान्तिक वि.न.ष.ए.व. **सुखस्य -** सुख न.ष.ए.व. **ब्रह्मणः -** ब्रह्मन् न.ष.ए.व. **प्रतिष्ठा -** प्र+स्था प्र.ग.प.प.+अङ्+टाप्=प्रतिष्ठा वि.स्त्री.प्र.ए.व. **(अस्मि) -** अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अव्ययस्य -** न विद्यते व्ययः-कालत्रयेऽपि नाशो यस्य तदव्ययं तस्याऽव्ययस्य = नाही होत व्यय-कालत्रयामध्येसुद्धा नाश ज्याचा तो त्याचा**(ब.स.) शाश्वतस्य -** शश्वतम्-निरंतरं तत्र भवः शाश्वतस्तस्य शाश्वतस्य = शश्वत म्हणजे निरंतर होणारे ते शाश्वत त्या शाश्वताची**(भावार्थे त.वि.) ऐकान्तिकस्य -** एकान्तः-अव्यभिचारस्तत्र भवमैकान्तिकं तस्य ऐकान्तिकस्य-अव्यभिचारस्य = एकांत म्हणजे अव्यभिचार त्यामध्ये होणारे ते ऐकांतिक त्याची**(भावार्थे त.वि.)**

**ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे**

**श्रीकृष्णार्जुनसंवादे गुणत्रयविभागयोगो नाम चतुर्दशोऽध्यायः ॥१४॥**

**-: अध्याय चौदावा समाप्त :-**

**ॐ श्रीपरमात्मने नम:**

**अथ पञ्चदशोऽध्याय:**

**अध्याय १५ वा**

आपल्या स्वरूपाच्या प्राप्तीच्या आड जर कोण येत असेल तर हा प्रपंच म्हणजे एक प्रकारचा बळकट वृक्ष आहे. लौकिक वृक्षांना खाली मूळ वर फांद्या असतात त्यामुळे त्याचा अंत लागतो व त्याच्या मुळाशी घाव घातला तर तो मूळापासून तोडल्या जातो; पण हा वृक्ष त्याच्या उलट आहे. याचे वर मूळ आणि खाली फांद्या आहेत त्यामुळे याचा शेवट लागत नाही आणि तोडता येत नाही म्हणून या वृक्षाचेच भगवान अध्यायाच्या आरंभी प्रतिपादन करतात. म्हणून हा संसार कसा आहे ते या अध्यायाच्या प्रारंभी अश्वत्थ वृक्षाच्या रूपकाने भगवान सांगत आहेत. ज्ञानेश्वर महाराजाच्या दृष्टिने हा अध्याय ज्ञानकांडाचा व गीता शास्त्राचा शेवटचा अध्याय आहे. या अध्यायामध्ये संसाराचे मिथ्यात्व दाखवून व जीवाला आत्मस्वरूपाची प्राप्ती करून देवून त्याच्या मागची जन्ममरणाची येरझार संपविणे हा या अध्यायाचा विषय आहे.

अश्वत्थ वृक्षाच्या रूपकाने संसाराचे वर्णन आणि त्याला जाणऱ्याचे महत्व -

**श्री भगवान उवाच** - श्री भगवान म्हणाले

**ऊर्ध्वमूलमध:शाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ।**

**छन्दांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ॥१॥**

**अन्वय:** - ऊर्ध्वमूलम्, अध:शाखम्, अव्ययम्, अश्वत्थम्, प्राहु:, यस्य, पर्णानि, छन्दांसि, य:, तम्, वेद, स:, वेदवित् ।

**अन्वयार्थ:** - **ऊर्ध्वमूलम्** - ज्याचे मुळ वर आहे **अध:शाखम्** - ज्याच्या शाखा (फांद्या) खाली आहेत **अव्ययम्** - ज्याचा कधीही नाश होत नाही (म्हणजे अविनाशी) असा हा (अशा याला) **अश्वत्थम्** - संसार वृक्ष **प्राहु:** - म्हणतात **यस्य** - ज्याची **पर्णानि** - पाने **छन्दांसि** - वेद आहेत **य:** - जो पुरुष **तम्** - त्या प्रपंचरूपी वृक्षाला **वेद** - जाणतो **स:** - तो पुरुष **वेदवित्** - खरा (वास्तविक) ज्ञानी आहे म्हणजे वेदवेत्ता आहे.

**विवरण** - संसारवृक्षाची उत्पत्ती आणि विस्तार ब्रह्मापासून झालेला असल्यामुळे ब्रह्म या वृक्षाचे मूळ आहे म्हणजे नित्य, अनंत आणि सर्वांचे आधार आणि सर्वांच्या वर जे नित्य धाम त्या ठिकाणी निवास करणारे असल्यामुळे त्याला मूळ या नावाने संबोधित केले आहे. कारण, मूळापेक्षा या ठिकाणी शाखा खाली असल्यामुळे त्याला अहंकार, महत्तत्त्वादि खाली शाखा असणारा (संसारवृक्ष) आणि क्षणभंगुर आणि विनाशी म्हटले आहे. परंतु याचा प्रवाह अनादि असल्यामुळे तो अव्यय म्हणजे अविनाशी आहे. ऋग्वेद, यजुर्वेद आदि या वृक्षाची पाने आहेत. ज्याप्रमाणे पाने वृक्षाच्या शाखापासून उत्पन्न होऊन वृक्षाचे रक्षण आणि वाढ करणारी असतात. त्याचप्रमाणे वेदविहित कर्मापासूनच संसाराचे रक्षण आणि वृद्धी होते म्हणून वेदाला या वृक्षाची पाने म्हटले आहे. जो पुरुष या संसारवृक्षाला जाणतो तोच वास्तविक वेदाला जाणतो. (जाणणारा आहे.)

**व्याकरणम् - ऊर्ध्वमूलम्** - ऊर्ध्व वि. मूल न.वि.पु.द्वि.ए.व. **अध:शाखम्** - अधस् अ. शाख वि.पु. द्वि.ए.व. **अव्ययम्** - अव्यय वि.पु.द्वि.ए.व. **अश्वत्थम्** - अश्वत्थ पु.द्वि.ए.व. **प्राहु:** - प्र+ब्रू द्वि.ग.उ.प. (प.प.)वर्त.तृ.पु.ब.व. **यस्य** - यत् सर्व.पु.ष.ए.व. **पर्णानि** - पर्ण न.प्र.ब.व. **छन्दांसि** - छन्द्+असुन्-छन्दस् न.प्र.ब.व. **य:** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **तम्** - तत् सर्व.पु.द्वि.ए.व. **वेद** - विद् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **स:** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **वेदवित्** - वेदवित् वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **ऊर्ध्वमूलम्** - ऊर्ध्वम्-सर्वोत्कृष्टं क्षराक्षराभ्यां विलक्षणं ब्रह्ममूलं कारणम्-बीजं यस्य स ऊर्ध्वमूलस्तं ऊर्ध्वमूलम् = ऊर्ध्व म्हणजे उत्कृष्ट क्षराक्षरापासून विलक्षण ब्रह्ममूळ कारण-बीज आहे ज्याचे त्याला**(ब.स.)** यद्वा **ऊर्ध्वमूलम्** - ऊर्ध्वमुच्छ्रितमुत्कृष्टतमं यत्परं ब्रह्म तदेव मायाशबलं मूलम्-बीजं यस्य स ऊर्ध्वमूलस्तं ऊर्ध्वमूलम् = ऊर्ध्व-उच्छ्रित-उत्कृष्टतम जे परब्रह्म आहे तेच मायाशबल ब्रह्म मूल-बीज आहे ज्याचे तो उर्ध्वमूल त्याला**(ब.स.)** यद्वा **ऊर्ध्वमूलम्** - अव्यक्तमव्याकृतं मायोपाधिकं ब्रह्म तदेव मूलम्-कारणं यस्य स ऊर्ध्वमूलस्तं ऊर्ध्वमूलम् = अव्यक्त-अव्याकृत अर्थात् मायोपाधिक ब्रह्म तेच मूल-कारण आहे ज्याचे तो ऊर्ध्वमूल त्याला**(ब.स.)** **अध:शाखम्** - अधस्तस्माद् ब्रह्मणोऽर्वाचीना:-कार्योपाधयो हिरण्यगर्भादय: शाखा यस्य सोऽध:शाखस्तमध:शाखम् = अध म्हणजे ब्रह्मापासून खाली कार्योपाधिरूप हिरण्यगर्भादि शाखा आहेत ज्याच्या त्याला**(ब.स.)** यद्वा **अध:शाखम्** - अव्यक्तान्महन्महतोऽङ्कारोऽहङ्कारात्पञ्चतन्मात्राणि पञ्चतन्मात्रेभ्य: पञ्चमहाभूतानीति श्रवणान्महदादिविकारा: सर्वे प्रकृतेरध:स्थत्वादध इत्युच्यन्ते अधोऽध:शब्दवाच्या महदादय: शाखा इव शाखा यस्य सोऽयमध:शाखस्तमध:शाखम् = अव्यक्तापासून महत्, महत् पासून अहंकार, अहंकारापासून पंच तन्मात्रा, पंच तन्मात्रापासून पंच महाभूते उत्पन्न होतात या वचनाने महदादि संपूर्ण विकार प्रकृतिपासून खाली स्थित आहेत म्हणून ते अध: आहेत अध:-अध:शब्दवाच्य महदादि शाखाच्या समान ज्याच्या शाखा आहेत तो अध:शाख त्याला**(ब.स.)** **अश्वत्थम्** - श्व:-प्रभातपर्यन्तं तिष्ठतीति श्वत्थो-न श्वत्थोऽश्वत्थस्तमश्वत्थम् = श्व-सूर्योदयापर्यंत राहणारा श्वत्थ, जो श्वत्थ नाही तो अश्वत्थ त्याला**(न.त.स.)** यद्वा **अश्वत्थम्** - मायाकार्यत्वेन तिष्ठतीत्यश्वथस्तमश्वथम् = माया कार्यत्वेन जो राहतो तो अश्वत्थ त्याला**(तृ.त.स.)** यद्वा **अश्वत्थम्** - श्वोऽपि न स्थाता इत्यश्वत्थस्तं क्षणप्रध्वंसिनमश्वत्थम् = जो उद्या ही राहणार नाही म्हणून अश्वत्थ त्या क्षणभंगुर अश्वत्थाला**(न.त.स.)** **वेदवित्** - वेदं वेत्ति-जानातीति वेदवित् = वेदाला जाणणारा वेदवित्**(उप.स.)**

संसार वृक्षाचा विस्तार आणि असंगशस्त्राने त्याचे छेदन करण्याचा उपाय -

**अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवाला: ।**

**अधश्च मूलान्यनुसन्ततानि कर्मानुबन्धीनि मनुष्यलोके ॥२॥**

**अन्वय:** - तस्य, गुणप्रवृद्धा:, विषयप्रवाला:, शाखा:, अध:, च, ऊर्ध्वम्, प्रसृता:, मनुष्यलोके, कर्मानुबन्धीनि, मूलानि, अध:, च, (ऊर्ध्वम्), अनुसन्ततानि ।

**अन्वयार्थ:** - **तस्य** - त्या वृक्षाच्या **गुणप्रवृद्धा:** - सत्त्व, रज आणि तम या योगाने वृद्धिला पावलेल्या आणि **विषयप्रवाला:** - शब्दादि विषयरूपी पल्लवांनी युक्त अशा **शाखा:** - फांद्या **अध: च, ऊर्ध्वम्** - खाली आणि वर **प्रसृता:** - पसरलेल्या आहेत **मनुष्यलोके** - मनुष्यलोकामध्ये **कर्मानुबन्धीनि** - कर्मानुसार बांधणारी **मूलानि** - अहंता ममता आणि वासनारूपी मूळे **अध: च (उर्ध्वम्)** - खाली आणि वर **अनुसन्ततानि** -

पसरलेली आहेत.

**विवरण** - सत्त्व, रज आणि तम यांच्या द्वारा वाढलेल्या आणि शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध या पाच विषयरूपी नवीन नवीन कोमल पल्लवांकुरांनी युक्त त्या संसार वृक्षाच्या शाखा तिर्यक् योनी तसेच ब्रह्मलोकापासून तर पाताळापर्यंत पसरलेल्या आहेत आणि मनुष्यशरीर धारण करून कर्म हेच ज्याचे ध्येय आहे. अशा मनुष्यलोकामध्ये कर्मानुसार बंधनाला कारण होणारी अहंता, ममता आणि वासनारूपी मूळे खालच्या आणि वरच्या लोकामध्ये पसरलेली आहेत.

**व्याकरणम्** - **तस्य** - तत् सर्व.पु.ष.ए.व. **गुणप्रवृद्धाः** - गुण पु. प्र+वृध् प्र.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.प्र.ब.व. **विषयप्रवालाः** - विषय पु. प्रवाला स्त्री.प्र.ब.व. **शाखाः** - शाखा स्त्री.प्र.ब.व. **अधः** - अधस् अ.**च** - उभ.अ. **ऊर्ध्वम्** - ऊर्ध्व अ. **प्रसृताः** - प्र+सृ प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **मनुष्यलोके** - मनुष्य पु. लोक पु.स.ए.व. **कर्मानुबन्धीनि** - कर्मन् न. अनुबन्धिन् पु.वि.न.प्र.ब.व. **मूलानि** - मूल न.प्र.ब.व. **अधः** - अधस् अ. **च** - च उभ.अ. **अनुसन्ततानि** - अनु+सम्+तन् अ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **विषयप्रवालाः** - विषयाः-शब्दस्पर्शरूपरसगन्धाः प्रवालाः-मनोहरकोमलपल्लवा यासां ता विषयप्रवालाः = विषय-शब्दादिविषय प्रवाल-पल्लव आहेत ज्या शाखांचे त्या**(ब.स.) मनुष्यलोके** - मनुष्याणां लोको मनुष्यलोकस्तस्मिन् मनुष्यलोके = मनुष्य लोकामध्ये**(ष.त.स.) गुणप्रवृद्धाः** - गुणैः-सत्त्वरजस्तमोगुणैः प्रकर्षेण वृद्धाः-वृद्धिगता इति गुणप्रवृद्धाः = सत्त्वरजतमोगुणांच्या द्वारा वृद्धिला प्राप्त झालेल्या अशा गुणप्रवृद्धा**(तृ.त.स.)**

**न रूपमस्येह तथोपलभ्यते नान्तो न चादिर्न च सम्प्रतिष्ठा ।**

**अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसङ्गशस्त्रेण दृढेन छित्त्वा ॥३॥**

**अन्वयः** - इह, अस्य, रूपम्, तथा, न, उपलभ्यते, न, अन्तः, च, न, आदिः, च, न, सम्प्रतिष्ठा, एनम्, सु विरूढमूलम्, अश्वत्थम्, दृढेन, असङ्गशस्त्रेण, छित्त्वा ।

**अन्वयार्थः** - **इह** - या ठिकाणी **अस्य रूपम्** - या प्रपंचरूपी वृक्षाचे रूप **तथा** - ज्याप्रमाणे प्रतिपादन केले आहे त्याप्रमाणे **न, उपलभ्यते** - विचारांती उपलब्ध होत नाही **न, अन्तः** - याचा अंत नाही **च** - आणि **न आदिः** - आदि नाही **च** - आणि **न सम्प्रतिष्ठा** - स्थितीही नाही **सुविरूढमूलम्** - अतिशय खोल मूळे गेलेल्या **एनम्, अश्वत्थम्** - या संसारवृक्षाला **दृढेन, असङ्गशस्त्रेण** - अतिशय दृढ अशा अनासक्तिरूप तीक्ष्ण शस्त्राने **छित्त्वा** - तोडून.

**विवरण** - ज्याप्रमाणे शास्त्रप्रतिपादित संसारवृक्षाचे स्वरूप आहे त्याप्रमाणे वास्तविक विचार केला तर प्रतीत होत नाही म्हणजे विचाराच्या अंती नाशवान आणि क्षणभंगुर प्रतीत होते म्हणून या वृक्षाचा अंत कळत नाही आरंभ कळत नाही आणि स्थिती कळत नाही. म्हणजे या संसारवृक्षाचे आदि, अंत आणि स्थिती हे तिन्ही सुद्धा उपलब्ध होत नाहीत त्याचप्रमाणे या संसारवृक्षाच्या अनादि कालापासून पुष्ट तसेच अत्यंत मजबूत होणाऱ्या अविद्यामूलक अहंता, ममता आणि वासनारूपी मूळ असणाऱ्या संसार वृक्षाला दृढ असलेल्या विवेकरूपी असंग शस्त्राने तोडून.

**व्याकरणम्** - **इह** - इह क्रि.वि.अ. **अस्य** - इदम् सर्व.पु.ष.ए.व. **रूपम्** - रूप वि.न.प्र.ए.व. **तथा** - तथा

क्रि.वि.अ. **न** - न क्रि.वि.अ. **उपलभ्यते** - उप+लभ् प्र.ग.आ.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **आदिः** - आदि पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अन्तः** - अन्त पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **न** - न क्रि. वि.अ. **सम्प्रतिष्ठा** - सम्+प्रतिष्ठा स्त्री.प्र.ए.व. **सुविरूढमूलम्** - सु अ. वि+रूह् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. मूल न.द्वि.ए.व. **एनम्** - एतत् सर्व.पु.द्वि.ए.व. **अश्वत्थम्** - अश्वत्थ पु.द्वि.ए.व. **दृढेन** - दृढ वि.न.तृ.ए.व. **असङ्गशस्त्रेण** - अ+सङ्ग पु.वि.न. शस्त्र न.तृ.ए.व. **छित्त्वा** - छिद् स.ग.उ.प.त्वान्त अ.

**समासविग्रहार्थाः** - **असङ्गशस्त्रेण** - सज्जते विषयेषु पुमाननेनेति सङ्गः-वैषयिको रागस्तदभावोऽसङ्गो विरागस्तीव्रमोक्षेच्छया सदसद्विवेकविज्ञानेन च समुत्पन्नं वैराग्यं तदेव शस्त्रं तेनाऽसङ्गशस्त्रेण = ज्यायोगाने पुरुष विषयांमध्ये सक्त होतो तो संग म्ह. विषयसंबंधी राग, त्याचा अभाव असंग-विराग, तीव्र मोक्षाच्या इच्छेने तसेच सत्य व असत्याच्या विवेकज्ञानाने उत्पन्न वैराग्य हेच शस्त्र आहे त्या असंगशस्त्राने **(न.त.ग.कर्म.स.)** यद्वा **असङ्गशस्त्रेण** - न सङ्ग इत्यसङ्गः-पुत्रवित्तलोकैषणादिभ्यो व्युत्थानं तेन असङ्गशस्त्रेण = असंग म्ह. पुत्र, वित्त व लोक या तीन एषणादिकांपासून व्युत्थान करणे म्ह. वैराग्यपूर्वक परिव्राजक स्वीकारणे त्या असंगशस्त्राने**(न.त.ग.पं.त.स.)** यद्वा **असङ्गशस्त्रेण** - न सङ्ग इत्यसङ्गोऽसङ्गः-स्त्री-पुत्रादिषु सङ्गराहित्यमहंममतात्यागो वैराग्यं तदेव शस्त्रं तेनाऽसङ्गशस्त्रेण-वैराग्येण = संग नाही तो असंग, असंग हेच शस्त्र म्हणजे स्त्रीपुत्रादिच्या ठिकाणी आसक्तिरहितता-अहंता आणि ममतेचा त्यागच वैराग्य तेच शस्त्र आहे त्या असंगशस्त्राने**(न.ग.कर्म.स.)** यद्वा **असङ्गशस्त्रेण** - सङ्गः-स्पृहाऽसङ्गः-सङ्गविरोधि वैराग्यं पुत्र वित्तलोकैषणात्यागरूपं तदेव शस्त्रं रागद्वेषमयसंसारविरोधित्वात्, तेनाऽसङ्गशस्त्रेण = संग-स्पृहा असंग-संग विरोधी असंग-पुत्रवित्त आणि लोकसंबंधी तीन एषणांचा त्यागरूप वैराग्य तेच रागद्वेषमय संसाराच्या विरोधि असल्यामुळे शस्त्र आहे त्या असंगशस्त्राने**(न.ग.कर्म.स.)** **सुविरूढमूलम्** - सुष्ठु-सम्यक् प्रकारेण विरूढानि-विरोहं गतानि-वासनारूपानि मूलानि यस्य स सुविरूढमूलस्तं सुविरूढमूलम् = चांगल्या प्रकारे फार खोल गेली आहे वासनारूपी मूळे ज्याची तो त्या सुविरूढमूळाला**(ब.स.)** यद्वा **सुविरूढमूलम्** - सुतरामेरण्डतैललेपेन तत्पात्रवत् सर्वतो विरूढानि विशिष्य व्याप्तानि मूलानि विविधविषयवासनाजालानि यस्य स सुविरूढमूलस्तं सुविरूढमूलम् = एरंडतेलाच्या सुंदरलेपाने जसे त्याचे पात्र चारही बाजूंनी लिप्त होऊन जाते त्याचप्रमाणे चारही बाजूंनी विशेषकरून व्याप्त आहे मूळ-अनेकप्रकारचे वासनाजाल ज्याचे तो त्या सु विरूढमूळाला**(ब.स.)**

परमपदस्वरूप परमेश्वराच्या प्राप्तीच्या निमित्त त्या आदि पुरुषाला शरण जाण्याकरिता प्रेरणा -

**ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन्गता न निवर्तन्ति भूयः ।**

**तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ॥४॥**

**अन्वयः** - ततः, यस्मिन्, गताः, भूयः, न, निवर्तन्ति, तत्, पदम्, परिमार्गितव्यम्, च, यतः, पुराणी, प्रवृत्तिः, प्रसृता, तम्, एव, आद्यम्, पुरुषम्, प्रपद्ये ।

**अन्वयार्थः** - **ततः** - त्या नंतर **यस्मिन्, गताः** - ज्या परम पदाच्या ठिकाणी पोहचलेले **भूयः** - पुन्हा **न निवर्तन्ति** - परत येत नाहीत **तत्, पदम्** - अशा त्या परम पदाला **परिमार्गितव्यम्** - अन्वेषण-शोधावे **च** - आणि **यतः** - ज्या पदापासून **पुराणी** - पुरातन **प्रवृत्तिः** - विश्वपरंपरा **प्रसृता** - पसरली आहे **तम्, एव** - त्याच **आद्यम्, पुरुषम्** - आदि परम पुरुषाला **प्रपद्ये** - मी शरण आहे.

**विवरण** - नंतर त्या परमपदाला प्राप्त झालेले महापुरुष पुन्हा परत येत नाहीत अशा परमपदाला चांगल्या प्रकारांनी जाणावे त्या पासूनच संसार वृक्षाची अनादी परंपरा चालत आलेली आहे आणि उत्पन्न होऊन विस्ताराला प्राप्त झालेली आहे अशा त्या आदि पुरुष नारायणाला मी शरण आहे अशा प्रकारांनी त्या परमपदाचा अन्वेषण-शोध करावा.

**व्याकरणम्** - **ततः** - तद्+तसिल्=ततस् अ. **यस्मिन्** - यत् सर्व.पु.स.ए.व. **गताः** - गम् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **भूयः** - भूयस् अ. **न** - न क्रि.वि.अ. **निवर्तन्ति** - नि+वृत् प्र.ग.आ.प.(प.प.)वर्त.तृ.पु.ब.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **पदम्** - पद न.प्र.ए.व. **परिमार्गितव्यम्** - परि+मार्ग् द.ग.प.प.+कर्म.तव्यत्=परिमार्गितव्य वि.न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **यतः** - यद्+तसिल्=यतस् अ. **पुर-णी** - पुराणी स्त्री.प्र.ए.व. **प्रवृत्तिः** - प्रवृत्ति स्त्री.प्र.ए.व. **प्रसृता** - प्र+सृ प्र.ग.प.प.कर्म.भू.धा. वि.स्त्री.प्र.ए.व. **तम्** - तत् सर्व.पु.द्वि.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **आद्यम्** - आद्य वि.पु.द्वि.ए.व. **पुरुषम्** - पुरुष पु.द्वि.ए.व. **प्रपद्ये** - प्र+पद् च.ग.आ.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **पुरुषम्** - पुरि शयनात् पुरुषस्तं पुरुषम् = पुरि म्हणजे शरीरामध्ये शयन करतो म्हणून तो पुरुष त्या पुरुषाला(**वि.**)

परमपदरूप परमेश्वराला प्राप्त झालेल्या पुरुषाचे लक्षण -

**निर्मानमोहा जितसङ्गदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः ।**

**द्वन्द्वैर्विमुक्ताः सुखदुःखसञ्ज्ञैर्गच्छन्त्यमूढाः पदमव्ययं तत् ॥५॥**

**अन्वयः** - निर्मानमोहाः, जितसङ्गदोषाः, अध्यात्मनित्याः, विनिवृत्तकामाः, सुखदुःसञ्ज्ञैः, द्वन्द्वैः, विमुक्ताः, अमूढाः, तत्, अव्ययम्, पदम्, गच्छन्ति ।

**अन्वयार्थः** - **निर्मानमोहाः** - ज्या पुरुषांचे मान आणि मोह नष्ट झाले आहेत (निघून गेलेले आहेत) **जितसङ्गदोषाः** - ज्यांनी आसक्तिरूप दोष जिंकले आहेत **अध्यात्मनित्याः** - ज्यांची परमात्म्याच्या स्वरूपामध्ये निरंतर स्थिती आहे **विनिवृत्तकामाः** - ज्यांचे सर्व काम पूर्णरूपाने निवृत्त झाले आहेत **सुखदुःखसञ्ज्ञैः, द्वन्द्वैः** - सुख आणि दुःख नावाच्या द्वंद्वाच्याद्वारा जे **विमुक्ताः** - सर्वथा मुक्त झाले आहेत असे **अमूढाः** - ज्ञानीपुरुष **तत्, अव्ययम्, पदम्** - त्या अविनाशी परम पदाला **गच्छन्ति** - प्राप्त होतात.

**विवरण** - मान म्हणजे प्रतिष्ठा आणि मोह म्हणजे अविवेक विपर्ययज्ञान ज्या महापुरुषांचे नष्ट झाले आहेत. ज्या पुरुषांनी आसक्तिरूपी दोषावर विजय प्राप्त केला आहे म्हणजे ज्या पुरुषांची हा लोक आणि परल-लोकाच्या भोगाविषयी यत्किञ्चिन्मात्रही आसक्ति राहिली नाही. जर कदाचित् विषयाबरोबर संबंध झाला तरी ज्यांच्या अंतःकरणामध्ये कोणत्याही प्रकारचा विकार म्हणजे आसक्ति उत्पन्न होत नाही ते महापुरुष सदासर्वदाकरिता परमात्म्याच्या स्वरूपामध्ये स्थित असतात म्हणजे ज्यांचा क्षणमात्राकरिता सुद्धा परमात्म्यापासून वियोग होत नाही. ज्यांची इच्छा, तृष्णा, अपेक्षा, वासना आणि स्पृहा इत्यादि सर्व प्रकारच्या मनोकामना नष्ट झालेल्या असतात. (शीत, उष्ण, प्रिय, अप्रिय, मान, अपमान, स्तुती, निंदा इत्यादि द्वंद्व सुख आणि दुःखाला हेतू असल्यामुळे त्यांना सुख दुःख संज्ञक म्हटले आहे.) अशा या सुख दुःख नावाच्या द्वंद्वांनी त्यांना सर्वथा मुक्त केले आहे म्हणजे यांच्यापासून ते सदा-सर्वदाकरिता परित्यक्त

झाले आहेत. असे अनेक प्रकारच्या विकार तसेच द्वंद्वांनी रहित विवेकी महापुरुष त्या अविनाशी परम पदाला प्राप्त होतात.

**व्याकरणम्** - **निर्मानमोहा:** - निर्+मान पु. मोह पु.प्र.ब.व. **जितसङ्गदोषा:** - जित-जि प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. सङ्ग पु. दोष पु.प्र.ब.व. **अध्यात्मनित्या:** - अध्यात्म वि. नित्य वि.पु.प्र.ब.व. **वि निवृत्तकामा:** - वि+नि+वृ प्र.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि. काम पु.प्र.ब.व. **सुखदु:खसञ्ज्ञै:** - सुख न. दु:ख न. संज्ञ वि.पु.तृ.ब.व. **द्वन्द्वै:** - द्वन्द्व पु.तृ.ब.व. **विमुक्ता:** - वि+मुच् ष.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **अमूढा:** - अ+मुह् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **तत्** - तत् सर्व.न.द्वि.ए.व. **अव्ययम्** - अव्यय वि.न.द्वि.ए.व. **पदम्** - पद न.द्वि.ए.व. **गच्छन्ति** - गम् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **अमूढा:** - न मूढा अमूढा:-तत्त्वज्ञानिन: = जे मूढ नाहीत ते अमूढ म्ह.तत्त्वज्ञानी **(न.त.स.) निर्मानमोहा:** - मानश्च-देहादौ अहंबुद्धिश्च, मोहश्च-विपर्ययज्ञानं चेति मानमोहौ, निर्गतौ मानमोहौ येभ्यस्ते निर्मानमोहा: = मान आणि मोह गेले आहेत ज्यांच्यापासून ते**(द्व.ग.ब.स.) जितसङ्गदोषा:** - सङ्ग एव दोष: सङ्गदोषो जित:-निर्जित: सङ्गदोष:-स्त्रीपुत्रादिष्वासक्त्याभिनिवेशो यैस्ते जितसङ्गदोषा: = संगदोष जिंकला आहे ज्यांच्या द्वारा ते**(कर्म.ग.ब.स.) विनिवृत्तकामा:** - विशेषेण-निरवशेषतया निवृत्ता: कामा:-इच्छा येभ्यस्ते विनिवृत्तकामा: = विशेषरूपाने-निरवशेषरूपाने निवृत्त-समाप्त झाले आहेत काम ज्यांच्यापासून ते**(ब.स.) सुखदु:खसञ्ज्ञै:** = सुखानि च दु:खानि च सुखदु:खानि संज्ञा नाम येषां तानि सुखदु:खसंज्ञानि तै: सुखदु:खसंज्ञै: = सुखदु:खसंज्ञा-नाम आहे ज्यांची ते त्यांच्याद्वारा**(द्व.ग.ब.स.) अध्यात्म नित्या:** - आत्मनि प्रत्यग्रूपब्रह्मणि अधिकृत्य वर्तत इत्यध्यात्ममध्यात्मे-आत्मज्ञाने नित्या:-तत्परा इत्यध्यात्म नित्या: = अध्यात्मामध्ये म्हणजे परमात्म्याच्या स्वरूपाने निरंतर स्थित राहाणारे ते**(अव्यय समाहार ग.स.त.स.)** यद्वा **अध्यात्मनित्या:** - आत्मनि इत्यध्यात्मम्-अवस्थितिस्तथैव नित्या:-निरता:-आत्मारामा ये ते अध्यात्मनित्या: = अध्यात्म-आत्मज्ञान-सर्वत्र ब्रह्मदर्शन स्थिति त्यामध्ये नित्य-रत-आत्माराम आहेत ते**(अव्यय समा.ग.स.त.स.)** यद्वा **अध्यात्मनित्या:** - परमात्मस्वरूपालोचने-विचारे नित्या:-तत्परा ये ते अध्यात्मनित्या: = परमात्म स्वरूपाच्या आलोचनामध्ये-विचारामध्ये नित्य-तत्पर आहेत जे ते**(स.त.स.) विमुक्ता:** - विशेषेण मुक्ता विमुक्ता:-रहिता: = विशेषरूपाने मुक्त असलेले**(तृ.पु.स.)**

परमपदाला परमप्रकाशमय आणि अपुनरावृत्तिशील दाखविणे -

**न तद्भासयते सूर्यो न शशाङ्को न पावक: ।**

**यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥६॥**

**अन्वय:** - सूर्य:, तत्, न, भासयते, न, शशाङ्क:, न, पावक:, यत्, गत्वा, न, निवर्तन्ते, तत्, मम, परमम्, धाम ।

**अन्वयार्थ:** - **सूर्य:** - आदित्य **तत्** - त्या परमपदाला **न भासयते** - प्रकाशित करीत नाही **शशाङ्क:** - चंद्र **न** - त्या पदाला प्रकाशित करीत नाही **न पावक:** - अग्नि त्या पदाला प्रकाशित करीत नाही **यत्** - ज्या पदाला **गत्वा** - प्राप्त होऊन (झालेले लोक) **न निवर्तन्ते** - पुन्हा परत येत नाहीत **तत्** - ते **मम** - माझे **परमम्, धाम** - परम म्हणजे श्रेष्ठ पद आहे.

**विवरण** - ज्या आनंदस्वरूप परमपदाला प्राप्त होऊन मनुष्य पुन्हा या जन्ममृत्युरूप संसारामध्ये परत येत नाही. अशा त्या अव्यक्त अक्षर आणि स्वयंप्रकाश परम गतीला सूर्य प्रकाशित करू शकत नाही, चंद्रमा प्रकाशित करू शकत नाही, अग्नि सुद्धा प्रकाशित करू शकत नाही, या शिवाय असणारे चक्षु, मन, बुद्धिसुद्धा या परम पदाला प्रकाशित करू शकत नाही असे माझे अप्रमेय, अचिंत्य आणि अनिर्वचनीय परम म्हणजे श्रेष्ठ धाम म्हणजे पद आहे.

**व्याकरणम्** - **सूर्य:** - सूर्य पु.प्र.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **भासयते** - भास् प्र.ग.आ.प.प्रयोजक वर्त.तृ.पु.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **शशाङ्क:** - शश+अङ्क पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **पावक:** - पावक पु.प्र.ए.व. **यत्** - यत् सर्व.न.द्वि.ए.व. **गत्वा** - गम् प्र.ग.प.प.त्वान्त अ. **न** - न क्रि.वि.अ. **निवर्तन्ते** - नि+वृत् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **मम** - अस्मत् सर्व.ष.ए.व **परमम्** - परम वि.न.प्र.ए.व. **धाम** - धामन् न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **शशाङ्क:** - शश:-अङ्क:-लाञ्छनं यस्य स शशाङ्क:-चन्द्र: = शशच आहे अंक-लांच्छन-चिन्ह ज्याचे तो**(ब.स.)** **सूर्य:** - सूते-जनयतीति सर्वं जगदिति सूर्य: = सर्व जगाला उत्पन्न करणारा**(वि.)** यद्वा **सूर्य:** - स्वस्वकर्मणि लोकान् प्रेरयतीति सूर्य: = आप-आपल्या कर्मांमध्ये लोकांना प्रेरीत करणारा **(वि.)** **पावक:** - पुनातीति पावक: = पवित्र करतो तो पावक**(वि.)**

जीवात्म्याच्या स्वरूपाचे कथन -

**ममैवांशो जीवलोके जीवभूत: सनातन: ।**

**मन:षष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥७॥**

**अन्वय:** - जीवलोके, सनातन:, जीवभूत:, मम, एव, अंश:, प्रकृतिस्थानि, मन:षष्ठानि, इन्द्रियाणि, कर्षति ।

**अन्वयार्थ:** - **जीवलोके** - संसारामध्ये **सनातन:** - सनातन **जीवभूत:** - जीवात्मा **मम, एव** - माझाच **अंश:** - अंश (**अस्ति** - आहे तो माझा जीवभूत अंश) **प्रकृतिस्थानि** - प्रकृतिच्या ठिकाणी स्थित असणाऱ्या **मन:षष्ठानि** - मनासहित सहा **इन्द्रियाणि** - इंद्रियांचे **कर्षति** - आकर्षण करतो.

**विवरण** - ज्याप्रमाणे सर्व ठिकाणी समभावाने विषयरहित स्थित असणारे महाकाश घट आणि मठ आदिच्या संबंधाने वेगवेगळे प्रतीत होत असले तरी घट आणि मठामध्ये जे स्थित आकाश ते महाकाशाचाच अंश आहे. त्याचप्रमाणे सर्व ठिकाणी समभावाने व्याप्त विभागरहित असा मी प्रत्येक शरीरामध्ये वेगवेगळ्या रूपाने जरी प्रतीत होत असलो तरी प्रत्येक शरीरामध्ये वेगवेगळा असणारा जीवात्मा माझाच अंश आहे. असा माझा अंश असणारा जीवात्मा आप-आपल्या स्थानामध्ये स्थित असलेले पाच ज्ञानेंद्रिये आणि मन यांचे आकर्षण करतो.

**व्याकरणम्** - **जीवलोके** - जीव पु. लोक पु.स.ए.व. **सनातन:** - सनातन वि.पु.प्र.ए.व. **जीवभूत:** - जीव पु. भूत भू प्र.ग.प.प.भावे.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **मम** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **अंश:** - अंश पु.प्र.ए.व. **प्रकृतिस्थानि** - प्रकृति स्त्री. स्थ वि.न.द्वि.ब.व. **मन:षष्ठानि** - मनस् न. षष्ठ संख्या वा. वि.न.द्वि.ब.व. **इन्द्रियाणि** - इन्द्रिय न.द्वि.ब.व. **कर्षति** - कृष् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **जीवलोके** - जीवानां लोक:-समूहो जीवलोकस्तस्मिन् जीवलोके = जीवलोकांमध्ये **(ष.त.स.)** **मन:षष्ठानि:** - मन: अन्त:करणं षष्ठं येषां तानि मन:षष्ठानि-श्रोत्रत्वक्चक्षुरसनघ्राणाख्यानि = मन सहावे आहे ज्यांचे ते त्यांना म्हणजे श्रोत्र, त्वचा, चक्षु, रसना आणि घ्राण इत्यादींना**(ब.स.)** **प्रकृतिस्थानि** - सुषुप्तिप्रलययो: प्रकृतौ-स्वकारणे तन्मात्रतया तिष्ठन्ति तानि प्रकृतिस्थानि = सुषुप्ति आणि प्रलयाच्या वेळी प्रकृतिमध्ये-स्वकारणामध्ये सूक्ष्मरूपाने राहातात ते प्रकृतिस्थानि**(स.त.स.)** यद्वा **प्रकृतिस्थानि** - स्वस्थाने-कर्णशष्कुल्यादौ प्रकृतौ तिष्ठन्ति तानि प्रकृतिस्थानि = स्वस्थानामध्ये स्थित-कानाचे छिद्र इत्यादि या प्रकृतीत स्थित असतात.

वायुच्या दृष्टांताने जीवात्म्याच्या गमनाचा विषय -

**शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वर: ।**

**गृहीत्वैतानि संयाति वायुर्गन्धानिवाशयात् ॥८॥**

**अन्वय:** - वायु:, आशयात्, गन्धान्, इव, यत्, ईश्वर:, अपि, उत्क्रामति, च, यत्, शरीरम्, अवाप्नोति, एतानि, गृहीत्वा, संयाति ।

**अन्वयार्थ:** - **वायु** - वारा **आशयात्** - पुष्पादिकांपासून **गन्धान्, इव** - गंधाला घेऊन जसा जातो त्याप्रमाणे **यत्** - जेव्हा **ईश्वर:, अपि** - देहाचा स्वामी जीवात्मा **उत्क्रामति** - शरीराचा त्याग करून जातो **च** - आणि **यत्** - जेव्हा **शरीरम्** - दुसऱ्या शरीराला **अवाप्नोति** - प्राप्त होतो त्यावेळी (जीवात्मा) **एतानि** - मनासह सहा इंद्रियांना **गृहीत्वा** - घेऊन **संयाति** - जातो.

**विवरण** - ज्याप्रमाणे वायु गंधाला एक स्थानावरून दुसऱ्या स्थानावर घेऊन जातो त्याप्रमाणे या शरीराचा स्वामी जीवात्मा या वर्तमान शरीराला सोडून दुसरे शरीर ग्रहण करतो त्याप्रमाणे तो जीवात्मा मनासहित सहा इंद्रियांना घेऊन नवीन-नवीन शरीरामध्ये प्रवेश करतो. वास्तविक पाहिले तर हा जीवात्मा परमात्म्याचा अंश आहे त्यामुळे तो नित्य, अविनाशी आणि अचल आहे म्हणून त्याचे कोठेच येणे-जाणे होत नाही. परंतु, सूक्ष्म शरीराबरोबर याचा संबंध झाल्यामुळे सूक्ष्म शरीराच्या द्वारा एक स्थूल शरीरापासून दुसऱ्या स्थूल शरीरामध्ये जाणे प्रतीत होते, अशा प्रकारे हा जीवात्मा मनासहित सहा इंद्रियांना घेऊन दुसऱ्या म्हणजे भ विष्यकालीन शरीरामध्ये प्रवेश करतो.

**व्याकरणम्** - **वायु:** - वायु पु.प्र.ए.व. **आशयात्** - आशय पु.पं.ए.व. **गन्धान्** - गन्ध पु.द्वि.ब.व. **इव** - इव अ. **यत्** - यत् अ. **ईश्वर:** - ईश्वर पु.प्र.ए.व. **अपि** - अपि अ. **उत्क्रामति** - उद्+क्रम् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **यत्** - यत् अ. **शरीरम्** - शरीर न.द्वि.ए.व. **अवाप्नोति** - अव+आप् पं.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **एतानि** - एतत् सर्व.न.द्वि.ब.व. **गृहीत्वा** - गृह् न.ग.उ.प.त्वान्त अ. **संयाति** - सम्+या द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

मन व इंद्रियांच्या द्वारा जीवात्म्याच्या विषयसेवनाचे कथन -

**श्रोत्रं चक्षु: स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च ।**

**अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते ॥९॥**

**अन्वय:** - अयम्, श्रोत्रम्, चक्षु:, च, स्पर्शनम्, रसनम्, च, घ्राणम्, एव, च, मन:, अधिष्ठाय, विषयान्, उपसेवते।

**अन्वयार्थ:** - **अयम्** - हा जीवात्मा **श्रोत्रम्** - कर्ण **चक्षु:** - नेत्र **च** - आणि **स्पर्शनम्** - त्वचा **रसनम्** - जिव्हा **च** - आणि **घ्राणम्, एव** - घ्राणही **च** - आणि **मन:** = मन **अधिष्ठाय** - यांचा आश्रय घेवून **विषयान्** - शब्दादि विषयांचे **उपसेवते** - सेवन करतो.

**विवरण** - उपर्युक्त प्रतिपादित जीवात्मा कर्माचा कर्ता नाही आणि त्यापासून प्राप्त होणारे फलस्वरूप विषय व सुखदु:खांचा भोक्ता नाही; परंतु प्रकृती आणि तिचे कार्य यांच्या बरोबर अज्ञानजनित अनादि संबंध असल्यामुळे त्याच्या ठिकाणी कर्तव्य आणि भोक्तृत्व प्राप्त होते. वास्तविक त्याच्या ठिकाणी कर्तृत्व-भोक्तृत्वाचा यत्किंचित् सुद्धा संबंध नाही असा हा कर्तृत्व-भोक्तृत्व रहित अचल, अविनाशी आणि नित्य असणाऱ्या परमात्म्याचा अंश जीवात्मा श्रोत्र, चक्षु, स्पर्श, रसना, घ्राण आणि मन यांचा आश्रय करून म्हणजे यांचा अधिष्ठाता होऊन शब्द, रूप, स्पर्श, रस आणि गंध इत्यादि विषयाचे सेवन करतो.

**व्याकरणम्** - **अयम्** - इदम् सर्व.पु.प्र.ए.व. **श्रोत्रम्** - श्रोत्र न.द्वि.ए.व. **चक्षु:** - चक्षु न.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **स्पर्शनम्** - स्पर्शन न.द्वि.ए.व. **रसनम्** - रसन न.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **घ्राणम्** - घ्राण न.द्वि.ए.व. **एव** - एव अ. **च** - च उभ.अ. **मन:** - मनस् न.द्वि.ए.व. **अधिष्ठाय** - अधि+स्था प्र.ग.प.प.ल्यबन्त अ. **विषयान्** - विषय पु.द्वि.ब.व. **उपसेवते** - उप+सेव् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **चक्षु:** - चेष्टे-पश्यतीत्यनेनेति चक्षु: = ज्याच्या द्वारा पाहिल्या जाते तो चक्षु**(त.वि.)**

सर्व अवस्थेमध्ये स्थित आत्म्याला मूर्खलोक जाणत नाहीत आणि ज्ञानीलोक जाणतात या विषयाचे कथन -

**उत्क्रामन्तं स्थितं वापि भुञ्जानं वा गुणान्वितम्।**

**विमूढा नानुपश्यन्ति पश्यन्ति ज्ञानचक्षुष: ॥१०॥**

**अन्वय:** - उत्क्रामन्तम्, अपि, वा, स्थितम्, भुञ्जानम्, वा, गुणान्वितम्, विमूढा:, न, अनुपश्यन्ति, ज्ञानचक्षुष:, पश्यन्ति।

**अन्वयार्थ:** - **उत्क्रामन्तम्** - देहाला सोडून जाणाऱ्या **अपि वा** - अथवा **स्थितम्** - शरीरामध्ये स्थित असलेल्या **भुञ्जानम्** - विषयांचे सेवन करणाऱ्या **वा** - अथवा **गुणान्वितम्** - तीन गुणांनी युक्त असणाऱ्या या जीवात्म्याला (शरीराहून वेगळा असा) **विमूढा:** - मूढ लोक **न अनुपश्यन्ति** - पहात नाहीत (परंतु) **ज्ञानचक्षुष:** - ज्ञानदृष्टिने युक्त असणारे विवेकशील पुरुष **पश्यन्ति** - पाहातात.

**विवरण** - शरीर सोडून जाणाऱ्या अथवा शरीरामध्ये स्थित असणाऱ्या अथवा विषयांचा भोग करणाऱ्या अथवा सुखदु:ख आणि मोहात्मक गुणांनी युक्त असणाऱ्या या जीवात्म्याला हे अविवेकी मूढ चांगल्या प्रकारांनी जाणत नाहीत. परंतु, जे विवेकशील ज्ञानी पुरुष आहेत ते मात्र शरीर जाते वेळी अथवा विषयांचा उपभोग घेतेवेळी प्रत्येक अवस्थेमध्ये आत्मा वास्तविक प्रकृतीपासून सर्वथा अलिप्त म्हणजे भिन्न, शुद्ध, बोधरूप आणि असंग आहे असे जाणतात.

**व्याकरणम् - उत्क्रामन्तम्** - उद्+क्रम् प्र.ग.प.प.कर्त.शतृ=उत्क्रामत् वि.पु.द्वि.ए.व. **अपि** - अपि अ. **वा** - वा उभ.अ. **स्थितम्** - स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.द्वि.ए.व. **भुञ्जानम्** - भुज् स.ग.प.प.(उ.प.) कर्त.शानच्=भुञ्जान वि.पु.द्वि.ए.व. **वा** - वा उभ.अ. **गुणान्वितम्** - गुण पु. अनु+इ द्वि.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.द्वि.ए.व. **विमूढाः** - वि+मूह् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **न** - न क्रि.अ. **अनुपश्यन्ति** - अनु+दृश् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **ज्ञानचक्षुषः** - ज्ञान न. चक्षुष् न.वि.पु.प्र.ब.व. **पश्यन्ति** - दृश् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - ज्ञानचक्षुषः** - ज्ञानमेव चक्षुः-चक्षुरिन्द्रियं येषां ते ज्ञानचक्षुषः विवेकिनः = ज्ञानच आहे चक्षु ज्यांचे ते**(कर्म.ग.ब.स.) गुणान्वितम्** - गुणैः-सत्त्वादिभिरन्वितः-युक्त इति गुणान्वितस्तं गुणान्वितम् = सत्त्वादि गुणांनी युक्त असणाऱ्याला**(तृ.त.स.) विमूढाः** - विशेषेण मूढाः-पामरा इति विमूढाः-बहिर्दृष्टयः = विशेषरूपाने मूढ असणारे**(तृ.त.स.) उत्क्रामन्तम्** - उत्क्रामतीति उत्क्रामन् तमुत्क्रामन्तम् = त्याग करीत असणाऱ्याला**(शतृ प्रत्ययान्त वि.) भुञ्जानम्** - भुंक्त इति भुञ्जानस्तं भुञ्जानम् = भोग करीत असणाऱ्याला **(शतृ प्रत्ययान्त वि.)**

**यतन्तो योगिनश्चैनं पश्यन्त्यात्मन्यवस्थितम् ।**

**यतन्तोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यन्त्यचेतसः ॥११॥**

**अन्वयः** - यतन्तः, योगिनः, एनम्, आत्मनि, अवस्थितम्, पश्यन्ति, च, अकृतात्मानः, यतन्तः, अपि, अचेतसः, एनम्, न, पश्यन्ति ।

**अन्वयार्थः - यतन्तः** - प्रयत्न करणारे **योगिनः** - योगिजन **एनम्** - या आत्म्याला **आत्मनि** - आपल्या हृदयामध्ये **अवस्थितम्** - स्थित असलेला **पश्यन्ति** - पाहतात **च** - आणि **अकृतात्मानः** - ज्यांनी आपल्या अंतःकरणाला शुद्ध केलेले नाही असे **यतन्तः, अपि** - प्रयत्न करणारे सुद्धा **अचेतसः** - अविवेकी मूढ पुरुष **एनम्** - या आत्म्याला **न पश्यन्ति** - पहात नाहीत.

**विवरण** - श्रवण, मनन आणि निदिध्यासनाच्या द्वारा ज्या पुरुषांनी आपले अंतःकरण शुद्ध केले आहे असे विवेकशील पुरुष आपल्या हृदयामध्ये स्थित असणाऱ्या आत्मतत्त्वाला यथार्थरूपाने पाहातात. परंतु निष्काम कर्म आदिच्या द्वारा ज्या पुरुषांनी आपल्या अंतःकरणाला सुसंस्कृत केलेले नाही असे मलविक्षेपादि दोषांनी युक्त असणारे पुरुष आपल्या हृदयामध्ये अवस्थित असणाऱ्या आत्मतत्त्वाला यथार्थ रूपाने पाहात नाहीत.

**व्याकरणम् - यतन्तः** - यत् प्र.ग.आ.प.(उ.प.)कर्त.शतृ-यतत् वि.पु.प्र.ब.व. **योगिनः** - योगिन् पु.प्र.ब.व. **एनम्** - एतत् सर्व.पु.द्वि.ए.व. **आत्मनि** - आत्मन् पु.स.ए.व. **अवस्थितम्** - अव+स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.द्वि.ए.व. **पश्यन्ति** - दृश् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **च** - च उभ.अ. **अकृतात्मानः** - अ+कृ अ.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. आत्मन् पु.प्र.ब.व. **यतन्तः** - यत् प्र.ग.आ.प.(उ.प.) कर्त.शतृ=यतत् वि.पु.प्र.ब.व. **अपि** - अपि अ. **अचेतसः**- अ+चेतस् न.वि.पु.प्र.ब.व. **एनम्** - एतत् सर्व.पु.द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **पश्यन्ति** - दृश् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - अकृतात्मानः** - न कृत इत्यकृतः-सुसंस्कृतरहित आत्मा-मनो येषां ते अकृतात्मानः-अ विद्यास्मितारागद्वेषाभिनिवेशविशिष्टास्तत एवाऽचेतसो विवेकशून्या बहिर्मुखाः = शुद्ध अंतःकरण नाही ज्यांचे

ते-अविद्या, अस्मिता, राग, द्वेष, अभिनिवेशाने युक्त असे विवेकशून्य बहिर्मुख**(न.त.ग.ब.स.)** यद्वा **अकृतात्मान:** - अकृतो बाह्यवासनाभिर्विषयकर्मशास्त्रादिगोचराभिरवशीकृतो बहिरेव प्रवाहायमान आत्मा-चित्तं येषां ते अकृतात्मान: = अकृत-विषय कर्म शास्त्र इ. विषय असणाऱ्या बाहेरच्या वासनांनी अवशीभूत आत्मा-चित्त आहे ज्यांचे ते अकृतात्मा**(ब.स.)** **यतन्त**: - यतन्ति ते यतन्त: = प्रयत्न करीत असणारे**(कृ. वि.)** **योगिन**: - तीव्रमोक्षेच्छावैराग्याभ्यां बहि: प्रावण्यवैमुख्येन-चित्तस्याऽत्मन्यविकारात्मना स्थितिरूपो योगो येषां ते योगिन: = तीव्र मोक्षाची इच्छा आणि वैराग्याच्या द्वारा बाहेरच्या प्रवृत्तिने रहित चित्ताची आत्म्यामध्ये अविकार स्वरूपाने स्थितिरूप योग आहे ज्यांचा ते योगी**(ब.स.)** यद्वा **योगिन**: - योगोऽस्यास्ती ति योगी ते योगिन: = योग आहे ज्यांचा ते योगी**(कृ.वि.)**

परमेश्वराच्या तेजाचे महत्व(महिमा) -

**यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् ।**

**यच्चन्द्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥१२॥**

**अन्वय:** - यत्, आदित्यगतम्, तेज:, अखिलम्, जगत्, भासयते, यत्, चन्द्रमसि, च, यत्, अग्नौ, तत्, तेज:, मामकम्, विद्धि ।

**अन्वयार्थ: - यत्** - जे **आदित्यगतम्, तेज**: - सूर्याच्या ठिकाणी जे तेज आहे ते **अखिलम्, जगत्** - संपूर्ण जगाला **भासयते** - प्रकाशित करते **यत्** - जे **चन्द्रमसि** - चंद्राच्या ठिकाणी **च** - आणि **यत्** - जे **अग्नौ** - अ ग्निच्या ठिकाणी तेज आहे **तत्, तेज:** - ते तेज **मामकम्** - माझे आहे असे तू **विद्धि** - समज.

**विवरण** - संपूर्ण जगाला प्रकाशित करणारे सूर्य, चंद्रमा आणि अग्निच्या ठिकाणी जे तेज आहे ते माझेच आहे, असे तू चांगल्या प्रकारे समज. म्हणजे माझ्या प्रकाशाच्या द्वाराच ते सर्व जगाला प्रकाशित करतात त्यांच्या ठिकाणी जे तेज आहे ते माझेच आहे असे तू जाण.(समज.)

**व्याकरणम् - यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **आदित्यगतम्** - आदित्य पु. गम् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा. वि.न.प्र.ए.व. **तेज:** - तेजस् न.प्र.ए.व. **अखिलम्** - अखिल वि.न.द्वि.ए.व. **जगत्** - जगत् न.द्वि.ए.व. **भासयते** - भास् प्र.ग.आ.प.प्रयोजक वर्त.तृ.पु.ए.व. **यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **चन्द्रमसि** - चन्द्रमस् पु.स.ए.व. **च -** च अ. **यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **अग्नौ** - अग्नि पु.स.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.द्वि.ए.व. **तेज:** - तेजस् न.द्वि.ए.व. **मामकम्** - मामक अस्मद् सर्व. तद्धि.प्रत्ययान्त पु.द्वि.ए.व. **विद्धि** - विद् द्वि.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **आदित्यगतम्** - आदित्ये-सूर्ये गतम्-प्राप्तमित्यादित्यगतम् = आदित्य म्हणजे सूर्याच्या ठिकाणी असलेले**(स.त.स.)** **मामकम्** - ममेदं मामकम् = माझ्या संबंधी**(वि.)**

पृथ्वीरूपाने संपूर्ण जगाला धारण करणाऱ्या आणि चंद्ररूपाने त्याचे पोषण करणाऱ्या परमेश्वराच्या सामर्थ्याचे कथन -

**गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा ।**

**पुष्णामि चौषधी: सर्वा: सोमो भूत्वा रसात्मक: ॥१३॥**

**अन्वय:** - अहम्, गाम्, आविश्य, ओजसा, भूतानि, धारयामि, च, (अहम्), रसात्मक:, सोम:, भूत्वा, सर्वा:, औषधी:, पुष्णामि ।

**अन्वयार्थ:** - **अहम्** - मी **गाम्** - पृथ्वीमध्ये **आविश्य** - प्रवेश करून **ओजसा** - आपल्या सामर्थ्याने **भूतानि** - संपूर्ण भूतांना **धारयामि** - धारण करतो **च** - आणि (**अहम्** - मी) **रसात्मक:** - रसस्वरूप **सोम:** - चंद्र **भूत्वा** - होऊन **सर्वा: औषधी:** - संपूर्ण वनस्पतींना **पुष्णामि** - पोषण करतो (पुष्ट करतो).

**विवरण** - पृथ्वीमध्ये जी भूतमात्रांना धारण करण्याची शक्ती आहे ती शक्ती पृथ्वीची नसून माझीच आहे. म्हणून मी स्वत: आत्मरूपाने पृथ्वीमध्ये प्रविष्ट होवून आपल्या सामर्थ्याने संपूर्ण प्राणिमात्रांना धारण करतो त्याप्रमाणे चंद्राच्या ठिकाणी जी वनस्पतींना पोषण करण्याची शक्ती आहे ती शक्ती चंद्राची नसून माझीच आहे म्हणून मी चंद्राच्या रूपाने प्रगट होऊन सर्व वनस्पतींचे पोषण करतो.

**व्याकरणम्** - **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **गाम्** - गो स्त्री.द्वि.ए.व. **आविश्य** - आ+विश् ष.ग.प.प.ल्यबन्त अ. **ओजसा** - उब्ज् ष.ग.प.प.+असुन्, ब् लोप, गुण=ओजस् न.तृ.ए.व. **भूतानि** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.द्वि.ब.व. **धारयामि** - धृ प्र.ग.उ.प.(प.प.)णिच् वर्त.प्र.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **रसात्मक:** - रस+आत्मक वि.पु.प्र.ए.व. **सोम:** - सोम पु.प्र.ए.व. **भूत्वा** - भू प्र.ग.प.प.त्वान्त अ. **सर्वा:** - सर्व सर्व.स्त्री.द्वि.ब.व. **औषधी:** - औषधी स्त्री.द्वि.ब.व. **पुष्णामि** - पुष् न.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **रसात्मक:** - रस एव आत्मा-स्वरूपं यस्य सो रसात्मक: = रसच आत्मा म्हणजे स्वरूप आहे ज्याचे तो**(ब.स.)**

भगवंताचे आपल्याला वैश्वानर रूपाने सर्व प्रकारच्या अन्नाला पचविण्याचे दाखविणे -

**अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रित: ।**

**प्राणापानसमायुक्त: पचाम्यन्नं चतुर्विधम् ॥१४॥**

**अन्वय:** - अहम्, प्राणिनाम्, देहम्, आश्रित:, प्राणापानसमायुक्त:, वैश्वानर:, भूत्वा, चतुर्विधम्, अन्नम्, पचामि ।

**अन्वयार्थ:** - **अहम्** - मी **प्राणिनाम्** - प्राण्यांच्या **देहम्** - देहामध्ये **आश्रित:** - स्थित असलेला **प्राणापानसमायुक्त:** - प्राण आणि अपान यांनी युक्त **वैश्वानर:** - जठर अग्नि **भूत्वा** - होऊन **चतुर्विधम्** - शुष्क, स्निग्ध, सुपक्व आणि विदग्ध असे चार प्रकारचे **अन्नम्** - अन्न **पचामि** - पचवितो.

**विवरण** - सर्वांच्या शरीरामध्ये उष्णता विद्यमान राहण्याल्या आणि अन्न पचनाला कारणीभूत असा सर्वांच्या शरीरांमध्ये निवास करणारा प्राण आणि अपान यांनी युक्त असलेला वैश्वानर तो मीच जठराग्नि रूपाने सर्व प्राण्यांच्या शरीरात स्थित राहून चार प्रकारचे अन्न (भक्ष्य, भोज्य, लेह्य आणि चोष्य) पचवितो.

**व्याकरणम्** - **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **प्राणिनाम्** - प्राणिन् वि.पु.ष.ब.व. **देहम्** - देह पु.द्वि.ए.व. **आश्रित:** - आ+श्रि प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **प्राणापानसमायुक्त:** - प्राण पु. अपान पु. सम्+आ+युज् च.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **वैश्वानर:** - विश्वानर+अण्=वैश्वानर पु.प्र.ए.व. **भूत्वा**

- भू प्र.ग.प.प.त्वान्त अ. **चतुर्विधम्** - चतुर् संख्या वा.वि. विध पु.वि.न.द्वि.ए.व. **अन्नम्** - 'अद भक्षणे' अद् द्वि.ग.प.प.+कर्म.क्त=अन्न भू.धा.न.द्वि.ए.व. **पचामि** - पच् प्र.ग.उ.प.(प.प.)वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थः** - **प्राणापानसमायुक्तः** - प्राणः-उच्छ्वासरूपवायुश्च, अपानः- निश्वासरूपवायुश्च प्राणापानौ प्राणापानाभ्यां समायुक्तः-संयुक्त इति प्राणापानसमायुक्तः = प्राण आणि अपान यांनी युक्त**(द्व.स.ग.तृ.त.स.)** **चतुर्विधम्** - चतस्रो विधाः-प्रकारा यस्य तत् चतुर्विधम्-भक्ष्यं, भोज्यं, लेह्यं चोष्यं च चतुर्विधम् = चार प्रकार आहेत ज्याचे ते-भक्ष्य, भोज्य, लेह्य आणि चोष्य असे चार प्रकारचे चतुर्विध**(ब.स.)** **वैश्वानरः** - विश्वसम्बन्धी नरो विश्वानरो विश्वानर एव वैश्वानरः = विश्वसंबंधी नर विश्वानर, विश्वानरच वैश्वानर-दहन, पाचन, प्रकाशन शक्तिमान**(कर्म.स.)** **प्राणिनाम्** - प्राणा येषां सन्ति ते प्राणिनस्तेषां प्राणिनाम्-प्राणवताम् = प्राण आहेत ज्यांचे ते त्या प्राण्यांच्या**(अस्त्यर्थे त.वि.)**

प्रभावासहित भगवंताच्या स्वरूपाचे कथन -

**सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।**

**वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदान्तकृद्वेदविदेव चाहम् ॥१५॥**

**अन्वयः** - अहम्, सर्वस्य, हृदि, सन्निविष्टः, च, मत्तः, स्मृतिः, ज्ञानम्, च, अपोहनम्, (भवन्ति), च, सर्वैः, वेदैः, अहम्, एवम्, वेद्यः, वेदान्तकृत्, च, वेदवित्, अहम्, एव ।

**अन्वयार्थः** - **अहम्** - मी **सर्वस्य** - सर्व प्राण्यांच्या **हृदि** - हृदयामध्ये **सन्निविष्टः** - स्थित आहे **च** - आणि **मत्तः** - माझ्यापासूनच **स्मृतिः** - स्मृति **ज्ञानम्** - ज्ञान **च** - आणि **अपोहनम्** - अपोहन (विस्मृति) **भवन्ति** - होतात **च** - आणि **सर्वैः वेदैः** - सर्व वेदांच्याद्वारा **अहम्, एव** - मीच **वेद्यः** - जाणण्यास योग्य आहे **वेदान्त कृत्** - वेदांताचा कर्ता **च** - आणि **वेदवित्** - वेदाला जाणणारा **अहम्, एव** - मीच आहे.

**विवरण** - यद्यपि मी सर्व ठिकाणी समभावाने परिपूर्ण आहे तरी पण सर्वांच्या हृदयदेशामध्ये अंतर्यामीरूपाने माझी विशेष स्थिती आहे त्यातल्या त्यात शुद्ध सुसंस्कृत अंतःकरणामध्ये माझे प्रत्यक्ष दर्शन होते. पूर्वीच्या अनुभूत वस्तुच्या स्मरणाचे नाव आहे स्मृति, कोणत्याही वस्तुला यथार्थ जाणण्याच्या शक्तीचे नाव आहे ज्ञान, संशय विपर्यय आदि तर्कजालाचे नाव आहे उहन आणि त्याचे दूर होण्याचे नाव आहे अपोहन अशा प्रकारे मी अंतःकरणामध्ये स्थित राहून स्मृति, ज्ञान, उहन आणि अपोहन त्याच्या बुद्धिमध्ये उत्पन्न करतो. सर्व वेदाच्या द्वारा मीच जाणणे योग्य आहे. त्याचप्रमाणे वेदांताचा कर्ता आणि वेदाला जाणणारा मीच आहे.

**व्याकरणम् - अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **सर्वस्य** - सर्व सर्व.पु.ष.ए.व. **हृदि** - हृद् न.स.ए.व. **सन्निविष्टः** - सम्+नि+विष् ष.ग.प.प.+कर्म.क्त=सन्निविष्ट भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **मत्तः** - अस्मत् सर्व.पञ्चम्यन्त तसिल् प्रत्ययान्त **स्मृतिः** - स्मृति स्त्री.प्र.ए.व. **ज्ञानम्** - ज्ञान न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **अपोहनम्** - अप+उह्+प्र.ग.आ.प.+ल्युट्=अपोहन न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **सर्वैः** - सर्व सर्व.पु.तृ.ब.व. **वेदैः** - विद् द्वि.ग.प.प.+अच् किंवा घञ्=वेद पु.तृ.ब.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **एव** - एव निश्चयात्मक अ. **वेद्यः** - विद् द्वि.ग.प.प.+कर्म. ण्यत्=वेद्य वि.पु.प्र.ए.व. **वेदान्तकृत्** - वेद+अन्त वि.कृत् प्रत्ययान्त पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **वेदवित्** - वेदवित् वि.पु.प्र.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **एव** - एव निश्चयात्मक अ.

**समासविग्रहार्थाः - वेदान्तकृत्** - वेदस्यान्त इति वेदान्तः (करोतीति कृत्) वेदान्तस्य कृदिति वेदान्तकृत् = वेदांताचा कर्ता**(ष.त.स.) वेदवित्** - वेत्तीति वित् वेदस्य वित् = वेदाला जाणणारा**(ष.त.स.)**

सर्वभूतांना क्षर आणि कूटस्थ आत्म्याला अक्षर पुरुष दाखविणे -

**द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ।**

**क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥१६॥**

**अन्वयः** - लोके, क्षरः, च, अक्षरः, एव, इमौ, द्वौ, पुरुषौ, सर्वाणि, भूतानि, क्षरः, च, कूटस्थः, अक्षरः, उच्यते ।

**अन्वयार्थः - लोके** - या लोकामध्ये **क्षरः** - क्षर (विनाशी) **च** - आणि **अक्षरः, एव** - अक्षर सुद्धा (अ विनाशी) असे **इमौ द्वौ पुरुषौ** - दोन प्रकारचे पुरुष आहेत **सर्वाणि भूतानि** - सर्वभूते **क्षरः** - क्षर पुरुष आहे **च** - आणि **कूटस्थः** - ब्रह्मज्ञानावांचून नाश होत नाही म्हणून भगवंताची मायाशक्ति-कूटस्थ **अक्षरः** - अक्षर पुरुष आहे असे **उच्यते** - म्हटला जातो.

**विवरण** - या संसारामध्ये क्षर आणि अक्षर असे दोन पुरुष आहेत विनाशी असल्यामुळे एकाला क्षर म्हटले आहे आणि अविनाशी असल्यामुळे दुसऱ्याला अक्षर म्हटले आहे. म्हणजे सर्वप्राण्यांचे शरीर नाशवान् असल्यामुळे क्षर म्हटले आहे आणि जे सदा-सर्वदा एक रूपाने राहाते आणि त्याच्यामध्ये केव्हाही परिवर्तन होऊ शकत नाही असा कूटस्थ जीवात्मा अविनाशी असल्यामुळे त्याचा केव्हाही आणि कोणत्याही अवस्थेमध्ये नाश आणि अभाव होत नाही म्हणून त्याला अक्षर म्हटले आहे.

**व्याकरणम् - लोके** - लोक पु.स.ए.व. **क्षरः** - क्षर वि.पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **अक्षरः** - अक्षर वि.पु.प्र.ए.व. **एव** - एव अ. **इमौ** - इदम् सर्व.पु.प्र.द्वि.व. **द्वौ** - द्वि संख्या वा.वि.पु.प्र.द्वि.व. **पुरुषौ** - पुरुष पु.प्र.द्वि.व. **सर्वाणि** - सर्व.न.प्र.ब.व. **भूतानि** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.प्र.ब.व. **क्षरः** - क्षर वि.पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **कूटस्थः** - कूटस्थ वि.पु.प्र.ए.व. **अक्षरः** - अक्षर वि.पु.प्र.ए.व. **उच्यते** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अक्षरः** - न क्षर इति तत्पदवाच्यः पुरुषोऽक्षरः = जो क्षर-विनाशी नाही तो अविनाशी तत्पदवाच्य अक्षर**(न.त.स.) कूटस्थः** - कूटे-मायाप्रपञ्चे कारणात्मास्वरूपेण तिष्ठतीति कूटस्थः = माया प्रपंचामध्ये कारणरूपाने राहणारा**(स.त.स.)** यद्वा **कूटस्थः** - महदादिपृथिव्यन्तः समष्टिव्यष्ट्यात्मकः स्थूल सूक्ष्मप्रपञ्चलक्षणकार्यराशिः कूटस्तत्र कूटे स्वकार्ये सर्वत्र कारणत्वेन घटादिषु मृदिव बहिरन्तश्च सर्वतो व्याप्य तिष्ठतीत्यव्यक्तं प्रकृतिशब्दवाच्यं कूटस्थः = महदादिपासून तर पृथिवीपर्यंत समष्टि-व्यष्टी स्वरूप स्थूलसूक्ष्मरूप कार्यराशि कूट त्या कूटरूप सर्व कार्यामध्ये जो सर्वत्र कारणरूपाने घटादिमध्ये मातीप्रमाणे बाहेर आणि आत सर्वत्र व्याप्त होऊन स्थिर राहणारा अव्यक्त असा प्रकृतिशब्दवाच्य कूटस्थ**(स.त.स.)** यद्वा **कूटस्थः** - कूटसाक्षीत्यत्र कूटशब्दः कपटवाची तत्र कूटे कपटे पुरुषस्य विपरीतभावाचरणे तिष्ठतीति कूटस्थो माया सैवाऽक्षर इत्युच्यते = 'कूटसाक्षी' याठिकाणी कूटशब्द कपटवाची आहे त्या कूटामध्ये-कपटामध्ये-पुरुषाच्या विपरीतभावाच्या आचरणामध्ये स्थित होते अशी कूटस्थमाया तिलाच अक्षर म्हटले जाते **(स.त.स.) क्षरः** - क्षरतीति त्वंपदवाच्यः पुरुषः क्षरः = नाश पावणारा क्षर (म्हणजे त्वंपदाचा वाच्य)**(वि.)**

पुरुषोत्तमाच्या स्वरूपाचे कथन -

**उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।**

**यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥१७॥**

**अन्वयः** - तु, अन्यः, उत्तमः, पुरुषः, परमात्मा, इति, उदाहृतः, यः, अव्ययः, ईश्वरः, लोकत्रयम्, आविश्य, बिभर्ति ।

**अन्वयार्थः** - **तु** - परंतु **अन्यः** - या दोन पुरुषांहून वेगळा **यः** - जो **उत्तमः पुरुषः** - उत्तम पुरुष **परमात्मा** - त्यालाच परमात्मा **इति, उदाहृतः** - असे म्हटले आहे **यः** - जो **अव्ययः, ईश्वरः** - अविनाशी ईश्वर **लोकत्रयम्, आविश्य** - त्रैलोक्यात प्रवेश करून **बिभर्ति** - सर्वांना धारण करतो.

**विवरण** - क्षर आणि अक्षर या दोन पुरुषांहून तिसरा पुरुष म्हणजे पुरुषोत्तम अगदी भिन्न आणि अत्यंत श्रेष्ठ तसेच नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त आणि सर्वशक्तिमान असा आहे तोच तिन्ही लोकामध्ये प्रवेश करून सर्वांचे धारण पोषण करतो. तसेच क्षर आणि अक्षर पुरुषांचा नियामक, स्वामी तसेच सर्वशक्तिमान ईश्वर असल्यामुळे त्याला परमात्मा असे म्हटले आहे. त्याचा केव्हाही व्यय तसेच अभाव होत नाही तो सदा-सर्वदा अविनाशी रूपाने राहतो.

**व्याकरणम्** - **तु** - तु उभ.अ. **अन्यः** - अन्य सर्व.पु.प्र.ए.व. **उत्तमः** - उत्तम वि.पु.प्र.ए.व. **पुरुषः** - पुरुष पु.प्र.ए.व. **परमात्मा** - परम वि. आत्मन् पु.प्र.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **उदाहृतः** - उद्+आ+हृ प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **यः** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **अव्ययः** - अव्यय वि.पु.प्र.ए.व. **ईश्वरः** - ईश्वर पु.प्र.ए.व. **लोकत्रयम्** - लोक पु. त्रय न.द्वि.ए.व. **आविश्य** - आ+विश् ष.ग.प.प.ल्यबन्त अ. **बिभर्ति** - भृ तृ.ग.उ.प.(प.प.)वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **लोकत्रयम्** - लोकानां-स्वर्गादीनां त्रयं लोकत्रयम् = तीन लोक**(ष.त.स.)** यद्वा **लोकत्रयम्** - लोक्यन्ते ज्ञायन्त इति लोकाः समष्टिव्यष्टिलक्षणाः स्थूलसूक्ष्मकारणदेहाः साभिमानिनः सावस्थास्तेषां त्रयं लोकत्रयम् = पाहिले जाते अथवा जाणले जाते असा तो लोक समष्टि व्यष्टिरूप, स्थूलसूक्ष्मकारण देह अभिमानसहित अवस्थासहित त्यांचा त्रय-तीन लोक**(ष.त.स.)** यद्वा **लोकत्रयम्** - लोक्यन्ते दृश्यन्त इति लोका जाग्रत्स्वप्नसुषुप्तयः स्वाभिमानिभोग्यार्थास्तासां त्रयं लोकत्रयम् = अवलोकन केले जाते-पाहिले जाते ते लोक अभिमानी आणि भोग्य पदार्थासहित जाग्रत, स्वप्न आणि सुषुप्ति त्यांचा त्रय -लोकत्रय**(ष.त.स.)** **परमात्मा** - परमश्चासौ आत्मा चेति परमात्मा = परमात्मा**(कर्म.स.)** **पुरुषः** - पुरा आस इति पुरुषः-यज्ञः, सर्वस्मात् पूर्वं विद्यमानत्वात्, पूर्णत्वादास इति पुरुषः = पूर्वी विद्यमान असल्यामुळे अथवा पूर्ण असल्यामुळे त्याला पुरुष म्हटले जाते**(वि.)** **उत्तमः** - उद्गतं तमः-तमोगुणो यस्मात् स उत्तमः = निघून गेला आहे तमोगुण ज्याच्यापासून तो**(वि.)** **ईश्वरः** - ईशितुम्-शासितुं शीलमस्येति ईश्वरः = शासन करण्याचे शील आहे ज्याचे तो**(वि.)**

पुरुषोत्तमत्वाच्या प्रसिद्धिच्या हेतुचे प्रतिपादन -

**यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः ।**

**अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥१८॥**

**अन्वय:** - यस्मात्, अहम्, क्षरम्, अतीत:, च, अक्षरात्, अपि, उत्तम:, अत:, लोके, च, वेदे, पुरुषोत्तम:, प्रथित:, अस्मि।

**अन्वयार्थ:** - **यस्मात्** - ज्या अर्थी **अहम्** - मी **क्षरम्** - क्षर पुरुषाहून **अतीत:** - वेगळा आहे **च** - आणि **अक्षरात्, अपि** - अक्षर पुरुषाहूनही **उत्तम:** - श्रेष्ठ किंवा उत्तम आहे **अत:** - म्हणून (**अहम्** - मी) **लोके** - लोकामध्ये **च** - आणि **वेदे** - वेदामध्ये **पुरुषोत्तम:** - पुरुषोत्तम (या नावाने)**प्रथित:** - प्रसिद्ध **अस्मि** - आहे.

**विवरण** - मी क्षर पुरुषाहून अत्यंत वेगळा (विलक्षण) म्हणजे अतीत आहे. परंतु, क्षर पुरुषाप्रमाणे मी अक्षर पुरुषापासून तर सर्वथा अतीत नाही कारण तो माझा अंश असल्यामुळे अविनाशी आणि चेतन आहे. किंतु, अक्षर पुरुषाहून मी उत्तम तर अवश्य आहे. कारण तो प्रकृतिस्थ आणि मी प्रकृतिच्या गुणापासून सर्वंथा अतीत तो अल्पज्ञ मी सर्वज्ञ, तो नियम्य, मी नियामक, जो माझा उपासक मी त्याचा उपास्य देव आहे अशा प्रकारांनी मी अक्षरपुरुषापेक्षा अत्यंत उत्तम आहे म्हणून मी लोकामध्ये आणि वेदामध्ये पुरुषोत्तम या नावाने प्रसिद्ध आहे.

**व्याकरणम्** - **यस्मात्** - यत् सर्व.पु.पं.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.पु.प्र.ए.व. **क्षरम्** - क्षर वि.न.द्वि.ए.व. **अतीत:** - अति+इ द्वि.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **अक्षरात्** - अक्षर वि.पु.पं.ए.व. **अपि** - अपि अ. **उत्तम:** - उत्तम वि.पु.प्र.ए.व. **अत:** - अतस् अ. **लोके** - लोक पु.स.ए.व. **च** - च उभ.अ. **वेदे** - वेद पु.स.ए.व. **पुरुषोत्तम:** - पुरुष+उत्तम वि.पु.प्र.ए.व. **प्रथित:** - प्रथ् प्र.ग.आ.प./ द.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **पुरुषोत्तम:** - पुरुषेषु वा पुरुषाणां मध्ये उत्तम:-उत्कृष्ट इति पुरुषोत्तम: = पुरुषामध्ये उत्तम पुरुषोत्तम(**स./ष.त.स.**) **उत्तम:** - उद्गतम्-निर्गतं तमो रजस्तमोपाधिर्यस्मात् स उत्तम: = निघून गेली आहे रजतम उपाधि ज्याच्यापासून तो उत्तम(**ब.स.**)

भगवान श्रीकृष्णाला पुरुषोत्तम समजणाऱ्याचे महत्व -

**यो मामेवमसम्मूढो जानाति पुरुषोत्तमम्।**

**स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत॥१९॥**

**अन्वय:** - भारत, य:, असम्मूढ:, माम्, एवम्, पुरुषोत्तमम्, जानाति, स:, सर्ववित्, माम्, सर्वभावेन, भजति ।

**अन्वयार्थ:** - **भारत** - हे भरतकुलोत्पन्न! **य:** - जो **असम्मूढ:** - ज्ञानीपुरुष **माम्, एवम्** - उपर्युक्त प्रकारांनी मलाच **पुरुषोत्तमम्** - पुरुषोत्तमाला **जानाति** - जाणतो **स:** - तो **सर्ववित्** - सर्वज्ञ पुरुष **माम्** - मला **सर्वभावेन** - सर्वत्र वासुदेव परमात्माच आहे अशा भावनेने **भजति** - भजतो.

**विवरण** - संशय, विपर्यय आदि दोषापासून शून्य असा ज्ञानीपुरुष मला साधारण पुरुष न समजून साक्षात् सर्वशक्तिमान परमेश्वर पुरुषोत्तम समजतो म्हणजे मला पुरुषोत्तमाला यथार्थ रूपाने जाणतो तो सर्व ठिकाणी वासुदेव आहे अशा प्रकारांनी माझी उपासना करतो म्हणजे मला भजतो.

**व्यारकणम्** - **भारत** - भारत पु.संबो.ए.व. **य:** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. **असम्मूढ:** - अ+सम्+मुह्

च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **एवम्** - एव निश्चयात्मक अ. **पुरुषोत्तमम्** - पुरुष+उत्तम वि.पु.द्वि.ए.व. **जानाति** - ज्ञा न.ग.उ.प.(प.प.)वर्त.तृ.पु.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **सर्ववित्** - सर्ववित् वि.पु.प्र.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **सर्वभावेन** - सर्व वि. भाव पु.तृ.ए.व. **भज ति** - भज् प्र.ग.उ.प.(प.प.)वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **असम्मूढः** - न सम्मूढ इत्यसम्मूढः = जो संमूढ नाही तो असंमूढ**(न.त.स.)** यद्वा **असम्मूढः** - देहेन्द्रियादिष्वहं ममेति बुद्धिर्यस्य स संमूढस्तद्विलक्षणोऽसंमूढः-देहादावहंभावममभावनिर्मुक्तः = देह आणि इंद्रियांच्या ठिकाणी मी आणि माझी बुद्धी आहे ज्याची तो संमूढ त्याच्याहून विलक्षण असंमूढ-देहादिकाच्या ठिकाणी मी भाव आणि माझा भाव याने रहित**(ब.ग.न.त.स.)** यद्वा **असम्मूढः** - विषयाशा ग्रहग्रस्तः सम्मूढस्तद्विलक्षणोऽसम्मूढः = विषय आशारूप ग्रहाने ग्रस्त संमूढ त्याच्याहून विलक्षण असंमूढ **(न.त.स.)** **सर्ववित्** - सर्वात्मना सर्वं वेत्तीति सर्ववित्-सर्वज्ञः = सर्वांचा आत्मा या रूपाने सर्व जाणतो तो सर्ववित्-सर्वज्ञ**(उ.प.स.)** **पुरुषोत्तमम्** - पुरुषेषु-क्षराक्षरपुरुषेषु यद्वा पुरुषाणां मध्ये उत्तमः-उत्कृष्टस्तं पुरुष-ोत्तमम् = पुरुषामध्ये-क्षराक्षरामध्ये उत्तम-उत्कृष्ट असा पुरुषोत्तम त्या पुरुषोत्तमाला**(स./ष.त.स.)** **सर्वभावेन** - अहमेवेदं सर्वमिति भावः सर्वभावस्तेन सर्वभावेन-सार्वात्म्येन = मीच सर्व आहे असा भाव सर्वभाव अशा सर्वभावाने-सार्वात्म्याने**(क.स.)**

उपर्युक्त गुह्यतम विषयाच्या ज्ञानाचे महत्व -

**इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ।**

**एतद्बुद्ध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत ॥२०॥**

**अन्वयः** - अनघ, भारत, इति, इदम्, गुह्यतमम्, शास्त्रम्, मया, उक्तम्, एतद्, बुद्ध्वा, बुद्धिमान्, च, कृतकृत्यः, स्यात्।

**अन्वयार्थः** - **अनघ भारत** - हे पापरहित अर्जुना! **इति, इदम्** - असे हे **गुह्यतमम्, शास्त्रम्** - अत्यंत गुह्यातील गुह्य शास्त्र **मया** - माझ्या द्वारा **उक्तम्** - सांगितले गेले आहे **एतत्** - हे अध्यात्म शास्त्र **बुद्ध्वा** - जाणून **बुद्धिमान्** - ज्ञानवान **च कृतकृत्यः** - व कृतकृत्य **स्यात्** - होतो.

**विवरण** - हे निष्पाप अर्जुना! अत्यंत गुह्यातील गुह्य शास्त्र माझ्या द्वारा प्रतिपादन केलेले आहे अशा या अध्यात्म शास्त्राला चांगल्या प्रकारांनी जाणून बुद्धिमान पुरुष कृतकृत्य होतो.

**व्याकरणम्** - **अनघ** - अन्+अघ वि.पु.संबो.ए.व. **भारत** - भारत पु.संबो.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **इदम्** - सर्व.न.प्र.ए.व. **गुह्यतमम्** - गुह्य वि.तमप् प्रत्ययान्त वि.न.प्र.ए.व. **शास्त्रम्** - शास्त्र न.प्र.ए.व. **मया** - अस्मत् सर्व.तृ.ए.व. **उक्तम्**- वच् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **एतत्** - एतत् सर्व.न.द्वि.ए.व. **बुद्ध्वा** - बुध् च.ग.आ.प.त्वान्त अ. **बुद्धिमान्** - बुद्धिमत् पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **कृतकृत्यः** - कृ अ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि. कृत्य कर्म.ण्यत् वि.पु.प्र.ए.व. **स्यात्** - अस् द्वि.ग.प.प.विध्यर्थ तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **कृतकृत्यः** - कृतम्-समाप्तिगतं, कृत्यम्-कर्तव्यकर्म येन स कृतकृत्यः = समाप्तिला गेले आहे कर्तव्य कर्म ज्याच्या द्वारा तो**(ब.स.)** **अनघ** - अघम्-पापं न विद्यते यस्य सोऽनघस्तत्सम्बुद्धौ हे अनघ = पाप नाही ज्याचे तो अनघ**(ब.स.)** **बुद्धिमान्** - बुद्धिरस्यास्तीति बुद्धिमान् = बुद्धी आहे ज्याची तो बु

द्धिमान(**अस्त्यर्थे त.वि.**) **गुह्यतमम्** - अतिशयेन गुह्यमिति गुह्यतमम्-गोप्यतमम् = गुह्यतम म्ह.सर्वापेक्षा अधिक गोपनीय अर्थात अत्यंत गुप्त(**वि.**) **शास्त्रम्** - निर्विशेषं परं तत्त्वं शास्ति-बोधयतीति शास्त्रम् = निर्विशेष परम तत्त्वाचे जे शासन करते अथवा बोधन करते ते शास्त्र(**वि.**)

**ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे**

**श्रीकृष्णार्जुनसंवादे पुरुषोत्तमयोगो नाम पञ्चदशोऽध्यायः ॥१५॥**

**-: अध्याय पंधरावा समाप्त :-**

**ॐ श्रीपरमात्मने नम:**

**अथ षोडशोऽध्याय:**

नवव्या अध्यायामध्ये भगवंताने दैवी, आसुरी आणि राक्षसी अशा तीन प्रकारच्या प्रकृती सांगितल्या आहेत. त्याचाच विस्तार करण्याकरिता सोळाव्या अध्यायाचा प्रारंभ केला जात आहे. जसे 'अभयं सत्व संशुद्धि:' इत्यादी. त्यामधून दैवीसंपत्ती संसारबंधातून मुक्त होण्याकरिता आहे आणि आसुरी व राक्षसी अत्यंत बंधाला कारणीभूत होणाऱ्या आहेत असे या अध्यायात भगवंताने अर्जुनाला विस्तारपूर्वक सांगितले आहे.

**श्रीभगवानुवाच** - श्री भगवान म्हणाले.

**अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थिति: ।**

**दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥१॥**

**अन्वय:** - अभयम्, सत्त्वसंशुद्धि:, ज्ञानयोगव्यवस्थिति:, च, दानम्, दम:, यज्ञ:, स्वाध्याय:, तप:, च, आर्जवम् ।

**अन्वयार्थ:** - **अभयम्** - भयरहित **सत्त्वसंशुद्धि:** - अंत:करणाची निर्मलता **ज्ञानयोगव्यवस्थिति:** - ज्ञान आणि योग यांच्या ठिकाणी तत्परता **च** - आणि **दानम्** - दान **दम:** - इंद्रियांचा निग्रह **यज्ञ:** - यज्ञ **स्वाध्याय:** - वेदशास्त्राचे अध्ययन **तप:** - तप **च** - आणि **आर्जवम्** - अंत:करणाची सरलता.

**विवरण** - इष्टाचा वियोग आणि अनिष्टाच्या संयोगापासून मनामध्ये भीती उत्पन्न होणे भय. त्या विपरीत असणारे अभय राग, द्वेष, हर्ष, शोक, ममत्व, अहंकार, मोह, मत्सर आणि नाना प्रकारचे कलुषित पापमय भाव इत्यादिकांचा सर्वथा अभाव होऊन अंत:करण पूर्णरूपाने निर्मल परिशुद्ध होऊन जाणे सत्त्वशुद्धि. परमात्म्याच्या स्वरूपाला यथार्थ रूपाने जाणणे, ज्ञान आणि त्याच्या प्राप्तीकरिता परमात्म्याच्या ध्यानामध्ये निरंतर स्थित राहाणे ज्ञानयोगव्यवस्थिति देश, काळ आणि पात्राचा विचार करून, निष्काम भावाने अन्न, वस्त्र, विद्या आणि औषधादि वस्तूंचे वितरण करणे दान. विषयांपासून इंद्रियांचा निग्रह करून त्यांना आपल्या आधीन ठेवणे दम. हवन तसेच वैश्वदेव करणे यज्ञ. वेदाचे अध्ययन करणे तसेच अन्य भगवंतासंबंधी असणाऱ्या ग्रंथांचे अध्ययन करणे स्वाध्याय. धर्म पालनाकरिता कष्ट सहन करून अंत:करण इंद्रियांना तापविणे तप. शरीर, इंद्रिय आणि अंत:करणाच्या सरळपणाचे नाव आर्जव.

**व्याकरणम् - अभयम्** - अभय न.प्र.ए.व. **सत्त्वसंशुद्धि:** - सत्त्व न. सम्+शुद्ध+क्तिन्=संशुद्धि स्त्री.प्र.ए.व. **ज्ञानयोगव्यवस्थिति:** - ज्ञान न. योग पु. स्थिति स्त्री.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **दानम्** - दा+ल्युट्=दान न.प्र.ए.व. **दम:** - दम पु.प्र.ए.व. **यज्ञ:** - यज्ञ पु.प्र.ए.व. **स्वाध्याय:** - स्वाध्याय पु.प्र.ए.व. **तप:** - तपस् न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **आर्जवम्** - आर्जव न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - अभयम्** - न भयमित्यभयम् = जे भय नाही ते**(न.त.स.) सत्त्वसंशुद्धि:** - सत्त्वस्य-अन्त:करणस्य सम्यक् प्रकारेण शुद्धिरिति संशुद्धि:-परवञ्चनमायाऽनृतादिपरिवर्जनम् = अंत:करणाची निर्मलता-दुसऱ्याची फसवणूक, माया, अनृत आदिचा परित्याग संशुद्धि**(ष.त.स.) परवञ्चनम्** - परस्य

व्याजेन वशीकरणं परवञ्चनम् = दुसऱ्याला कोणत्या तरी निमित्ताने वश करणे**(ष.त.स.) माया** - हृदयेऽन्यथा कृत्वा बहिरन्यथा व्यवहरणं माया = हृदयामध्ये अन्य भाव ठेवून बाहेर दुसऱ्या प्रकारचा व्यवहार करणे**(वि.) अनृतम् -** अयथाद्रष्टाकथनमनृतम् = जसे पाहिले नाही तसे बोलणे**(परिभाषा) ज्ञानयोगव्यवस्थिति:** - ज्ञानमध्यात्मज्ञानं तदेवयोग:-प्राप्तिरितिज्ञानयोग:-श्रवणमननादिस्तत्रैव मनसो विशिष्याऽवस्थितिर्व्यवस्थिति:-सदा तदेकप्रावण्यम् = ज्ञान-अध्यात्मज्ञानच योग आहे-श्रवण मननादिमध्ये अवस्थिति-व्यवस्थिति-सदा त्यामध्ये तत्परता**(क.ग.त.स.)** यद्वा **ज्ञानयोगव्यवस्थिति:** - ज्ञानम्-शास्त्रत: आचार्यतश्च आत्मादिपदार्थानामवगम:, अवगतानामिंद्रियाद्युपसंहारेण एकाग्रतया आत्मसंवेद्यतापादनं योग इति ज्ञानयोगस्तयोर्व्यवस्थिति:-व्यवस्थानमिति ज्ञानयोगव्यवस्थिति: = ज्ञान-शास्त्रावरून व आचार्यांच्या मुखाने आत्मा-अनात्मा इत्यादि पदार्थांचा अवबोध आणि अवगत-ज्ञात झालेल्या त्या पदार्थांना इंद्रियादिकांच्या उपसंहाराने मनाच्या एकाग्रतेने स्वसंवेद्यतेला प्राप्त करणे. त्यांचा साक्षात् अनुभव घेणे हा योग असा ज्ञानयोग त्या ज्ञानयोगामध्ये व्यवस्थिति-विशेष प्रकारचे अवस्थान-त्यामध्ये निश्चयाने स्थित होणे**(द्व.ग.समा.त.स.)** यद्वा **ज्ञानयोगव्यवस्थिति:** - ज्ञानम्-शास्त्रादात्मतत्त्वस्यावगम:, चित्तैकाग्रतया तस्य स्वानुभवारूढत्वं योग इति ज्ञानयोगस्तयोर्व्यवस्थिति: सर्वदा तन्निष्ठता ज्ञानयोगव्यवस्थिति: = ज्ञान शास्त्राद्वारा आत्मतत्त्वाचा अवगम-बोध आणि चित्ताच्या एकाग्रतेद्वारा त्याला आपल्या अनुभवामध्ये आरूढ-स्थिर करणे हा योग असा ज्ञानयोग त्या ज्ञानयोगामध्ये व्यवस्थिति-सर्वदा निष्ठ होणे**(द्व.ग.समा.त.स.) आर्जवम्** - ऋजोर्भाव आवर्जम् = ऋजुचा भाव आर्जव**(भावार्थे तद्धि.वि.) दम: -** इंद्रियाणि दमयतीति दम:-बाह्येंद्रियसंयम: = बाहेरच्या इंद्रियांचा संयम करणे**(वि.) दानम्** - दीयते तद् दानम् = दिले जाते ते दान**(वि.)** यद्वा **दानम्** - दानेन निर्वृत्तमिति दानम् = दान देऊन परिपूर्ण झाला त्याला दान म्हणतात**(वि.)**

**अहिंसा सत्यमक्रोधस्त्याग: शान्तिरपैशुनम्।**

**दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम्॥२॥**

**अन्वय:** - अहिंसा, सत्यम्, अक्रोध:, त्याग:, शान्ति:, अपैशुनम्, भूतेषु, दया, अलोलुप्त्वम्, मार्दवम्, ह्री:, अचापलम्।

**अन्वयार्थ: - अहिंसा** - कोणत्याही प्रकारची हिंसा न करणे **सत्यम्** - यथार्थ आणि प्रिय भाषण **अक्रोध:** - क्रोध राहित्य **त्याग: -** कर्मांमध्ये कर्तेपणाच्या अभिमानाचा त्याग **शान्ति:** - अंत:करणाच्या चंचलतेचा अभाव **अपैशुनम्** - कोणाचीच निंदा न करणे **भूतेषु दया** - सर्व भूतमात्राच्या ठिकाणी दया **अलोलुप्त्वम्** - इंद्रिय आणि विषयाचा संयोग झाला असतानाही त्याठिकाणी आसक्तिरहित होणे **मार्दवम्** - मृदुता **ह्री:** - लज्जा **अचापलम्** - इंद्रियांच्या क्रियेचा अभाव.

**विवरण** - मन, वाणी आणि शरीराच्या द्वारा कोणत्याही प्रकारे हिंसा करण्याची चेष्टा न करणे अहिंसा. इंद्रिय आणि अंत:करणाच्या द्वारा जसे पाहिले, ऐकिले आणि अनुभवले त्याप्रमाणे दुसऱ्याकरीता सुद्धा कपट सोडून यथासंभव प्रिय आणि हितकर वाणीचे उच्चारण करणे सत्य. अपमान आणि अपकार केलेला पाहून अथवा निंदा आणि दुर्वचन ऐकून मनामध्ये जी एक द्वेषपूर्ण उत्तेजनामयी वृत्ती अथवा मनामध्ये जलन आणि नेत्रामध्ये लाली उत्पन्न होणे क्रोध आणि या सर्व वृत्तीचा अभाव होणे अक्रोध. कर्तव्यकर्म करीत असताना त्यामध्ये ममता आसक्ति, फल आणि स्वार्थरहित होणे त्याग. संसाराच्या चिंतनाचा सर्वथा अभाव होऊन

अंत:करणामध्ये विक्षेपरहित वृत्ती म्हणजे सात्त्विक वृत्ती उत्पन्न होणे शांति. दुसऱ्याचे दोष पाहून लोकांमध्ये प्रगट करणे अथवा निंदा करणे पैशून आणि त्या सर्वाचा अभाव होणे अपैशून. कोणत्याही प्राण्याला दु:खित पाहून त्याला सुखी करणे दया. इंद्रिय आणि विषयाच्या संयोगामध्ये आसक्ती होणे अथवा दुसऱ्याला विषयाचा भोग करीत असतांना पाहून विषय भोगाच्या प्राप्तीकरिता मनात लालसा होणे लोलुपता आणि तिचा अभाव होणे अलोलुपता. अंत:करण वाणी आणि व्यवहारामध्ये जी कठोरता त्या सर्वांचा अभाव त्या ठिकाणी अतिशय कोमलता येणे मार्दव. वेदशास्त्र आणि लोकव्यवहाराच्या विरूद्ध आचरण करणाऱ्याचा संकोच करणे ह्री-लज्जा. कारणावाचून हातपाय शरीराच्या अवयवाचा व्यवहार करणे चपलता आणि त्या सर्वांचा आभाव होणे अचपलता.

**व्याकरणम्** - **अहिंसा** - अहिंसा स्त्री.प्र.ए.व. **सत्यम्** - सत्य न.प्र.ए.व. **अक्रोध:** - अ+क्रोध पु.प्र.ए.व. **त्याग:** - त्याग पु.प्र.ए.व. **शान्ति:** - शम्+क्तिन्=शान्ति स्त्री.प्र.ए.व. **अपैशुनम्** - अ+ पिशुन+अण्=पैशुन/अ+पिश् ष.ग.प.प.+उनन्=पिशुन+अण्=पैशुन न.प्र.ए.व. **भूतेषु** - भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.भूत वि.न.स.ब.व. **दया** - दया स्त्री.प्र.ए.व. **अलोलुप्त्वम्** - अ+लोलुप्त्व वि.न.प्र.ए.व. **मार्दवम्** - मृदु+अण्=मार्दव न.प्र.ए.व. **ह्री:** - ह्री स्त्री.प्र.ए.व. **अचापलम्** - अ+चपल+अण्=चापल न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अहिंसा** - न हिंसाऽहिंसा = प्राण्यांना पीडा किंवा दु:ख न देणे ती अहिंसा**(न.त.स.)** **अक्रोध:** - न क्रोधोऽक्रोध: = जो क्रोध नाही तो**(न.त.स.)** **अलोलुप्त्वम्** - न लोलुप्त्वमलोलुप्त्वम् = जे लोलुप्त्व नाही ते अलोलुप्त्व**(न.त.स.)**

**तेज: क्षमा धृति: शौचमद्रोहो नातिमानिता ।**

**भवन्ति सम्पदं दैवीमभिजातस्य भारत ॥३॥**

**अन्वय:** - तेज:, क्षमा, धृति:, शौचम्, अद्रोह:, नातिमानिता, भारत, दैवी, सम्पदम्, अभिजातस्य, भवन्ति ।

**अन्वयार्थ:** - **तेज:** - तेज **क्षमा** - क्षमा **धृति:** - धैर्य **शौचम्** - शुचिर्भूतपणा **अद्रोह:** - द्रोहरहितता **नातिमानिता** - अतिशय मानित्व धारण न करणे-पूज्यतेच्या अभिमानाचा अभाव **भारत** - भरतकुलोत्पन्न अर्जुना! **दैवी सम्पदम्** - दैवी संपत्तीला, **अभिजातस्य** - अनुसरून उत्पन्न झालेल्या पुरुषाच्या ठिकाणी (हे उपर्युक्त गुण) **भवन्ति** - होतात.

**विवरण** - श्रेष्ठ पुरुषाच्या ठिकाणी असणाऱ्या शक्ती विशेषाचे नाव तेज. अपराध करणाऱ्याला कोणत्याही प्रकारे दंड देण्याची इच्छा न करणे त्याच्या अपराधाला निरपराध माणणे म्हणजे त्याच्या अपराधाला विसरून जाणे क्षमा. मोठ्यातली मोठी आपत्ती, भय आणि दु:ख उपस्थित झाले तरी त्यापासून विचलित न होणे त्याप्रमाणे काम, क्रोध, भय आणि लोभ यांच्या आधीन होऊन आपल्या धर्मापासून आणि कर्तव्यापासून विमुख न होणे धैर्य. बाह्य तसेच आंतर शुद्धी होणे शौच. शत्रुतेचा व्यवहार करणाऱ्या प्राण्यांच्या ठिकाणी यत्किंचिन्मात्र सुद्धा द्वेष आणि शत्रुतेचा भाव न ठेवणे अद्रोह. श्रेष्ठ अथवा पूज्य समजून प्रतिष्ठा आणि पूजा आदिची विशेष इच्छा करणे आणि प्राप्त झाल्यावर प्रसन्न होणे अतिमानिता त्या सर्वाचा अभाव होणे नातिमा

निता. देवाच्या संबंधाने आलेल्या गुणाला अथवा त्याच्या प्राप्तीच्या साधनरूप सद्‌गुणाला आणि सदाचाराच्या समुदायाला दैवी संपत्ती म्हणतात. असे उपर्युक्त लक्षण ज्याच्या ठिकाणी विद्यमान आहे तोच पुरुष दैवी संपत्तीने युक्त आहे. म्हणजे त्याच्या ठिकाणी हे सर्व उपर्युक्त गुण उत्पन्न होतात.

**व्याकरणम् - तेजः** - तिज्+असुन्-तेजस् न.प्र.ए.व. **क्षमाः** - क्षमा स्त्री.प्र.ए.व. **धृतिः** - धृ+क्तिन्=धृति स्त्री.प्र.ए.व. **शौचम्** - शुचिर् च.ग.उ.प.+अण्=शौच न.प्र.ए.व. **अद्रोहः** - अ+द्रुह् च.ग.प.प.+घञ्=द्रोह पु.प्र.ए.व. **नातिमानिता** - न+अति+मानिता स्त्री.प्र.ए.व. **भारत** - भारत पु.संबो.ए.व. **दैवीम्** - दैवी स्त्री. द्वि.ए.व. **सम्पदम्** - सम्पद् स्त्री.द्वि.ए.व. **अभिजातस्य** - अभि+जन् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.ष.ए.व. **भवन्ति** - भू प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - अद्रोहः** - न द्रोहोऽद्रोहः स्वापकारिणं हन्तुमिच्छा तदभावोऽद्रोहः = जो द्रोह नाही तो अद्रोह-अपकारीला मारण्याची इच्छा त्याचा अभाव अद्रोह**(न.त.स.) नातिमानिता** - अतिमानोऽस्यास्तीति अतिमानी तस्य भावोऽतिमानिता तद्विपरीता नातिमानिता-स्वस्य प्रतिष्ठानपेक्षित्वं = आपल्या प्रतिष्ठेची अपेक्षा न करणारा**(अस्त्यर्थे त.वि.ग.न.समा.ग.भावार्थे त्वल् प्रत्ययान्त)** यद्वा **नातिमानिता** - स्वस्याऽतिपूज्यत्वाभिनिवेशोऽतिमानस्तदभावो नातिमानः सोऽस्याऽस्तीति नातिमानी तस्य भावो नातिमानिता = आपल्यामध्ये अतिपूज्यत्वाचा अभिनिवेश अतिमान त्याचा अभाव नातिमान तो ज्याचा आहे तो नातिमानी त्याचा भाव नातिमानिता**(न.समा.ग.अस्त्यर्थे त.वि.ग.भा.त्वल् प्रत्य.)** यद्वा **नातिमानिता** - अत्यर्थं मानः-अतिमानः सो यस्य विद्यते सोऽतिमानी तद्भावोऽतिमानिता तदभावो नातिमानिता = अतिशय मान हा अतिमान तो अतिमान ज्याला असतो तो अतिमानी त्याचा भाव अतिमानिता तिचा अभाव नातिमानिता **(अस्त्यर्थे त.वि.ग.भा.त्वल् प्रत्य.ग.न.त.स.)**

आसुरी संपत्तीची सहा लक्षणे -

**दम्भो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च।**

**अज्ञानं चाभिजातस्य पार्थ सम्पदमासुरीम्॥४॥**

**अन्वयः** - पार्थ, दम्भः, दर्पः, च, अभिमानः, क्रोधः, च, पारुष्यम्, एव, च, अज्ञानम्, आसुरीम्, सम्पदम्, अभिजातस्य।

**अन्वयार्थः - पार्थ** - हे पृथुपुत्रा **दम्भः** - दांभिकपणा **दर्पः** - गर्व **च** - आणि **अभिमानः** - अभिमान **क्रोधः** - क्रोध **च** - आणि **पारुष्यम्, एव** - कठोरता (निष्ठुरता) **च** - आणि **अज्ञानम्** - अज्ञान (हे गुण) **आसुरीम्** - आसुरी **सम्पदम्** - संपत्तीला अनुसरून **अभिजातस्य** - उत्पन्न झालेल्या मनुष्याच्या ठिकाणी असतात.

**विवरण** - पूजा आणि प्रतिष्ठेकरिता धनादिकांच्या लोभाने अथवा कोणाला फसविणाऱ्या अभिप्रायाने आपणाला धर्मात्मा भगवद्भक्त, ज्ञानी आणि महात्मा या रूपाने प्रसिद्ध करणे अथवा लोकांना दाखविणाऱ्या धर्मपालनाच्या दानाच्या भक्तीच्या, व्रत उपवासादिकाच्या अथवा योग साधनाच्या द्वारा आपले कार्य सिद्ध होईल. त्याप्रमाणे ढोंग करणे दंभ. विद्या, धन, कुटुंब, जाती, अवस्था, बल आणि ऐश्वर्य आदिच्या द्वारा उत्पन्न होणाऱ्या गर्वामुळे दुसऱ्यांना तुच्छ समजून त्यांची अवहेलना करणे दर्प. श्रेष्ठ, पूज्य, प्रतिष्ठावान आदिच्या इच्छा मनामध्ये ठेवणे अभिमान. तिरस्कार, निंदा, मनाच्या विरुद्ध कार्य इत्यादि दुर्वचन ऐकून

अंत:करणामध्ये द्वेषयुक्त भावना उत्पन्न होणे क्रोध. कोमलतेचा अत्यंत अभाव अथवा कठोरता युक्त होणे पारुष्य. सत्य असत्य आणि धर्म अधर्मादिकाचे ययार्थ ज्ञान न होणे म्हणजे विपरीत ज्ञान होणे अशा प्रकारचे भगवंताची सत्ता न मानणारे आणि त्याच्या विरोधी वर्तन करणारे असे जे आसुरी लोक त्यांच्या ठिकाणी वरील सर्व गुण राहतात.

**व्याकरणम्** - **पार्थ:** - पार्थ पु.संबो.ए.व. **दम्भ:** - दम्भ पु.प्र.ए.व. **दर्प:** - दृप् च.ग.प.प.+अच्=दर्प पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **अभिमान:** - अभि+मन् च.ग.आ.प./अ.ग.आ.प.+घञ्=अभिमान पु.प्र.ए.व. **क्रोध:** - क्रोध पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **पारुष्यम् -** परुष्+ष्यञ्=पारुष्य न.प्र.ए.व. **एव** - एव अ. **च** - च उभ.अ. **अज्ञानम्** - अज्ञान न.प्र.ए.व. **आसुरीम्** - आसुरी स्त्री.द्वि.ए.व. **सम्पदम्** - सम्पद् स्त्री. द्वि.ए.व. **अभिजातस्य** - अभि+जन् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.ष.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **आसुरीम्** - असुषु-इन्द्रियेषु-प्राणेषु विषयसुखलाभाय रमन्ते ते आसुरा:-असुराणा मियमासुरी तामासुरीम् = इंद्रियांमध्ये रममाण होणारे असुर, त्यांचे संबंधी ते आसुर**(वि.) पारुष्यम्** - परुष:-निष्ठुरभाषा तस्य भाव: पारुष्यम् = परुष-कठोरभाषा त्याचा भाव पारुष्य**(भावार्थे त.वि.)**

दैवी संपत्तीचे फल मुक्ति तसेच आसुरी संपत्तीचे फल बंधन दाखविणे -

**दैवी सम्पद्विमोक्षाय निबन्धायासुरी मता ।**

**मा शुच: सम्पदं दैवीमभिजातोऽसि पाण्डव ॥५॥**

**अन्वय:** - दैवी, सम्पद्, विमोक्षाय, आसुरी, निबन्धाय, मता, (अत:), पाण्डव, मा, शुच:, दैवीम्, सम्पदम्, अभिजात:, असि ।

**अन्वयार्थ:** - **दैवी सम्पद्** - दैवी संपत्ती **विमोक्षाय** - मोक्षाकरिता आहे आणि **आसुरी (संपद्)** - आसुरी संपत्ती **निबन्धाय** - बंधनासाठी आहे **मता** - असे मानले आहे (**अत:** - याकरिता) **पाण्डव** - हे पंडुपुत्रा अर्जुना! **मा शुच:** - तू शोक करू नकोस; कारण तू **दैवीम्, सम्पदम्** - दैवी संपत्तीला **अभिजात: असि** - अनुसरून उत्पन्न झाला आहेस.

**विवरण** - सत्त्वगुणाने युक्त तसेच आचरणाच्या समुदायाने युक्त अशी दैवी संपत्ती पुरुषाला संसारबंधनापासून सर्वथा मुक्त करून मोक्षाला प्राप्त करण्याकरिता आणि दुर्गम दुराचाराने युक्त तसेच रजोमिश्रित तमोगुणप्रधान भावाच्या समुदायाने युक्त अशी आसुरी संपत्ती संसार बंधनाला कारण होते आहे. परंतु, हे अर्जुना! तू शोक करू नकोस कारण तू दैवी संपत्तीला अनुसरून उत्पन्न झाला आहेस.

**व्याकरणम्** - **दैवी सम्पद्** - देव+अण्+ङीष्=दैवी स्त्री.प्र.ए.व. सम्+पद् च.ग.आ.प./द.ग.आ.प.+क्विप्=सम्पद् स्त्री.प्र.ए.व. **विमोक्षाय** - वि+मोक्ष पु.च.ए.व. **आसुरी** - आसुरी स्त्री.प्र.ए.व. **निबन्धाय** - नि+बन्ध् द.ग.प.प./न.ग.प.प.+घञ्=निबन्ध पु.च.ए.व. **मता** - मन् च.ग.आ.प.कर्म.भू.धा. वि.स्त्री.प्र.ए.व. **पाण्डव** - पाण्डव पु.सं.ए.व. **मा** - मा निषेधार्थक अ. **शुच:** - प्र.ग.प.प.सा.भूत द्वि.पु.ए.व. **दैवीम्** - दैवी स्त्री.द्वि.ए.व. **सम्पदम्** - सम्पद् स्त्री.द्वि.ए.व. **अभिजात:** - अभि+'जनी प्रादुर्भावे'जन् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **असि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **दैवीम्** - देवस्येयं दैवी तां दैवीम् = देवाच्या संबंधी ती दैवी**(त.वि.) निबन्धाय** - नियतो

बन्धो निबंधस्तस्मै निबन्धाय = नियत बंध निबंध त्या करिता**(कर्म.स.)**

दैवी आणि आसुरी या दोन सृष्टिचा संकेत करून आसुर सृष्टिला विस्तारपूर्वक ऐकण्याची आज्ञा -

**द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च ।**

**दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु ॥६॥**

**अन्वयः** - अस्मिन्, लोके, दैवः, च, आसुरः, एव, द्वौ, भूतसर्गौ, दैवः, विस्तरशः, प्रोक्तः, पार्थ, मे, आसुरम्, शृणु ।

**अन्वयार्थः** - **अस्मिन्, लोके** - या लोकामध्ये **दैवः** - दैवी **च** - आणि **आसुरः एव** - आसुरी अशी **द्वौ भूतसर्गौ** - दोन प्रकारच्या भूताची सृष्टी आहे त्यामध्ये **दैवः** - देवाची सृष्टी **विस्तरशः** - विस्तार पूर्वक **प्रोक्तः** - कथन केली आहे **पार्थ** - हे अर्जुना! (आता तू) **मे** - माझ्यापासून **आसुरम्** - आसुरी सृष्टीचे विस्तारपूर्वक **शृणु** - श्रवण कर (ऐक).

**विवरण** - या लोकामध्ये दोन प्रकारची सृष्टी प्रतिपादन केली आहे एक तर दैवी प्रकृतीने युक्त आणि दुसरी आसुरी प्रकृतीने युक्त आतापर्यंत दैवी प्रकृतिने युक्त पुरुषाचे वर्णन विस्तार पूर्वक केले आहे. यानंतर आसुरी प्रकृतीने युक्त पुरुषाचे स्वभाव, आचरण आणि व्यवहाराचे वर्णन माझ्याकडून विस्तारपूर्वक ऐक.

**व्याकरणम् - अस्मिन्** - इदम् सर्व.पु.स.ए.व. **लोके** - लोक पु.स.ए.व. **दैवः** - दैव वि.पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **आसुरः** - आसुर वि.पु.प्र.ए.व. **एव** - एव अ. **च** - च उभ.अ. **द्वौ** - द्वि संख्या वा.वि.पु.प्र.द्वि.व. **भूतसर्गौ** - भूत भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. सर्ग पु.प्र.द्वि.व. **दैवः** - दैव पु.प्र.ए.व. **विस्तरशः** - वि+स्तृ न.ग.उ.प.+अप्=विस्तर+शस्=विस्तरशस् अ. **प्रोक्तः** - प्र+वच् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **आसुरम्** - आसुर वि.पु.द्वि.ए.व. **शृणु** - शृ प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **भूतसर्गौ** - सृज्येत इति सर्गौ भूतानाम्-प्राणिमात्राणां सर्गौ-सृष्टी भूतसर्गौ = दोन प्रकारच्या भूतांची सृष्टी**(ष.त.स.) दैवः** - देवस्येदं दैवः = देवसंबंधी दैव**(त.वि.) सर्गौ** - सृज्यते-संसृज्यते गन्धः पुष्पमिव प्राणिचित्तमनुबध्य तिष्ठतीति सर्गः-स्वभावस्तौ सर्गौ-प्रकृती = जो मिळून राहतो-पुष्पामधल्या गंधाप्रमाणे मिळून राहतो-प्राण्याच्या चित्ताबरोबर संबंध करून स्थित राहतो तो सर्ग-प्रकृति**(वि.)**

आसुरी संपत्ती प्राप्त असलेल्या पुरुषांमध्ये सदाचाराच्या अभावाचे कथन -

**प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः ।**

**न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ॥७॥**

**अन्वयः** - आसुराः, जनाः, प्रवृत्तिम्, च, निवृत्तिम्, न, विदुः, तेषु, शौचम्, न, अपि, च, आचारः, न, सत्यम्, न, विद्यते ।

**अन्वयार्थः** - **आसुराः जनाः** - आसुरी प्रकृतिला अनुसरून उत्पन्न झालेले लोक **प्रवृत्तिम्** - धर्माच्या ठिकाणी प्रवृत्त **च** - आणि **निवृत्तिम्** - अधर्मापासून निवृत्त व्हावे असे **न विदुः** - ते जाणत नाहीत **तेषु** - त्यांच्या ठिकाणी **शौचम्, न** - अंतर बाहेरची शुद्धता नसते **अपि च** - त्याचप्रमाणे **आचारः** - श्रेष्ठ आचरण

**न** - नसते आणि **सत्यम्, न विद्यते** - सत्य नसते.

**विवरण** - यथार्थ आचरण केल्याने कल्याण होईल असेच आचरण करावे आणि अकल्याण होणाऱ्या आचरणापासून निवृत्त व्हावे असे आसुरस्वभावाने युक्त असणारे पुरुष प्रवृत्त कोठे व्हावे आणि निवृत्त कशापासून व्हावे हे यथार्थ रूपाने जाणतच नाहीत. कारण, त्यांच्या ठिकाणी अंतर आणि बाहेरची शुद्धी नसते, सदाचरण नसते आणि सत्यही नसते.

**व्याकरणम् - आसुरा: -** असुर+अण्=आसुर वि.पु.प्र.ब.व. **जना:** - जन पु.प्र.ब.व. **प्रवृत्तिम्** - प्र+वृत्+क्तिन्=प्रवृत्ति स्त्री.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **निवृत्तिम्** - नि+वृत्+क्तिन्=निवृत्ति स्त्री.द्वि.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **विदु:** - विद् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **तेषु** - तत् सर्व.स.ब.व. **शौचम्** - शौच न.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **अपि** - अपि अ. **च** - च उभ.अ. **आचार:** - आ+चर् प्र.ग.प.प.+घञ्=आचर पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **सत्यम्** - सत्य न.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **विद्यते** - विद् च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - शौचम्** - शुचेर्भाव: कर्म वा शौचम् = शुचीचा भाव अथवा कर्म शौच**(भावार्थे त.वि.)**

आसुरी संपदा असणाऱ्यांच्या नास्तिकतेविषयी कथन -

**असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् ।**

**अपरस्परसम्भूतं किमन्यत्कामहैतुकम् ॥८॥**

**अन्वय:** - ते, जगत्, असत्यम्, अप्रतिष्ठम्, अनीश्वरम्, अपरस्परसम्भूतम्, कामहैतुकम्, किम्, अन्यत्, आहु: ।

**अन्वयार्थ: - ते** - आसुरी प्रकृतिचे लोक **जगत्** - हे सर्व विश्व **असत्यम्** - असत्य **अप्रतिष्ठम्** - प्रतिष्ठारहित **अनीश्वरम्** - या सृष्टीचा-जगताचा कोणीही कर्ता नाही केवल ईश्वरही नाही असे **अपरस्परसम्भूतम्** - स्त्री पुरुषाच्या संयोगापासून उत्पन्न झालेले जगत् केवळ **कामहैतुकम्** - काममूलक आहे **किम्, अन्यत्** - या शिवाय आणखी काय आहे? **आहु:** - असे म्हणतात.

**विवरण** - आसुरी प्रकृतिच्या स्वभावाने युक्त असणारे लोक म्हणतात कि, या जगताची नित्य सत्ता नसून केवळ असत्य आहे आणि जन्माच्या पूर्वी आणि मृत्युच्यानंतर या जीवाचे अस्तित्व नाही. या जगताचा रचयिता, नियामक आणि शासक कोणी दुसरा ईश्वर नाही. हे जगत् केवळ स्त्री पुरुषाच्या संयोगापासून उत्पन्न झालेले आहे. केवळ कामच यांचे कारण आहे याशिवाय दुसरे काय आहे?

**व्यारकणम् - ते** - तत् सर्व.पु.प्र.ब.व. **जगत्** - जगत् न.प्र.ए.व. **असत्यम्** - असत्य न.प्र.ए.व. **अप्रतिष्ठम्** - अ+प्रतिष्ठ न.प्र.ए.व. **अनीश्वरम्** - अन्+ईश्वर न.प्र.ए.व. **अपरस्परसम्भूतम्** - अ+परस्पर वि. सम्+भू प्र.ग.प.प.+कर्त.क्त=सम्भूत वि.न.प्र.ए.व. **कामहैतुकम्** - काम पु. हैतुक वि.न.प्र.ए.व. **किम्** - किम् सर्व.न.प्र.ए.व. **अन्यत्** - अन्यत् सर्व.न.प्र.ए.व. **आहु:** - ब्रू द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **अप्रतिष्ठम्** - प्रतितिष्ठत्यनयेति प्रतिष्ठा कारणं सुखदु:खादिवैचित्र्यहेतुभूतौ धर्माधर्मौ न प्रतिष्ठाऽस्येत्यप्रतिष्ठम् = ज्याच्या द्वारा स्थित होते ती प्रतिष्ठा-कारण सुखदु:खादि वैचित्र्याला हेतुभूत असणारे धर्म आणि अधर्म ज्याची प्रतिष्ठा नाही ते अप्रतिष्ठ**(न.त.स.)** यद्वा **अप्रतिष्ठम्** - नास्ति धर्माधर्मरूपा प्रतिष्ठा-

व्यवस्थाहेतुर्यस्य तदप्रतिष्ठम् = नाही धर्माधर्मरूप प्रतिष्ठा व्यवस्थेचा हेतू ज्याचा ते अप्रतिष्ठ**(न.त.स.)** यद्वा **अप्रतिष्ठम्** - नास्ति प्रतिष्ठा-ईश्वरमूलाधार यस्य तदप्रतिष्ठम् = नाही प्रतिष्ठा म्हणजे ईश्वरमूलाधार ज्याचे ते **(न.त.स.)** **अनीश्वरम्** - नास्ति ईश्वर: कर्ता-व्यवस्थापक:-शासक:-उत्पत्तिकारणं यस्य तदनीश्वरम् = नाही ईश्वर कर्ता म्हणजे शासक अथवा उत्पत्तिकारण ज्याचा ते**(न.स.ग.ब.स.)** यद्वा **अनीश्वरम्** - नास्ति शुभाशुभयो: कर्मणो: फलदातेश्वरो नियन्ता यस्य तदनीश्वरम् = नाही शुभ आणि अशुभ कर्माचा फलदाता-नियामक ईश्वर ज्याचा ते अनीश्वर**(न.त.स.)** **अपरस्परसम्भूतम्** - अपरश्च परश्चेति अपरस्परं तस्मात् स्त्रीपुरुष मैथुनात्-संगमात् संभूतं उत्पन्नं यत् तत् अपरस्परसंभूतम् = परस्पर स्त्री-पुरुषाच्या मैथुनापासून उत्पन्न झालेली भूते**(ब.स.)** **कामहैतुकम्** - काम: राग एव हेतु: यस्य तत् कामहेतुकम् कामहेतुकमेव कामहैतुकम् = काम म्हणजे प्रजाची सृष्टी करण्याकरिता रागच हेतु-कारण आहे ज्याचा ते**(ब.स.)** **असत्यम्** - नाऽस्ति सत्यम् त्रिकालाबाधितं परं ब्रह्ममूलं वेदपुराणादि प्रमाणं यस्य तत् असत्यम् = नाही सत्य म्हणजे वेदपुराणादि प्रमाणयुक्त त्रिकालाबाधित परब्रह्म मूल ज्याचे ते**(न.ब.स.)**

आसुरी प्रकृतिने युक्त असणाऱ्या दुराचाराचे वर्णन -

**एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धय: ।**

**प्रभवन्त्युग्रकर्माण: क्षयाय जगतोऽहिता: ॥९॥**

**अन्वय:** - एताम्, दृष्टिम्, अवष्टभ्य, नष्टात्मान:, अल्पबुद्धय:, अहिता:, उग्रकर्माण:, जगत:, क्षयाय, प्रभवन्ति ।

**अन्वयार्थ: - एताम्, दृष्टीम्** - या दृष्टीचा **अवष्टभ्य** - अवलंब करून **नष्टात्मान:** - ज्याचा स्वभाव विनाश पावला आहे असे **अल्पबुद्धय:** - अल्पबुद्धिने युक्त **अहिता:** - जगाचे अकल्याण करणारे **उग्रकर्माण:** - उग्र कर्माने युक्त असणारे ते आसुर लोक **जगत:** - जगताच्या **क्षयाय** - विनाशाकरिता **प्रभवन्ति** - प्रवृत्त होतात. (उत्पन्न होतात.)

**विवरण** - आत्म्याची सत्ता न मानणारे आणि असत् सिद्धांताचा आश्रय करणारे, विनाशी स्वभावाने तसेच अल्पबुद्धीने युक्त जगाचे अहित करणारे, तसेच उग्र कर्माने युक्त असणारे ते आसुर लोक जगताचा क्षय करण्याकररिताच उत्पन्न होतात.

**व्याकरणम् - एताम्** - एतत् सर्व.स्त्री.द्वि.ए.व. **दृष्टिम्** - दृष्टि स्त्री.द्वि.ए.व. **अवष्टभ्य** - अव+स्तम्भ् पं.ग.प.प.ल्यबन्त अ. **नष्टात्मान:** - नश् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. आत्मन् पु.प्र.ब.व. **अल्पबुद्धय:** - अल्प वि. बुद्धि स्त्री.प्र.ब.व. **अहिता:** - अ+धा तृ.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **उग्रकर्माण:** - उग्र वि. कर्मन् वि.न.पु.प्र.ब.व. **जगत:** - जगत् न.ष.ए.व. **क्षयाय** - क्षय पु.च.ए.व. **प्रभवन्ति** - प्र+भू प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **नष्टात्मान:** - कामक्रोधलोभमोहादि लक्षणेन रजस्तमोदोषेण नष्टस्तिरोहित आत्मा-विवेकबुद्धिर्येषां ते नष्टात्मान: = काम, क्रोध, लोभ, मोहादि लक्षणाने युक्त रजोगुण आणि तमोगुणारूप दोषाच्याद्वारा नष्ट-तिरोहित आत्मा-विवेक बुद्धी आहे ज्यांची ते**(ब.स.)** **उग्रकर्माण:** - उग्रम्-हिंस्त्रकर्म येषां ते उग्रकर्माण: = उग्र म्हणजे हिंस्त्र कर्म आहे ज्यांचे ते**(ब.स.)** यद्वा **उग्रकर्माण:** - उग्रम्-क्रूरं शास्त्रविरूद्धं

देहपोषणैकप्रयोजनं परहिंसाप्रधानं कर्म येषां ते उग्रकर्माणः = उग्र-क्रूर केवल देहपोषण प्रयोजनाने युक्त पर हिंसाप्रधान शास्त्रविरूद्ध कर्म आहे ज्यांचे ते**(ब.स.) अहिताः** - न विद्यते हितं येषां ते अहिताः = नाही होत हित ज्यांचे ते**(न.ब.स.) अल्पबुद्धयः** - अल्पे-तुच्छे स्रगादि विषयभोगे बुद्धिर्येषां ते अल्पबुद्धयः = अल्प-तुच्छ स्रगादि विषय भोगामध्ये सत्य बुद्धी आहे ज्यांची ते**(ब.स.)** यद्वा **अल्पबुद्धयः** - अल्पे मलमांसास्थिमये देहे अहमिति बुद्धिर्येषां ते ये अल्पबुद्धयः-देहमात्रात्मदर्शिनः = अल्पामध्ये-मलमांस हाडाने युक्त असणाऱ्या देहामध्ये मी अशी बुद्धी आहे ज्यांची ते अल्पबुद्धि-देहमात्रात्मदर्शी**(ब.स.)**

**काममाश्रित्य दुष्पूरं दम्भमानमदान्विताः ।**

**मोहाद्गृहीत्वासद्ग्राहान्प्रवर्तन्तेऽशुचिव्रताः ॥१०॥**

**अन्वयः** - दुष्पूरम्, कामम्, आश्रित्य, दम्भमानमदान्विताः, मोहाद्, असद्ग्राहान्, गृहीत्वा, अशुचिव्रताः, प्रवर्तन्ते ।

**अन्वयार्थः** - **दुष्पूरम्, कामम्, आश्रित्य** - कधीच पूर्ती न होणाऱ्या कामाचा अवलंब करून **दम्भमानमदान्विताः** - दंभ, मान आणि मद यांनी युक्त असणारे लोक **मोहाद्** - मोहामुळे **असद्ग्राहान्** - असत् सिद्धांताला **गृहीत्वा** - ग्रहण करून **अशुचिव्रताः** - शास्त्रविधिरहित अशुचिव्रताने युक्त असणारे लोक (संसारामध्ये) **प्रवर्तन्ते** - प्रवृत्त होतात.

**विवरण** - दंभ, मान आणि मदाने युक्त असणारे आसुरी प्रकृतीचे लोक असत् सिद्धांताला पूर्ण करण्याकरिता मनामध्ये दृढ संकल्प करून, कोणत्याही साधनाच्या द्वारा पूर्ती न होणाऱ्या अपूर्ण कामनांचा आश्रय करून आणि अज्ञानामुळे असत् सिद्धांताला ग्रहण करून, शास्त्रविरूद्ध असणाऱ्या खाणे, पिणे, चालणे, बोलणे इत्यादि भ्रष्ट व्यवहाराला-आचरणाला धारण करून संसारामध्ये प्रवृत्त होतात.

**व्याकरणम् - दुष्पूरम्** - दुष्पूर वि.पु.द्वि.ए.व. **कामम्** - कम् प्र.ग.आ.प.+घञ्=काम पु.द्वि.ए.व. **आश्रित्य** - आ+श्रि प्र.ग.उ.प.ल्यबन्त अ. **दम्भमानमदान्विताः** - दम्भ पु. मान पु. मद पु. अनु+इ द्वि.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.प्र.ब.व. **मोहात्** - मुह् च.ग.प.प.+घञ्=मोह पु.पं.ए.व. **असद्ग्राहान्** - असत् वि. गृह् न.ग.उ.प.+घञ्=ग्राह वि.पु.द्वि.ब.व. **गृहीत्वा** - गृह् न.ग.उ.प.त्वान्त अ. **अशुचिव्रताः** - अ+शुचि वि. व्रत पु.प्र.ब.व. **प्रवर्तन्ते** - प्र+वृत् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **दम्भमानमदान्विताः** - दम्भश्च मानश्च मदश्चेति दम्भमानमदास्तैरन्विताः दम्भमानमदान्विताः = दंभ, मान आणि मद यांनी युक्त असे दंभमानमदान्वित**(द्व.समा.ग.तृ.त.स.) असद्ग्राहान्** - असत्-अनर्थमेव ग्राहयन्ति-संभावयन्तीत्यसद्ग्राहास्तानसद्ग्राहान् = असत सिद्धांताला ग्रहण करणाऱ्यांना **(उप.स.) अशुचिव्रताः** - अशुचीन्यमङ्गलकराणि नरकाद्यनर्थकारणानि व्रतानि-नियमाः येषां तेऽशुचिव्रताः = अशुचि-अमंगलकारी-नरकादि अनर्थाचे कारण व्रत-नियम आहे ज्यांचे ते**(ब.स.)** यद्वा **अशुचिव्रताः** - अशुचीनि श्मशानादिदेशोच्छिष्टत्वाद्यवस्थाद्यशौचसापेक्षाणि वामागमाद्युपदिष्टानि व्रतानि येषां तेऽशुचिव्रताः = वाममार्गीय आगमांच्या द्वारा उपदिष्ट श्मशानादि दूषित देश आणि उच्छिष्टादि अवस्थाजनित अशौच सापेक्ष व्रत आहे ज्यांचे ते अशुचिव्रत**(ब.स.)**

**चिन्तामपरिमेयां च प्रलयान्तामुपाश्रिताः ।**

**कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ॥११॥**

**अन्वयः** - प्रलयान्ताम्, अपरिमेयाम्, चिन्ताम्, उपाश्रिताः, कामोपभोगपरमा, च, एतावद्, इति, निश्चिताः ।

**अन्वयार्थः - प्रलयान्ताम्, अपरिमेयाम्** - आसुरी प्रकृतिचे लोक मरेपर्यंत न संपणाऱ्या अशा **चिन्ताम्** - चिंतेला **उपाश्रिताः** - आश्रय केलेले त्याचप्रमाणे **कामोपभोगपरमाः** - कामाचा-विषयाचा उपभोग घेण्यामध्येच श्रेष्ठ म्हणजे तत्पर असलेले **च** - आणि **एतावद्** - विषयांचा भोग करणे हेच ज्याचे अंतिम साध्य आहे **इति निश्चिताः** - असे दृढ निश्चय केलेले असतात.

**विवरण** - विषयभोगापासून प्राप्त होणाऱ्या सुखाच्या आशेने मरेपर्यंत न संपणाऱ्या असंख्य चिंतेचा आश्रय केलेले आणि विषय भोगामध्येच तत्पर असणारे म्हणजे विषयाचा भोग घेणे हाच एक प्रकारचा पुरुषार्थ आहे असा त्यांचा निश्चय झालेला असतो.

**व्याकरणम् - प्रलयान्ताम्** - प्रलय वि. अन्त वि.स्त्री.द्वि.ए.व. **अपरिमेयाम्** - अ+परिमेय वि.स्त्री.द्वि.ए.व. **चिन्ताम्** - चिन्ता स्त्री.द्वि.ए.व. **उपाश्रिताः** - उप+आ+श्रि प्र.ग.उ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **कामोपभोगपरमाः** - काम पु. उप+भोग पु. परम वि.पु.प्र.ब.व. **च** - च उभ.अ. **एतावद् -** एतद्+परिणामे वतुप्=एतावद् पु.प्र.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **निश्चिताः** - निस्+चि पं.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ब.व.

**समासविग्रहार्थाः - कामोपभोगपरमाः** - काम्यन्त इति कामाः-शब्दादिविषयाः कामानां उपभोगः-प्रीत्या सेवनम्, कामोपभोग एव परमः-निरतिशयः पुरुषार्थो न धर्मादिर्येषां ते कामोपभोगपरमाः = कामना केली जाते असा काम-शब्दादिविषय कामांचा उपभोग असा कामोपभोग, कामोपभोग घेणे हाच परम पुरुषार्थ आहे, धर्मादि नाही ज्यांचा ते**(ष.त.ग.ब.स.) प्रलयान्ताम्** - प्रलय एव मरणमेव अन्तः-पर्यवसनं यस्याः सा प्रलयान्ता तां प्रलयान्ताम् = प्रलयच-मरणच अंत-पर्यवसान जिचा ती तिला**(ब.स.) अपरिमेयाम्** - यस्याः चिन्तायाः इयत्ता-सीमा न परिमातुं शक्यते सा अपरिमेया तां अपरिमेयाम् = ज्या चिंतेची इयत्ता-सीमा निश्चित करता येत नाही-जिचे परिमाणच करता येत नाही अशी ती अपरिमेया त्या अपरिमेय चिंतेला**(न.त.स.) एतावदितिनिश्चिताः** - पुमान् जनित्वा मरणान्तं सम्यग्विषयाननुभुङ्क्त इति यत्त्वेतावदेव पुंजन्मनः फलं देहपातस्यैव मोक्षत्वान्नाऽतः परमं फलमिति निश्चितं सिद्धान्तो येषां ते एतावदिति निश्चिताः = पुरुष उत्पन्न होऊन मरेपर्यंत चांगल्याप्रकारे विषयांना भोगतो केवळ येवढेच पुरुष जन्माचे फल आहे कारण देहपातच मोक्ष आहे त्याहून दुसरे फल नाही असा निश्चित सिद्धांत आहे ज्यांचा ते एतावदिति निश्चित**(ब.स.)**

**आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः ।**

**ईहन्ते कामभोगार्थमन्यायेनार्थसञ्चयान् ॥१२॥**

**अन्वयः** - आशापाशशतैः, बद्धाः, कामक्रोधपरायणाः, कामभोगार्थम्, अन्यायेन, अर्थसञ्चयान्, ईहन्ते ।

**अन्वयार्थः - आशापाशशतैः** - हजारो आशा हेच पाश यांनी **बद्धाः** - बद्ध झालेले **कामक्रोधपरायणाः** - काम आणि क्रोधाचा आश्रय केलेले असे ते लोक **कामभोगार्थम्** - विषयभोगाकरिता **अन्यायेन** - अन्यायाने **अर्थसञ्चयान्** - द्रव्यसंचय करण्याकरिता **ईहन्ते** - इच्छा करतात.

**विवरण** - आशेच्या हजारो अनेक प्रकारच्या पाशांनी बद्ध झालेले, तसेच काम आणि क्रोधांचा आश्रय केलेले असे ते लोक विषयभोगाकरिताच अन्यायपूर्वक धन प्राप्त करण्याची इच्छा करतात.

**व्याकरणम् - आशापाशशतैः** - आशा स्त्री. पाश पु. शत संख्या वा.वि.न.तृ.ब.व. **बद्धाः** - बन्ध् न.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **कामक्रोधपरायणाः** - काम पु. क्रोध पु. परायण वि.पु.प्र.ब.व. **कामभोगार्थम्** - काम पु. भोग पु. अर्थ पु.द्वि.ए.व. **अन्यायेन** - अन्याय वि.पु.तृ.ए.व. **अर्थसञ्चयान्** - अर्थ पु. सम्+चय पु.द्वि.ब.व. **ईहन्ते** - ईह् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - कामभोगार्थम्** - कामानाम्-स्वर्गादिविषयाणां भोगः कामभोगः कामभोगाय अयं कामभोगार्थस्तं कामभोगार्थम् = काम-स्वर्गादि विषय त्यांचा भोग अशा त्या कामभोगाकरिता **(ष.त.ग.च.स.) अर्थसञ्चयान्** - अर्थानाम्-द्रव्याणां संचयाः-राशयो अर्थसञ्चयास्तानर्थसञ्चयान् = अर्थाचे जे संचय ते अर्थसञ्चय त्या अर्थसञ्चयाला**(ष.त.स.) आशापाशशतैः** - आशा एव-सदसत्पदार्थलिप्सा एव बन्धनहेतुत्वात् पाशाः-बन्धनरज्जव इति आशापाशा आशापाशानां शतानि-अनेकानि आशापाशशतानि तैराशापाशशतैः = आशाच-सदसत्पदार्थांची इच्छाच पाश-बंधन रज्जु असा आशापाश त्या हजारो आशापाशाच्या द्वारा बांधलेले**(क.ग.ष.त.स.) कामक्रोधपरायणाः** - कामश्च-विषयाभिलाषश्च, क्रोधश्च-अमर्षश्चेति कामक्रोधौ परमयनमाश्रयो येषां ते कामक्रोधपरायणाः = काम आणि क्रोध हेच परम आश्रय आ-हेत ज्यांचे ते**(द्व.ग.ब.स.) अन्यायेन** - न न्यायेनेत्यन्यायेन = नाही न्यायाने ते अन्यायाने**(न.त.स.)**

आसुरी प्रकृतिने युक्त असणाऱ्यांच्या ममतायुक्त व अहंकारयुक्त अनेक मनोरथांचे वर्णन -

**इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम् ।**

**इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥१३॥**

**अन्वयः** - मया, अद्य, इदम्, लब्धम्, इमम्, मनोरथम्, प्राप्स्ये, मे, इदम्, धनम्, अस्ति, इदम्, अपि, पुनः, भविष्यति ।

**अन्वयार्थः - मया** - माझ्याद्वारा **अद्य इदम्, लब्धम्** - आज हे धन मिळविले प्राप्त केले (उद्या) **इदम्, मनोरथम्, प्राप्स्ये** - (मी माझा) हा मनोरथ प्राप्त करून घेईन **मे, इदम्, धनम्, अस्ति** - माझे हे धन आहे **इदम्, अपि पुनः भविष्यति** - आणखीही हे धन मी मिळवील.

**विवरण** - अहंकारयुक्त आसुरी प्रकृतिचे लोक अनेक प्रकारचे व्यर्थ मनोरथ करीत राहतात आणि म्हणतात की, आज हे धन मी प्राप्त केले याला पुनः मी उद्या प्राप्त करीन हे प्राप्त केलेले धन माझ्या मनाला संतोष देण-ारे आहे आणि धन पुनः भविष्यकाळी उपयोगी पडेल अशा प्रकारे अनेक कल्पना करीत राहतात. त्याच्या त्या कल्पना व्यर्थ असतात. त्या कल्पनापासून एकही मनोरथ सिद्ध होत नाही.

**व्याकरणम् - मया** - अस्मत् सर्व.तृ.ए.व. **अद्यम्** - अद्य अ. **इदम्** - इदम् न.प्र.ए.व. **लब्धम्** - लब्ध प्र.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **इमम्** - इदम् सर्व.पु.द्वि.ए.व. **मनोरथम्** - मनोरथ पु.द्वि.ए.व. **प्राप्स्ये** - प्र+आप् पं.ग.प.प.(आ.प.)द्वि.भवि.प्र.पु.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **इदम्** - इदम् सर्व.न.प्र.ए.व. **धनम्** - धन न.प्र.ए.व. **अस्ति** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **इदम्** - इदम् सर्व.न.प्र.ए.व. **अपि** - अपि अ. **पुनः** - पुनर् अ. **भविष्यति** - भू प्र.ग.प.प.द्वि.भवि.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - मनोरथम्** - मनोरथयति मनोरथस्तं मनोरथम् = मनाला फिरविणारा तो त्याला**(उप.स.)** यद्वा **मनोरथम्** - मन एव रथो मनोरथस्तं मनोरथम् = मनच रथ आहे तो मनोरथ त्याला**(क.स.)** यद्वा

**मनोरथम्** - मनसो रथो मनोरथस्तं मनोरथम् = मनाच्या रथाला**(ष.त.स.)**

**असौ मया हत: शत्रुर्हनिष्ये चापरानपि ।**

**ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी ॥१४॥**

**अन्वय:** - मया, असौ, शत्रु:, हत:, च, अपरान्, अपि, (अहम्), हनिष्ये, अहम्, ईश्वर:, अहम्, भोगी, अहम्, सिद्ध:, बलवान्, सुखी, अहम् ।

**अन्वयार्थ:** - **मया** - माझ्याकडून **असौ** - हा **शत्रु:** - शत्रू **हत:** - मारला गेलेला आहे **च** - आणि **अपरान्, अपि** - दुसऱ्या शत्रुंना सुद्धा **अहम्, हनिष्ये** - मी मारीन **अहम्, ईश्वर:** - मी ईश्वर आहे **अहम्, भोगी** - मी सुख भोगणारा आहे **अहम्, सिद्ध:** - मी सिद्ध आहे **बलवान्, सुखी अहम्** - मी बलवान व सुखी आहे.

**विवरण** - ज्या शत्रुला कोणी शूर वीर पुरुष सुद्धा मारणारा नाही असा दुर्जय शत्रू माझ्याकडून मारला गेला आणि दुसऱ्याही शत्रूंना मी मारणार आहे, या जगतामध्ये माझ्या शिवाय कोणीच ईश्वर नाही केवळ मी ईश्वर आहे आणि ऐश्वर्याचा भोग करणारा सुद्धा मीच आहे, मी सिद्ध आहे मी बलवान आहे आणि सुखी मीच आहे अशा अभिमानी आणि भ्रष्ट चित्त झालेल्या आसुरी प्रकृतियुक्त पुरुषाला जगतामध्ये त्याच्या शिवाय कोणीच श्रेष्ठ दिसत नाही केवळ मीच श्रेष्ठ आहे असे स्वत:लाच मानणारा.

**व्याकरणम् - मया -** अस्मत् सर्व.तृ.ए.व. **असौ** - अदस् सर्व.पु.प्र.ए.व. **शत्रु:** - शत्रु पु.प्र.ए.व. **हत:** - हन् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **हनिष्ये** - हन् द्वि.ग.प.प.(आ.प.)द्वि.भ वि.प्र.पु.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **ईश्वर:** - ईश्वर पु.प्र.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. **भोगी** - भुज् स.ग.प.प.+घञ्=भोग+इनि=भोगिन् पु.प्र.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.पु.प्र.ए.व. **सिद्ध:** - सिद्ध वि.पु.प्र.ए.व. **बलवान्** - बलवत् वि.पु.प्र.ए.व. **सुखी** - सुखिन् वि.पु.प्र.ए.व. **अहम्** - अस्मत् सर्व.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **भोगी** - भोगोऽस्यास्तीति भोगी-भोगवान् = भोग आहे ज्याचा तो**(अस्त्यर्थे तद्धि.वि.)** **बलवान्** - बलमस्य विद्यते बलवान् = बल आहे ज्याचे तो**(अस्त्यर्थे त.वि.)** **सुखी** - सुखमस्यास्तीति सुखी -सुखवान् = सुख आहे ज्याचे तो**(अस्त्यर्थे त.वि.)**

आसुरी प्रकृतिने युक्त असणाऱ्यांना नरकाची प्राप्ती -

**आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया ।**

**यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिता: ॥१५॥**

**अन्वय:** - आढ्य:, अभिजनवान्, अस्मि, मया, सदृश:, अन्य:, क:, अस्ति, (अहम्) यक्ष्ये, दास्यामि, मो दिष्ये, इति, अज्ञान, विमोहिता: ।

**अन्वयार्थ:** - **आढ्य:** - मी मोठा धनवान आहे **अभिजनवान्, अस्मि** - मी कुलीन आहे **मया सदृश:** - माझ्यासारखा **अन्य: क:, अस्ति** - दुसरा कोण आहे? **अहम्, यक्ष्ये** - मी यज्ञ करीन **दास्यामि** - मी दान देईल **मोदिष्ये** - आनंद प्राप्त करीन **इति** - असे या प्रमाणे **अज्ञानविमोहिता:** - अज्ञानाने मोहीत झालेले असतात.

हितम् = प्रिय आणि हितकर**(द्वं.स.) वाङ्मयम्** - वाचां विकार इति वाङ्मयम् = वाचांचा विकार वाङ्मय **(विकारार्थे त.वि.)**

मानसिक तपाचे लक्षण -

**मन:प्रसाद: सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रह: ।**

**भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥१६॥**

**अन्वय:** - मन:प्रसाद:, सौम्यत्वम्, मौनम्, आत्मविनिग्रह:, भावसंशुद्धि:, इति, एतत्, मानसम्, तप:, उच्यते ।

**अन्वयार्थ: - मन:प्रसाद: -** मनाची प्रसन्नता **सौम्यत्वम्** - शांत भाव **मौनम्** - मौन **आत्मविनिग्रह:** - मनाचा निग्रह **भावसंशुद्धि:** - राग-द्वेषरहित अंत:करणाची स्थिति **इति, एतत्** - असे हे **मानसम्, तप:** - मानसिक तप **उच्यते** - म्हटले जाते.

**विवरण** - विषाद, भय, चिंता, शोक, व्याकुलता आणि उद्विग्नता आदि दोषाने रहित अशी अंत:करणाची प्रसन्नता. हिंसा, क्रूरता, निर्दयता आणि तापकारक दोषापासून सर्वथा रहित तसेच शांत आणि शीतलतायुक्त सौम्यत्व. भगवन्नामाच्या अतिरिक्त न बोलण्याविषयी मनाचा संयम मौन. चंचल मनाचा सर्व विषयांपासून निरोध आत्मविनिग्रह. राग, द्वेष, काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, इष्टविरोध आणि अनिष्ट चिंतन या सर्व दुर्भावांचा नाश करुन या विरोधी दया, क्षमा, प्रेम आणि विनयाने युक्त अशा अंत:करणाची स्थिति भावसंशुद्धि, अशा प्रकारच्या भावाने युक्त जे तप असते त्याला मानस तप म्हणतात.(म्हटले जाते).

**व्याकरणम् - मन:प्रसाद: -** मनस् न.ष.ए.व. प्रसाद पु.प्र.ए.व. **सौम्यत्वम्** - सौम्+य+अण्=सौम्यत्व वि.न.प्र.ए.व. **मौनम्** - मुनि+अण्=मौन न.प्र.ए.व. **आत्मविनिग्रह:** - आत्मन् पु. वि+नि+ग्रह पु.प्र.ए.व. **भावसंशुद्धि:** - भाव पु. सम्+शुद्धि स्त्री.प्र.ए.व. **इति -** इति क्रि.वि.अ. **एतत्** - एतत् सर्व.न.प्र.ए.व. **मानसम्** - मनस्+(तस्येदम्)अण्=मानस न.प्र.ए.व. **तप:** - तपस् न.प्र.ए.व. **उच्यते** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - मन:प्रसाद: -** मनस:-अन्त:करणस्य, प्रसाद:-प्रसन्नतेति मन:प्रसाद: = मनाची प्रसन्नता **(ष.त.स.) आत्मविनिग्रह:** - आत्मन:-इन्द्रियसहितस्य मनस:, विनिग्रह:-नियमनं वा विषयेषु प्रवृत्तिनिरोध मित्यात्मविनिग्रह: = इंद्रियांचा निग्रह अथवा विषयामध्ये प्रवृत्तिचा निरोध**(ष.त.स.) भावसंशुद्धि:** - भाव्यते -चिन्त्यतेऽर्थोऽनेनेति भाव:-अन्तकरणं तस्य रागद्वेषादिदोषसंश्लेषाभावापादनमिति भावसंशुद्धि: = अर्थाची ज्याद्वारे भावना केली जाते तो भाव म्हणजे अंत:करण त्यामध्ये रागद्वेषादि दोषांच्या संबंधाचा अभाव करणे भावसंशुद्धि**(ष.त.स.) सौम्यत्वम्** - सोम्यस्य भाव: सौम्यत्वम्-उग्रस्वभावराहित्यम् = सोम्याचा भावही सौम्यत्व आहे**(भावार्थे त.वि.) मौनम्** - मननात् मुनिर्मुनेर्भावो मौनम्-ध्यानपरायणो मुनिस्तद्भाव एव मौनम् -न तु वाङ्मात्रनिरोधोऽन्यथा पश्वादीनामपि तद्वत्तापत्ते: = मननामुळे मुनि आणि मुनिचा भाव मौन. ध्यान परायण ही मुनि आहे. त्याचा भाव ही मौन आहे. वाणीचा संयम मौन नाही अन्यथा पश्वादिकांच्या ठिकाणी मौनाचे लक्षण जाईल म्हणून मनाचा संयम करणेही मौन आहे**(भावार्थे त.वि.)**

सात्त्विक तपाचे लक्षण -

**श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः ।**

**अफलाकाङ्क्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते ॥१७॥**

**अन्वयः** - अफलाकाङ्क्षिभिः, युक्तैः, नरैः, परया, श्रद्धया, तप्तम्, तत्, त्रिविधम्, तपः, सात्त्विकम्, प रिचक्षते ।

**अन्वयार्थः** - **अफलाकाङ्क्षिभिः** - फलाच्या ठिकाणी इच्छा न ठेवणाऱ्या **युक्तैः नरैः** - आत्मनिष्ठ पुरुषाकडून **परया श्रद्धया** - अत्यंत भक्तिभावाने **तप्तम्** - आचरलेले **तत्** - ते **त्रिविधम्, तपः** - तीन प्रकारचे तप **सात्त्विकम्** - सात्त्विक **परिचक्षते** - म्हटले जाते.

**विवरण** - सन्मानपूर्वक तसेच श्रद्धेने युक्त आणि मोठमोठ्या विघ्नांची पर्वा न करता उत्साहपूर्वक तसेच इहलोक आणि परलोकाच्या भोगाविषयी आसक्तिरहित आणि निष्काम भावाने ज्या तपाचे आचरण केले जाते त्या तीन प्रकारच्या तपाला सात्त्विक तप म्हटले जाते.

**व्याकरणम् - अफलाकाङ्क्षिभिः** - अ+फल न.वि. काङ्क्षिन् पु.तृ.ब.व. **युक्तैः** - युज् च.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.पु.तृ.ब.व. **नरैः** - नर पु.तृ.ब.व. **परया** - परा स्त्री.तृ.ए.व. **श्रद्धया** - श्रद्धा स्त्री. तृ.ए.व. **तप्तम्** - तप्+क्त=तप्त प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.द्वि.ए.व. **त्रिविधम्** - त्रि संख्यावाचक वि. विध पु.द्वि.ए.व. **तपः** - तप् प्र.ग.प.प.+असुन्=तपस् न.द्वि.ए.व. **सात्त्विकम्** - सात्त्विक वि.न.द्वि.ए.व. **परिचक्षते** - परि+चक्ष् द्वि.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अफलाकाङ्क्षिभिः** - फलानामाकाङ्क्षा इच्छा येषां ते फलाकाङ्क्षिणः फलाकाङ्क्षिणो न भवन्ति तेऽफलकाङ्क्षिणस्तैरफलाकाङ्क्षिभिः = फलांची आकांक्षा म्हणजे इच्छा आहे ज्यांची ते फलाकांक्षि नाही ज्यांची ते अफलाकांक्षि त्यांच्या कडून**(ष.ब.ग.न.त.स.) त्रिविधम्** - तिस्रो विधाः-प्रकारा यस्य तत् त्रिविधम् = तीन प्रकार आहेत ज्याचे ते**(ष.ब.स.) नरैः** - नृणन्ति-नयन्ति कर्माणि प्रेरयन्ति-प्रापयन्ति कर्मफलमिति वा नरास्तैर्नरैः = नेतात कर्मामध्ये प्रेरित करतात-प्राप्त करून घेतात कर्मफलास असे नर-मनुष्य त्या नरांकडून**(उप.त.स.)**

राजस तपाचे लक्षण -

**सत्कारमानपूजार्थं तपो दम्भेन चैव यत् ।**

**क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ॥१८॥**

**अन्वयः** - यत्, तपः, सत्कारमानपूजार्थम्, च, दम्भेन, एव, क्रियते, तत्, इह, राजसम्, चलम्, अध्रुवम्, प्रोक्तम् ।

**अन्वयार्थः - यत्, तपः** - जे तप **सत्कारमानपूजार्थम्** - आपला लोकांनी सत्कार केला पाहिजे, लोकांमध्ये मान झाला पाहिजे, लोकांनी आपली पूजा केली पाहिजे **च** - आणि **दम्भेन एव** - दम्भाने युक्त होऊनच **क्रियते** - केले जाते **तत्** - ते तप **इह** - या ठिकाणी **राजसम्** - राजस **चलम्** - अनिश्चित आणि **अध्रुवम्** - अस्थिर **प्रोक्तम्** - म्हटले जाते.

**विवरण** - जे तप आपल्या केवल प्रसिद्धिसाठी अथवा आपला जगतामध्ये मान व्हावा अथवा स्वतःला

लोकांनी मोठा तपस्वी मानावे अथवा लोकांनी आदर सत्काराबरोबर आपली पूजा करावी किंवा स्वार्थाकरिता अथवा दम्भाने युक्त होऊनच जे केले जाते ते तप अधिक दिवस टिकणारे नसून अनिश्चित आ णि क्षणिक फलाने युक्त असते त्याला राजस तप म्हटले जाते.

**व्याकरणम् - यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **तपः** - तपस् न.प्र.ए.व. **सत्कारमानपूजार्थम्** - सत्कार वि.पु. मान पु. पूजा स्त्री. अर्थम् अ. **च** - च उभ.अ. **दम्भेन** - दम्भ पु.तृ.ए.व. **एव** - निश्चयार्थक अ. **क्रियते** - कृ अ.ग.उभ.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **इह** - इह क्रि.वि.अ. **राजसम्** - राजस वि.न.प्र.ए.व. **चलम्** - चल वि.न.प्र.ए.व. **अध्रुवम्** - अ+ध्रुव वि.न.प्र.ए.व. **प्रोक्तम्** - प्र+वच् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - सत्कारमानपूजार्थम्** - सत्कारश्च मानश्च पूजा चेति सत्कारमानपूजाः सत्कारमानपूजाभ्य इ ति सत्कारमानपूजार्थम् = सत्कार मान आणि पूजा करिताच**(द्व.ग.च.त.स.) अध्रुवम्** - न ध्रुवमित्यध्रुवम् = जे ध्रुव म्हणजे स्थिर नाही ते अध्रुव**(न.त.स.)**

तामस तपाचे लक्षण -

**मूढग्राहेणात्मनो यत्पीडया क्रियते तपः ।**

**परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ॥१९॥**

**अन्वयः** - यत्, तपः, मूढग्राहेण, आत्मनः, पीडया, वा, परस्य, उत्सादनार्थम्, क्रियते, तत्, तामसम्, उदाहृतम् ।

**अन्वयार्थः - यत्, तपः** - जे तप **मूढग्राहेण** - मूढतापूर्वक **आत्मनः** - स्वतःच्या **पीडया** - पीडेने **वा** - अथवा **परस्य** - दुसऱ्याच्या **उत्सादनार्थम्** - नाशासाठी **क्रियते** - केले जाते **तत्** - ते तप **तामसम्** - तामस तप **उदाहृतम्** - म्हटलेले आहे.

**विवरण** - मूढतापूर्वक मन, वाणी आणि शरीर यांना पीडा देवून त्याचप्रमाणे दुसऱ्याची संपत्ती हस्तगत करून त्यांना नाना प्रकारचे कष्ट देवून ज्या अशास्त्रीय तपाचे आचरण केले जाते त्या तपाला तामस तप म्हटले जाते.

**व्याकरणम् - यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **तपः** - तपस् न.प्र.ए.व. **मूढग्राहेण** - मुह् च.ग.प.प.भावे.भू.धा. वि. ग्राह वि.पु.तृ.ए.व. **आत्मनः** - आत्मन् पु.ष.ए.व. **पीडया** - पीडा स्त्री.तृ.ए.व. **वा** - वा उभ.अ. **परस्य** - पर वि.पु.ष.ए.व. **उत्सादनार्थम्** - उद्+साद्+णिच्+ल्युट्=उत्सादन न. अर्थ पु.प्र.ए.व. **क्रियते** - कृ अ.ग.उ.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **तामसम्** - तामस वि.न.प्र.ए.व. **उदाहृतम्** - उद्+आ+हृ प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - मूढग्राहेण** - मूढानाम्-अविवेकानां ग्राहः-दुराग्रह इति मूढग्राहस्तेन मूढग्राहेन = मूढ लोकांच्या दुराग्रहाद्वारा**(ष.त.स.)** यद्वा **मूढग्राहेन -** अर्थानर्थस्वरूपानभिज्ञो मूढस्तस्य ग्राहस्त्वहमेव बुद्धिमा नित्यभिनिवेशो मूढग्राहस्तेनाऽत्यन्तमूढबुद्ध्या = मूढ म्हणजे अर्थ आणि अनर्थाच्या स्वरूपाला न जाणणारा. त्याचा ग्राह म्हणजे मीच बुद्धिमान आहे असा अभिनिवेश त्याच्याद्वारा म्हणजे अत्यंत मूढबुद्धी पुरुषाच्याद्वारा **(ष.त.स.) उत्सादनार्थम्** - उत्सादनाय-नाशायेत्युत्सादनार्थम् = नाशाकरिता**(च.त.स.)** यद्वा **उत्सादनार्थम् -**

उत्सादनमेवाऽर्थ:-प्रयोजनं यस्य तदुत्सादनार्थम् = नाश करणे प्रयोजन आहे ज्याचे ते**(ब.स.)** **तामसम्** - तमोगुणस्येदं तामसम् = तमोगुण संबंधी**(सम्बन्धी त.वि.)** यद्वा **तामसम्** - तमसा जातं तामसम् = तमोगुणाच्याद्वारा उत्पन्न ते तामस तप**(जातार्थे त.वि.)**

सात्त्विक दानाचे लक्षण -

**दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे ।**

**देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम् ॥२०॥**

**अन्वय:** - यत्, दानम्, दातव्यम्, इति, अनुपकारिणे, देशे, काले, च, पात्रे, दीयते, तत्, दानम्, सात्त्विकम्, स्मृतम् ।

**अन्वयार्थ:** - **यत्** - जे **दानम्** - दान **दातव्यम्, इति** - दान करणे आमचे कर्तव्य आहे अशा बुद्धीने **अनुपका रिणे** - ज्याला दिले त्याच्याकडून पुन्हा उपकाराची अपेक्षा न करता **देशे काले च पात्रे** - योग्य ठिकाण, काल आणि देश या ठिकाणी **दीयते** - दिले जाते **तत्** - ते **दानम्** - दान **सात्त्विकम्** - सात्त्विक **स्मृतम्** - म्हटले जाते.

**विवरण** - अनादररहित दान देणे माझे कर्तव्य आहे अशा भावनेने अथवा उपकाराची अपेक्षा न करता केवळ उपकार करण्याच्या हेतुने अथवा दुष्काळ पडलेल्या देशामध्ये अथवा याशिवाय हरिद्वार, कुरूक्षेत्र, मथुरा, काशी, प्रयाग इत्यादि तीर्थस्थान आणि ग्रहण, पौर्णिमा, आमावशा, संक्रांती, एकादशी आदि पूज्यकाल-प वित्रकाल दु:खी, दरिद्री, भयभीत, अथवा याशिवाय श्रेष्ठाचरणयुक्त विद्वान, ब्राह्मण, ब्रह्मचारी, वानप्रस्थ आ णि संन्यासी आदि सत्पात्राच्या ठिकाणी योग्य विनियोग केला जातो त्या दानाला सात्त्विक दान म्हटले जाते.

**व्याकरणम् - यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **दानम्** - दान न.प्र.ए.व. **दातव्यम्** - दा तृ.ग.उ.प.कर्म.तव्य वि.न.प्र.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **अनुपकारिणे** - अन्+उप+कृ अ.ग.उ.प.+णिनि=अनुपकारिन् वि.पु.च.ए.व. **देशे** - देश पु.स.ए.व. **काले** - काल पु.स.ए.व. **च** - च उभ.अ. **पात्रे** - पात्र न.स.ए.व. **दीयते** - दा तृ.ग.उ.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **दानम्** - दान न.प्र.ए.व. **सात्त्विकम्** - सात्त्विक वि.न.प्र.ए.व. **स्मृतम्** - स्मृ प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **अनुपकारिणे** - नोपकारीत्यनुपकारी तस्मायनुपकारिणे = जो उपकारी नाही तो अनुपकारी त्याच्याकरिता**(न.त.स.)** **दातव्यम्** - दातुं योग्यमिति दातव्यम् = दान करण्याकरिता योग्य**(योग्यार्थे कृदन्त वि.)**

राजस दानाचे लक्षण -

**यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुन: ।**

**दीयते च परिक्लिष्टं तद्दानं राजसं स्मृतम् ॥२१॥**

**अन्वय:** - तु, यत्, प्रत्युपकारार्थम्, वा, पुन:, फलम्, उद्दिश्य, च, परिक्लिष्टम्, दीयते, तत्, राजसम्, दानम्, स्मृतम् ।

**अन्वयार्थ:** - **तु** - परंतु **यत्** - जे दान **प्रत्युपकारार्थम्** - ज्याला दान दिले त्यांनी पुन्हा आपल्यावर उपकार

करावा या हेतुने दिलेले **वा पुन: फलम्, उद्दिश्य** - फलाच्या ठिकाणी दृष्टी ठेवून **च** - आणि **परिक्लिष्टम्** - अतिशय कष्टाने **दीयते** - दिले जाते **तत्** - ते दान **राजसम्, दानम्, स्मृतम्** - राजस दान म्हटले आहे.

**विवरण** - दुसऱ्याने आपल्यावर उपकार करावा या भावनेने अथवा मान, प्रतिष्ठा आणि इहलोक तथा परल-ोकाच्या भोगाची प्राप्ती व्हावी यासाठी अथवा रोगनिवृत्तीसाठी अशाप्रकारे फलाची दृष्टी ठेवून जे दान दिले जाते त्या दानाला राजस दान म्हटले जाते.

**व्याकरणम् - तु** - तु उभ.अ. **यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **प्रत्युपकारार्थम्** - प्रति+उप+कृ अ.ग.उ.प.+घञ्=प्रत्युपकार+अर्थम्=प्रत्युपकारार्थम् पु. अर्थ पु.द्वि.ए.व./अ. **वा** - वा उभ.अ. **पुन:** - पुनर् अ. **च** - च उभ.अ. **परिक्लिष्टम्** - परि+क्लिश् च.ग.आ.प./न.ग.प.प.कर्त.क्त=परिक्लिष्ट वि.न.प्र.ए.व. **दीयते** - दा तृ.ग.उ.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व. **तत् -** तत् सर्व.न.प्र.ए.व. **राजसम्** - राजस वि.न.प्र.ए.व. **दानम्** - दान न.प्र.ए.व. **स्मृतम्** - स्मृत वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **प्रत्युपकारार्थम्** - प्रत्युपकारायेति प्रत्युपकारार्थम् = दुसऱ्यांनी उपकार करावा याकरिता **(च.त.स.)** यद्वा **प्रत्युपकारार्थम्** - प्रत्युपकारोऽर्थ: प्रयोजनं यस्य तत् प्रत्युपकारार्थम् = उपकार करणे हे प्रयोजन आहे ज्याचे ते**(ब.स.) राजसम्** - रजस रजोगुणस्येदं राजसम्। यद्वा रजसा जातमिति राजसम् = राजससंबंधी अथवा रजद्वारा जे ते राजस म्हटले जाते**(सम्बन्धी/जातार्थे त.स.)**

तामस दानाचे लक्षण -

**अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते ।**

**असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम् ॥२२॥**

**अन्वय:** - यत्, दानम्, अदेशकाले, च, अपात्रेभ्य:, असत्कृम्, अवज्ञातम्, दीयते, तत्, तामसम्, उदाहृतम् ।

**अन्वयार्थ:** - **यत्** - जे **दानम्** - दान **अदेशकाले** - योग्य देश न पाहता योग्य काल न पाहता **च** - आणि **अपात्रेभ्य:** - अयोग्य मनुष्यांना **असत्कृतम्** - सत्कार रहित आणि **अवज्ञातम्** - तिरस्कारपूर्वक **दीयते** - दिले जाते **तत्** - ते दान **तामसम्** - तामसदान **उदाहृतम्** - म्हटले जाते.

**विवरण** - दान ग्रहण करणाऱ्या अधिकारी पुरुषाचा आदर, यथायोग्य अभिवादन, कुशल प्रश्न, प्रिय भाषण न करून अथवा क्रोधाने बोलून, तिरस्कार करून, अन्य कोणत्याही प्रकारे वचन आणि शरीर यांच्या द्वारा अपमानित करून अथवा अयोग्य देश, काल आणि पात्र यामध्ये जे दान दिले जाते ते दान तामस दान म्हटले जाते.

**व्याकरणम् - यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **दानम्** - दान न.प्र.ए.व. **अदेशकाले** - अ+देश पु. काल पु.स.ए.व. **च** - च उभ.अ. **अपात्रेभ्य:** - अ+पात्र न.च.ब.व. **असत्कृतम्** - असत् वि. कृ अ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **अवज्ञातम्** - अव+ज्ञा न.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **दीयते** - दा तृ.ग.उ.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **तामसम्** - तामस वि.न.प्र.ए.व. **उदाहृतम्** - उद्+आ+हृ प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अदेशकाले** - देशश्च-शुद्धदेशश्च कालश्च-दानसमयश्च एतयोः समाहार इति देशकालम्, न देशकालमित्यदेशकालं तस्मिनदेशकाले = देश आणि काल या दोन्हीचा समाहार देशकाल नाही देशकाल असा अदेशकाल अशा त्या अदेशकालामध्ये**(समाहार द्वं.स.ग.न.त.स.) अपात्रेभ्यः** - न पात्राणि-न सत्पत्राणीति तेभ्योऽपात्रेभ्यः = नाही जे सत्पात्र त्यांच्याकरिता**(न.त.स.) असत्कृतम्** - सत्कृतं न भवति तदसत्कृतम् = नाही सत्कृत ते असत्कृत**(न.त.स.)**

ॐतत्सत् नामाचे महत्त्व -

**ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ।**

**ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥२३॥**

**अन्वयः** - ॐ तत्सत्, इति, त्रिविधः, ब्रह्मणः, निर्देशः, स्मृतः, तेन, पुरा, ब्राह्मणाः, च, वेदाः, च, यज्ञाः, विहिताः ।

**अन्वयार्थः - ॐ तत्सत्** - ॐ तत् आणि सत् **इति -** असा **त्रिविधः** - तीन प्रकारचा **ब्रह्मणः** - ब्रह्माचा **निर्देशः** - निर्देश **स्मृतः** - सांगितला आहे **तेन** - त्या निर्देशाच्या योगाने **पुरा** - पुर्वी (ब्रह्मदेवाने) **ब्राह्मणाः** - ब्राह्मण **च** - आणि **वेदाः** - वेद **च** - आणि **यज्ञाः -** यज्ञ **विहिताः** - यांची रचना केलेली आहे.

**विवरण** - ज्या ब्रह्मापासून संपूर्ण कर्ता, कर्म, आणि कर्मविधीची उत्पत्ती झाली आहे. त्या ब्रह्माची ॐ, तत् आणि सत्, अशी तीन नावे आहेत म्हणजे असा तीन प्रकारचा निर्देश सांगितला आहे. यज्ञामध्ये अथवा कोणत्याही कार्यामध्ये वैगुण्य प्राप्त झाले असता या तीन नामाचे उच्चारण करण्याने त्या वैगुण्याची अंगासहित पूर्ति होते अशा त्या उपर्युक्त निर्देशानुसार सृष्टीच्या पूर्वी (आरंभी) ब्रह्मदेवाने ब्राह्मण, वेद आणि यज्ञ आदिची रचना केली.

**व्याकरणम् - ॐ** - ॐ अ. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **सत्** - सत् वि.न.प्र.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **त्रिविधः** - त्रि संख्या वा.वि. विध पु.प्र.ए.व. **ब्रह्मणः** - ब्रह्मन् न.ष.ए.व. **निर्देशः** - निर्देश पु.प्र.ए.व. **स्मृतः** - स्मृ प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **तेन** - तत् सर्व.पु.तृ.ए.व. **पुरा** - पुरा अ. **ब्राह्मणाः** - ब्राह्मण पु.प्र.ब.व. **च** - च उभ.अ. **वेदाः** - वेद पु.प्र.ब.व. **च** - च उभ.अ. **यज्ञाः** - यज्ञ पु.प्र.ब.व. **विहिताः** - वि+धा तृ.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ब.व.

**समासविग्रहार्थाः - त्रिविधः** - तिस्रो विधाः प्रकारा यस्य स त्रिविधः-त्रिप्रकारकः = तीन प्रकार अवयव आहेत ज्याचे तो**(ब.स.) ब्राह्मणाः** - ब्रह्मणोऽपत्यानि पुमांस इति ब्राह्मणाः = ब्रह्माचे अपत्य-पुत्र ब्राह्मण **(अपत्यार्थे त.वि.) निर्देशः** - निर्दिश्यते वस्त्वनेनेति निर्देशः = वस्तुचे ज्याच्या द्वारा कथन केले जाते तो निर्देश**(वि.)**

ॐकाराच्या प्रयोगाची व्याख्या -

**तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः ।**

**प्रवर्तन्ते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् ॥२४॥**

**अन्वयः** - तस्मात्, ओम्, इति, उदाहृत्य, ब्रह्मवादिनाम्, विधानोक्ताः, यज्ञदानतपःक्रियाः, सततम्, प्रवर्तन्ते

।

**अन्वयार्थ:** - **तस्मात्** - म्हणून **ओम्, इति, उदाहृत्य** - ओम् अशा अक्षराचे उच्चारण करून **ब्रह्मवादिनाम्** - ब्रह्मवाद्यांच्या(उच्चारण करणाऱ्या पुरुषांच्या) **विधानोक्ता:** - शास्त्रांला अनुसरून होणाऱ्या **यज्ञदानतप: क्रिया:** - यज्ञ, दान, तप या क्रिया **सततम्** - निरंतर **प्रवर्तन्ते** - प्रवृत्त होतात.

**विवरण** - वेदादि म्हणजे यज्ञादि कर्म करणाऱ्या अधिकारी विद्वान ब्राह्मणाच्या यज्ञ, दान, तपादि समस्त शास्त्रविहित क्रिया सर्वदा ओंकारोच्चारणपूर्वकच होतात.

**व्याकरणम्** - **तस्मात्** - तत् सर्व.पं.ए.व./अ. **ओम्** - ओम् अ. **इति** - इति क्रि.वि.अ. **उदाहृत्य** - उद्+आ+हृ प्र.ग.प.प.ल्यबन्त अ. **ब्रह्मवादिनाम्** - ब्रह्मवादिन् वि.पु.ष.ब.व. **विधानोक्ता:** - विधान न. वच् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ब.व. **यज्ञदानतप: क्रिया:** - यज्ञ पु. दान न. तपस् न. क्रिया स्त्री.प्र.ब.व. **सततम्** - सतत क्रि.वि.अ. **प्रवर्तन्ते** - प्र+वृत् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **विधानोक्ता:** - विधानेन-यथाशास्त्रविधिना उक्ता:-उच्चारिता विधानोक्ता:-ओंकाररूपेण सर्वत्र ब्रह्मणो व्याप्तिर्दर्शिता: = शास्त्रविधिच्या द्वारा उच्चारण केलेल्या म्हणजे ॐकाररूपाने सर्व ठिकाणी ब्रह्माची व्याप्ति दर्शविणाऱ्या**(तृ.त.स.)** **ब्रह्मवादिनाम्** - ब्रह्म-वेदान् वदन्ति ते ब्रह्मवादिनस्तेषां ब्रह्मवादिनाम् -वैदिकानाम् = ब्रह्म म्हणजे वेदाला जाणणारे ते ब्रह्मवादी त्यांच्या**(उप.स.)** यद्वा **ब्रह्मवादिनाम्** - ब्रह्म वेदास्तदर्थश्च वदितुं शीलमेषामस्ति ब्रह्मवादिन:-वेदवेदार्थपारगा ब्राह्मणास्तेषां ब्रह्मवादिनाम् = ब्रह्म-वेद त्याच्या अर्थाला कथन करण्याचे शील आहे ज्यांचे ते ब्रह्मवादी-वेद आणि वेदाच्या अर्थाचे पारंगत ब्राह्मण त्या ब्रह्मवादींची**(ष.त.ग.ब.स.)** **यज्ञदानतप:क्रिया:** - यज्ञाश्च-अश्वमेधादयश्च, दानानि च-अन्नदानानि च, तपांसि च कृच्छ्रचान्द्रयणादीनि चेति यज्ञदानतपांसि तान्येव क्रिया इति यज्ञदानतप: क्रिया: = यज्ञ, दान आणि तप यांच्या क्रिया**(द्वं.ग.क.स.)**

तत् शब्दाचे प्रयोगाची व्याख्या -

**तदित्यनभिसन्धाय फलं यज्ञतप:क्रिया: ।**

**दानक्रियाश्च विविधा: क्रियन्ते मोक्षकाङ्क्षिभि: ॥२५॥**

**अन्वय:** - मोक्षकाङ्क्षिभि:, फलम्, अनभिसन्धाय, विविधा:, यज्ञतप:क्रिया:, च, दानक्रिया:, तत्, इति, क्रियन्ते ।

**अन्वयार्थ:** - **मोक्षकाङ्क्षिभि:** - मोक्षाची आकांक्षा करणाऱ्या पुरुषांकडून **फलम्, अनभिसन्धाय** - फलाची अभिलाषा न करता **विविधा:** - अनेक प्रकारच्या **यज्ञतप:क्रिया:** - यज्ञतपरूप क्रिया **च** - आणि **दानक्रिया:** - दान क्रिया **तत्, इति** - तत् अक्षर ब्रह्माचे उच्चारण करून **क्रियन्ते** - केल्या जातात.

**विवरण** - इह लोक आणि परलोकाच्या भोगाविषयीच्या आसक्तीचा त्याग करून तसेच कोणत्याही फलाची इच्छा न ठेवता केवळ मोक्षाची कामना करणाऱ्या पुरुषांकडून तत् या ब्राह्म नामाचे उच्चारण करून नानाप्रकारचे यज्ञतपरूप क्रिया तसेच दानक्रिया केल्या जातात.

**व्याकरणम्** - **मोक्षकाङ्क्षिभि:** - मोक्ष पु. काङ्क्षिन् वि.पु.तृ.ब.व. **फलम्** - फल न.द्वि.ए.व. **अनभिसंधाय**

- अन्+अभि+सम्+धा तृ.ग.उ.प.ल्यबन्त अ. **विविधाः** - वि+विधा स्त्री.प्र.ब.व. **यज्ञतपःक्रियाः** - यज्ञ पु. तपस् न. क्रिया स्त्री.प्र.ब.व. **च** - च उभ.अ. **दानक्रियाः** - दान न. क्रिया स्त्री.प्र.ब.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **क्रियन्ते** - कृ अ.ग.उ.प.कर्म.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः** - **मोक्षकाङ्क्षिभिः** - मोक्षं काङ्क्षन्ति-इच्छन्ति ते मोक्षकाङ्क्षिणस्तैर्मोक्षकाङ्क्षिभिः- मोक्षेच्छुभिः = मोक्षाला इच्छिणारे असे ते त्यांच्याकडून**(उप.स.)** **यज्ञतपःक्रियाः** - यज्ञाश्च तपांसि च यज्ञतपांसि तान्येव क्रिया यज्ञतपःक्रियाः = यज्ञतपःक्रिया**(द्व.ग.क.स.)** **दानक्रियाः** - दानानि चैव क्रिया इति दानक्रियाः = दानरूप क्रिया**(क.स.)** **अनभिसंधाय** - न अभिसंधायेत्यनभिसंधाय = नाही अभिलाषा करून ते**(न.त.स.)**

सत् शब्दाच्या प्रयोगाची व्याख्या -

**सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते ।**

**प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते ॥२६॥**

**अन्वयः** - सद्भावे, च, साधुभावे, सत्, इति, एतत्, प्रयुज्यते, तथा, पार्थ, प्रशस्ते, कर्मणि, सच्छब्दः, युज्यते ।

**अन्वयार्थः** - **सद्भावे** - सत्यभावामध्ये **च** - आणि **साधुभावे** - चांगल्या भावामध्ये **सत्, इति, एतत्, प्रयुज्यते** - सत् असे पद योजिले जाते **तथा** - त्या प्रमाणे **पार्थ** - हे अर्जुना! **प्रशस्ते कर्मणि** - चांगल्या (उत्तम)कर्मामध्ये **सच्छब्दः** - सत् हा शब्द **युज्यते** - योजिला जातो.

**विवरण** - सत्य आणि श्रेष्ठभाव या अर्थामध्ये सत् या पदाचा प्रयोग केला जातो. त्याचप्रमाणे हे अर्जुना! जे शास्त्रविहित करणे योग्य शुभविवाहादि कर्मामध्ये सुद्धा सत् या पदाचा प्रयोग केला जातो.

**व्याकरणम्** - **सद्भावे** - सत् वि. भाव पु.स.ए.व. **च** - च उभ.अ. **साधुभावे** - साधु वि. भाव पु.स.ए.व. **सत्** - सत् वि.पु.प्र.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **एतत्** - एतत् सर्व.न.प्र.ए.व. **प्रयुज्यते** - प्र+युज् स.ग.प.प./द.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व. **तथा** - तथा क्रि.वि.अ./थाल् प्रत्ययान्त तद्धि.अ. **पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **प्रशस्ते** - प्र+शंस् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.स.ए.व. **कर्मणि** - कर्मन् न.स.ए.व. **सत्** - सत् वि.पु.प्र.ए.व. **शब्द** - शब्द पु.प्र.ए.व. **युज्यते** - युज् स.ग.प.प./द.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **सच्छब्दः** - सत् चासौ शब्दश्चेति सच्छब्दः = सत्शब्द**(क.स.)** **सद्भावे** - सतो ब्रह्मणो भावः सद्भावस्तस्मिन् सद्भावे = सताचा म्हणजे ब्रह्माचा भाव सद्भाव त्यामध्ये**(ष.त.स.)** यद्वा **सद्भावे** - विद्यमानस्य वस्तुनोऽस्तित्वं सद्भावस्तस्मिन् सद्भावे = विद्यमान वस्तुचे अस्तित्व सद्भाव त्यामध्ये**(ष.त.स.)** **साधुभावे** - साधोः-सद्वृत्ततायाः भावः साधुभावस्तस्मिन् साधुभावे = साधूचा म्हणजे सद्वृत्ततेचा भाव साधुभाव त्यामध्ये**(ष.त.स.)** यद्वा **साधुभावे** - साधुभावे च असद्वृत्तस्य असाधोः सद्वृत्तता साधुभावस्त स्मिन् साधुभावे = दुराचरण करणाऱ्या असाधुचे जे सद्वर्तन तो साधुभाव त्या साधुभावामध्ये**(ष.त.स.)**

**यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते ।**

**कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥२७॥**

**अन्वय:** - च, यज्ञे, तपसि, च, दाने, (या), स्थिति:, (सा), सत्, इति, उच्यते, तदर्थीयम्, कर्म, सत्, इ ति, एव, अभिधीयते ।

**अन्वयार्थ:** - **च** - आणि **यज्ञे तपसि च दाने** - यज्ञ, तप आणि दान या कर्माच्या ठिकाणी **या स्थिति:** - जी स्थिति आहे (**सा** - ती सुद्धा) **सत्, इति, उच्यते** - सत् या नामाने संबोधित केली जाते **च** - आणि **तदर्थीयम्** - परमात्म्यासाठी जे **कर्म** - कर्म केले जाते (ते सुद्धा) **सत् -** सत् **कर्म, इति, एव** - असेच **अ भिधीयते** - म्हटले जाते.

**विवरण** - यज्ञ, दान आणि तप या कर्माच्या ठिकाणी जी श्रद्धा आणि प्रेमपूर्वक आस्तिक बुद्धी अथवा निष्ठा असते ती सुद्धा सत्नामाने कथन केली जाते आणि परमात्म्याकरिता जे कर्म निश्चयपूर्वक केले जाते ते सुद्धा सत्कर्मच म्हटले जाते.

**व्याकरणम् - च** - च उभ.अ. **यज्ञे** - यज्ञ पु.स.ए.व. **तपसि** - तपस् न.स.ए.व. **च** - च उभ.अ. **दाने** - दान न.स.ए.व. **या** - यत् सर्व.स्त्री.प्र.ए.व. **स्थिति:** - स्थिति स्त्री.प्र.ए.व. **सा** - तत् सर्व.स्त्री.प्र.ए.व. **सत्** - सत् वि.न.प्र.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **उच्यते** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **तदर्थीयम्** - तदर्थीय वि.न.प्र.ए.व. **कर्म** - कर्मन् न.प्र.ए.व. **सत्** - सत् वि.न.प्र.ए.व. **इति** - इति क्रि. वि.अ. **एव** - एव क्रि.वि.अ. **अभिधीयते** - अभि+धा तृ.ग.उभ.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था:** - **तदर्थीयम्** - यस्येदं नामत्रयं स एव परमात्मा एव अर्थफलं यस्य तत्तदर्थम्, तदर्थमेव तदर्थीयम् = ज्याचे हे तीन नाव आहेत तोच परमात्मा आणि परमात्माच अर्थ म्हणजे फल आहे ज्याचे ते **(ब.स.ग.त.वि.)** यद्वा **तदर्थीयम्** - तपदानयज्ञास्तेषामर्थस्तदर्थम्, तदर्थमेव तदर्थीयम् = तप, दान, यज्ञ यांचा अर्थच तदर्थ आहे तदर्थच तदर्थीय**(ष.त.ग.त.वि.)** यद्वा **तदर्थीयम्** - यस्य ब्रह्मणो नामेदं प्रस्तुतं तदेवार्थो विषयो यस्य तत्तदर्थम्-शुद्धब्रह्मज्ञानं तदनुकूलं कर्म तदर्थीयम् = ज्या ब्रह्माचे नाव प्रस्तुत आहे तेच ज्याचा अर्थ या विषय आहे ते तदर्थ-शुद्धब्रह्मज्ञान त्याचे अनुकूल कर्म तदर्थीय**(त.वि.)** यद्वा **तदर्थीयम्** - भगवदर्पणबुद्ध्या क्रियमाणं कर्म तदर्थीयम् = भगवदर्पणबुद्धिने क्रियमाण केलेले कर्म तदर्थीय**(वि.)**

अश्रद्धेने केली जाणारी कर्मे या लोकात आणि परलोकात निष्फल आणि असत् दाखविणे -

**अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ।**

**असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥२८॥**

**अन्वय:** - पार्थ, यत्, अश्रद्धया, हुतम्, दत्तम्, तप:, तप्तम्, च, कृतम्, (तत्), असत्, इति, उच्यते, तत्, न, प्रेत्य, च, नो, इह ।

**अन्वयार्थ: - पार्थ** - हे अर्जुना! **यत्** - जे **अश्रद्धया** - श्रद्धारहित होऊन केलेले **हुतम्** - हवन **दत्तम्** - दिलेले दान तसेच **तप: तप्तम्** - आचरलेले तप **च** - आणि **कृतम्** - केलेले कर्म (**तत्** - ते सर्व) **असत्, इति, उच्यते** - असत असे म्हटले जाते **तत्** - ते कर्म **न प्रेत्य** - मरणानंतर परलोकामध्ये त्याचा उपयोग होत नाही **च** - आणि **नो इह** - या लोकांमध्येसुद्धा ते लाभदायक होत नाही.

**विवरण** - हे अर्जुना! श्रद्धेशिवाय केलेले हवन, दिलेले दान, केलेले तप आणि जेवढे काही शुभ कर्म केले जाते ते सर्व असतच म्हटले जाते. असे जे श्रद्धारहित केलेले कर्म ना इहलोकामध्ये लाभकारक होत ना

मरणानंतर परलोकामध्ये फलप्रद होत.

**व्याकरणम् - पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **अश्रद्धया** - अ+ श्रद्धा स्त्री.तृ.ए.व. **हुतम्** - हु तृ.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **दत्तम्** - दा प्र.ग.प.प./तृ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **तप:** - तपस् न.प्र.ए.व. **तप्तम्** - तप् द.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **कृतम्** - कृ अ.ग.उभ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **असत्** - असत् वि.पु.प्र.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **उच्यते** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **प्रेत्य** - प्र+इ द्वि.ग.प.प.ल्यबन्त प्रेत्य अ. **च** - च उभ.अ. **नो** - अ. **इह** - इह अ.

**समासविग्रहार्था: - अश्रद्धया** - न श्रद्धा इति अश्रद्धा तया अश्रद्धया-आस्तिक्यबुद्धिराहित्येन = नाही श्रद्धा ती अश्रद्धा तिच्या द्वारा**(न.त.स.) असत्** - न सदित्यसत् = नाही सत् ते असत्**(न.त.स.)**

**ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे**

**श्रीकृष्णार्जुनसंवादे श्रद्धात्रयविभागयोगो नाम सप्तदशोऽध्याय: ॥१७॥**

**-: अध्याय सतरावा समाप्त :-**

**ॐ श्रीपरमात्मने नमः**

**अथाष्टादशोऽध्यायः**

संन्यास आणि त्यागाचे तत्त्व जाणण्याकरिता अर्जुनाची इच्छा -

**अर्जुन उवाच** - अर्जुन म्हणाला.

**सन्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम् ।**

**त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन ॥१॥**

**अन्वयः** - महाबाहो, हृषीकेश, केशिनिषूदन, सन्यासस्य, च, त्यागस्य, तत्त्वम्, पृथक्, वेदितुम्, इच्छामि ।

**अन्वयार्थः** - **महाबाहो**- हे महाबाहो! **हृषीकेश** - हे हृषीकेश! **केशिनिषूदन** - हे केशिनामक दैत्याला ठार करणाऱ्या श्रीकृष्णा! **सन्यासस्य** - संन्यास या शब्दाच्या अर्थाचे तत्त्व **च** - आणि **त्यागस्य** - त्याग या शब्दाच्या अर्थाचे **तत्त्वम्** - तत्त्व **पृथक्** - वेगवेगळे **वेदितुम्** - जाणण्याकरिता **इच्छामि** - मी इच्छा करतो.

**विवरण** - अर्जुन म्हणाला की, हे श्रीकृष्णा! मी संन्यास आणि त्यागाचे तत्त्व भिन्न-भिन्नरूपाने जाणण्याकरिता इच्छा करतो. कारण, या पूर्वी अनेक ठिकाणी संन्यास आणि त्यागाचे वर्णन आपल्या द्वारा प्रतिपादन केले गेले आहे. परंतु संन्यासाचे स्वरूप काय? त्यामध्ये कोणते भाव आणि कर्म सहायक होतात आणि कोण कोणते बाधक होतात? त्याचप्रमाणे त्यागाचे स्वरूप काय? त्यामध्ये काय साधक होतात आणि काय बाधक होतात? हे मला यथार्थरूपाने कळत नसल्यामुळे पुनरपि मी वेगवेगळ्या रूपाने जाणण्याची इच्छा करतो.

**व्याकरणम्** - **महाबाहो** - महाबाहु पु.संबो.ए.व. **हृषीकेश** - हृषीकेश पु.संबो.ए.व. **केशिनिषूदन** - केशिनिषूदन पु.संबो.ए.व. **सन्यासस्य** - सन्यास पु.ष.ए.व. **च** - च उभ.अ. **त्यागस्य** - त्याग पु.ष.ए.व. **तत्त्वम्** - तत्त्व न.द्वि.ए.व. **पृथक्** - पृथक् अ. **वेदितुम्** - विद् द्वि.ग.प.प.तुमन्त अ. **इच्छामि** - इषु ष.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **केशिनिषूदन** - केशिम्-केशिनामानं दैत्यम्, निषूदयति-नाशयतीति केशिनिषूदनस्तत्सम्बुद्धौ हे केशिनिषूदन = केशिनामक दैत्याला मारणारा हे केशिनिषूदन**(उप.स.)** **महाबाहो**- महान्तौ-श्रेष्ठौ बाहू-हस्तौ यस्य स महाबाहुस्तत्सम्बुद्धौ हे महाबाहो = मोठे बाहु म्हणजे हात आहेत ज्याचे तो**(ब.स.)**

त्यागाच्या विषयामध्ये दुसऱ्या चार सिद्धांताचे कथन -

**श्रीभगवानुवाच** - श्री भगवान म्हणाले

**काम्यानां कर्मणां न्यासं सन्यासं कवयो विदुः ।**

**सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥२॥**

**अन्वयः** - कवयः, काम्यानाम्, कर्मणाम्, न्यासम्, सन्यासम्, विदुः, विचक्षणाः, सर्वकर्मफलत्यागम्, प्राहुः ।

**अन्वयार्थ: - कवय: -** काही विद्वानलोक **काम्यानाम्, कर्मणाम् -** काम्यकर्माच्या **न्यासम् -** त्यागाला **सन्न्यासम् -** संन्यास **विदु: -** जाणतात **विचक्षणा: -** दुसरेकाही विचारकुशल पण्डित लोक **सर्वकर्मफलत्यागम् -** सर्वकर्मफलाच्या त्यागालाच **त्यागम् -** त्याग असे **प्राहु: -** कथन करतात.(म्हणतात.)

**विवरण -** या लोकांमध्ये स्त्री, धन, पुत्रादि भोगाच्या इच्छेने शास्त्रविहित काम्य कर्म केली जातात. त्याचप्रमाणे परलोकामध्ये स्वर्गादि प्राप्तिच्या इच्छेने शास्त्रविहित काम्यकर्म केले जाते. अशा ज्या उपर्युक्त प्रतिपादित काम्यकर्माच्या त्यागालाच काही विद्वान लोक संन्यास समजतात. वर्णाश्रमानुसार शास्त्रविहित ईश्वराची भक्ति, देवतांचे पूजन, मातापिता आणि गुरूजन यांची सेवा, यज्ञ, दान आणि तप तसेच नित्यनैमित्तिकादि जेवढे कर्तव्य कर्म आहेत ते जर नाही केले तर अनादिकालापासून आलेली परंपरा विस्कळीत होते आणि त्यांचे अनुष्ठान केले तर इहलोक आणि परलोकांच्या भोगाची प्राप्ति होते. अशा ज्या उपर्युक्त कथित सर्वकर्मफलाच्या त्यागाला दुसरे विचारकुशल पुरुष त्याग म्हणतात.

**व्याकरणम् - कवय: -** कवि वि.पु.प्र.ब.व. **काम्यानाम् -** कम् प्र.ग.आ.प.+णिङ्+यत्=काम्य वि.न.ष.ब.व. **कर्मणाम् -** कर्मन् न.ष.ब.व. **न्यासम् -** न्यास पु.द्वि.ए.व. **सन्न्यासम् -** सन्न्यास पु.द्वि.ए.व. **विदु: -** विद् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **विचक्षणा: -** विचक्षण वि.पु.प्र.ब.व. **सर्वकर्मफलत्यागम् -** सर्व वि. कर्म न. फल न. त्याग पु.द्वि.ए.व. **प्राहु: -** प्र+ब्रू द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्था: - सर्वकर्मफलत्यागम् -** सर्वाणि-समस्तानि च तानि कर्माणि च सर्वकर्माणि, सर्वकर्मणां फलानि सर्वकर्मफलानि, सर्वकर्मफलानां त्याग: सर्वकर्मफलत्यागस्तं सर्वकर्मफलत्यागम् = सर्वकर्मांच्या फलाच्या त्यागाला**(क.ग.ष.ग.ष.त.स.)**

**त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिण: ।**

**यज्ञदानतप:कर्म न त्याज्यमिति चापरे ॥३॥**

**अन्वय: -** एके, मनीषिण:, दोषवत्, कर्म, त्याज्यम्, इति, प्राहु:, च, अपरे, यज्ञदानतप:कर्म, न, त्याज्यम्, इति, (प्राहु) ।

**अन्वयार्थ: - एके मनीषिण: -** कित्येक पण्डित लोक **दोषवत्, कर्म -** दोषयुक्त कर्म **त्याज्यम् -** त्याग करणे योग्य आहे **इति प्राहु: -** असे म्हणतात **च: -** आणि **अपरे -** दुसरे पंडित लोक **यज्ञदानतप:कर्म -** यज्ञ, दान आणि तपरूप कर्म हे **न त्याज्यम् -** त्याग करणे योग्य नाही **इति -** असे **(प्राहु:)** - कथन करतात.

**विवरण -** कित्येक विद्वान लोक म्हणतात की, दोषयुक्त असलेल्या कर्माचा त्याग करणे आवश्यक आहे. कारण की, आरंभ केलेल्या कर्माच्या ठिकाणी थोडा फार तरी पापाचा संबंध असतोच म्हणजे विहित कर्मे सुद्धा सर्वथा निर्दोष रहात नाहीत कारण अठराव्या अध्यायामध्ये म्हटले आहे की, 'सर्वारम्भा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृता:' जसा अग्नि धूमाच्या द्वारा आवृत्त असतो त्याचप्रमाणे सर्वकर्म दोषाच्या द्वारा आवृत्त असतात म्हणून दोषाने युक्त असलेल्या सर्व कर्माचा त्याग करणे आवश्यक आहे. दुसरे काही पंडित लोक म्हणतात की यज्ञ, दान आणि तप इ. कर्माचा त्याग करणे योग्य नाही.

**व्याकरणम् - एके -** एक सर्व.पु.प्र.ब.व. **मनीषिण: -** मनीषिन् वि.पु.प्र.ब.व. **दोषवत् -** दोषवत् न.प्र.ए.व. **कर्म -** कर्मन् न.प्र.ए.व. **त्याज्यम् -** त्यज् प्र.ग.प.प.कर्म.ण्यत् वि.न.प्र.ए.व. **इति -** इति क्रि.वि.अ. **प्राहु:**

**-** प्र+ब्रू द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व. **च** - च उभ.अ. **अपरे** - अपर सर्व.पु.प्र.ब.व. **यज्ञदानतपःकर्म** - यज्ञ पु. दान न. तपस् न.कर्मन् न.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **त्याज्यम्** - त्याज् प्र.ग.प.प.कर्म.ण्यत् वि.न.प्र.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **प्राहुः** - प्र+ब्रू द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ब.व.

**समासविग्रहार्थाः - यज्ञदानतपःकर्म** - यज्ञश्च दानश्च तपश्चेति यज्ञदानतपांसि तान्येवेति कर्म यज्ञदानतपःकर्म = यज्ञ, दान आणि तपरूप कर्म**(द्व.ग.क.स.) मनीषिणः** - मनीषा-सूक्ष्माबुद्धिरस्ति येषां ते मनीषिणः = सूक्ष्म बुद्धी आहे ज्यांची ते**(अस्त्यर्थे त.वि.) त्याज्यम्** - त्यक्तुम् परित्यक्तुं योग्यमिति त्याज्यम् = त्याग करण्याकरिता योग्य ते त्याज्य**(कृ.वि.)**

त्यागाच्या विषयामध्ये आपला निश्चय सांगण्याकरिता भगवंताचे कथन -

**निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम ।**

**त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः सम्प्रकीर्तितः ॥४॥**

**अन्वयः** - भरतसत्तम, तत्र, त्यागे, मे, निश्चयम्, शृणु, हि, पुरुषव्याघ्र, त्यागः, त्रिविधः, सम्प्रकीर्तितः ।

**अन्वयार्थः - भरतसत्तम** - हे अर्जुना! **तत्र त्यागे** - त्या त्यागाविषयी **मे निश्चयम्** - माझा निर्णय **शृणु** - श्रवण कर **हि** - कारण **पुरुषव्याघ्र** - हे पुरुषश्रेष्ठ अर्जुना! **त्यागः** - त्याग **त्रिविधः** - सात्त्विक राजस आणि तामस असा तीन प्रकारचा **सम्प्रकीर्तितः** - प्रतिपादन केलेला आहे.

**विवरण** - हे अर्जुना! उपर्युक्त प्रतिपादित संन्यास आणि त्याग यामधून पहिला त्यागाविषयी माझा निर्णय श्रवण कर. कारण की, त्यागच सात्त्विक, राजस आणि तामस असा तीन प्रकाराचा सांगितलेला आहे.

**व्याकरणम् - पुरुषव्याघ्र** - पुरुष पु. व्याघ्र पु.संबो.ए.व. **तत्र** - त्रल् प्रत्ययान्त सप्तम्यन्त तद्धित अ. **त्यागे** - त्याग पु.स.ए.व. **मे** - अस्मत् सर्व पु.ष.ए.व. **निश्चयम्** - निश्चय पु.द्वि.ए.व. **शृणु** - श्रु प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **हि** - हि क्रि.वि.अ. **भरतसत्तम** - भरत पु. सत्तम वि.पु.संबो.ए.व. **त्यागः** - त्याग पु.प्र.ए.व. **त्रिविधः** - त्रि संख्या वा.वि. विध पु.प्र.ए.व. **सम्प्रकीर्तितः** - सम्+प्र+कृ(कीर्त) ष.ग.प.प.कर्म.भू.धा. वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - भरतसत्तम** - भरतेषु भरतवंशेषु सत्तमः श्रेष्ठ इति भरतसत्तमस्तत्सम्बुद्धौ हे भरतसत्तम = भरतवंशामध्ये श्रेष्ठ**(सप्त.त.स.) पुरुषव्याघ्र** - पुरुषेषु-नरेषु व्याघ्रः-श्रेष्ठ इति पुरुषव्याघ्रस्तत्सम्बुद्धौ हे पुरुषव्याघ्र = नरश्रेष्ठ पुरुषांमध्ये श्रेष्ठ**(सप्त.त.स.) तत्र** - तस्मिन्निति तत्र = त्यामध्ये**(त.वि.)**

यज्ञ दान आणि तपरूप कर्माच्या त्यागाचा निषेध -

**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ।**

**यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥५॥**

**अन्वयः** - यज्ञदानतपःकर्म, न, त्याज्यम्, तत्, कार्यम्, एव, यज्ञः, दानम्, च, तपः, एव, मनीषिणाम्, पावनानि ।

**अन्वयार्थः - यज्ञदानतपः कर्म** - यज्ञ दान आणि तपरूप कर्म **न त्याज्यम्** - त्याग करणे योग्य नाही **तत्,**

**कार्यम्, एव** - ते कर्म अवश्य करणेच योग्य आहे **यज्ञ: दानम्, च तप:, एव** - यज्ञ दान आणि तपच (फलेच्छा टाकून केले म्हणजे) **मनीषिणाम्, पावनानि** - विद्वान लोकांना पावन करणारी होतात म्हणजे चित्तशुद्धिकरिता कारण होतात.

**विवरण** - शास्त्राने विधान केलेल्या यज्ञ, दान आणि तपरूप अवश्य कर्तव्य कर्माचा त्याग करणे योग्य नाही असे जे उपर्युक्त प्रतिपादित अवश्य कर्तव्य कर्म मनुष्याला कोणत्याही परिस्थितिमध्ये करायलाच पाहिजे कारण यज्ञ, दान आणि तपरूप कर्मे फलेच्छा टाकून करणाऱ्या बुद्धिमान पुरुषाला पवित्र करणारी होतात म्हणजे ती अंत:करणशुद्धिकरिता कारण होतात.

**व्याकरणम् - यज्ञदानतप:कर्म** - यज्ञ पु. दान न. तपस् न. कर्मन् न.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **त्याज्यम्** - त्यज् प्र.ग.प.प.कर्म.ण्यत् वि.प्र.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **कार्यम्** - कृ अ.ग.उभ.प.कर्म.ण्यत् वि.न.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **यज्ञ:** - यज्ञ पु.प्र.ए.व. **दानम्** - दान न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **तप:** - तपस् न.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **मनीषिणाम्** - मनीषिन् वि.पु.ष.ब.व. **पावनानि** - पू न.ग.उ.प.+ णिच्+ल्युट्=पावन वि.न.प्र.ब.व.

**समासविग्रहार्था: - मनीषिणाम्** - मनीषा-सुक्ष्मबुद्धिरस्ति येषां ते मनीषिणस्तेषां मनीषिणाम्-मुमुक्षूणाम् = सूक्ष्मबुद्धी आहे ज्यांची ते त्यांच्या**(अस्त्यर्थे त.वि.)** यद्वा **मनीषिणाम्** - प्रकृतिविकृति विलक्षणमात्मानमसङ्गचिद्रूपं मन्तुं शीलम्-स्वभावो येषामस्ति ते मनीषिणस्तेषां मनीषिणाम् = प्रकृति आणि विकृति पासून विलक्षण असंग चिद्रूप आत्म्याचे मनन करण्याचे शील-स्वभाव ज्यांचे ते मनीषी त्यांना **(शीलार्थे ब.स.) पावनानि** - पावयन्ति तानि पावनानि-चित्तशुद्धिकराणि = पावन करणारी ती पावनानि **(वि.)**

भगवंताचे त्यागाच्या विषयामध्ये आपले निश्चित मत दाखविणे -

**एतान्यपि तु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा फलानि च ।**

**कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥६॥**

**अन्वय:** - तु, पार्थ, एतानि, कर्माणि, अपि, सङ्गम्, च, फलानि, त्यक्त्वा, कर्तव्यानि, इति, मे, निश्चितम्, उत्तमम्, मतम् ।

**अन्वयार्थ: - तु** - परंतु **पार्थ** - हे पृथापुत्र अर्जुना! **एतानि, अपि कर्माणि** - ही यज्ञ, दान व तपरूप कर्मे देखील **सङ्गम्, च फलानि त्यक्त्वा** - आसक्ति व फलेच्छा सोडून **कर्तव्यानि** - केली पाहीजेत **इति** - असे **मे** - माझे **निश्चितम्, उत्तमम्, मतम्** - निश्चित उत्तम मत आहे.

**विवरण** - शास्त्रामध्ये जेवढी काही वर्ण आणि आश्रमानुसार कर्तव्य कर्मे सांगितली आहेत त्या सर्व कर्माचे अनुष्ठान म्हणजे आचरण करीत असतांना लोक आणि परलोक यांच्या भोगरूप फलामध्ये असणाऱ्या आस क्ति आणि कामनांचा तसेच काम्य कर्म आणि निषिद्ध कर्मांचा सर्वथा त्याग करून मुमुक्षु पुरुषाने शास्त्रवि हित कर्तव्य कर्मांचे आचरण करीत रहावे असे माझे निश्चित मत आहे.(असे भगवान म्हणतात)

**व्याकरणम् - तु** - तु उभ.अ. **पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **एतानि** - एतत् सर्व.न.प्र.ब.व. **कर्माणि** - कर्मन् न.प्र.ब.व. **अपि** - अपि अ. **सङ्गम्** - सङ्ग पु.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **फलानि** - फल न.द्वि.ब.व. **त्यक्त्वा**

- त्यज् प्र.ग.प.प.त्वान्त अ. **कर्तव्यानि** - कृ अ.ग.उ.प.कर्म.तव्यत् वि.न.प्र.ब.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **निश्चितम्** - निस्+चि पं.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **उत्तमम्** - उत्तम वि.न.प्र.ए.व. **मतम्** - मन् च.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - उत्तमम्** - उद्गतं तम:-तमोगुणो यस्मात्तदुत्तमम्-सात्त्विकम् = गेला तम-तमोगुण ज्यातून ते उत्तम-सात्त्विक**(पं.ब.स.) कर्तव्यानि** - कर्तुं योग्यमिति कर्तव्यं तानि कर्तव्यानि = करण्याकरिता योग्य अशी जी कर्मे**(वि.) सङ्गम्** - सज्जतेऽनेनेति सङ्ग:-कामस्तं सङ्गम् = ज्याच्याद्वारा पुरुष आसक्त होतो तो सङ्ग-काम याला**(वि.)**

तामस त्यागाचे लक्षण -

**नियतस्य तु सन्न्यास: कर्मणो नोपपद्यते।**

**मोहात्तस्य परित्यागस्तामस: परिकीर्तित: ॥७॥**

**अन्वय:** - तु, नियतस्य, कर्मण:, सन्न्यास:, न, उपपद्यते, तस्य, मोहात्, परित्याग:, तामस:, परिकीर्तित:।

**अन्वयार्थ: - तु** - परंतु **नियतस्य कर्मण:** - विहित कर्माचा **सन्न्यास:** - त्याग **न उपपद्यते** - प्राप्त होत नाही **तस्य** - त्या विहित कर्माच्या **मोहात्** - मोहापासून अथवा अज्ञानामुळे होणारा **परित्याग:** - त्याग **तामस: परिकीर्तित:** - तामस म्हटलेला आहे.

**विवरण** - शास्त्रामध्ये ज्या पुरुषाला जी कर्मे नियत म्हणून अनुष्ठान करण्याकरिता सांगितलेली आहेत अशा त्या शास्त्र विहित कर्माचा त्याग केव्हाही प्राप्त होत नाही जरी मोहामुळे त्या विहित कर्माचा त्याग केला तरी त्या त्यागाला तामस त्याग म्हटलेले आहे.

**व्याकरणम् - तु** - तु उभ.अ. **नियतस्य** - नि+यम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.ष.ए.व. **कर्मण:** - कर्मन् न.ष.ए.व. **सन्न्यास:** - सन्न्यास पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **उपद्यते** - उप+पद् च.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व. **तस्य** - तत् सर्व.ष.ए.व. **मोहात्** - मोह पु.पं.ए.व. **परित्याग:** - परि+त्याग पु.प्र.ए.व. **तामस:-** तामस वि.पु.प्र.ए.व. **परिकीर्तित:** - परि+कृ(कीर्त)ष.ग.प.प.कर्म.भू.धा. वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - सन्न्यास:** - सम्यक् न्यास:-त्याग इति सन्न्यास: = चांगल्या प्रकारे न्यास म्हणजे त्यागच संन्यास आहे**(वि.) तामस:** - तमसोऽयं तामस:, यद्वा तमसा जात इति तामस: = संबंधी अथवा तमद्वारा उत्पन्न तामस**(वि.)**

राजस त्यागाचे लक्षण -

**दु:खमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत्।**

**स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत् ॥८॥**

**अन्वय:** - यत्, कर्म, दु:खम्, इति, एव, कायक्लेशभयात्, त्यजेत्, स:, राजसम्, त्यागम्, कृत्वा, त्यागफलम्, न, एव, लभेत्।

**अन्वयार्थ: - यत्, कर्म -** जे कर्म **दु:खम् -** दु:खरूप आहे **इति, एव -** असे जाणून **कायक्लेशभयात् -** शरीर क्लेशाच्या म्हणजे त्रासाच्या भीतिने **त्यजेत् -** त्याग करतो **स: -** तो पुरुष **राजसम्, त्यागम्, कृत्वा -** राजस त्याग करून **त्यागफलम् -** त्यागाच्या फलाला **न, एव लभेत् -** प्राप्त होत नाही.

**विवरण -** कर्माचे अनुष्ठान करीत असतांना व्रत, उपवास आदिच्याद्वारा मन, इंद्रिय आणि शरीराला अनेक कष्ट तसेच त्यामध्ये अनेक प्रकारचे विघ्न उत्पन्न होतात म्हणून मन, इंद्रिय आणि शरीर दु:खाच्या तसेच विघ्नाच्या भीतिने संपूर्ण कर्मांना दु:खरूप समजून जो पुरुष यज्ञ, दान, तप आदि शास्त्रविहित कर्माचा त्याग करतो त्या त्यागाला राजस त्याग म्हटले आहे अशा प्रकारे कर्मफलाच्या त्यागापासून होणारा जो मोक्ष त्याला तो पुरुष प्राप्त होत नाही.

**व्यारकणम् - यत् -** यत् सर्व.न.प्र.ए.व. **कर्म -** कर्मन् न.प्र.ए.व. **दु:खम् -** दु:ख न.प्र.ए.व. **इति -** इति क्रि.वि.अ. **एव -** एव अ. **कायक्लेशभयात् -** काय वि. क्लेश पु. भय न.पं.ए.व. **त्यजेत् -** त्यज् प्र.ग.प.प. विध्यर्थ तृ.पु.ए.व. **स: -** तत् सर्व.पु.प्र.ए.व. **राजसम् -** राजस वि.पु.द्वि.ए.व. **त्यागम् -** त्याग पु.द्वि.ए.व. **कृत्वा -** कृ अ.ग.उ.प.त्वान्त अ. **त्यागफलम् -** त्याग पु. फल न.द्वि.ए.व. **न -** न क्रि.वि.अ. **एव -** एव क्रि.वि.अ. **लभेत् -** लभ् प्र.ग.आ.प./प.प.विध्यर्थ तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - कायक्लेशभयात् -** कायस्य शरीरस्य क्लेश: कायक्लेश: कायक्लेशात् भयम्-भीति: कायक्लेशभयं तस्मात् कायक्लेशभयात् = शरीराच्या क्लेशापासून भय, त्या भयापासून अथवा भयामुळे **(ष.त.ग.पं.त.स.) त्यागफलम् -** त्यागस्य फलं त्यागफलम् = त्यागाच्या फलाला**(ष.त.स.)**

सात्त्विक त्यागाचे लक्षण -

**कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन ।**

**सङ्गं त्यक्त्वा फलं चैव स त्याग: सात्त्विको मत: ॥९॥**

**अन्वय: -** अर्जुन, कार्यम्, इति, एव, यत्, नियतम्, कार्यम्, सङ्गम्, च, फलम्, त्यक्त्वा, एव, क्रियते, स:, त्याग:, सात्त्विक:, मत: ।

**अन्वयार्थ: - अर्जुन -** हे अर्जुना! **कार्यम्, इति, एव -** शास्त्रविहित कर्म केलेच पाहिजे असे समजून **यत् नियतम्, कर्म -** जे नित्य कर्म **सङ्गम्, च फलम्, त्यक्त्वा, एव -** आसक्ति आणि फलाकांक्षा सोडून **क्रियते -** केले जाते **स: -** तो **त्याग: -** त्याग **सात्त्विक: -** सात्त्विक **मत: -** म्हटला गेला आहे.(मानला गेला आहे.)

**विवरण -** शास्त्रविहित जे अवश्य कर्तव्य नित्य नैमित्तिकादि कर्म आहेत त्या सर्व कर्मांचा स्वरूपाने त्याग न करता म्हणजे त्या कर्मांचे अनुष्ठान केलेच पाहिजे असे समजून या लोकाच्या आणि परलोकाच्या भोगामध्ये असणाऱ्या आसक्ति, ममता, आणि कामनांचा सर्वथा त्याग करून उत्साहपूर्वक कर्म केले जाते अशा प्रकारचा जो त्याग त्या त्यागाला सात्त्विक त्याग म्हटले गेले आहे.

**व्याकरणम् - अर्जुन -** अर्जुन पु.संबो.ए.व. **कार्यम् -** कृ अ.ग.उ.प.कर्म.ण्यत् वि.न.प्र.ए.व. **इति -** इति क्रि.वि.अ. **एव -** एव क्रि.वि.अ. **यत् -** यत् सर्व.न.प्र.ए.व. **नियतम् -** नि+यम् प्र.ग.प.प.भावे.भू.धा. वि.न.प्र.ए.व. **कर्म -** कर्मन् न.प्र.ए.व. **सङ्गम् -** सङ्ग पु.द्वि.ए.व. **च -** च उभ.अ. **फलम् -** फल न.द्वि.ए.व. **त्यक्त्वा -** त्यज् प्र.ग.प.प.त्वान्त अ. **एव -** एव क्रि.वि.अ. **क्रियते -** कृ अ.ग.उ.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व.

**त्यागः -** त्याग पु.प्र.ए.व. **सात्त्विकः -** सात्त्विक वि.पु.प्र.ए.व. **मतः -** मन् च.ग.आ.प.कर्म.भू.धा. वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - कार्यम् -** कर्तुं योग्यमिति कार्यम्-वर्णाश्रमप्राप्तम् = करण्याकरिता योग्य ते कार्य**(योग्यार्थे कृदन्त वि.)**

सात्त्विक त्यागाच्या लक्षणाचे वर्णन -

**न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते ।**

**त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः ॥१०॥**

**अन्वयः -** यः, अकुशलम्, कर्म, न, द्वेष्टि, कुशले, न, अनुषज्जते, त्यागी, सत्त्वसमाविष्टः, मेधावी, छिन्नसंशयः, (भवति) ।

**अन्वयार्थः - यः -** जो पुरुष **अकुशलम्, कर्म -** जन्म मृत्युला कारण होणाऱ्या अशुभ कर्माविषयी **न द्वेष्टि -** द्वेष करीत नाही **कुशले न अनुषज्जते -** चित्तशुद्धीद्वारा मोक्षाला कारण होणाऱ्या शुभ कर्माविषयी आसक्त होत नाही (असा तो) **त्यागी -** त्यागी **सत्त्वसमाविष्टः -** सत्त्वगुणाने युक्त **मेधावी -** बुद्धिमान **छिन्नसंशयः -** ज्याचे सर्वसंशय नष्ट झाले आहेत असा(**भवति** - होतो.)

**विवरण -** पापकर्मे नानाप्रकारच्या नरकामध्ये टाकणारी तसेच काम्य कर्मे पुनर्जन्माला देणारी असतात असे समजून जो पुरुष अकुशल कर्माविषयी द्वेष करीत नाही आणि शास्त्रविहित जे कर्तव्य यज्ञ, दान, तप आणि नित्यनैमित्तिकादि कर्मे आहेत त्यांचे जर निष्कामभावाने चांगल्या प्रकारे अनुष्ठान केले तर ते पूर्वकृत संचित पापापासून तसेच कर्मबंधनापासून सर्वथा मुक्त करून परंपरेने मोक्षाला प्राप्त करण्याकरिता कारणीभूत होतात. अशा त्या परंपरेने मोक्षाला कारणीभूत होणाऱ्या शुभकर्माविषयी तो पुरुष आसक्त होत नाही. अशा प्रकारे तो रागद्वेषाने रहित, शुद्ध सत्त्वगुणाने युक्त तसेच ज्याचे सर्व संशय नष्ट झाले आहेत असा यथार्थ त्यागी पुरुष होतो.

**व्याकरणम् - यः -** यत् सर्व.पु.प्र.ए.व. **अकुशलम् -** अ+कुशल वि.न.द्वि.ए.व. **कर्म -** कर्मन् न.द्वि.ए.व. **न -** न क्रि.वि.अ. **द्वेष्टि -** द्विष् द्वि.ग.उ.प./प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **कुशले -** कुशल वि.न.स.ए.व. **न -** न क्रि.वि.अ. **अनुषज्जते -** अनु+सज्ज् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व. **त्यागी -** त्यागिन् वि.पु.प्र.ए.व. **सत्त्वसमा विष्टः -** सत्त्व न. सम्+आ+विश् ष.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **छिन्नसंशयः -** छिद् स.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि. संशय पु.प्र.ए.व. **मेधावी -** मेधाविन् वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अकुशलम् -** न विद्यते कुशलं-शरीरसुखं यस्मिन् तदकुशलम् = नाही शरीरसुख ज्याच्यामध्ये ते**(न.ग.ब.स.) सत्त्वसमाविष्टः -** सत्त्वेन-सत्त्वगुणेन समाविष्टः-आत्मनिष्ठ इति सत्त्वसमाविष्टः = सत्त्वगुणाच्या द्वारा युक्त**(तृ.त.स.)** यद्वा **सत्त्वसमाविष्टः -** यदा सत्त्वेन-आत्मानात्मविवेकविज्ञानहेतुना समा विष्टः-संव्याप्तः संयुक्त इति सत्त्वसमाविष्टः = जेव्हा पुरुष अशा सत्त्वाने-आत्मा व अनात्मा यांच्या विवेकज्ञानाला कारण होणाऱ्या सत्त्वाने समाविष्ट-संव्याप्त-संयुक्त असा सत्त्वसमाविष्ट**(तृ.त.स.)** यद्वा **सत्त्वसमाविष्टः -** सत्त्वं रजस्तमस्तत्कार्यनिर्मुक्त आत्मानात्मस्वरूपनिर्धारणसमर्थोऽन्तःकरणपरिपाकविशेषस्तेन समाविष्ट इति सत्त्वसमाविष्टः = सत्त्वाने-रज, तम आणि त्यांच्या कार्याने रहित आत्मा आणि अनात्म्याच्या

स्वरूपाचा निश्चय करण्यामध्ये समर्थ अंत:करण त्याच्या परिपाकविशेषाने समाविष्ट-चांगल्या प्रकाराने युक्त असा सत्त्वसमाविष्ट**(तृ.त.स.) छिन्नसंशय: -** छिन्न:-नष्ट:, संशय:-सन्देहो यस्य स छिन्नसंशय: = नष्ट झाला आहे संशय ज्याचा तो**(ब.स.)** यद्वा **छिन्नसंशय: -** छिन्न:-स्वस्य कूटस्थासङ्गचिदात्मत्वविज्ञानेन विच्छिन्न: संशय:-सञ्चितागामिवर्तमानकर्मभिर्मम लेपोऽस्ति वा न वा, कर्तृत्वभोक्तृत्वादिलक्षण: संसार आत्मनो वाऽनात्मनो वा, मोक्षकारणं योगो वाऽप्युपास्तिर्वा कर्म वा ज्ञानं वा, तन्निष्ठा वा, मोक्ष: सालोक्यादिर्वा निर्विशेषात्मनाऽवस्थानलक्षणो वाऽन्यो वा इत्येवमादि: सन्देहो यस्य स छिन्नसंशय: = छिन्न-आपल्या कूटस्थ असंग आत्मतत्त्वाच्या विज्ञानाने विच्छिन्न झालेले आहेत संशय-सञ्चित, आगामी आणि वर्तमान कर्मांच्याद्वारा माझा संबंध आहे किंवा नाही; कर्तृत्व, भोक्तृत्व आदिरूप संसार आत्म्यामध्ये आहे किंवा अनात्म्यामध्ये आहे; मोक्षाचे कारण योग आहे किंवा उपासना आहे, किंवा कर्म आहे किंवा ज्ञान आहे किंवा ज्ञाननिष्ठा आहे; मोक्ष सालोक्य आदिरूप आहे किंवा निर्विशेष आत्मरूपाने अवस्थानरूप आहे किंवा अन्य प्रकारचा आहे इत्यादि संशय ज्याचे तो छिन्नसंशय**(ब.स.) मेधावी -** मेधा-शास्त्रहृदयज्ञानबुद्धिरस्यास्तीति मेधावी = शास्त्र विषयीनी बुद्धी आहे ज्याची तो**(अस्त्यर्थे त.वि.)** यद्वा **मेधावी -** मेधया-आत्मज्ञानलक्षणया प्रज्ञया संयुक्त:-तद्वान्-मेधावी = मेधेने-आत्मज्ञानरूप प्रज्ञेने संयुक्त-मेधावान-मेधावी **(वि.)** यद्वा **मेधावी -** चिदन्याविषयकमहं ब्रह्मात्मैक्यज्ञानमेव मेधा-बुद्धिरस्यास्तीति मेधावी = 'चित्'च्या अतिरिक्त अन्य कोणालाही विषय न करणारा 'अहं ब्रह्मास्मि'- मी ब्रह्म आहे इत्याकारक ब्रह्मात्मैक्यज्ञान-ब्रह्म आणि आत्म्याच्या एकतेचे ज्ञानच मेधा-बुद्धी आहे ज्याची तो मेधावी**(अस्त्यर्थे त.वि.) त्यागी -** त्यागोऽस्यास्तीति त्यागी = त्याग आहे ज्याचा तो त्यागी**(अस्त्यर्थे त.वि.)**

**न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषत:।**

**यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥११॥**

**अन्वय: -** हि, देहभृता, कर्माणि, अशेषत:, त्यक्तुम्, न, शक्यम्, तु, य:, कर्मफलत्यागी, स:, त्यागी, इति, अभिधीयते।

**अन्वयार्थ: - हि -** कारण **देहभृता -** देह धारण करणाऱ्या पुरुषाकडून **कर्माणि -** कर्मे **अशेषत: -** पूर्णतया **त्यक्तुम् -** त्याग करणे **न शक्यम् -** शक्य नाही **तु -** परंतु **य: -** जो पुरुष **कर्मफलत्यागी -** कर्मफलाचा त्यागी आहे **स: -** तो पुरुष **त्यागी -** त्यागी आहे **इति -** असे **अभिधीयते -** म्हटले आहे.

**विवरण -** शरीरधारी मनुष्य पूर्णतया कर्माचा अधिकारी आहे. म्हणजे त्याच्याकडून कर्मे होतच राहणार. कारण कर्म केल्यावाचून शरीराचा निर्वाह होऊ शकत नाही. म्हणजे मनुष्य कोणत्याही परिस्थितिमध्ये असला तरी त्याच्याकडून खाणे-पिणे, उठणे-बसणे, चालणे-फिरणे इत्यादि कर्म होणारच म्हणून देहधारण करणाऱ्या पुरुषाकडून कर्मे नि:शेष त्याग करणे शक्य नाही. अशाप्रकारे कर्मे करीत असतांना जो फलाचा त्याग करतो त्याला यथार्थ त्यागी म्हटले आहे.

**व्याकरणम् - हि -** हि क्रि.वि.अ. **देहभृता -** देहभृत् वि.पु.तृ.ए.व. **कर्माणि -** कर्मन् न.द्वि.ब.व. **अशेषत: -** शिष् अशेषतस् अ. **त्यक्तुम् -** त्यज् प्र.ग.प.प.तुमन्त अ. **न -** न क्रि.वि.अ. **शक्यम् -** शक् पं.ग.प.प.कर्म.यत् न.प्र.ए.व. **तु -** तु उभ.अ. **य: -** यत् सर्व.पु.प्र.ए.व. **कर्मफलत्यागी -** कर्म न. त्यागिन् पु.प्र.ए.व. **स: -** तत् सर्व.पु.प्र.ए.व. **त्यागी -** त्यागिन् पु.प्र.ए.व. **इति -** इति क्रि.वि.अ. **अभिधीयते -** अ

भि+धा तृ.ग.उ.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - कर्मफलत्यागी** - कर्मणां फलानि कर्मफलानि कर्मफलानां त्यागोऽस्यास्तीति कर्मफलत्यागी = कर्मांच्या फलांचा त्यागी**(ष.त.ग.अस्त्यर्थे त.वि.) देहभृता** - देहमयमेवाऽहमिति स्वात्मना बिभर्तीति देहभृत् यद्वा बिभर्तीति भृत् देहस्य भृत् देहभृत् तेन देहभृता = देह मी आहे अशा आपल्या स्वरूपाच्या द्वारा जो धारण करतो तो देहभृत् अथवा देहाचा धारण करणारा देहभृत त्याच्याकडून**(उपपद ग.ष.त.स.)**

त्यागी पुरुषाच्या महत्त्वाचे प्रतिपादन -

**अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम्।**

**भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु सन्न्यासिनां क्वचित्॥१२॥**

**अन्वयः** - अनिष्टम्, इष्टम्, च, मिश्रम्, त्रिविधम्, फलम्, अत्यागिनाम्, प्रेत्य, भवति, तु, सन्न्यासिनाम्, क्व चित्, न।

**अन्वयार्थः - अनिष्टम्** - पशुपक्षादि योनी अथवा नरकादि प्राप्ती **इष्टम्** - स्वर्गादि प्राप्ती **च** - आणि **मिश्रम्** - मनुष्यादि योनि प्राप्ती **कर्मणः** - असे कर्माचे **त्रिविधम्** - तीन प्रकारचे **फलम्** - फल हे **अत्यागिनाम्** - कर्मफलाचा त्याग न करणाऱ्या पुरुषांना **प्रेत्य भवति** - मरणानंतर प्राप्त होते **तु** - परंतु **सन्न्यासिनाम्** - कर्मफलाचा त्याग करणाऱ्या संन्याशांना (ते फल) **क्वचित्** - केव्हाही **न** - प्राप्त होत नाही.

**विवरण** - कर्मफलामध्ये असणाऱ्या ममता, आसक्ति आणि कामनांचा सर्वथा त्याग न करणाऱ्या पुरुषाला कधी शुभ कर्माचे फल स्वर्गादिकांची तर कधी अनिष्ट कर्माचे फल पशुपक्षादि योनिंची आणि कधी मिश्र कर्माचे फल मनुष्यादि योनिंची प्राप्ति होते. अशा प्रकारे उपर्युक्त प्रतिपादित कर्मफलाचा त्याग न करणाऱ्या पुरुषाला मरणानंतर तीन कर्माचे फल प्राप्त होते. परंतु, कर्मफलाचा त्याग करणाऱ्या परमार्थी संन्याशांना कोणत्याही कालामध्ये कर्माचे फल प्राप्त होत नाही.

**व्याकरणम् - अनिष्टम्** - अन्+इष् ष.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **इष्टम्** - इष् ष.ग.प.प.कर्म.भू.धा. वि.न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **मिश्रम्** - मिश्र वि.न.प्र.ए.व. **कर्मणः** - कर्मन् न.ष.ए.व. **त्रिविधम्** - त्रि संख्या वा.वि. विध वि.न.प्र.ए.व. **फलम्** - फल न.प्र.ए.व. **अत्यागिनाम्** - अ+त्यागिन् पु.ष.ब.व. **प्रेत्य** - प्रेत्य प्र+इ द्वि.ग.प.प.ल्यबन्त अ. **भवति** - भू प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **तु** - तु उभ.अ. **सन्न्यासिनाम्** - सन्न्यासिन् पु.ष.ब.व. **क्वचित्** - क्वचित् अ. **न** - न क्रि.वि.अ.

**समासविग्रहार्थाः - अत्यागिनाम्** - त्यागोऽस्ति येषां ते त्यागिनस्तेषां त्यागिनाम् न त्यागिनामित्यत्यागिनाम् = त्याग आहे ज्याचा ते त्यागी नाही त्यागी जे ते अत्यागी त्यांच्या(करिता)**(अस्त्यर्थे त.वि.ग.न.त.स.) सन्न्यासिनाम्** - सम्यग् न्यासः-त्याग इति सन्न्यासः सन्न्यासोऽस्ति येषां ते सन्न्यासिनस्तेषां सन्न्यासिनाम् = चांगल्या प्रकारचा त्याग म्हणजे न्यासच संन्यास आहे तो संन्यास ज्यांचा आहे ते संन्यासी त्यांच्या(करिता) **(अस्त्यर्थे त.वि.)**

संपूर्ण कर्मांच्या होण्यामध्ये अधिष्ठानादि पाच हेतु असल्याचे निरूपण

**पञ्चैतानि महाबाहो कारणानि निबोध मे ।**

**साङ्ख्ये कृतान्ते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम् ॥१३॥**

**अन्वयः** - महाबाहो, सर्वकर्मणाम्, सिद्धये, साङ्ख्ये, कृतान्ते, प्रोक्तानि, एतानि, पञ्च, कारणानि, मे, निबोध ।

**अन्वयार्थः - महाबाहो** - हे अर्जुना! **सर्वकर्मणाम्, सिद्धये** - सर्व कर्मांच्या सिद्धिकरिता **साङ्ख्ये कृतान्ते** - साङ्ख्य सिद्धांतामध्ये **प्रोक्तानि** - सांगितलेली **एतानि पञ्च कारणानि** - अशी ही पाच कारणे **मे** - माझ्याकडून तू **निबोध** - समजून घे.

**विवरण** - भगवान म्हणतात की, हे अर्जुना! शास्त्रविहित कर्म असो अथवा शास्त्रनिषिद्ध कर्म असो या सर्व कर्माच्या सिद्धिसाठी सांख्य शास्त्रामध्ये सांगितलेली अशी ही पाच कारणे माझ्याकडून चागंल्या प्रकारे जाणून घे.

**व्याकरणम् - महाबाहो** - महाबाहु पु.संबो.ए.व. **सर्वकर्मणाम्** - सर्व वि. कर्मन् न.ष.ब.व. **सिद्धये** - सिद्धि स्त्री.च.ए.व. **साङ्ख्ये** - साङ्ख्य न.स.ए.व. **कृतान्ते** - कृ अ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि. अन्त वि.न.स.ए.व. **प्रोक्तानि** - प्र+वच् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.द्वि.ब.व. **एतानि** - एतत् सर्व न.द्वि.ब.व. **पञ्च कारणानि** - पञ्च वि. कृ+णिच्+ल्युट्=कारण न.द्वि.ब.व. **मे** - अस्मत् सर्व ष.ए.व. **निबोध** - नि+बुध् च.ग.आ.प./ प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - महाबाहो** - महान्तौ-देवब्राह्मणपूजकौ बाहू-हस्तौ यस्य स महाबाहुस्तत्सम्बुद्धौ हे महाबाहो = महान म्हणजे देवाला आणि ब्राह्मणाला पूजणारे हात आहेत ज्याचे तो महाबाहू**(ब.स.) कृतान्ते** - कृतः-स्पष्टीकृत आत्मानात्मनोरन्तस्तत्त्वनिश्चयो यत्र तत्कृतान्तं तस्मिन् कृतान्ते = कृत-स्पष्ट केला आहे आत्मा आणि अनात्म्याचा अंत-तत्त्वनिर्णय ज्याच्यामध्ये ते कृतांत त्यामध्ये**(ब.स.)** यद्वा **कृतान्ते** - कृतस्य कर्मणः वैदिकस्य नित्यनैमित्तिकादेरन्तः-परिसमाप्तिर्यस्मिंस्तत् कृतान्तं तस्मिन् कृतान्ते = केलेल्या कर्माचा-वैदिक नित्यनैमित्तिक आदि कर्माचा अंत-परिसमाप्ति आहे ज्याच्यामध्ये ते कृतांत त्यामध्ये**(ब.स.) साङ्ख्ये** - सम्यक् ख्यायते-ज्ञायते आत्मानात्मनोस्तत्त्वं प्रकाश्यतेऽनेनेति साङ्ख्यम्-वेदान्तशास्त्रं तस्मिन् साङ्ख्ये = चांगल्या प्रकारे आत्मा आणि अनात्मा यांचे तत्त्व जाणले जाते-प्रकाशित केले जाते ज्याच्याद्वारा ते सांख्य त्यामध्ये**(वि.)** यद्वा **साङ्ख्ये** - सङ्ख्यायन्ते-गण्यन्ते तत्त्वानि-ज्ञातव्याः पदार्था यस्मिन् तत् साङ्ख्यम् तस्मिन् साङ्ख्ये = गणले-मोजले जातात तत्त्व-जाणण्यास योग्य पदार्थ ज्याच्यामध्ये ते त्यामध्ये**(वि.)**

मागील श्लोकाप्रमाणे -

**अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।**

**विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पञ्चमम् ॥१४॥**

**अन्वयः** - अधिष्ठानम्, तथा, कर्ता, च, पृथग्विधम्, करणम्, च, विविधाः, पृथक्, चेष्टाः, च, अत्र, दैवम्, एव, पञ्चमम् ।

**अन्वयार्थः - अधिष्ठानम्** - अधिष्ठान शरीर **तथा** - त्याचप्रमाणे **कर्ता** - जीव **च** - आणि **पृथग्विधम्, करणम्**

- नानाप्रकारची इंद्रिये **च** - आणि **विविधाः पृथक्, चेष्टाः** - निरनिराळे प्राणादिकांचे व्यापार **च** - आणि **अत्र** - या कारणामध्ये **दैवम्, एव, पञ्चमम्** - इंद्रियांच्या अधिष्ठात्री देवता हे पाचवे कारण आहे.

**विवरण** - कर्माच्या सिद्धिसाठी करण आणि क्रियांचा आश्रय शरीर अधिष्ठान, तिसऱ्या अध्यायामध्ये सांगितलेला 'अहङ्कार विमूढात्मा' अशा प्रकारचा कर्ता जीव, मन आणि बुद्धी हे अंतर असलेले तसेच पाच ज्ञानेंद्रिये आणि पाच कर्मेंद्रिये हे बाहेर असलेले अनेक प्रकारचे करण, हालचाल-चळनवळन अथवा श्वासोच्छ्वासादि अथवा डोळयांची उघडझाप, पाहणे, ऐकणे इत्यादि नानाप्रकारच्या क्रिया, इंद्रियांवर अनुग्रह करणाऱ्या देवता म्हणजे दैव हे पाचवे कारण आहे.

**व्याकरणम् - अधिष्ठानम्** - अधि+स्था+ल्युट्=अधिष्ठान न.प्र.ए.व. **तथा** - तथा क्रि.वि.अ. **कर्ता** - कृ+तृच्=कर्तृ वि.पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **पृथग्विधम्** - पृथग् अ. विध वि.न.प्र.ए.व. **करणम्** - कृ अ.ग.उ.प.+करणे ल्युट्=करण न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **विविधाः** - वि+विध वि.पु.प्र.ब.व. **पृथक्** - पृथक् अ. **चेष्टाः** - चेष्ट् प्र.ग.आ.प.+अङ्ग+टाप्=चेष्टा स्त्री.प्र.ब.व. **च** - च उभ.अ. **अत्र** - एतत्+त्रल्=अत्र अ. **दैवम्** - दैव न.प्र.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **पञ्चमम्** - पञ्चम वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - पृथग्विधम्** - पृथग् विधाः-प्रकारा यस्य तत् पृथग्विधम् = वेगळे वेगळे प्रकार आहेत ज्याचे ते(**ब.स.**) **कर्ता** - करोतीति कर्ता = करतो तो कर्ता(**वि.**)

**शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः ।**

**न्याय्यं वा विपरीतं वा पञ्चैते तस्य हेतवः ॥१५॥**

**अन्वयः** - नरः, शरीरवाङ्मनोभिः, यत्, न्याय्यम्, वा, विपरीतम्, वा, कर्म, प्रारभते, तस्य, एते, पञ्च, हेतवः ।

**अन्वयार्थः - नरः** - पुरुष **शरीरवाङ्मनोभिः** - शरीर, वाणी आणि मन यांच्याकडून **यत्** - जें **न्याय्यम्, वा विपरीतम्, वा कर्म** - शास्त्रविहित अथवा शास्त्रनिषिद्ध कर्म **प्रारभते** - आरंभ करतो **तस्य** - त्या कर्माचे **एते पञ्च हेतवः** - हे पांच हेतु(कारण)आहेत.

**विवरण** - मनुष्य न्यायपूर्वक शास्त्रविहित यज्ञ, दान, तप, विद्याध्ययन इत्यादि कर्माचा अथवा शास्त्राने ज्याचा निषेध केला आहे अशा असत्यभाषण, चोरी, व्यभिचार, हिंसा, अभक्ष्यभक्षण इ. कर्माचा मन, वाणी आणि शरीराच्याद्वारा आरंभ करतो त्या कर्माचे हे पाच हेतु(कारण)आहेत.

**व्याकरणम् - नरः** - नर पु.प्र.ए.व. **शरीरवाङ्मनोभिः** - शरीर न. वाक् स्त्री. मनस् न.तृ.ब.व. **यत्** - यत् सर्व.न.द्वि.ए.व. **न्याय्यम्** - न्याय्य वि.न.द्वि.ए.व. **वा** - वा उभ.अ. **विपरीतम्** - वि+परि+इ द्वि.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.द्वि.ए.व. **वा** - वा उभ.अ. **कर्म** - कर्मन् न.द्वि.ए.व. **प्रारभते** - प्र+आ+रभ् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व. **तस्य** - तत् सर्व.पु.ष.ए.व. **एते** - एतत् सर्व.पु.प्र.ब.व. **पञ्चहेतवः** - पञ्चन् वि. हेतु पु.प्र.ब.व.

**समासविग्रहार्थाः - शरीरवाङ्मनोभिः** - शरीरम्-देहश्च, वाक् च-भाषा च, मनश्च-अन्तकरणश्चेति शरीरवाङ्मनांसि तै शरीरवाङ्मनोभिः = शरीर, वाणी आणि मनाकडून (**द्व.स.**) **न्याय्यम्** - न्यायादनपेतमिति न्याय्यम् = न्यायापासून जे प्राप्त होते ते(**अनपेतार्थे त.वि.**)

आत्म्याला कर्ता समजणाऱ्याची निंदा -

**तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः ।**

**पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥१६॥**

**अन्वयः -** तु, तत्र, एवम्, सति, यः, अकृतबुद्धित्वात्, केवलम्, आत्मानम्, कर्तारम्, पश्यति, सः, दुर्मतिः, न, पश्यति ।

**अन्वयार्थः - तु -** परंतु **तत्र, एवम्, सति -** उपर्युक्त सांगितल्याप्रमाणे असताना **यः -** जो पुरुष **अकृतबुद्धित्वात् -** शास्त्रीय संस्काराने रहित बुद्धी असल्यामुळे **केवलम्, आत्मानम् -** केवळ निर्विकार आत्म्यालाच **कर्तारम् -** कर्ता **पश्यति -** पहातो **सः -** तो **दुर्मतिः -** अविवेकी मूढ पुरुष **न पश्यति -** यथार्थ रूपाने पहात नाही.

**विवरण -** उपर्युक्त अधिष्ठानादि पाच करणापासून सर्व कर्मे होत असतानासुद्धा आत्म्याचा त्या कर्माबरोबर यत्किञ्चिन्मात्रही संबंध नाही. कारण, आत्मा सर्वथा निर्विकार, शुद्ध, असंग असे श्रुतिने प्रतिपादन केले आहे 'असङ्गो ह्ययं पुरुषः' अशा असंग आत्म्याचा कर्माबरोबर कोणत्याही प्रकारचा संबंध नाही परंतु सत्संग आणि सत्शास्त्राभ्यासाच्या द्वारा तसेच विवेक आणि शमदमादि आध्यात्मिक साधनांच्या द्वारा ज्या पुरुषाची बुद्धी शुद्ध सुसंस्कृत झालेली नसल्यामुळे असंस्कृत बुद्धियुक्त अज्ञानवश पुरुष निरुपाधिक आत्म्याला कर्ता मानतो असा दुर्बुद्धी पुरुष नित्य, शुद्ध, बुद्ध, निर्विकार आणि असंग आत्म्याला यथार्थ रूपाने पाहत नाही म्हणजे अनादिसिद्ध अविद्येच्या वश होऊन अज्ञानी पुरुष आत्म्याला यथार्थ रूपाने जाणत नाही.

**व्याकरणम् - तु -** तु उभ.अ. **तत्र -** तत्+त्रल्=तत्र अ. **एवम् -** एवम् क्रि.वि.अ. **सति -** अस् द्वि.ग.प.प.कर्त.शतृ वि.पु.स.ए.व. **यः -** यत् सर्व.पु.प्र.ए.व. **अकृतबुद्धित्वात् -** अ+कृ अ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि. बुद्धि स्त्री. त्वा प्रत्ययान्त पु.पं.ए.व. **केवलम् -** केवल वि.पु.द्वि.ए.व. **आत्मानम् -** आत्मन् पु.द्वि.ए.व. **कर्तारम् -** कर्तृ पु.द्वि.ए.व. **पश्यति -** दृश् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **सः -** तत् सर्व.पु.प्र.ए.व. **दुर्मतिः -** दुर्+मति स्त्री.प्र.ए.व. **न -** न क्रि.वि.अ. **पश्यति -** दृश् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अकृतबुद्धित्वात् -** अकृता-शास्त्राचार्याणामुपदेशरहिता-असंस्कृता बुद्धिर्यस्य सोऽकृतबुद्धिस्तस्या भावोऽकृतबुद्धित्वं तस्मादकृतबुद्धित्वात् = शास्त्र आणि आचार्यांच्या उपदेशाने रहित असंस्कृत बुद्धी आहे ज्याची तो अशा असंस्कृतबुद्धी त्या असंस्कृतबुद्धिमुळे**(ब.स.ग.त्वा प्रत्ययान्त त.वि.) दुर्मतिः -** दुःखरूपेऽनात्मनि मतिरहंबुद्धिर्यस्य स दुर्मतिः-बहिर्दृष्टिः = दुःखरूप अनात्म्यामध्ये अहंबुद्धी आहे ज्याची तो दुर्मति**(ब.स.)** यद्वा **दुर्मतिः -** कुत्सिता-विपरीता दुष्टा-अजस्रं जननमरणप्रतिपत्तिहेतुभूता मतिरस्येति दुर्मतिः = कुत्सिता-विपरीता दुष्टा-सतत जन्म मरणाच्या प्राप्तिला कारण होणारी अशी ज्याची मति तो दुर्मति **(ब.स.)**यद्वा **दुर्मतिः -** अविद्याकार्यत्वेण दुष्टे देहेन्द्रियादावेवाऽहमिति मतिर्यस्य स दुर्मतिः = अविद्येचे कार्य असल्यामुळे दुष्ट देह, इंद्रिय आदीमध्येही अहंबुद्धी आहे ज्याची तो दुर्मति**(ब.स.)**यद्वा **दुर्मतिः -** रजस्तमोवासनात्मिकयाऽविद्यया दूषिता मतिर्यस्य स दुर्मतिः = रजोगुण आणि तमोगुणाच्या वासनारूप अविद्येने दूषित बुद्धी आहे ज्याची तो दुर्मति**(ब.स.)**यद्वा **दुर्मतिः -** दुष्टा-विवेकप्रतिबन्धकपापेन मलिना म

तिर्यस्य स दुर्मतिः = दुष्ट-विवेकप्रतिबंधक पापाने मलिन बुद्धी आहे ज्याची तो दुर्मति**(ब.स.)**

कर्तृत्वाभिमानाने रहित होऊन कर्म करणाऱ्याची प्रशंसा -

**यस्य नाहङ्कृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ।**

**हत्वापि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते ॥१७॥**

**अन्वयः** - यस्य, अहङ्कृतः, भावः, न, यस्य, बुद्धिः, न, लिप्यते, सः, इमान्, लोकान्, हत्वा, अपि, न, हन्ति, न, निबध्यते ।

**अन्वयार्थः - यस्य** - ज्या पुरुषाला **अहङ्कृतः भावः** - मी या कर्माचा कर्ता आहे असा अहंकार त्याच्या ठिकाणी **न** - नसतो आणि **यस्य** - ज्याची **बुद्धिः** - बुद्धी **न लिप्यते** - कोणत्याही कर्मांच्या द्वारा लिप्त होत नाही **सः** - तो पुरुष **इमान्, लोकान्** - या सर्व लोकांना **हत्वा, अपि** - मारून देखील **न हन्ति** - मारीत नाही आणि **न निबध्यते** - त्या कर्मफलाच्या द्वारा बांधला जात नाही.

**विवरण** - यथार्थ रूपाने निरुपाधिक आत्म्याचे ज्ञान झाल्यामुळे त्या पुरुषाच्या अंत:करणामध्ये कर्माचे फलस्वरूप इहलोकाच्या स्त्री, पुत्र, धन आदि करून भोगामध्ये तसेच परलोकाच्या स्वर्गादि भोगामध्ये ममता, आसक्ति आणि कामनांचा सर्वथा अभाव होऊन ज्याचा अज्ञानजनित अहंभाव सर्वथा नष्ट झाला आहे अशा पुरुषाच्या अंत:करणामध्ये कर्म तसेच त्याच्या फलाविषयी यत्किञ्चितही कर्तेपणाचा बोध उत्पन्न होत नाही. जरी त्याच्याकडून मन, बुद्धी आणि इंद्रियांच्याद्वारा लोकसंग्रहार्थ प्रारब्धानुसार कर्म होत असेल, तरी तो पुरुष त्या पदार्थाला स्वप्नाप्रमाणे क्षणिक तसेच नाशवान समजत असल्यामुळे त्या सांसारिक पदार्थांच्याद्वारा तसेच कर्माच्याद्वारा त्याची बुद्धी यत्किञ्चितही लिप्त होत नाही. त्याचप्रमाणे तो पुरुष सर्व लोकांना मारीत असला तरी देखील तो त्यांना वास्तविक मारीत नाही म्हणून तो त्या कर्मफलाच्याद्वारा बद्ध होत नाही.

**व्याकरणम् - यस्य** - यत् सर्व.पु.ष.ए.व. **अहङ्कृतः** - अस्मत् सर्व. कृ अ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **भावः** - भाव पु.प्र.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **लिप्यते** - लिप् ष.ग.उ.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व. **सः** - तत् सर्व.पु.प्र.ए.व. **इमान्** - इदम् सर्व.पु.द्वि.ब.व. **लोकान्** - लोक पु.द्वि.ब.व. **हत्वा** - हन् द्वि.ग.प.प.त्वान्त अ. **अपि** - अपि अ. **न** - न क्रि.वि.अ. **हन्ति** - हन् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **निबध्यते** - नि+बन्ध् न.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अहङ्कृतः** - अहम्-अहङ्कारेण कृतः-निष्पादित इति अहङ्कृतः = अहङ्काराने केलेला तो अहंकृत**(तृ.त.स.) भावः** - भाव्यतेऽहमिति गृह्यतेऽनेनेति भावः-अन्तःकरणम् = ज्याच्याद्वारा भावना केली जाते म्ह. मी ब्रह्म आहे असे त्याच्या द्वारा ग्रहण केले जाते तो भाव-अंत:करण**(वि.)**

कर्माची प्रेरणा आणि कर्मसंग्रहाचे स्वरूप -

**ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना ।**

**करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसङ्ग्रहः ॥१८॥**

**अन्वयः** - ज्ञानम्, ज्ञेयम्, परिज्ञाता, त्रिविधा, कर्मचोदना, करणम्, कर्म कर्ता, इति, त्रिविधः, कर्मसङ्ग्रहः ।

**अन्वयार्थ: - ज्ञानम् -** प्रमाज्ञान **ज्ञेयम् -** विषय **परिज्ञाता -** ज्ञाता **त्रिविधा कर्मचोदना-** कर्मामध्ये प्रेरित करणारी अशी तीन प्रकारची सामुग्री आहे **करणम् -** इंद्रिये **कर्म -** कर्म आणि **कर्ता -** कर्ता **इति -** असा **त्रिविध: -** तीनप्रकारचा **कर्मसङ्ग्रह: -** कर्म संग्रह आहे.

**विवरण -** कोणत्याही पदार्थाच्या स्वरूपाचा निश्चय करणारा तो ज्ञाता, ज्याच्याद्वारा वस्तुच्या स्वरूपाचा निश्चय केला जातो ते ज्ञान, आणि ज्या वस्तुच्या स्वरूपाचा निश्चय केला जातो ते ज्ञेय, अशा प्रकारे ज्ञाता, ज्ञान आणि ज्ञेय या तिन्हीचा संबंधच मनुष्याला कर्मामध्ये प्रवृत्त करणारा आहे. पाहणे, ऐकणे, समजणे, करणे, खाणे-पिणे अशाप्रकारच्या संपूर्ण क्रिया करणारा पुरुष कर्ता, मन, बुद्धी आणि इंद्रियांकडून उपर्युक्त ज्या क्रिया केल्या जातात ते करण, ज्याविषयी उपर्युक्त क्रिया केली जाते ते कर्म, असा कर्ता, करण आणि कर्म असा तीन प्रकारचा कर्माचा संग्रह आहे.

**व्याकरणम् - ज्ञानम् -** ज्ञान न.प्र.ए.व. **ज्ञेयम् -** ज्ञा न.ग.उ.प.कर्म.यत् वि.न.प्र.ए.व. **परिज्ञाता -** परि+ज्ञाम+तृच्=परिज्ञातृ पु.प्र.ए.व. **त्रिविधा: -** त्रि संख्यावाचक वि. विधा स्त्री.प्र.ए.व. **कर्मचोदना -** कर्म न. चोदना स्त्री.प्र.ए.व. **करणम् -** करण न.प्र.ए.व. **इति -** इति क्रि.वि.अ. **त्रिविध: -** त्रि संख्यावाचक वि. विध: वि.पु.प्र.ए.व. **कर्मसङ्ग्रह: -** कर्म न. सङ्ग्रह पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - कर्मचोदना -** चोद्यते प्रवर्तते अनया सा चोदना कर्मणां चोदना-प्रेरणा कर्मचोदना = जिच्या द्वारा सर्व प्रेरित केले जाते-प्रवृत्त केले जाते ती चोदना अशी कर्माची चोदना**(ष.त.स.) कर्मसङ्ग्रह: -** कर्मणां सङ्ग्रह इति कर्मसङ्ग्रह: = कर्माचा संग्रह असा कर्मसंग्रह**(ष.त.स.)** यद्वा **कर्मसंग्रह: -** संगृह्यतेऽस्मिन् इति संग्रह: कर्मण:-संग्रह: कर्मसंग्रह: = संग्रह केला जातो म्हणून संग्रह कर्माचा जो संग्रह तो कर्मसंग्रह **(ष.त.स.) ज्ञानम् -** ज्ञानम्-इष्टानिष्टादिरूपं द्रव्यगुणकर्मादिपदार्थजातं ज्ञायतेऽनेनेति ज्ञानं साधारण: सर्वपदार्थ विषयको बोध: = इष्ट आणि अनिष्टादिरूप द्रव्य, गुण, कर्मादि सर्व पदार्थ जाणले जातात ते ज्ञान-संपूर्ण पदार्थविषयक साधारण बोध**(वि.)** यद्वा **ज्ञानम् -** ज्ञायतेऽनेनेति ज्ञानं सर्वविषयमशेषेणोच्यते = ज्याच्या योगाने जाणले जाते ते ज्ञान सर्वविषयांविषयींचे ज्ञान अर्थात् सर्व प्रकारचे ज्ञान हा येथील ज्ञानशब्दाचा अर्थ आहे**(वि.) ज्ञेयम् -** ज्ञातव्यं द्रव्यगुणादिपदार्थजातं सर्वं ज्ञेयमित्युच्यते = जाणणे योग्य द्रव्य, गुणादि सर्व पदार्थ ज्ञेय म्हटले जातात**(वि.) परिज्ञाता -** ज्ञेयस्य ज्ञानस्य च ज्ञाता प्रमाता साभासो विज्ञानात्मा = ज्ञेय आणि ज्ञानाचा ज्ञाता-प्रमाता-साभास विज्ञान आत्मा**(ष.स.) करणम् -** क्रियते अननेति करणम्-बाह्यमाभ्यन्तरं च श्रोत्रादिवागादिबुद्ध्यादिद्वादशविधम् = ज्याच्याद्वारा ग्रहण केले जाते ते करण-बाहेरचे आणि आतले श्रोत्र आदि वागादि तसेच बुद्धी आदिच्या भेदाने बारा प्रकारचे आहे**(वि.) कर्मसंग्रह: -** कर्म सम्यग्गृह्यतेऽस्मिनिति कर्मसंग्रह: = ज्यामध्ये कर्मांचे चांगल्या प्रकारे ग्रहण केले जाते तो कर्मसंग्रह**(वि.)**

ज्ञान, कर्म आणि कर्त्याचे त्रिविध भेद दाखविण्याची प्रस्तावना -

**ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदत: ।**

**प्रोच्यते गुणसङ्ख्याने यथावच्छृणु तान्यपि ॥१९॥**

**अन्वय: -** गुणसङ्ख्याने, ज्ञानम्, च, कर्म, च, कर्ता, गुणभेदत:, त्रिधा, एव, प्रोच्यते, तानि, अपि, यथावत्, शृणु ।

**अन्वयार्थः - गुणसङ्ख्याने** - गुणांची गणना करणाऱ्या सांख्यशास्त्रामध्ये **ज्ञानम्** - ज्ञान **च** - आणि **कर्म** - कर्म **च** - आणि **कर्ता** - कर्ता **गुणभेदतः** - सत्त्व, रज, तमोगुणाच्या भेदाने **त्रिधा एव** - तीन प्रकारचाच **प्रोच्यते** - म्हटला जातो **तानि, अपि** - त्यांना देखील **यथावत्** - यथाशास्त्र म्हणजे जसेच्या तसे **शृणु** - माझ्याकडून श्रवण कर.

**विवरण** - सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांच्या संबंधापासून संपूर्ण पदार्थाच्या भिन्न भिन्न भेदांची गणना करणाऱ्या सांख्यशास्त्रामध्ये ज्ञान, कर्म आदि कर्ता सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांच्या भेदाने तीन-तीन प्रकारचे सांगितले आहे त्यांना देखील तू माझ्याकडून यथाशास्त्र (चांगल्या प्रकारे) श्रवणकर.

**व्याकरणम् - गुणसङ्ख्याने** - गुण वि. सम्+ख्या+ल्युट्=सङ्ख्यान न.स.ए.व. **ज्ञानम्** - ज्ञान न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **कर्म** - कर्मन् न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **कर्ता** - कर्तृ पु.प्र.ए.व. **गुणभेदतः** - गुण वि.पु. भिद्+घञ्+तसिल्=भेदः अ. **त्रिधा** - त्रिधा अ. **एव** - एव क्रि.वि.अ. **प्रोच्यते** - प्र+वच् द्वि.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व. **तानि** - तत् सर्व.न.द्वि.ब.व. **अपि** - अ. **यथावत्** - यथावत् अ. **शृणु** - श्रु प्र.ग.प.प.लोट् द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - गुणभेदतः** - गुणानाम्-सत्त्वादिगुणानां भेदो गुणभेदः, गुणभेदेनेति गुणभेदतः = गुणांच्या भेदाने**(ष.त.स.) गुणसङ्ख्याने** - गुणाः-सत्त्वरजस्तमांसि सम्यक्कार्यभेदेन ख्यायन्ते-प्रतिपाद्यन्तेऽस्मिन्निति गुणसङ्ख्यानम्-कपिलं तस्मिन् गुणसंख्याने-सांख्यशास्त्रे = गुण-सत्त्व, रज, तम या तीन गुणांचा ज्यामध्ये चांगल्या कार्यभेदाने ख्यान-प्रतिपादन केले जाते ते गुणसंख्यान म्हणजे कपिलदर्शन त्या सांख्यशास्त्रामध्ये **(वि.)**

सात्त्विक ज्ञानाचे लक्षण -

**सर्वभुतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते ।**

**अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम् ॥२०॥**

**अन्वयः** - येन, विभक्तेषु, सर्वभुतेषु, एकम्, अविभक्तम्, अव्ययम्, भावम्, ईक्षते, तत्, ज्ञानम्, सात्त्विकम्, विद्धि ।

**अन्वयार्थः - येन** - ज्याच्या योगाने **विभक्तेषु सर्वभूतेषु** - पृथग्-पृथग् असणाऱ्या सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी **एकम्, अविभक्तम, अव्ययम्, भावम्** - एक, अविभक्त, अविनाशी असणाऱ्या आत्मवस्तुला **ईक्षते** - पहातो **तत्** - ते **ज्ञानम्** - ज्ञान **सात्त्विकम्** - सात्त्विक आहे असे **विद्धि** - तूं समज.

**विवरण** - ज्या ज्ञानाच्या योगाने भिन्न-भिन्न प्रतीत होणाऱ्या संपूर्ण चराचर प्राणीमात्रामध्ये असणाऱ्या एक, अद्वितीय, अविनाशी, निर्विकार, ज्ञानस्वरूप परमात्मभावाला विभागरहित म्हणजे समभावाने पहातो असे ते अद्वैत प्रतिपादित आत्मदर्शन ज्ञान सात्त्विक ज्ञान आहे असे तू समज.

**व्याकरणम् - येन** - यत् सर्व.पु.तृ.ए.व. **विभक्तेषु** - वि+भज् द.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.स.ब.व. **सर्वभूतेषु** - सर्व वि.भू.प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.स.ब.व. **एकम्** - एक संख्या वा.वि.पु.द्वि.ए.व. **अविभक्तम्** - अ+वि+भज् द.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.द्वि.ए.व. **अव्ययम्** - अव्यय वि.पु.द्वि.ए.व. **भावम्** - भाव पु. द्वि.ए.व. **ईक्षते** - ईक्ष् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.द्वि.ए.व. **ज्ञानम्** - ज्ञान न.द्वि.ए.व. **सा**

**त्त्विकम् -** सात्त्विक वि.न.द्वि.ए.व. **विद्धि -** विद् द्वि.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व

**समासविग्रहार्थाः - अविभक्तम् -** विभक्तः-भिन्नो न भवतीति अविभक्तस्तं अविभक्तम्-अनुस्यूतम् = विभक्त म्हणजे भिन्न होत नाही असा तो अविभक्त म्हणजे अनुस्यूत त्याला**(न.त.स.) भावम् -** भावं नामरूपादिकं सर्वं भाव्यते यत्र येन वा स भावः-प्रत्यगात्मा तं सच्चिदानन्दैकरसमात्मानम् = नाम, रूपादि सर्व ज्यामध्ये अथवा ज्याच्याद्वारा उत्पन्न होते तो भाव-प्रत्यगात्मा त्या भावाला-सच्चिदानन्दैकरस आत्म्याला**(वि.)**

राजस ज्ञानाचे लक्षण -

**पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान्।**

**वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम्॥२१॥**

**अन्वयः -** तु, यत्, ज्ञानम्, सर्वेषु, भूतेषु, पृथक्त्वेन, पृथग्विधान्, नानाभावान्, वेत्ति, तत्, ज्ञानम्, राजसम्, विद्धि।

**अन्वयार्थः - तु -** परंतु **यत्, ज्ञानम् -** जे ज्ञान **सर्वेषु भुतेषु -** संपूर्ण प्राणिमात्रामध्ये **पृथक्त्वेन -** भिन्न-भिन्न प्रकाराने **पृथग्विधान्, नानाभावान् -** भिन्नभिन्नरूपाने नाना प्रकारच्या भावाला म्हणजे आत्म्याला **वेत्ति -** जाणतो **तत्, ज्ञानम् -** ते ज्ञान **राजसम् -** राजस **विद्धि -** जाण.

**विवरण -** पशु, पक्षी, मनुष्य, राक्षस आणि देवता जेवढे काही चराचर प्राणिमात्र आहेत त्यामध्ये असणारे जे ज्ञान शरीराकृती भेदाने आणि स्वभावभेदाने आत्म्याला भिन्न-भिन्न रूपाने जाणते ते ज्ञान राजस आहे असे तू समज म्हणजे प्रत्येक पदार्थामध्ये आत्मा भिन्न-भिन्न रूपाने प्रतीत होतो असे जे ज्ञान आहे ते राजस ज्ञान आहे असे तू समज.

**व्याकरणम् - तु -** तु उभ.अ. **यत् -** यत् सर्व.न.प्र.ए.व. **ज्ञानम् -** ज्ञान न.प्र.ए.व. **सर्वेषु -** सर्व सर्व.न.स.ब.व. **भूतेषु -** भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.स.ब.व. **पृथक्त्वेन -** पृथक्त्व वि.पु.तृ.ए.व. **पृथग्विधान् -** पृथक् अ. विध पु.द्वि.ब.व. **नानाभावान् -** नाना अ. भू+णिच्+अच्=भाव पु.द्वि.ब.व. **वेत्ति -** विद् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **तत् -** तत् सर्व.न.द्वि.ए.व. **ज्ञानम् -** ज्ञान न.द्वि.ए.व. **राजसम् -** राजस वि.न.द्वि.ए.व. **विद्धि -** विद् द्वि.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - पृथग्विधान् -** पृथक्-भिन्नो विधः-प्रकारो येषां ते पृथग्विधास्तान् पृथग्विधान् = पृथक-भिन्न विध-प्रकार आहेत ज्यांचे ते त्यांना **(ब.स.)**

तामस ज्ञानाचे लक्षण -

**यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तमहैतुकम्।**

**अतत्त्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम्॥२२॥**

**अन्वयः -** तु, यत्, एकस्मिन्, कार्ये, कृत्स्नवत्, सक्तम्, अहैतुकम्, अतत्त्वार्थवत्, च, अल्पम्, तत्, तामसम्, उदाहृतम्।

**अन्वयार्थः - तु -** परंतु **यत् -** जे ज्ञान **एकस्मिन्, कार्ये -** एक कार्यरूप शरीरामध्येच **कृत्स्नवत् -** पूर्णत्वाने

**सक्तम् -** आसक्त असलेले **अहैतुकम् -** युक्तिरहित **अतत्त्वार्थवत् -** तत्त्वार्थशून्य **च -** आणि **अल्पम् -** तुच्छ असते **तत् -** ते ज्ञान **तामसम् -** तामस **उदाहृतम् -** म्हटलेले आहे.

**विवरण -** ज्या विपरीत ज्ञानाच्याद्वारा मनुष्य प्रकृतिचे कार्यरूप शरीराला आपले स्वरूप समजतो आणि त्या नाशवान क्षणभंगूर शरीरामध्ये सर्व प्रकारे आसक्त होतो अर्थात त्याच्या सुखाने सुखी आणि त्याच्या दु:खाने दु:खी होतो तसेच त्याच्या नाशानेच आपला सर्वस्व नाश मानतो आणि आत्म्याला शरीराच्या भिन्न जाणत नाही असे जे ज्ञान एकाच कार्यामध्ये पूर्णरूपाने आसक्त असणारे युक्तिरहित, विपर्ययज्ञान, तत्त्वार्थशून्य आणि अगदी अल्प असते ते ज्ञान तामस ज्ञान म्हटलेले आहे.

**व्याकरणम् - तु -** तु उभ.अ. **यत् -** यत् सर्व.न.प्र.ए.व. **एकस्मिन् -** एक संख्या वा.वि.न.स.ए.व. **कार्ये -** कृ अ.ग.उ.प.कर्म.ण्यत् वि.न.स.ए.व. **कृत्स्नवत् -** कृत्स्न वि.वत् प्रत्ययान्त न.प्र.ए.व. **सक्तम् -** सज्ज् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **अहैतुकम् -** अहैतुक वि.न.प्र.ए.व. **अतत्त्वार्थवत् -** अ+तत्त्व न. अर्थ वत् प्रत्ययान्त वि.न.प्र.ए.व. **च -** च अ. **अल्पम् -** अल्प न.प्र.ए.व. **तत् -** तत् सर्व.न.प्र.ए.व. **तामसम् -** तामस वि.न.प्र.ए.व. **उदाहृतम् -** उद्+आ+हृ प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - अहैतुकम् -** हैतुकं न भवति तदहैतुकम्-हेतुवर्जितम्-युक्तिरहितम् = जे हैतुक नाही ते अहैतुक-हेतुवर्जित-युक्तिरहित**(न.त.स.) अतत्त्वार्थवत् -** यथाभूतोऽर्थस्तत्त्वार्थ: सोऽस्य ज्ञेयभूतोऽस्तीति तत्त्वार्थवत् न तत्त्वार्थवदित्यतत्त्वार्थवत् = यथाभूत-खरा असलेला जो अर्थ तो तत्त्वार्थ, तसा तत्त्वार्थ ज्या ज्ञानाचा ज्ञेय-विषय आहे ते ज्ञान तत्त्वार्थवत् होय असे तत्त्वार्थवत् जे नाही ते अतत्त्वार्थवत्**(न.त.स.)** यद्वा **अतत्त्वार्थवत् -** अबाधितार्थ: तत्वार्थ: स यस्य ज्ञानस्य नाऽस्ति तदतत्त्वार्थवत्-अयथार्थविषयकम् = अबाधित अर्थ तत्त्वार्थ जो ज्या ज्ञानाचा नाही ते अतत्त्वार्थवत्-अयथार्थविषयक**(न.त.स.)**

सात्त्विक कर्माचे लक्षण -

**नियतं सङ्गरहितमरागद्वेषत: कृतम् ।**

**अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते ॥२३॥**

**अन्वय: -** यत्, अफलप्रेप्सुना, अरागद्वेषत:, नियतम्, सङ्गरहितम्, कर्म, कृतम्, तत्, सात्त्विकम्, उच्यते ।

**अन्वयार्थ: - यत् -** जे **अफलप्रेप्सुना -** फलाची इच्छा न करणाऱ्याकडून **अरागद्वेषत: -** प्रीति आणि द्वेष यांनी रहित **नियतम् -** नित्य **सङ्गरहितम् -** आसक्तिशून्य **कर्म -** कर्म **कृतम् -** केले जाते **तत् -** ते **सात्त्विकम् -** सात्त्विक कर्म **उच्यते -** म्हटले जाते.

**विवरण -** शास्त्रविहित सांगितलेले यज्ञ, दान, तप आदि जे कर्म आहे त्याठिकाणी फलाची इच्छा न करता रागद्वेषाने रहित तसेच आसक्ति न ठेवता केले जाते ते कर्म सात्त्विक असे म्हटले जाते.

**व्याकरणम् - यत् -** यत् सर्व.न.प्र.ए.व. **अफलप्रेप्सुना -** अ+फल न. प्रेप्सु वि.पु.तृ.ए.व. **अरागद्वेषत: -** अ+राग पु. द्विष्+द्वि.ग.उ.प.तसिल्=द्वेषतस् तद्धि.अ. **नियतम् -** नि+यम् प्र.ग.प.प.भावे.भू.धा. वि.न.प्र.ए.व. **सङ्गरहितम् -** सङ्ग पु. रह् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **कर्म -** कर्मन् न.प्र.ए.व. **कृतम् -** कृ अ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **तत् -** तत् सर्व.न.प्र.ए.व. **सात्त्विकम् -** सात्त्विक वि.न.प्र.ए.व. **उच्यते -** वच् द्वि.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - अफलप्रेप्सुना -** फलं प्राप्तुमिच्छतीति फलप्रेप्सु:, फलप्रेप्सुर्न भवतीत्यफलप्रेप्सुस्तेनाऽफलप्रेप्सुना-फलेच्छारहितेन = फलाची इच्छा न करणाऱ्याकडून म्ह. फलेच्छार हिताकडून**(न.त.स.) सङ्गरहितम् -** सङ्गेन कर्तृत्वाभिनिवेशेन रहितम्-शून्यमिति सङ्गरहितम् = आसक्तिने र हित**(तृ.त.स.) अरागद्वेषत: -** रागश्च-पुत्रादिप्रीत्यनुबन्धश्च, द्वेषश्च-परमोत्कर्षासहनश्च रागद्वेषौ न भवतस्तौऽरागद्वेषौ, अरागद्वेषाभ्यामित्यरागद्वेषत: = राग आणि द्वेष यांनी रहित**(द्व.ग.न.त.स.)** यद्वा **अरागद्वेषत: -** सुखसाध्यत्वे तत्फलसाधनत्वे वा कर्मणि राग:, दु:खसाध्यत्वे दु:खफलसाधनत्वे वा कर्मणि द्वेषश्च जायते रागश्च द्वेषश्च रागद्वेषौ न रागद्वेषौ यस्येष्टानिष्टयो: कर्मणो: समबुद्धेरसावरागद्वेषस्तेनारागद्वेषत: = सुखरूप फलाच्या साधन कर्मामध्ये राग आणि दु:खरूप फलाच्या साधन कर्मामध्ये द्वेष, राग आणि द्वेष रागद्वेष ज्या समबुद्धिला इष्ट आणि अनिष्ट कर्मामध्ये राग आणि द्वेष नाही ते अरागद्वेष त्या अरागद्वेषाने**(द्व.ग.न.त.स.)** यद्वा **अरागद्वेषत: -** राजसन्मानादिकमनेन लप्स्य इति रागश्च, शत्रुमनेन पराजेष्य इति द्वेषश्च रागद्वेषौ न कृतमरागद्वेषत: कृतम् = राजाच्याद्वारा मी सन्मानादि प्राप्त करील आणि द्वेषाच्याद्वारा मी शत्रुला पराजित करील असे रागद्वेष त्या रागद्वेषाच्याद्वारा न केलेले असे अरागद्वेषाने कलेले**(द्व.ग.न.त.स.)**

राजस कर्माचे लक्षण -

**यत्तु कामेप्सुना कर्म साहङ्कारेण वा पुन: ।**

**क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम् ॥२४॥**

**अन्वय: -** तु, यत्, कर्म, कामेप्सुना, वा, पुन:, साहङ्कारेण, बहुलायासम्, क्रियते, तत्, राजसम्, उदाहृतम् ।

**अन्वयार्थ: - तु -** परंतु **यत् -** ते **कर्म -** कर्म **कामेप्सुना -** फलाची इच्छा करणाऱ्या **वा पुन: -** अथवा **साहङ्कारेण -** अहङ्कार पूर्वक पुरुषाकडून **बहुलायासम् -** मोठ्या आयासाने **क्रियते -** केले जाते **तत् -** ते कर्म **राजसम् -** राजस **उदाहृदम् -** या नावाने संबोधित (केले जाते) अथवा केलेले आहे.

**विवरण -** जे कर्म ममता आसक्ति आणि फलाची इच्छा करणाऱ्या तसेच ते कर्म मीच करतो अशा अहंकारपूर्वक पुरुषाकडून योठ्या परिश्रमाने केले जाते ते कर्म राजस (म्हटले जाते) अथवा म्हटलेले आहे.

**व्याकरणम् - तु -** तु उभ.अ. **यत् -** यत् सर्व.न.प्र.ए.व. **कर्म -** कर्मन् न.प्र.ए.व. **कामेप्सुना -** कामेप्सु वि.पु.तृ.ए.व. **वा -** वा अ. **पुन: -** पुनर् पादपूर्णार्थक अ. **साहङ्कारेण -** स अ. अहङ्कार पु.तृ.ए.व. **बहुलायासम् -** बहुल वि. आयास पु.वि.न.प्र.ए.व. **क्रियते -** कृ अ.ग.उ.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व. **तत् -** तत् सर्व.न.प्र.ए.व. **राजसम् -** राजस वि.न.प्र.ए.व. **उदाहृतम् -** उद+आ+हृ प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा. वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - साहङ्कारेण -** अहङ्कारेण सहितमिति साहङ्कारस्तेन साहङ्कारेण = अहंकारपूर्वक**(तृ.त.स.) बहुलायासम् -** बहुलो महानायास:-श्रमो यस्मिन् कर्मण्याचमनादौ भवति तद् बहुलायासम् = बहुल-पुष्कळ-मोठा क्लेश-श्रम ज्या आचमनादि कर्मामध्ये होतो तो बहुलायास-अत्यंत यत्नपूर्वक जे कर्म केले जाते ते कर्म राजस**(ब.स.) कामेप्सुना -** कामस्य इप्सुरिति कामेप्सुस्तेन कामेप्सुना = कामाची इच्छा करणाऱ्याकडून **(ष.त.स.)** यद्वा **कामेप्सुना -** काम्यत इति काम: कर्मफलं तमाप्तुमिच्छता कामेप्सुना-फलप्रेप्सुना = इच्छा केली जाते तो काम म्ह. कर्मफल त्याच्या प्राप्तिची इच्छा करणाऱ्याकडून**(उप.स.)**

तामस कर्माचे लक्षण -

**अनुबन्धं क्षयं हिंसामनवेक्ष्य च पौरुषम् ।**

**मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते ॥२५॥**

**अन्वयः** - यत्, कर्म, अनुबन्धम्, क्षयम्, हिंसाम्, च, पौरुषम्, अनवेक्ष्य, मोहात्, आरभ्यते, तत्, तामसम्, उच्यते ।

**अन्वयार्थः - यत्** - जे **कर्म** - कर्म **अनुबन्धम्** - भावी परिणाम **क्षयम्** - हानी **हिंसाम्** - हिंसा **च** - आणि **पौरुषम्** - सामर्थ्य **अनवेक्ष्य** - यांचा विचार न करून **मोहात्** - मोहाने-अज्ञानाने **आरभ्यते** - आरंभिले जाते **तत्** - ते कर्म **तामसम्** - तामस **उच्यते** - म्हटले जाते.

**विवरण** - कर्म आरंभ करण्याच्या पूर्वी त्यापासून भावी परिणाम सुख होईल किंवा दु:ख होईल. तसेच त्यामध्ये हानी, हिंसा, परिश्रम आणि धन किती खर्च होईल याचा विचार न करता जे कर्म अज्ञानाने आरंभिले जाते ते तामस कर्म म्हटले जाते.

**व्याकरणम् - यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **कर्म** - कर्मन् न.प्र.ए.व. **अनुबन्धम्** - अनुबन्ध पु.द्वि.ए.व. **क्षयम्** - क्षय पु.द्वि.ए.व. **हिंसाम्** - हिंसा स्त्री.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **पौरुषम्** - पौरुष पु.द्वि.ए.व. **अनवेक्ष्य** - अन्+अव+ईक्ष् प्र.ग.आ.प.ल्यबन्त अ. **मोहात्** - मोह पु.पं.ए.व. **आरभ्यते** - आ+रभ् प्र.ग.आ.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **तामसम्** - तामस वि.न.प्र.ए.व. **उच्यते** - वच् द्वि.ग.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अनुबन्धम्** - अनु-पश्चाद्भाविनं परिणामं बध्यते-सम्बध्यत इत्यनुबन्धम् = अनु-पश्चात् होणाऱ्या परिणामाच्याद्वारा बांधल्या जातो तो त्याला**(वि.) अनुबन्धम्** - पश्चात् भावि यत् वस्तु सोऽनुबन्ध उच्यते तमनुबन्धम् = अनु-मागून होणारी जी वस्तु (परिणाम) तिला अनुबंध म्हटले जाते त्या अनुबंधाला **(वि.) अनुबन्धम्** - उत्तरभाव्यनर्थस्तत्कर्मणः फलभूतस्तमनुबन्धम्-पश्चाद्भाव्यशुभम् = अनुबंध म्हणजे वर सांगितलेल्या कर्मांचा फलभूत उत्तरभावी होणारा अनर्थ-पश्चाद् भावी अशुभपरिणाम**(वि.)**

सात्त्विक कर्त्याचे लक्षण -

**मुक्तसङ्गोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः ।**

**सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्त्विक उच्यते ॥२६॥**

**अन्वयः** - मुक्तसङ्गः, अनहंवादी, धृत्युत्साहसमन्वितः, सिद्ध्यसिद्ध्योः, निर्विकारः, कर्ता, सात्त्विकः, उच्यते ।

**अन्वयार्थः - मुक्तसङ्गः** - ज्याने आसक्तिचा त्याग केला आहे **अनहंवादी** - अहंकारवृत्तिरहित **धृत्युत्साहसमन्वितः** - धैर्य आणि उत्साह यांनी युक्त **सिद्ध्यसिद्ध्योः निर्विकारः** - जो सिद्धि आणि असिद्धिविषयी निर्विकार असतो तो **कर्ता** - कर्ता **सात्त्विकः** - सात्त्विक **उच्यते** - म्हटला जातो.

**विवरण** - मन, इंद्रिय आणि शरीराकडून होणाऱ्या कर्मामध्ये प्राप्त असलेल्या, आसक्ति, ममता आणि कामनांचा ज्या पुरुषाने त्याग केलेला असून आणि सांसारिक कोणत्याही पदार्थाविषयी त्याची अहंबुद्धी रा

हिलेली नाही. तसेच शास्त्रविहित स्वधर्मपालनरूप कोणतेही कर्म करीत असतांना त्यामध्ये अनेक मोठ-मोठी विघ्ने उपस्थित झाली तरी तो पुरुष त्या स्वधर्मपालनरूप कर्मापासून यत्किञ्चितही विचलित न होता अत्यंत उत्साहपूर्वक तसेच अनेक प्रकारच्या विघ्नाला सामोरे जाऊन अभयपूर्वक आपले कर्तव्यकर्म पालन करण्यामध्ये सतर्क राहातो. असा पुरुष आसक्ति, ममता आणि कामनांनी रहित शुभकर्मापासून सिद्धि प्राप्त झाली अथवा अशुभ कर्मापासून असिद्धि प्राप्त झाली तरी तो हर्षित तसेच दु:खित सुद्धा होत नाही कारण तो दोन्हींच्या विषयी निर्विकार असतो तो सात्त्विक कर्ता म्हटला जातो.

**व्याकरणम् - मुक्तसङ्गः -** मुच् ष.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि. सङ्ग पु.प्र.ए.व. **अनहंवादी -** अन्+अहम्+वद् प्र.ग.प.प.+णिनि=अनहंवादिन् वि.पु.प्र.ए.व. **धृत्युत्साहसमन्वितः -** धृति स्त्री. उत्साह पु. सम्+अनु+इ द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **सिद्ध्यसिद्ध्योः -** सिद्धि स्त्री. अ+सिद्धि स्त्री.स.द्वि.व. **निर्विकारः -** निर्+वि+कृ अ.ग.उ.प.+घञ्=निर्विकार पु.प्र.ए.व. **कर्ता -** कर्तृ पु.प्र.ए.व. **सात्त्विकः -** सात्त्विक वि.पु.प्र.ए.व. **उच्यते -** वच् द्वि.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - मुक्तसङ्गः -** मुक्तः-त्यक्तः सङ्गः-कर्तृत्वाभिमानः-फलाभिसन्धिलक्षणो कामो येन स मुक्तसङ्गः = त्याग केलेला आहे कर्तृत्वाभिमानाचा-फलाभिसंधिरूप कामाचा ज्याने तो**(ब.स.) निर्विकारः -** निर्गताः विकाराः यस्य स निर्विकारः = निघून गेले आहेत विकार ज्याचे तो**(ब.स.) अनहंवादी** - अहङ्कारेण -गर्वेण वदतीत्यहंवादी, अहंवादी न भवतीत्यनहंवादी = अहंकाराने-गर्वाने जो बोलतो तो अहंवादी असा जो बोलत नाही तो अनहंवादी**(न.त.स.)** यद्वा **अनहंवादी** - सङ्कल्पेऽप्यहमिदं करोमीति वदनशीलो न भवतीत्यनहंवादी = संकल्प झाला तरी तो मी करतो असा बोलण्याचा स्वभाव ज्याचा नाही तो अनहंवादी **(न.त.स.)** यद्वा **अनहंवादी** - कर्ताऽहमिति वदनशीलो न भवति स्वगुणश्लाघाविहीनो वेत्यनहंवादी = मी कर्ता आहे असा बोलण्याचा स्वभाव ज्याचा नाही अथवा जो आपल्या गुणाची प्रशंसा करत नाही असा तो अनहंवादी**(न.त.स.)सिद्ध्यसिद्ध्योः -** सिद्धिश्च-कर्मसमाप्तिश्च, असिद्धिश्च-केनचित् प्रतिबन्धेन असमाप्तिश्चे ति सिद्ध्यसिद्धी तयोः सिद्ध्यसिद्ध्योः = सिद्धि आणि असिद्धिच्या**(द्व.स.) धृत्युत्साहसमन्वितः -** धृतिः-स्वधर्मानुष्ठाने वैकल्यराहित्येन धैर्यंच, उत्साहः-स्वधर्मानुष्ठाने हर्षोद्भव इति धृत्युत्साहौ धृत्युत्साहाभ्यां सम न्वितः-युक्तो धृत्युत्साहसमन्वितः = धैर्य आणि उत्साह यांनी युक्त**(द्व.ग.तृ.त.स.)** यद्वा **धृत्युत्साहसमन्वितः -** धृतिः-अर्थव्ययदेहायासादौ धैर्यम्, उत्साहः-चिकीर्षावेशस्ताभ्यां सम्यगन्वितो धृत्युत्साहसमन्वितः = धृति-अर्थव्यय आणि देहाच्या आयास आदिमध्ये धैर्य, उत्साह करण्याच्या इच्छेचा वेग या दोन्हीद्वारा चांगल्या प्रकारे युक्त असा धृत्युत्साहसमन्वित**(द्व.ग.तृ.त.स.)**

राजस कर्त्याचे लक्षण -

**रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः ।**

**हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ॥२७॥**

**अन्वयः -** रागी, कर्मफलप्रेप्सुः, लुब्धः, हिंसात्मकः, अशुचिः, हर्षशोकान्वितः, कर्ता, राजसः, परिकीर्तितः ।

**अन्वयार्थः - रागी -** विषयासक्तिने युक्त **कर्मफलप्रेप्सुः -** कर्मफलाची आकांक्षा करणारा **लुब्धः -** लोभी

**हिंसात्मकः -** प्राणिमात्रांना पीडा देणारा **अशुचिः -** बाह्य आणि अंतर शुद्धिरहित **हर्षशोकान्वितः -** हर्ष आणि शोक यांनी युक्त असा **कर्ता** - कर्ता **राजसः -** राजस **परिकीर्तितः -** म्हटला गेला आहे.

**विवरण -** या पूर्वी केलेल्याच्या विपरीत मन, इंद्रिय आणि शरीराकडून होणाऱ्या कर्मामध्ये निहित असणाऱ्या आसक्ति, ममता आणि कामनांचा ज्या पुरुषाने त्याग केलेला नाही, इहलोक आणि परलोकामध्ये असणाऱ्या नानाप्रकारच्या भोगाची इच्छा करणारा, आपल्या अभिलाषेच्या पूर्तिकरिताच दुसऱ्याला दुःख देणारा म्हणजे हिंसक, न्याय अन्यायाचा विचार न करता धनादि संग्रह करणारा म्हणजे लोभी, बाह्य आणि अंतर शुद्धिरहित, तसेच हर्ष आणि शोकाने युक्त असा जो कर्ता तो राजस कर्ता म्हटलेला आहे.

**व्याकरणम्** - **रागी** - रञ्ज् प्र./च.ग.उ.प.+इनि=रागिन् वि.पु.प्र.ए.व. **कर्मफलप्रेप्सुः -** कर्म न. फल न. प्र+आप्, इत्यत्र आकारस्येकारः+सन्+उ=प्रेप्सुः वि.पु.प्र.ए.व. **लुब्धः -** लुभ् च.ग.प.प.कर्म.भू.धा. वि.पु.प्र.ए.व. **हिंसात्मकः -** हिंसा स्त्री. आत्मक वि.पु.प्र.ए.व. **अशुचिः -** अशुचि वि.पु.प्र.ए.व. **हर्षशोकान्वितः -** हर्ष पु. शोक पु. अनु+इ द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **कर्ता -** कर्तृ पु.प्र.ए.व. **राजसः -** राजस वि.पु.प्र.ए.व. **परिकीर्तितः -** परि+कृत् द.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - कर्मफलप्रेप्सुः -** कर्मणां फलम्-पुत्रकलत्रधनसंपत्तिस्वर्गं चेति कर्मफलम्, कर्मफलस्य प्रेप्सुः कर्मफलप्रेप्सुः = कर्माचे फल-पुत्र, कलत्र, धन, संपत्ति, स्वर्ग असे कर्मफल त्या कर्मफलाची इच्छा करणारा तो कर्मफलप्रेप्सु**(ष.त.ग.ष.त.स.) हर्षशोकान्वितः -** हर्षश्च-लाभजनितश्च शोकश्च-अलाभजनितश्च हर्षशोकौ हर्षशोकाभ्यामन्वितः-युक्तः हर्षशोकान्वितः = हर्ष आणि शोक यांनी युक्त**(द्व.ग.तृ.त.स.)** यद्वा **हर्षशोकान्वितः -** इष्टप्राप्तौ हर्षश्चानिष्टप्राप्तौ इष्टवियोगे च शोकश्चेति हर्षशोकौ ताभ्यां अन्वितः संयुक्त इति हर्षशोकान्वितः = इष्ट प्राप्ति झाली असता हर्ष व अनिष्ट प्राप्ति आणि इष्टवस्तुचा वियोग झाला असता शोक असे हर्षशोक त्या हर्षशोकांनी युक्त**(द्व.ग.तृ.त.स.) हिंसात्मकः -** हिंसा आत्मा-स्वरूपं यस्य स हिंसात्मकः = हिंसा करणे स्वरूप आहे ज्याचे तो हिंसात्मक**(ब.स.) अशुचिः -** न शुचिरित्यशुचिः= जो शुद्ध नाही तो अशुचि**(न.त.स.) रागी -** पुत्रादिकुशलनिमित्ते कर्मणि रागोऽस्यास्तीति रागी = पुत्रादि कुशल निमित्त कर्मामध्ये राग आहे ज्याचा तो रागी**(अस्त्यर्थे त.वि.)** यद्वा **रागी -** कर्मफलापेक्षत्वात्तत्साधनेषु कर्मसु रागोऽस्यास्तीति रागी = कर्माच्या फलाची इच्छा झाल्यामुळे ज्याचा कर्माच्या साधनामध्ये राग आहे तो रागी **(अस्त्यर्थे त.वि.)** यद्वा **रागी -** रागः-विषयभोगेच्छा सोऽस्यास्तीति रागी-कामाद्याकुलचित्तः = राग-विषयभोगाची इच्छा ज्याची आहे तो रागी-कामादिच्याद्वारा व्याकुलचित्त**(अस्त्यर्थे त.वि.)**

तामस कर्त्याचे लक्षण -

**अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठोऽनैष्कृतिकोऽलसः ।**

**विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते ॥२८॥**

**अन्वयः -** अयुक्तः, प्राकृतः, स्तब्धः, शठः, नैष्कृतिकः, विषादी, अलसः, च, दीर्घसूत्री, कर्ता, तामसः, उच्यते ।

**अन्वयार्थः - अयुक्तः -** स्थिरचित्त नसलेला **प्राकृतः -** असंस्कृत किंवा संस्काररहित मूढ **स्तब्धः -** विनयरहित-गर्वयुक्त **शठः -** धूर्त-शठ **नैष्कृतिकः -** दुसऱ्याच्या जीविताचा नाश करणारा **विषादी -** शोक करणारा

**अलसः** - आळसी **च** - आणि **दीर्घसूत्री** - कार्य लांबणीवर टाकणारा असा तो **कर्ता** - कर्ता **तामसः** - तामस **उच्यते** - म्हटला जातो.

**विवरण** - मन आणि इंद्रिये अधीन नसणारा म्हणजे सदा असमाधानी चित्त असणारा, अंत:करण सुसंस्कृत नसणारा म्हणजे केवळ मूर्खाप्रमाणे आचरण करणारा, अत्यंत कठोर स्वभाव असून कोणापुढेही नम्र न होण-ारा म्हणजे आपल्या पुढे दुसऱ्याला काही एक न समजणारा, दुसऱ्याला आपल्या जाळ्यांत फसविणारा म्हणजे दुसऱ्याला केवळ ठकविणारा, दुसऱ्याच्या जीविताचा नाश करणारा, अंत:करणामध्ये आणि इंद्रियांमध्ये सतत आळस भरलेला, रात्रंदिवस शोक करणारा, थोड्या दिवसाच्या कार्याला अधिक दिवस लावणारा अशा उपर्युक्त विशेषणांनी युक्त असणाऱ्या पुरुषाला तामस कर्ता म्हटले आहे.

**व्याकरणम्** - **अयुक्तः** - अ+युज् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **प्राकृतः** - प्र+आ+कृ अ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **स्तब्धः** - स्तम्भ् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **शठः** - शठ पु.प्र.ए.व. **नैष्कृतिकः** - नैष्कृतिक वि.पु.प्र.ए.व. **विषादी** - वि+सद् ष.ग.प.प.+घञ्+इनि=विषादिन् वि.पु.प्र.ए.व. **अलसः** - अलस वि.पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **दीर्घसूत्री** - दीर्घसूत्रिन् वि.पु.प्र.ए.व. **कर्ता** - कर्तृ पु.प्र.ए.व. **तामसः** - तामस वि.पु.प्र.ए.व. **उच्यते** - वच् द्वि.ग.प.प.कर्म.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः** - **अयुक्त** - न युक्त इत्ययुक्तः-अस्थिरचित्तश्चञ्चलः = जो युक्त नाही तो अयुक्त-अस्थिर चित्तवाला-चंचल**(न.त.स.)** **विषादी** - विषादः-खेदोऽस्यास्तीति विषादी-क्लिष्टचित्तः-इष्टे वस्तुनि लब्धेऽपि तृप्तिरहितत्वादीषदपि संतोषरहितः = विषादी-खेद आहे ज्याचा तो विषादी-चित्ताला क्लेश देणारा-इष्ट वस्तु प्राप्त झाली तरी सुद्धा तृप्ति न झाल्यामुळे थोड्याही संतोषाने रहित**(अस्त्यर्थे त.वि.)** **दीर्घसूत्री** - दीर्घसूत्री-सद्यः कर्तव्यमपि कार्यं पक्षे, मासे वा अयने इति दीर्घसूत्री-चिरकारी = लवकर करणे योग्य कार्यालासुद्धा जो एक दिवसात किंवा एका आठवड्याने किंवा एका महिन्याने किंवा एक वर्षामध्ये करतो तो दीर्घसूत्री-दीर्घकाळी**(परिभाषा)** यद्वा **दीर्घसूत्री** - कर्तव्यानां दीर्घप्रसारणो अद्य वा श्वः कर्तव्यं तत् मासेनाऽपि न करोति = दीर्घसूत्री-कर्तव्यांचा मोठा पसारा करणारा, आज किंवा उद्या-एक दोन दिवसात जे करावयाचे ते महिन्यानेही करीत नाही**(परि.)** यद्वा **दीर्घसूत्री** - निरन्तरशङ्कासहस्रकवलितान्तःकरणत्वेनातिमन्थरप्रवृत्तिर्यदद्यकर्तव्यं तन्मासेनापि न करोति न वेति दीर्घसूत्री = निरंतर हजारो शङ्केच्या द्वारा कवलित-ग्रस्तचित्त झाल्यामुळे अतिमंथर-अत्यंत मंदप्रवृत्तिवाला पुरुष आज जे कर्तव्य कर्म आहे त्याला महिन्याने करतो अथवा करीत नाही तो दीर्घसूत्री**(परि.)** **नैष्कृतिकः** - निष्कृतेर्भावो नैष्कृतिकः = निष्कृतिचा भाव नैष्कृतिक आहे**(भावार्थे त.वि.)** यद्वा **नैष्कृतिकः** - निष्कृतिर्मनवाक्कायैः परतिरस्करणं तत्प्रणवो नैष्कृतिकः = मन, वाणी आणि शरीराने दुसऱ्याचा तिरस्कार करणारा वा दुसऱ्याचा अपमान करणारा तो**(परि.)** **प्राकृतः** - प्रकृतौ भव इति प्राकृतः = प्रकृतिमध्ये होणारा (तो) प्राकृत **(भावार्थे त.वि.)**

बुद्धी आणि धृतिचे त्रिविध भेद दाखविण्याची प्रस्तावना -

**बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु ।**

**प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनञ्जय ॥२९॥**

**अन्वयः** - धनञ्जय, बुद्धेः, च, धृतेः, एव, गुणतः, त्रिविधम्, भेदम्, अशेषेण, पृथक्त्वेन, प्रोच्यमानम्, शृणु

।

**अन्वयार्थः - धनञ्जय** - हे अर्जुना! **बुद्धेः** - बुद्धिच्या **च** - आणि **धृतेः, एव** - धृतिच्याही **गुणतः** - गुणाच्यानुसार होणाऱ्या **त्रिविधम्, भेदम्** - तीन प्रकारच्या भेदाला **अशेषेण** - काही अवशिष्ट न ठेवता **पृथक्त्वेन** - विभागपूर्वक **प्रोच्यमानम्** - कथित केल्या जाणाऱ्या भेदाला तू **शृणु** - श्रवण कर.

**विवरण** - हे अर्जुना! सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांच्यानुसार होणाऱ्या बुद्धिच्या तसेच धृतिच्या सुद्धा भेदाला माझ्याकडून काही अवशिष्ट न ठेवता भिन्न-भिन्न रूपाने विवेकपूर्वक श्रवण कर.

**व्याकरणम् - धनञ्जय** - धनञ्जय पु.संबो.ए.व. **बुद्धेः** - बुद्धि स्त्री.ष.ए.व. **च** - च उभ.अ. **धृतेः** - धृति स्त्री.ष.ए.व. **एव** - एव अ. **गुणतः** - गुण+तसिल्=गुणतः अ. **त्रिविधम्** - त्रि संख्या वा.वि. विध पु. द्वि.ए.व. **भेदम्**- भेद पु.द्वि.ए.व. **अशेषेण** - अशेष वि.पु.तृ.ए.व. **पृथक्त्वेन** - पृथक्त्व वि.पु.तृ.ए.व. **प्रोच्यमानम्** - प्र+ब्रू(वच्) द्वि.ग.प.प.+शानच् वि.पु.द्वि.ए.व. **शृणु** - श्रु प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - त्रिविधम्** - त्रयो विधा यस्य स त्रिविधस्तं त्रिविधम् = तीन प्रकार आहेत ज्याचे त्याला **(ब.स.)गुणतः** - गुणेभ्य इति गुणतः-सत्त्वादिगुणेभ्यः = सत्त्वादि गुणांमुळे**(तसिल् प्रत्ययान्त त.वि.)**

सात्त्विक बुद्धिचे लक्षण-

**प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये ।**

**बन्धं मोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी ॥३०॥**

**अन्वयः** - पार्थ, या, प्रवृत्तिम्, च, निवृत्तिम्, कार्याकार्ये, भयाभये, बन्धम्, च, मोक्षम्, वेत्ति, सा, बुद्धिः, सात्त्विकी ।

**अन्वयार्थः - पार्थ** - हे अर्जुना! **या** - जी **प्रवृत्तिम्** - प्रवृत्तिमार्गाला **च** - आणि **निवृत्तिम्** - निवृत्तिमार्गाला **कार्याकार्ये** - कर्तव्य आणि अकर्तव्य यांना **भयाभये** - भय आणि अभय यांना **बन्धम्, च मोक्षम्** - बंध आ णि मोक्षाला **वेत्ति** - जाणते **सा बुद्धिः** - ती बुद्धी **सात्त्विकी** - सात्त्विकी आहे.

**विवरण** - परमात्म्याच्या प्राप्तिकरिता शास्त्रविहित निष्काम भावाने कर्माचे आचरण करणाऱ्या प्रवृत्तिमार्गाला, तसेच परमात्म्याच्या प्राप्तिकरिता संसारापासून विरक्त होऊन आणि संन्यास आश्रम स्वीकार करून अहंता, ममता आणि आसक्ति त्यागपूर्वक शम, दम, तितिक्षा आदि साधनांच्याद्वारा निरंतर श्रवण, मनन आणि निदिध्यासन करणाऱ्या निवृत्ति मार्गाला, शास्त्रविहित कर्तव्य आणि शास्त्रनिषिद्ध अकर्तव्य कर्माला, दुःखप्रद घटनांच्याद्वारा उत्पन्न होणाऱ्या भयाला तसेच या विपरीत अभयाला जन्ममृत्युरूप बंधाला आणि या विपरीत जन्ममृत्युनाशरूप मोक्षाला जी बुद्धी यथार्थ रूपाने जाणते ती बुद्धी सात्त्विकी अशी म्हटली जाते.

**व्याकरणम् - पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **या** - यत् सर्व.स्त्री.प्र.ए.व. **प्रवृत्तिम्** - प्रवृत्ति स्त्री.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **निवृत्तिम्** - निवृत्ति स्त्री.द्वि.ए.व. **कार्याकार्ये** - कार्य-कृ अ.ग.उ.प.कर्म.ण्यत् वि. अ+कार्य न.द्वि. द्वि.व. **भयाभये** - भी तृ.ग.प.प.+अच्=भय, अ+भय=अभय न.द्वि.द्वि.व. **बन्धम्** - बन्ध पु.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **मोक्षम्** - मोक्ष पु.द्वि.ए.व. **वेत्ति** - विद् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **सा** - तत् सर्व.स्त्री.प्र.ए.व.

**बुद्धिः -** बुद्धि स्त्री.प्र.ए.व. **सात्त्विकी -** सात्त्विकी स्त्री.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - कार्याकार्ये -** कार्यश्चाकार्यश्चेति कार्याकार्ये = कार्य आणि अकार्याला**(द्व.स.) भयाभये -** भयश्चाभयश्चेति भयाभये = भय आणि अभयाला**(द्व.स.) सात्त्विकी -** सत्त्वस्य-सत्त्वगुणस्येयं सात्त्विकी = सत्त्वसंबंधी ती सात्त्विकी**(सम्बन्धार्थे त.वि.)**

राजस बुद्धिचे लक्षण-

**यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च ।**

**अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ॥३१॥**

**अन्वयः -** पार्थ, यया, धर्मम्, च, अधर्मम्, च, कार्यम्, च, अकार्यम्, एव, अयथावत्, प्रजानाति, सा, बुद्धिः, राजसी ।

**अन्वयार्थः - पार्थ -** हे अर्जुना! **यया -** ज्या बुद्धिच्याद्वारा **धर्मम्, च अधर्मम् -** धर्म आणि अधर्म यांना **च -** आणि **कार्यम्, च, अकार्यम्, एव -** कार्य आणि अकार्यालाही **अयथावत् -** अयथार्थरूपाने **प्रजानाति -** जाणते **सा -** ती **बुद्धिः -** बुद्धी **राजसी -** राजसी आहे.

**विवरण -** जे शास्त्रविहित सांगितलेले अहिंसा, सत्य, दया, शांति, ब्रह्मचर्य तसेच यज्ञ, दान, तप याप्रमाणे अध्ययन, अध्यापन आदि धर्माला आणि कपट, चोरी व्यभिचार, हिंसा, दंभ आदि अधर्माला तसेच कर्तव्य आणि अकर्तव्याला जी बुद्धी यथार्थरूपाने जाणत नाही ती बुद्धी राजसी म्हटली जाते.

**व्याकरणम् - पार्थ -** पार्थ पु.संबो.ए.व. **यया -** यत् सर्व.स्त्री.तृ.ए.व. **धर्मम् -** धर्म पु.द्वि.ए.व. **च -** च उभ.अ. **अधर्मम् -** अ+धर्म पु.द्वि.ए.व. **च -** च उभ.अ. **कार्यम् -** कृ अ.ग.उ.प.कर्म.ण्यत् वि.न.द्वि.ए.व. **च -** च उभ.अ. **अकार्यम् -** अ+कृ अ.ग.उ.प.कर्म.ण्यत् वि.न.द्वि.ए.व. **एव -** एव क्रि.वि.अ. **अयथावत् -** यद्+थाल्=यथा,न+यथा=अयथा+वत्=अयथावत् अ. **प्रजानाति -** प्र+ज्ञा न.ग.उ.प.वर्त.तृ.पु.ए.व. **सा -** तत् सर्व.स्त्री.प्र.ए.व. **बुद्धिः -** बुद्धि स्त्री.प्र.ए.व. **राजसी -** राजसी वि.स्त्री.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अकार्यम् -** कर्तुं योग्यमिति कार्यम् न कार्यमित्यकार्यम् = करण्याकरिता योग्य ते कार्य जे कार्य नाही ते अकार्य त्याला**(न.त.स.) अयथावत् -** यथावत्-यथाशास्त्रं न भवति तदयथावत्-संशयास्पदत्वेन = जे यथावत् म्हणजे यथाशास्त्र नाही ते अयथावत्-संशयास्पदत्वाने**(न.त.स.)** यद्वा **अयथावत् -** यथा इव वर्तते इति यथावत्, न यथावदित्ययथावत् = ज्याप्रमाणे आहे त्याप्रमाणे असणारा किंवा वागणारा यथावत् नाही यथावत् तो अयथावत्**(न.त.स.) अधर्मम् -** न धर्ममित्यधर्मम् = जो धर्म नाही तो अधर्म त्या अधर्माला**(न.त.स.)**

तामसी बुद्धिचे लक्षण -

**अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता ।**

**सर्वार्थान्विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ॥३२॥**

**अन्वयः -** पार्थ, या, तमसा, आवृता (बुद्धिः), अधर्मम्, धर्मम्, इति, च, सर्वार्थान् (पदार्थान्) विपरीतान्, मन्यते, सा, बुद्धिः, तामसी ।

**अन्वयार्थ: - पार्थ** - हे पृथापुत्र अर्जुना! **या** - जी **तमसा, आवृता (बुद्धि:)** - अज्ञानाने ग्रस्त झालेली बुद्धी **अधर्मम्, धर्मम्, इति** - अधर्माला धर्म असे **च** - आणि **सर्वार्थान्, विपरीतान्** - सर्व पदार्थाला विपरीत **मन्यते** - समजते **सा बुद्धि:** - ती बुद्धी **तामसी** - तामसी आहे.

**विवरण** - अज्ञानाने मोहित झालेली बुद्धी, चोरी, कपट, व्यभिचार आदि जे अधर्म त्यांना ती धर्म समजते, त्याचप्रमाणे दुसऱ्या सर्व पदार्थांना विपरीत मानते म्हणजे समजते ती बुद्धी तामसी बुद्धी म्हटली जाते.

**व्याकरणम् - पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **या** - यत् सर्व.स्त्री.प्र.ए.व. **तमसा** - तमस् न.तृ.ए.व. **आवृता** - आ+वृ पं.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.स्त्री.प्र.ए.व. **अधर्मम्** - अ+धर्म पु.द्वि.ए.व. **धर्मम्** - धर्म पु.द्वि.ए.व. **इति** - इति क्रि.वि.अ. **च** - च उभ.अ. **सर्वार्थान्** - सर्व वि. अर्थ पु.द्वि.ब.व. **विपरीतान्** - वि+परि+इ द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.द्वि.ब.व. **मन्यते** - मन् च.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **सा** - तत् सर्व.स्त्री.प्र.ए.व. **बुद्धि:** - बुद्धि स्त्री.प्र.ए.व. **तामसी** - तामसी वि.स्त्री.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - अधर्मम्** - न धर्म इत्यधर्मस्तमधर्मम् = जो धर्म नाही तो अधर्म त्याला**(न.त.स.)** **सर्वार्थान्** - सर्वे च समस्ताश्च ते अर्थाश्च-प्रयोजनानि चेति सर्वार्थास्तान् सर्वार्थान्-लौकिकपदार्थान् = सर्व पदार्थांना**(क.स.)** **तामसी** - तमस इयं तामसी = तम संबंधी तामसी**(सम्बन्धार्थे त.वि.)**

सात्त्विक धृतिचे लक्षण -

**धृत्या यया धारयते मन:प्राणेन्द्रियक्रिया: ।**

**योगेनाव्यभिचारिण्या धृति: सा पार्थ सात्त्विकी ॥३३॥**

**अन्वय:** - योगेन, अव्यभिचारिण्या, यया, धृत्या, मन:, प्राणेन्द्रियक्रिया:, धारयते, पार्थ, सा, धृति:, सात्त्विकी ।

**अन्वयार्थ: - योगेन** - ध्यानयोगाच्या द्वारा **अव्यभिचारिण्या** - अव्यभिचारिणी अशा **यया धृत्या** - ज्या धारणाशक्तिच्या द्वारा **मन: प्राणेन्द्रियक्रिया:** - मन, प्राण आणि इंद्रिय यांच्या क्रिया (मनुष्य) **धारयते** - धारण करतो **पार्थ** - हे पृथापुत्र अर्जुना! **सा** - ती **धृति:** - धृति **सात्त्विकी** - सात्त्विक आहे.

**विवरण** - ध्यानयोगाच्या द्वारा विचलित न होणाऱ्या म्हणजे चिरकालपर्यंत स्थिर राहणाऱ्या तसेच निश्चित उद्देश स्थिर करणाऱ्या ज्या अव्यभिचारिणी धृतिच्या द्वारा मन, प्राण आणि इंद्रिय यांच्या क्रिया मनुष्य धारण करतो त्यावेळी त्या धृतिला सात्त्विक धृति म्हटली जाते.

**व्याकरणम् - योगेन** - योग पु.तृ.ए.व. **अव्यभिचारिण्या** - अव्यभिचारिणी स्त्री.तृ.ए.व. **यया** - यत् सर्व.स्त्री.तृ.ए.व. **धृत्या** - धृति स्त्री.तृ.ए.व. **मन:प्राणेन्द्रियक्रिया:** - मनस् न. प्राण पु. इन्द्रिय न. क्रिया स्त्री.प्र.ब.व. **धारयते** - धृ प्र.ग.उ.प.(आ.प.)+वर्त.णिच्=धारय तृ.पु.ए.व. **पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **सा** - तत् सर्व.स्त्री.प्र.ए.व. **धृति:** - धृति स्त्री.प्र.ए.व. **सात्त्विकी** - सात्त्विकी वि.स्त्री.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - अव्यभिचारिण्या**- व्यभिचरति सा व्यभिचारिणी, व्यभिचारिणी न भवति सा अव्यभिचारिणी तया अव्यभिचारिण्या-नित्यसमाध्यनुगतया = जी व्यभिचारिणी नाही ती अव्यभिचारिणी-नित्यसमाधिने अनुगत-व्याप्त तिच्याद्वारा**(न.त.स.)** **मन:प्राणेन्द्रियक्रिया:** - मनश्च-अन्त:करणश्च, प्राणश्च

प्राणापानरूपस्य-प्रवृत्तकर्मजननानुकूलशक्तिश्च, इन्द्रियाणि-ज्ञानेन्द्रियाणि च, मन:-प्राणेन्द्रियाणि, तेषां क्रिया: -चेष्टा इति मन:प्राणेन्द्रियाक्रिया: = मन, प्राण आणि इंद्रिय यांच्या क्रिया**(द्व.ग.ष.त.स.)**

राजसी धृतिचे लक्षण -

**यया तु धर्मकामार्थान्धृत्या धारयतेऽर्जुन।**

**प्रसङ्गेन फलाकाङ्क्षी धृति: सा पार्थ राजसी ॥३४॥**

**अन्वय:** - तु, अर्जुन, फलाकाङ्क्षी, यया, धृत्या, प्रसङ्गेन, धर्मकामार्थान्, धारयते, पार्थ, सा, धृति:, राजसी।

**अन्वयार्थ: - तु -** परंतु **अर्जुन -** हे अर्जुना! **फलाकाङ्क्षी -** फलाची इच्छा करणारा पुरुष **यया धृत्या -** ज्या धारणाशक्तिच्या द्वारा **प्रसङ्गेन -** प्रसंगवशात् **धर्मकामार्थान् -** धर्म, काम आणि अर्थ यांना **धारयते -** धारण करतो म्हणून **पार्थ -** हे अर्जुना! **सा -** ती **धृति: -** धृति **राजसी -** राजसी आहे.

**विवरण -** कर्माचे फलस्वरूप इहलोक आणि परलोकच्या अनेक प्रकारच्या भोग्य विषयांची इच्छा करणारा सकाम पुरुष ज्या धारणाशक्तिच्याद्वारा अत्यंत आसक्त होऊन धर्म, अर्थ आणि काम यांना धारण करतो म्हणून हे अर्जुना! या धृतिला राजसी धृति म्हटले आहे.

**व्याकरणम् - तु -** तु उभ.अ. **अर्जुन -** अर्जुन पु.संबो.ए.व. **फलाकाङ्क्षी -** फल न. आकाङ्क्षिन् पु.प्र.ए.व. **यया -** यत् सर्व.स्त्री.तृ.ए.व. **धृत्या -** धृति स्त्री.तृ.ए.व. **प्रसङ्गेन -** प्रसङ्ग पु.तृ.ए.व. **धर्मकामार्थान् -** धर्म पु. काम पु. अर्थ पु.द्वि.ब.व. **धारयते -** धृ प्र.ग.उ.प.(आ.प.)वर्त.णिच् तृ.पु.ए.व. **पार्थ -** पार्थ पु.संबो.ए.व. **सा -** तत् सर्व.स्त्री.प्र.ए.व. **धृति: -** धृति स्त्री.प्र.ए.व. **राजसी -** राजसी वि.स्त्री.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - धर्मकामार्थान्-** धर्मश्च कामश्चाऽर्थश्चेति धर्मकामार्थास्तान् धर्मकामार्थान् = धर्म, काम आणि अर्थ यांना**(द्व.स.) फलाकाङ्क्षी -** फलमाकाङ्क्षत इच्छति यद्वा फलस्याऽऽकाङ्क्षीति फलाकाङ्क्षी = फलाला इच्छितो अथवा फलाची इच्छा करणारा असा फलाकांक्षी**(उप./ष.त.स.) राजसी -** रजस:-रजोगुणस्येयं राजसी = रजोगुण संबंधी राजसी**(सम्बन्धार्थे त.वि.)**

तामसी धृतिचे लक्षण -

**यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च।**

**न विमुञ्चति दुर्मेधा धृति: सा पार्थ तामसी ॥३५॥**

**अन्वय:** - पार्थ, दुर्मेधा:, यया, (धृत्या) स्वप्नम्, भयम्, शोकम्, विषादम्, च, मदम्, एव, न, विमुञ्चति, सा, धृति:, तामसी।

**अन्वयार्थ: - पार्थ -** हे पृथापुत्र अर्जुना! **दुर्मेधा: -** दुर्बद्धि पुरुष **यया (धृत्या) -** ज्या धारणाशक्तिच्या योगाने **स्वप्नम् -** निद्रेला **भयम् -** भयाला **शोकम् -** शोकाला **विषादम् -** खेदाला **च -** आणि **मदम्, एव-** मदालाही **न विमुञ्चति -** सोडीत नाही **सा -** ती **धृति: -** धृति **तामसी -** तामसी आहे.

**विवरण -** अत्यंत मंद आणि मलिन बुद्धिवान तसेच दुसऱ्याचे अनिष्ट करण्याची इच्छा करणारा असा दुर्बुद्धी पुरुष ज्या धृतिच्या योगाने निद्रेला, भयाला, चिंतेला, खेदाला आणि उन्मत्तपणाला सोडीत नाही अशा त्या धृतिला तामसी धृति म्हटले आहे.

**व्याकरणम् - पार्थ -** पार्थ पु.संबो.ए.व. **दुर्मेधाः -** दुर्+मेध् प्र.ग.उ.प.+असुन्=दुर्मेधस् स्त्री.प्र.ए.व. **यया -** यत् सर्व.स्त्री.तृ.ए.व. **स्वप्नम् -** स्वप् द्वि.ग.प.प.+नन्=स्वप्न पु.द्वि.ए.व. **भयम् -** भय न.द्वि.ए.व. **शोकम् -** शोक पु.द्वि.ए.व. **विषादम् -** वि+सद्+घञ्=विषाद पु.द्वि.ए.व. **च -** उभ.अ. **मदम् -** मद पु.द्वि.ए.व. **एव -** एव क्रि.वि.अ. **न -** न क्रि.वि.अ. **विमुञ्चति -** वि+मुच् ष.ग.उ.प.(प.प.)वर्त.तृ.पु.ए.व. **सा -** तत् सर्व.स्त्री.प्र.ए.व. **धृतिः -** धृति स्त्री.प्र.ए.व. **तामसी -** तामसी वि.स्त्री.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - दुर्मेधाः -** दुष्टा-निषिद्धाचरणे निष्ठा-तमोदोषदूषिता-कुत्सिता, मेधा-बुद्धिर्यस्य स दुर्मे धापुरुषः = निषिद्ध आचरणामध्ये निष्ठा तमोदोषाने दूषित कुत्सित-अत्यंत निंद्य बुद्धी आहे ज्याची तो **(ब.स.)**

तीन गुणाच्या अनुसार सुखाच्या भेदाला ऐकण्याकरिता आज्ञा -

**सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ ।**

**अभ्यासाद्रमते यत्र दुःखान्तं च निगच्छति ॥३६॥**

**अन्वयः -** भरतर्षभ, तु, इदानीम्, त्रिविधम्, सुखम्, मे शृणु, यत्र, अभ्यासात्, रमते, च, दुःखान्तम्, निगच्छ ति ।

**अन्वयार्थः - भरतर्षभ-** हे भरतश्रेष्ठ अर्जुना! **तु -** परंतु **इदानीम् -** आता (यावेळी) (**तत्**-ते) **त्रिविधम् -** तीन प्रकारचे **सुखम् -** सुखाला **शृणु -** ऐक. **यत्र -** ज्या सुखाच्या ठिकाणी **अभ्यासात्-** (प्राणी) अभ्यासाच्या योगाने **रमते -** रममाण होतो **च -** आणि **दुःखान्तम् -** दुःखाच्या नाशाला **निगच्छति -** अवश्य प्राप्त होतो.

**विवरण -** उपर्युक्त कथित केल्याप्रमाणे या ठिकाणी सुद्धा मी तुला सात्त्विक सुखाच्या प्राप्तिकरिता तसेच राजस आणि तामस सुखाच्या त्यागाकरिता तीन प्रकारच्या सुखाचे भेद सांगत आहे. अशा त्या तीन प्रकारच्या सुखाच्या भेदाला माझ्याकडून चांगल्या प्रकारे श्रवण कर. कारण, ज्या सात्त्विक सुखाला प्राप्त झालेला पुरुष आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक इ. सर्व प्रकारच्या दुःखनाशाच्या शांतिला प्राप्त होतो.

**व्याकरणम् - भरतर्षभ -** भरत पु. ऋषभ पु.संबो.ए.व. **तु -** तु उभ.अ. **इदानीम् -** इदानीम् अ. **त्रिविधम् -** त्रि संख्या वा.वि. विध न.द्वि.ए.व. **सुखम् -** सुख न.द्वि.ए.व. **शृणु -** श्रु प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **यत्र -** यत्र त्रल् प्रत्ययान्त तद्धित सप्तम्यन्त अ. **अभ्यासात् -** अभ्यास पु.पं.ए.व. **रमते -** रम् प्र.ग.आ.प. वर्त.तृ.पु.ए.व. **च -** च उभ.अ. **दुःखान्तम् -** दुःख न. अन्त वि.पु.द्वि.ए.व. **निगच्छति -** नि+गम् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - दुःखान्तम् -** दुःखस्य-त्रिविधतापस्य, अन्तः-नाशः दुःखान्तस्तं दुःखान्तम् = त्रिविध दुःखाच्या नाशाला**(ष.त.स.)**

सात्त्विक सुखाचे लक्षण -

**यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ।**

**तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥३७॥**

**अन्वयः -** यत्, तत्, अग्रे, विषम्, इव, परिणामे, अमृतोपमम्, तत्, आत्मबुद्धिप्रसादजम्, सुखम्, सात्त्विकम्, प्रोक्तम् ।

**अन्वयार्थः- यत् -** जे **तत् -** ते सुख **अग्रे -** आरंभी **विषम्, इव -** विषासारखे दुःखात्मक असते परंतु **परिणामे -** परिणामी (अंती-शेवटी) **अमृतोपमम् -** अमृताप्रमाणे सुखकारक वाटते **तत् -** ते **आत्मबुद्धिप्रसादजम्, सुखम् -** आत्मविषयक बुद्धिच्या प्रसादापासून उत्पन्न झालेले सुख **सात्त्विकम् -** सात्त्विक **प्रोक्तम् -** संबोधित केले गेले आहे-म्हटले गेले आहे.

**विवरण -** आरंभी सात्त्विक सुखाला प्राप्त करण्याकरिता विवेक, वैराग्य, शम, दम, आणि तितिक्षा आदि साधनांच्या द्वारा विषप्रमाणे दुःखात्मक अनेक प्रकारचे कष्ट सहन करावे लागतात. परंतु, शेवटी हळु-हळु त्या साधन अभ्यासाच्या द्वारा ध्यानजनित सात्त्विक सुखाचा अनुभव येऊन ते सुख त्याला अमृतासारखे वाटते. असे हे आत्मविषयक बुद्धिच्या प्रसादापासून उत्पन्न झालेले सुख सात्त्विक सुख म्हटले गेले आहे.

**व्याकरणम् - यत् -** यत् सर्व.न.प्र.ए.व. **तत् -** तत् सर्व.न.प्र.ए.व. **अग्रे -** अग्र अ. **विषम् -** विष न.प्र.ए.व. **इव -** इव अ. **परिणामे -** परि+नम् प्र.ग.प.प.+घञ्=परिणाम पु.स.ए.व. **अमृतोपमम् -** अमृत न. उपम न.प्र.ए.व. **तत् -** तत् सर्व.न.प्र.ए.व. **आत्मबुद्धिप्रसादजम् -** आत्मन् पु. बुद्धि स्त्री. प्रसाद पु. ज वि.न.प्र.ए.व. **प्रोक्तम् -**प्र+वच् द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - आत्मबुद्धिप्रसादजम् -** आत्मनि परमेश्वरे बुद्धिरात्मबुद्धिः, आत्मबुद्धेः प्रसाद इति आत्मबुद्धिप्रसाद आत्मबुद्धिप्रसादात् जातं आत्मबुद्धिप्रसादजम् = आत्म्यामध्ये असणाऱ्या बुद्धिच्या प्रसादापासून उत्पन्न झालेले**(स.ग.ष.ग.प.त.स.)** यद्वा **आत्मबुद्धिप्रसादजम् -** आत्मनो बुद्धिरात्मबुद्धिरात्मबुद्धेः प्रसादः- नैर्मल्यं सलिलवत् स्वच्छता ततो जातमात्मबुद्धिप्रसादजम् = आपली जी बुद्धी ती आत्मबुद्धि. आत्मबुद्धिचा जो प्रसाद म्ह. निर्मलता जलाप्रमाणे स्वच्छता तो आत्मबुद्धिप्रसाद त्यापासून झालेले ते आत्मबुद्धिप्रसादज सुख**(ष.ग.ष.ग.प.त.स.)** यद्वा **आत्मबुद्धिप्रसादजम् -** आत्मविषया बुद्धिरात्मबुद्धिस्तस्याः प्रसादो निद्रालस्यादिराहित्येन स्वच्छतयाऽवस्थानं ततो जातमात्मबुद्धिप्रसादजम् = आत्मविषया बुद्धी आत्मबुद्धी आत्मबुद्धिचा प्रसाद आत्मबुद्धिप्रसाद-निद्रा, आलस्यादिने रहित असल्यामुळे जो स्वच्छरूपाने अवस्थान-स्थिति त्यापासून उत्पन्न आत्मबुद्धिप्रसादज सुख**(स.ग.ष.ग.प.त.स.) सात्त्विकम् -** सत्त्वस्य-सत्त्वगुणस्येदं सात्त्विकम् = सत्त्वगुणद्वारा उत्पन्न**(जातार्थे त.वि.)**

राजस सुखाचे लक्षण -

**विषयेन्द्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ।**

**परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ॥३८॥**

**अन्वयः -** यत्, सुखम्, विषयेन्द्रियसंयोगात्, तत्, अग्रे, अमृतोपमम्, परिणामे, विषम्, इव, तत्, सुखम्,

राजसम्, स्मृतम्।

**अन्वयार्थ: - यत् -** जे **सुखम् -** सुख **विषयेन्द्रियसंयोगात् -** विषय आणि इंद्रियांच्या संयोगापासून उत्पन्न झालेले असते **तत् -** ते **अग्रे -** आरंभी **अमृतोपमम् -** अमृतासारखे असते आणि **परिणामे -** परिणामी (शेवटी) **विषमिव -** विषासारखे दु:खात्मक असते **तत् -** ते **सुखम् -** सुख **राजसम् -** राजस **स्मृतम् -** म्हटले गेले आहे.

**विवरण -** जे सुख विषय आणि इंद्रिय यांच्या संयोगापासून उत्पन्न झालेले असते ते सुख आरंभाला आनंददायक म्हणजे अमृतासारखे वाटते परंतु विषय भोगाची इच्छा करून त्यामध्ये आसक्त म्हणजे रममाण होणाऱ्या पुरुषाला अनेक प्रकारच्या पापकर्माचे दु:खरूपी म्हणजे पशु-पक्षी तसेच नरकादि योनी आदि फल भोगावे लागतात म्हणजे ते सुख आरंभी अमृतासारखे गोड असले तरी परंतु शेवटी विषाप्रमाणे दु:खात्मक कडू असते अशा त्या सुखाला राजस सुख म्हटले जाते.

**व्याकरणम् - यत् -** यत् सर्व.न.प्र.ए.व. **विषयेन्द्रियसंयोगात् -** विषय पु. इन्द्रिय न. संयोग पु.पं.ए.व. **तत् -** तत् सर्व.न.प्र.ए.व. **अग्रे -** अग्र न.स.ए.व. **अमृतोपमम् -** अमृत न. उपम न.प्र.ए.व. **परिणामे -** परिणाम पु.स.ए.व. **विषम् -** विष न.प्र.ए.व. **इव -** इव अ. **तत् -** तत् सर्व.न.प्र.ए.व. **राजसम् -** राजस वि.न.प्र.ए.व. **स्मृतम् -** स्मृ प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - विषयेन्द्रियसंयोगात् -** विषयाश्च-शब्दस्पर्शरूपरसगन्धविषयाश्च इन्द्रियाणि च-श्रोत्रादीनि चेति विषयेन्द्रियाणि, विषयेन्द्रियाणां संयोग:-सम्बन्धो विषयेन्द्रियसंयोगस्तस्मात् विषयेन्द्रियसंयोगात् = विषय आणि इंद्रिय यांच्या संयोगापासून**(द्व.ग.ष.त.स.) अमृतोपमम् -** अमृतमुपमा-उपमानं यस्य तदमृतोपमम्-अमृततुल्यम् = अमृतच उपमा ज्याची ते अमृतोपम**(ब.स.)**

तामस सुखाचे लक्षण -

**यदग्रे चानुबन्धे च सुखं मोहनमात्मन: ।**

**निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ॥३९॥**

**अन्वय:** - यत्, सुखम्, अग्रे, च, अनुबन्धे, च, आत्मन:, मोहनम्, (तथा) निद्रालस्यप्रमादोत्थम्, तत्, तामसम्, उदाहृतम्।

**अन्वयार्थ: - यत्, सुखम् -** जे सुख **अग्रे -** आरंभी **च -** आणि **अनुबन्धे च -** परिणामी-अंती सुद्धा **आत्मन:, मोहनम् -** आत्म्याला मोहित करणारे असून (**तथा -** त्याच प्रमाणे ) **निद्रालस्यप्रमादोत्थम् -** निद्रा, आळस आणि प्रमाद यापासून उत्पन्न झालेले असते **तत् -** ते सुख **तामसम् -** तामस **उदाहृतम् -** म्हटले गेले आहे.

**विवरण -** आरंभी आणि शेवटी आत्म्याला मोहित करणारे असून तसेच मन आणि इंद्रियांच्या विश्रांतिपासून उत्पन्न होणारे निद्राजनित तसेच मन, इंद्रिये आणि शरीराच्या परिश्रमाचा त्याग करून आरामापासून प्राप्त होणारे आलस्यजनित तसेच व्यर्थ क्रिया करण्यामध्ये मनाला आसक्त करून शास्त्रविहित कर्तव्य कर्माच्या त्यागापासून उत्पन्न होणारे प्रमाजनित जे सुख असते ते सुख तामस सुख म्हटलेले आहे.

**व्याकरणम् - यत्** - यत् सर्व.न.प्र.ए.व. **सुखम्** - सुख न.प्र.ए.व. **अग्रे** - अग्र न.स.ए.व. **च** - च उभ.अ. **अनुबन्धे** - अनु+बन्ध पु.स.ए.व. **च** - च उभ.अ. **आत्मनः** - आत्मन् पु.ष.ए.व. **मोहनम्** - मोहन वि.न.प्र.ए.व. **निद्रालस्यप्रमादोत्थम्** - निद्रा स्त्री. आलस्य न. प्रमाद पु. उत्थ वि.न.प्र.ए.व. **तत्** - तत् सर्व.न.प्र.ए.व. **तामसम्** - तामस वि.न.प्र.ए.व. **उदाहृतम्** - उद्+आ+हृ प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा. वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - निद्रालस्यप्रमादोत्थम्** - निद्रा च-सुषुप्तिश्च आलस्यश्च-बुद्धिजाड्यश्च-तन्द्रा च, प्रमादश्च-बुद्धिपारवश्यश्चेति निद्राऽऽलस्यप्रमादास्तेभ्यो उत्थम्-उत्पन्नं जातमिति निद्रालस्यप्रमादोत्थम् = निद्रा, आळस आणि प्रमाद यांच्या पासून उत्पन्न होणारे**(द्व.ग.प.त.स.) मोहनम्** - मुह्यति तत् मोहनम् = मोहित करणारे ते **(वि.)आलस्यम्** - अलसस्य भावमालस्यम्-बुद्धिजाड्यम् = अलसाचा भाव आलस्य म्हणजे बुद्धिची जडता**(भावार्थे त.वि.)**

तीन गुणांच्या प्रसंगाचा उपसंहार -

**न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ।**

**सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः ॥४०॥**

**अन्वयः** - यत्, एभिः, त्रिभिः, प्रकृतिजैः, गुणैः, मुक्तम्, स्यात्, तत्, सत्त्वम्, पृथिव्याम्, वा, दिवि, वा देवेषु, पुनः, न, अस्ति ।

**अन्वयार्थः - यत्** - जो **एभिः, त्रिभिः, प्रकृतिजैः गुणैः** - या प्रकृतिजन्य गुणाकडून **मुक्तम्** - मुक्त **स्यात्** - असेल **तत्, सत्त्वम्** - असा तो (कोणताही) प्राणी **पृथिव्याम्, वा दिवि वा देवेषु पुनः** - पृथ्वीमध्ये अथवा स्वर्गामध्ये अथवा देवामध्ये सुद्धा **न अस्ति** - मिळणार नाही.

**विवरण** - संपूर्ण पदार्थ प्रकृतिजनित सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांचे कार्य असल्यामुळे प्रकृतिजनित गुणांच्या संबंधानेच प्राणिमात्रांचा नाना प्रकारच्या योनिमध्ये जन्म होतो म्हणून पृथ्वीलोक, अंतरिक्षलोक आणि देवलोकामध्ये असा कोणताही प्राणी नाही की तो या तीन गुणानेच युक्त नाही.

**व्याकरणम् - यत्**- यत् सर्व.न.प्र.ए.व. **एभिः** - इदम् सर्व.पु.तृ.ब.व. **त्रिभिः** - त्रि संख्या वा.वि.पु.तृ.ब.व. **प्रकृतिजैः** - प्रकृति स्त्री. ज वि.पु.तृ.ब.व. **गुणैः** - गुण पु.तृ.ब.व. **मुक्तम्** - मुच् ष.ग.उ.प.कर्म.भू.धा. वि.पु.प्र.ए.व. **स्यात्** - अस् द्वि.ग.प.प.विध्यर्थ तृ.पु.ए.व. **पृथिव्याम्** - पृथिवी स्त्री.स.ए.व. **वा** - वा उभ.अ. **दिवि** - दिव् स्त्री.स.ए.व. **वा** - वा उभ.अ. **देवेषु** - देव पु.स.ब.व. **पुनः** - पुनर् अ. **न** - न क्रि. वि.अ. **अस्ति** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - प्रकृतिजैः** - प्रकृतेः-मायायाः, जाताः-उत्पन्नास्तैः प्रकृतिजैः-वैषम्यावस्थां प्राप्तैः = प्रकृतिपासून उत्पन्न जे त्यांच्याकडून-वैष्यम्यावस्थेला प्राप्त असलेल्याकडून**(प.त.स.)**

वर्णधर्माच्या विषयाचा आरंभ -

**ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परन्तप ।**

**कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥४१॥**

**अन्वयः** - परन्तप, ब्राह्मणक्षत्रियविशाम्, च, शूद्राणाम्, कर्माणि, स्वभावप्रभवैः, गुणैः, प्रविभक्तानि।

**अन्वयार्थः - परन्तप** - हे शत्रूला ताप देणाऱ्या अर्जुना! **ब्राह्मणक्षत्रियविशाम्** - ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांची **च** - आणि **शूद्राणाम्** - शूद्र यांची **कर्माणि** - कर्मे **स्वभावप्रभवैः गुणैः** - स्वभावसिद्ध गुणांच्या योगाने **प्रविभक्तानि** - विभागली गेली आहेत.

**विवरण** - सत्त्वगुण अधिक असणारा ब्राह्मण, सत्त्वमिश्रित रजोगुण अधिक असणारा क्षत्रिय, तमोमिश्रित रजोगुण अधिक असणारा वैश्य, रजोमिश्रित तमोगुण अधिक असणारा शूद्र अशा उपर्युक्त कथित ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र, यांची कर्मे स्वभावापासून उत्पन्न झालेल्या सत्त्वादि गुणांनी विभाजित केलेली आहेत.

**व्याकरणम् - परन्तप** - परन्तप पु.संबो.ए.व. **ब्राह्मणक्षत्रियविशाम्** - ब्राह्मण पु. क्षत्रिय पु. विश् पु.ष.ब.व. **च** - च उभ.अ. **शूद्राणाम्** - शूद्र पु.ष.ब.व. **कर्माणि** - कर्मन् न.प्र.ब.व. **स्वभावप्रभवैः** - स्वभाव पु. प्रभव पु.तृ.ब.व. **गुणैः** - गुण पु.तृ.ब.व. **प्रविभक्तानि** - प्र+वि+भज् प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ब.व.

**समासविग्रहार्थाः - ब्राह्मणक्षत्रियविशाम्** - ब्राह्मणाश्च, क्षत्रियाश्च विशश्चेति ब्राह्मणक्षत्रियविशस्तेषां ब्राह्मणक्षत्रियविशाम् = ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांची**(द्व.स.) स्वभावप्रभवैः** - स्वभावात्-त्रिगुणात्मिकाप्रकृत्याः प्रभवः-उत्पत्तिर्येषां ते स्वभावप्रभवास्तैः स्वभावप्रभवैः = त्रिगुणात्मक प्रकृतीपासून प्रभव-उत्पत्ति आहे ज्यांची ते त्यांच्याकडून**(ब.स.)** यद्वा **स्वभावप्रभवैः** - स्वभाव-ईश्वरस्य प्रकृतिस्त्रिगुणात्मिका माया सा प्रभवो येषां गुणानां ते स्वभावप्रभवास्तैः स्वभावप्रभवैः = स्वभाव-ईश्वराची प्रकृती म्ह.त्रिगुणात्मिका माया, मायाच ज्या गुणांच्या प्रभाव-उत्पत्तिचे कारण आहे असे ते त्यांच्याद्वारा**(ब.स.)** यद्वा **स्वभावप्रभवैः** - स्वेषां भावः स्वभावो मुखबाह्वादिभ्यो जननम्-प्रभवः कारणं येषां तैः स्वभावप्रभवैः = आप-आपला भाव स्वभाव आहे मुख, बाहु आदिच्याद्वारा जनन-प्रभव-कारण आहे ज्यांचा ते त्यांच्याकडून**(ब.स.)**

ब्राह्मणाच्या स्वाभाविक कर्माचे वर्णन -

**शमो दमस्तपः शौचं क्षान्तिरार्जवमेव च।**

**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥४२॥**

**अन्वयः**- शमः, दमः, तपः, शौचम्, क्षान्तिः, आर्जवम्, ज्ञानम्, विज्ञानम्, च, आस्तिक्यम्, एव, ब्रह्मकर्मस्वभावजम्।

**अन्वयार्थः - शमः** - शम **दमः** - दम **तपः** - तप **शौचम्** - बाह्य आणि आंतर शुद्धि **क्षान्तिः** - क्षमा **आर्जवम्** - मनाचा सरळपणा **ज्ञानम्** - ज्ञान **विज्ञानम्** - अनुभवयुक्त ज्ञान **च** - आणि **अस्तिक्यम्, एव** - आस्तिक्यबुद्धीच **ब्रह्मकर्म स्वभावजम्** - ब्राह्मणाची प्रकृती-स्वभावजन्य कर्म आहे.

**विवरण** - अंतःकरणाचा निग्रह शम, तसेच इंद्रियांचे दमन करणे दम, धर्मपालनाकरिता कष्ट सहन करणे तप, बाह्य आंतर शुद्धि ठेवणे शौच, दुसऱ्याच्या अपराधाची क्षमा करणे क्षान्ति, मन, इंद्रिय आणि शरीर सरळ असणे आर्जव, वेद शास्त्रांचे अध्ययन व अध्यापन करणे ज्ञान, परमात्म्याच्या तत्त्वाचा अनुभव घेणे विज्ञान, वेद, शास्त्र, ईश्वर आणि परलोक यांच्या विषयी विश्वास ठेवणे आस्तिक्य, ही सर्वच ब्राह्मणाची स्वाभाविक कर्मे आहेत.

**व्याकरणम् - शमः** - शम पु.प्र.ए.व. **दमः** - दम पु.प्र.ए.व. **तपः** - तपस् न.प्र.ए.व. **शौचम्** - शौच न.प्र.ए.व. **क्षान्तिः** - क्षम् प्र.ग.आ.प.+(क्तिन् अनुनासिकस्य क्विझलोः क्ङिति ६/४/१५) क्षान्ति स्त्री.प्र.ए.व. **आर्जवम्** - आर्जव न.प्र.ए.व. **ज्ञानम्** - ज्ञान न.प्र.ए.व. **विज्ञानम्** - वि+ज्ञान न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **आस्तिक्यम्** - आस्तिक्य न.प्र.ए.व. **एव** - एव निश्चयार्थक अ. **ब्रह्मकर्म स्वभावजम्** - ब्रह्मन् न. कर्मन् न. स्वभाव पु. ज वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - ब्रह्मकर्म** - ब्राह्मणः-ब्राह्मणस्य मुमुक्षोः कर्तव्यं कर्मेति ब्रह्मकर्म = ब्राह्मणाचे कर्तव्य कर्म ते ब्रह्मकर्म**(ष.त.स.)** यद्वा **ब्रह्मकर्म** - ब्राह्मणजातेः कर्म ब्रह्मकर्म = ब्राह्मण जातीचे कर्म ब्रह्मकर्म**(ष.त.स.) स्वभावजम्** - स्वभावात् जातं उत्पन्नं वा स्वभावजम् = स्वभावापासून उत्पन्न झालेले**(प.त.स.) आस्तिक्यम्** - आस्तिकस्य कर्म भावो वा इदं वेत्यास्तिक्यम् = आस्तिकाचे कर्म भाव अथवा संबंधी आस्तिक्य **(भावार्थक/सम्बन्धार्थक त.वि.)**

क्षत्रियाच्या स्वाभाविक कर्माचे वर्णन -

**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम्।**

**दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम्॥४३॥**

**अन्वयः** - शौर्यम्, तेजः, धृतिः, दाक्ष्यम्, च, युद्धे, अपि, अपलायनम्, दानम्, च, ईश्वरभावः, क्षात्रम्, स्वभावजम्, कर्म।

**अन्वयार्थः - शौर्यम्** - शूरवीरता **तेजः** - तेज **धृतिः** - धैर्य **दाक्ष्यम्** - दक्षता **च** - आणि **युद्धे, अपि अपलायनम्** - युद्धातून पराङ्मुख न होणे **दानम्** - दान **च** - आणि **ईश्वरभावः** - स्वामीभाव **क्षात्रम्** - हे क्ष त्रियाचे **स्वभावजम्, कर्म** - प्रकृतिजन्य-स्वभावजन्य कर्म आहे.

**विवरण** - मोठमोठ्या बलवान शत्रूंचा न्याययुक्त पराजय करण्यामध्ये भीती न बाळगता युद्ध करण्याकरिता सतत उत्साहित राहून युद्धाच्यावेळी साहसपूर्वक गंभीरता सहित युद्ध करीत राहणे शूरवीरता, ज्या शक्तीच्या प्रभावाने मनुष्य दुसऱ्याची भीती बाळगून कोणत्याही कर्तव्यापासून च्यूत होत नाही आणि दुसरे लोक न्यायाच्याविरूद्ध प्रतिकूल व्यवहार करण्याकरिता भितात असे तेज, मोठमोठे संकट जरी समोर उपस्थित झाले तरी जो आपल्या कर्तव्यापासून विचलीत न होता आपल्या कर्तव्यपालनामध्येच संलग्न रहातो असे धैर्य, परस्पर भांडण करणाऱ्यांच्या न्याय करण्यामध्ये दक्ष, युद्धाच्या वेळी मोठे संकट जरी उपस्थित झाले तरी शत्रूला पाठ दाखवून परत येण्याची इच्छा न करणारा असा अपलायन, यथा योग्य असे ते दान, शासनाच्या द्वारा लोकांना अन्यायाचरणापासून सदाचरणामध्ये प्रवृत्त करणे तसेच दुष्ट लोकांना दंड देणे आ णि संपूर्ण प्रजाजनांच्या हिताचा विचार करून निःस्वार्थभावाने त्यांची सेवा करणे असा ईश्वरभाव असे उपर्युक्त कथित क्षत्रियांचे स्वभावजन्य कर्म आहे.

**व्याकरणम् - शौर्यम्** - शूर् द.ग.आ.प.+ष्यञ्=शौर्य न.प्र.ए.व. **तेजः** - तेजस् न.प्र.ए.व. **धृतिः** - धृति स्त्री प्र.ए.व. **दाक्ष्यम्** - दक्ष् प्र.ग.आ.प.+ष्यञ्=दाक्ष्य न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **युद्धे** - युद्ध न.स.ए.व. **अपि** - अपि क्रि.वि.अ. **अपलायनम्** - अ+पलायन न.प्र.ए.व. **दानम्** - दान न.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **ईश्वरभाव** - ईश्वर पु. भाव पु.प्र.ए.व. **क्षात्रम्** - क्षत्र+अन्=क्षात्र वि.न.प्र.ए.व. **स्वभावजम्** - स्वभाव पु. ज

वि.न.प्र.ए.व. **कर्म -** कर्मन् न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - अपलायनम् -** न पलायनमित्यपलायनम्-शत्रुभ्योऽपराङ्मुखता = पलायन नाही ते अपलायन-शत्रुपासून पराङ्मुख न होणे**(न.त.स.) ईश्वरभाव: -** ईश्वरस्य भाव इतीश्वरभाव:-ईशितव्यान् प्रति प्रभुशक्तिप्रकटीकरणम् = ईश्वराचा भाव ईश्वरभाव-ज्यांचे नियमन करावयाचे त्यांच्यापुढे आपली प्रभुशक्ति प्रकट करणे-त्यांना आपल्या सामर्थ्याची कल्पना आणून देणे**(ष.त.स.) शौर्यम् -** शूरस्य भाव: कर्म शौर्यम्-पराक्रम:-वीराणामपि संहरणसामर्थ्यम् = शूराचा भाव शौर्य-पराक्रम-वीरालाही थोपवून धरण्याचे सामर्थ्य **(भवार्थक त.वि.) दाक्ष्यम् -** दक्षस्य-कुशलस्य भावो दाक्ष्यम्-प्रतिकूल्यशतेऽपि स्वकार्यनिर्वाहसामर्थ्यश्च = दक्षाचा भाव दाक्ष्य-प्रतिकूलता असूनसुद्धा आपल्या कार्याचा निर्वाह करण्याचे सामर्थ्य**(भावार्थे त.वि.) क्षात्रम् -** क्षतात्-दु:खात् त्रायते-संरक्षतीति क्षत्र: क्षत्रस्य-क्षत्रियस्येदं क्षात्रम् = दु:खापासून रक्षण करणारा क्षत्र, क्षत्रसंबंधी क्षात्र**(संबन्धार्थे त.वि.) क्षात्रं कर्म -** क्षत्रियस्य-क्षत्रजातेरर्हं कर्तव्यं शास्त्रेण विहितं कर्म क्षात्रं कर्म = क्षत्रियाचे-क्षत्रजातीचे योग्य-कर्तव्य शास्त्रविहित कर्म क्षात्रकर्म**(ष.त.स.)**

वैश्य आणि शूद्राच्या स्वाभाविक कर्माचे वर्णन -

**कृषिगौरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम् ।**

**परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ।।४४।।**

**अन्वय: -** कृषिगौरक्ष्यवाणिज्यम्, स्वभावजम्, वैश्यकर्म, परिचर्यात्मकम्, शूद्रस्य, अपि, स्वभावजम्, कर्म ।

**अन्वयार्थ: - कृषिगौरक्ष्यवाणिज्यम् -** शेती, पशूचे पालन आणि व्यापार हे **स्वभावजम् -** प्रकृतिजन्य **वैश्यकर्म -** वैश्याचे कर्म आहे **परिचर्यात्मकम् -** सेवारूपी कर्म **शूद्रस्य, अपि -** शूद्राचे देखील **स्वभावजम् -** प्रकृतिजन्य **कर्म -** कर्म आहे.

**विवरण -** उत्तम प्रकाराने भूमिची मशागत करून पशूंचे पालन करणे, मनुष्य, देवता आणि पशु-पक्षी आदि संपूर्ण प्राणिमात्रांच्या उपभोगाच्या उपयोगी येणाऱ्या संपूर्ण पवित्र वस्तुंचा धर्मानुकूल देवघेवीचा व्यापार करणे हे वैश्याचे स्वभावजन्य कर्म आहे आणि त्याचप्रमाणे ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांची यथायोग्य सेवा करीत रहाणे हे शूद्राचे स्वाभाविक कर्म आहे.

**व्याकरणम् - कृषिगौरक्ष्यवाणिज्यम् -** कृषि स्त्री. गौरक्ष्य न. वाणिज्य न.प्र.ए.व. **वैश्यकर्मस्वभावजम् -** वैश्य पु. कर्मन् न. स्वभाव पु. ज वि.न.प्र.ए.व. **परिचर्यात्मकम् -** परिचर्या स्त्री. आत्मक वि.न.प्र.ए.व. **शूद्रस्य -** शूद्र पु.ष.ए.व. **अपि -** अपि क्रि.वि.अ. **स्वभावजम् -** स्वभाव पु. ज वि.न.प्र.ए.व. **कर्म -** कर्मन् न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - कृषिगौरक्ष्यवाणिज्यम् -** कृषिश्च-अन्नोत्पत्त्यर्थं भूमेर्विलेखनम्, गा:-धेनू रक्षतीति गोरक्ष:, गोरक्षस्य भावो गौरक्ष्यश्च-पशुपालनश्च, वणिज: कर्म वाणिज्यश्च-क्रयविक्रयलक्षणश्चैतेषां समाहार: कृषिगौरक्ष्यवाणिज्यम् = कृषि-अन्नाच्या उत्पत्तिकरिता भूमिचे कर्षण-नांगरणे गोरक्षचा भाव गौरक्ष्य-पशुपालन आणि व्यापाऱ्याचे कर्म वाणिज्य-व्यापार यांचा समाहार**(भावार्थे त.ग.समाहार द्व.स.) वैश्यकर्म -** वैश्यस्य-वैश्यजाते: कर्मेति वैश्यकर्म = वैश्याचे किंवा वैश्यजातिचे कर्म ते वैश्यकर्म**(ष.त.स.)** यद्वा **वैश्यकर्म -** विशो जातेरर्हं कर्तव्यं शास्त्रेण विहितं कर्म वैश्यकर्म = वैश्यजातीचे योग्य-कर्तव्य शास्त्रविहित कर्म

वैश्यकर्म**(ष.त.स.) परिचर्यात्मकम् -** परिचर्या-वर्णत्रयसेवा, आत्मा-स्वरूपं यस्य तत् परिचर्यात्मकम् = परिचर्या-वर्णत्रयसेवा करण्याचे स्वरूप आहे ज्याचे ते**(ब.स.)**

आप आपल्या वर्णधर्माच्या पालनाने परमसिद्धिची प्राप्ति व त्याच्या पालनाचा विधि -

**स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ।**

**स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विन्दति तच्छृणु ॥४५॥**

**अन्वयः -** स्वे स्वे कर्मणि, अभिरतः, नरः, संसिद्धिम्, लभते, स्वकर्मनिरतः, यथा, सिद्धिम्, विन्दति, तत्, शृणु ।

**अन्वयार्थः - स्वे स्वे कर्मणि -** उपर्युक्त सांगितलेल्या आपआपल्या कर्मामध्ये **अभिरतः, नरः -** पूर्णतया संलग्न असलेला पुरुष **संसिद्धिम् -** परमात्मप्राप्तिरूप परमसिद्धिला **लभते -** प्राप्त होतो **स्वकर्मनिरतः -** आपल्या कर्मामध्ये संलग्न असलेला पुरुष **यथा -** ज्याप्रमाणे **सिद्धिम् -** मोक्षाला **विन्दति -** प्राप्त होतो **तत् -** ते **शृणु -** श्रवण कर-ऐक.

**विवरण -** ब्राह्मणाचे शमदमादि कर्म, क्षत्रियाचे शूरवीरादि कर्म, वैश्याचे देवघेव व्यापारादि कर्म आणि शूद्राचे सेवादि कर्म आहेत. उपर्युक्त अशा त्या आपआपल्या स्वाभाविक कर्माचे अनुष्ठान केले तर तो पुरुष परमात्मसिद्धिला प्राप्त होतो म्हणजे जसा तो त्या कर्माच्या आचरणापासून परमसिद्धिला म्हणजे मोक्षाला प्राप्त होतो ते सुद्धा तूं माझ्याकडून श्रवण कर-ऐक.

**व्याकरणम् - स्वे स्वे -** स्व सर्व.पु.स.ए.व. **कर्मणि -** कर्मन् न.स.ए.व. **अभिरतः -** अभि+रम् प्र.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **नरः -** नर पु.प्र.ए.व. **संसिद्धिम् -** सम्+सिद्धि स्त्री.द्वि.ए.व. **लभते -** लभ् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.प्र.ए.व. **स्वकर्मनिरतः -** स्व वि. कर्मन् न. रम् प्र.ग.आ.प.कर्त.भू.वा.धा. वि.पु.प्र.ए.व. **यथा -** यथा क्रि.वि.अ. **सिद्धिम् -** सिद्धि स्त्री.द्वि.ए.व. **विन्दति -** विद् ष.ग.उ.प.(प.प.) वर्त.तृ.पु.ए.व. **तत् -** तत् सर्व.न.द्वि.ए.व.**शृणु -** श्रु प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - स्वकर्मनिरतः -** स्वस्य आत्मनः कर्म स्वकर्म, स्वकर्मनिरतः-तत्पर इति स्वकर्मनिरतः = आपल्या कर्मामध्ये संलग्न असलेला**(ष.त.ग.स.त.स.) संसिद्धिम् -** सम्यक्-सिद्धिः संसिद्धिस्तां संसिद्धिम् = चांगली सिद्धिच संसिद्धि आहे**(वि.)**

**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।**

**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ॥४६॥**

**अन्वयः -** यतः, भूतानाम्, प्रवृत्तिः, येन, इदम्, सर्वम्, ततम्, तम्, स्वकर्मणा, अभ्यर्च्य, मानवः, सिद्धिम्, विन्दति ।

**अन्वयार्थः - यतः -** ज्याच्यापासून **भूतानाम् -** प्राणिमात्रांची **प्रवृत्तिः -** उत्पत्ति होते **येन -** ज्याच्याद्वारा **इदम्, सर्वम् -** हे सर्व विश्व **ततम् -** व्यापले गेले आहे **तम् -** अशा त्या ईश्वराला **स्वकर्मणा -** आपल्या कर्माच्या द्वारा **अभ्यर्च्य -** आराधना करून **मानवः -** मनुष्य **सिद्धिम् -** सिद्धिला **विन्दति -** प्राप्त होतो.

**विवरण -** सर्वशक्तिमान सर्वांतर्यामी आणि सर्वव्यापी परमात्म्यापासून या संपूर्ण जगताची उत्पत्ती होते आणि

त्याच्या द्वारा हे संपूर्ण जगत व्याप्त झालेले आहे म्हणजे परमात्माच आपल्या मायेच्या योगाने जगताच्या रूपामध्ये प्रगट झालेला आहे अशा त्या परमात्म्याला आपल्या स्वाभाविक कर्माने पुजून मानव परम सिद्धिला प्राप्त होतो.

**व्याकरणम् - यत: -** यतस् तसिल् प्रत्ययान्त तद्धि. पञ्चम्यन्त अ. **भूतानाम् -** भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा. वि.न.ष.ब.व. **प्रवृत्ति: -** प्रवृत्ति स्त्री.प्र.ए.व. **येन -** यत् सर्व.पु.तृ.ए.व. **इदम् -** इदम् सर्व.न.प्र.ए.व. **सर्वम् -** सर्व न.प्र.ए.व. **ततम् -** 'तनु विस्तारे' तन् अ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **तम् -** तत् सर्व.पु. द्वि.ए.व. **स्वकर्मणा -** स्व वि. कर्मन् न.तृ.ए.व. **अभ्यर्च्य -** अभि+अर्च् प्र.ग.प.प.ल्यबन्त अ. **मानव: -** मानव पु.प्र.ए.व. **सिद्धिम् -** सिद्धि स्त्री द्वि.ए.व. **विन्दति -** विद् ष.ग.उ.प.(प.प.)वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - स्वकर्मणा -** स्वस्य-आत्मन: कर्म स्वकर्म तेन स्वकर्मणा-यथावर्णाश्रमविहितानुष्ठानेन = आपल्या कर्माच्याद्वारा-वर्णाश्रमविहितानुष्ठानाच्या द्वारा**(ष.त.स.) मानव: -** मनोरपत्यमिति मानव: = मनुचे अपत्य (संतान) मानव**(अपत्यार्थे त.वि.)**

स्वधर्म पालनाची प्रशंसा -

**श्रेयान्स्वधर्मो विगुण: परधर्मात्स्वनुष्ठितात्।**

**स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ।।४७।।**

**अन्वय: -** स्वनुष्ठितात्, परधर्मात्, विगुण:, स्वधर्म:, श्रेयान्, स्वभावनियतम्, कर्म, कुर्वन्, किल्बिषम्, न, आप्नोति।

**अन्वयार्थ: - स्वनुष्ठितात्, परधर्मात् -** चांगल्या प्रकारे-आयासरहित अनुष्ठान केलेल्या परधर्माहून **विगुण: स्वधर्म: -** गुणरहित-सदोष आपला धर्म **श्रेयान् -** अधिक कल्याणकारक आहे **स्वभावनियतम्, कर्म कुर्वन् -** स्वभावसिद्ध नियत कर्म करीत असतांना मनुष्य **किल्बिषम् -** पापाला **न, आप्नोति -** प्राप्त होत नाही.

**विवरण -** परधर्म म्ह. दुसऱ्याचा धर्म आचरण करण्याकरिता जरी सुलभ वाटत असला तरि परंतु चांगल्या प्रकारे अनुष्ठान केलेल्या परधर्माहून आपला स्वत:चा धर्म विगुण म्ह. गुणरहित जरी असला तरी तो आचरण करण्याकरिता श्रेष्ठ आहे. क्षत्रियापेक्षा ब्राह्मणाचा धर्म सत्त्वगुणांनी युक्त आहे. परंतु क्षत्रिय त्या धर्माचे आचरण करण्याकरिता योग्य नाही. त्याने आपल्या क्षत्रिय धर्माचेच आचरण करणे योग्य म्हणजे श्रेयस्कर आहे. म्हणून स्वभावाने नियत केलेल्या स्वधर्मरूप कर्माचे अनुष्ठान करीत असतांना पापाला प्राप्त होत नाही.

**व्याकरणम् - स्वनुष्ठितात्-** सु वि. अनु+स्था प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.पं.ए.व. **परधर्मात् -** पर वि. धर्म पु.पं.ए.व. **विगुण: -** विगुण वि.पु.प्र.ए.व. **स्वधर्म: -** स्व वि. धर्म पु.प्र.ए.व. **श्रेयान् -** श्रेयस् पु.प्र.ए.व. **स्वभावनियतम् -** स्व वि. भाव पु. नि+यम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.द्वि.ए.व. **कर्म -** कर्मन् न.द्वि.ए.व. **कुर्वन् -** कृ अ.ग.उ.प.कर्त.शतृ वि.पु.प्र.ए.व. **किल्बिषम् -** किल्बिष न.द्वि.ए.व. **न -** न क्रि.वि.अ. **आप्नोति -** आप् पं.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - विगुण: -** विगतो गुणो यस्य स विगुण:-सदोष: = निघून गेला आहे गुण ज्याचा तो म्हणजे गुणहीन**(ब.स.) स्वधर्म: -** स्वस्य-आत्मनो धर्म: स्वधर्म: = स्वत:चा धर्म**(ष.त.स.) स्वभावनियतम् -** स्वभावेन-प्रकृत्या नियमितमिति स्वभावनियतम् = स्वभावाने नियत केलेले स्वभावनियत**(तृ.त.स.) स्वनु**

**ष्ठितात्** - सम्यक् प्रकारेण अनुष्ठित:-अधिष्ठित: स्वनुष्ठितस्तस्मात् स्वनुष्ठितात् = चांगल्या प्रकारे अनुष्ठान केलेल्या**(वि.)** **कुर्वन्** - करोतीति कुर्वन् = करीत असताना**(वि.)**

स्वधर्माच्या त्यागाचा निषेध -

**सहजं कर्म कौन्तेय सदोषमपि न त्यजेत् ।**

**सर्वारम्भा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृता: ॥४८॥**

**अन्वय:** - कौन्तेय, सहजम्, कर्म, सदोषम्, अपि, न, त्यजेत्, हि, धूमेन, अग्नि:, इव, सर्वारम्भा:, दोषेण, आवृता: ।

**अन्वयार्थ:** - **कौन्तेय** - हे कुंतिपुत्र अर्जुना! **सहजम्, कर्म-** जन्माबरोबर निर्माण झालेले स्वाभाविक कर्म **सदोषम्, अपि** - दोषाने युक्त जरी असले तरी **न त्यजेत्** - त्याचा त्याग करू नये **हि** - कारण **धूमेन, अग्नि:, इव (आवृता:)** - धूराने अग्नी जसा आच्छादित केला जातो (केलेला असतो) त्याचप्रमाणे **सर्वारम्भा:** - ही सर्व कर्मे **दोषेण** - दोषाने **आवृता:** - आच्छादित झालेली असतात.

**विवरण** - आपापल्या स्वभावानुसार जन्माबरोबर उत्पन्न झालेले कर्म जरी दोषाने युक्त असले तरी त्या स्वाभा विक कर्माचा त्याग करू नये. कारण, काही काही कर्म साधारणत: हिंसादि दोषाने मिश्रित दिसतात परंतु ते शास्त्रविहित आणि न्यायोचित असल्यामुळे त्या कर्माचे आचरण करीत असतांना मनुष्याला पाप लागत नाही कारण धुराने जसा अग्नी आच्छादित झालेला असतो त्याचप्रमाणे सर्व कर्मे कोणत्या ना कोणत्या तरी दोषाने आच्छादित झालेली असतात.

**व्याकरणम्** - **कौन्तेय** - कौन्तेय पु.संबो.ए.व. **सहजम्** - सह अ. ज वि.न.द्वि.ए.व. **कर्म** - कर्मन् न. द्वि.ए.व. **सदोषम्** - स अ. दोष पु.द्वि.ए.व. **अपि** - अपि अ. **न** - न क्रि.वि.अ. **त्यजेत्** - त्यज् प्र.ग.प.प. विध्यर्थ तृ.पु.ए.व. **हि** - हि क्रि.वि.अ. **धूमेन** - धूम पु.तृ.ए.व. **अग्नि:** - अग्नि पु.प्र.ए.व. **इव** - इव अ. **सर्वारम्भा:** - सर्व वि. आ+रभ्+घञ्+मुम् च=आरम्भ पु.प्र.ब.व **दोषेण** - दोष पु.तृ.ए.व. **आवृता:** - आ+वृ पं.ग.उ.प. कर्म.भू.धा.वि.प्र.ब.व.

**समासविग्रहार्था:** - **सर्वारम्भा:** - आरभ्यन्त इति आरम्भा:, सर्वे च-सम्पूर्णाश्च ते आरम्भाश्चेति सर्वारम्भा:-सर्व कर्माणि = ज्यांचा आरंभ केला जातो ते आरंभ-सर्वकर्मे**(क.स.)** **सदोषम्** - दोषेण सहितमिति सदोषम् = दोषाने सहित-दोषयुक्त असे सदोष**(तृ.त.स.)** **सहजम्** - ब्राह्मणादियोनिजन्मना सह जातं सहजम् = ब्राह्मणादियोनि जन्माबरोबर उत्पन्न होणारे**(जातार्थे त.वि.)** यद्वा **सहजम्** - **‘**कर्मणा जायते द्विज:**’** इति न्यायेन सह जन्मना द्वितीयेण जायत इति सहजम्-जातित: प्राप्तम् = दुसऱ्या जन्माच्या(उपनयनाबरोबर उत्पन्न होणारे) **(वि.)**

संन्यासाच्या योगाने परम सिद्धिची प्राप्ति -

**असक्तबुद्धि: सर्वत्र जितात्मा विगतस्पृह: ।**

**नैष्कर्म्यसिद्धिं परमां सन्न्यासेनाधिगच्छति ॥४९॥**

**अन्वय:** - सर्वत्र, असक्तबुद्धि:, जितात्मा, विगतस्पृह:, सन्न्यासेन, परमाम्, नैष्कर्म्यसिद्धिम्, अधिगच्छति ।

**अन्वयार्थः - सर्वत्र -** संसाराच्या कोणत्याही भोग्य वस्तु विषयी **असक्तबुद्धिः -** ज्यांचे अंत:करण आसक्त झालेले नसते **जितात्मा -** ज्याने आपल्या अंत:करणाला अधीन केलेले आहे **विगतस्पृहः -** ज्याची इच्छा नि:शेष समाप्त झालेली आहे असा ज्ञानी पुरुष **सन्न्यासेन -** संन्यासाच्या योगाने (सांख्य योगाने) **परमाम्, नैष्कर्म्यसिद्धिम् -** श्रेष्ठ अशा नैष्कर्म्यसिद्धिला **अधिगच्छति -** प्राप्त होतो.

**विवरण -** संसारातील कोणत्याही पदार्थाविषयी त्याच्या ठिकाणी आसक्ति राहिलेली नसते, म्हणजे आस क्तिचा सर्वथा अभाव झालेला असतो, त्याचप्रमाणे देहादिकांविषयी त्यांची स्पृहा म्हणजे इच्छा नि:शेष नाहीसी झालेली असते, ज्याने आपल्या अंत:करणाला अधीन ठेवलेले आहे, असा आत्मज्ञ पुरुष सांख्ययोगाच्या द्वारा परम म्हणजे श्रेष्ठ अशा नैष्कर्म्य सिद्धिला प्राप्त होतो.

**व्याकरणम् - सर्वत्र -** सर्वत्र त्रल् प्रत्ययान्त तद्धि. सप्तम्यन्त अ. **असक्तबुद्धिः -** अ+सञ्ज् प्र.ग.आ.प.कर्म.भू.धा.वि. बुद्धि स्त्री.प्र.ए.व. **जितात्मा -** जि प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. आत्मन् पु.प्र.ए.व. **विगतस्पृहः -** वि+गम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. स्पृह वि.पु.प्र.ए.व. **सन्न्यासेन -** संन्यास पु.तृ.ए.व. **परमाम् -** परमा वि.स्त्री.द्वि.ए.व. **नैष्कर्म्यसिद्धिम् -** नैष्कर्म्य न.वि. सिद्धि स्त्री.द्वि.ए.व. **अ धिगच्छति -** अधि+गम् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - असक्तबुद्धिः -** असक्ता-सङ्गशून्या बुद्धिः-मतिर्यस्य सोऽसक्तबुद्धिः = संगरहित बुद्धी आहे ज्याची तो असक्तबुद्धि**(ब.स.)** यद्वा **असक्तबुद्धिः -** अहमेषाम् ममैतदित्यभिष्वङ्गरहिता बुद्धिर्यस्य सोऽसक्तबुद्धिः = मी यांचा आहे हे माझे आहेत अशा प्रकारच्या अभिष्वंग-आग्रहाने रहित आहे बुद्धी ज्याची तो असक्तबुद्धि**(ब.स.)** यद्वा **असक्तबुद्धिः -** सर्वत्र-विषयान्तरे कर्मान्तरे देशान्तरे लोकान्तरे देवतान्तरे च भोक्तुं कर्तुं स्थातुं प्राप्तुमुपासितुं च असक्ताऽननुरक्ता तत्तद्विषयैः संबन्धरहिता बुद्धिर्यस्य सोऽसक्तबुद्धिः = सर्वत्र-दुसऱ्या विषयामध्ये, दुसऱ्या कर्मामध्ये, दुसऱ्या देशामध्ये, दुसऱ्या लोकामध्ये आणि दुसऱ्या देवतामध्ये भोगाकरिता, करण्याकरिता, स्थितिकरिता, प्राप्त करण्याकरिता आणि उपासना करण्याकरिता असक्त-अननुरक्त-त्या त्या विषयांच्या बरोबर संबंधाने रहित आहे बुद्धी ज्याची तो असक्तबुद्धि**(ब.स.)** यद्वा **असक्तबुद्धिः -** सर्वत्र-पुत्रमित्रकलत्रधनादिष्वसक्ता-रागममतादिदोषनिर्मुक्ता बुद्धिर्यस्य सोऽसक्तबुद्धिः = सर्वत्र -पुत्र, मित्र, कलत्र, धनादिमध्ये असक्त-राग, ममतादि दोषाने निर्मुक्त बुद्धी ज्याची तो असक्तबुद्धि**(ब.स.)** **जितात्मा -** जितः-वशीकृतः, आत्मा-कार्यकरणसंघातो येन स जितात्मा = अहंकारशून्य-अधीन केला आहे आत्मा-कार्यकरणसंघात ज्याने तो जितात्मा**(ब.स.)** यद्वा **जितात्मा -** जितः-तीव्रवैराग्येण श्रद्धापूर्वकचिरका लिकनित्यनिरन्तरसत्प्रत्ययावृत्त्यभ्यासेन निर्जितो ब्रह्मण्येव स्थिरतां गमिता आत्मा मनो यस्य स जितात्मा = जित-तीव्र वैराग्याने श्रद्धापूर्वक चिरकालिक नित्यनिरंतर सत्प्रत्ययाच्या आवृत्तिच्या अभ्यासाने निर्जित ब्रह्मामध्येच स्थिरतेला प्राप्त झाला आहे आत्मा-मन ज्याचे तो जितात्मा**(ब.स.)** यद्वा **जितात्मा -** जितः-नि र्जितस्तीव्रमुमुक्षया मुहुर्मुहुर्विषयदोषसंदर्शनेन तदुदिततीव्रवैराग्येण तेषु बन्धकत्वबुद्ध्या भयेन चाऽसत्त्वज्ञानेन च सम्यग्विषयवैमुख्यं गमित आत्मा मनो यस्य स जितात्मा = जित-निर्जित तीव्र मुमुक्षाच्याद्वारा पुन्हा-पुन्हा विषयामध्ये दोष पाहण्याने त्यापासून उदित तीव्र वैराग्याने त्यामध्ये बंधकत्वबुद्धिने, भयाने आणि असत्त्वज्ञानाने चांगल्या प्रकारे विषयापासून विमुखतेला प्राप्त झाला आत्मा-मन ज्याचे तो जितात्मा**(ब.स.)** **विगतस्पृहः -** विगता आत्मनोऽन्यत्र न गता, स्पृहा-इच्छा यस्य स विगतस्पृहः-विषयाभिलाषशून्यः = आत्म्याच्या अतिरिक्त नाही गेली स्पृहा-इच्छा ज्याची तो म्ह.विषयाभिलाषशून्य**(ब.स.)** यद्वा **विगतस्पृहः -**

देहात्परिग्रहाच्च विशिष्य गता-विगता देहपरिग्रहक्षेमविषया स्पृहा-अपेक्षा यस्य स विगतस्पृहः = देहाने आणि परिग्रहाने विशेष करून गत-विगत झाली आहे देह, परिग्रह आणि क्षेमविषयक स्पृहा-अपेक्षा ज्याची तो विगतस्पृह**(ब.स.)** यद्वा **विगतस्पृहः** - विगता स्पृहा-तृष्णा देहजीवितभोगेषु यस्मात् स विगतस्पृहः = ज्याच्यापासून देह, जीवित, भोग इत्यादिकविषयीची स्पृहा-तृष्णा पार निघून गेली आहे तो विगतस्पृह **(प.त.स.)** **नैष्कर्म्यसिद्धिम्** - निर्गतानि कर्माणि यस्मात् स निष्कर्मा यद्वा न कर्म यत्र तन्निष्कर्मा तस्य भावो नैष्कर्म्यम्, नैष्कर्म्यश्च तत् सिद्धिश्च-प्राप्तिश्च सा नैष्कर्म्यसिद्धिस्ताम् नैष्कर्म्यसिद्धिम् = नाही कर्म जेथे तो निष्कर्म त्याचा भाव नैष्कर्म्य तीच सिद्धि म्ह. नैष्कर्म्यसिद्धि त्या नैष्कर्म्यसिद्धिला**(ब.ग.भावार्थे त द्वि.ग.ष.त.स.)**

ज्ञानाच्या परा निष्ठेच्या वर्णनाची प्रतिज्ञा -

**सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे ।**

**समासेनैव कौन्तेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥५०॥**

**अन्वयः** - या, ज्ञानस्य, परा, निष्ठा, सिद्धिम्, प्राप्तः, यथा, ब्रह्म, आप्नोति, कौन्तेय, तथा, मे, समासेन, एव, निबोध ।

**अन्वयार्थः - या** - जी **ज्ञानस्य** - ज्ञानाची **परा निष्ठा** - शेवटची मर्यादा म्ह. अखेरची सीमा आहे **सिद्धिम् प्राप्तः** - अशा या परमसिद्धिला प्राप्त झालेला पुरुष **यथा** - ज्या प्रकारे **ब्रह्म** - ब्रह्माला **आप्नोति** - प्राप्त होतो **कौन्तेय** - हे अर्जुना! **तथा** - तो क्रम-प्रकार **मे** - माझ्याकडून **समासेन, एव** - संक्षेपाने **निबोध** - श्रवण कर -जाणून घे.

**विवरण** - जी ज्ञानयोगाची अखेरची स्थिती म्ह. सीमा आहे अशा या स्थितीला म्हणजे परमसिद्धिला येवून पोहचलेला शुद्ध अंतःकरणाने युक्त अधिकारी पुरुष ज्या विधिने (क्रमाने) ज्ञानाच्या परमनिष्ठेला प्राप्त होऊन परब्रह्माला प्राप्त होतो. हे अर्जुना! तो क्रम माझ्याकडून विस्तार न करता संक्षेपाने समजून घे.

**व्याकरणम् - या** - यत् सर्व.स्त्री.प्र.ए.व. **ज्ञानस्य** - ज्ञान न.ष.ए.व. **परा** - परा वि.स्त्री.प्र.ए.व. **निष्ठा** - निष्ठा स्त्री.प्र.ए.व. **सिद्धिम्** - सिद्धि स्त्री.द्वि.ए.व. **प्राप्तः** - प्र+आप् पं.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **यथा** - यथा क्रि.वि.अ. **ब्रह्म** - ब्रह्मन् न.द्वि.ए.व. **आप्नोति** - आप् पं.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **कौन्तेय** - कौन्तेय पु.संबो.ए.व. **तथा** - प्रकारार्थे त्रल् प्रत्ययान्त तद्धित अ. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **समासेन** - समास पु.तृ.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **निबोध** - नि+बुध् प्र.ग.प.प./च.ग.आ.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - तथा** - तेन प्रकारेण तथा = त्या प्रकाराने**(प्रकारार्थे त.वि.)**

ज्ञानयोगाच्या अनुसार भगवत् प्राप्तिला पात्र होण्याची विधि -

**बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च ।**

**शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च ॥५१॥**

**अन्वयः** - विशुद्धया, बुद्ध्या, युक्तः, च, धृत्या, आत्मानम्, नियम्य, शब्दादीन्, विषयान्, त्यक्त्वा, च, रागद्वेषौ, व्युदस्य ।

**अन्वयार्थः - विशुद्धया बुद्ध्या युक्तः** - शुद्ध बुद्धिने युक्त **च** - आणि **धृत्या, आत्मानम्, नियम्य** - सात्त्विक धैर्याने बाह्य विषयामध्ये प्रवृत्त चित्ताचे नियमन करून **शब्दादीन्, विषयान्, त्यक्त्वा** - शब्दस्पर्शादि विषयांचा त्याग करून **च** - आणि **रागद्वेषौ व्युदस्य** - राग आणि द्वेष यांना सर्वथा नष्ट करून.

**विवरण** - पूर्वार्जित पापाच्या संस्काराने रहित म्हणजे विशुद्ध बुद्धिने युक्त आणि सात्त्विक धैर्याने शरीरेंद्रिय संघाताला आपल्या अधीन करून, शब्दादि सर्व विषयांचा त्याग करून आणि त्याचप्रमाणे राग आणि द्वेष यांचा सर्वथा नाश करून.

**व्याकरणम् - विशुद्धया** - वि+शुध् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.स्त्री.तृ.ए.व. **बुद्ध्या** - बुद्धि स्त्री.तृ.ए.व. **युक्तः** - युज् च.ग.आ.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **धृत्या** - धृति स्त्री.तृ.ए.व. **आत्मानम्** - आत्मन् पु.द्वि.ए.व. **नियम्य** - नि+यम् प्र.ग.प.प.ल्यबन्त अ. **शब्दादीन्** - शब्द पु. आदि वि.पु.द्वि.ब.व. **विषयान्** - विषय पु.द्वि.ब.व. **त्यक्त्वा** - त्यज् प्र.ग.प.प.त्वान्त अ. **च** - च उभ.अ. **रागद्वेषौ** - राग पु. द्वेष.पु.द्वि.द्वि.व. **व्युदस्य** - वि+उद्+अस् च.ग.प.प.ल्यबन्त अ.

**समासविग्रहार्थाः - शब्दादीन्** - शब्दः आदिर्येषां ते शब्दादयस्तान् शब्दादीन् = शब्द आहे आदि म्हणजे आरंभाला ज्यांच्या ते त्यांना**(ब.स.) रागद्वेषौ** - रागश्च-विषयप्रीतिश्च द्वेषश्च-अमर्षश्चेति रागद्वेषौ = राग आणि द्वेष**(द्व.स.)**

मागील श्लोकाप्रमाणे -

**विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः ।**

**ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः ।।५२।।**

**अन्वयः** - विविक्तसेवी, लघ्वाशी, यतवाक्कायमानसः, नित्यम्, ध्यानयोगपरः, वैराग्यम्, समुपाश्रितः ।

**अन्वयार्थः - विविक्तसेवी** - एकांत स्थानामध्ये राहणारा **लघ्वाशी** - सात्त्विक, परिमित आणि हितकर भोजन करणारा **यतवाक्कायमानसः** - वाणी, शरीर आणि मन यांचे नियमन करणारा (केलेला) **नित्यम् ध्यानयोगपरः** - निरंतर ध्यान योगामध्ये निमग्न झालेला **वैराग्यम्, समुपाश्रितः** - वैराग्याचा आश्रय केलेला.

**विवरण** - नदीतट, देवालय, वन, पर्वत आणि गुहा याठिकाणी निवास करण्याचे ज्याचे शील आहे असा, साधनाच्या उपर्युक्त आणि आपल्या शक्तिनुसार नियमित हितकर परिमित आणि पवित्र तसेच सात्त्विक पदार्थांचे सेवन करणारा असा, वाणी, शरीर आणि मन यांना आपल्या अधीन ठेवणारा, सदैव ध्यानयोगामध्ये समाहित झालेला तसेच वैराग्याचा आश्रय केलेला असा.

**व्याकरणम् - विविक्तसेवी** - 'विचिर् पृथग्भावे' विच् स.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि. सेविन् पु.प्र.ए.व. **लघ्वाशी** - लघु+आशिन् पु.प्र.ए.व. **यतवाक्कायमानसः** - यम् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. वाच् स्त्री. काय पु. मानस वि.पु.प्र.ए.व. **नित्यम्** - नित्य वि.न.प्र.ए.व. **ध्यानयोगपरः** - ध्यान न. योग पु. पर वि.प्र.ए.व. **वैराग्यम्** - वैराग्य न.द्वि.ए.व. **समुपाश्रितः** - सम्+उप+आ+श्रि प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - विविक्तसेवी**- विविक्तं जनसंमर्दरहितं पवित्रश्च-चित्प्रसादकरं देशं सेवितुं शीलमस्यास्तीति विविक्तसेवी = जनसमूहाने रहित आणि पवित्रता-चित्ताला शांतता प्राप्त होईल अशा एकांत देशाचे सेवन

करण्याचे शील आहे ज्याचे तो**(शीलार्थे त.वि.)** यद्वा **विविक्तसेवी -** अरण्यनदीपुलिनगिरिगुहादीन् विविक्तान् देशान् सेवितुं शीलं अस्येति विविक्तसेवी = अरण्य, नदीचे तीर, पर्वत, गुहा इत्यादि एकांत व पवित्र देशाचे सेवन करण्याचे ज्याचे शील-स्वभाव आहे तो विविक्तसेवी**(शीलार्थे त.वि.) लघ्वाशी -** लघु-स्वल्पं भिक्षान्नमात्रं सात्त्विकं भोजनं अशितुं-भक्षितुं शीलं यस्य स लघ्वाशी = लघु-थोडे भिक्षान्नप्राप्त सात्त्विक भोजन खाण्याचे शील आहे ज्याचे तो लघ्वाशी**(ब.स.)** यद्वा **लघ्वाशी -** लघु-परिमितम्, हितं मेध्यश्चाशितुं शीलं यस्य स लघ्वाशी-निद्रालस्यादिचित्तलयकाररिहित: = लघु-परिमित, हितकारी आणि मेध्य-पवित्र भोजन करण्याचा स्वभाव आहे ज्याचा तो लघ्वाशी-निद्रा, आलस्यादि चित्तलयकारि पदार्थांनी रहित **(ब.स.)** यद्वा **लघ्वाशी -** लघु-गुरुत्वरहितद्रव्यमशितुं शीलं यस्य स लघ्वाशी **=** लघु-गुरुत्व रहित भोजन करण्याचा स्वभाव आहे ज्याचा तो लघ्वाशी**(ब.स.) यतवाक्कायमानस: -** वाक्च-वाणीच, कायश्च-देहश्च, मानसश्चान्त:करणश्चेति वाक्कायमानसानि, यतानि-नियमितानि वाक्कायमानसानि यस्य स यतवाक्कायमानस: = नियमित केली आहे वाणी, काया आणि मन ज्याने तो**(द्व.ग.ब.स.)** यद्वा **यतवाक्कायमानस: -** यतानि संयता नि-सम्यङ्निरुद्धानि बाह्यप्रवृत्ते: सम्यग्विमुखीकृतानि वाक्कायमानसानि येन स यतवाक्कायमानस:-यम नियमासनादिसाधनसंपन्न: = यत-संयत-बाह्यप्रवृत्तिपासून चांगल्या प्रकारे निरुद्ध-विमुख केली आहे वाणी, काया आणि मन ज्याने तो यतवाक्कायमानस-यम, नियम, आसनादि साधनसंपन्न**(तृ.ब.स.) ध्यानयोगपर: -** ध्यानम्-दृश्यतिरस्कारपूर्वकानुभवप्रत्ययस्तदेव योगो ध्यानयोग: स एव पर: पुरुषार्थो यस्य स ध्यानयोगपर: = दृश्यतिरस्कारपूर्वक अनुभव प्रत्ययच ध्यान तोच योग आहे असा ध्यानयोगच श्रेष्ठ पुरुषार्थ आहे ज्याचा तो **(ब.स.)** यद्वा **ध्यानयोगपर: -** ध्यानम्-आत्मस्वरूपचिन्तनं योग:-आत्मविषये एव एकाग्रीकरणं तौ ध्यानयौगौ परत्वेन कर्तव्यौ यस्य स ध्यानयोगपर: = ध्यान-आत्मस्वरूपाचे चिंतन, योग-आत्मा या विषयातच त्याला एकत्र करणे, ते ध्यानयोग, परत्वाने-श्रेष्ठ साधन या रूपाने ज्याला कर्तव्य असतात तो ध्यानयोगपर**(ब.स.) वैराग्यम् -** विषयेभ्यो विगत:-निर्गतो राग:-इच्छा यस्य स विरागो विरागस्य भाव वैराग्यम्-दृष्टादृष्टेषु विषयेषु वैतृष्ण्यम्-सर्वत्रेच्छाराहित्यम् = विषयापासून निघून गेला आहे राग-इच्छा ज्याची तो विराग विरागाचा भाव वैराग्य-दृष्ट आणि अदृष्टामध्ये तृष्णा नसणे-सर्व ठिकाणी इच्छारहित असणे **(ब.स.ग.भावार्थे त.वि.) समुपाश्रित: -** सम्यक्-सुष्ठुप्रकारेणोपाश्रित:-अधिष्ठित इति समुपाश्रित: = चांगल्या प्रकारे आश्रय केलेले**(वि.)**

**अहङ्कारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ।**

**विमुच्य निर्मम: शान्तो ब्रह्मभूयाय कल्पते ॥५३॥**

**अन्वय :-** अहङ्कारम्, बलम्, दर्पम्, कामम्, क्रोधम्, परिग्रहम्, विमुच्य, निर्मम:, शान्त:, ब्रह्मभूयाय, कल्पते ।

**अन्वयार्थ: - अहङ्कारम् -** अहंकार **बलम् -** बल **दर्पम् -** गर्व **कामम् -** काम **क्रोधम् -** क्रोध **परिग्रहम् -** प रिग्रह **विमुच्य -** या सर्वांचा त्याग करून **निर्मम: -** ममत्वबुद्धिरहित झालेला **शान्त: -** असा शांत होत्साता संन्यासी **बह्मभूयाय -** ब्रह्म होण्याकरिता **कल्पते -** योग्य म्हणजे समर्थ होतो.

**विवरण -** शरीर, इंद्रिये आणि अंत:करणाच्या ठिकाणी असणारी आत्मबुद्धिच अहंकार अन्यायपूर्वक दुसऱ्यावर शारीरिक शक्तिच्यामुळे प्रभुत्व करणेच बल, धन, विद्या आणि जाति आदिच्या कारणामुळे होण-

ारा गर्व, लोक आणि परलोकाच्या भोगाला प्राप्त करण्याची इच्छाच काम, आपल्या मनाच्या प्रतिकुल आचरण करणाऱ्यावर अंत:करणामध्ये उत्पन्न होणारा उत्तेजनपूर्वक क्रोध, सांसारिक पदार्थांचा संग्रहच परिग्रह इत्यादि उपर्युक्त प्रतिपादित विकारांचा सर्वथा त्याग करून ध्यान योगाने समाहित होत्साता तसेच ममतारहित आणि शांतियुक्त संन्यासी ब्रह्मभावाला प्राप्त होण्यासाठी समर्थ होतो.

**व्याकरणम् - अहङ्कारम् -** अहङ्कार पु.द्वि.ए.व. **बलम् -** बल न.द्वि.ए.व. **दर्पम् -** दर्प पु.द्वि.ए.व. **कामम् -** काम पु.द्वि.ए.व. **क्रोधम् -** क्रोध पु.द्वि.ए.व. **परिग्रहम् -** परिग्रह पु.द्वि.ए.व. **विमुच्य -** वि+मुच् ष.ग.प.प.ल्यबन्त अ. **निर्ममः -** निर्मम वि.पु.प्र.ए.व. **शान्तः -** शम् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **ब्रह्मभूयाय -** ब्रह्म+भूय न.च.ए.व. **कल्पते -** क्लृप् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - निर्ममः-** निर्गतः-निष्क्रान्तः मम-ममता, यस्मात् सः निर्ममः =निघून गेली आहे ममता ज्याची तो**(ब.स.)परिग्रहः -** परितः-सर्वतः ग्रहमिति परिग्रहः = सर्व ठिकाणी ग्रहच परिग्रह**(वि.)**

ज्ञानयोगाने पराभक्तिची प्राप्ती -

**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न काङ्क्षति ।**

**समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥५४॥**

**अन्वयः -** ब्रह्मभूतः, प्रसन्नात्मा, न शोचति, न काङ्क्षति, सर्वेषु, भुतेषु, समः, पराम्, मद्भक्तिम्, लभते ।

**अन्वयार्थः - ब्रह्मभूतः -** ब्रह्माला प्राप्त झालेला **प्रसन्नात्मा -** असा प्रसन्न अंत:करणयुक्त पुरुष **न शोचति -** शोक करीत नाही **न काङ्क्षति -** आणि आकांक्षा करीत नाही आणि त्याच प्रमाणे **सर्वेषु भुतेषु समः -** तो सर्व प्राणिमात्रामध्ये समान असतो असा उपर्युक्त लक्षणांनी युक्त पुरुष **पराम्, मद्भक्तिम् -** माझ्या श्रेष्ठ भक्तिला **लभते -** प्राप्त होतो.

**विवरण -** ब्रह्माला प्राप्त झालेल्या पुरुषाचे मन पवित्र, स्वच्छ, शांत आणि सतत प्रसन्नयुक्त असते अशा पुरुषाची संसाराच्या कोणत्याही वस्तुविषयी भिन्न प्रतीति, रमणीय बुद्धी आणि ममता न राहिल्यामुळे तो कोणत्याही पदार्थाविषयी शोक करीत नाही व आकांक्षाही करीत नाही, त्याचप्रमाणे सर्व भूतांमध्ये सम असतो असा संन्यासी माझ्या पराभक्तिला प्राप्त होतो.

**व्याकरणम् - ब्रह्मभूतः -** ब्रह्मन् न. भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **प्रसन्नात्मा -** प्र+सद् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि. आत्मन् पु.प्र.ए.व. **न -** न क्रि.वि.अ. **शोचति -** शुच् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **न -** न क्रि.वि.अ. **काङ्क्षति -** काङ्क्ष् प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व. **सर्वेषु -** सर्व सर्व.न.स.ब.व. **भूतेषु -** भू प्र.ग.प.प.कर्त.भू.वा.धा.वि.स.ब.व. **समः -** सम वि.पु.प्र.ए.व. **पराम् -** परा वि.स्त्री.द्वि.ए.व. **मद्भक्तिम् -** अस्मत् सर्व.ष.ए.व. भक्ति स्त्री.द्वि.ए.व. **लभते -** लभ् प्र.ग.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - प्रसन्नात्मा -** प्रसन्नः-आनन्दरूपः, आत्मा-अन्तःकरणं यस्य स प्रसन्नात्मा-प्रसन्नचित्तः = प्रसन्नचित्त आहे ज्याचे तो**(ब.स.)** यद्वा **प्रसन्नात्मा -** निरुक्तसाधनसंपत्त्या समनुष्ठितसमाधिनिष्ठा विध्वस्तरजस्तमस्तत्कार्यरागद्वेषाद्यहङ्कारममकाराद्यशेषमलतया प्रसन्नः केवलशुद्धसत्त्वभावापन्नः सर्वत्र ब्रह्ममात्रग्रहणेन प्रशान्तो विपरितप्रत्ययनिर्मुक्त आत्मा-अन्तःकरणं यस्य स प्रसन्नात्मा = निरुक्तसाधनसंपत्तिने समनुष्ठित समाधिनिष्ठेने रज, तम तसेच त्यांचे कार्य राग, द्वेषादि याप्रमाणे अहंकार आणि ममकारादि संपूर्ण

मल नष्ट झाल्यामुळे प्रसन्न-केवलशुद्ध सत्त्वभावाला प्राप्त-सर्वठिकाणी ब्रह्ममात्राचे ग्रहण केल्याने प्रशांत-विपरीत प्रत्ययाने रहित आत्मा-अंत:करण ज्याचा तो प्रसन्नात्मा **(ब.स.) मद्भक्तिम्** - मम-परमात्मन:, भ क्ति:-भजनं मद्भभक्तिस्तां मदभक्तिम् = माझ्या भक्तिला**(ष.त.स.)**

परा भक्तिने भगवत् प्राप्ती -

**भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वत: ।**

**ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम् ॥५५॥**

**अन्वय:** - भक्त्या, (अहम्) यावान्, अस्मि, च, य:(अस्मि), तत्त्वत:, माम्, अभिजानाति, तत:, माम्, तत्त्वत:, ज्ञात्वा, तदनन्तरम्, विशते ।

**अन्वयार्थ: - भक्त्या** - भक्तिच्या योगाने **अहम्** - मी **यावान्, अस्मि** - जेवढा आहे **च** - आणि **य: (अ स्मि)** - जो आहे असे तो **तत्त्वत:** - यथार्थरूपाने **माम्** - मला **अभिजानाति** - जाणतो **तत:** - पश्चात् **माम्** - मला **तत्त्वत:** - यथार्थरूपाने **ज्ञात्वा** - जाणून **तदनन्तरम्** - शीघ्रातिशीघ्र (माझ्यामध्ये) **विशते** - प्रवेश करतो.

**विवरण** - पराभक्तिरूप तत्त्वज्ञानाच्या द्वारा तो योगी माझ्या यथार्थ स्वरूपाला जाणतो म्ह. माझे निर्गुण निराकार स्वरूप काय आहे आणि सगुण निराकार आणि सगुण साकार रूप काय आहे? पुन: साकारापासून निराकार कसा होतो? निराकारापासून साकार कसा होतो? इत्यादि स्वरूपाला तो यथार्थ रूपाने अवशिष्ट न ठेवता जाणतो त्यानंतर तो संन्यासी मला यथार्थरूपाने जाणून तत्काळ माझ्या स्वरूपामध्ये अभिन्नरूपाने प्र विष्ट होतो. अर्थात निर्गुण निराकार ब्रह्मतत्त्व आहे, सगुण निराकार ईश्वर तत्त्व आहे आणि सगुण साकार भगवन्ताचे अवतार रूप आहेत. सर्व देवता आणि संपूर्ण विश्व सुद्धा तो आहे अर्थात केवल उपाधिच्या योगाने तो सगुण साकार आहे असा तो मला यथार्थ रूपाने जाणून तत्काळ माझ्या मध्ये प्रवेश करतो.

**व्याकरणम् - भक्त्या** - भक्ति स्त्री.तृ.ए.व. (**अहम्** - अस्मत् सर्व.प्र.ए.व.) **यावान्** - यद्+वतुप्,आत्व=यावत् वि.पु.प्र.ए.व. **अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **च** - च उभ.अ. **य:** - यत् सर्व.पु.प्र.ए.व. (**अस्मि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व.) **तत्त्वत:** - तद्+त्व+तसिल्=तत्त्वतस् अ. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **अभिजानाति** - अभि+ज्ञा न.ग.प.प.कर्त.लट् वर्त.तृ.पु.ए.व. **तत:** - तद्+त सिल्=ततस् अ. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **तत्त्वत:** - तद्+त्व+तसिल्=तत्त्वतस् अ. **ज्ञात्वा** - ज्ञा न.ग.उ.प.त्वान्त अ. **तदनन्तरम्** - तद् सर्व. अनन्तर न.प्र.ए.व. **विशते** - विश् ष.ग.प.प.आ.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - यावान्** - यत् परिणाममस्य यावान् = जे परिणाम याचे**(वि.)**

भक्तिसहित निष्काम कर्मयोगाने भगवत् प्राप्ति -

**सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रय: ।**

**मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥५६॥**

**अन्वय:** - मद्व्यपाश्रय:, सर्वकर्माणि, सदा, कुर्वाण:, अपि, मत्प्रसादात्, शाश्वतम्, अव्ययम्, पदम्, अव-

प्नोति ।

**अन्वयार्थ:- मद्व्यपाश्रय:-** अन्यातिरिक्त माझाच आश्रय केलेला **सर्वकर्माणि** - सर्वकर्मे **सदा कुर्वाण:, अपि** - निरंतर करीत असतांना सुद्धा **मत्प्रसादात्** - माझ्या प्रसादाच्या योगाने **शाश्वतम्, अव्ययम्, पदम्** - नित्य आणि अविनाशी अशा पदाला **अवाप्नोति** - प्राप्त होतो.

**विवरण** - मन, इंद्रिये आणि शरीर यांच्या द्वारा होणाऱ्या सर्व कर्माच्या ठिकाणी निहित असणाऱ्या ममता, आसक्ति आणि कामनांचा सर्वथा त्याग करून परमप्राप्य, परमप्रिय, परमहितैषी आणि परमाधार मीच आहे असा माझा म्हणजे परमात्म्याचाच आश्रय केलेला संन्यासी संपूर्ण नित्य, नैमित्तिक, काम्य आणि निषिद्ध कर्मे जरी करीत असला तरी तो माझ्या कृपेने सनातन अविनाशी परमपदाला प्राप्त होतो.

**व्याकरणम् - मद्व्यपाश्रय:** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. व्यपाश्रय पु.प्र.ए.व. **सर्वकर्माणि** - सर्व वि. कर्मन् न. द्वि.ब.व. **सदा** - सदा अ. **कुर्वाण:** - कृ अ.ग.उ.प.आ.प.कर्त.शानच् वि.पु.प्र.ए.व. **अपि** - अपि अ. **मत्प्रसादात्** - अस्मत् सर्व.ष.ए.व. प्र+सद् प्र.ग.प.प.+घञ्=प्रसाद पु.पं.ए.व. **शाश्वतम्** - शाश्वत वि.न. द्वि.ए.व. **अव्ययम्** - अव्यय वि.न.द्वि.ए.व. **पदम्** - पद न.द्वि.ए.व. **अवाप्नोति** - अव+आप् पं.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - मद्व्यपाश्रय:** - अहमेव-परमात्मैव भासरूपदेहद्वयस्य व्यपाश्रय:-अधिष्ठानत्वेन आश्रयो यस्य स मद्व्यपाश्रय: = मीच म्हणजे परमात्माच दोन प्रकारच्या देहाचा अधिष्ठानरूपाने आश्रय ज्याचा तो **(ब.स.)** यद्वा **मद्व्यपाश्रय:** - अहमेव-भगवान्वासुदेव एव व्यपाश्रय:-शरणं यस्य स मद्व्यपाश्रय: = मीच-भगवान वासुदेवच व्यपाश्रय-शरण आहे ज्याचा तो मद्व्यपाश्रय**(ब.स.)** यद्वा **मद्व्यपाश्रय:** - योऽहं 'अ ग्निर्मूर्धा चक्षुषि चन्द्रसूर्या' इत्युक्तलक्षण: सर्वभूतात्मभूत: सर्वात्मक: परमेश्वर: स एव व्यपाश्रयो यस्य स मद्व्यपाश्रय: = 'अग्नि मूर्धा आहे आणि चक्षु चंद्र आणि सूर्य आहे' या उक्त लक्षणाने जो मी सर्वभूतांचा आत्मभूत सर्वात्मक परमेश्वर तोच आहे व्यपाश्रय-भव-संसार त्या पासून मुक्त होण्याकरिता स्वकर्माच्याद्वारा आराधनीय आहे ईश्वर ज्याचा तो मद्व्यपाश्रय**(ब.स.) अव्ययम्** - न विद्यते व्ययो नाशो यस्य तदव्ययम् = नाही होत नाश ज्याचा ते अव्यय**(ब.स.) शाश्वतम्** - शाश्वत्-निरन्तरं भवं शाश्वतम् = निरंतर होणारा-असणारा शाश्वत**(भवार्थे त.वि.)**

भक्तिसहित निष्काम कर्मयोगाचे अनुष्ठान करण्याची आज्ञा -

**चेतसा सर्वकर्माणि मयि सन्न्यस्य मत्पर: ।**

**बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्त: सततं भव ॥५७॥**

**अन्वय:** - सर्वकर्माणि, चेतसा, मयि, संन्यस्य, बुद्धियोगम्, उपाश्रित्य, मत्पर:, मच्चित्त:, सततम्, भव ।

**अन्वयार्थ: - सर्वकर्माणि** - सर्वकर्मे **चेतसा** - मनाने **मयि** - माझ्याठिकाणी **सन्न्यस्य** - अर्पण करून **बुद्धियोगम्** - बुद्धियोगाला **उपाश्रित्य** - आश्रित करून **मत्पर:** - मत्पर झालेला तसेच **मच्चित्त:** - अन्यातिरिक्त माझ्याठिकाणी ज्याचे चित्त आहे असा **सततम्** - निरंतर **भव** - तू हो.

**विवरण** - हे अर्जुना! जेवढे काही कर्म तुझ्याकडून होतील त्या सर्वांना माझ्या ठिकाणी समर्पण करून सिद्धि आणि असिद्धि, सुख आणि दु:ख, हानी आणि लाभ त्याचप्रमाणे संसाराच्या सर्व पदार्थांमध्ये आणि प्रा

णिमात्रांमध्ये समबुद्धी ठेव. अशा प्रकारच्या समबुद्धिचा म्हणजे बुद्धियोगाचा आश्रय करून मत्पर झालेला आणि माझ्या ठिकाणी त्याचे सतत चित्त आहे असा तू हो.

**व्याकरणम् - सर्वकर्माणि** - सर्व वि. कर्मन् न.द्वि.ब.व. **चेतसा** - चेतस् न.तृ.ए.व. **मयि** - अस्मत् सर्व.स.ए.व. **सन्न्यस्य** - सम्+नि+अस् च.ग.प.प.ल्यबन्त अ. **बुद्धियोगम्** - बुद्धि स्त्री. योग पु.द्वि.ए.व. **उपाश्रित्य** - उप+आ+श्रि प्र.ग.उ.प.ल्यबन्त अ. **मत्परः** - अस्मत् सर्व.प्र.ए.व. पर वि.पु.प्र.ए.व. **सततम्** - सतत वि.न.प्र.ए.व. **मच्चित्तः** - अस्मत् सर्व.चित् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **भव** - भू प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - मत्परः** - अहमेव परः-पुरुषार्थः-प्राप्यं वस्त्विति बुद्धिर्यस्य स मत्परः = मीच आहे परमपुरुषार्थ-प्राप्य वस्तु अशाप्रकारची ज्याची बुद्धी तो मत्पर**(ब.स.) बुद्धियोगम्** - वासुदेवः सर्वमिति निश्चयो बुद्धियोगस्तं बुद्धियोगम् = सर्वठिकाणी वासुदेव आहे असा निश्चय आहे तो बुद्धियोग त्या बुद्धियोगाला**(परि.)** यद्वा **बुद्धियोगम्** - मयि समाहितबुद्धित्वं बुद्धियोगस्तं बुद्धियोगम् = माझ्याठिकाणी समाहितबुद्धित्व हाच बुद्धियोग त्या बुद्धियोगाला**(स.त.स.) मच्चित्तः** - मयि एव परमेश्वरे चित्तम्-अन्तकरणं यस्य स मच्चित्तः= माझ्यामध्ये चित्त आहे ज्याचे तो मच्चित्त**(ब.स.)** यद्वा **मच्चित्तः** - मयि-भगवति वासुदेव एव चित्तं यस्य न राजनि कामिन्यादौ वा स मच्चित्तः = माझ्यामध्ये-भगवान वासुदेवामध्येच ज्याचे चित्त राजा आणि कामिनी आदीमध्ये नाही तो मच्चित्त**(ब.स.)**

भगवच्चिंतनाने उद्धार आणि भगवदाज्ञेच्या त्यागाने अधोगति -

**मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ।**

**अथ चेत्त्वमहङ्कारान्न श्रोष्यसि विनङ्क्ष्यसि ॥५८॥**

**अन्वयः** - मच्चित्तः, मत्प्रसादात्, सर्वदुर्गाणि, तरिष्यसि, अथ, चेत्, त्वम्, अहङ्कारात्, न, श्रोष्यसि, विनङ्क्ष्यसि ।

**अन्वयार्थः - मच्चितः** - माझ्या ठिकाणी चित्त ठेवलेला असा तू **मत्प्रसादात्** - माझ्या प्रसादामुळे **सर्वदुर्गाणि** - जन्ममरणरूप संसाराला कारण असणाऱ्या अज्ञानादि सर्व संकटांना **तरिष्यसि**- तरून जाशील **अथ चेत्** - पण जर **त्वम्** - तू **अहङ्कारात्** - अहंकारामुळे **न श्रोष्यसि** - ऐकणार नाहीस तर **विनङ्क्ष्यसि** - विनाश पावशील.

**विवरण** - माझ्या ठिकाणी ज्याने चित्त अर्पित केले आहे म्हणजे स्थापित केले आहे असा तू या लोकातील आणि परलोकातील सर्व दुःखांपासून, दुर्गुण आणि दुराचारापासून त्याचप्रमाणे जन्ममृत्युरूपी मोठ्या संकटापासून मुक्त होशील म्ह. तरून जाशील. जर कदाचित अहंकारामुळे माझे उपर्युक्त प्रतिपादित वचन ऐकणार नाहीस तर तू नाश पावशील.

**व्याकरणम् - मच्चित्तः** - अस्मत् सर्व.स.ए.व. चित् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **मत्प्रसादात्** - अस्मत् सर्व.प्रसाद पु.पं.ए.व. **सर्वदुर्गाणि** - सर्व वि. दुर्ग न.द्वि.ब.व. **तरिष्यसि** - तृ प्र.ग.प.प.द्वि.भवि. द्वि.पु.ए.व. **अथ** - अथ अ. **चेत्** - चेत् अ. **अहङ्कारात्** - अहङ्कार पु.पं.ए.व. **न** - न क्रि.वि.अ. **श्रोष्यसि** - श्रु प्र.ग.प.प.द्वि.भवि.द्वि.पु.ए.व. **विनङ्क्ष्यसि** - वि+नश् च.ग.प.प.द्वि.भवि.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - मच्चित्तः -** सर्वदा ध्येयत्वेन सर्वत्र विषयत्वेन वाऽहमेव परमात्मा चित्ते यस्य स मच्चित्तः = सर्वदा ध्येयरूपाने अथवा सर्वठिकाणी विषयरूपाने मीच परमात्मा ज्याच्या चित्तामध्ये आहे तो मच्चित्त **(ब.स.) मत्प्रसादात् -** मम-अन्तर्यामिपरमेश्वरस्य प्रसादो मत्प्रसादस्तस्मात् मत्प्रसादात् = माझ्या-अंतर्यामि परमेश्वराच्या प्रसादामुळे**(ष.त.स.) सर्वदुर्गाणि -** सर्वाणि च तानि दुर्गाणि-संकटानीति सर्वदुर्गाणि = सर्व संकटे**(कर्म.स.)**

**यदहङ्कारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे ।**

**मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ।।५९।।**

**अन्वयः -** अहङ्कारम्, आश्रित्य, न, योत्स्ये, इति, यत्, मन्यसे, एषः, ते, मिथ्या, व्यवसायः, प्रकृतिः, त्वाम्, नियोक्ष्यति ।

**अन्वयार्थः - अहङ्कारम् आश्रित्य -** अहंकाराचा आश्रय करून **न योत्स्य -** मी युद्ध करणार नाही **इति -** असे **यत् -** जे **मन्यसे -** समजतोस **एषः -** हा **ते-** तुझा **मिथ्या व्यवसायः -** व्यर्थ निश्चय आहे-खोटा निश्चय आहे **प्रकृति -** (कारण) तुझा क्षात्र स्वभाव **त्वाम् -** तुला **नियोक्ष्यति -** युद्ध करण्याकरिता भाग पाडील म्हणजे युद्धामध्ये प्रवृत्त करील.

**विवरण -** 'न योत्स्ये' मी युद्ध करणार नाही अर्जुनाच्या या उक्तिचे स्मरण करून भगवान म्हणतात कि, तू जर अहंकाराचा अवलंब करून मी कदापि युद्ध करणार नाही असे तू समजतोस तर हे तुझे समजणे व्यर्थ आहे. याला काही एक मूल्य नाही कारण, तू स्वतंत्र नाहीस प्रकृतिच्या अधीन आहेस. युद्ध करण्याची तुझी इच्छा नसली तरी तुझा स्वभाव तुला युद्ध करण्याकरिता प्रवृत्त करीलच; कारण युद्ध करणे तुझे स्वाभाविक कर्म आहे ते तुला युद्धामध्ये दृढतेने म्हणजे निश्चितरूपाने प्रवृत्त करणार आहे.

**व्याकरणम् - अहङ्कारम् -** अहङ्कार पु.द्वि.ए.व. **आश्रित्य -** आ+श्रि प्र.ग.उ.प.ल्यबन्त अ. **न -** न क्रि. वि.अ. **योत्स्ये -** युध् च.ग.आ.प.द्वि.भवि.प्र.पु.ए.व. **इति -** इति क्रि.वि.अ. **यत् -** यत् सर्व.द्वि.ए.व. **मन्यसे -** मन् च.ग.आ.प.द्वि.पु.ए.व. **एषः -** एतत् सर्व.पु.प्र.ए.व. **ते -** युष्मत् सर्व.ष.ए.व. **मिथ्या -** मिथ्या अ. **व्यवसायः -** व्यवसाय पु.प्र.ए.व. **प्रकृतिः -** प्रकृति स्त्री.प्र.ए.व. **त्वाम् -** युष्मत् सर्व.द्वि.ए.व. **नियोक्ष्यति -** नि+युज् च.ग.उ.प.द्वि.भवि.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - अहङ्कारम् -** अहं करोतीत्यहङ्कारस्तमहङ्कारम् = मी करतो असा अहंकार त्या अहंकाराला **(वि.)**

**स्वभावजेन कौन्तेय निबद्धः स्वेन कर्मणा ।**

**कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत् ।।६०।।**

**अन्वयः -** कौन्तेय, स्वभावजेन, स्वेन, कर्मणा, निबद्धः, मोहात्, यत्, कर्तुम्, न, इच्छसि, तत्, अवशः, अ पि, करिष्यसि ।

**अन्वयार्थः - कौन्तेय -** हे कुंतिपुत्र अर्जुना! **स्वभावजेन स्वेन कर्मणा -** प्रकृतिजन्य आपल्या कर्माने **निबद्धः -** बद्ध झालेला असा तूं **मोहात् -** अज्ञानामुळे **यत् -** जे **कर्तुम्, न, इच्छसि -** करण्याची इच्छा करीत नाहीस

**तत् -** ते **अवश:, अपि -** प्रकृतीच्या अधीन होऊन देखील **करिष्यसि -** करशील.

**विवरण** - हे अर्जुना! तूं क्षत्रियकुलामध्ये जन्मलेला आहेस आणि त्यामुळे युद्ध करणे हे तुझे स्वाभाविक कर्म आहे त्यापासून तुला पाप लागणार नाही. यास्तव मी युद्ध करणार नाही हे तुझे बोलणे उचित नाही. या स्वाभाविक कर्माला अविवेकामुळे जर तू करण्याची इच्छा करीत नसला तरी पण आपल्या स्वभावजन्य कर्माने बद्ध झालेला असा तू स्वभाववश होऊन युद्धरूपी कर्म करशील.

**व्याकरणम् - कौन्तेय -** कौन्तेय पु.संबो.ए.व. **स्वभावजेन -** स्वभाव पु. ज वि.पु.तृ.ए.व. **स्वेन -** स्व सर्व.पु.तृ.ए.व. **कर्मणा -** कर्मन् न.तृ.ए.व. **निबद्ध: -** नि+बन्ध् न.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **मोहात् -** मोह पु.पं.ए.व. **यत् -** यत् सर्व.न.द्वि.ए.व. **कर्तुम् -** कृ अ.ग.उ.प.तुमन्त अ. **न -** न क्रि.वि.अ. **इच्छसि -** इष् ष.ग.प.प.वर्त.द्वि.पु.ए.व. **तत् -** तत् सर्व.न.द्वि.ए.व. **अवश: -** अवश वि.पु.प्र.ए.व. **अपि -** अपि अ. **करिष्यसि -** कृ अ.ग.उ.प.द्वि.भवि.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - अवश: -** न वश:-न स्वाधीनोऽवश:-स्वभावस्वाधीन: परवश:-प्रकृतेर्वश: = नाही वश -अधीन तो अवश-परवश-प्रकृतिच्या आधीन-स्वभावाधीन**(न.त.स.) स्वभावजेन -** स्वभावात्-क्ष त्रियस्वभावात् जातं स्वभावजं तेन स्वभावजेन = स्वभावापासून उत्पन्न म्हणजे अत्यंत बद्ध**(पं.त.स.)**

परमात्म्याच्या व्यापकतेचे कथन -

**ईश्वर: सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।**

**भ्रामयन्सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया ॥६१॥**

**अन्वय: -** अर्जुन, सर्वभूतानाम्, हृद्देशे, ईश्वर:, यन्त्रारूढानि, सर्वभूतानि, मायया, भ्रामयन्, तिष्ठति ।

**अन्वयार्थ: - अर्जुन -** हे अर्जुना! **सर्वभूतानाम् -** सर्व प्राणिमात्रांच्या **हृद्देशे -** हृदयामध्ये स्थित असलेला **ईश्वर: -** ईश्वर **यन्त्रारूढानि सर्वभूतानि -** यंत्रावर (जणु काय) आरूढ झालेल्या सर्व प्राणिमात्रांना **मायया -** मायेने **भ्रामयन् -** भ्रमण करवीत **तिष्ठति -** रहातो.(असतो.)

**विवरण -** मायावी पुरुष ज्या प्रमाणे यंत्रारूढ बाहुल्यांना गुप्तरूपाने फिरवून इकडे तिकडे जसा नाचवितो त्याचप्रमाणे सर्वांच्या हृदय देशामध्ये स्थित असणारा परमात्मा; शरीररूपी यंत्रावर आरूढ झालेल्या बाहुल्यांप्रमाणे सर्व प्राणिमात्रांना मायेच्या योगाने भ्रमण करवीत रहातो.

**व्याकरणम् - अर्जुन -** अर्जुन पु.संबो.ए.व. **सर्वभूतानाम् -** सर्व वि.भू प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.ष.ब.व. **हृद्देशे -** हृत् न. देश पु.स.ए.व. **ईश्वर: -** ईश्वर पु.प्र.ए.व. **यन्त्रारूढानि -** यन्त्र न. आ+रूह् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.द्वि.ब.व. **सर्वभूतानि -** सर्व वि.भू.प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.न.द्वि.ब.व. **मायया -** माया स्त्री.तृ.ए.व. **भ्रामयन् -** भ्रम् प्र.ग.प.प./च.ग.प.प.+णिच्+कर्त.शतृ=भ्रामयत् पु.प्र.ए.व. **तिष्ठति -** स्था प्र.ग.प.प.वर्त.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - हृद्देशे -** हृद:-हृदयस्य देश:-अन्तकरणं अथवा अवकाश: हृद्देशस्तस्मिन् हृद्देशे = हृदयाचा देश म्हणजे अंत:करण त्यामध्ये**(ष.त.स.) यन्त्रारूढानि -** यन्त्राणि-प्रारब्धयन्त्राणि, आरूढाणि-अ धिष्ठितानीति यन्त्रारूढानि = प्रारब्धरूपी यंत्रावर आरूढ झालेल्या**(स.त.स.)** यद्वा **यन्त्रारूढानि -** यन्त्राणि-

शरीराणि तान्यारूढानीति यन्त्रारूढानि = शरीररूपी यंत्रावर आरूढ झालेल्या**(द्वि.त.स.) भ्रामयन् -** भ्रामयती ति भ्रामयन् = भ्रमण करवीत असताना**(शतृप्रत्ययान्त णिजन्त वि.)**

ईश्वराला शरण जाण्याची आज्ञा आणि त्याचे फळ -

**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।**

**तत्प्रसादात्परां शान्तिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥६२॥**

**अन्वयः -** भारत, तम्, एव, सर्वभावेन, शरणम्, गच्छ, तत्प्रसादात्, पराम्, शान्तिम्, शाश्वतम्, स्थानम्, प्राप्स्यसि ।

**अन्वयार्थः - भारत -** हे भरतकुलोत्पन्न अर्जुना! **तम्, एव -** सर्वांच्या हृदयामध्ये स्थित असलेल्या त्या परमेश्वरालाच **सर्वभावेन -** सर्व भावाने **शरणम्, गच्छ -** शरण जा **तत्प्रसादात् -** त्याच्या कृपेमुळे **पराम्, शान्तिम् -** श्रेष्ठ शांतिला **स्थानम् -** शाश्वत पदाला **प्राप्स्यसि -** प्राप्त होशील.

**विवरण -** सर्वांच्या हृदयदेशामध्ये व्यापकरूपाने अवस्थित असलेल्या सर्व शक्तिमान परमात्म्यालाच भक्तिभावाने शरण जा. अशा प्रकारे तूं सर्वभावाने शरण गेला म्हणजे त्याच्या प्रसादाने (कृपेने) तूं परम शांतिला आणि शाश्वत स्थानाला प्राप्त होशील.

**व्याकरणम् - भारत -** भारत पु.संबो.ए.व. **तम् -** सर्व.पु.द्वि.ए.व. **एव -** एव क्रि.वि.अ. **सर्वभावेन -** सर्व वि. भाव पु.तृ.ए.व. **शरणम् -** शरण न.द्वि.ए.व. **गच्छ -** गम् प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **तत्प्रसादात् -** तत् सर्व. प्रसाद पु.पं.ए.व. **पराम् -** परा वि.स्त्री.द्वि.ए.व. **शान्तिम् -** शान्ति स्त्री.द्वि.ए.व. **शाश्वतम् -** शाश्वत वि.न.द्वि.ए.व. **स्थानम् -** स्थान न.द्वि.ए.व. **प्राप्स्यसि -** प्र+आप् पं.ग.प.प.द्वि.भवि.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - तत्प्रसादात् -** तस्य ईश्वरस्य प्रसादः-अनुग्रहस्तत्प्रसादस्तस्मात् तत्प्रसादात् = त्याच्या प्रसादामुळे**(ष.त.स.) सर्वभावेन -** सर्वश्चासौ भावः सर्वभावस्तेन सर्वभावेन-प्रेमलक्षणेन भक्तियोगेन-सर्वात्मचित्ततया = सर्वभावाने-प्रेमस्वरूप भक्तियोगाने-सर्वांचा आत्मा या भावनेने**(क.स.)**

अध्यात्म ज्ञानाच्या उपदेशाचा उपसंहार -

**इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ।**

**विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥६३॥**

**अन्वयः -** इति, मया, ते, गुह्यात्, गुह्यतरम्, ज्ञानम्, आख्यातम्, एतत्, अशेषेण, विमृश्य, यथा, इच्छसि, तथा, कुरु ।

**अन्वयार्थः- इति -** अशाप्रकारे **मया -** माझ्याकडून **ते -** तुला **गुह्यात्, गुह्यतरम्, ज्ञानम् -** गुह्यातील अत्यंत गुह्य ज्ञान **आख्यातम् -** सांगितले आहे **एतत् -** या रहस्ययुक्त ज्ञानाचा **अशेषेण -** पूर्णपणे **विमृश्य -** विचार करून **यथा, इच्छसि -** जसे तुझ्या इच्छेला येईल **तथा कुरु -** त्याचप्रमाणे तूं कर.

**विवरण -** तुला मी या ज्ञानाचा अधिकारी समजून अत्यंत गुह्यातील गुह्य ज्ञान सांगितलेले आहे. आता तू या रहस्यमय ज्ञानाचा पूर्णतया विचार करून मग तुला जसे वाटेल त्याप्रमाणे तू कर म्ह. ज्ञान किंवा कर्म यातील

जे तुला इष्ट वाटेल त्याचे अनुष्ठान कर.

**व्याकरणम् - इति** - इति क्रि.वि.अ. **मया** - अस्मत् सर्व.तृ.ए.व. **ते** - युष्मत् सर्व.च.ए.व. **गुह्यात्** - गुह् प्र.ग.आ.प.कर्म.गुह्+क्यप्=गुह्य वि.न.पं.ए.व. **गुह्यतरम्** - गुह् प्र.ग.आ.प.कर्म.गुह्+क्यप्=गुह्य वि. तद्धिते डतरच् वि.न.प्र.ए.व. **ज्ञानम्** - ज्ञान न.प्र.ए.व. **आख्यातम्** - आ+ख्या द्वि.ग.प.प.कर्म.भू.धा. वि.न.प्र.ए.व. **एतत्** - एतत् सर्व.न.द्वि.ए.व. **अशेषेण** - अशेष वि.पु.तृ.ए.व. **विमृश्य** - वि+मृश् ष.ग.प.प.ल्यबन्त अ. **यथा** - यथा क्रि.वि.अ. **इच्छसि** - इष् ष.ग.प.प.वर्त.द्वि.पु.ए.व. **तथा** - तथा क्रि. वि.अ. **कुरु** - कृ अ.ग.उ.प.(प.प.)आज्ञार्थ द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - गुह्यतरम्** - अतिशयेन गुह्यं गोप्यमिति गुह्यतरम् = अत्यंत गुह्य असे गुह्यतर(**अतिशयार्थे त.वि.**)

पुनः समस्त गीतेच्या साररूप सर्व गुह्यतम रहस्याला ऐकण्याकरिता आज्ञा -

**सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः।**

**इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम्॥६४॥**

**अन्वयः** - सर्वगुह्यतमम्, मे, परमम्, वचः, भूयः, शृणु, मे, दृढम्, इष्टः, असि, ततः, इति, हितम्, ते, वक्ष्यामि।

**अन्वयार्थः - सर्वगुह्यतमम्** - अत्यंत सर्वगुह्यातील गुह्य **मे** - माझे **परमम्, वचः** - श्रेष्ठ वचन **भूयः** - पुन्हा **शृणु** - श्रवण कर (तू) **मे** - मला (माझा) **दृढम्, इष्टः** - अत्यंत प्रिय **असि** - आहेस **तत्** - म्हणून **इति** - अशा प्रकारचे **हितम्** - हित **ते** - तुला (**भूयः** - पुन्हा) **वक्ष्यामि** - मी सांगेन.

**विवरण** - अत्यंत गुह्यातील परम रहस्य मी पूर्वी तुला एक वेळ सांगितलेले आहे. परंतु, तूं त्या उपदेशाला म्हणजे परम रहस्याला विशेषरूपाने धारण केले नाही म्हणून पुनरपि माझे सर्व गुह्यातील अत्यंत श्रेष्ठ वचन श्रवण कर. कारण, तुझा आणि माझा प्रेमाचा अटल संबंध असल्यामुळे तू माझा अत्यंत प्रिय आहेस म्हणून अशा प्रकारचे तुझे हित मी सांगेन.

**व्याकरणम् - सर्वगुह्यतमम्** - सर्व वि. गुह् प्र.ग.आ.प.कर्म.गुह्+क्यप्-गुह्य वि. तद्धिते डतमच् वि.न. द्वि.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **परमम्** - परम वि.न.द्वि.ए.व. **वचः** - वच् द्वि.ग.प.प.+असुन्=वचस् न.द्वि.ए.व. **भूयः** - भूयस् अ. **शृणु** - श्रु प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **दृढम्** - दृह् प्र.ग.प.प.भावे.भू.धा.वि.द्वि.ए.व. **इष्टः** - इष् ष.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **असि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.द्वि.पु.ए.व. **ततः** - तद्+तसिल्=ततस् अ. **इति** - इति क्रि.वि.अ. **ते** - युष्मत् सर्व.ष.ए.व. **हितम्** - धा तृ.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.न.द्वि.ए.व. **वक्ष्यामि** - वच् द्वि.ग.प.प.द्वि.भवि.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - सर्वगुह्यतमम्** - सर्वाणि च यानि गुह्यानि सर्वगुह्यानि, सर्वगुह्येभ्योऽतिशयितं गुह्यं गोप्यमिति सर्वगुह्यतमम् = सर्व गुह्यापेक्ष्याही अतिशय गुह्य(**क.स.ग.अतिशयार्थे तमप् प्रत्ययान्त त.वि.**)

भगवंताची भक्ती करण्याकरिता आज्ञा आणि तिचे फळ -

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु।**

**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥६५॥**

**अन्वयः** - मन्मनाः, भव, मद्भक्तः, (भव), मद्याजी, (भव), माम्, नमस्कुरु, ते सत्यम्, प्रतिजाने, माम्, एव, एष्यसि, मे, प्रियः, असि।

**अन्वयार्थः - मन्मनाः भव** - माझ्या ठिकाणी चित्त ठेवणारा हो **मद्भक्तः (भव)** - माझाच भक्त हो **मद्याजी (भव)** माझेच पूजन करणारा हो **माम्, नमस्कुरु** - मलाच प्रणाम कर **ते सत्यम्, प्रतिजाने** - मी तुला सत्य प्रतिज्ञा करून सांगतो की **माम्, एव** - मलाच **एष्यसि** - प्राप्त होशील **मे प्रियः, असि** - माझा तू प्रिय आहेस.

**विवरण** - माझ्या ठिकाणीच ज्याने मन समर्पित केलेले आहे असा तूं हो, अन्यातिरिक्त माझाच भक्त हो भजन पूजनादि करावयाचे असेल तर माझेच कर, नमस्कार सुद्धा मलाच कर मी तुला सत्य प्रतिज्ञा करून सांगतो की तू मलाच प्राप्त होशील कारण तू माझा अत्यंत प्रिय भक्त आहेस.

**व्याकरणम् - मन्मनाः** - अस्मत् सर्व.मनस् न.वि.पु.प्र.ए.व. **भव** - भू प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **मद्भक्तः** - अस्मत् सर्व.भज् प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **मद्याजी** - अस्मत् सर्व.याजिन् वि.पु.प्र.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **नमस्कुरु** - नम् प्र.ग.प.प.+असुन्=नमस् अ. कृ अ.ग.उ.प. (प.प.)आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **माम्** - अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **एव** - एव क्रि.वि.अ. **एष्यसि** - इ द्वि.ग.प.प. द्वि.भवि.द्वि.पु.ए.व. **ते** - युष्मत् सर्व.च.ए.व. **सत्यम्** - सत्य न.द्वि.ए.व. **प्रतिजाने** - प्रति+ज्ञा न.ग.उ.प. (आ.प.)वर्त.प्र.पु.ए.व. **मे** - अस्मत् सर्व.ष.ए.व. **प्रियः** - प्रिय वि.पु.प्र.ए.व. **असि** - अस् द्वि.ग.प.प.वर्त.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - मद्भक्तः** - मम-परमेश्वरस्य भक्त इति मद्भक्तः = माझा भक्त**(ष.त.स.)** यद्वा **मद्भक्तः** - मामेव भजतीति मद्भक्तः = मलाच भजतो तो मद्भक्त**(द्वि.त.स.) मद्याजी** - मामेव बाह्येन्द्रियैर्यष्टुम्-पूजयितुम् -आराधयितुं शीलं यस्य स मद्याजी-सदा मत्पूजापर = मलाच-माझेच बाह्येंद्रियांच्या द्वारा पूजन-आराधन करण्याचे शील आहे ज्याचे तो**(ब.स.)** यद्वा **मद्याजी** - वेदोक्तैरेव स्वकर्मभिरौपासनाद्यश्वमेधान्तैर्मामेव परमेश्वरं यष्टुमाराधयितुं शीलमस्याऽस्तीति मद्याजी = वेदोक्त औपासनाला ग्रहण करून अश्वमेधापर्यंत आपल्या कर्माच्याद्वारा माझेच आराधन करण्याचे ज्याचे शील आहे तो मद्याजी**(शीलार्थे ब.स.) मन्मनाः** - मय्येव मनो यस्य स मन्मनाः = माझेच ठिकाणी मन आहे ज्याचे तो मन्मना**(ब.स.)** यद्वा **मन्मनाः** - मयि-मोक्षस्वरूप एव मनो यस्य स मन्मनाः = माझ्यामध्ये-मोक्षस्वरूपामध्येच मन आहे ज्याचे तो मन्मना**(ब.स.)**

सर्वधर्माच्या आश्रयाचा त्याग करून केवळ भगवंताला शरण जाण्याची आज्ञा -

**सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज।**

**अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥६६॥**

**अन्वयः** - सर्वधर्मान्, परित्यज्य, माम्, एकम्, शरणम्, व्रज, अहम्, त्वा, सर्वपापेभ्यः, मोक्षयिष्यामि, मा, शुचः।

**अन्वयार्थः - सर्वधर्मान्** - सर्वधर्मांचा **परित्यज्य** - परित्याग करून **माम्, एकम्** - मी जो ईश्वर त्या मला एकट्याला **शरणम्, व्रज** - शरण ये (जा) **अहम्** - मी **त्वा** - तुला **सर्वपापेभ्यः** - सर्व शुभाशुभ पापापासून **मोक्षयिष्यामि** - मुक्त करील **मा शुचः** - म्हणून तू शोक करू नकोस.

**विवरण -** हा उपसंहारात्मक श्लोक असल्यामुळे भगवान आपले अंतिम उपदेशरूपी अमृत देण्याच्या इच्छेने अर्जुनाला म्हणतात की, हे अर्जुना! सर्व धर्मांचा म्हणजे (शास्त्रविहित आणि शास्त्रनिषिद्ध जेवढे काही धर्म अधर्म आहेत त्या सर्वांचा) त्याग करून काया, वाचा आणि मनाने मला शरण ये अशा प्रकारे तूं मला शरण आला म्हणजे (शुभाशुभ कर्माचे जे फलरूप कर्मबंधन आहे अशा त्या बंधनाने बांधलेला मनुष्य जन्म-जन्मांतरामध्ये नाना योनिमध्ये भ्रमण करीत असतो) अशा त्या कर्मबंधनरूपी पापापासून मी तुला सर्वथा मुक्त करील म्हणून तू शोक करू नकोस.

**व्याकरणम् - सर्वधर्मान् -** सर्व वि. धर्म पु.द्वि.ब.व. **परित्यज्य -** परि+त्यज् प्र.ग.प.प. ल्यबन्त अ. **माम् -** अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **एकम् -** एक संख्या वा.वि.पु.द्वि.ए.व. **शरणम् -** शृ+ल्युट्=शरण न.द्वि.ए.व. **व्रज -** व्रज् प्र.ग.प.प.आज्ञार्थ द्वि.पु.ए.व. **अहम् -** अस्मत् सर्व.प्र.ए.व. **त्वा -** युष्मत् सर्व.द्वि.ए.व. **सर्वपापेभ्यः -** सर्व वि. पाप न.पं.ब.व. **मोक्षयिष्यामि -** मुच् द.ग.(उ.प.)प.प.द्वि.भवि.प्र.पु.ए.व. **मा -** मा अ. **शुचः -** शुच् च.ग.उ.प.(प.प.)सा.भूत.द्वि.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - सर्वधर्मान् -** सर्वे च-सम्पूर्णाश्च ते धर्माः सर्वधर्मास्तान् सर्वधर्मान् = सर्वधर्मांना**(क.स.)**
**सर्वपापेभ्यः -** सर्वानि च तानि पापानीति सर्वपापानि तेभ्यः सर्वपापेभ्यः = सर्वपापांपासून**(क.स.)**

चार प्रकारच्या अनधिकाऱ्यांना गीतेचा उपदेश न करण्याची आज्ञा -

**इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन।**

**न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥६७॥**

**अन्वयः -** ते, इदम्, अतपस्काय, अभक्ताय, अशुश्रूषवे, च, यः, माम्, अभ्यसूयति, कदाचन, न, वाच्यम्।

**अन्वयार्थः - ते -** तुझे **इदम् -** हे अत्यंत गुह्य ज्ञान **अतपस्काय -** तप न करणाऱ्याला **अभक्ताय -** त्याचप्रमाणे जो माझा भक्त नसेल **अशुश्रूषवे -** ऐकण्याची इच्छा करीत नसेल **च -** आणि **यः -** जो **माम् -** मला **अभ्यसूयति -** दोषदृष्टिने पहात असेल त्याला देखील **कदाचन -** केव्हाही **न वाच्यम् -** सांगू नकोस.

**विवरण -** तू माझा अतिशय प्रिय भक्त असून सोळाव्या अध्यायामध्ये सांगितलेल्या दैवी संपत्तिने युक्त आ-हेस म्हणून मी केवळ तुझे हित व्हावे या दृष्टिने मी तुला अत्यंत गुह्यातील परमगुह्य म्हणजे अत्यंत गुप्त ठेवलेले ज्ञान सांगितलेले आहे. परंतु हे परमगुह्य ज्ञान तूं, जो स्वधर्म पालनरूप तप करीत नसेल आणि केवळ भोगाच्या आसक्तिमुळे सांसारिक विषय-सुखाच्या लोभाने धर्माचा त्याग करून पाप कर्मामध्ये प्रवृत्त होत असेल अशा पुरुषाला, त्याचप्रमाणे ज्याचे माझ्या ठिकाणी प्रेम नाही पूज्य भावना नाही, श्रद्धा भक्ति नाही अशा भक्तिरहित पुरुषाला, आणि गीता शास्त्राविषयी प्रेम आणि श्रद्धा नसल्यामुळे ऐकण्याची इच्छा होत नसेल अशा पुरुषाला, त्याचप्रमाणे माझी असूया करणाऱ्या म्हणजे मला दोष दृष्टिने पाहणाऱ्या पुरुषाला सुद्धा सांगू नकोस.

**व्याकरणम् - ते -** युष्मत् सर्व.च.ए.व. **इदम् -** इदम् सर्व.न.प्र.ए.व. **अतपस्काय -** अ+तपस्क वि.पु.च.ए.व. **अभक्ताय -** अ+भज् प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.च.ए.व. **अशुश्रूषवे -** अ+शुश्रूषु वि.पु.च.ए.व. **च -** च उभ.अ. **यः -** यत् सर्व.पु.प्र.ए.व. **माम् -** अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **अभ्यसूयति -** अभि+असू(असूञ्)+यक्-असूय'कण्ड्वादिगण'उ.प.(प.प.)वर्त.तृ.पु.ए.व. **कदाचन -** कदाचन अ. **न -** न

क्रि.वि.अ. **वाच्यम् -** वच् द्वि.ग.प.प.कर्म.ण्यत् वि.न.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - अतपस्काय -** 'ऋतं तप: सत्यं तप:' इत्यादि श्रुत्युक्तं तपो न यस्याऽस्ति सोऽतपस्कस्तस्मै अतपस्काय-तपोरहिताय = 'ऋतं तप: सत्यं तप:' इत्यादि श्रुतिने सांगितलेल्या तपाचे जो आचरण करीत नाही तो अतपस्क त्याच्या करिता-तपरहिताकरिता**(न.त.स.) अभक्ताय -** न भक्तोऽभक्तस्तस्मायभक्ताय-गुरुदेवभक्तिरहिताय = अभक्ताकरिता-गुरुदेवभक्ति यांनी रहित असलेला**(न.त.स.) अशुश्रूषवे -** श्रोतु मिच्छतीति शुश्रूषुर्न शुश्रूष्वित्यशुश्रूषुस्तस्मायशुश्रूषवे = ऐकण्याची इच्छा न करणाऱ्या करिता**(न.त.स.)** **वाच्यम् -** वक्तुं योग्यमिति वाच्यम् = जे बोलण्यास योग्य आहे ते वाच्य**(योग्यार्थे कृ.वि.)**

गीतेच्या प्रचाराचे माहात्म्य -

**य इमं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ।**

**भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशय: ॥६८॥**

**अन्वय: -** य:, इमम्, परमम्, गुह्यम्, मद्भक्तेषु, अभिधास्यति, मयि, पराम्, भक्तिम्, कृत्वा, माम्, एव, एष्य ति, असंशय: ।

**अन्वयार्थ: - य: -** जो पुरुष **इमम्, परमम्, गुह्यम् -** हे श्रेष्ठ ज्ञान **मद्भक्तेषु -** माझ्या भक्ताच्या ठिकाणी **अ भिधास्यति -** कथन करील (तो पुरुष) **मयि -** माझ्या ठिकाणी **पराम्, भक्तिम्, कृत्वा -** श्रेष्ठ भक्ति करून (पराकाष्ठेचे प्रेम करून) **माम्, एव -** मलाच **एष्यति -** प्राप्त होतो **असंशय -** या विषयी यत्किञ्चितही संशय नाही.

**विवरण -** हा उपर्युक्त सांगितलेला उपदेश मनुष्याला संसार बंधनापासून मुक्त करणारा तसेच साक्षात् मी परमात्मा त्या माझी प्राप्ती करून देणारा असा अत्यंत श्रेष्ठ आणि गुप्त ठेवण्यास योग्य असणारा आहे. परंतु, जो मनुष्य माझ्या ठिकाणी प्रेम करून म्हणजे माझी परा भक्ति करून माझ्या कडून प्रतिपादित असे हे परम रहस्ययुक्त गीताशास्त्र माझ्या भक्ताच्या अंत:करणामध्ये अर्थाच्याद्वारा दृढ करून देईल असा पुरुष मलाच प्राप्त होईल या विषयी यत्किञ्चिन्मात्रही संशय नाही.

**व्याकरणम् - य: -** यत् सर्व.पु.प्र.ए.व. **इदम् -** इदम् सर्व.न.द्वि.ए.व. **परमम् -** परम वि.न.द्वि.ए.व. **गुह्यम् -** गुह् प्र.ग.उ.प.कर्म.गुह+क्यप्=गुह्य वि.न.द्वि.ए.व. **मद्भक्तेषु -** अस्मत् सर्व.भज् प्र.ग.उ.प.कर्म.भू.धा. वि.पु.स.ब.व. **अभिधास्यति -** अभि+धा तृ.ग.उ.प.द्वि.भवि.तृ.पु.ए.व. **मयि -** अस्मत् सर्व.स.ए.व. **पराम्** - परा वि.स्त्री.द्वि.ए.व. **भक्तिम् -** भक्ति स्त्री.द्वि.ए.व. **कृत्वा -** कृ अ.ग.उ.प.त्वान्त अ. **माम् -** अस्मत् सर्व.द्वि.ए.व. **एव -** एव क्रि.वि.अ. **एष्यति -** इ द्वि.ग.प.प.द्वि.भवि.तृ.पु.ए.व. **असंशय: -** अ+संशय पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्था: - मद्भक्तेषु -** मम-परमात्मनो भक्ता:-अनन्योपासका मद्भक्तास्तेषु मद्भक्तेषु = माझ्या भक्ताच्या ठिकाणी**(ष.त.स.) असंशय: -** न संशय इत्यसंशय: = नाही संशय असा असंशय**(न.त.स.)**

**न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तम: ।**

**भविता न च मे तस्मादन्य: प्रियतरो भुवि ॥६९॥**

**अन्वय: -** च, मनुष्येषु, कश्चित्, तस्मात्, मे, प्रियकृत्तमः, न, च, भुवि, तस्मात्, अन्यः, मे, प्रियतरः, न, भ विता।

**अन्वयार्थ: - च -** आणि **मनुष्येषु कश्चित् -** मनुष्यांमध्ये कोणीही **तस्मात् -** त्या (मनुष्या) पेक्षा **मे प्रियकृत्तम: -** माझे अधिक प्रिय करणारा **न -** नाही **च -** आणि **भुवि -** या भूलोकी **तस्मात्, अन्य: -** त्याच्या पेक्षा दुसरा **मे -** माझा **प्रियतर: -** अधिक प्रिय **न भविता -** कोणीही होणार नाही.

**विवरण -** यज्ञ, दान, तप, सेवा, पूजा आणि जप ध्यानादि जेवढे काही माझे प्रिय कार्य आहेत त्या पेक्षाही जो माझ्या अमृत वचनाला म्हणजे उपदेशाला माझ्या भक्ताच्या मनामध्ये दृढ करून (ठसवून) देतो अशा प्रकारचे कार्य सर्वांमध्ये मला प्रिय आहेत. असे प्रिय कार्य करणारा सर्व मनुष्यांमध्ये त्यापेक्षा अधिक मला कोणीही दिसत नाही आणि जगतामध्ये सुद्धा मला त्या पुरुषांहून अधिक प्रिय कोणीही होणार नाही.

**व्याकरणम् - च -** च उभ.अ. **मनुष्येषु -** मनुष्य पु.स.ब.व. **कश्चित् -** किम् सर्व.पु.प्र.ए.व.चित् प्रत्ययान्त **तस्मात् -** तत् सर्व.पु.पं.ए.व. **मे -** अस्मत् सर्व.ष.ए.व. **प्रियकृत्तम: -** प्रिय वि. कृत् वि.तद्धिते डतमच् पु.प्र.ए.व. **न -** न.क्रि.वि.अ. **च -** च उभ.अ. **भुवि -** भू स्त्री.स.ए.व. **तस्मात् -** तत् सर्व.पु.पं.ए.व. **अन्य: -** अन्य सर्व.पु.प्र.ए.व. **मे -** अस्मत् सर्व.ष.ए.व. **प्रियतर: -** प्रिय वि.तद्धिते डतरच् पु.प्र.ए.व**. न -** न क्रि.वि.अ. **भविता -** भू प्र.ग.प.प.प्र.भवि.तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - प्रियकृत्तम: -** प्रियं करोतीति प्रियकृद् यद्वा प्रियस्य कृदिति प्रियकृत्, अतिशयेन प्रियकृदि ति प्रियकृत्तमः-अत्यन्तं प्रियकारी = प्रियाला करणारा प्रियकृत् म्हणजे अत्यधिक प्रिय करणारा **(उप.स.ग.त.स.ग.अतिशयार्थे त.वि.)** यद्वा **प्रियकृत्तम: -** मे प्रियमिष्टं मत्प्राप्तेरन्तरङ्गसाधनश्रवणमननध्याना दिकं नित्यं प्रयत्नेन ये कुर्वन्ति ते प्रियकृतस्तेभ्य: सर्वेभ्योऽप्युत्तम: प्रियकृत् प्रियकृत्तम: = प्रियाचा-इष्टाचा-माझ्या प्राप्तिकरिता अंतरंग साधन श्रवण, मनन, ध्यान आदिचे जे प्रतिदिन प्रयत्नपूर्वक अनुष्ठान करतात ते प्रियकृत् आहेत त्या सर्वांपेक्षा उत्तम प्रियकृत्, प्रियकृत्तम आहे**(परि.) प्रियतर: -** अतिशयेन प्रिय इति प्रियतरः = अधिक प्रिय**(अतिशयार्थे त.वि.)**

गीतेच्या पठणाचे माहात्म्य -

**अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयो:।**

**ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्ट: स्यामिति मे मति: ॥७०॥**

**अन्वय: -** च, य:, आवयो:, इमम्, धर्म्यम्, संवादम्, अध्येष्यते, तेन, ज्ञानयज्ञेन, अहम्, इष्टः, स्याम्, इति, मे, मतिः।

**अन्वयार्थ: - च -** आणि **य: -** जो पुरुष **आवयो: -** आमच्या दोघांच्या **इमम्, धर्म्यम्, संवादम् -** या धर्ममय संवादाला **अध्येष्यते -** अध्ययन करील **तेन -** त्या पुरुषाकडून **ज्ञानयज्ञेन -** ज्ञानयज्ञाने **अहम् -** मी **इष्ट: -** यजन केलेला असा **स्याम् -** होईल **इति -** असे **मे -** माझे **मति: -** मत आहे.

**विवरण -** जो पुरुष माझ्या आणि अर्जुनाच्या अशा या धर्ममय संवादरूपी गीता शास्त्राचे पठन करील म्हणजे धर्ममय संवादरूपी अर्थाचा विचार करील त्या पुरुषाकडून मी ज्ञानयज्ञाने पूजिला जाईल असे माझे निश्चित मत आहे.

**व्याकरणम् - च -** च उभ.अ. **यः -** यत् सर्व.पु.प्र.ए.व. **आवयोः -** युष्मत् सर्व.ष.द्वि.व. **इमम् -** इदम् सर्व.पु.द्वि.ए.व. **धर्म्यम् -** धर्म्य वि.पु.द्वि.ए.व. **संवादम् -** सम्+वद् प्र.ग.प.प.+घञ्=संवाद पु.द्वि.ए.व. **अध्येष्यते -** अधि+इ द्वि.ग.आ.प.द्वि.भवि.तृ.पु.ए.व. **तेन -** तत् सर्व.पु.तृ.ए.व. **ज्ञानयज्ञेन -** ज्ञान न. यज्ञ पु.तृ.ए.व. **अहम् -** अस्मत् सर्व.प्र.ए.व. **इष्टः -** इष् ष.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **स्याम् -** अस् द्वि.ग.प.प.विध्यर्थ प्र.पु.ए.व. **इति -** इति क्रि.वि.अ. **मे -** अस्मत् सर्व.ष.ए.व. **मतिः -** मति स्त्री.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - ज्ञानयज्ञेन -** ज्ञानमेव यज्ञो ज्ञानयज्ञस्तेन ज्ञानयज्ञेन-गीतापठनेन = ज्ञानच यज्ञ आहे त्याच्या द्वारा म्हणजे गीता पठणाच्याद्वारा**(क.स.)**

गीतेच्या श्रवणाचे माहात्म्य -

**श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः ।**

**सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम् ॥७१॥**

**अन्वयः -** यः, श्रद्धावान्, च, अनसूयः, नरः, शृणुयात्, अपि, सः, अपि, मुक्तः, पुण्यकर्मणाम्, शुभान्, लोकान्, प्राप्नुयात् ।

**अन्वयार्थः - यः -** जो **श्रद्धावान् -** श्रद्धायुक्त **च -** आणि **अनसूयः -** दोषदृष्टिने न पाहणारा **नरः -** असा मनुष्य या गीता शास्त्राचे **शृणुयात्, अपि -** श्रवणही करील **सः अपि -** तो देखील **मुक्तः -** सर्व पापापासून मुक्त होऊन **पुण्यकर्मणाम् -** पुण्य कर्म करणाऱ्यांच्या **शुभान्, लोकान् -** शुभ लोकांना **प्राप्नुयात् -** प्राप्त होईल.

**विवरण -** जो श्रद्धायुक्त होऊन श्रवण करणारा, त्याचप्रमाणे श्रवण करीत असतांना भगवंताच्या वचनावर कोणत्याही प्रकारचा दोषारोपण न करणारा, म्हणजे गीता शास्त्राची कोणत्याच प्रकारे अवहेलना न करणारा म्हणजे दोष दृष्टि रहित असा मनुष्य या गीता शास्त्राचे केवळ श्रवण जरी करील तो देखील या जन्म जन्मांतरामध्ये संचय केलेल्या पापासून मुक्त होऊन पुण्य कर्म करणाऱ्या श्रेष्ठ लोकाला प्राप्त होईल.

**व्याकरणम् - यः -** यत् सर्व.पु.प्र.ए.व. **श्रद्धावान् -** श्रद्धा+मतुप्=श्रद्धावत् पु.प्र.ए.व. **च -** च उभ.अ. **अनसूयः -** अनसूय वि.पु.प्र.ए.व. **नरः -** नर पु.प्र.ए.व. **शृणुयात् -** श्रु प्र.ग.प.प.विध्यर्थ तृ.पु.ए.व. **अपि -** अपि अ. **सः -** तत् सर्व.पु.प्र.ए.व. **अपि -** अपि अ. **मुक्तः -** मुच् ष.ग.उ.प.कर्म.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **पुण्यकर्मणाम् -** पुण्य वि. कर्मन् न.ष.ब.व. **शुभान् -** शुभ वि.पु.द्वि.ब.व. **लोकान् -** लोक पु.द्वि.ब.व. **प्राप्नुयात् -** प्र+आप् पं.ग.प.प.विध्यर्थ तृ.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - पुण्यकर्मणाम् -** पुण्यं पुण्यरूपं कर्म येषां ते पुण्यकर्माणस्तेषां पुण्यकर्मणाम्-अश्वमेधा दियागकर्तृणाम्-अग्निहोत्रादिकर्मवताम् = पुण्यकर्म आहे ज्यांचे ते त्यांच्या-अश्वमेध आदि याग करणाऱ्यांच्या-अग्निहोत्रादि कर्मवंतांच्या**(ब.स.) अनसूयः -** न विद्यतेऽसूया-गुणेषु दोषदृष्टिर्यस्य सोऽनुसूयः -गीतावाक्येषु गुणदोषदृष्टिरहितः = नाही असूया म्हणजे गुणामध्ये दोषदृष्टि ज्याची तो गीतावाक्याच्या ठिकाणी गुण आणि दोषरूपी दृष्टिने रहित**(ब.स.) श्रद्धावान् -** श्रद्धा-भक्तिरस्यास्तीति श्रद्धावान्-श्रद्धधानः = श्रद्धा आहे ज्याची तो-मोठा श्रद्धाळु**(अस्त्यर्थे त.वि.)**

गीताश्रवणाने अर्जुनाचा मोह नष्ट झाला किंवा नाही हे जाणण्याकरिता भगवंताचा प्रश्न -

**कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा।**

**कच्चिदज्ञानसम्मोहः प्रनष्टस्ते धनञ्जय ॥७२॥**

**अन्वयः** - पार्थ, त्वया, एतत्, एकाग्रेण, चेतसा, कच्चित्, श्रुतम्, धनञ्जय, ते, अज्ञानसम्मोहः, प्रनष्टः, कच्चित्।

**अन्वयार्थः - पार्थ** - हे पृथापुत्र अर्जुना! **त्वया** - तुझ्याकडून **एतत्** - उपदेशात्मक कथन केलेले हे गीता शास्त्र **एकाग्रेण चेतसा** - स्थिर चित्ताने **श्रुतम्, कच्चित्** - श्रवण केले काय? **धनञ्जय** - हे अर्जुना! **ते** - तुझा **अज्ञानसम्मोहः** - अज्ञानापासून निर्माण झालेला हा मोह **प्रनष्टः कच्चित्** - सर्वथा नष्ट झाला का?

**विवरण** - आपल्याद्वारा केलेला उपदेश शिष्याने धारण केला आहे की नाही, त्याच्या अंत:करणामध्ये या उपदेशाचा प्रकाश पडला आहे की नाही, त्या प्रकाशाने त्याचे अज्ञान नष्ट झाले की नाही हे आपल्या प्रिय शिष्याला विचारणे गुरुचे मोठे कर्तव्य आहे. त्याचप्रमाणे भगवान देखील या ठिकाणी आपल्या अत्यंत प्रिय शिष्य अर्जुनाला विचारतात कि, हे अर्जुन! मी जे सांगितलेले गीताशास्त्र तू एकाग्र अंत:करणाने श्रवण केले का? या गीताशास्त्राच्या श्रवणामुळे अज्ञानापासून उत्पन्न झालेला हा मोह सर्वथा नाहीसा झाला का?

**व्याकरणम् - पार्थ** - पार्थ पु.संबो.ए.व. **त्वया** - युष्मत् सर्व.तृ.ए.व. **एतत्** - एतत् सर्व.न.प्र.ए.व. **एकाग्रेण** - एकाग्र वि.न.तृ.ए.व. **चेतसा** - चेतस् न.तृ.ए.व. **श्रुतम्** - श्रु प्र.ग.प.प.कर्म.भू.धा.वि.न.प्र.ए.व. **कच्चित्** - कच्चित् अ. **धनञ्जय** - धनञ्जय पु.संबो.ए.व. **ते** - युष्मत् सर्व.ष.ए.व. **अज्ञानसम्मोहः** - अज्ञान न. सम्मोह वि.पु.प्र.ए.व. **प्रनष्टः** - प्र+नश् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **कच्चित्** - कच्चित अ.

**समासविग्रहार्थाः - अज्ञानसम्मोहः** - अज्ञानमेव संमोहः-मिथ्या भ्रम इत्यज्ञानसम्मोहः = अज्ञानच संमोह आहे**(क.स.) एकाग्रेण** - एक एव अग्रो विषयो यस्य स एकाग्रस्तेन एकाग्रेण = एकच अग्र म्ह. विषय आहे ज्याचा तो अशा त्या एकाग्राने**(ब.स.)**

आपल्या मोहाचा नाश तसेच स्मृतिची प्राप्ति करून अर्जुनाचे संशयरहित होणे आणि आज्ञा पालनाची प्रतिज्ञा करणे -

**अर्जुन उवाच** - अर्जुन म्हणाला.

**नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत।**

**स्थितोऽस्मि गतसन्देहः करिष्ये वचनं तव ॥७३॥**

**अन्वयः** - अच्युत, त्वत्प्रसादात्, (मम), मोहः, नष्टः, मया, स्मृतिः, लब्धा, गतसन्देहः, स्थितः, अस्मिः, तव, वचनम्, करिष्ये।

**अन्वयार्थः - अच्युत** - हे श्रीकृष्णा! **त्वत्प्रसादात्** - तुझ्या प्रसादामुळे **(मम) मोहः नष्टः** - माझा मोह सर्वथा नष्ट झाला **मया** - माझ्याकडून **स्मृतिः** - खऱ्या स्वरूपाविषयी स्मृति **लब्धा** - प्राप्त केली गेली **गतसन्देहः** - सर्व संदेह गेलेला असा मी **स्थितः, अस्मि** - निश्चल होऊन राहिलो आहे **तव वचनम्, करिष्ये** - (आता मी) तुझी आज्ञा पालन करील.

**विवरण** - अर्जुन म्हणतो की, हे अच्युत श्रीकृष्णा! युद्धामध्ये बंधु-बांधव नाश पावतील या शोकाने व्याकुळ

होऊन आपल्या यथार्थ स्वरूपाला न जाणणाऱ्या मोहाने व्याप्त होणारा असा मी आपली आज्ञा मानण्याकरिता तयार नव्हतो. परंतु आपल्या कृपाप्रसादामुळे माझा सर्वप्रकारचा मोह संपूर्णतया नष्ट झालेला असल्यामुळे माझ्या अंत:करणामध्ये दिव्य ज्ञानाचा प्रकाश प्राप्त झाला आहे. त्यापासून मला आपल्या गुणाची ऐश्वर्याची आणि स्वरूपाची स्मृति प्राप्ति झाली म्हणून आता मला आपल्या प्रभाव, ऐश्वर्य आणि सगुण-निर्गुण, साकार, निराकार स्वरूपाच्या विषयी त्याचप्रमाणे धर्म-अधर्म आणि कर्तव्य-अकर्तव्य या विषयी मला यत्किंश्चितही संशय राहिला नाही म्हणजे सर्व संशय नाहीसे झाले आहेत. आता मी निश्चित आपल्या आज्ञेचे पालन करीन.

**व्याकरणम् - अच्युत -** अच्युत पु.संबो.ए.व. **त्वत्प्रसादात् -** त्वत् युष्मत् सर्व.ष.ए.व. प्रसाद पु.पं.ए.व. (**मम -** अस्मत् सर्व.ष.ए.व.) **मोह: -** मोह पु.प्र.ए.व. **नष्ट: -** नश् च.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **मया -** अस्मत् सर्व.तृ.ए.व. **स्मृति: -** स्मृति स्त्री.प्र.ए.व. **लब्धा -** लभ् प्र.ग.आ.प.कर्म.भू.धा. वि.स्त्री.प्र.ए.व. **गतसन्देह: -** गत-गम् प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि. सन्देह पु.प्र.ए.व. **स्थित: -** स्था प्र.ग.प.प.कर्त.भू.धा.वि.पु.प्र.ए.व. **अस्मि -** अस् द्वि.ग.प.प.वर्त.प्र.पु.ए.व. **तव -** युष्मत् सर्व.ष.ए.व. **वचनम् -** वचन न.द्वि.ए.व. **करिष्ये -** कृ अ.ग.उ.प.(आ.प.)द्वि.भवि.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्था: - त्वत्प्रसादात् -** तव प्रसाद:-अनुग्रहस्त्वत्प्रसादस्तस्मात्त्वत्प्रसादात् = तुझ्या प्रसादामुळे **(ष.त.स.) गतसन्देह: -** गत:-ध्वस्त: सन्देह:-संशयो यस्य स गतसन्देह: = गेला आहे संदेह ज्याचा तो **(ब.स.)**

श्रीकृष्ण आणि अर्जुनाच्या संवादाचे महत्व संजय प्रतिपादन करतो -

**सञ्जय उवाच -** संजय म्हणाला

**इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मन: ।**

**संवादमिमम‌श्रौषमद्भुतं रोमहर्षणम् ॥७४॥**

**अन्वय: -** इति, अहम्, वासुदेवस्य, च महात्मन:, पार्थस्य, इमम्, अद्भुतम्, रोमहर्षणम्, संवादम्, अश्रौषम् ।

**अन्वयार्थ: - इति -** याप्रमाणे **अहम् -** मी **वासुदेवस्य-** श्रीवासुदेवाच्या **च -** आणि **महात्मन: पार्थस्य -** महात्मा अर्जुनाच्या **इमम्, अद्भुतम्, रोमहर्षणम्, संवादम् -** या विस्मयकारक आणि अंगावर रोमांच उत्पन्न करणाऱ्या संवादाला **अश्रौषम् -** श्रवण केले.

**विवरण -** त्या नंतर संजय धृतराष्ट्राला म्हणतो की, अत्यंत विस्मयकारक आणि त्याचप्रमाणे अंगावर रोमांच उत्पन्न करणाऱ्या या योगेश्वर श्रीकृष्ण आणि अर्जुनाच्या दिव्य अलौकिक संवादाचे श्रवण केले.

**व्याकरणम् - इति -** इति क्रि.वि.अ. **अहम् -** अस्मत् सर्व.प्र.ए.व. **वासुदेवस्य -** वासुदेव पु.ष.ए.व. **च -** च उभ.अ. **महात्मन: -** महान्+आत्मन्-महात्मन् पु.ष.ए.व. **पार्थस्य -** पार्थ ष.ए.व. **इमम् -** इदम् सर्व.पु. द्वि.ए.व. **अद्भुतम् -** अद्भुत वि.पु.द्वि.ए.व. **रोमहर्षणम् -** रोमहर्ष पु.द्वि.ए.व. **संवादम् -** सम्+वद्+घञ्-संवाद पु.द्वि.ए.व. **अश्रौषम् -** श्रु प्र.ग.प.प.सा.भूत.(लुङ्)प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - महात्मनः -** महान्-विशाल आत्मा-अन्तःकरणं यस्य स महात्मा तस्य महात्मनः-महानुभावस्य = मोठा आत्मा-अंतःकरण आहे ज्याचे तो त्या महात्म्याचा**(ब.स.) संवादम् -** सम्यक्-उत्तम प्रकारेण वादः-आत्मविचारो यस्मिन् स संवादस्तं संवादम् = चांगल्या प्रकारे आत्मविचार आहे ज्याच्यामध्ये तो संवाद त्या संवादाला**(ब.स.) रोमहर्षणम् -** रोमाणि-शरीरकेशानि हृष्यन्ति-पुलकीभवन्त्यनेनेति रोमहर्षणस्तं रोमहर्षणम्-रोमाञ्चकरम् = रोम-केस शरीरावरील केस हर्ष पावतात (ताठ उभे राहतात) असा रोमहर्ष त्या रोमहर्षाला-अंगावर रोमांच उभे करणाऱ्या संवादाला(अष्टसात्त्विक भावाला)**(वि.)**

**व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्गुह्यमहं परम्।**

**योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम् ॥७५॥**

**अन्वयः -** अहम्, एतद्, परम्, गुह्यम्, योगम्, व्यासप्रसादात्, कथयतः, योगेश्वरात्, कृष्णात्, स्वयम्, साक्षात्, श्रुतवान्।

**अन्वयार्थः - अहम् -** मी **एतद्, परम्, गुह्यम्, योगम् -** या गुह्यातील परम गुह्य योगाला **व्यासप्रसादात् -** व्यास महर्षिंच्या प्रसादाने (कृपेमुळे) दिव्य दृष्टि प्राप्त करून **कथयतः -** कथन करीत असलेल्या **योगेश्वरात्, कृष्णात् -** योगेश्वर कृष्णाच्या मुखातून **स्वयम्, साक्षात् -** स्वतः प्रत्यक्षरूपाने **श्रुतवान् -** श्रवण केले.

**विवरण -** भगवान व्यास महर्षिंनी माझ्यावर दया करून दूर देशामध्ये होणाऱ्या सर्व घटनांना (संवादाला) पाहण्याची ऐकण्याची आणि समजण्याची अद्भूत शक्ति प्रदान केली असल्यामुळे मी गुह्यातील अतिशय गुह्य योगाला अर्जुनाला सांगत असणाऱ्या योगेश्वर श्रीकृष्णाच्या मुखातून आपल्या स्वतःच्या श्रवणेंद्रियाने प्रत्यक्ष ऐकिले त्यामुळे मला अद्भूत हर्ष झाला.

**व्याकरणम् - अहम् -** अस्मत् सर्व.प्र.ए.व. **एतद् -** एतत् सर्व.पु.द्वि.ए.व. **परम् -** पर वि.द्वि.ए.व. **गुह्यम् -** गुह् प्र.ग.उ.प.कर्म.गुह्+क्यप्=गुह्य वि.पु.द्वि.ए.व. **योगम् -** योग पु.द्वि.ए.व. **व्यासप्रसादात् -** व्यास पु. प्रसाद पु.पं.ए.व. **कथयतः -** कथ् द.ग.उ.प.(प.प.)कर्त.णिच्+शतृ=कथयत् वि.पु.पं.ए.व. **योगेश्वरात् -** योग पु. ईश्वर पु.पं.ए.व. **कृष्णात् -** कृष्ण पु.पं.ए.व. **स्वयम् -** स्वयम् अ. **साक्षात् -** साक्षात् अ. **श्रुतवान् -** श्रु प्र.ग.प.प.कर्त.क्तवतु=श्रुतवत् भू.धा.वि.पु.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - व्यासप्रसादात् -** व्यासस्य श्रीकृष्णद्वैपायनस्य प्रसादः-दिव्यचक्षुप्रसादो व्यासप्रसादस्तस्मात् व्यासप्रसादात् = व्यासाच्या प्रसादामुळे**(ष.त.स.) योगेश्वरात् -** योगानामीश्वरो योगेश्वरस्तस्मात् योगेश्वरात् = योगेश्वरापासून**(ष.त.स.)** यद्वा **योगेश्वरात् -** योग-ज्ञानयोग आत्यन्तिकसंसारदुःखनिवृत्तिकारणं तत्सिद्धिर्यस्य प्रसादात् स योगेश्वरस्तस्माद्योगेश्वरात् = योग-आत्यंतिक संसार दुःखाच्या निवृत्तिचा कारण ज्ञानयोग त्याची सिद्धि ज्याच्या प्रसादापासून होते तो योगेश्वर त्याच्यापासून **(ब.स.)** यद्वा **योगेश्वरात् -** योग-मायायोगः सृष्ट्यादिस्तत्कर्तृत्वाद्योगेश्वरस्तस्माद्योगेश्वरात् = योग-मायायोग-सृष्ट्यादिचा कर्ता असल्यामुळे योगेश्वर त्याच्यापासून**(परि.) कथयतः -** कथयतीति कथयन् तस्मात् कथयतः = कथन करणाऱ्या पासून**(शतृप्रत्ययान्त वि.)**

श्रीकृष्ण आणि अर्जुनाच्या संवादाने संजयाचे हर्षित होणे -

**राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम्।**

**केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहः ॥७६॥**

**अन्वयः** - राजन्, केशवार्जुनयोः, इमम्, अद्भुतम्, च, पुण्यम्, संवादम्, संस्मृत्य, संस्मृत्य, मुहुः, मुहुः, हृष्यामि ।

**अन्वयार्थः - राजन्, केशवार्जुनयोः** - हे राजन् केशव आणि अर्जुन यांच्या **इमम्, अद्भुतम्, च पुण्यम्, संवादम्** - या विस्मयकारक आणि कल्याणप्रद संवादाला **संस्मृत्य संस्मृत्य** - पुन्हा पुन्हा स्मरण करून (मी) **मुहुः मुहुः** - वारंवार **हृष्यामि** - हर्षित होत आहे.

**विवरण** - संजय धृतराष्ट्राला म्हणतो की, श्रीकृष्ण आणि अर्जुनाच्या या अलौकिक तसेच पापापासून मुक्त करून पुण्य उत्पन्न करणाऱ्या आश्चर्यकारक आणि कल्याणप्रद संवादाला मी पुन्हा-पुन्हा आठवण करून वारंवार हर्षित होत आहे.

**व्याकरणम् - राजन्** - राजन् पु.संबो.ए.व. **केशवार्जुनयोः** - केशव पु. अर्जुन पु.ष.द्वि.व. **इमम्** - इदम् सर्व.पु.द्वि.ए.व. **अद्भुतम्** - अद्+भू+डुतच्=अद्भुत वि.पु.द्वि.ए.व. **च** - च उभ.अ. **पुण्यम्** - पुण्य वि.पु.द्वि.ए.व. **संवादम्** - संवाद पु.द्वि.ए.व. **संस्मृत्य संस्मृत्य** - सम्+स्मृ प्र.ग.प.प.ल्यबन्त अ. **मुहुः मुहुः** - मुहुस् अ. **हृष्यामि** - हृष् च.ग.उ.प.(प.प.)वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - केशवार्जुनयोः** - केशवश्च अर्जुनश्चेति केशवार्जुनौ तयोः केशवार्जुनयोः-श्रीकृष्णार्जुनयोः = केशव आणि अर्जुनाच्या**(द्व.स.) अद्भुतम्** - अकस्माद्भूतः-जातोऽद्भुतस्तमद्भुतम्-आश्चर्यकारकम् = अकस्मात उत्पन्न होणारा तो अद्भुत-आश्चर्यकारक त्याला**(वि.)**

भगवंताच्या विश्वरूपाचे स्मरण करून संजयाचे हर्षित होणे -

**तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः ।**

**विस्मयो मे महान्राजन्हृष्यामि च पुनः पुनः ॥७७॥**

**अन्वयः** - च, राजन्, हरेः, तत्, अत्यद्भुतम्, रूपम्, संस्मृत्य, संस्मृत्य, मे, महान्, विस्मयः, च, पुनः, पुनः, हृष्यामि ।

**अन्वयार्थः - च** - आणि **राजन्** - हे धृतराष्ट्रा! **हरेः तत्, अत्यद्भुतम्, रूपम्** - श्रीहरिच्या त्या अतिशय विस्मयकारक रूपाला **संस्मृत्य संस्मृत्य** - पुन्हापुन्हा स्मरण करून **मे**- मला **महान्** - मोठे **विस्मयः** - आश्चर्य वाटते **च** - आणि **पुनः पुनः** - पुन्हा पुन्हा **हृष्यामि** - मी आनंदित होत आहे.

**विवरण** - गुण, प्रभाव, लीला, ऐश्वर्य, महिमा, नाम आणि स्वरूप यांचे श्रवण, मनन, कीर्तन आणि दर्शनापासून संपूर्ण पाप नष्ट करणाऱ्या या श्रीकृष्णाच्या अत्यंत विलक्षण स्वरूपालाच पुनः पुनः स्मरण करून माझ्या अंतःकरणामध्ये मोठे आश्चर्य होत आहे आणि पुन्हा पुन्हा मी आनंदित होतो.(होत आहे.)

**व्याकरणम् - च** - च उभ.अ. **राजन्** - राजन् पु.संबो.ए.व. **हरेः** - हरि पु.ष.ए.व. **तत्** - सर्व.न.द्वि.ए.व. **अत्यद्भुतम्** - अति अ. अद्भुत वि.न.द्वि.ए.व. **रूपम्** - रूप न.द्वि.ए.व. **संस्मृत्य संस्मृत्य** - सम्+स्मृ प्र.ग.प.प.ल्यबन्त अ. **मे** - अस्मत् सर्व.च.ए.व. **महान्** - महत् वि.पु.प्र.ए.व. **विस्मयः** - विस्मय पु.प्र.ए.व. **च** - च उभ.अ. **पुनः पुनः** - पुनर् अ. **हृष्यामि** - हृष् च.ग.उ.प.(प.प.)वर्त.प्र.पु.ए.व.

**समासविग्रहार्थाः - राजन् -** राजते प्रकाशत इति राजा तत्सम्बुद्धौ हे राजन् = प्रकाश करतो तो राजा**(वि.)**

श्रीकृष्ण आणि अर्जुनाच्या प्रभावाचे (सामर्थ्याचे) कथन -

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।**

**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥७८॥**

**अन्वयः -** यत्र, योगेश्वरः, कृष्णः, (च) यत्र, धनुर्धरः, पार्थः, तत्र, श्रीः, विजयः, भूतिः, (च) ध्रुवा, नीतिः, इति, मम, मतिः ।

**अन्वयार्थः - यत्र योगेश्वरः कृष्णः -** ज्या ठिकाणी भगवान श्रीकृष्ण आहेत (**च -** आणि) **यत्र -** ज्या ठिकाणी **धनुर्धरः पार्थः -** गांडीवधारी अर्जुन आहे **तत्र -** त्या ठिकाणी **श्रीः -** लक्ष्मी **विजयः -** जय **भूतिः -** ऐश्वर्य (**च -** आणि) **ध्रुवा नीतिः -** अढळनीति आहेत. **इति मम मतिः -** असे माझे मत आहे.

**विवरण -** संजय म्हणतो की, हे राजन्! ज्या पक्षामध्ये योगेश्वर भगवान श्रीकृष्ण आहे आणि ज्यापक्षामध्ये गांडीव धनुर्धारी अर्जुन आहे त्या ठिकाणीच संपत्ति, विजय, ऐश्वर्य आणि अढळ नीति निश्चित असते असे माझे दृढ मत आहे.

**व्याकरणम् - यत्र -** यद्+त्रल्=यत्र सप्तम्यन्त तद्धित अ. **योगेश्वरः -** योग पु. ईश्वर पु.प्र.ए.व. **कृष्णः -** कृष्ण पु.प्र.ए.व. **यत्र -** यद्+त्रल्=यत्र सप्तम्यन्त तद्धित अ. **धनुर्धरः -** धनुस् न. धर.वि.पु.प्र.ए.व. **पार्थः -** पार्थ पु.प्र.ए.व. **तत्र -** तद्+त्रल्=तत्र सप्तम्यन्त तद्धित अ. **श्रीः -** श्री स्त्री.प्र.ए.व. **विजयः -** वि+जि प्र.ग.प.प.+अच्=विजय पु.प्र.ए.व. **भूतिः -** भू प्र.ग.प.प.+क्तिन्=भूति स्त्री.प्र.ए.व. **ध्रुवा -** ध्रुवा वि.स्त्री.प्र.ए.व. **नीतिः -** नीति स्त्री.प्र.ए.व. **इति -** इति क्रि.वि.अ. **मम-** अस्मत् सर्व.ष.ए.व. **मतिः -** मति स्त्री.प्र.ए.व.

**समासविग्रहार्थाः - धनुर्धरः -** धनुम्-गाण्डीवं धारयतीति धनुर्धरः = गांडीव धनुष्याला धारण करणारा **(उप.स.) योगेश्वरः -** योगानामीश्वरः-स्वामी योगेश्वरः = योगांचा ईश्वर म्हणजे स्वामी**(ष.त.स.)**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे**

**श्रीकृष्णार्जुनसंवादे मोक्षसन्यासयोगो नामाष्टादशोऽध्यायः ॥१८॥**

**-: अध्याय अठरावा समाप्त :-**

**॥ श्रीगुरुचरणारविन्दार्पणमस्तु ॥**

**॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥**